देशभक्त-साहित्यसम्राट

# नरसिंह चिंतामण केळकर

यांच्या

# आठवणी



संपादक व संग्राहक

सदाशिव विनायक बापट



प्रस्तावना-लेखक

श्री ज. म. करंदीकर,
बी. ए., एल्एल्. बी.,
विश्वस्त, केसरी-मराठा संस्था, पुणें.



शके १८७० ] प्रथमावृत्ति [ सन १९४८



किंमत १० रुपये

# अर्पण-पत्रिका

परमवंद्य—पवित्र भारतमातेस लाभलेल्या

## अभिनव श्रीस्वातंत्र्य-लक्ष्मीस

आणि

तदर्थ अवतरलेल्या व लहानपणापासून विशिष्ट रीतीचें वळण लावून मातृभूमीची सेवा करण्यास मला स्फूर्ति दिलेल्या महनीय

## केसरी-मराठा संस्थेस

ही 'नरसिंह'स्मृति-कुसुमांजलि कृतज्ञताबुद्धीनें अर्पण केली आहे.

—सदाशिव विनायक बापट
आठवणीकार

# 'आठवणीं'चें हृद्गत

न खलु स उपरतो यस्य वल्लभो जनः स्मरति ।

— मालतीमाधव

दे. भ तात्यासाहेब केळकर याना दिवगत होऊन एक वर्ष होत आले या कालावधीत त्याच्याविषयींचा आदरभाव अनेकांनी अनेक प्रकारानीं व्यक्त केला. कोणी स्मारक-फड उभारले, कोणी खास अक प्रसिद्ध केले, कोणा तैल-चित्राचे अनावरण केले; ज्यानी त्यानी आपापल्या परीने त्याच्या स्मृतीस आदराजलि वाहिली पण तात्यासाहेबाचे एकनिष्ठ सच्छिष्य सदाशिवराव बापट याचा 'आठवणी' प्रसिद्ध करण्याचा उपक्रम सर्वांत अधिक यशस्वी झाला असून, तो अधिकाधिक आदरणीय वाटतो इतर स्मारके तात्यासाहेबाची स्मृति जागृत ठेवण्यास उपयुक्त आहेत व त्या दृष्टीने ती अभिनदनार्यार्ह आहेत; तथापि त्या स्मारकात तात्यासाहेबाचे यथार्थ स्वरूप प्रकट होत नाही स्मारकफडातून केळकर-सभागृह निर्माण झाले, शिष्यवृत्त्या ठेवण्यात



श्री ज स. करदीकर

आल्या, केळकर-पदक देण्याची योजना झाली अथवा [illegible] असलेच दहावीस स्मृतिजागृतीचे प्रकार घडवून आणले तर त्या योगाने तात्यासाहेबाची स्मृति चिरस्थायी होईल, नाही असे नाही, पण केळकर सभागृह पाहणाऱ्या प्रेक्ष-कास, शिष्यवृत्ति पटकावणा या विद्यार्थ्यास, पदक मिळविणाऱ्या पदवीधरास जर विचारले की, या स्मृतिचिन्हावरून तुला काय बोध होतो, तर तो एवढेच सांगेल की, 'तात्यासाहेब केळकर नावाचे एक मोठे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले, त्याच्या थोरपणाचे हे स्मृतिचिन्ह आहे ' ते थोर होते म्हणजे ते कसे होते, त्याचा थोरपणा कशात होता, त्यानी राष्ट्रकार्य काय केले, समाजाच्या उत्कर्षाला ते कसे कारणीभूत झाले इत्यादि प्रश्न विचारल्यास त्याची उत्तरे देण्याला त्या स्मृतिचिन्हा-पासून त्याला काही स्फूर्ति प्राप्त होणार नाही सद्भाऊ बापटानी प्रसिद्ध केलेल्या 'आठवणी'चे पुस्तक हे अशा प्रकारचे स्मारक आहे की, त्यावरून तात्यासाहेबाची नुसती 'निर्विकल्प स्मृति'च [illegible] होणार नसून 'सविकल्प स्मृति' सदैव जागृत राहणार आहे आठवणीच्या या पुस्तकाने तात्यासाहेबाच्या स्वभावासबधाच्या

आणि त्याच्या कर्तृत्वासबधाच्या कोणत्याहि प्रश्नास त्वरित उत्तर देण्याचें साधन उपलब्ध झाले आहे आणि म्हणूनच असे साधन निर्माण करून वाचकांच्या हाती देण्याची सदाशिवराव बापटांची कामगिरी विशेष अभिनदनीय व स्वागतार्ह आहे

## चरित्र व आठवणी यांतील तारतम्य

चरित्र-प्रथानेहि चरित्रनायकाच्या स्वभावाची व गुणाची ओळख पटते. तरी पण चरित्राला काही एक ठराविक ठशाची ठेवण राखावी लागते आणि त्यामुळे चरित्रातील महत्त्वाचे तेवढे सर्व भाग ठळकपणे वाचकापुढे येतातच असे नाही. आणि दुसरा मुख्य फरक असा की, चरित्र-लेखक हा आपल्या एकट्याच्याच विशिष्ट चष्म्यातून चरित्रनायकाकडे पाहात असल्याने, त्याच्या स्वतःच्या मताची छाप चरित्रनायकाच्या कृतीवर पडलेली दिसते. आठवणीचे लेखक शेकडो असून 'भिन्नरुचिर्हि लोकः' या न्यायाने प्रत्येकाची आवडनिवड वेगळी असणारच अर्थातच चरित्रनायकाची कोणतीहि कृति इतक्याच्या दृष्टीतून निसटू शकत नसल्याने, प्रत्येक लहानसान कृत्यावर अनेकाना आपापल्या दृष्टिकोनातून प्रकाश पाडल्याने, चरित्रनायकाचे अतरग वाचकापुढे अगदी निःसकोचपणे, आडपडदा न ठेवता, माडले जाते, आणि न्यायालयात ज्याप्रमाणे एकाच्या साक्षीपेक्षा अनेकाची साक्ष सत्यत्वाने ग्राह्य धरली जाते, त्याप्रमाणे अनेकाच्या परीक्षणाच्या कसोटीला उतरलेले गुण निर्विवादपणे वाचकाना ग्राह्य धरावे लागतात इतकेच नव्हे तर, वाचकाच्या मनावर ते आपोआपच आपला ठसा त्याला न कळत पाडतात एवच कोणाच्याहि एकटाकी चरित्रापेक्षा अनेकाच्या आठवणींनी गुफलेला हा हार चरित्रनायकाचे गुणवैभव अधिक खुलवितो यात शकाच नाही

कोणतीहि चागली गोष्ट अतिरेकाने बिघडवून टाकता येते, त्याप्रमाण आठवणी लिहिण्यातहि अतिरेक करून हा प्रकार हास्यास्पद करून दाखविता येईल व त्याप्रमाणें कित्येकानी न कळत असा प्रकार केलाहि असेल तसे झाल्यास सपादकाला आपली विवेकबुद्धि चालवावी लागते व तसा त्याला स्वतःसिद्ध अधिकार असतोच कोणतीहि आठवण लिहावयाची झाल्यास ती सत्याला व औचित्याला धरूनच असली पाहिजे. त्याचबरोबर लेखाच्या लाबी-रुदीला काही प्रमाणबद्धता पाळली गेलीच पाहिजे नाही नर 'मिया मूठभर तर दाढी हातभर' असला विसगत प्रकार व्हावयाचा हा सर्व धोरणे साभाळून लेखकानी जर महत्त्वाच्या तेवढ्याच आठवणी नेटक्या, मोजक्या शब्दात, ठसठशीतपणे माडल्या तर आठवणीचा ग्रथ हा केव्हाहि सरसपणात चरित्रग्रथाला हार खावयाला लावील

दुसऱ्याहि एका दृष्टीने आठवणीचा ग्रथ चरित्रग्रथापेक्षा अधिक उपयुक्त ठरतो. चरित्रग्रथाचे वाचक थोडे तरी पोक्त व समानधर्मी असावे लागतात; त्यामुळें

त्याच्या वाचकांची सख्या बरीचशी मर्यादित होते. आठवणीचा ग्रथ आबालवृद्धाना सारखाच चित्ताकर्षक वाटणारा असल्याने वाचकाची सख्या तर अमर्याद वाढतेच; पण त्यांतल्या त्यात तरुण, होतकरू वाचकाना त्यांत अधिक गोडी वाटू लागून त्यांच्या मनावर चरित्रनायकाच्या गुणाचा ठसा अधिक लवकर उमटतो. आठवणींतून प्रतीत होणारा कोणताहि गुण एक प्रकारे इतका सहजसुलभ वाटतो की, तरुण वाचकाला आपण त्याचे अनुकरण करावे अशी ईर्षा वाटू लागते. चरित्रातलें गुणवर्णन हे न सोडविलेल्या कोड्यासारखे आपल्या आटोक्याबाहेरचे वाटले तर आठवणीतले गुणवर्णन हे सोडवून दाखविलेल्या कोड्याप्रमाणे असल्याने वाचकाला वाटते की, हे कोडे मीहि सोडवू शकलो असतो. अर्थातच आठवणींच्या वाचनाने होतकरू वाचकाचे मन त्या त्या गुणाचे अनुकरण करण्याकडे वेधले जाते आणि हाच असल्या ग्रथप्रकाशनाचा खरा उपयोग होय. नाहीतर, तसे पाहूं गेल्यास, या आठवणीच्या प्रसिद्धीकरणाने तात्यासाहेब केळकराना आता काय नवा मोठेपणा मिळावयाचा आहे ? जन्मभर देशकार्यार्थ देह झिजवून त्यानी प्रतिपक्षाच्याहि मनात भरेल आणि मत्सरग्रस्ताच्या हृदयात सलेल इतका मोठेपणा प्राप्त करून घेतलाच होता, तेव्हा त्याच्या कीर्तीत आणखी काही भर घालण्यासाठी हा प्रयत्न नसून, एका अर्थी आपली कृतज्ञता व्यक्त करून आनृण्यसपादनाचे सुख स्वतःस लाभावे आणि भावी पिढीपुढे एक अनुकरणीय आदर्श माडून त्या पिढीच्या [illegible] उचित वळण लावावे एवढीच मनीषा या प्रयत्नाच्या मुळाशी असणार.

दिवगत व्यक्तीला असल्या ग्रथप्रकाशनापासून प्रत्यक्षतः काही लाभ नसला तरी जोपर्यंत या लोकात तिची स्मृति जागृत आहे तोपर्यंत त्या व्यक्तीवर मृत्यूची मात चालत नाही अशी भावना असते. **" न खलु स उपरतो यस्य वल्लभो जनः स्मरति "** असा दडकच भवभूतीने मालती माधव नाटकात मालतीच्या तोंडून वदविला आहे त्यावरून पाहता आठवणीचे ग्रथ म्हणजे त्या त्या चरित्रनायकाला अक्षय्य कीर्तिलाभ करून देण्यासारखेच आहेत; आणि जोपर्यंत या जगात एखाद्याची कीर्ति गाजत असते तोपर्यंत त्याची परलोकातहि [illegible] दुमदुमत असते

> यावद्धि प्रथते लोके पुरुषस्य यशो भुवि ।
> तावत्तस्याक्षया कीर्तिर्भवतीत्यनुशुश्रुम ।।

यात म्हटल्याप्रमाणे इहलोकात कीर्ति असेपर्यंत परलोकात त्याचा रहिवास अक्षय्य असतो आणि जोपर्यंत त्याची आठवण ताजी आहे तोपर्यंत त्याची कीर्ति अभग असते हेहि वर सागितलेच आहे. एतावता इहपर लोकात कीर्ति अखड गजता राहण्याला आठवणी ताज्या राखणें हा सुफलदायी मार्ग आहे. याच मार्गाने श्रीयुत बापट यानी लोकमान्य टिळकाच्या कीर्तीला अक्षय्यपद लाभून दिले आहे

व तीच महत्त्वाकांक्षा मनात बाळगून तात्यासाहेबांच्याहि आठवणी प्रसिद्ध करण्याचे धाडस त्यांनीच केले आहे !

आठवणींनी नांवाला चिरस्थायीपणा सारखाच येत असला तरी प्रत्येकाचे गुण सारखेच नसल्याने, ज्याची त्याची कीर्ति अखेरीस ज्याच्या त्याच्या अंगच्या गुणावरच अवलबून असते. नसते गुण अंगी चिकटविण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी ते गुण चिकटणार कसे आणि अल्पाशानें असलेल्या गुणाचा फुगा फुगविला तरी तो कितीसा फुगेल आणि किती दिवस टिकेल ! कालासारखा खऱ्या-खोट्या नाण्याची पारख करणारा दुसरा कोणी परीक्षक नाही. लुंग्या-सुग्या व्यक्तीच्या गुणाचा फुगा कालाच्या तावडीत सांपडला की तेव्हाच फुटून नष्टप्राय होतो. तशी अवस्था लोकमान्याच्या आठवणींची झाली नाही आणि तात्यासाहेबांच्या आठवणींचीहि गत तशी होणार नाही. यावरून कोणीहि असा गैरसमज करून घेऊ नये की, लोकमान्याच्या अंगीं जे जे गुण उत्कटत्वाने वास करीत होते ते ते सर्वच गुण तात्यासाहेब केळकराच्याहि अगी वसत होते उभयताच्या गुणांत पुष्कळच तफावत होती तरी पण गुणभिन्नता असली म्हणून काही कीर्तीच्या व्यापकपणात नि [illegible] हमखास फरक पडलाच पाहिजे असे नाही.

### लोकोत्तरता व लोकप्रियता यांतील भेद

लो टिळकाच्या गुणगौरवाची सर [illegible] गुणाना येणार नाही असे म्हणण्यात [illegible] केळकराचा अपमान करतो असे मानण्याचे मुळीच कारण नाही लोकमान्य हे लोकोत्तर होते आणि लोकोत्तर पुरुषाची बरोबरी कोणीहि करू शकत नाही, म्हणूनच तर त्याना लोकोत्तर म्हणावयाचे परतु लोकोत्तर नसलेले पुढारीहि लोकप्रिय असू शकतात, किंबहुना लोकोत्तर पुढाऱ्यापेक्षा लोकोत्तर नसलेले पुढारी अधिक लोकप्रिय असू शकतात. हे विधान कित्येकास चमत्कारिक आणि विसगतहि वाटेल यास्तव त्याचे थोडेसे स्पष्टीकरण करणे आवश्यक आहे लोकोत्तर पुरुष सामान्य जनतेपेक्षा इतक्या उचीच्या पातळीवर असतो की, सामान्य लोकाना त्याजकडे दुरूनच पाहून त्या विषयी आपला आदर व्यक्त करता येतो त्याची बरोबरी करणे तर राहोच, पण त्याच्याशी सलगी करणे, त्याच्याशीं मनमोकळेपणाने चार शब्द बोलणे हे देखील अनेकाना साध्य होत नाही त्यामुळें अशा लोकोत्तर पुरुषाविषयी कितीहि मोठा आदर भाव मनात बाळगला तरी त्याला लोकप्रियतेचे स्वरूप क्वचितच येते उलटपक्षी जो पुढारी इतका लोकोत्तर नसतो त्याच्याशी सलगी करणे सामान्य माणसासहि शक्य वाटते व त्यामुळे त्याच्या लोकप्रियतेचें क्षेत्र वाढते

या मुद्दयाची अधिक फोड करण्यासाठी व्यवहारातला सामान्य दृष्टान्त घेऊ [illegible] पिताहि असतो आणि माताहि असते पित्याच्या अंगी लोकोत्तर

गुण असल्यास त्याच्या योगाने कुटुंब मोठ्या पदवीला चढते; म्हणून त्या कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीस पित्याविषयी अत्यंत आदर वाटतो. तथापि पित्याच्या प्रेमळपणाचा लाभ व्यक्तिशः प्रत्येक व्यक्तीस मिळतोच असे नाही. अर्थातच प्रत्येक व्यक्तीस त्या पित्याविषयी प्रेम वाटेलच असे म्हणवत नाही. परंतु मातेची गोष्ट वेगळी आहे. तिच्या प्रेमळपणाच्या छायेचा लाभ कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीस होतो, त्यामुळें प्रत्येक व्यक्तीला मातेविषयीं प्रेम वाटतेच वाटते. मातेच्या अगच्या गुणामुळे कुटुबाच्या मोठेपणात किती भर पडली याचा विचार कुटुबातील व्यक्ति करीत बसत नाहीत लोकमान्य टिळक हे महाराष्ट्रालाच नव्हे तर अखिल भारताला पित्यासारखे होते आणि त्यांच्या लोकोत्तर गुणामुळे भारताला गौरवसपन्नता आली, म्हणून प्रत्येक भारतपुत्राच्या चित्तात लोकमान्याविषयी निरपवाद अत्यत आदरभाव वसत होता त्या आदर-भावाला प्रेमाची जोड मिळणे वा न मिळणे हे त्या त्या व्यक्तीचा लोकमान्याशी जशा प्रकारचा सबध आला असेल त्या प्रकारावर अवलबून असणार हे उघड आहे. याचा निष्कर्ष थोडक्यात सूत्ररूपाने सागावयाचा झाल्यास असे म्हणता येईल की, ‘प्रत्येक भारतीयाच्या मनात लोकमान्याविषयी आदरभाव आणि ज्याचा त्याच्याशी निकट सबध आला त्याच्या मनात प्रेमभाव वसत असे’ तात्यासाहेब केळकराच्याविषयी जनतेला काय वाटत असे याचे पृथक्करण केल्यास त्याचा निष्कर्षाही सूत्ररूपाने असा माडता येईल की, ‘प्रत्येक भारतीयाच्या मनात तात्या-साहेबाविषयी प्रेमभाव आणि ज्याना त्याच्या मताचा थोरपणा पटला त्याच्या मनात त्याच्याविषयी आदरभाव वसत असे’

## स्पष्टीकरणार्थ एक-दोन दृष्टान्त

वरील परिच्छेदातील भेद आणखी एका दृष्टान्ताने अधिक स्पष्ट करू. वराहावतार धारण करून श्रीविष्णूने बुडालेल्या पृथ्वीला वर काढले. त्याबरोबर पृथ्वीवरील सर्व प्राणिमात्राचाहि उद्धार झाला लो. टिळकानी पारतंत्र्याच्या डोहात बुडालेल्या भारतखडाचा उद्धार केला; त्याबरोबर प्रत्येक भारतवासीयाला मोठेपणा प्राप्त झालाच, पण हा फायदा सामुदायिक असल्याने कोणीहि विशिष्ट व्यक्ति मात्र लोकमान्यानी उद्धार केला म्हणून लोकमान्याविषयी वैयक्तिक कृत-ज्ञता दर्शविण्याविषयी तळमळीने पुढे येणार नाही परंतु एखाद्या पाणबुड्याने बुडणारी शेपन्नास माणसे पाण्यातून वर काढून वाचविली असतील, तर ती सर्व माणसे जन्मभर त्याचे गुण कृतज्ञतेने आठवीत राहातील लो टिळकाची काम-गिरी वराहावतारासारखी राष्ट्रोद्धार करणारी असून, तात्यासाहेबाची कामगिरी पाणबुड्याने अनेकाचे प्राण वाचविण्यासारखी होती

वरील पौराणिक दृष्टान्ताऐवजी चालू व्यवहारातला दृष्टान्त अनेकाना अधिक

लवकर पटेल; म्हणून तसा दुसरा एक दृष्टान्त देऊ. समजा, आधुनिक काळातल्या एखाद्या मंत्र्याने ऋणमोचक कायदा करून प्रांतांतल्या हजारो ऋणग्रस्ताना ऋण-मुक्त केले, तर ऋणमुक्त समाज सामुदायिक रीतीने त्या मंत्र्याविषयी धन्योद्गार काढील; मात्र कोणीहि एक ऋणको व्यक्तिशः याने माझ्यावर उपकार केले अशी भावना बाळगणार नाही उलटपक्षी एखाद्या कर्णासारख्या दात्याने गावातील अनेक ऋणकोना, द्रव्यदान देऊन ऋणमुक्त केले तर ते व्यक्तिशः त्या दात्याचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतील; पण त्या आभाराना सामुदायिक स्वरूप येणार नाही. साराश, लोकमान्याचे लोकोत्तर गुण राष्ट्रोद्धारक असल्याने त्याचा सामुदायिकरीत्या मोठा गौरव होऊन गेला तात्यासाहेबाच्या गुणाचा लाभ असख्य व्यक्तीना, पण व्यक्तिशः, लाभ झाल्याने त्याचे वैयक्तिक चाहाते व भक्त असख्य होते व त्यामुळे त्याची लोकप्रियता व्यक्तिदृष्टीने अधिक उठावदार दिसून आली.

वरील विवेचन लक्षांत घेतल्यावर लो टिळकाच्या । ।ण। आणि तात्यासाहेबाच्या आठवणी याच्यातील भेद कोणत्या स्वरूपाचा असेल हे वाचकाच्या लक्षात आलेच असेल लोकमान्याच्या ।। ।। राष्ट्रोद्धारक गुणाविषयीचा आदरभाव व्यक्त करणाऱ्या आठवणीचा भरणा भरपूर असून, वैयक्तिक प्रेमभावदर्शक आठवणी त्या मानाने कमी आढळतात. उलटपक्षी तात्यासाहेबाच्या आठवणीत वैयक्तिक प्रेमळपणाच्या गुणगानाचा भरणा भरपूर असून, लोकमान्याच्या गुणासारख्या लोकोत्तर गुणाविषयी आदरभाव व्यक्त करणाऱ्या आठवणी त्या मानाने कमी आढळतात

लोकमान्य टिळक नि तात्यासाहेब केळकर याच्या आठवणीची तुलना केली तर त्यात वर निर्दिष्ट केलेला फरक दृग्गोचर होतो तथापि त्यातहि हे लक्षात बाळगले पाहिजे की, हे जे गुणाचे वर्गीकरण केले त्यातून कोणत्याहि एका गुणाचा सपूर्ण अभाव कोणातच आढळणार नाही कारण जर कोणात एखाद्या वर्गाच्या गुणाचा अगदीच अभाव असेल, तर तो राष्ट्रपुढारीच मानता येणार नाही; मग त्याच्या आठवणीचा सग्रह करण्याचा खटाटोप तरी कोण करील ? आणि कोणी तसा उपद्यापी सग्राहक भेटलाच तरी त्याच्या मागणीला भीक घालण्याइतकी कळकळ तरी कोणास वाटणार ? साराश, वर जो ऊहापोह केला तो सापेक्षताभाव लक्षात ठेवण्यासाठी केला; कारण जगातील व्यवहाराकडे नेहमी सापेक्षताभावानेच पाहावे लागते.

## आठवणींना कात्री कां लाविली ?

वरील विवेचनावरून हे साहजिकच लक्षात येईल की, वैयक्तिक स्नेहसबधाच्या आठवणीचा, केळकराच्या बाबतीत खरोखरच पाऊस पडेल इतका

सांठा जनतेच्या स्मृतीत असणे शक्य आहे. तरीपण त्याच त्या स्वरूपाच्या आठवणींची द्विरुक्ति होणार नाही, इतकी खबरदारी घेतली गेली असल्यानें आठवणींची सख्या पूर्वसकल्पाच्या आटोक्यात ठेवली गेली आहे. त्यामुळें आठवणी पाठविणाऱ्याचा आंकडा मर्यादेच्या आतच राखतां आला. वास्तविक पाहता ज्याला ज्याला म्हणून केळकराच्याविषयी, जे कांही सागावयाचें असेल तें सागण्याला वाव ठेवला जाणे हे स्वाभाविक होते. तथापि साप्रतच्या काळातल्या इतर कोणत्याहि सपादकाला ज्या अडचणी नडतात, त्याच या आठवणीच्या सपादकालाहि नडत असल्यामुळे, द्विरुक्ति टाळण्यासाठी कित्येक आठवणीना फाटा द्यावा लागला.

दुसरी दृष्टि औचित्याची व महत्त्वाची आठवणीत काय सागावे नि काय सांगू नये यालाहि काही तारतम्य चालवावेच लागते पुढारी झाला म्हणून काय झाले, तो नेहमीच पुढारीपणाच्या वेषभूषेने नटून सदासर्वकाळ रगभूमीवरच वावरत असतो असे नाही त्यामुळे त्याची कोणती उक्ति वा कृति पडद्याबाहेरची समजावयाची व कोणती 'जनान्तिक' समजावयाची याचा विवेक करूनच त्यासबधाची आठवण प्रकट करावयाची का न करावयाची हे ठरविले पाहिजे इग्लिश कादबरीकर्त्री जेन ऑस्टेन हिने आपल्या एका पात्राच्या तोंडून असे वदविले आहे कीं, "If we remember all the silly things that one has said in the morning and repeat them in the evening then–" ( सकाळी सहज बोलून गेलेल्या सगळ्या बावळट गोष्टी लक्षात ठेवून, तुम्ही सध्याकाळी त्या गोष्टी जर त्याच्या अगी लावू लागला तर सपलेच म्हणावयाचे ! ) यातील तात्पर्य हेच कीं, आठवण म्हणून नमूद करावयाची घटना थट्टेतील नसावी, महत्त्वाची असावी आणि त्या आठवणीतून चरित्रनायकाच्या कोणत्या तरी गुणदोषावर प्रकाश पडेल अशा स्वरूपाची ती असावी. वर्तमानपत्रात देण्यासारखी वार्ता कोणती, हिचे विवरण करताना लॉर्ड नॉर्थक्लिफ यानी दिलेले उदाहरण मार्मिक आहे. ते म्हणतात, 'एका रस्त्यात एक कुत्रा एका माणसाला चावला' ही घटना सत्य असली तरी ती प्रसिद्ध करण्यासारखे तिच्यात वैशिष्टय काय आहे? पण याच्या उलट जर 'एखादा मनुष्य बेफाम होऊन कुत्र्याला चावला' तर ती 'वार्ता' हटकून प्रसिद्ध करण्याजोगी आहे. हीच कसोटी लावून तात्यासाहेबाच्या सबधाच्या आठवणीकडे पाहू लागल्यास, 'तात्यासाहेब आमच्या घरी आले व त्याना चहा घेतला, सभेचे अध्यक्ष व्हा अशी विनती केली गेली व ती त्यानी मान्य केली, सभेला ते ठरल्या वेळी आले,' असल्या आठवणी अगदी मामुली अतएव नीरस ठरतील याच्या उलट जर कोणी असे सागितले की, 'तात्यासाहेबाना चहा देऊ केला असता काही गभीर प्रसगाने त्याचे चित्त वेधले गेल्याने चहा घेण्यालादेखील ते विसरले,

त्याना अध्यक्षपद देऊ केले असता, त्यानी स्वत: तो मान नाकारून दुसऱ्या कोणाचें नाव सुचविले, सभेस वेळेवर यावयाचें खरे, पण तिकडे 'मेंढीसाहेबाचे पिंड पाडावयाचे होते म्हणून त्याना सभेला येण्याला उशीर झाला', अशा स्वरूपाच्या आठवणी औचित्याच्या आणि गुणदर्शकत्वाच्या दृष्टीने खरोखरच सरस ठरतील, आणि हे लिहिण्यास आल्हाद वाटतो की, या ग्रंथातील बहुतेक आठवणी अशा महत्त्वाच्या स्वरूपाच्याच आहेत, आणि त्यातील कित्येक आठवणी फारच सुरस आहेत याचे श्रेय त्या आठवणी पाठविणारास तर आहेच, पण आलेल्या आठवणींची सरस-नीरसतेच्या दृष्टीने छाननी करून औचित्याचा भग न होईल, अशाच आठवणी निवडून काढण्याचे जे परिश्रम श्रीयुत बापट यानी केले त्यानाहि त्या श्रेयाचे वाटेकरी केले पाहिजे अशी निवड करताना त्यानी चाळण आणि कात्री या दोहोंचाहि उपयोग केलेला दिसतो चाळून पाखडून घेताना कित्येक आठवणी अजीबात गाळाव्या लागल्या असतील आणि निवडून घेतलेल्या आठवणींतहि शिगे, शेपट उपसर्गदायक होऊ नयेत म्हणून त्याची छाटाछाटहि त्यास करावी लागली असेल असे केल्याबद्दल त्याना अनेकाचा रोष पत्करावा लागला असेल परतु जे कार्य ज्या उद्देशाने हाती घेतल असेल त्याला बाधक होणार सर्व प्रकार टाळणे क्रमप्राप्तच असते त्यातूनहि आठवणी पाठविण्याविषयी विनती करताना बापटानी आपले धोरण जाहीर करून, आठवणीचे स्वरूप व त्याचा विस्तार कसा व किती असावा हेहि आगाऊ कळविले होते, त्याप्रमाणे आठवणी पाठविण्याची मुदतहि दिग्दर्शित केली होती या सर्व मर्यादा सभाळून ज्यानी आठवणी पाठविल्या त्याच्या त्या तशाच स्वीकारल्या गेल्या, आणि ज्यांच्यात थोडीबहुत छाटाछाट करून भागेल असे वाटले तेथे त्यानी तशी शस्त्रक्रियाहि केली, पण ज्या आठवणी अशा चौकटीत बसू शकल्या नाहीत त्या परत करण्यात आल्या, याबद्दल त्याना दोष देणे अन्यायाचे ठरेल.

आपण जीव तोडून लिहावें आणि त्याची सपादकाना अशी वासलात लावावी हे ज्याच्या मानी स्वभावाला मानवले नाही त्यानी आपल्या आठवणी पाठविण्याचेच टाळले याबद्दल त्यानाहि तत्त्वत: दोष देता येत नाही; कारण प्रत्येकाला मतस्वातंत्र्य आहेच तथापि त्यानी आपल्या आठवणी न पाठविल्यानें तात्यासाहेबाच्या गुणगानात काही अपुरेपणा राहिला अशातला भाग नाही कारण इतरानी त्याचा वचपा भरून काढला आहेच मात्र आठवणी न पाठविणाऱ्याच्या मनाचा प्राजळपणा व्यक्त होण्याची सधि त्यानी दवडली असे म्हणावेसे वाटते. समेटप्रियता हा तात्यासाहेबाचा एक विशेष गुण होता व त्या गुणाची जाणीव आपल्यालाहि आहे हे दाखविण्याला ही उत्तम सधि होती "धर्मं शुश्रूषमाणेभ्य: पृष्टेन च सता पुन । वक्तव्य विदुषा नित्य धर्ममाहुर्मनीषिण.॥ अप्रतिब्रुवत कष्टो दोषो हि भविता प्रभो ॥" असे व्यासमहर्षींनी महाभारतात म्हटले आहे

असो; ज्यानी ज्यानी आठवणी पाठविल्या आणि त्यात जरूर तशी छाटाछाट करण्याचीहि परवानगी बापटांना दिली त्यांचा तात्यासाहेबांविषयीचा हा आदर प्रशंसनीय आहे; आणि प्रस्तुतचा ग्रंथ अशा प्रांजलबुद्धीच्या सहकार्याचे फळ आहे

सकटग्रस्तास साहाय्य करण्याची तत्परता

कोणीहि कोठलाहि मनुष्य कसाहि असला तरी त्याची सकटग्रस्त स्थिति पाहून तात्यासाहेबांना कळवळा येई व ते आपल्याकडून त्याच्या संकटमुक्ततेसाठी शक्य ती खटपट करीत व त्याकरिता अधिकारी वर्गाकडे भीड खर्चावी लागली तरी ती खर्चण्यास काकू करीत नसत या सबधात अक्कलकोटच्या मगरूळकर पुजारीबंधूंचे उदाहरण नमुनेदार म्हणून देण्याजोगे आहे. सदर पुजाऱ्यांची जमीन सस्थानांतून जप्त करण्यात आली होती. त्या प्रकरणात तात्यासाहेबांनी मध्यस्थी करावी अशी पुजाऱ्यांनी विनंती केल्यावरून तात्यासाहेबांनी संस्थानच्या दिवाणाकडे खासगी रीतीने पत्र लिहिले त्या पत्राला दिवाणाकडून आलेल्या पत्राचा उताराच पुढे देण्यात येत आहे. त्यावरून तात्यासाहेबांची परोपकार-तत्परता व्यक्त होते

दिवाणांच्या पत्राचा उतारा

श्री अक्कलकोट,

ता १६।३।१९२८

श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर, मु पुणे, यासी —

कृ सा. न वि. वि.

आपण ता ७।१०।२६ चे खासगी पत्र लिहिले. त्यात मि. पुजारीबंधु मग-रूळकर याच्या साराबाकी-वसुलीसाठी सरकारजमा केलेल्या जमिनी, त्यांच्या गरिबीकडे व पुढे ते चागल्या वर्तणुकीने राहतील अशा कबुलीनंतर व त्यांच्या चुकीमुळे त्यांच्या मुलाबाळांचे नुकसान होऊं नये म्हणून, परत याव्यात अशा आशयाचे लिहिलेले होते.

पुजारीबंधूंचे वर्तन अक्कलकोट संस्थानातच नव्हे तर इतर कोठेंहि असभ्यपण ठरलें असतें. अशा परिस्थितींत सुद्धां त्यांची गरिबी, त्यांना झालेला पश्चात्ताप व त्यांच्या नुकसानीचें भान हे सर्व श्रीमंतांनी लक्षांत घेऊन, दयार्द्र अंतःकरणाने पुजारीबंधूवर मेहेरनजर करून त्यांच्याकडे येणे असलेली तगाई-बाकी सर्व वसूल दिल्यावर व आपली वर्तणूक सुधारण्याची कबुली दिल्यावर, त्यांच्या जमिनी त्याना परत देण्याचा हुकूम केला आहे. कळावे, ही विनंती.

सही इंग्रजी

दिवाण, स. अक्कलकोट.

सदरहू पुजारीबधूंचा व त्याच्या चळवळीचा आणि सस्थानच्या जप्ती-हुकुमाचा तात्यासाहेबाशी अर्थाअर्थी कांहीं सबध नसता, आपल्या पत्राने त्या कुटुबावरील आपत्ति टळत असल्यास तें साहाय्य करणे आपले कर्तव्य होय असे मानून, केवळ दयार्द्रबुद्धीने व कनवाळूपणाने त्यानी पत्र लिहिले व त्याचा वर दर्शविल्याप्रमाणे सुपरिणाम झाला अशाच रीतीने तात्यासाहेबानीं किती लोकावर किती प्रकारानीं उपकार केले असतील याची गणतीच करवत नाही !

तात्यासाहेब केळकर यांचे चरित्र विद्यमान पिढीला तरी सपूर्णपणे अवगत आहे. भावी पिढ्याकरिता त्यानी स्वतःच आत्मवृत्त लिहून ठेवले आहे. त्याचबरोबर त्याच्यासबधीच्या आठवणीच्या पुस्तकातून त्याचे चरित्र शोधून काढण्याचा द्राविडीप्राणायाम कोणीहि करू नये असे स्वतः तात्यासाहेबानीच वाचकांना बजावले असल्यामुळे, प्रस्तुतच्या आठवणीच्या सग्रहातून त्याचे चरित्र शोधून काढण्याचा खटाटोप कोणी करू नये तर मग या आठवणीच्या सग्रहातून पाहावयाचे काय असे जर कोणी विचारील, तर त्यान्या • • ' असे उत्तर देता येईल की, या आठवणी म्हणजे तात्यासाहेबाच्या चरित्राची पार्श्वभूमि होय

## मनाशीं प्रतारणा केली नाही

अशा या पार्श्वभूमीवरून पाहिल्यास तात्यासाहेबाच्या अगच्या अनेक सद्गुणापैकी त्याचें बुद्धिवैभव, त्याचा प्रेमळपणा, त्याची परोपकारतत्परता, त्याचे रसिकत्व, त्याचा विनोदीपणा, [illegible] इत्यादि गुण अत्यत ठळकपणाने प्रतीतीस येतात त्याचे सौजन्य ज्यात चमकत नाही अशी एकहि [illegible] सद्मा आढळणार नाही त्याच्या मनांत कपटभाव [illegible] आढळणार नाही. त्याचा दरबार अगदी खुल्लमखुल्ला असा असे ते जे बोलत तेच करीत, आणि जें करीत तेच ते आपल्या व्याख्यानातून प्रतिपादीत असत. जाहीर सभेत एक मत, खाजगी चर्चेत दुसरेच, स्वतःच्या आचरणात तिसरेच आणि कोणी सल्ला विचारला तर चौथेच, असे त्याच्या मताचे भिन्न भिन्न कप्पे नसत. सरकारी अधिकाऱ्यापासूनहि त्यानी आपलीं मते कधी लपवून ठेवली नाहीत असा त्याचा उघडा कारभार असल्याने आपले मत बनवितानाच ते दूरवर विचार करीत आणि एकदा पूर्ण विचारांती आपले मत बनविल्यावर त्याला ते ठाम चिकटून राहात.

आपल्या मताच्या ठामपणामुळें त्यांचा आत्मविश्वासहि दृढतर झाला होता तरी पण ते दुसऱ्याच्या मताची हेटाळणी करीत नसत आपलें मत स्वतत्रपणे बनविण्याचा प्रत्येकाला हक्क आहे, असे ते मानीत आणि त्या मतस्वातत्र्याचा [illegible] आपल्या मताची ते कोणावरहि सक्ति

करीत नसत. मतस्वातंत्र्याचा हक्क बजावल्याबद्दल ते कधीं कोणावर रुष्ट झाले नाहींत. एवढेच नव्हे तर त्यांची उलट अशी तक्रार असे कीं, अनेक मोठीं माणसे-देखील आपले मत स्वतंत्रपणें न बनवितां, दुसऱ्याची मते, स्वतःला पटत नसता उसनी घेतात, आणि स्वतःचे खरे मत सागण्याला कचरतात. तात्यासाहेबांनीं स्वतःच्या मनाशीं अशी प्रतारणा कधींहि केली नाहीं. अर्थातच इतर कोणीं तशी ती केल्यास त्याची त्यांना चीड येई.

तात्यासाहेबाची समेटप्रियता हा कित्येक शिष्टांना एक थट्टेचा विषय होऊन बसला होता. परतु कोणत्याहि वेळी त्यानीं समेटासाठी स्वतःची तत्त्वच्युति होऊ दिली नाही. तत्त्वाला धक्का लागू न देतांहि सौजन्याने वागल्यास निष्कारण माजणारा कलह टाळता येतो हेच त्यानी आपल्या आचरणाने दर्शविले.

## 'नरसिंह'-नामावळी

या ग्रथातील आठवणी म्हणजे एकेक गुणबोधक नामकरण असेच मानता येईल. आठवणीच्या लेखकाची सख्या पाचशेच्या आतच असली, तरी त्यातल्या कित्येकाच्या आठवणी दोन अगर दोहोहून अधिक असल्याने एकदर आठवणीची सख्या एक हजाराहून अधिक भरते. अशा या एक सहस्र आठवणी म्हणजे एक-प्रकारे विष्णुसहस्रनामावळीप्रमाणे 'नरसिंह' नामावळीच होय ही उपमा वाच्या-र्थाने शब्दशः खरी धरावयाची नाही हे सागावयास नकोच कारण प्रत्येक आठवणीत अगदी वेगवेगळया गुणाचे दिग्दर्शन असेलच असे म्हणवत नाही. काही आठवणीत तर परस्परविरुद्ध गुण दिग्दर्शित केलेले असतील उदाहरणार्थ, न्याय आणि दयार्द्रबुद्धि, कडक शिस्त आणि क्षमाशीलता, समेट-प्रियता आणि स्वमताभिमान, काटकसर आणि औदार्य, निरहकारवृत्ति आणि स्वाभिमान अशा या जोड्या परस्परविरोधी भासतान तथापि तो खरा विरोध नसून, विरोधाभासच होय. स्थल, काल, व्यक्तिसबध याच्या भिन्नतेमुळें यातील कोणत्याहि गुणाला दोषत्व येत नसून, त्या प्रसगी तद्विरुद्ध गुणच दोषावह झाला असता. प्रेमळ माता आपल्या मुलाचे लाडहि करते आणि प्रसगविशेषी त्याला शासनहि करते. तिचे हे परस्परविरुद्ध भासणारे वर्तन त्या त्या प्रसगानुरोधाने उचितच ठरत असल्यानें, दोन्ही प्रकार गुणातच समाविष्ट होतात. त्याचप्रमाणे तात्यासाहेब केळकर हे कधी रागावून कडक शासन करीत नसत असेहि नाही आणि चुकीची क्षमा करीत नसत असेहि नाही. अर्थातच त्या त्या परिस्थितीत त्याचे ते वर्तन त्यांना शोभूनच दिसे. विष्णुसहस्रनामांत 'भयकृत्' आणि 'भयनाशन' अशा विरोधी नावाप्रमाणेच हे समजावे.

## इंग्रजी आठवणींचें वैशिष्ट्य

मराठींत व हिंदींत ज्या आठवणी प्रसिद्ध झाल्या आहेत त्याच्यात सकृद्-

असें कांही ठिकाणी विरोध दिसण्याचा संभव असल्यामुळे हा खुलासा करावा लागला. इंग्रजी आठवणींसंबंधानं अशा खुलाशाची गरजच भासणार नाही. इंग्रजी आठवणीत विशिष्ट प्रसंगाचे वर्णन थोडेंच आढळते. त्यांतील वर्णन हे सामान्यपणे गुणाचें बीज करण्याच्या स्वरूपाचेंच असल्यामुळे, त्यात त्यांच्या वर्तनावरून वाचकांनी गुणानुमान करावें अशी अपेक्षाच त्या त्या लेखकांनी ठेवली नसून, लेखकांनी स्वतःच तात्यासाहेबांच्या गुणाचे वर्णन मुक्तहस्तानें केलें आहे. मराठी आठवणींत तात्यासाहेब घरी, दारी, शेजारी कसे दिसत याचा ऊहापोह आहे; तर इंग्रजी आठवणींत सार्वजनिक कार्यकर्ते या नात्यानें परस्थ लोकांस ते कसे दिसले याचें वर्णन आहे. त्यांच्या सार्वजनिक कार्याचा संबंध हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतील प्रमुख पुढाऱ्यांशी तर आलाच, पण त्याशिवाय विलायतेतील कित्येक पुढाऱ्यांशीहि त्यांचा स्नेहसंबंध आला होता अशा अनेक प्रमुख व्यक्तींनी तात्यासाहेबांच्या कर्तृत्वासंबंधानें जे अभिप्राय व्यक्त केले आहेत ते वाचून त्यांच्याविषयींचा आदर कितीतरी पटींनी अधिक वाढतो

विशेषतः डॉ जयकर, बॅ मेथा, लाला दुनीचंद, सर मिर्झा इस्माइल, एन्. सी नरसिंहाचार्य, सर सी पी रामस्वामी अय्यर, डॉ. गोकुलचंद नारंग, डॉ. श्यामाप्रसाद मुकर्जी, हेलिना नॉर्मंटन, देवेंद्रनाथ मुकर्जी, कॅप्टन केशवचंद्र इत्यादींचे गुणगौरवपर लेख अत्यंत मार्मिक आणि मननीय आहेत तात्यासाहेबांचें पुढारीपण किती विविध स्वरूपाचें आणि उच्च कोटीचें होतें याची प्रतीति त्यांच्या लेखांवरून चांगली येते

याप्रमाणे स्वकीय व परकीय, स्वपक्षीय आणि परपक्षीय, हिंदु, मुसलमान, पारसी, अँग्लोइंडियन, युरोपिअन या सर्वांनाच तात्यासाहेब सारखेच आदरणीय व अनुकरणीय वाटत होते याचा पुरावाच या सहस्रावधि आठवणींच्या रूपानें श्रीयुत सदाशिवराव बापट यांनी वाचकांच्यापुढे ठेवला आहे.

## सद्वर्तनाचा आदर्श

अशा रीतीनें या आठवणी म्हणजे बोधप्रद तत्त्वे मनावर ठसविणारे ठसेच होत. अशा आठवणींच्या द्वारा चरित्रनायकाच्या अंगच्या विविध गुणांवर तर प्रकाश पडतोच, पण त्याबरोबरच तो तो सद्गुण आपल्या अंगी बाणण्यास आपण व्यवहारांत कसें वागावें ही शिकवणूक मिळते आणि कोणतीहि शिकवणूक आपल्या आहाराबाहेरची नसल्यास, ती कृतींत उतरविण्याचा प्रयत्न आपल्या हातून सहजासहजीं घडूं लागतो, हा असल्या आठवणींपासून मोठाच लाभ होय. याकरितांच असें आग्रहपूर्वक सांगावेसें वाटतें की, वयातीततेमुळे ज्यांचा स्वभाव अद्यापि पक्का ताठर बनला नसून, ज्यांच्यांत थोडा तरी लवचिकपणा उरला आहे, अशा मध्यमावस्थेतल्या वाचकांनी या आठवणी अवश्य वाचून आपल्या

स्वभावाला शक्य तेवढे चांगले वळण लावण्याचा यत्न करावा. बाल व तरुण वाचकांनी तर या [illegible] । म्हणजे आपल्यापुढे ठेवलेला सद्वर्तनाचा आदर्शच आहे असे मानून, हा कित्ता गिरविण्याचा अभ्यास करून भलेपणा संपादावा असो; श्री. सदाशिवराव बापट हे असले आठवणीचे ग्रंथ संपादन करण्यात किती परिश्रम करतात याची नव्याने जाणीव करून देण्याचे कारण नाही. लो. टिळकांच्या आठवणीचे तीन खंड प्रसिद्ध करून त्यांनी एक विक्रम पूर्वी करून दाखविलाच आहे. त्या मानाने प्रस्तुतचा विक्रम छोटा भासत असला तरी लोकमान्यांविषयींचा जनतेतला आदर व त्या वेळची महाराष्ट्राची परिस्थिति आणि तात्यासाहेबांच्याविषयींचा आदर व या वेळची महाराष्ट्रातली विपरीत परिस्थिति या दोहोंची तुलना केल्यास सद्यःस्थितीत त्यांना इतके यश लाभले हाच त्यांचा मोठा विक्रम होय या संबंधात त्यांच्या मार्गात किती अडचणी उभ्या राहिल्या त्याचे वर्णन त्यांनी आत्मनिवेदनात केलेच आहे पण कोणत्याहि परिस्थितीत निराश व्हावयाचे नाही असा त्यांचा कृतनिश्चय असल्याने त्यांच्या चिकाटीला एवढे यश लाभले. एकनिष्ठ [illegible] एवढी यातायात कोणी करू शकत नाही. अर्थातच लो. टिळकांविषयी जसा नितान्त आदर बापटांच्या चित्तात होता तसाच आदर तात्यासाहेबांच्याविषयीहि त्यांच्या मनी वसत असल्यामुळे त्यांनी मनोभावाने ही वाङ्मयअर्चा केली. या अर्चनकार्यात तात्यासाहेबांच्या दृष्टीने काही मंत्रतंत्र, विधिविधान, आचारोपचार चुकला असला तरी तात्यासाहेब हे आपल्या स्वभावजन्य सौजन्याने, सामप्रियतेने आणि गुणग्राहक वृत्तीने या कृतीकडे पाहतील आणि त्यांना आत्मस्तुति जरी मनापासून आवडत नसली, तरी श्रीयुत बापटांच्या मनातील सद्भाव जाणून त्यांचा आत्मा या वाङ्मयपूजेने संतुष्ट होईल असा भरवसा वाटतो.

केसरी कार्यालय,
आश्विन शुद्ध १
दि २।१०।४८

ज. स. करंदीकर

# आत्मनिवेदन



मत्कथाश्रवणे श्रद्धा मदनुध्यानमुद्धव ।
सर्वलाभोपहरणं दास्येनात्मनिवेदनम् ॥
एवं धर्मैर्मनुष्याणामुद्धवात्मनिवेदनम् ।
मयि संजायते भक्तिः कोऽन्योऽर्थोऽस्यावशिष्यते ॥

— श्रीमद्भागवत

आपणास निवेदावें । आपण विवेकें नुरावें ।
आत्मनिवेदन जाणावें । याचे नांव ॥ — श्रीसमर्थ

कै. देशभक्त साहित्यसम्राट् नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर याच्या आठवणीचा हा ग्रथ आज त्याच्या वर्षश्राद्धाच्या दिवशी वाचकास सादर करण्यास मला आनद — दुःखमिश्रित आनद — होत आहे ! वस्तुत' हे त्याचे वाङ्मय-श्राद्ध कोणा अधिकृत व्यक्तीकडून होते तर ते योग्य झाले असते व त्यामुळें मला विशेष आनद झाला असता तथापि आपल्या धर्मकल्पनेप्रमाणे दिवगत व्यक्तीच्या कुलातील कोणीहि हे कृत्य करण्यास अधिकारी असतो. त्याप्रमाणे कै तीर्थस्वरूप तात्यासाहेबाच्या सार्वजनिक किबहुना राजकीय परिवारातील एक अत्यत विनम्र घटक मी आपणास समजत असल्यामुळे, श्रद्धापूर्ण अतःकरणाने करावयाचे हे वाङ्मयश्राद्ध करण्याचे पुण्य माझ्या वांट्यास आले हे मी माझे भाग्यच समजतो.

हे सत्कर्म करण्याचे पुण्य मला लाभेल अशी मला कल्पना नव्हती कारण खुद्द तात्यासाहेबांस यास अशा प्रकारची योजना मुळीच अभिप्रेत नव्हती, व त्याचा स्वभाव लक्षात घेता असे असणे हे अगदी स्वाभाविकच होते. लो. टिळकाच्या आठवणींच्या पहिल्या खडास त्यानी प्रस्तावना लिहिली आहे त्या ग्रथाची त्या वेळी जाहिरात मी 'केसरी'त दिली; तीत त्याच्या नावामागे 'साहित्य-सम्राट्' असे उपपद मी लिहिले होते 'केसरी'च्या सदर जाहिरातीचे स्टीरिओ केलेले पान त्यानी आदल्या रात्री सहज पाहिले जाहिरातीतील 'साहित्यसम्राट्' हा शब्द पाहून त्याना राग आला व तेवढा तो शब्द त्यानी छिनीने उडवून लावला ! दुसऱ्या दिवशी सकाळीं मी 'केसरी' पाहतो तो हा प्रकार दिसला. चकित झालो. चौकशी करता तात्यासाहेबाकडे बोट दाखविण्यात आले. त्यास विचारतां ते म्हणाले, " अहो, माझा स्वभाव तुम्हास माहीत आहे माझ्या माणसाने, माझ्या पत्रात, माझी अशी स्तुति करणे बरोबर आहे का ? हे मला बिलकुल मजूर नाही; म्हणून मी तो शब्द काढून टाकला " " प्रभवो ह्यात्मनः स्तोत्र जुगुप्सन्त्यपि विश्रुताः " ( समर्थपुरुष आपल्या वर्णनीय गुणाचीहि स्तुति करवीत नाहीत, ती ऐकण्याच

त्यास कटाळा येतो. ) हे श्रीमद्भागवतांतील वचन तात्यासाहेबाना कसे लागू पडते ते दिसून येतें. अर्थात् अशा विनयसपन्न पुरुषाला प्रस्तुत ग्रंथासारखा प्रयत्न कसा मजूर होणार ? आत्मस्तुतीसबंधाने ते स्वतः जरी इतके विनयसपन्न होते, तरी त्याच्या सार्वजनिक मताविषयी कोणी काहीहि टीका करू नये अगर बरे-वाईट म्हणू नये असा त्याचा स्वभाव नव्हता; अथवा स्वतःविषयीं मतप्रदर्शन करण्यांत ते पाय मागें घेत असें मुळींच नव्हते. त्याच्या या स्वभावाविषयी माझा विचार मी रस्किनच्या शब्दातच व्यक्त केलेला बरा. तो म्हणतो –

"The first test of a truly great man is his humility. I don't mean by humility, doubt of his power or hesitation in speaking his opinions, but a right understanding of the relation between what he can say and do and the rest of the world's sayings and doings "

तात्यासाहेब म्हणतात 'हें मला मजूर नाहीं'

तात्यासाहेब यानी एके ठिकाणी म्हटले आहे की, "स्वतःचे मूल्यमापन स्वतःच करणे यासारखी कठीण पण आवश्यक गोष्ट दुसरी नाही," आणि याप्रमाणे त्यानी हे कठीण व आवश्यक कार्य करून दाखविले आहे. ते म्हणजे त्याचे आत्मचरित्र होय "गतगोष्टी – अर्थात् माझी जीवनयात्रा" हा त्याचा ग्रथ छापून त्याची पहिली प्रत त्याच्या टेबलावर आलेली मी पाहिली; तेव्हा त्यास मी हसत हसत सहज पण जरा लावून बोलण्यासारखे साभिप्राय म्हणालो, "स्वतःच्या वाङ्मयाचे सर्व प्रकार आपण आपल्या हातानेच प्रसिद्ध करीत आहात. आता त्यात आपल्यासबधाने करण्यासारखे दुसऱ्यास काहीहि उरू देण्याचा आपला बेत दिसत नाही, असेच ना समजावयाचे ?" हे ऐकून थोडे गोरेमोरे होऊन त्या महामर्मज्ञ पुरुषाने चटकन उत्तर दिले, "समजलो; दुसऱ्यास आपणासबधाने प्रसिद्ध करण्यासारखे काहीहि ठेवू नये असे मी ठरविले तरी तुमच्यासारखी काहीं हट्टी माणसे नियम मोडून आपला हट्ट पुरविणार नाहीत कशावरून ? मला ही भीति आहेच !" असे म्हणत त्यानी तो आत्मचरित्राचा ग्रथ उघडून त्यांतील विशिष्ट मजकुरावर बोट ठेवून मला त्यानीं वाचण्यास सागितले. तो मजकूर असा :– "उद्या माझ्या पश्चात् आधुनिक चरित्रकोशात ग्रथकार, वर्तमानपत्रकार, राजकीय पुढारी या नात्यानी माझ्या चरित्राचा थोडा-फार उल्लेख होण्याचा सभव आहे, ही गोष्ट विनय सोडल्याशिवायहि मला नमूद करण्यास हरकत वाटत नाही तेव्हा अशा प्रसगी माझी साधार माहिती जितकी अधिक प्रसिद्ध होईल तितकें बरे. कारण मग कल्पना चालवून मजविषयी कोणीहि काहीहि लिहावे असे तरी घडणार नाही अनेक सार्वजनिक स्वरूपाच्या गोष्टी, या

एकप्रकारे निमसार्वजनिक मिळकत समजल्या जाण्याइतके सार्वजनिक महत्त्व महाराष्ट्रांतील एक पुढारी या नात्याने मला अखेर-अखेर आले होते, असे मी मानले तर मी गर्विष्ठ किंवा अहंकारी बनलो असे कोणी मला म्हणेल असे वाटत नाही मग असल्या गोष्टींसंबधाने कोणी तरी काही तरी सांगितलेली अर्धवट बातमी, हकीकत, आठवण, माझ्या पश्चात् प्रसिद्ध होणे यात इतर कोणाचा फायदा नसून माझा मात्र तोटा आहे तो वाचावा याकरिता या आत्मवृत्तासारखे काहीतरी लिहून ठेवणे बरे अशी क ्पना दृढ झाली '' हा मजकूर वाचून संपताच झटकन मी त्यास म्हणालो, 'पण शेवटी असे एक दालन शिल्लक राहीलच की, ज्याचा · । ·। काही केल्या उपयोग करता येणार नाही; तो इतरानीच करावा!' हे ऐकून माझी समजूत पटेल अशा स्वरात गभीर मुद्रेने ते म्हणाले, "आले, माझ्या लक्षात आले; तुमच्या मनात काय आहे ते मी समजलो छे, तसे काही होऊ नये माझी ती योग्यता नाही फक्त टिळकच त्यास योग्य त्याच्या जोडीस बसण्याला निराळीच पात्रता लागते निदान मी तरी त्यास पात्र नाही बाकी हेहि मी बोलणे व्यर्थच आहे म्हणा कशाला भविष्यकाळाच्या पोटात आपण शिरा!''

## प्रस्तुत ग्रंथाचें कारण

पुराणात अशी कथा आहे की, प्रभुरामचद्राच्या नावाचा महिमा म्हणून त्याच्या नावाने इतरानी पाण्यात टाकलेले दगड तरगले व सकल्पित कार्य झाले; पण प्रत्यक्ष त्याने टाकलेला दगड बुडाला! या गोष्टीतील रहस्य तात्यासाहेबाच्या बाबतींतहि प्रतीत होते! स्वतःसबधाने काहीतरीच मोजमाप घेणाऱ्या या थोर पुरुषाची वरील विचारसरणी लक्षात घेऊन, त्या अत्यत विनयशील, गुणी, परोपकारी व खऱ्या देशभक्त पुरुषासबधाने प्रस्तुत ग्रथासारखा प्रयत्न न करणे म्हणजे एकतर कृतघ्नपणाचे पाप समाजाने आप‍ ्या माथी घेण्यासारखें आहे; इतकेच नव्हे तर, त्याच्या ठायी असलेल्या सद्‌गुणसपदेचे सरक्षण व जोपासना करून पुढील पिढ्यास तिचा लाभ न देता ती विस्मृतीच्या व उपेक्षेच्या मातीत मिसळविण्यासारखे आहे! आणि हे पाप आपल्या राष्ट्राने आजपर्यंन्त काही थोडेथोडके केलेले नाही. पण ही जाणीव सुदैवाने आता सर्वत्र उत्पन्न झाली आहे ही समाधानाची गोष्ट होय. कै. तात्यासाहेब हे लोकमान्याचे पट्टशिष्य व अतेवासी होत. त्याचे सार्वजनिक जीवन लोकमान्याच्या जीवनात अनुस्यूत आहे; किंबहुना लोकमान्याच्या सार्वजनिक जीवनापैकी फार मोठा भाग तात्यासाहेबाच्या साहाय्याने व्यापलेला आहे. या दृष्टीने तात्यासाहेबाचे सार्वजनिक जीवन हे लोकमान्याच्या सार्वजनिक जीवनाचे पूरक असल्यामुळे, त्याचे चरित्र जनतेच्या पुढे आल्याशिवाय लोकमान्याचे चरित्र पूर्ण होणार नाहीं, याहि दृष्टीने प्रस्तुत ग्रथाचा उपक्रम होणे क्रमप्राप्तच आहे. शिवाय तात्यासाहेबाचे चरित्र हे लोकमान्याच्या चरित्राला पूरक

असले तरी, तात्यासाहेब या महनीय व्यक्तीच्या दृष्टीनेहि पण त्याचें स्वतत्र असे स्थान आहे यात शका नाहीं. तात्यासाहेबाच्या चरित्रापैकीं निम्मा भाग लोकमान्याच्या चरित्रांत समाविष्ट होतो, तसा त्यानतरचा भाग अगदीं स्वतत्र होतो; व त्यातील सर्व कार्यकर्तृत्व त्याचे स्वतःचे ठरतें. तात्यासाहेबाच्या कार्याचा व्याप फार दाडगा होता. वाङ्मयदृष्ट्या तर लोकमान्याच्यापेक्षाहि तात्यासाहेबाचा व्याप अधिक होता असे म्हणण्यात अतिशयोक्ति होणार नाही. तात्पर्य, तात्यासाहेबांसारखा सर्वगामी, सर्वव्यापी पुरुष महाराष्ट्रात गेल्या अर्धशतकात न्या. रानडे याच्याशिवाय दुसरा कोणी झाला नाही अशी एका थोर गृहस्थाने अनेक वेळा केलेली घोषणा सर्वश्रुत आहेच पण विशेष नवलाची व चटका लागण्यासारखी गोष्ट म्हणजे त्याच्या जीवितयात्रेतील शेवटच्या अतकालाच्या प्रसगाची होय 'अनिष्ट सर्वभूताना मरण नाम भारत। मृत्युकाले हि भूताना सद्यो जायाति वेपथुः।' भीष्म धर्मराजाला सागतात, 'खरोखर कोणत्याहि प्राण्याला मरण नकोसे वाटते; मृत्युकाळ जवळ आला की, सर्वाना कापरे भरते.' पण या वचनाविरुद्ध तात्यासाहेबाचे मृत्युसमयीं धीरोदात्त वर्तन दिसून आले कारण या पुरुषाला काल-पुरुष दिसू लागतांच त्यानी एखाद्या सिद्धकोटीतील पुरुषाप्रमाणे केलेले वर्तन पाहून सर्वांच्या तोंडून धन्योद्गार निघाले ! आणि म्हणूनच श्रीसमर्थ म्हणतात — मरणाचे स्मरण असावे। मरोन कीर्तीस उरवावे। येणेप्रकारे ॥ ( स्वतःच्या मृत्यूच्या बाबतींत आत्मवृत्ताच्या प्रस्तावनेत व प्रस्तुत ग्रथाच्या पान ४९६ वर तात्यासाहेब यानी काढलेले उद्गार चिंतनीय असल्यामुळे त्याकडे मी वाचकाचे लक्ष वेधितो )

## ग्रथ करण्यास पात्र कोण ?

अशा सत्कीर्तीच्या 'नरा'च्या सबधाने आपले कर्तव्य काय, याचा विचार त्याच्या प्रेतयात्रेत मी चालली असताना माझ्या डोक्यात चालू होता. तो विचार अर्थातच प्रस्तुत ग्रथाच्या योजनेबद्दलचा. वस्तुतः हे कार्य प्रारभी म्हटल्याप्रमाणें, गुरुवर्य तात्यासाहेब याच्या कौटुबियाकडून म्हणजे त्याचे मुलगे, मुली, पुतणे, बधु, नातू याच्या हातून व्हावे अशी माझी मनापासून इच्छा होती कारण अधिकार, विद्या, वाङ्मयप्रेम, रसिकता, सहृदयता, कळकळ, साधनानुकूलता आदि सर्व दृष्टीनी ही मडळी सत्पात्र असल्यामुळे हे कार्य त्याच्या हातून नमुनेदार होईल, अशी माझी भावना होती. म्हणून त्याच्याजवळ प्रथम मी हा विषय काढला त्याच्याहि मनात हा विषय घोळत होताच पुढे या बाबतीत बराच विचारविनिमय करण्यात आला. ती सर्वच मडळी सुज्ञ, सुबुद्ध, विचारी, परिस्थितिप्रज्ञ व मजविषयीं प्रेम, कळकळ, सहानुभूति बाळगणारी असल्यामुळे अखेर त्या सर्वांनी मिळून मीच हें कार्य अगीकारणें सर्व दृष्टीनी कसे उचित व सयुक्तिक आहे हे मला पटवून देण्याचा प्रयत्न केला व अखेर ते मलाहि मान्य झाल्यामुळे ते करण्यास मी आनदाने प्रवृत्त झालो

## तात्यासाहेबांची आशा खरी ठरली !

'आठवण' ही चीज अशी आहे की, जसजसा काळ जातो, तसतशी ती कापराप्रमाणे किंवा बर्फाप्रमाणे नाहीशी होते, मनुष्य ती विसरतो. हा सिद्धान्त व या कार्यातील पूर्वानुभव लक्षांत घेऊन तात्रडतोब मी या कार्यास प्रारंभ केला व पुढे आठ दिवसांतच म्हणजे दि. १८–१०–१९४७च्या 'केसरीं'त एतद्विषयक जाहीर विनंतीपत्रक प्रसिद्ध केले या पत्रकाकडे जनतेचे विशेष लक्ष वेधावें म्हणून तात्यासाहेबांच्याविषयी विशिष्ट आत्मीयत्व बाळगणारे, लोकमान्याचे पौत्र व दौहित्र म्हणजे अनुक्रमे रा. जयतराव टिळक व रा. गणपतराव केतकर व शिवाय मी, अशाच्या नावानी ते प्रसिद्ध करण्यात आले व महाराष्ट्रांतील ठळक अशा बहुतेक सर्व वृत्तपत्रात ते छापण्यांत आले त्याचबरोबर निरनिराळ्या व्यक्तींशी खासगी पत्रव्यवहारहि मी सुरू केला 'टिळक-आठवणी' ग्रंथाच्या वेळेपेक्षा या वेळी आठवणी मिळण्याच्या ग्र ी ' फारच अनुकूल असा अनुभव आला, हे येथें प्रथमदर्शनीच जाहीर करण्यास मला आनद होतो त्या वेळी ती कल्पना अगदी नवीन होती, वाट मळावयाची होती. पण त्यानतर गेल्या पचवीस वर्षात अनेक प्रसिद्ध व्यक्तीच्या आठवणी प्रकाशित होऊन हा प्रकार आता आठवणी पाठविणाराच्याहि चागलाच अंगवळणी पडला आहे याचे मला प्रत्यतर आले पचवीस वर्षापूर्वी लोकमान्याच्या आठवणी मिळविण्यास जितके सायास पडले तितके या वेळी न पडता, कार्य बरेच सुकर झाले, ही समाधानाची गोष्ट होय या बाबतीत गु तात्यासाहेब यानी त्या काळीं टिळक-आठवणीच्या पाहिल्या खडास लिहिलेल्या विद्वत्ताप्रचुर ( लिटररी ) प्रस्तावनेत व्यक्त केलेली आशा येथे नमूद करणे योग्य होईल ते लिि । . – "आठवणा मिळविण्यास परिश्रम पडण्याची कारणे बापट यानी अनुमानिली ती खरीच आहेत तथापि त्यातल्या त्यात माझ्या मते मुख्य कारण हेच की, आठवणी स्मरणात ठेवणे व त्याचे महत्त्व मनाला पटवून त्या लिहिणे हा वाङ्मयव्यासगाचा प्रकार आपल्याइकडे अगदी अभिनव असून, तो लोकाच्या अगवळणी पडला नाही वाङ्मयलेखनाचा हा नवा प्रकार यानतर रूढ होऊन तो वाढतच जाईल व पुढे येणाऱ्या अशा प्रकारच्या ग्रथकारास तरी रा बापट यास पडले इतके परिश्रम पडणार नाहीत अशी आशा वाटते " तात्यासाहेब याची ही आशा खरी ठरली, पूर्ण झाली ! शिवाय योगायोग असा की, प्रत्यक्ष त्याच्याच बाबतीत हा अनुभव जाहीर करण्याचे भाग्य माझ्या वाट्यास आले !

## आठवणीचे वड !

काय कारण असेल ते असो; 'आठवण' ही चूष मला लहानपणापासूनच फार प्रिय आहे. विद्यार्थिदशेतील गोष्ट मी सोडून देतो; पण वयाच्या एकोणिसाव्या वर्षापासून महर्षि अण्णासाहेब पटवर्धन याच्या सान्निध्यात माझे दिवस गेल्यामुळे,

त्यांच्या बोलण्यांत आलेल्या व त्यांच्या समकालीन असलेल्या कांहीं गृहस्थांनीं सांगितलेल्या कै. सार्वजनिक काकांच्या थोड्या विशेष गोष्टी – आठवणी – मीं त्या वेळीं टिपून ठेवल्या होत्या. पुढे अण्णासाहेब समाधिस्थ झाल्यावर त्यांच्यासंबधींच्या कांहीं आठवणीहि मीं लिहून काढल्या व ते लहानसे चोपडें गु. तात्यासाहेब केळकर यांस दाखविलेहि होतें. पण अनेक अडचणींमुळे ते काम मागे पडले, तसेंच राहून गेलें व शेवटीं ते चोपडेंहि गहाळ झालें ! तात्पर्य, आठवणीचे हे माझें वेड असें फार जुने आहे, एवढे सागून त्याविषयीं माझें ममत्व व भावना काय आहे हे टेनिसनच्याच शब्दात नमूद करतो तो म्हणतो –

> " As the dew to the blossoms,
> The bud to the bee,
> As the scent to the rose,
> Are those memories to me. "

## आठवणींचें माहात्म्य व त्यांचा उपयोग

'आठवणी' या वाङ्मयविषयक प्रकारासबधाने लो. टिळकाच्या आठवणीच्या खडद्वयास लिहिलेल्या आपल्या सुदर प्रस्तावनेत तात्यासाहेब केळकर व लोकनायक बापूजी अणे या उभयतानी तात्त्विक दृष्टया फार मार्मिक विवेचन केलेले आहे. विशेषतः तात्यासाहेब यानी तर प्रत्यक्ष चरित्रापेक्षाहि 'आठवणी'च्या वाङ्मयप्रकारास जास्त महत्त्व दिल्याचे दिसून येते ते लिहितात, " प्रकरणवार लिहिलेला एखादा चरित्रग्रथ वाचून चरित्रविषयाच्या कार्यक्षेत्राची सुसगत व व्यापक कल्पना येऊ शकेल; पण त्याचा स्वभाव व त्याचे गुणदोष याची कल्पना आठवणीवजा हकीकती किवा सवाद प्रसग यानी जितकी येऊ शकते तितकी एखादे सपूण चरित्र वाचल्यानेहि कदाचित् येऊ शकणार नाही " तात्यासाहेब याच्या तोलाचे पाश्चात्य ग्रथकार याचे तसेच म्हणणे आहे. चॅनिंग लिहितो, 'One simple anecdote of a great man is worth a volume of biography.' अखिल आग्ल वाचकवर्गाला प्रिय व मान्य होऊन बसलेल्या बॉस्वेलचे असे उद्गार आहेत कीं, 'More knowledge may be gained of a man's real character by a short conversation with one of his servants than from a formal and studied narrative.' 'आठवणी'चे असे हे स्वयभू माहात्म्य असले तरी, त्याचा ऐनाजिनसी चरित्रग्रथासच खरा उपयोग होणारा आहे. याच दृष्टीने विल्मॉट याचा अनुभव लक्षांत घेण्यासारखा आहे. तो म्हणतो, 'Occasionally a single anecdote narrated by any perosn opens a character : reminiscences enable the skilful hand to construct the skeleton.' अशाच प्रकारचे उद्गार खुद्द गु. तात्यासाहेब यानी लिहिलेल्या लो.

टिळक यांच्या चरित्रग्रंथाच्या दुसऱ्या व तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेत त्यांनी काढले आहेत. ते म्हणतात, " या ग्रंथास बापट यांच्या आठवणीच्या पुस्तकाचाहि उपयोग झाला आहे. आठवणींच्या तिन्ही खंडाच्या साहाय्याने आणखी एक वेगळ्या रीतीने टिळक-चारित्र कोणास लिहिण्याची स्फूर्ति झाली तर त्याला हे साधन उपयोगी पडण्यासारखे आहे. " अनुभवाचे हे सर्व बोल लक्षात घेऊनच आम्ही प्रस्तुत ग्रंथाबद्दल जे विनंतीपत्रक प्रसिद्ध केले होते त्यात असेच म्हटले होतें की, " तात्यासाहेबानी स्वतःचे आत्मचरित्र लिहिले असले तरी, प्रसिद्ध होणाऱ्या त्यांच्या आठवणीच्या आधाराने त्यांचे एक स्वतंत्र चरित्र लिहिले जावयास पाहिजे व तसे लिहिणारा लवकरच कोणी पुढे येईलहि ! " ही आमची इच्छा पूर्ण होवो अशी प्रार्थना आहे

## 'आठवणी' व 'आख्यायिका' यांची मीमांसा

प्रस्तुत ग्रंथ फक्त 'आठवणीं'चा आहे; त्यास नावहि तसेच दिले आहे यात आख्यायिकाचा समावेश करण्यात आला नाही. ' लोकमान्य टिळकांच्या आठवणी व आख्यायिका ' असे त्या ग्रंथाचे नाव होते; व त्यात थोड्याबहुत आख्यायिकांचा समावेश करण्यात आलाहि त्या वेळी नुसत्याच आठवणी थोड्या मिळतील असे प्रथम वाटले, म्हणून त्या ग्रंथाची तशी सजोड योजना केली; पण त्या वेळीहि पुढे अनुभव असाच आला की, नुसत्या आठवणीचाच आला तसा मजकूर छापला असता तर, आणखी दोन-तीन खंड सहज भरले असते, व त्याशिवाय आख्यायिकांचा मजकूर वेगळाच ! म्हणून हा पूर्वानुभव लक्षात घेऊन व गु. तात्यासाहेबाविषयी येणाऱ्या मजकुराचे क्षेत्र लक्षात आणून, त्यांच्या नुसत्या आठवणीच प्रसिद्ध करण्याचे ठरविले. पक्वान्न ताटभर असल्यावर इतर पदार्थांची इच्छा कोण करतो ? किंवा सुंदर हारासाठी उत्कृष्ट सुवासिक फुलें भरपूर मिळाल्यावर, त्यात घालण्यात येणाऱ्या पानांस कोण विचारतो ? शिवाय आख्यायिका ही किती झाले तरी 'आठवणी'ची चुलत-सावत्र बहीण ! आख्यायिका म्हणजे फुगीर किंवा खोलगट [illegible] आरशाप्रमाणे असते. त्यात खरे प्रतिबिंब कसे दिसणार ? यासंबंधाने तात्यासाहेब केळकर यांनी केलेली विचिकित्सा व दिलेला अभिप्राय मार्गदर्शक ठरतो ते लिहितात — " आठवण ही प्रथमतः घडलेली गोष्ट ज्याने प्रत्यक्ष पाहिली त्यानेच ता ' चक्षुर्वै सत्य ' म्हणून सांगितलेली असावी, [illegible] प्रायः त्याज्यच. निदान तशा प्रकारची आठवण ही दुय्यम प्रतीची समजावी अशा दुय्यम प्रतीच्या आठवणीचा समावेश 'आख्यायिका' या सदराखाली होऊ शकतो. परंतु आख्यायिकांना इतिहासाचे स्वरूप नसून बखरीचे स्वरूप असते हे ध्यानात ठेविले पाहिजे शिवाय [illegible] झाली तरी ती ' खुद्द [illegible] खुद्द मला सांगितले ' येथपर्यंत तरी तिचा मुळाशी प्रत्यक्ष संबंध असला पाहिजे पण यापली-

कडे जाऊन सागोवागीच्या नात्यात चुलतपणाच्या जितक्या अधिक चुली येतील, तितकी सत्याची राख अधिक झालेली आढळेल. पुराव्याच्या दृष्टीनें म्हणजे शास्त्रीय सत्यकथनाच्या दृष्टीने आख्यायिका, आठवणीपेक्षां गौणच ठरते." साहित्य-सम्राटाच्या या अभिप्रायावरून आख्यायिका हे नाव वर्ज्य करून ते कलम या ग्रथात अजिबात गाळण्यात आले आहे.

## तात्यासाहेबांचें कार्यक्षेत्र

तात्यासाहेबाचे कार्यक्षेत्र विशाल व दीर्घकालीन असल्यामुळें सहस्रावधि लहान-थोर कार्यकर्त्यांशी त्याचा सबध आलेला होता. नुसत्या एका पुण्यापुरतेच बोलावयाचे तर गेल्या पन्नास वर्षांतील पुण्यातील असे एकहि सार्वजनिक कार्य दाखविता येणार नाही कीं, तात्यासाहेबाचा त्याच्याशी प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सबध आलेला नाही. महाराष्ट्रातील सार्वजनिक चळवळीविषयीहि असेच स्थूलमानाने म्हणता येईल अशाच प्रकारचे विधान अखिल हिंदुस्थानासबधानें करणे केव्हाहि न्यायाचे व वस्तुस्थितीस धरून व्हावयाचे नाही हे खरें; तथापि 'मराठ्या'चे दीर्घकाल सपादक, लोकमान्याचे प्रमुख साहाय्यक, वरिष्ठ कायदेमडळाचे सभासद, राष्ट्रीय सभेच्या [illegible] मडळाचे सदस्य, स्वराज्यसघाचे चिटणीस व तिच्या विलायतेतील शिष्टमडळाचे एक प्रमुख सभासद, लडन येथील 'इडिया' पत्राचे सपादक व तेथील गोलमेज परिषदेचे सभासद इत्यादि विविध नात्यानीं अखिल भारताशीं व विलायतेशीहि त्याचा सबध आला होता तसेच वाङ्मयक्षेत्रातील ग्रथकार, वृत्त-पत्रकार, नाटककार, कादबरीकार, चरित्रकार, टीकाकार, इतिहासकार, तत्त्वज्ञान-लेखक, लघुकथालेखक, प्रस्तावनालेखक व कवि इत्यादि विविध अगानी त्यानी बहुमोल सेवा केली असल्यामुळे, त्या त्या क्षेत्रातील शेकडो व्यक्तींशी त्याचा निकट सबध आला होता. याशिवाय मुख्य म्हणजे राजकारण, समाजसुधारणा, स्थानिकस्वराज्य सस्था, शैक्षणिक व इतर सार्वजनिक सस्था, विमाकपन्या व बॅका याची स्थापना, व्यापार, साखरेच्या व इतर कारखान्याची उभारणी इत्यादि राष्ट्रीय जीवनाची जी अनेक अगोपागे आहेत त्यातहि त्यानी आपले बुद्धिसर्वस्व खर्च करून त्यातील शेकडो लोकाबरोबर कार्य केले आहे. अशा प्रकारच्या [illegible] क्षेत्रातील लोकाशी पत्रव्यवहार करून व समक्ष गाठीभेटी घेऊन त्याच्या आठवणी मिळविण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला आहे

## आठवणी किती व कशा मिळाल्या ?

माझ्या शक्तिबुद्धीप्रमाणे मी सुमारे दीड हजार लोकाचा ठावठिकाणा काढून त्यास आपल्या आठवणी पाठविण्याबद्दल पुनः पुनः पत्रे लिहिली ती सुमारे २१०० झाली व अशा रीतीने पत्रव्यवहार करून सुमारे ५०० लोकांकडून आठवणींचा

मेवा हातीं आला. प्रत्येकाला आपली वस्तु चांगली वाटणे हा मनुष्यस्वभावच आहे. पण हा मेवा निवडून पाहता त्यात अग्राह्य असा दुर्दैवानें सुमारें १२५ जणांचा निघाल्यामुळे तो सर्व बाजूस ठेवावा लागला! बाकी सुमारे ३७५ जणांचा मेवा निवडून, साफसूफ करून, वाचकवृंदास सादर करीत आहे. लोकमान्यांच्या आठवणींच्या तिन्ही खंडांकरिता १५६७ लोकांना ६००० पत्रे लिहून ७०० जणांकडून मजकूर मिळाला. देशभक्त तात्यासाहेबाच्या या ग्रंथाकरिता १५०० लोकाना २१०० पत्रे लिहून ५०० जणाकडून मजकूर आला या फलनिष्पत्तीवरून काही अनुमाने काढतां येतील. पण त्या खोल पाण्यात मी शिरत नाहीं! तथापि येथे एकदोन गोष्टीचा निर्देश करणे आवश्यक आहे : ... कालवश झाल्यावर अनेक वृत्तपत्रांत व मासिकात त्याच्या मृत्युलेखांबरोबर त्याच्या आठवणीहि प्रसिद्ध करण्यात आल्या काही नि[illegible] विशेष अक [illegible] त्या[illegible]ठवणीचे मुख्य सदर [illegible] आले होते अशा रीतीन बऱ्याच जणाच्या बऱ्याच आठवणी प्रसिद्ध होऊन गेल्या. एकदा इतरत्र प्रसिद्ध झालेली आठवण प्रस्तुत ग्रथात घ्यावयाची नाही असा माझा दडक असल्यामुळे, त्या [illegible] तो मजकूर साभार परत पाठविण्यात आला पण यामुळे त्याची मजवर इतराजी होऊन मलाहि त्या मजकुरास मुकावे लागले! काही गृहस्थानी पूर्वी कोठेहि प्रसिद्ध न केलेल्या आपल्या आठवणी पाठविल्या; पण त्याबरोबरच्या पत्रात ठासून लिहिले की, "आमच्या मजकुरावरून सपादकीय लेखणी फिरता कामा नये, त्यास बिलकूल धक्का लावता कामा नय मजकूर आहे तसाच [illegible] आला पाहिजे!" मजकूर चांगला व निरपवाद असला तर तो [illegible] हवाच असतो; [illegible]ना तो उत्तम असल्यास जशाचा तसा घेण्यास त्यास आनदच होतो पण सदर मजकूर जशाचा तसा घेतला असता तर सपादकावर खुशाल अब्रूनुकसानीचे व राजद्रोहाचे खटले भरण्यास पचाईत पडती ना व तशीच इतर खेकटींहि निर्माण झाल्याशिवाय राहती ना! म्हणून तो मजकूर साभार परत करणें भाग पडल. वर दिलेल्या कारणामुळे आठवणी व त्या देणाऱ्याची सख्या थोडीबहुत कमी होऊन एकदर ग्रथावर त्याचा कांहीसा परिणाम व्हावा हे अगदी स्वाभाविक होय.

पण उलटपक्षी सागावयाचे तर, अशीहि कांही मडळी भेटलीच कीं, 'यत् रोचते तत् ग्राह्यम्। यन्न रोचते तत् त्याज्यम्।' असे म्हणून विश्वासपूर्वक त्यानी आपल्या आठवणीचा मजकूर माझ्या हवाली केला व त्या बाबतीत एक अक्षरहि न बोलता त्याची सर्व जबाबदारी त्यानी मजवरच टाकिली! अर्थात् त्याचा योग्य तो परामर्श घेण्यात आला हे सागावयास नकोच. तसेच विशेष [illegible] व अगत्याच्या कांहीं मडळीकडून आठवणी मिळणार अशी माझी खात्री होतीच. त्याप्रमाणे त्यास विचारतां, 'आपण मजकूर देणार आहो, पण तो दमाने पुढे सावकाश देऊ',

असे त्याचें म्हणणे पडले. पण अनेक कारणास्तव मला दम निघत नसल्यामुळे त्यांचें हे म्हणणे मीं न ऐकता, त्यांच्यामागें लागून त्याजकडून मी अखेर मजकूर मिळविला पण दुर्दैवाने, तो ग्रथरूपाने प्रसिद्ध झाल्याचे पहाण्यापूर्वीच त्यांनीं – उदाहरणार्थ डॉ मुजे, गु. भाऊसाहेब लवाटे, रा. बाबूराव साळवे . लक्ष्मीबाई कोल्हटकर यांनी – इहलोक सोडला ! यामुळे माझ्या जिवास हळहळ लागून राहिली यात शका नाही. असो.

कांही अवघड ठिकाणचा मजकूर केवळ पत्रव्यवहाराने मिळणें कठीण होते, व ती ठिकाणे तर विशेष महत्त्वाची असल्यामुळे त्याकरिता हिंडावे लागलें, प्रवास करावा लागला, त्या त्या व्यक्तीकडे पुनः पुनः गेल्याने त्यास होणाऱ्या त्रासामुळे त्याजकडून झालेला अपमान गिळावा लागला व स्वतःच्या क्वचित् तत्त्वभ्रष्टतेकडेहि कानाडोळा करणे प्राप्त झाले पण आपला इष्ट हेतु साधण्याकारिता 'न जावेचि तेथेचि लागेल जावे । वदावेचि ना तेचि लागे वदावे ।' अशी स्थिति पत्करावी लागेल ही मनाशी खूणगाठ मी प्रथमच बाधली होती पण नमूद करण्यास आनद वाटतो की, या प्रयत्नातहि, माझ्या अपेक्षेपेक्षाहि, जास्त यश मला मिळाले

## विचित्र अनुभव !

पण मान साग वा जनात, अपमान मागावा मनात, या म्हणीतील पहिल्या तत्त्वान्वये वर उल्लेख झाला आता दुसऱ्या तत्त्वान्वये उल्लेख खाली होत असला तरी, तो स्वगत आहे असेच समजावे ! निदान मी तरी असेच समजतों तात्यासाहेबाचा गोड स्वभाव, त्याची थड व प्रशात वृत्ति, त्याची समतोल दृष्टि, त्याची खिलाडू वृत्ति, त्याची निर्लेप व पक्षनिरपेक्ष परोपकारिता व त्यांचे अजातशत्रुत्व यामुळे त्याच्या आठवणी मिळविण्यास फारशी पचाईत पडेल असे मला प्रथम वाटले नाही; कोणाकडूनहि नाखुषी येईल अशी कल्पना झाली नाही व विरोध होईल हे मनीध्यानीहि आले नाही पण दुर्दैवान प्रत्यक्ष अनुभव मात्र थोडा उलट आला खरा ! हे कार्य करीत असता, कोठे विश्वासाच्या उच जागेवर हेवा–मत्सर-अहकाराचे तृणाच्छादित खळगे दिसले, कोठे कृतज्ञतेच्या प्रकाशाऐवजी कृतघ्नतेचा काळोख पाहावयास सापडला, कोठे निःपक्षत्वाच्या मऊ बैठकीऐवजीं पक्षाभिमानाचे काटे बोचले, कोठे सहकारितेच्या गोड झऱ्याच्या जागी विरोधाचे खारट प्रवाह अनुभवास आले व कोठे तर फक्त कामापुरते स्वार्थी मामा भेटले ! तात्यासाहेबांच्या हयातीत वर वर्णन केलेल्या जातीच्या लोकाचे वर्तन त्याच्याशी कसे होत असे व त्यांचे सौजन्य आणि परोपकारिता याची लूट अशा लोकानी कशी केली हे मीं प्रत्यक्ष पाहिले असल्यामुळे, स्वाभाविकच त्याच्याकडे मी मोठ्या आशेने गेलो. पण या वेळी तावातावाने त्यांनी काढलेले उद्गार व मला दिलेली उत्तरे ऐकून मी अगदी थिजू-

नच गेलो; नमुन्याकरिता त्यापैकी फक्त एकाचाच येथे उल्लेख करतो एक 'सत्पुरुष' म्हणाले, "तुम्ही आठवणी जमविल्या; आख्यायिका गोळा केल्या; आता फक्त 'आरवा' तेवढ्या राहिल्या; त्या प्रसिद्ध करा म्हणजे जन्माचे सार्थक झाले ! ! " अशा प्रकारचे आहेर स्वीकारून, पण तोंड न उघडता, 'नीच उत्तर साहाण । प्रत्योत्तर न देणे ॥' हा सद्गुरूचा उपदेश आठवून मी गप्प बसलो व 'Everyone salutes the rising Sun, but he is rare who salutes the setting Sun" ही असलेली जगाची स्वाभाविक प्रवृत्ति लक्षात घेऊन अशा लोकांशी बुद्धिवाद न करता अगर संबंध न ठेवता, 'उदंडाचे उदंड ऐकावे । परि ते प्रत्यये पहावे । खरे खोटे निवडावे । अन्तर्यामी ॥' असा बोध घेऊन मी मनाचे सांत्वन केले ! !

ज्यांच्याशी कोणत्या ना कोणत्या कारणामुळे विशेष संबंध आलेल्या अगर परिचय असलेल्या गृहस्थांना आठवणी देण्याबद्दल मी समक्ष विनंती करी अगर पत्रे पाठवी त्यात ज्यांच्याकडून त्या देण्याबद्दल प्रथमच नकार मिळे, त्यांना अर्थातच पुन्हा विचारण्याचे कारणच नसे पण ज्यांच्याकडून आरंभीच होकार येई त्यांच्याकडून मात्र त्या मिळेपर्यंत त्यांचा नाद मी सोडत नसे. कारण मला वाटे, सहजा-सहजी त्यांच्याकडून मजकूर न आल्याने आपण तो नाद सोडला तर, न जाणो, कदाचित् एकादी महत्त्वाची गोष्ट अगर एखादा अति मौल्यवान प्रसंग राहून जावयाचा ! याच केवळ [illegible] जाऊन मजकूर पदरात पडेपर्यंत, समक्ष गाठी-भेटी घेऊन अगर पत्रव्यवहार एकसारखा चालू ठेवून त्यांचा पिच्छा मी पुरवीत असे तथापि याहि बाबतीत दुर्दैवाने मी तोटका पडलो व मला अखेर काही ठिकाणी हार खावी लागली हे मी कबूल करतो ! श्रीयुत प्र. के. अत्रे, विद्वद्वर्य प्रो. रामभाऊ रानडे, दे. भ. अच्युतराव पटवर्धन, दे. भ. स. का. पाटील अशासारख्या नामवंत बऱ्याच जणांपैकी प्रत्येकास मी स्वतः कमीत कमी [illegible] पत्रे पाठविली व [illegible] त्यांच्यावर वजन पडेल अशा थोर गृहस्थांचा वशिला लावून त्यांच्या-कडूनहि त्यास विनंती करविली, पण उपयोग झाला नाही, यश आले नाही ! रा. अत्रे समक्ष मला म्हणाले, "बापट, आता मात्र मी तुमचा अंत पाहात नाही दोनतीन दिवसात मजकूर न चुकता पाठवितो." पण दुर्दैवाने अखेर तो [illegible] पडला नाही तो नाहीच ! ! तसेच देशातील अव्वल दर्जाच्या अनेक थोर गृहस्थांकडून आठवणी पाठविण्याबद्दल प्रथम तत्परतेने अनुकूल उत्तरे आली पण राज्यकारभार अंगावर पडून त्या कामाच्या दडपणा[illegible] सापडल्यामुळे असले काम करण्यास त्यास उसंत होत नसावी असेच अखेर मला दिसून आले व [illegible] काहींना मला कळविलेहि याहिमुळे माझी [illegible] झाली. तात्पर्य, प्रस्तुत ग्रंथात ज्या कोणा थोरा–मोठ्या माणसाचे नाव आठवणी देणारात नसेल त्यास विनंती न केल्यामुळे त्यांच्याकडून

मजकूर आला नाही असे न समजता, त्याच्या बाबतीत विश्वप्रयत्न होऊनहि तो यऊ शकला नाही, असेच वाचकानी नि.शक समजावें अशी माझी विनती आहे. तसेच, तात्यासाहेब याचा विलायतेतील प्रमुख लोकाशी सबधहि थोडाथोडका आला नव्हता लोकमान्याच्या आठवणीच्या वेळी विलायतेतील त्यास परिचित अशा प्रत्येक व्यक्तीशी मला पत्रव्यवहार करावा लागला पण सुदैवाने या वेळी लडन येथे माझे जुने मित्र रा दत्तोपत ताम्रनकर हे 'केसरी'चे प्रतिनिधि म्हणून वास्तव्य करीत असल्यामुळे त्याच्यावर मी हे काम सोपविले यामुळे माझे ते श्रम वाचले मला माहीत असलेल्या तिकडील लोकाच्या नावाची विस्तृत यादी तेवढी मी त्याच्याकडे पाठविली. पण दरम्यानच्या महायुद्धाच्या प्रलयामुळे व विशेषतः बराच काळ लोटल्यामुळे बहुतेक मडळी दिवगत झाली असल्याचे त्यानी कळविले. तथापि विद्यमान लोकाचा पत्ता-मुगावा लावन त्याजकडून मजकूर मिळविण्याचा त्यानी बहुत प्रयत्न केला हे नमूद करण्यास आनद होतो

## भयकर उल्कापात व त्याचे परिणाम

अशा रीतीने आठवणी मिळविण्याचे काम तीन महिने सतत एकसारखे चालू होते एवढ्या अवधीत हाताशी इतका मजकूर आला की, तो पाहून ११ मार्चला [illegible] हा ग्रथ प्रसिद्ध करावा असे वाटू लागण्यापर्यंत मजल गेली! कारण आम्ही प्रसिद्ध केलेल्या जाहीर विनतीपत्रकात असे म्हटलें होते की, "सदर आठवणी पुरेशा हाती येताच लगेच त्या ग्रथरूपाने छापून प्रसिद्ध करण्याचे काम आम्ही हातावेगळे करणार आहो त्यासाठी एखाद्या विशिष्ट ठरीव कालाची अगर प्रसगाची वाट न पाहण्याचाहि आमचा मानस आहे" हा सकल्प सिद्धीस जाण्याचा काल आम्हास स्पष्ट दिसू लागला पण दुदैवाची गोष्ट अशी की, ३० जानेवारीस देशात येवढा अभूतपूर्व, भयकर उल्कापात झाला – महात्मा गाधीचा वध झाला – व त्याने देश हादरून गेला! लोकक्षोभाच्या ज्वालामुखी पर्वताचे रौद्र रूप प्रकट झाले प्रत्यक्ष पुणे शहरात दगल झाली व तीत टिळक-मदिरहि सापडले! या मदिराच्या कचेरीतच आठवणीचे कामकाज मी करीत असे. दगेखोरानी टिळक-मदिराच्या आत व बाहेर आग पेटविली. ती पाहून मी बेभान झालो! तशा स्थितीत मी तेथे गेलो व टिळक-मदिराच्या मौल्यवान् कागदपत्राच्या दप्तरात आठवणीचे सर्व साहित्य बाधून टागा अगर मजूर न मिळाल्यामुळे, ते भलेमोठे जड दप्तर डोक्यावर घेऊन बाहेर पडलो. ते घेऊन घरी येण्याची सोयच नव्हती! म्हणून टिळक-मदिराजवळील विश्वासाच्या एका मित्राच्या घरीं ते ठेवण्यास गेलो. त्यानी सागितले, 'तुमचा हा जळका वासा येथे ठेवू नका!' म्हणून दुसऱ्या स्नेह्याकडे गेलो. ते म्हणाले, 'आताच आमच्या घराची झडती झाली; पुनः होण्याचा सभव आहे; तुमचा तुम्ही विचार करा' म्हणून तिसऱ्या स्नेह्याकडे गेलो त्याचे घर आज पेटविले जाण्याचा

संभव आहे असे तेथे कानावर आले! जसे, कोणी पाठीशी लागल्यास कावरीबावरी होऊन मांजरी तोंडात पिल्लू घेऊन त्यास ठेवण्यास निवाऱ्याची जागा शोधते तशी माझी गत झाली! अखेर एकदाचे सुरक्षित ठिकाणी ते दप्तर ठेविले तेव्हां माझा जीव भाड्यात पडला!

## प्रतिकूल परिस्थिति

देशातील या भयंकर प्रकाराचा सर्वच व्यवहारावर परिणाम झाला तसा माझ्या या कार्यावरहि झाला [illegible] नवल नाही स्तब्धता, नैराश्यता, उदासीनता, अविश्वास याच्या कुंद व रोगट वातावरणात काही दिवस गेले. पुढे आस्ते आस्ते ते कमी झाले. संकटाचे ढग वितळू लागले, आशेचा वारा वाहू लागला व सत्कर्माचा सूर्य प्रकाशला. म्हणून मी माझ्या कार्यास पुन्हा सुरुवात केली पण आता मात्र दुर्दैवाने निराळाच अनुभव येऊ लागला. पत्रव्यवहार व गाठीभेटी याचा उपयोग होईनासा झाला, नवीन मजकूर मिळणे बाजूसच राहिले; उलट मिळालेला मजकूर कांही अति नाजूक [illegible] परत मागितला!! ३० तारखेपूर्वी मजकूर पाठविण्याच्या बाबतीत वचनबद्ध झालेल्या काही शिष्यांनी "आता तुम्हास आठवणी पाठविणे शक्य नाही" असे रागाने कळवून अंग झाडून टाकले! अशातच काही स्वकीयापैकी, कोणी घाबरटपणाने तर [illegible] वैषम्यबुद्धीने प्रस्तुतचा हा प्रयत्न मी आता अजीबात सोडून द्यावा असा खासा पोक्त सल्ला दिला!! या [illegible] कितपत उपयोग झाला हे सांगणे सोडून दिले तरी, ग्रंथाच्या एकंदर स्वरूपावर वरील परिस्थितीचा थोडाबहुत परिणाम होणे अपरिहार्यच होते. हाती आलेल्या व येऊ घातलेल्या मजकुराच्या प्रमाणावरून जेथे ६००-६०० पृष्ठांचे दोन खंड निघावेत असा प्रथम अंदमास होता, तेथे ६०० पृष्ठाचा एकच खंड प्रसिद्ध करावा अशी परिस्थिति निर्माण झाली व [illegible] करावे, असे अखेर ठरवावे लागले! तदनुसार कागदाची परवानगी देण्याबद्दल सरकारकडे अर्ज करण्यात आला. पुढे देशातील राजकीय वातावरण जसजसें निवळत चालले, तसतसे आठवणी मिळविण्याच्या पुनः चालविलेल्या प्रयत्नास यश येत चालले फार काय, पण प्रस्तुत आत्मनिवेदनाचा मजकूर [illegible] असताहि अजून आठवणी येण्याचा प्रवाह चालूच आहे! यामुळे संकल्पित ६०० पानात सर्व मजकूर बसणार नाही या भीतीने पुनः जास्त पृष्ठे छापण्याकरिता सरकारची परवानगी [illegible] व १२० पृष्ठे जास्त छापण्यास ती मिळाली. अशा रीतीने मजकूर व पाने याचा पाठशिवीचा खेळ चालू असता, "घट्ट झाले पाणी घाल, पातळ झाले पीठ घाल" या ग्राम्य महिला-म्हणीची आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं!

## संपादकीय संस्कार

तथापि अशा प्रकारच्या ग्रथांतील मजकुरावर सपादकीय हात फिरला जाणे आवश्यकच असते; आणि प्रस्तुत ग्रथाच्या बाबतींत तर तो हात दमेपर्यंत त्यास काम करावे लागले! ग्रथातील जागेची मर्यादा, औचित्य, महत्त्व, अभिरुचि वगैरे लक्षात घेऊन, तारतम्यबुद्धि चालवून, निःपक्षपाती मनाने मजकुरास नाइलाजास्तव कात्री लावावी लागली. कित्येकाच्या मजकुराचा सक्षेप करावा लागला ज्यानी आपल्या आ त्वा लेखी न देता तोंडींच मला सागितल्या त्या मी घरी येऊन लिहून काढून त्यावर त्याच्या समतीच्या सह्या घेतल्या तसेच परगावाहून आलेली मोडी लिपीची बाडे बालबोध करणे, कित्येकामध्ये सन, तार।। भरणे, त्रुटित मजकुराने लिहून पाठविलेल्या आठवणीची बाडे पूर्ण लिहून काढून पुन्हा ती ज्याची त्याच्याकडे पसतीकरिता पाठवून परत मिळविणे, अत्यत दुर्वाच्य असलेला मजकूर खिळे जुळविणाऱ्याच्या सोयीकरिता पुन्हा सर्व सुवाच्य लिहून काढणे वगैरे जिकीरीची कामेहि करावी लागलीं तथापि प्रसूतिवेदनेसारखे हे काम मला वाटे यात शका नाही! एकदा एकाच्या मजकुरात येऊन गेलेली सामान्य गोष्ट पुन्हा दुसऱ्याच्या मजकुरात आली तर द्विरुक्तीचा दोष टाळण्याकरिता ती गाळण्यात आली आहे. पण तीच गोष्ट विशेष महत्त्वाची असली व ती अनेकाच्या मजकुरात आली असली तरी ती बुद्धिपुरस्सरच ठेवण्यात आली आहे कारण एका थोर ग्रथकाराच्या मताप्रमाणे अशी पुनरुक्ति म्हणजे ती गोष्ट खरी असल्याचा एक उत्कृष्ट पुरावाच होय. तो लिहितो — “ दहानी दहा प्रकारानी एकच गोष्ट सागितली असता ती शास्त्रीय दृष्टया ‘सिद्ध’ म्हणून सहजच ठरते”. उलटपक्षी, जागेच्या अभावीं व काटकसरीच्या दृष्टीने काही चागल्या बाबीसाहि फाटा द्यावा लागला उदाहरणार्थ, प्रत्येक आठवणीतील मजकुराचे द्योतक असे त्या त्या लेखकाने घातलेले आकर्षक शीर्षक काढून टाकावे लागलें. शिवाय आठवणी पाठविणाराच्या बहुतेक सर्व लिखाणात काही ठराविक गोष्टीविषयीं आलेला सर्वसामान्य पण रसभरीत मजकूर पुनरुक्तीचा दोष टाळण्याकरिता गाळावा लागला. उदाहरणार्थ — ( १ ) स्वतःची तात्यासाहेबाविषयीची भक्ति, ( २ ) त्याचे प्रथमदर्शन व त्याचा आपल्या नावर झालेला परिणाम, ( ३ ) आपल्या स्वतःची माहिती, ( ४ ) मिरवणुकी, सभा, समेलने, मेजवान्या वगैरेची थाटामाटाची वर्णने, ( ५ ) तात्यासाहेबाची सर्वसामान्य स्तुति, ( ६ ) त्याच्या मृत्यूबद्दल दुःखोद्गार, ( ७ ) आठवणी पाठविण्याबद्दल बापटाचा विलक्षण आग्रह इत्यादि. वस्तुतः ज्याच्या त्याच्या दृष्टीने वरील प्रकारचा मजकूर ज्याचा त्यास महत्त्वाचा व अगत्याचा वाटणे स्वाभाविक आहे. फार काय, पण मलाहि त्यात एकप्रकारची लज्जत आहे असेच वाटतें. पण लज्जतदारपणा झाला म्हणून त्यासहि काही सीमा आहेच. म्हणून याहि दृष्टीने तो कमी करणे भाग पडले हे लिहिण्यास दुःख होते.

## काटकसरीची कमाल !

मजकूर व जागा यानी परस्परास सामावून घेण्याच्या दृष्टीने करण्यात आलेल्या विशिष्ट काटकसरीचे आणखी थोडे दिग्दर्शन येथे करणे आवश्यक आहे. माझ्या अतिआग्रहाच्या विनतीमुळे ज्या काही सुहृदानी आपला मजकूर देण्याची कृपा केली, त्या प्रत्येकाच्या मजकुरापैकी फक्त एकचतुर्थांशच मजकूर घेऊन बाकीचा सर्व बाजूस ठेवावा लागला ! प्रत्यक्ष केळकर कुटुंबीयातील मडळींनी खरोखर आपल्या आठवणीचा पाऊस पाडला असता हे मला माहीत आहे पण त्याजकडूनहि हाताच्या बोटाच्या सख्येपेक्षा जास्त आठवणीच्या सख्येचा मजकूर घ्यावयाचा नाही असेच मला निरुपायाने ठरवावे लागले ! फार काय, पण प्रत्यक्ष मी माझ्या नावाने एकहि आठवण घातली नाही ! ! लो टिळकाच्या तिन्ही आठवणी-खडात माझ्या नावावर माझ्या स्वत-च्या आठवणीना १४२ पृष्ठे खर्ची पडली आहेत ! पण केवळ परिस्थितीमुळे मला येथे सयम करणेच भाग पडले स्वतःच्या घरी घालण्यात आलेल्या प्रयोजनात प्रथम सर्वांना सन्मानपूर्वक सतुष्ट करणे व त्याचा योग्य तो परामर्श घेणे हेच कोणीहि झाले तरी आपले आद्य कर्तव्य समजतो, व मगच स्वतःची सोय झाल्यास पाहतो, किंवा तसे काही न जमल्यास त्याची क्षितीहि तो बाळगत नाही विशेष सागावयाचे म्हणजे, हाच न्याय या प्रत्यक्ष आत्मनिवेदनाच्या मजकुरासहि लावण्याचे मी योजिले होते; पण कळकळीच्या काहीं हितचिंतक सल्लागाराना व सहानुभवी मित्रांनी व्यावहारिक दृष्टीने तसे करणे अनिष्ट व अयोग्य आहे असे माझ्या मनावर बिंबविल्यामुळे सक्षेपत. वस्तुस्थितिकथनाचा मीं हा नम्र प्रयत्न केला आहे. शिवाय कै गु तात्यासाहेब याच्या आठवणीचा ग्रथ तयार करणे हे मी माझे खासगी काम समजत नसून, ते एक जबाबदारीचे, पवित्र व सार्वजानिक काम आहे असेच मी मानीत असल्यामुळे, हे इतिवृत्त सक्षेपाने वाचकास निवेदन करणे हेहि मी आपले कर्तव्यच समजतो

## इंग्रजीतील आठवणींचे स्वरूप

या ग्रथात सस्कृत, मराठी, हिंदी व इग्रजी या भाषात आठवणी लिहिण्यात आल्या आहेत. त्यापैकी पहिल्या तीन भाषातील मजकुराविषयी काहीं न लिहिता, ग्रथाच्या शेवटी घालण्यात आलेल्या फक्त इग्रजी मजकुरासबधाने एवढेच म्हणतों की, त्यापैकी कांही भाग फारसा आठवणीच्या स्वरूपाचा नसून तो निव्वळ गुणवर्णनपर ( appreciation ) असतांहि घेतला आहे, याची मला पूर्ण जाणीव आहे; पण त्याचे कारण मी सागण्यापेक्षा लो टिळक याच्या इग्रजीतील आठवणीच्या माझ्या पहिल्या खडाच्या पुस्तकास प्रस्तावना लिहिणारे कै. दे भ. तात्यासाहेब केळकर यानी आपल्या मार्मिक प्रस्तावनेत जे कारण दिले आहे तेच येथेंहि लागू पडणारे असल्यामुळे ते येथें उदधृत करतो तात्यासाहेब लिहितात :—

" The reminiscences contained in this book are mostly by those who came into contact with Lok Tilak, but comparatively at a distance; and therefore they may look more like appreciations than reminiscences But even these have their own value as coming from illustrious men and women, who were his contemporary judges and in a few cases also his co-workers "

### या स्मृति-मंदिराचे धनी कोण ?

अशा रीतीनं उभारण्यात आलेले हे 'नरसिंह-स्मृति-मंदिर' आहे 'लो. टिळक-स्मृति-मंदिर' तीन मजली ( तीन खंड ) असून हे 'केळकर-स्मृति-मंदिर' एकमजली असले तरी ते आकाराने विस्तृत आहे याचा अर्थ असा कीं, लोकमान्यांच्या आठवणींच्या तीन खंडांची पृष्ठसंख्या १८७५ असून त्यांत आठवणी-लेखक ७०० आहेत, तर प्रस्तुतच्या या एकाच ग्रंथाची पृष्ठसंख्या सुमारे ६७५ असून त्याचे आठवणी-लेखक सुमारे ३७५ आहेत अर्थात याचे श्रेय केवळ आठवणीदारांनाच आहे, मी फक्त निमित्तमात्र आहे, म्हणून म्हणतो – "आतां ग्रंथाचे दूषण-भूषण । सर्वस्व त्याचे त्यासी ॥" तथापि, ग्रंथविषयक कामांत मी कांही केले असेन तर ते मी न सांगता एका ग्रंथकाराच्या खालील शब्दांतच व्यक्त केलेले बरे तो म्हणतो – 'I have here made only a nosegay of culled flowers and have brought nothing of my own except the string that ties them I am but a gatherer and a disposer of other men's stuff " हाच विचार किंबहुना माझी खरी मनो-भावना टिळक आठवणींच्या तिसऱ्या खंडाच्या आत्मनिवेदनांत शेवटी मी व्यक्त केली आहे म्हणून पुनरुक्तीचा थोडा दोष पत्करूनहि पुन्हा तेच शब्द येथे उद्धृत करतो "आठवणींच्या रूपाने हे वाङ्मयस्मारक ज्या अनेक स्त्री-पुरुषांच्या साहाय्याने मला उभारतां आले, त्या सर्व बंधुभगिनींस एकवार शेवटचे अभिवादन करून त्यांनी मजकडून ही सेवा करून घेतली याबद्दल प्रथम त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतो वस्तुतः या स्मृति-मंदिराचे धनी त्यांचे तेच आहेत फार तर त्यांचे 'विश्वस्त' इतकेच कदाचित् माझे नातें असू शकेल ! येवढेच नव्हे, तर या बाबतींतील माझ्या अंतःकरणांतील सदैव जागृत असणारी भावना मी माझ्या शब्दांनी व्यक्त न करता, संत श्रीतुकाराम-महाराजांच्या शब्दाने सांगतो की, फोडिले भांडार । धन्याचा हा माल । मी तंव हमाल । भारवाही ॥

### केळकर-सूक्तिसंग्रह प्रसिद्ध होणार काय ?

आठवणींच्या ग्रंथासंबंधानं जे काय थोडक्यांत म्हणावयाचे होतें त्याचे येथ-

वर निरूपण झाले. आता एका गोष्टीसबधाने खुलासा करितो. वस्तुतः प्रस्तुत ग्रथ तयार करण्याच्या आधी 'टिळक-सूक्ति-सग्रह' या ग्रथासारखा 'केळकर-सूक्ति-सग्रह' ग्रथ तयार करण्याची माझी मनीषा होती कारण एक तर त्यासबधी मी पूर्वीच थोडीबहुत तयारी करून ठेविली होती दुसरे असे की, आठवणीच्या ग्रथाचे काम परावलबी, दीर्घसूत्री व सर्वस्वी परेच्छाधीन असल्यामुळे ते सावकाश व यथाकाल होणारे आहे उलट, 'सूक्ति-सग्रह' ग्रथाचे काम हे एकहाती, स्वावलबी व सर्वस्वी स्वाधीनचे आहे तथापि हा ग्रथ झाला तरी, तो ताबडतोब प्रसिद्ध होणे कठीणच होते कारण तात्यासाहेब यानी आपल्या पन्नास वर्षांच्या राजकीय चळवळीच्या उद्योगाबरोबरच श्रीसरस्वतीदेवीची उपासना काही थोडी-थोडकी केलेली नाही किंबहुना मुख्यत या देवतेच्या सेवेच्या द्वारेच त्यानी आपले जीवितकार्य पूर्ण केले आहे. यामुळे त्याच्या अगाध वाङ्मयोदधीचे अवगाहन करून त्यातून ओजस्वी, दीप्तिमान्, सग्राह्य व सस्मरणीय अशा सूक्तीची पाणीदार मौक्तिके गोळा करण्याचे अवघड कार्य झटपट होणारं नाही, हे अगदी उघड आहे. तथापि, इतस्ततः पडलेले आठवणीच्या पाण्याचे थेब एकत्र करून त्याच्या सुदर सरोवराचा ग्रथ निर्माण करण्यास लागणाऱ्या प्रदीर्घ काळापेक्षा 'सूक्ति-सग्रह' बनविण्याचे कार्य अल्प काळात जनतेच्या सेवेस सादर करता येईल असे मला वाटत होते, परतु हेहि खरे की, जसजसा काळ निघून जातो तसतसे लोकाना आठवणीचे विस्मरण होते, व्यक्ति नाहीशा होतात व एकदर परि-स्थितीतहि बदल होतो या अशा अनेक कारणामुळे हे कार्य अधिकच बिकट होते, हा लोकमान्याच्या आठवणीचे ग्रथ तयार करताना आलेला पूर्वानुभव लक्षात घेऊन, प्रस्तुतचा ग्रथ प्रथम प्रसिद्ध करून नतर मग 'केळकर-सूक्ति-सग्रह' हा ग्रथ प्रसिद्ध करावा असे मी मनाशी निश्चित ठरविले आणि त्या उद्योगास लागलो त्याप्रमाणे दि २१ नोव्हेंबर १९४७ च्या 'केसरी'त "केळकर-सूक्ति-सग्रह प्रसिद्ध होणार" या शीर्षकाखाली मी खालील मजकूर प्रसिद्ध केला आहे :– "आठवणीचा ग्रथ प्रसिद्ध होताच त्याच्या पाठोपाठ 'केळकर-सूक्तिसग्रह' हा ग्रथहि प्रसिद्ध होईल असे मी नम्रपणे जाहीर करतो. वास्तविक एक टप्पा सोडून पुढील लाबच्या टप्प्याविषयी आगाऊ बोलणे, त्याची परिस्फुटता करणे, माझ्या मनास व स्वभावास मानवणारे नाही परतु गेल्या 'केसरी'तील अग्रलेखात एतद्विषयक आलेला मजकूर लक्षात घेऊन माझ्या सुहृदाच्या व मित्रमडळीच्या सल्ल्यावरून नाइलाजास्तव ही नम्र घोषणा आजच करणे मला भाग पडले आहे" या घोषणेप्रमाणें प्रस्तुत आठवणीचा ग्रथ आता हातावेगळा झाल्यानतर त्या उद्योगास लागण्याला मी मोकळा होत आहें. परतु वयोमान व मुख्यतः गेल्या चार-सहा महिन्यात जडलेल्या काही विशिष्ट व्याधीमुळें भासू लागलेली शक्तिक्षीणता व त्यामुळे उत्पन्न होणारा स्वतःविषयीचा

अविश्वास यामुळे माझ्या हातून हे कार्य कसे काय पार पडेल या भीतीने मात्र मन अस्वस्थ आहे. प्रभुकृपे काय घडेल तें खरें! असो.

**ग्रंथाची प्रस्तावना म्हणजे पृथ्वीस आधारणारा शेष!**

शेवटचे काम म्हणजे आभार-प्रदर्शनाचे. क्रमांकाने हे कलम शेवटचें मानण्यात येत असले तरी, वस्तुतः मनोव्यापारात त्याचें आद्यस्थान आहे प्रथम, हा ग्रंथ वाचकांच्या हातीं देण्यास प्रामुख्येकरून जे कारणीभूत झाले त्या सर्व आठवणी लेखकाचे मी पुन्हा एकवार मनापासून आभार मानतों. तसेच ज्या सहृदय स्वकीयानी हस्ते-परहस्ते आठवणी मिळवून देण्याची मला मदत केली त्या अनेक परोपकारी सज्जनांचे उपकार मी विसरणे अशक्य आहे अर्वाचीन काळच्या वाङ्मययुगातील ग्रंथरचनेत ग्रंथाइतकाच किंबहुना अधिकच ग्रंथाच्या प्रस्तावनेस मान व महत्त्व देण्यात येत असते, आणि त्यात प्रस्तावना-लेखक जितके थोर, विद्वान् व प्रसिद्ध, आणि त्याची प्रस्तावना जितकी मोठी, मार्मिक व विवेचक असेल तितके त्या ग्रंथास स्वाभाविकच मोल येत असते फार काय पण, छत्रीचा जसा दांडा, फुलाचा जसा देठ, शरीराचे जसे नाक, मंदिराचा जसा कळस, सभेचा जसा अध्यक्ष, सैन्याचा जसा सेनानायक, वाद्याच्या मिरवणुकीतील जसा नगारा, इतकेच नव्हे तर, नक्षत्रात जसा चंद्र, तेच स्थान ग्रंथाच्या प्रस्तावनेचे होय असे अर्वाचीन काळीं सर्वत्र समजण्यात येते या दृष्टीने 'केसरी'चे माजी संपादक व गीतामंजरीकार विद्वद्वर्य श्री जनार्दन सखाराम ऊर्फ तात्यासाहेब करदीकर यानी परिश्रमपूर्वक लिहिलेल्या विद्वत्ताप्रचुर प्रस्तावनेबद्दल मी त्यांचा ऋणी आहे लोकमान्याच्या आठवणीच्या पहिल्या खंडास तात्यासाहेब केळकर यानी प्रस्तावना लिहिली त्या तात्याच्या आठवणीच्या ग्रंथास या तात्यानी प्रस्तावना लिहिण्याच्या आलेल्या योगाबद्दल मला फार आनंद होत आहे तसेच या ग्रंथाच्या शेवटच्या सर्व मुद्रितावरून त्याची सराईत नजर फिरून ती सर्व मुद्रिते बारकाईने तपासण्याचे कार्य त्यानी केले असल्यामुळे माझे मन या बाबतीत निश्चित आहे अशा रीतीने तात्यासाहेब करदीकर यानी केलेल्या द्विविध व जबाबदारीच्या कार्याबद्दल त्याचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत

**केळकरांचे घर म्हणजे माहेरघर!**

प्रस्तुतसारख्या ग्रंथाचे स्वरूपच असे आहे की, त्यास अनेकाचे हात लागल्याखेरीज तो सिद्ध होऊच नये म्हणून विनंती केली असता अनेकानी अनेक रीतीनी साह्य केले हे तर खरेच; पण विनंती करण्यापूर्वीच आपणहून स्वयंस्फूर्त मदत करण्याची ज्यानी उत्कट इच्छा दर्शविली, त्याच्या निरपेक्षपणाबद्दल कसे उतराई व्हावे हेच मला समजत नाही. कै तात्यासाहेबाचे भक्त व माझे जुने स्नेही श्रीयुत रा. द. ऊर्फ पंत पराडकर हे या श्रेणीतील असून, त्यानी केवळ तात्यासाहेबाच्या प्रेमाखातर या ग्रंथाची दुसरें

मुद्रिते तपासण्याचे श्रम घेतले व आपल्या मुद्रणकलाभिज्ञतेचाहि लाभ दिला याबद्दल मी त्यांचे मनापासून आभार मानतो. कै गुरुवर्य तात्यासाहेब केळकर यांचे घर म्हणजे माझे स्फूर्तिस्थान व माहेरघर असल्यामुळे आभारप्रदर्शनाच्या कलमात त्यांच्या घरच्या मंडळींचा उल्लेख येथे झालेला पाहणे हे त्या सदभिरुचीच्या व निरपेक्ष मंडळींना मुळींच आवडणार नाही; त्या मंडळींचे आभार मानणे म्हणजे मी माझे स्वतःचेच आभार मानण्यासारखे होणार आहे, अशी वस्तुस्थिति आहे. पण हे जाणूनहि, केवळ माझ्या समाधानाचा स्वार्थ साधण्याकरिता ह्या मंडळींपैकी व्यक्तिशः कोणाचाच उल्लेख न करता, समष्टिरूपानेच त्या सर्व मंडळींचे, त्यांनी केलेल्या हरेक मदतीबद्दल, मी मनोभाव आभार प्रदर्शित करतो

### मदतनिसांचे आभार

वर म्हटल्याप्रमाणे या ग्रंथास ज्यांच्या मदतीनेच हात लागून हा ग्रंथ हातावेगळा होण्याचे मला समाधान होत आहे, त्या मंडळींत 'केसरी'चे माजी संपादक रा वासुदेव कृष्ण भावे, रा दामोदर विश्वनाथ गोखले, केसरीचे उपसंपादक रा जयंत श्रीधर टिळक, इतिहाससंशोधक रा शंकर नारायण जोशी, राष्ट्रीय कीर्तनकार रा वासुदेव शिवराम कोल्हटकरबुवा, महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे चिटणीस रा गोपाळ आबाजी ऊर्फ तात्यासाहेब देशपांडे, विलायतेतील 'केसरी'चे प्रतिनिधि रा दत्तात्रय विश्वनाथ ताम्हनकर, वैदिक-संशोधन-मंडळातील कार्यकर्ते रा दिगंबर वासुदेव नेनेशास्त्री, रा कुंज-विहारी लक्ष्मण भोपटकर, केसरी मराठा संस्थेचे व्यवस्थापक रा आत्माराम रावजी भट, चिरंजीव प्रभाकर दत्तात्रय दामले, रा यशवंत कृष्ण ठकार, रा ग र वैशंपायन, रा ग दा चितळे, मुंबईचे सप्लाय ऑफिसर रा श्रीपाद नरहर सप्रे, 'सह्याद्रि' मासिकाच्या जुळणी-विभागाचे प्रमुख रा भास्कर महादेव कुलकर्णी व त्यांचे सहकारी व मुद्रिते तपासणारे श्री त्र्य रा दामले, ग भा क्षीरसागर, द. वि जोग, न भा काळे, हे प्रमुख असल्यामुळे त्यांचे मी मनापासून आभार मानतो. तसेच ग्रंथाच्या मलपृष्ठावरील तिरंगी चित्र श्री जनार्दन दत्तात्रय गोंधळेकर यांनी अगदी लवकर तयार करून दिल्याबद्दल त्यांचेहि आभार मानणें उचित आहे.

### विश्वस्त-त्रयीचें ऋण

खरोखर आभार मानण्यासारखें गोड काम दुसरें कोणतेंहि नसेल कारण आभार मानणे म्हणजे आपली कृतज्ञता व्यक्त करणें होय; आणि कृतज्ञता व्यक्त करणें म्हणजे ऋणमुक्ततेचे काहींसें समाधान मिळविण्यासारखें आहे पण कृत-ज्ञतेची व्याख्या 'अधिक मदतीची अपेक्षा' अशी मर्मज्ञ लोक करतात तेव्हा हे आभार म्हणजे व्याजी लावलेले भांडवलच होय असे कोणी म्हणेल ! परंतु तशी भावना मनात न बाळगता निर्व्याजपणे हे आभारप्रदर्शनाचें काम मी करीत

आहे सर्वात शेवटचे पण अत्यादरपूर्वक व कृतज्ञताबुद्धीने अंतःकरणापासून आभार मानावयाचे ते 'केसरी-मराठा' संस्थेचे विश्वस्त यांचे होत. रा. जनार्दन सखाराम करंदीकर, रा. लक्ष्मण बळवंत भोपटकर व रा. गजानन विश्वनाथ केतकर या विश्वस्तत्रयीच्या झालेल्या साहाय्याबद्दल त्यांचे आभार मला शब्दांनी व्यक्त करता येणे अशक्य आहे. या त्रयमूर्तीने मिळून व शिवाय व्यक्तिशः, विशिष्ट प्रकारचें जे अमूल्य साहाय्य केले आहे, त्या योगाने त्यांनीं मला कायमचे ऋणी करून ठेविले आहे; इतकेंच नव्हे तर, हा ग्रंथ सर्वतोपरी त्यांचाच आहे असे म्हणण्यात काडीमात्राहि अतिशयोक्ति मी करीत नाहीं अशी माझी भावना आहे.

## तात्यांचे आशीर्वाद

प्रस्तुत ग्रंथाची योजना गुरुवर्य तीर्थस्वरूप तात्यासाहेब केळकर यांना अभिप्रेत कशी नव्हती हे आरंभी मी सांगितलेच आहे. अर्थात् त्यांना अभिप्रेत नसतांना, म्हणजे त्यांच्या काहींसे मनाविरुद्ध, पण त्यांच्याविषयीं वसत असलेल्या गाढ, थोर व अकृत्रिम प्रेमामुळे आणि केवळ कृतज्ञताबुद्धीमुळेच हा ग्रंथ तयार करण्यात आला आहे. पण तो तयार होत असतां झालेले खटाटोप वगैरे त्यांच्या अतींद्रिय ज्ञानास गोचर होऊन, शेवटी त्यांनी मजवरील विशिष्ट ममत्वबुद्धीमुळे आशीर्वादात्मकच उद्गार काढले असले पाहिजेत अशी माझी दृढ श्रद्धा आहे. हे त्यांचे आशीर्वाद खाली दिलेल्या 'श्रीसमर्थहृदयातील' शब्दांतच सांगितलेले बरे :–

जें जें त्वां कांहीं केलें । तें तें सर्व आम्हां पावलें ।
तुजकडे त्यांतील कांही न उरलें । येणें तुज घडलें आत्मनिवेदन ॥

प्रस्तुत आत्मनिवेदनात्मक लेखाच्या आरंभी श्रीमद्भागवतांत उद्धवास उद्देशून भगवंतांनी काढलेले उद्गार अवतरित केले आहेत त्यांतीलहि बीज हेंच होय!

## वाचक-वृंदास प्रार्थना

शेवटी, सद्गुरु श्रीसमर्थांच्या शब्दांत वाचकांची प्रार्थना करून हे लांबलेलें आत्मनिवेदन समाप्त करितो.

इतुकें बोलिलें स्वभावें । त्यांत मानेल तितुकें घ्यावें ॥
श्रोतीं उदास न व्हावें । बहु बोलिलें म्हणोनी ॥
चुकत वाकत आठवलें । इतुकें संकलित बोलिलें ॥
न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥

केळकर प्रथम श्राद्ध-दिन.
आश्विन वद्य ३०, शके १८७०
केसरी कार्यालय, पुणे २.

सर्वांचा नम्र सेवक,
**सदाशिव विनायक बापट**

# जीवन-संदेश

## अर्थात्

## तात्यासाहेबांचा अखेरचा लेख



तीर्थरूप तात्यासाहेब केळकर याच्या निर्याणानतर, त्याच्या कांहीं पुऱ्या व काहीं अपुऱ्या हस्तालिखितांची जुळवाजुळव करीत असता, 'पैलथडचा मोक्ष' हा अप्रतिम लेख माझ्या हातीं आला. या लेखाच्या पहिल्या दहापाच ओळी वाचल्यावर एकदम असें वाटलें कीं, जणू काही त्यानी आपला जीवन-सदेशच. आपणामागें लोकास पहावयास सापडावा म्हणन आपल्या हातानें लिहून ठेवला आहे! जीवन ही एक चमत्कारिक समस्या आहे त्याचें उत्तर सर्वानाच सापडत नाहीं. १९४६ च्या ऑगस्टमध्ये आमच्या घरीं 'मोक्षाची कल्पना' या विषयावर त्याची ध्वनि-मुद्रिका घेतली गेली. त्यात त्यानीं सागितलें कीं 'मोक्षाची पेठ' म्हणून या जगाच्या पलीकडे काहीं वस्तु आहे असें नाहीं. मोक्ष हा या जगात, इतकेंच नव्हे तर, याच देही याच डोळां अनु-भवावयास सापडतो या पुस्तकात आठवणी लिहिणाऱ्या मनात मानवी आयुष्याच्या पैलथडीला गलेले तात्यासाहेब आपला सदेश म्हणून एक-दोन शब्द तरी सागतील काय अशी भावना खात्रीनें येत असेल. त्याचें काहीं अशीं तरी समाधान होईल अशा अपेक्षेनें, हा लेख इतरत्र कोठेंहि प्रसिद्धीला न देता, मी याच पुस्तकाकरिता देत आहें

— काशिनाथ नरसिंह केळकर

# ऐलथडीचा मोक्ष
## (न. चिं. केळकर)

आजच्या निबंधाला मी ' ऐलथडीचा मोक्ष ' असें शीर्षक दिलें आहे. पण एक काना कमी करून ' ऐलथडीच मोक्ष ' असें दिलें असतें तरी योग्य झालें असतें. इतकेंच नव्हे तर, मोक्ष हा ऐल व पैल अशा दोन थडींस असतो असें म्हणण्यापेक्षां तो पैलथडीला नसून ऐलथडीसच आहे, असें प्रतिपादन मला किंचित् आग्रहानें करावयाचें आहे. तथापि ऐल व पैल या थडी म्हणजे काय व कशाच्या, याचा थोडा विचार प्रथम करूं. थडी म्हणजे कांठ व तीर. हे शब्द सामान्यतः नदीच्या दोन कांठांना, बाजूंना लावतात. मग या दोन कांठांच्या मध्यें काय आहे ? तर नदीचा प्रवाह. लाक्षणिक अर्थानें हे शब्द घ्यावयाचे तर, ऐलथडीचा मोक्ष म्हणजे मृत्यूपूर्वी इहजन्मरूपी नदीच्या अलीकडे लाभणारा मोक्ष, व पैलथडीचा मोक्ष म्हणजे मृत्यूनंतर पलीकडे लाभणारा मोक्ष. मध्यतरींच्या या जलसमूहाला किंवा प्रवाहाला 'मायानदी' किंवा 'भवसागर' असे रूढ शब्द आहत. पावसाळ्यांतल्या नदीच्या पात्रा-पेक्षां उन्हाळ्यांतील पात्र लहान असतें. परंतु हें नित्य कोरडें व प्रसंगविशेषीं भरून राहणारें असें मिळूनच इहजन्मरूप नदीचे पात्र म्हणतां येतें. त्याचा प्रारंभ जन्मापासून होतो व शेवट मृत्यूंत ठरतो ही मायानदी किंवा हा भवसागर तरून जाणें या दोनहि गोष्टी मोठ्या, सामान्य माणसाच्या लागी नाहींत, असें समजण्यांत येतें प्राकृत कवि म्हणतो, " उलट उलट माघारी सखया फिर गोते खाशी । हरिमायेचा खेळ कळेना टांगिल उफराटी । या मायानदीचं पाणि गढ्यार त्रिगीच वसरना " इत्यादि. संस्कृत वाङ्मयांत भवसंसार, संसृति, माया यांना समुद्राची उपमा दिली आहे.

ज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्यायांत या माया नदीचे रूपक अनेक अंगांनी वर्णिलें आहे, तें असें. ही माया नदी ब्रह्मरूप पर्वताच्या कड्यावरून सकल्परूप उडी घेऊन निघाली. प्रथम तिजमध्ये पंचमहाभूतांचा बुडबुडा आला. प्रवृत्ति व निवृत्ति या दोन कांठांबाहेर पडून ती वाहते. तिजवर त्रिगुणांचा पर्जन्य पडून मोहरूप पूर येतो त्यानें यमनियमांचीं गांवें वाहून जातात. तिला मत्सररूपी वळणें पडतात. तिच्यांत द्वेषादि भोंवरे उठतात. कामविकारांचे मासे चमकतात. तिजवर सुखदुःखरूप

'वोसाण तरंगत फिरतात. तिजमध्ये जीवरूप केसाचे पुंजके दिसतात. तिला अहङ्काराची मोठी धार आहे. विषयरूप लाटा उठतात. जन्ममृत्युरूप खळगे पडतात. हिच्यांतून तरून जाण्याकरितां बुद्धिरूप हात टाकून कोणी पोहतात कोणी वेदरूपी सांगाडीवर बसतात. कित्येकांनी यज्ञरूप नांवा लोटल्या. " तया पाणियाचे निवाहिले पणें। अजुनी न धरिती वोभाणें। ऐसा मायापूर हा कवणे। तरि जल गा॥ येथ एक नवलावो। जो जो कीजे तरणो पावो। तो तो अपावो। होय ते ऐक॥ पाडस वागुर करांडी। जरी मेरू मुंगी वोलांडी। तरी मायेची पैलथडी। देखती जीव॥"

समष्टिदृष्ट्या, सामुदायिकरीत्या ही सर्व सृष्टि मिळून मायानदी होते.त्याप्रमाणें व्यक्तिदृष्ट्या जन्मापासून मरणापर्यंतचें मनुष्यजीवन हा त्या मायानदीचाच एक फांटा ठरतो. पण तोहि तरून जाणें हें, ती मोठी नदी तरून जाण्याइतकेंच कठीण ठरते व्यक्तिजीवनाची लौकिक यशस्विता ही परमार्थदृष्ट्या यशस्विता नव्हे. तिची खूण वेगळीच होय आणि ती खूण म्हणजे मोक्षप्राप्ति किंवा मोक्षपात्रता

प्रस्तुत लेख मोक्षाविषयी असला तरी त्याची भूमिका बुद्धिप्रामाण्यवादीच आहे. कारण मोक्ष म्हणजे जीवाची अंतिम किंवा उत्तमांत उत्तम स्थिति व गति. मग ती जिवतपणी असो किंवा मरणोत्तर असो. बुद्धिप्रामाण्यवादी म्हटला म्हणजे तो नास्तिक किंवा चार्वाकमतानुयायीच असला पाहिजे अशी सामान्य समजूत असते, पण ती खरी नाही. कारण त्यालाहि विश्वकर्ता ईश्वर म्हणून कोणी आहे हे मान्य करावेंच लागतें. त्याला देहभोगाच्या व्यतिरिक्त इतर कांही ध्येय म्हणून असतेंच. चार्वाकाला कोणतींच नैतिक मूल्यें मान्य नव्हती. बुद्धिप्रामाण्यवादीयांमध्येंहि मतभेद असतो तो या ईश्वराचे स्वरूप आणि ईश्वर व मनुष्यजीव यांचे परस्पर संबंध काय आहेत यापुरताच असतो. तथापि या दोघांचे मार्ग दूरवर एकच कसे आहेत, आणि फुटतात तेथून पुढें कसे जातात, व हें पुढील अंतर किती थोडे असतें, हें या लेखांतील विवेचनावरून पुढें दिसून येईलच

प्रथम मोक्ष या शब्दाचा अर्थ काय हे पाहू. त्याची सर्वसमत व्याख्या एकच अशी नाही. पण सामान्यत यांत दोन कल्पनांचा अंतर्भाव होतो. (१) ईश्वरप्राप्ति व (२) जन्म-मरणाच्या बंधनापासून सुटका. स्वतः शंकराचार्यांनी गीतेच्या १३ व्या अध्यायांतील ११ व्या श्लोकावरील भाष्यांत मोक्षाचा अर्थ दिला आहे तो असा – 'अध्यात्मज्ञाननित्यत्वं न तत्त्वज्ञानार्थदर्शनं। एतज्ज्ञानमिति प्रोक्तं अज्ञानं यत् अतोऽन्यथा' हा श्लोक. त्यावरचें भाष्य असें – "आत्मादिविषयं ज्ञानं। तस्मिन् नित्यभावः। अमानित्वादीनां

ज्ञानसाधनानां भावनापरिपाकनिमित्त तत्त्वज्ञान । तस्य अर्थः मोक्षः ससारस्य उपरमः । तस्य आलोचनं तत्त्वज्ञानार्थ दर्शनं । तत्त्वज्ञानफलालोचने हि तत्साधनानुष्ठाने प्रवृत्तिः " लोकमान्य टिळकांनी हा अर्थ गीतारहस्यांत खालीलप्रमाणें सांगितला आहे – " ज्ञान म्हणजे क्षेत्र-क्षेत्रज्ञ किंवा प्रकृति व पुरुष यांच्या विवेकाचें ज्ञान. विभक्त दिसणाऱ्यांमध्यें अविभक्तता एकत्व पाहणें. पण हें ज्ञान केवळ बुद्धीनें जाणणें एवढाच अर्थ मोक्षशास्त्रांत विवक्षित नसतो. त्या ज्ञानाचा देहस्वभावावर साम्यबुद्धिरूप परिणाम घडला असला पाहिजे. एरवीं तें ज्ञान अपुरें किंवा कच्चें होय. म्हणून ज्ञान म्हणजे ' बुद्धीला अमुक अमुक कळणे ' असें न सांगतां ' मान व दंभ सुटणें; अहिंसा, अनासक्ति, समबुद्धि इत्यादि वीस गुण मनुष्याच्या अंगांत दृष्टीस पडूं लागले म्हणजे त्याला म्हणावें ' असें वरील श्लोकानें गीतेत सांगितलें आहे ". हे वीस गुण कोणते हें कळणें इष्ट आहे. ते असे :– ( १ ) अमानित्व ( २ ) अदंभित्व ( ३ ) अहिंसा ( ४ ) शांति ( ५ ) आर्जव ( ६ ) आचार्योपासना ( गुरुभक्ति ) ( ७ ) शौच ( ८ ) स्थैर्य ( ९ ) आत्मविनिग्रह ( १० ) वैराग्य ( ११ ) अहंकाराचा अभाव ( १२ ) जन्ममृत्युजराव्याधि हे दोष आहेत अशी जाणीव ( १३ ) अनासक्ति ( १४ ) ससारांत लपट होऊन न राहणें ( १५ ) इष्ट व अनिष्ट फलप्राप्तीविषयीं समबुद्धि ( १६ ) ईश्वराविषयी अनन्यभक्ति ( १७ ) एकांतवासाची आवड व ( १८ ) जनांच्या गर्दीत मिसळून राहण्याची नावड ( १९ ) अध्यात्मज्ञानाच्या नित्यत्वावर विश्वास ( २० ) तत्त्वज्ञानाचे परिशीलन.

या सर्वांवरून हें दिसून येईल की, मोक्ष म्हणजे ( १ ) ( बुद्धीनें ) विशिष्ट अध्यात्मज्ञानसंपन्न आणि ( अंतःकरणानें ) विशिष्ट मानव ( नैतिक ) गुणसंपन्न अशी स्थिति होय. म्हणूनच ' मोक्षस्य न हि वासोऽस्ति न ग्रामांतरमेव वा ' – ' मोक्ष नांवाचें वसतिस्थान म्हणून कोठें ( बांधलेलें ) नसतें, किंवा मोक्षाला जाणे म्हणजे आपण उठून परगांवी जातों तसें ग्रामांतर करणें नव्हे ' हे वचन सार्थच होय. याचा अर्थ मोक्ष हा मनुष्याला ( याच जन्मी ) अनुभवसाध्य असतो.

बुद्धिप्रामाण्यवादी झाला तरी मोक्षाच्या वरील व्याख्येला तो काय म्हणून नांवें ठेवील ? कारण विश्व हें विविध विचित्र अनेक असलें तरी अंतिमस्वरूपी तें एकात्मच होय, अशी कल्पना ( Unity of the Universe ) समन्वयपद्धतीनें ( Synthesis ) त्याला करतां येते व तो करतोहि. त्याच्या या एकात्मतेच्या कल्पनेंत सूक्ष्म भेदछटा राहात असली तर, आपल्या वैदिक द्वैत-वेदांत्यांच्या तत्त्वज्ञानांत जी सूक्ष्म भेदबुद्धीची छटा असते, तिच्याहून ही अधिक नाही खास, आणि ज्ञानसंपन्नतेच्या यथार्थपणाला अवश्य अशा ज्या

वीस गोष्टी वर सांगितल्या आहेत त्यांत तर बुद्धिप्रामाण्यवादी हा जी नीति म्हणून समजतो तिचा बहुतेक सर्वसंग्रहच आहे.

वैदिक तत्त्वज्ञानाप्रमाणें जीवाला मोक्षप्राप्ति होण्याला ज्या शिडीवरून चढावे लागतें त्याच्या पायऱ्या – पायंडे खालीलप्रमाणें आहेत – ( १ ) जीव धारण व रक्षण करणें याला अजाणतें कर्म म्हणतां येईल. ( २ ) जाणतें कर्म म्हणजे संसारप्रयोगी कर्म. तें वर्णाश्रमधर्माच्या नियमाप्रमाणें म्हणजे 'विहित' या शब्दानें वर्णन करण्यासारखें असावें. हें नित्यकर्म, कर्मयोगांतील कर्म. ( ३ ) हें कर्म करतांना कर्त्यानें त्याच्या फलाची इच्छा ठेवूं नये. निदान त्याविषयीं आसक्ति तरी नसावी. ( ४ ) आपण करतों तें सर्व कर्म ईश्वरार्पीत्यर्थ व ईश्वरार्पण असें समजावें. ( ५ ) असे केल्यानें चित्तशुद्धीला प्रारंभ होतो. ( ६ ) मग या चित्तशुद्धीला विशेष साहाय्य म्हणून, ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणें, हठयोग किंवा ईश्वरभक्ति, भजन ( पूजाअर्चा, नामस्मरण इत्यादि ) यांचा अभ्यास करावा. ( ७ ) यानें समत्वबुद्धि म्हणतात ती प्राप्त होते. ( ८ ) आणि समत्वबुद्धि प्राप्त झाल्यानें सम्यक् ज्ञान होतें. ( ९ )या ज्ञानसंपन्नतेची स्थिति हाच मोक्षहीच जीवन्मुक्ति, परंतु ( १० ) मरणोत्तर विदेहमुक्तिहि आत्म्याला लाभते. तिचेचार प्रकार मानण्यांत येतात, ते असे – ( १ ) सलोकता ( २ ) समीपता ( ३ ) सरूपता ( ४ ) सायुज्यता. यांपैकीं द्वैतमत वादी पहिल्या तीन प्रकारच्या मोक्षावर सतुष्ट असतात, पण अद्वैतवादी केवळ सायुज्यतेचाच मोक्ष मानतात.

अशा रीतीनें ही दहा पायऱ्यांची शिडी तयार होते, परतु एका जुन्या वैदिक तत्त्वज्ञानशास्त्राप्रमाणें ( मीमांसा ) या शिडीवर चढताना प्रथम जवळच एक आडवाट फुटते, आणि तिजवरून बाजूला जाणारा जीवात्मा स्वर्गलोक, पितरलोक म्हणून जीं वसतिस्थानें आहेत तेथें जाऊन राहतो. या स्वर्गलोकांत जाण्याची इच्छा असेल तर त्याला यज्ञ हें साधन सांगितलें आहे, आणि पितरलोकांत जाण्याची इच्छा असेल त्याला श्राद्धादि कर्में हें साधन सांगितलें आहे, परंतु ही दोन्हीहि कर्में बोलूनचालून काम्यकर्मेंच होत. म्हणजे विशिष्ट फलप्राप्तीची इच्छा मनांत ठेवूनच केलेली कर्में होत अर्थात् वेदान्त ( द्वैत असो, अद्वैत असो ) शास्त्रांत सांगितलेला मार्ग हा नाहीं, आणि मीमांसा-शास्त्र निरीश्वर मानण्याचें कारण हेंच की, त्या शास्त्रानें विहित म्हणून सांगितलेल्या शास्त्राची फलश्रुति स्वर्गप्राप्तींतच समाप्त होते. प्रत्यक्ष ईश्वरप्राप्तीपर्यंत जातच नाहीं.

यावरून हें दिसून येईल की, स्वतःला बुद्धिप्रामाण्यवादी म्हणवून घेणारे लोक वैदिक मीमांसकांपेक्षां वेदांती मोक्षवाद्यांनाच अधिक जवळचे आहेत. कारण मोक्षप्राप्तीच्या शिडींतला क्रम व कार्यक्रम या दोघांनाहि

सारख्याच मान्य आहे. कसें तें पहा. त्यांना जीवधारण हें कर्तव्य वाटतें. ते कर्मयोगवादी आहेतच, मात्र ते सर्वस्वीं सनातन पद्धतीचा वर्णाश्रमधर्म मानीत नाहींत. पण आतां तो धर्म हिंदुसमाजांत कितीसा उरला आहे? जन्मसिद्ध वर्ण म्हणजे जाति असें मानण्यापुरताच तो उरला आहे, किंवा त्याचें तसें विकृत रूपांतर झालें आहे गुणाप्रमाणें वर्णकर्म आणि आश्रमधर्माचें तत्त्व बुद्धिप्रामाण्यवादीहि तें चांगलें ध्येय म्हणून मान्यच करतात. बुद्धिप्रामाण्यवाद्यांना निष्कामता अनासक्तीपुरती तरी मान्य असतेच. मात्र ते प्रयत्नवादी, प्रगतिवादी, उत्कर्षवादी, उत्क्रांतिवादी असल्यामुळें, उद्योग केल्यासारखें कर्माचें कांहीं फल मिळावें असें ते मानतात. स्वार्थत्यागानें होणारी बुद्धीची शुद्धता त्यांना इष्ट व मान्य आहे, आणि प्रत्यक्ष मोक्ष म्हणजे काय याची त्यांची कल्पना अद्वैतवाद्यांशीं मिळती नसली तरी, जीवन्मुक्ताला लागणारे गुण हे नीतिगुण म्हणून त्यांना मान्य असतात. फरक पडत असला तर मरणोत्तर जीवाची — आत्म्याची काय स्थिति होते या विषयापुरता पडतो. त्याला आत्म्याचा पुनर्जन्म मान्य असो नसो. परतु जीव हा आत्मरूप असला व त्याला ईश्वराशी तादात्म्य मिळवितां येते हा सिद्धान्त खरा असला, तरी त्याशीं बुद्धिप्रामाण्यवाद्याला कांहीं कर्तव्य नाहीं. मुख्य मुद्दा हा आहे कीं, (१) जीवस्थितीत मोक्ष' मिळविण्याचा वेदान्ती मार्ग आणि बुद्धिप्रामाण्यावर आधारलेला नीतिनिष्ठ मनुष्यजीवनमार्ग यांत अभेदच आहे, एकरूपताच आहे. पण मला प्रस्तुत विशेषेंकरून सांगावयाचे ते हे की, (२) ईश्वराव्यतिरिक्त वेगळे असे स्वर्गलोक व पितरलोक वेदान्ती तत्त्वज्ञानानें निर्मूळ किंवा अमान्य केले नसले तरी, त्यांची त्यानें जी निंदा व जो निषेध केला आहे त्यांत बुद्धिप्रामाण्यवादी सहमतच आहे. मात्र तो एक पायरी आणखी पुढें जातो व असेंहि मानतो की, स्वर्गलोक व पितरलोक इत्यादि लोक मुळी अस्तित्वांतच नाहीत, केवळ मानिव आहेत. मनुष्यापुरतें जे काय आहे तें एक ईश्वर आणि ईश्वरनिर्मित सृष्टि व त्यातील मनुष्याचे स्थान.

पण शेवटचा मुद्दा म्हणजे मूलभूत भेद सोडून देऊन स्वर्गलोकादिकांच्या निंदानिषेधांत उभयतांचें जें ऐकमत्य आहे तें कसे हें पाहूं. बुद्धिप्रामाण्यवादी असें मानतो की, स्वर्ग-नरक, पितरलोक, भूतपिशाचलोक, यक्षगंधर्वलोक हे खरे नाहीत. आतां उत्क्रांतितत्त्वाप्रमाणेंहि कृमिकीटकापासून पुढें परिणति होऊन मनुष्य झाला त्याप्रमाणेंच, मनुष्याहून श्रेष्ठ म्हणजे अधिक परिणत, अधिक अध्यात्मगुणसंपन्न अशा अतिमानुष प्राण्यांच्या जीवांचाहि वर्ग असावा, तो कां नसेल असा तर्क चालविल्यास तो चालण्यासारखा आहे.

आणि सुशिक्षित आधुनिक अशा वर्गामध्येंहि ( उदा. थिऑसफिस्ट ) अशा अतिमानुष श्रेष्ठ वर्गाचें अस्तित्व मान्य करून त्यांशी संबंध जोडणारे, त्याचा अनुभव येतो, आम्ही घेतों, असे मानणारे, म्हणणारे लोक असतात. त्यांना आम्ही नांवे ठेवूं इच्छित नाही. ही ज्याच्या त्याच्या अनुभवाची गोष्ट आहे. तथापि मीमांसक व पुराणपद्धतीचे अनुयायी जो स्वर्गलोक मानतात तसा हे थिऑसफिस्ट मानीत नाहीत, ही मुद्दयाची गोष्ट आहे.

मनुष्यबुद्धि चिकित्सक असली तरी, जन्मापूर्वी आपण कोण, काय, कोठे, कसे होतों यापेक्षां, मृत्यूनंतर आपण कोठें जाणार, काय होणार, कसें राहणार, किंवा सर्वथा नष्ट होणार, या चिकित्सेकडेच त्याचें मन अधिक झुकतें. ' इहजन्म हा आपल्या जीवाच्या प्रवासामधला एक मधला मुक्काम असावा, ही गोष्ट त्याला स्थूलपणे पटते, पण प्रवासामध्यें आपली दृष्टि चालून आलेल्या मागच्या मार्गावर असत नाही, पण पुढच्या म्हणजे चालून जाण्याच्या मार्गावर असते. जन्मापूर्वी असू नसू किंवा कसेंहि असू. पण या जन्मीच्या सुख दुःखादि भोगांच्या अनुभवामुळे मरणोत्तर काय गति होणार या विचाराचा ध्यास त्याला लागतो आतां ही गोष्ट सर्वच माणसांना लागू आहे असे नाहीं, कारण कांही लोक याच जन्मीच्या संसारांत इतके गढून गेलेले असतात कीं, इतर दूरच्या अदृश्य गोष्टीच्या विचारांत गेलेला वेळ हा त्यांना अपव्यय वाटतो. पण इतर कांही लोक तसे नसतात. कदाचित् त्यांना हा जन्म इतका दुःखाच गेलेला असतो पुढच्या जन्मी कांही सुख लाभून या दुःखाचा वचपा निघावा, भरपाई मिळावी अशी आर्तता त्यांना उत्पन्न होते किंवा इतर कांहींना सुखच इतकें लाभलेलें असते की, तसेंच सुख पुढील जन्मींहि मिळावें, या सुखी जीवनाची परपरा वाढावी, याकरितां त्यांना पुढील जन्मीची आस्था वाटते. पण इतरांहि आणखी दोन वर्ग आहेत. एक संसाराविषयी उदासीन व विरागी ( सुखी किंवा दुःखी नव्हे ) आणि दुसरे म्हणजे या जन्मीच्या जीवनांत आनंदाने रमणारे उत्साही, तथापि निवान्त वेळी जिज्ञासा चालवून तात्त्विक विचार करणारे या चार वर्गांपैकीं पहिल्या दोहोंना स्वर्ग-पितरादि 'लोकांची' कल्पना सुचली व पटली पण तिसऱ्या व चवथ्या वर्गाच्या लोकांना सृष्टि, आत्मा व ईश्वर म्हणजे काय, त्यांचा परस्पर संबंध कांहीं आहे कीं नाहीं, याच्या ज्ञानाचें महत्त्व वाटून त्यांनीच मननपूर्वक शोध केला व कल्पना चालविल्या व उपपत्ति बसवल्या. या लोकांचें लक्ष प्रथम भोंवतालच्या सृष्टीकडे गेले आणि तिजमधील ईश्वरशक्ति हुडकून काढतांना, त्यांनीं भिन्नभिन्न देवता, उपदेवता यांची निर्मिति मनानें केली. त्यानंतर ही उपपत्ति खोटी वाटून असमाधानाने त्यांनी स्वतः अंतर्मुख होऊन

योगशास्त्र, मानसशास्त्र यांवर सब तत्त्वज्ञान आणून ठेवलें. पण त्यानंतर फिरून डोळे उघडून बहिर्मुख होऊन त्यांनीं सर्व सृष्टीची एकवाक्यता करून सर्वांतर्यामी ईश्वर भरला आहे, तथापि व्यक्ति-(मनुष्य) जीवालाहि स्वतंत्र म्हणून कांही कर्म कर्तव्य आहे असें त्यांना पटलें. मात्र हें कर्तव्य करूनहि शिवाय जीवाचा व ईश्वराचा संबंध अखंड आहे व त्या संबधाच्या सूत्राला चातीवर फिरणाऱ्या सुताप्रमाणें पीळ पडून दृढता येऊन तें त्या चातीवर अखेर गुंडाळले जाऊन पुनः एकरूप व्हावें, हीच तत्त्वज्ञानाची खरी उपपत्ति असें त्यांना वाटून म्हणजे हाच मोक्ष ठरून, ज्ञान, योग, भक्ति प्रार्थना, नैष्ठिक आचरण, नीति, ममताबुद्धि इत्यादि साधनें म्हणून त्यांनीं ठरविली.

आत्म्याचें सत्य स्वरूप अद्यापि ठरलेंल नाहीं. आत्म्याला आकार, रूप, रंग असेल काय ? थिऑसफिस्ट तत्त्वज्ञानाप्रमाणें आत्म्याचा फोटो ( छायाचित्र ) निघू शकते. उपनिषत्काळी आत्मा हा काळजाच्या भागांत असे असें मानीत. हठयोगी व तांत्रिक यांच्या मतें आत्मा हा मेंदूच्या संनिध असतो आत्मा मोहरीएवढा आहे असें कोणी मानतात अंगुष्ठमात्र असतो असें कित्येक मानतात. काळजांतला आत्मा मनोमय पुरुष, तर मेंदूं-तलें ब्रह्म हा मनस्पति व आत्म्याहून वरिष्ट असेंहि मत आहे. आत्म्याला शरीर नसल तरी त्याला स्थानिक व्यापकता आहे असें मानीत. आत्मा सर्व शरीर व्यापून राहतो असेंहि एक मत आहे. अर्थात् अशी सर्वव्यापकतेची शक्ति असणाऱ्या आत्म्याला हवें तितकें लहान व हवें तितकें मोठे होतां येणें शक्य होईलच ते कसेंहि असो, आत्मा हा मरणोत्तर शिल्लक राहतो असें वाटणें स्वाभाविक आहे. मग त्यामागून परिभ्रमण-संक्रमण यांची कल्पना आली. पण तो वृक्षजल इत्यादिकांत राहण्यापेक्षा फिरून मनुष्यदेह घेऊनच अवतरित होणें हे अधिक पटण्या-आवडण्यासारखें आहे. मग हा नवावतार चांगला की वाईट होईल ? याचे उत्तर ओघानेंच आले कीं, पूर्वजन्मांत त्याचें आचरण असेल व त्याच्या उर्वरित वासना चांगल्या किंवा वाईट असतील त्याप्रमाणें हा नवा अवतार होईल.

मनुष्याला आपण कां, कसे जन्मलों या चिकित्सेपेक्षां मरणोत्तर आपलें काय होणार ही चिकित्सा अधिक वेधून राहते यांत शंका नाही. मागें काय गेले यापेक्षां पुढें काय येणार याकडे त्याचें लक्ष अधिक असतें. आगगाडी-च्या उघड्या खिडकीशीं बसणारा प्रवासी मागच्या वाटेकडे तोंड करून बसत नाही. तो पुढच्या वाटेकडे तोंड करून बसतो. जें पूर्वजन्मीं किंवा या जन्मीं होऊन गेलें तें संपलें किंवा पदरांत पडलें. त्याचा विचार

करून काय उपयोग ? पण जें पुढें येणार आहे त्याची वार्ता जितकी आगाऊ कळेल तितकी हवी असें त्याला वाटतें, आणि कल्पना करावयाची तरी देखील तो पुढ त्याविषयींच करील. या न्यायानें मरणोत्तर आपलें काय होणार याचा विचार मनुष्य जिवंतपणीं करतो तेव्हां मरणोत्तरहि आपण हे आपणच राहूं व राहावें असें त्याला वाटते, इतकेंच नव्हें तर आज ज्यावर आपली सत्ता, स्वामित्व वा अधिकार चालतो, त्यावर पुढच्या जन्मीहि तो तसाच चालावा अशी आकांक्षा त्याला राहते मनुष्य मृत्युपत्र करतो, तेव्हां त्याची हीच अपेक्षा असते; आणि अशा मृत्युपत्रांत तो आपल्या मिळकतीचा वारसा पुढील पिढ्यांकडे एकामागून एक कसा जावा व तिची व्यवस्थाहि त्यांनीं कशी करावी, याविषयीं तो बंधनेंहि आपल्याकडून घालतो. हिंदुधर्मव्यवहारशास्त्राप्रमाणें असे निर्बंध फक्त स्वार्जित मिळकतीवरच घालतां येतात. इंग्रजी विशिष्ट कायद्याप्रमाणें वडिलार्जित मिळतीवरहि हा अधिकार चालतो. त्या सनिर्बंध वारसा-हक्काला 'इस्टेट इनटेल' असें म्हणतात. मात्र या हक्काला मर्यादा पडावी, किंबहुना एकाकडून दुसऱ्याला मिळणाऱ्या मिळकतीवर फाजील निर्बंध असल्यास तिच्या उपयोगाचे स्वारस्य जाते म्हणून इंग्रजी कायद्यांत 'परपेच्युइटी' म्हणजे 'निरंत बंधन' कायदा चालू देत नाही. तसेंच हिंदुस्थानांतील 'ट्रान्सफर ऑफ प्रॉपर्टी'च्या कायद्यांतहि अशीं कांहीं बंधनें घातलेली आहेत. असो

मरणोत्तर जन्म मिळावयाचा तर तो सुखाचा मिळावा, दुःखाचा नसावा अशी इच्छा असणें स्वाभाविक आहे. वैदिक धर्माच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें मरणोत्तर जीवाच्या तीन गति संभवतात स्वर्ग, नरक, मोक्ष या कल्पना कोणीं काढल्या, कोणाला सुचल्या, कोणीं कशा बसविल्या असा विचार केला तर वाटतें कीं, (१) या जन्मांतील जीविता-वर नाराज झालेल्या लोकांनीं मोक्षाची कल्पना काढली. (२) जीवनावर खूष, संतुष्ट असून या जन्मांतील सुखोपभोग मरणोत्तरहि मिळावे असें ज्यांना वाटलें त्यांनीं स्वर्गाची कल्पना बसविली, आणि (३) या जन्मांत मनुष्यांकडून सत्कर्म करवावें, त्यांना सन्मार्गावर ठेवावें अशी इच्छा असणाऱ्या परोपकारी नीतिवेत्त्यांनी मनुष्याला भीति दाखविण्याकरितां नरकाची कल्पना बसविली मनुष्य-जन्मावर संतुष्ट असलेले व असंतुष्ट असलेले असे मुख्य दोन विभाग सहजच होतात. असंतुष्टांमध्यें (१) ज्यांच्या वांट्याला दुःखच आलें, आणि (२) ज्यांना दुःख भोगावें लागत नाहीं, परंतु तात्त्विक दृष्ट्या ज्यांना जन्माचें व्यर्थत्व वाटलें, असे फिरून दोन विभाग होतात. या जन्मांत दुःखच ज्यांच्या गांठीं पडलें तो म्हणणार, असला जन्म फिरून घेऊन

फिरून दुःखाचाच संभव किंवा धोका पत्करावयाचा त्यापेक्षां, जन्मच न घेतां आला तर काय वाईट ? पण तात्त्विक दृष्ट्या विचार करणारा म्हणणार दुःख मिळो वा सुख मिळो, एर्कंदरीनें ती उठाठेवच, म्हणजे असंतोषालाच कारण. ती उठाठेव हवी कशाला ? त्यापेवजीं ज्या ईश्वर-तत्त्वांतून मी निघालों व जन्म पावलों त्या तत्त्वांत परत जाऊन मिसळतां आलें तर तें किती चांगलें ! आणि असें होण्याचा उपाय त्यांनीं विचारान्तीं शोधून काढला तो हा कीं, ईश्वर व जीव हे दोन्ही एकच होत आणि हें ज्ञान झालें व मनांत बिंबलें तर यापुढचा जन्म मिळणार नाहींच व या जन्माची उठाठेवहि फारशी त्रासदायक होणार नाहीं देशांतराला गेलेला, नोकरीवर गेलेला मनुष्य हा नेहमीं मनांत आपल्या घरची आठवण ठेवून, उदासवृत्तीनें पण कर्मकुशल पद्धतीनें, नोकरीचे दिवस काढून, ती संपतांच पुढें कायमची स्वस्थता भोगण्याकरितां परत घरीं येऊन राहतो. त्याप्रमाणें जीवाला उत्कंठा लागणें स्वाभाविक आहे व ईश्वरी तत्त्वांत लीन होणें संभवनीय आहे, असें ज्यांना वाटलें त्यांनीं ही मोक्षाची कल्पना निश्चित ठरविली असावी.

सामान्य मनुष्याच्या मोक्षाच्या कल्पना निश्चित नसतात. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें ज्यांनीं उपपत्ति बसविली व ज्यांना ती इष्टता पटली त्यांनीं मात्र हेंहि सांगितलें कीं, मोक्ष हा सत्यज्ञानानें मिळणारा असून, तें ज्ञान या जन्मांत करून घ्यावयाचें म्हणजे तो मोक्षहि याच जन्मांत मिळ-वावयाचा. त्यांचें म्हणणें ' मोक्षस्य न हि वासोऽस्ति न ग्रामांतरमेव वा ' या वचनांत चांगलें व्यक्त होतें. त्यांना या जन्मापलीकडे कांहीं दिसत नाहीं. तें इतकें कीं, मरणोत्तर आत्म्याचें परिभ्रमण, पुनर्देहधारण इत्यादि गोष्टी जवळ-जवळ नाकबूल करणारे म्हणून त्यांना कदाचित् स्वतःला नास्तिक म्हणवून घेण्यासहि तयार झालें पाहिजे. आणि एक ईश्वर व एक जीव या दोहोंचाच नित्य निकट संबंध असून त्यांच्यामध्ये दुसरा कोणी येऊं शकत नाहीं अशी त्यांची शुद्ध व तात्त्विक भूमिका असते. ज्ञानाप्रमाणें भक्ति हें ईश्वर-प्राप्तीचें साधन असे ज्या द्वैतवादी तत्त्वज्ञान्यांनीं ठरविलें त्यांनीं देखील पुनर्जन्माची इच्छा किंवा अपेक्षा केली नाहीं. ज्ञानवादी व भक्तिवादी यांत असला तर फरक इतकाच कीं, ज्ञानवाद्याच्या मताप्रमाणें मोक्ष-प्राप्तीला मरणाचीहि वाट पाहाण्याचें कारण नाहीं; आणि भक्तिवादी म्हणणार कीं, ईश्वरप्राप्ति व्हावयाची ती मरणोत्तरच होईल. ती होण्याकरितां आपण जन्मभर भक्ति करीत राहावें. मोक्षाच्या कल्पनेंत पुनर्जन्माचा अभाव गृहीत धरलेला असतो. तसेंच ज्ञानवादी व भक्तिवादी मुमुक्षु या दोघांची दृष्टि पुढें असल्या-मुळे, मागील जन्माचा विचार किंवा चिकित्सा ते फारशी करीत बसत नाहींत.

मोक्षनामक जी गति तिचें हें विवेचन झालें. पण स्वर्ग व नरक यांच्या कल्पनांचें विवेचन उरलें व तें असे. नरकाची कल्पना जीवाला शिक्षेचें भय घालण्याकरितां काढलेली असावी हें वर सांगितलें आहे. परोपकारी नीतिवेत्ता हें जाणतो कीं, मनुष्याला सन्मार्गावर ठेवण्याला एखाद्या पारितोषिकाची लालूच दाखविण्यापेक्षांहि शिक्षेचें भय दाखविलें असतां तें अधिक परिणामकारक ठरते. राजकीय समाजांत देखील आपण हेंच पाहतों. कारण समाजधारण व्हावयाचें तर त्यांतील घटक-व्यक्तिमात्राला अन्याय, अपाय न घडेल, त्याजवर अतिक्रमण न होईल, त्याला स्वतंत्र व शांततेनें राहून आत्मसाधन करतां येईल, विचारस्वातंत्र्य, आचार-स्वातंत्र्य भोगावयास मिळेल, तरच ती धारणा होईल. म्हणून अपराध करणारापासून त्याचा बचाव केला पाहिजे. याकरितां पिनल कोडासारखे कायदे करून त्यांत राजसत्तेच्या दृष्टीनें, अपराध, गुन्हे कोणते आणि ते केले असतां अपराध्याला काय शिक्षा करावया हें सांगितले असते पण याच्या उलट असा एखादा कायदा नसतो की, ज्यांत मनुष्य सदाचाराची कृत्यें करीत राहिल्यास त्याला अमुक एक बक्षीमपारितोषिक द्यावे. तात्पर्य, अनुग्रहाचा कायदा नाही, पण निग्रहाचा मात्र आहे. धर्माच्या दृष्टीनेंहि हीच विचारसरणी ओघानें येते. म्हणून परोपकारी नीतिवेत्ते मनुष्याला सांगतात कीं, तू दुराचार केलास तर तुला पुढील जन्मीं नरकवास म्हणजे दुःख व यातना भोगाव्या लागतील. पण राज्यशास्त्र व धर्मशास्त्र यात एक फरक पडतो तो हा की, राज्यशास्त्रांतील विधि फक्त पिनल कोड करून शिक्षा सांगतात. ज्यांना वर सांगितलेली मोक्षाची कल्पना सुचत नाही, पटत नाही, किंवा आपल्या कार्याला पुरी पडेलशी वाटत नाही असे धर्मशास्त्रप्रणेते नरकवासाचे पिनल कोड व प्रोसीजर सांगतात. त्याबरोबर दुसरे पक्षी स्वर्गाचे आमिष दाखवून त्याला लोभवूनहि सत्कृत्ये करण्याला सांगतात. मात्र या दोनहि गोष्टी करणारांत निःस्वार्थी, परोपकारी नीतिवेत्त्यांबरोबरच स्वार्थसाधु, लोभी धर्माधिकारीहि असूं शकतात. असें म्हणण्याचें कारण हे कीं, नरक व दुर्गति यांच्या वाङ्मयापेक्षां स्वर्ग व स्वर्गातील सुखसंपन्नता याविषयींचेंच वाङ्मय अधिक भरतें. धर्मग्रंथांतील दानाध्याय पाहिला म्हणजे याची खात्री पटेल. वर्षांतील असा एकहि दिवस नाही की ज्या दिवशी कांहीतरी दानविधि विहित म्हणून सांगितलेला नाही, आणि या प्रत्येक दानाला कांहीं ऐहिक व कांहीं पारलौकिक सुखलाभ सांगितलेले असतात. ग्राम्य शब्दांनीं बोलावयाचें तर "देवा, मला हें दे म्हणजे मी तुला हें देईन" असा मजकूर दानखंडांतील वाङ्मयांत असतो. या अनुयोगी-प्रतियोगी भाषेनें येथून तेथून सर्व लिहिलेलें

असतें; आणि दानाला सत्पात्र कोण तर ब्राह्मण ! असें ठरून गेल्यामुळें या दानखंड-वाङ्मयाची जबाबदारी किंवा दोष हा कोणी सर्वस्वीं ब्राह्मणांवर लादला तर त्यांत काय चूक ? नुसती नरकवासाची शिक्षा सांगणाराला हा स्वार्थाचा दोष तरी लागूं शकत नाहीं.

मोक्षाची कल्पना कशी निघाली हें पाहण्याला प्रथम या जीवन-संसाराची चिकित्सा करणें प्राप्त आहे. कारण मोक्ष म्हणजे या संसारापासून सुटका जन्ममरणाच्या उपाधीचें निर्मूलन अशी व्याख्या व समजूत दृढमूल राहिलेली आहे. जीवन हें वाईट वाटल्याशिवाय जन्माचा फेरा नको कोण म्हणेल ? जीवनाचें वर्णन अनेक लोकांनी अनेक प्रकारांनीं केलेलें आहे. हें वर्णन करणारा मनुष्य बहुधा आपल्या अनुभवावरून तें करतो आणि हे अगदी स्वाभाविक आहे. परंतु असेहि कांही लोक असतात की, त्यांना स्वत:ला जीवनाचा अनुभव कसाहि आला असला तरी ते जीवनाकडे आत्मनिरपेक्ष व स्वतंत्र दृष्टीनें पाहूं शकतात. खेळ खेळण्यापेक्षां खेळ पाहणाराला खेळ अधिक चांगला दिसतो अशी म्हणच आहे. म्हणून दोहों प्रकारच्या लोकांनीं जीवनाचें वर्णन कसें केलेलें आढळतें तें पाहू.

मोक्षाच्या सर्व सनातनी कल्पनांत ईश्वरज्ञान गृहीत धरलेलें असतें. पण वस्तुत: मोक्षाच्या कल्पनेंत ईश्वराचा संबंध कांहीच येत नाही मोक्षाची जुनी सामान्य कल्पना म्हणजे जीवानें ईश्वराशी तादात्म्य पावून जन्ममरणापासून मुक्तता करून घेणें. पण या तादात्म्याचा अर्थ लावतांना किती तरी वाद निर्माण होतात. सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता अशा तादात्म्याच्या पायऱ्या मांडलेल्या पाहिल्या म्हणजे हातांत फूटपट्टी, इंचपट्टी घेऊन अतर मोजणारा आधुनिक इंजिनियर आपलें सूक्ष्म गणितज्ञान बरोबर घेऊन अवतरला असें वाटतें. सलोकतेमध्यें ईश्वराचें म्हणून एक निवासस्थान आहे अशी कल्पना करावी लागते. समीपता हा शब्द उच्चारला म्हणजे जुन्या राजदरबारांतिल उच्चनीच स्थानांचा मानक्रम ( Rank and Precedence ) सभाळणाऱ्या अधिकाऱ्याची ( चोपदार, दरबार-कामगार ) आठवण होते. पण ईश्वर दूरचा व जवळचा असा सूक्ष्म भेद मानणारा आहे, म्हणजे पक्षपाती आहे असें मानल्यास आपण त्याचा अपमान करतो असें वाटतें. सरूपतेचा तर अर्थच कळत नाहीं. ईश्वराच्या घरीं ईश्वरस्वरूपाचे मुखवटे तयार करून ठेवले आहेत कीं काय, म्हणून एकेक सत्पात्र मुमुक्षूनें त्यांतला एकेक घेऊन आपल्या तोंडावर चढवावा, म्हणजे एकाच प्रकारचे छापील मुखवटे घालण्याचा कट करून ' फॅन्सी ड्रेस बॉल 'मध्यें घुसणाऱ्या खेळियांप्रमाणें हा कोण, तो कोण हें ओळखतां येऊं नये. सायुज्यता ही समजण्याला अशीच अवघड आहे. द्वैत तत्त्वज्ञानांत ईश्वर व जीव

*

यांमधील अंतर नेमकें मोजणारा सर्वेश्वर गृहीत धरावा लागतो. विशिष्टाद्वैत तत्त्वज्ञानांतील भेदाभेद मोजणें, मापणें याहून अवघड आणि सायुज्यमुक्ति म्हटली म्हणजे तें काय केवळ घटक-संमेलन ( मेकॅनिकल मिक्श्चर ) आहे की, गुणधर्म-संमिश्रण ( केमिकल कांपाउंड ) आहे हें ठरवावें लागते.

पण मोक्षाची खरी कल्पना या सर्वांहून वेगळी आहे. तींत ईश्वराचा सबंधच येत नाही. तीत पुनर्जन्म नाहीं किंवा परलोक नाहीं. स्वर्ग नाहीं, नरक नाही. तत्त्वतः मोक्षाची साधी व्याख्या अशी आहे. मोक्ष म्हणजे ईश्वर-निर्मित मनुष्यजीवाला निःस्वार्थी कर्मयोगाचें आचरण करितांना कर्तव्यविषयक कृतकृत्यतेच्या जाणिवेनें लाभणाऱ्या 'आनंदाची ऊर्मि व तन्मयता' आणि ऐलथडीच मोक्ष यांतील ऐलथडीचा अर्थ 'याच जन्मीं' असा आहे. ऐलथडी म्हणजे मायानदीचें अलीकडचें तीर.

या व्याख्येवरून 'मोक्ष-कल्पनेची व्याप्ति व पर्यवसान' केवळ नैतिक आहे असें सकृद्दर्शनी वाटेल. पण कोणी जुन्या वळणाचा श्रद्धाळू धर्माळू नसला तरी, जीवनमूल्यांची परिसमाप्ति नीतींत होते, त्यापलीकडे कांहीं उरत नाहीं असेंहि मानणारा तो नसतो. नीति ही बहुतांशीं परसापेक्ष तर मोक्ष हा बहुतांशी आत्मसापेक्ष आहे असें मानणें योग्य होईल.

१ मोक्षाचा संबंध ईश्वराशी पोंचत नाहीं. २ जन्ममृत्यूचा फेरा सोडविणें ही मोक्षाची कल्पना चुकीची आहे. ३ मोक्ष हा परतंत्र किंवा परलोकांत अनुभवावयाचा आहे या खोट्या कल्पनेमुळें विद्यमान जीविताचें महत्त्व जीवाला वाटत नाहीं. ४ मोक्ष ही या जन्मांतच शक्य तर अनुभवण्याची स्थिति होय. ५ ही स्थिति आनंदमय तन्मयतेची आहे. ६ आणि ही स्थिति मनुष्यानें कर्मयोगाचें ध्येयनिष्ठ व निर्दोष आचरण केलें असतां या जन्मांतच लाभूं शकते, आणि सुदैवानें ऐलथडीच्या मोक्षाचा हा सिद्धान्त हिंदु लोकांचे धर्मग्रंथ, तत्त्वज्ञानग्रंथ व धार्मिक कवि यांच्याच आधारानें पटवून देतां येण्यासारखा आहे.



# वर्णानुक्रमणिका

## ओ



## क

### ज



### ट



### ड



### ढ



### त

द

फ



ब



## चुकीची दुरुस्ती

पान ४८७ वर रा. र न. होनप याच्या नावावर दोन आठवणी छापण्यात आल्या आहेत. पण त्यापैकीं फक्त क्रमाक एक रा. होनप याची असून, क्रमाक दोन ही रा. बाळकृष्ण विठ्ठल शिखरे, मिरज, याची आहे झालेल्या या चुकीबद्दल दिलगिरी वाटते. त्या उभयतानी क्षमा करावी – संपादक.

श्री

# देशभक्त – साहित्यसम्राट्
# नरसिंह चिंतामण केळकर
## यांच्या
# आ ठ व णी



## पुरुषोत्तमशास्त्री रानडे
( शास्त्री, आनन्दाश्रम, पुणें )

( १ ) मम कै केळकरमहाशयै: सम यो हि सबन्धो घटितः स संस्कृत विषयककार्ये एव । तेषामेव महा नन्द पुण्यपुरे १८६३ तमशकाब्दे द्वितीयसस्कृत-साहित्यसमेलनस्याधिवेशनमभवत् । आसश्च ते तत्समेलनस्य कार्याध्यक्षाः । वेणु-(बेळगाव) ग्रामे प्रथमसस्कृतसाहित्यसंमेलनस्याधिवेशनावसरे द्वि. सं. सा समेलनस्य निमन्त्रण तत्र तैरेवोद्घोषितम । तेषामेव च महीयसा लौकिकमहिम्ना तत्तत्सस्था-माधिपतिभ्योऽन्येभ्यश्च सपत्तिमद्भ्य: समेलनार्थ प्रभूत द्रव्य लब्धम् । संमेलनेऽस्मिन् ... महा... न विशेषतस्तावद् द्वौ गुणौ मयाऽसकृदनुभूतौ । तयोरेकस्तेषां प्रतिक्षण समेधमान उत्साहः, अपरश्चावसरपरिपालनदक्षता । समेलनाध्यक्षान् पण्डितद्रविडराजेश्वरशास्त्रिणः पुण्यस्थानात् ( पुणे स्टेशन ) आनेतु तात्यामहानुभावादिभिरस्माभिर्गन्तव्यमासीत् । तात्यामहाशयास्तु उष्णीष उत्तरीयं च धारयित्वा यथावसर निर्धारितस्थले सनद्धा एव । समेलनस्थितसकलकार्येष्वपि ते सर्वेभ्य: प्रागेवोपस्थिता भवन्ति स्म । एकदा तु स प महाविद्यालयस्य 'रमाबाई हॉल' नामके सभागृह, समेलनस्यैकः कार्यवाह इत्यह निश्चितकालान्मनागिव पूर्वं गतवान् । यावत्पश्यामि तावन्मदपेक्षयाऽपि प्रागुपस्थितास्तात्यामहाभागाः ।

( २ ) अस्माक गीर्वाणवाग्वर्धिनी सभामपि तात्यामहोदयाः परमयाऽऽत्मीयतया पश्यन्ति स्म । एकदा वार्षिकोत्सवस्य नियोजिताध्यक्षेभ्यः 'केनाप्याकस्मिकेनापरिहार्यकारणेनाहमायातु न शक्नोमि' इति तन्त्रीसंदेशः प्राप्तः । वार्षिकोत्सवदिवसश्च सुनिश्चित आसीत । एतादृश्या विप्रतिपत्त्यां सभाचालकैर्वार्षिकोत्सवाध्यक्षपदार्थ प्रार्थितास्तात्यामहानुभावा अल्पीयस्येवावसरेऽध्यक्षभाषणं विद्वन्मनोहारि क्लृप्त कृत्वा यथावसरमागम्य ...त्वा चाध्यक्षासन समारम्भमरञ्जयन् । इति ।

दुपारीच आमच्या घरीं आले व म्हणाले " मला आज पोटभर गाणे ऐकावयाचें आहे " व त्यानीं सतत सहा तास त्यांच्या आवडीप्रमाणें ध्वनिमुद्रिका लावल्या. त्यांना गायनाचा एवढा जबरदस्त शोक आहे हे मला त्या दिवशीच कळले तसेच स. प. कॉलेजच्या म्युझिक सर्कलतर्फे होणाऱ्या गाण्याना तात्यासाहेब येत असत, हे माझ्या मुलाकडून मला समजतें असे

( ८ ) एकदा कसली तरी एक बैठक आमच्याकडे घेतली गेली व त्या वेळेला खूप मोठा गाराचा पाऊस पडला तेव्हां माझी लहान मुलगी मीनाक्षी हिने खूप गारा वेचल्या. त्यातल्या पुष्कळशा गारा तात्यासाहेबानी इतक्या आवडीनें खाल्ल्या कीं, सर्वांना तेव्हा फारच आश्चर्य वाटलें कारण, तेथील पुष्कळशा मडळीना वयपरत्वे गारा खाता येणे अशक्य झाले होते

( ९ ) माझे वडील सीताराम बाबाजी गुर्जर हे पधरा वर्षे माझ्याकडेच होते व ते 'आजोबा' ह्या नावानेच प्रसिद्ध होते तात्यासाहेब जेव्हा जेव्हा आमच्या घरी येत तेव्हा तेव्हा कामाची अत्यत निकड असूनसुद्धा आजोबाशी पाच मिनिटे बोलल्याशिवाय तात्यासाहेब बगल्याबाहेर जात नसत दारात जर आजोबा उभे असले ( तात्यासाहेब तेव्हा टिळकरोडवरच्या बगल्यात राहत असत ) व ते दारावरून शिवाजी मदिरात किंवा दुसरीकडे जात असले तरीसुद्धा " काय आजोबा, कसे काय ठीक आहे ना ? " व आजोबा ह्यावर " आत येता का ? " असे म्हणाले की, " नको, जातो आता, येईन परत कधीतरी " असे म्हणून हसतमुखाने डुलत डुलत व भराभरा दृष्टिआड होत असत अशी ही प्रेमळ मूर्ति परत काही आपल्या डोळ्यासमोर आता दिसणार नाही म्हणन, ह्या व ह्याहून अनेक आठवणीनी मन खिन्न झाल्याशिवाय राहत नाही



## लक्ष्मण बलवंत भोपटकर

( एम्. ए., एल्‌एल्. बी., ॲडव्होकेट, विश्वस्त, केसरी-मराठा संस्था, पुणें. )

गेली पचवीस-तीस वर्षे कै. न. चि तथा तात्यासाहेब केळकर व मी याचा अनेक कार्यक्षेत्रात इतका निकटचा सबध आला की, तसा इतराच्या नशिबीं क्वचितच आलेला असेल तेव्हा मला तात्यासाहेबाच्या स्वभावाच्या निरनिराळ्या छटा व विचाराचे बारीकसारीक पापुद्रे ही सारी अनुभवायास मिळाली ! त्या सर्वच गोष्टी मी देईन म्हटलं तर तो एक ग्रथच होईल परतु तसे न करता मी फक्त काहीं थोड्याच निवडक आठवणी खाली देत आहें

( १ ) एकाद्याने मनात भरण्यासारखी एखादी कामगिरी केली किंवा एकादे सत्कार्य केलं, तर त्याबद्दल हेवादावा न वाटता उलट त्याचा गौरव करण्यास

मनाचा जो उपजत थोरपणा लागतो, तो तात्यासाहेबाजवळ भरपूर होता व म्हणूनच ते शेवटपर्यंत आपले निस्सीम अनुयायी संपादू व कायम टिकवू शकले !

( अ ) मला तो प्रसंग स्पष्टपणे आठवतो १९०४ साली मी एम्. ए. चा अभ्यास करीत होतो 'तत्त्वज्ञान' हा माझा विषय होता. अभ्यासाच्या ओघात मी 'मराठा' पत्रामध्ये " दी पर्मनंट एलिमेंट्स् ऑफ् रिलिजन " या विषयावर एक लेखमाला लिहिली. ती तात्यासाहेबाना इतकी आवडली की, त्यानी पत्र पाठवून मला मुद्दाम भेटीस बोलाविले व मला मनःपूर्वक शाबासकी दिली. केसरी व मराठा पत्राचे नामवत संपादक म्हणून सुप्रसिद्ध असलेल्या तात्यासाहेबानी एका चोवीस वर्षांच्या अप्रसिद्ध तरुणाचा गौरव केलेला पाहून मला किती धन्यता वाटली असेल बरें !

( आ ) तात्यासाहेब ता. १४ ऑक्टोबर १९४७ रोजी दिवगत झाले. त्याच्या आदल्याच रविवारी म्हणजे ता. १२ ऑक्टोबर रोजी टिळक मंदिरात श्री. धोंडुमामा साठे याचा सत्कार करण्याकरिता जी सभा भरली होती तिचे ते अध्यक्ष होते. श्री. धोंडुमामानी दोन वर्षेपर्यंत अविरत श्रम करून सागलीचे इंजिनिअरिंग कॉलेज जे मूर्त स्वरूपात आणले, त्याबद्दल त्याचा सत्कार करावयाचा होता. त्या वेळी तात्यासाहेबानी धोंडुमामाबद्दल जे गौरवाचे उद्गार काढले व त्यांच्या श्रमाचे चीज करण्याबद्दल महाराष्ट्राला जी तळमळीची विनंती केली, ते उद्गार व ती विनंती आम्हा श्रोत्याच्या कानात अजूनहि घुमत आहेत ! माझी खात्री आहे कीं, त्या उद्‌गारांनीं धोंडुमामाच्या मान्या श्रमाचा परिहार झाला असला पाहिजे !

( २ ) परसुखाने सुखित व परदुःखाने दुःखित होणारा असा तात्यासाहेबाचा आत्मा होता ! १९०५ साली वंगभंगावरून महाराष्ट्रात सुरू झालेल्या आंदोलनात 'भाला' पत्राचे संपादक माझे ज्येष्ठ बंधु भालाकार, ती स्व भाऊसाहेब भोपटकर, याचा सरकारच्या रोषास पहिला बळी पडला ! माझ्या बंधूना पकडले त्या दिवशी मी मुंबईत एल्‌एल्. बी च्या टर्म्स भरण्याकरिता होतो मी लगेच पुण्यास आलो हे समजताच तात्यासाहेब आमच्या घरी येऊन मला म्हणाले, " घाबरू नका पैसे, भाल्यात लिहिणे, याबद्दल काही मदत लागली, तर खुशाल माझ्याजवळ मागा " आम्ही बंधूनी त्याच्याजवळ कोणतीच मदत मागितली नाही, हा भाग निराळा. पण एकट्या तात्यासाहेबानीच न मागता ती देऊ केली, हा नि संशय त्याच्या मनाचा मोठेपणा होता !

( ३ ) तात्यासाहेब हे शिस्तीचे मोठे भोक्ते असत ते दुसऱ्यावर शिस्त चालवीत, तशीच स्वतःवरहि चालवून घेत असत !

( अ ) सन १९२० साली सोलापूर येथे भरलेल्या प्रांतिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. त्या नात्याने त्याना परिषदेचे काम अत्यंत शिस्तीने पार पाडले

एका महत्त्वाच्या ठरावावर भाषण करणारे अनेक वक्ते असल्यामुळे त्यांनीं प्रत्येक वक्त्याला वेळ ठरवून दिलेला होता वक्त्यांमध्ये लोकमान्य टिळक हे एक वक्ते होते लोकमान्य भाषण करीत असतांना ठरवून दिलेली वेळ सपत येताच तात्यासाहेबांनी सूचनार्थ पहिली घटा वाजविली व वेळ सपल्याबरोबर दुसरी घटा वाजविली, आणि लोकमान्यहि असे शिस्तखोर की, घटा वाजविल्याबद्दल कोणताहि राग न मानता ते चटकन खाली बसले ! याबद्दल आमच्यापैकी काहीजण मनातून नाराज झाले ही नाराजी लोकमान्याजवळ व्यक्त केल्यावर, लोकमान्यानीं तात्याना दोष देण्याऐवजी उलट नाराजी दर्शविणाराची चांगलीच खरडपट्टी काढली !

( आ ) केसरी-मराठा ट्रस्टसबधाने टिळकबधूनी केलेल्या दाव्यात ट्रस्टी तात्यासाहेब केळकर व बाबासाहेब विद्वास याच्यातर्फे मी वकील होतो मी दोघानाहि असा निर्बंध घातला होता की, सदरील दाव्याचा निकाल होईपर्यंत टिळकबधूनी अगर इतरानी वर्तमानपत्रातून काहीहि लिहिले तरी त्याला उत्तरादाखल अगर खुलासा म्हणून केसरीत व मराठ्यात त्यानी काहीहि लिहावयाचे अगर प्रसिद्ध करावयाचे नाही तेव्हा काही वर्तमानपत्रातून या दोन्ही ट्रस्टीसबधाने अत्यत गलिच्छ व खोडसाळ असे लिखाण प्रसिद्ध होत असे व त्यामुळें तात्यासाहेबाची लेखणी फुरफुरत असल्याचे मला स्वच्छ दिसत असे तरीपण आपल्या वकिलाने आपणावर निर्बंध घातलेला आहे ना, तर मग तो आपण अवश्य पाळलाच पाहिजे, असा विचार करून त्यानीं त्या निर्बंधाचे उल्लघन रतिमात्रहि केले नाही ! दाव्याचा निकाल ट्रस्टीसारखा झाल्यावर माझे अभिनदन करण्यासाठी ते जेव्हा माझ्याकडे आले तेव्हां मी तात्यासाहेबाना म्हणालो, “ तात्यासाहेब, मी घातलेल्या निर्बंधामुळे तुमच्या मनास यातना होत होत्या हे मी जाणून होतो, परतु पुरावा होईतोपर्यंत मला झाकली मूठ उघडी करावयाची नव्हती. आता तुम्हाला जे काही व जितके लिहावयाचे असेल ते खुशाल लिहा. माझा निर्बंध मी मागे घेतला आहे. ”

( ४ ) कै. तात्यासाहेब तुरुगवासाला भीत नसत; पण त्यासाठी मोठेसे हपापलेलेहि नसत ! सन १९३० साली मीठ – सत्याग्रहात सामील होण्याचे आमच्या पक्षाने ठरविल्यावर एके दिवशी सकाळी तात्यासाहेब व बाबूराव गोखले माझ्या घरी येऊन मला म्हणाले, “ आम्ही मीठ-सत्याग्रहाला आज दुपारच्या गाडीने निघणार आहोत, तुम्हीहि आपली तयारी करा ” तेव्हा मी नागपूर युनिव्हर्सिटीच्या सेकड एलूएल्. बी चा परीक्षक असल्यामुळे परीक्षेचे पेपर तपासीत होतो. मी म्हणालो, “ तुम्ही पुढे व्हा मी चार-आठ दिवसात सारे पेपर तपासून व परत करून सत्याग्रहाला जातो ” तेव्हा तात्यासाहेब विनोदाने म्हणाले, “ जाऊ द्या हो, पेपर तुरुगात नाही का तपासता येणार ? ” ठरल्याप्रमाणे आम्ही

तिघेजण दुपारच्या गाडीने तीन केंद्राकडे निघालो. तात्यासाहेब पेणला जाऊन त्यांनी तेथे सत्याग्रह केला, मी कल्याणला सत्याग्रह केला व बाबूरावानी आपल्या केंद्रावर सत्याग्रह केला. आम्हा तिघापैकी मी व बाबूराव याना पकडण्यात येऊन आम्हांला शिक्षा झाल्या, पण तात्यासाहेबाना पकडण्यात आले नाही ! त्याचा मोठेपणाच त्यांच्या आड आला ! त्याला ते तरी काय करणार ? तरी पण त्यानी सोलापूर येथील लष्करी कायद्याविरुद्ध जी बहुमोल कामगिरी बजाविली, ती वर्ष-सहा महिन्याच्या तुरुंगवासापेक्षा कितीतरी भरीव होती !

( ५ ) तात्यासाहेब एकदा ज्याला आपला म्हणत, त्याचा सतत शक्यतो पाठपुरावा उल्हासाने करीत असत ! सन १९३५ च्या निवडणुकीच्या वेळी मी लोकशाही स्वराज्य पक्षाचा अध्यक्ष होतो तात्यासाहेबाचे म्हणणे असे की, "कायदेमंडळात जाण्याचे आता कॉंग्रेसने ठरविले आहे ना, तर मग या निवड-णुकी आपण लढवूं नयेत " माझे म्हणणे असे की, "पक्ष म्हटला की त्याने यशापयशाचा विचार न करता निवडणुकी ह्या लढविल्याच पाहिजेत कॉंग्रेसला अगदीच मोकळे रान सोडता कामा नये " त्याप्रमाणे निवडणुकी लढण्याचे ठरले. सभा संपल्यावर मी थट्टेखोरपणाने तात्यासाहेबाना म्हणालो, "अध्यक्ष या नात्याने मी तुम्हास फर्माविता की, या निवडणुकीच्या बाबतीत तुम्ही कायावाचामनेकरून पक्षास साहाय्य केले पाहिजे " तात्यासाहेबहि काही कमी विनोदी वृत्तीचे नव्हते. तेहि विनोदाने म्हणाले, "अध्यक्षमहाराज, हे आपले फर्मान मला सर्वस्वी मान्य आहे. बोला, कोणते साहाय्य अन् कसं करू ते " आणि पाहतो तो दुसऱ्या दिवशी उजा-डताच स्वारी माझ्या घरी दत्त उभी ! तेव्हा त्याचा एक गुडघा सुजला असल्या-मुळे त्याना चालवतहि नव्हते. तरीपण तशाहि स्थितीत माझ्याजवळून मत-दारांची यादी घेऊन मतदाराना भेटण्याचा त्यानी जो उपक्रम केला तो शेवट-पर्यंत अव्याहत चालविला !

( ६ ) प्रसंगी तात्यासाहेब जरी कठोर वृत्तीने वागत, तरी खरोखर जात्या ते हळव्या मनाचेच होते ! १९३९ साली भागानगरच्या सत्याग्रहात मी भाग घेण्याचे जे ठरविले ते त्याना मान्य नव्हते. त्याचे म्हणणे असे की, "अगोदर माझे म्हातारपण झालेले, आणि त्यात तुरुंग पाहावयाचा तो निजामी राज्यातला ! तेव्हां माझी काही धडगत लागावयाची नाही म्हणून मी स्वतः सत्याग्रहात जाऊं नये. " शेवटी खास गाडीने अडीचशे स्वयंसेवक बरोबर घेऊन, सत्याग्रहास निघण्याचा दिवस ठरला त्याच्या आदल्या दिवशी संध्याकाळी ते माझ्याकडे येऊन मला म्हणाले, "उद्या स्टेशनला निघण्यापूर्वी माझ्याकडे या, तुम्ही दोघेहिजण या, म्हणजे मी व ती असे आम्ही दोघेजण तुम्हाला आमच्या कुलदैवताचा तीर्थप्रसाद देणार आहोत." तात्यासाहेबाची इच्छा ही मला

केव्हांहि हुकुमाप्रमाणे असे! त्याप्रमाणे आम्ही दोघेजण त्यांच्या घरी गेलो. तात्यासाहेबांच्या पत्नीने (श्रीमती ताईनी) माझ्या पत्नीच्या कपाळास हळदकुंकू लाविले व माझ्याहि कपाळास कुंकू लाविले आणि आम्हा दोघासहि तीर्थप्रसाद दिला. तेव्हा त्याना एवढा हुदका आला की, त्यांच्या नेत्रांतून अश्रूंच्या धारा पाझरल्या! तात्यासाहेबहि अत्यंत गहिंवरले व त्यांचे नेत्रहि पाण्याने डबडबून आले! माझी पत्नी रडू लागली आणि या सर्वांचा परिणाम माझ्या मनावर होऊन जर माझे डोळे ओलेचिंब झाले, तर त्यात आश्चर्य ते काय? या एकंदर प्रकारावरून मी आपल्या मनाशी असा कयास बांधला की, तात्यासाहेब व ताई यांना मी कांही आता जिवंत परत येत नाही असे वाटल असावे व या विचारानेच त्यांचे मन कासावीस झालेले असावे!



## शंकर नारायण हरोप

### (सेवानिवृत्त सरकारी नोकर, केळकरांचे लेखक, ज्योतिर्विद्या परिसंस्थेचे कार्यवाह, पुणें)

कै. गुरुवर्य तात्यासाहेब केळकरांच्या आठवणी सांगावयाच्या म्हणजे त्यांच्याबरोबर लेखकाचा आलेला संबंध थोडक्या शब्दांत का होईना पण सांगणे अपरिहार्य आहे; एरवी त्या आठवणींचे मर्म नीट लक्षात येणार नाही असे वाटते. सबब थोडक्यात तो संबंध आधी सांगतो. माझ्या स्वतःच्या विद्यार्थीदशेपासून तात्यासाहेबांच्या मृत्यूपर्यंत सुमारे ४०-४५ वर्षे कांहींना कांही माझा नैमित्तिक संबंध त्यांच्याशी आलेला आहे केसरीचे एक उपसंपादक कै. दत्तोपंत लिमये यांच्याबरोबर मी केसरी-कार्यालयात अनेक कामानिमित्त जात असे, त्यावेळी तात्यासाहेब केळकर यांच्याबरोबरहि किरकोळ कामे करण्याचा मला हमेशा प्रसंग येई केसरी-कार्यालयातील सर्व कपाटे चाळून पाहिली, यादी करण्याचे काम मजकडेच होते व त्यावेळी खुद्द तात्यासाहेब केळकर यांचीच माझ्या कामावर मुख्यतः देखरेख असे. त्याचवेळी सतत ३-४ वर्षे त्यांचा मी लेखक होतो; पण हे लेखन रात्री ९ नंतर त्यांच्या स्वतःच्या घरी चाले एकसारखा कामानिमित्त भेटण्याचा संबंध मात्र यापुढे सुटला. तदनंतर त्यांच्याकडे मी फक्त कार्यपरत्वे सल्लामसलत विचारण्याकरिता जात-येत असे व हा क्रम मात्र शेवटपर्यंत चालू होता.

(१) कै. गुरुवर्य तात्यासाहेब केळकर यांची स्मरणशक्ति तीव्र होती. १९०४–५ सालची गोष्ट असावी. सध्या जेथे नूतन मराठी विद्यालयाचे हायस्कूल आहे तेथे त्या वेळी "न्यू प्रिपरेटरी क्लासेस" नावाची राष्ट्रीय शाळा होती सुपरिंटेंडेंट कै० शंकर गणेश ऊर्फ भाऊसाहेब लवाटे किंवा श्री. विनायकराव करंदीकर

आलटून पालटून असत त्या साली शाळेच्या शिवाजीउत्सवामध्ये 'शिवरायाचे चरित्र' हा विषय विद्यार्थ्यांच्या वक्तृत्वाच्या चढाओढीत ठेवला असून, विद्यार्थी या नात्याने मी त्यात भाग घेतला होता. परीक्षकात तिघांची समिति होती. एक भाऊसाहेब लवाटे, दुसरे तात्यासाहेब केळकर व तिसरे वामनराव तळवळकर तिघांनीहि त्या वेळीं मला सर्वात जास्त मार्क देऊन पहिल्या क्रमाकाने माझी निवड केली होती. विशेषतः तात्यासाहेब केळकराना माझे भाषण फार आवडल्याचे दिसून आले कारण, समारभानतर बक्षीस देण्याच्या वेळी त्यानीं मला जवळ बोलावून घेतले, माझे नांव विचारले व इतर काही किरकोळ प्रश्न विचारले नतर भाऊसाहेबाकडे वळून ते म्हणाले, "मुलगा तरतरीत दिसतो, त्याने काढलेले मुद्दे व ते माडण्याची पद्धति चागली असून, तो बोललाहि चागला" पुढे २ वर्षात स्थित्यतरे बरीच झाली आमच्या शाळेचे नाव "महाराष्ट्र विद्यालय" ठेविले जाऊन शाळा पाजरपोळाच्या बोळात श्रीधर विठ्ठल दाते याच्या वाड्यात नेण्यात आली त्या सालच्या शिवाजीउत्सवात तानाजी मालुसरे नाटक विद्यार्थ्यानी केले, त्यात तानाजीचे काम मजकडे होते शाळेचे शिक्षक, निमन्त्रित मडळी वगैरे बरीच त्या रात्री उपस्थित होती माझे काम सुबक झाल्याबद्दल सर्वानीच तारीफ केली, त्यात तात्यासाहेब केळकरहि होते शेवटी सागण्याची गोष्ट इतकीच की, दोन वर्षापूर्वीचा मी व माझे नाव स्मरणात ठेवून त्या वेळी नेमक्या माझ्या नावाचा पुनरुच्चार केला व शाबासकी दिली ! या त्याच्या स्मरणशक्तीबद्दल मला अद्यापहि कौतुक वाटते व ती लहानपणची गोष्ट अद्यापि माझ्या चागली स्मरणात आहे पूर्वी तात्यासाहेब यांनी मला कधीहि पाहिले नव्हते व माझे नांव तर त्याना मुळीच माहीत नव्हते. हीच आमची पहिली ओळख

(२) तात्यासाहेबाच्या ममताळूपणाचा व दयाळुत्वाचा अनुभव अनेक वेळा मला चागला आला. केसरीचे उपसपादक कै. दत्तोपत लिमये ह्याच्या दृढपरिचयामुळे माझे त्याच्याबरोबर केसरी-कार्यालयांत जाणे येणे नेहेमीं घडे. त्यावेळी माझें कॉलेजचे शिक्षण पुण्यातील दोघा नामाकित धनिकाच्या आश्रयावर चालू होते, पैकीं काही आकस्मिक कारणानिमित्त एका आश्रयदात्याची मदत एकाएकीं बद पडली. घरची गरिबी व इतर कोणाचाहि आधार नसल्यानें ते मजवर चागलेच सकट आले असे मला वाटले व काय करावे याबद्दल दत्तोपत लिमयाना गोष्ट काढून त्यांचा सल्ला विचारला ते म्हणाले, "हरीप, तुला देता येण्यासारखें मजजवळ काम नाही; पण तू आज मजबरोबर आलास म्हणजे तात्यासाहेब केळकर यांच्याजवळ गोष्ट काढ व कांहीं जमते का पाहा" मी नित्याप्रमाणे श्री. लिमये यांच्याबरोबर केसरी ऑफीसमध्ये गेलो. तात्यासाहेब केळकर जवळच आपल्या टेबलावर कांही कामांत निमग्न असल्याचे दिसले तात्यासाहेबांना आपण गोष्ट काय काढावी, कशी काढावी, ते काय म्हणतील इत्यादि धास्ती मला एक-

सारखी वाटत होती. त्यांच्याशीं निवात बोलण्याची संधि कशी मिळवावी याची मी वाटच पाहत होतो. इतक्यांत सुदैवानें ते खुर्चीवरून उठले व लगबगीने ऑफिसला लागून असलेल्या लायब्ररींत पुस्तक शोधण्याकरितां गेले. लायब्ररीची खोली त्या वेळी मोकळीच असे व तेथे कामाशिवाय सहसा कोणी जात नसत तात्यासाहेब खोलीत एकटेच असलेले पाहून मी त्याच्या पाठोपाठ लगेच गेलो व माझी अडचण त्यांना निवेदन केली. मला कमींतकमी महिना १०-१५ रु. ची मदत ताबडतोब न मिळाल्यास मला कॉलेजचे शिक्षण अर्धवट सोडावे लागेल, आजवर फी-पुस्तकें यांचा केलेला खर्च फुकट जाईल, शिवाय एक वर्ष विनाकारण गेलें ते गेलेंच; तेव्हां केसरी ऑफिसमध्ये फावल्या वेळीं आपण सागाल ते मी काम करतो; पण कसेहि करून मला १५ रुपयांची मदत पाहिजे, तिची आपण व्यवस्था करा, असे दीनवाणीने मी त्याना सांगितले त्याच वेळीं इतर काहीं प्रश्न घरगुती नात्याने त्यानी मला विचारले. शेवटी ते म्हणाले, तुम्ही ऑफिसमध्ये बसा; जाताना मी तुम्हाला सागतो, असे मजबरोबर बोलून ते आपल्या स्वतःच्या कामाला पुनः लागले दोन तासांनतर त्यांनी दत्तोपत लिमये याना आपणाकडे बोलावून घेतले व काहीं विचारविनिमय केला शेवटी लो. टिळकांच्या मधल्या दिवाणखान्यात जी पुस्तकाचीं मोठी कपाटे होती त्यातील पुस्तके काढून तिची विषयवारी यादी करण्याचे काम त्यांनी मजवर सोंपविले व अशा रीतीने त्या वेळचे माझे आर्थिक सकट एका क्षणांत दूर झालें त्या वेळचा माझा आनद गगनात मावेना व तात्यासाहेबांना त्यांच्या मदतीबद्दल मी स्वाभाविकच अंतःकरणपूर्वक धन्यवाद दिले त्या वेळचा परिस्थित्यनुरूप आलेला मजवरचा पेचप्रसग फार मोठा होता व केवळ तात्यासाहेबाच्या दयाळू स्वभावामुळे तो दूर झाला याची आठवण आजतागायत मला आहे.

(३) गु तात्यासाहेबाचा सल्ला अचूक, स्पष्ट व परिस्थित्यनुरूप योग्य असाच असे. त्याची थोडी उदाहरणे देतो.

(अ) प्लेगच्या दुर्धर दिवसांत आमची एक अत्यत जवळची नातलग मुलगी वैधव्याच्या फेऱ्यात सांपडली, व तिचे पालन-पोषण करण्याची जबाबदारी मजवर येऊन पडली माझे स्वतःचे कुटुब बरेच मोठें, पगार थोडा व त्यांत ही नवीन आपत्ति येऊन पडली पण कांही झालें तरी सकटांतून मार्ग तर काढला पाहिजे त्या वेळी अशा विधवांच्या चरितार्थाचे दोनच मार्ग शिल्लक असत. एक लोकांच्याकडे स्वैपाकपाणी करून जन्मभर कष्टांत दिवस काढण्याचा किंवा शाळेंतले शिक्षण घेऊन कोठें शाळामास्तरणीची १५-२० रुपयाची नोकरी करण्याचा पण दुसरा मार्ग अवलबिण्याससुद्धां दोन मोठ्या अडचणी होत्या. पहिली अडचण घरातील वृद्ध मातुश्री व जवळचे सनातनी नातलग यांच्या परवानगीची. कारण तरुण मुलींनीं घरच्या घरीं लिहिण्या-पुसण्याचीसुद्धां जेथें

मनाई तेथे शाळेंत ४ वर्षे शिकून मास्तरीण होणें व नतर अशा मुलींनी स्वतंत्र नोकरपेशा पत्करणे ही कल्पनाच त्या वेळी असह्य होती. दुसरी अडचण अशी होती कीं, मनाचा हिय्या करून शिक्षणाचा मार्ग ठरविलाच तरी सतत ४ वर्षे शिक्षण देण्याला व तेथपर्यंत खर्च झेपण्याला मला स्वतःला शक्ति नव्हती. त्या वेळी मी अनेक मित्राचा सल्ला घेतला, पुष्कळ विचारविनिमय केला गेला, पण कोडे कांही सुटेना शेवटी मनात आले की, आपण तात्यासाहेबांच्याकडे तर नित्यशः जातोंच, मग त्यांना याबाबतीत विचारायला काय हरकत आहे ! श्री. दत्तोपत लिमयाना मी काय करू असे विचारलेंच होतें व त्यानीं शिक्षणाचा मार्ग सुचविला होता त्यानतर एके दिवशी रात्री मोकळ्या वेळेला मुद्दाम तात्यासाहेबांकडे गेलो व सर्व इत्थंभूत हकीकत त्याना सागितली त्यावर त्यानी इतका झटपट व स्पष्ट सल्ला दिला की, माझे कोडे एका क्षणात उलगडले गेले ते म्हणाले " हरीप, तुम्ही आपल्या मातुःश्रींची नीट समजूत घाला, इतर कोणी दुसरे दुराग्रही नातेवाईक असलेच तर त्यांच्या बोलण्याकडे बिलकूल लक्ष देऊ नका. तुमच्या मुलीला तुम्ही हिंगण्याला कर्वे याच्या अनाथबालिकाश्रमात ठेवा, मी कर्व्यांना चिठ्ठी देतो व लगेचच्या लगेच उद्या मुलीला घेऊन त्याना तुम्ही भेटा. " असे म्हणून त्यानी आपल्या हाताने तावडतोब त्याच वेळी एक पत्र लिहिले व मजजवळ दिले. ठरल्याप्रमाणे मी अनाथबालिकाश्रमाच्या त्यावेळच्या मुख्याध्यापिका मिसेस कर्वे याना तात्यासाहेबाचे पत्र दिलें व माझी असहाय्य स्थिति बाईना निवेदन केली. तात्यासाहेबांच्या चिठ्ठीला त्यांनी मान देऊन निम्म्या खर्चात आमची शिक्षणाची सोय केली व अशा रीतीने आमची कायमची अडचण दूर झाली. आता त्या बाई हेड् मिस्ट्रेस असून त्याना ७५ रु. पगार आहे.

( आ ) प्लेगच्या दिवसांत पुण्यात कहर उसळत असे हे सर्वश्रुतच आहे. एके वर्षी पुष्कळ परिश्रम केले तरी झोपडीत राहण्याची आमची कांहीं एक सोय लागेना. आळीत व राहत्या वाड्यात उंदीर पडू लागले व केसेस होऊं लागल्या. जागा सोडण्याचे अगदी निकडीचें होऊन बसले. काय करावे सुचेना. तात्यासाहेबांना गोष्ट काढण्याचे अनेकवार मनात आले. पण माणसाला स्वतःचीच पंचाइत तेथे तो दुसऱ्याची कशी सोय लावणार ! त्याना शब्द टाकून काही काम होणार नाहीं अशी खोटीच कल्पना मी उराशी बाळगून ७-८ दिवस फुकट घालविले, असें त्या वेळीं पाठीमागून मला वाटले. असो. घरात अगदी जवळ प्लेग-केस झाली व पाठीमागें निकड लागली. तेव्हा घाईघाईने जाऊन एकदाचे त्याच्या कानांवर घातलें व मला कोठेंतरी झोपडीत एकादी जागा द्याल कां असें विनविलें. त्यानीं किंचित् विचार करून कै. वासुकाका जोशी याना एक चिठ्ठी दिली व त्यांनींहि मोठ्या कृपेनें आपल्या कँपात माझी सोय केली. पहिल्याने चिठ्ठी पाहून वासुकाका

मनातल्या मनांत काही पुटपुटले पण शेवटी तात्यासाहेबाच्या शब्दाचा मान राखला गेला व माझी त्या वर्षीची अडचण दूर झाली.

( इ ) सुमारे सन १९०८ साली मी महाराष्ट्र विद्यालयात शिक्षक होतो व पगार सारा १२ रु होता शाळा जहाल म्हणून गाजलेली व ती सरकार केव्हा लेखणीच्या एका फटकाऱ्याने उखडून टाकील याची शाश्वति मुळीच नव्हती. त्या वेळचे माझे व्यवसायबधु श्री सदाशिवराव बापट, भावे, दिवेकर इत्यादि मडळी असून कै. दिनकरराव भोपटकर शाळेचे सुपरिंटेडेट होते घरची गरिबी तर होतीच, पण हाच मिळत असलेला चतकोर भाकरीचा तुकडाहि सरकारी रोषामुळे केव्हा हातातून जाईल याची शाश्वति नव्हती. सरकारी खात्यात त्या वेळी नोकरी मिळणे अत्यत दुरापास्त व आमच्यासारख्या सरकारच्या नेहमी डोळ्यावर असणाऱ्या सस्थामधून वावरणाऱ्या व्यक्तीना तर कोणी जवळपासहि उभे करीत नसत, मग नोकरी-चाकरीची गोष्ट तर अत्यत लाबची. अशाहि परिस्थितीत आमच्या एका लाबच्या नातेवाइकाकडून, इरिगेशन खात्यात २० रु पगाराची शेवटची क्लार्कची जागा रिकामी आहे व त्या खात्याचे मुख्य साहेब श्री. विष्णु नारायण ऊर्फ अण्णासाहेब वर्तक आहेत अशी बातमी मला समजली व तेथे खटपट करावी असा मला सल्ला मिळाला रीतीप्रमाणे १।२ दिवसात मी त्याना भेटलो. परिस्थिति, शिक्षण, वय, जात वगैरे आवश्यक लागणारी माहिती दिली व नोकरी मिळण्यास अडचण नाही येथपर्यंत प्रकरण आले. पण शेवटी त्यानी एकच अट ठेवली. ती ही की, मी चागल्या वर्तणुकीबद्दल एखादे शिफारसपत्र दाखल करावे म्हणजे नोकरी मिळेल. वास्तविक त्या वेळीं माझे पुण्यात अनेक स्नेही होते व मला एकच काय अनेक शिफारसपत्रे मिळणारी होती; पण मी मनात असे हेरले की, अण्णासाहेब वर्तकाना जर तात्यासाहेब केळकरासारख्याचे स्वदस्तुरचे सर्टिफिकेट मी दिले तर उत्तम; कारण तात्यासाहेबाचा व अण्णासाहेब वर्तक याचा चागला स्नेहहि आहे ही गोष्ट माझ्या कानावर होती, अर्थात् केळकर याच्या शिफारसपत्राने फारच उपयुक्त कामगिरी होईल असा कयास मी बाधला. माझ्या या धोरणाने एका दगडांत दोन पक्षी मारल्याचे श्रेय मिळणारे होते. एक तर नोकरी हमखास मिळेल यांत शकाच नाही; पण मी केळकराच्या शिफारसीचा मनुष्य म्हणून वर्तकसाहेबाकडून मजवर जरा अधिक लक्ष राहील. तात्यासाहेब केळकरानीं त्याच्या नेहमीच्या दयाळू स्वभावानुसार ही गोष्ट काढताच मला पत्र तर दिलेंच, पण तें केवळ औपचारिक न देता जरा तिखट मीठ लावून दिले. त्याचा त्या वेळीं तर उपयोग मला झालाच पण अण्णासाहेब वर्तक पुण्यात असेतोपर्यंत अनेक वेळां नोकरींत माझा फायदा झाला

( ई ) तात्यासाहेब सर्वच प्रकारची योग्य ती मदत देण्यास नेहमीच तत्पर असत. केसरी कार्यालयातील पुस्तकांची यादी तयार करण्याचें काम चालू असता

ते मधूनमधून मजवर देखरेख करीत असत व वेळोवेळी सूचना देत, हे मी वर निवेदन केलेच आहे. एके वेळी संधि साधून आणखी काही कामगिरी मला देतां येण्यासारखी असल्यास सांगा अशी मीं मागणी केली आठवल्यासारखे करून लगेच त्यांनीं मला सागितलें की, रात्री १।२ तास एका लेखकाची मला जरूरी आहे. तुम्हाला माझ्या घरी येऊन काम करण्यास सवड होईल ? मी त्या वेळी शनीच्या पारापाशी राहत असून तात्यासाहेब गायआळीच्या राममंदिरासमोर आपल्या स्वतःच्या घरी राहत असत अर्थात् त्याच्या घरापासून माझे घर जवळच होते ही एक सोय. दुसरी महत्त्वाची सोय म्हणजे रात्रीच्या वेळी मुकाट्याने जाऊन काम करण्याची अनायासे संधि लाभली ही होय दिवसा ही गोष्ट त्याच्या घरी जाऊन करणे अगर केसरी कार्यालयात जाणे ह्या बाबी त्या वेळी अत्यंत कठीण व दुरापास्त होत्या केसरी संस्थेशी संबंध ठेवणे, केसरी कार्यालयात काम करणारी अगर संबंधी माणसे यांच्याबरोबर स्नेह ठेवणे, गायकवाड-वाड्यात जाणे, फार काय, नारायण पेठेत त्या बाजूला फिरकणे – विशेषतः सरकारी नोकराना – तर फारच जाचक असे, असा तो काळ होता ! साराश, खुद्द तात्यासाहेबानीच मला रात्रीची सवलत दिल्याने माझे आयते काम भागले. मी तात्यासाहेबाचा रात्रीचा लेखक बनलों व ते काम मी सतत ३–४ वर्षे केले तरी त्याचा थागपत्ता सरकारी देवदूतानाहि लागला नाही किंवा इतरेजनाना तर मुळीच लागला नाही. तात्यासाहेबाचा मी लेखक आहे ही गोष्ट त्या वेळी त्याचे दोन चिरंजीव, त्यांचे कुटुंब ताई, दत्तोपंत लिमये व सदाशिवराव बापट इत्यादि ५–७ माणसाशिवाय कुणासहि माहीत नव्हते स्वतःचा लेखक नेमून तात्यासाहेबानी त्या वेळी मला उपकृत करून ठेवले व त्या वेळची माझी आर्थिक अडचणहि अंशतः दूर केली, याजबद्दल मी त्याचा सदैव ऋणी आहे. शिवाय अशा थोर पुरुषाचा सतत रोजच्या रोज सहवास घडला हा लाभ तर मी विशेषच समजतो.

( उ ) तात्यासाहेबांचा लेखक बनल्यावर त्याचे कितीतरी सद्गुण माझ्या नजरेस आले. त्या प्रत्येकाचे तपशिलवार वर्णन केले तर "आठवणी"ची आणखी १०–१५ पाने सहजी अडलीं जातील, व शिवाय सर्व कांही सांगितले असें होणारच नाहीं. तरी या भानगडींत न पडता थोडक्यांत त्यांच्या सद्गुणांचे दिग्दर्शन करतों. अर्थात् रसिकाना त्यामुळे शितावरून भाताची परीक्षा होईलच.

लेखक असताना पहिला जो मला अनुभव आला तो त्याच्या नियमित-पणाचा. मजकूर सागण्यास सुरवात त्याना रात्री ९। च्या सुमारास करावयाची तें रात्री बरोबर १०॥ ला उठायचे रात्री जागरण मला सोसत नाही असे ते वार-वार सांगत असत. त्यांच्या लिखाणात केसरी–मराठ्याचा वर्तमानपत्री मजकूर, निबंध, प्रबंध, टीकात्मक लेख, चरित्र, गोष्टी, नाटकांचे प्रवेश व आल्यागेल्याच्या

लिखाणाची आयत्या वेळची कामे इत्यादि विषय आलटून पालटून असत. वरील-पैकी रोज निदान ४–५ विषयावर लिखाण होई फक्त काव्य टिपून घेण्याचा मात्र मजवर कधी प्रसग आला नाही

लेखनाचा मजकूर ते कधीकधी फेऱ्या घालून सागत असत; पण विशेषतः खुर्चीवर बसूनच मजकूर सागण्याचा त्याचा क्रम असे. मजकूर इग्रजी असो किंवा मराठी असो, लेख सपेपर्यत एकसारखा पण सथपणे सागण्याचा ओघ असे. विशेष घाई नसे किंवा अडखळणे, खोडाखोडी किंवा शोधहि नसत. वर्तमानपत्री मजकूर असला म्हणजे टेबलावरची ४–२ वर्तमानपत्रे उगीचच मधून उलटीपालटी करीत असत मजकुराकरिता आवर्जून ती चाळावयाची असे क्वचित् वेळेला होई. लेखन झाल्यानतर मला किती तरी वेळा त्याच्या प्रगल्भ बुद्धिमत्तेचे व चौफेर ज्ञानाचे कौतुक वाटत असे वर्तमानपत्री रोजचा ठराविक मजकूर सपला म्हणजे ते नाटकाचे प्रवेश लिहावयास घेत नाटकाच्या प्रत्येक प्रवेशाचा बनाव वास्तविक निराळा; म्हणजे एका प्रवेशाची पात्रे लगेच पुढच्या प्रवेशात नसायची व निर-निराळ्या प्रवेशाच्या सवादाचे प्रसगहि निरनिराळे असावयाचे. पण सागण्याचे कारण असे की, यत्किंचित् सगति न सोडता, प्रत्येक प्रवेशात पात्राच्या तोडी येणारी भाषा अगदी ठसकेदार, मार्मिक व प्रसगोचित् अशीच असावयाची. शिवाय त्यात गमतीदार कोट्या, उपमादि अलकार, ठसकेदार सवाद भरपूर असून अश्लीलता मुळी-सुद्धा दिसावयाची नाही. भिन्नभिन्न गुणावगुणाचे चित्रीकरण तात्यासाहेब मार्मिकतेने करीत त्याचे कोणतेहि नाटक चाळून पाहिल्यास या गोष्टी सहज नजरेस पडतील.

इतके विविध विषय व निरनिराळ्या प्रश्नोपप्रश्नावर त्याना रोजच्यारोज लिहावे लागे तरी त्याची सगति कशी सुटत नाही, याचे मला राहूनराहून आश्चर्य वाटे व रात्री घरी येताना अनेक वेळा या प्रश्नावर मनातल्या मनात मी विचार करीत असे एके दिवशी लेखन-कार्य आटोपल्यावर साधि साधून माझ्या मनात डवचणारा हा प्रश्न शेवटी मी त्याना विचारलाच त्यावर ते म्हणाले, "निर-निराळ्या विषयावर मजकूर सागावा लागतो, हे तुम्ही पाहताच; पण मजकुराची गोष्ट काय किंवा नाटकाच्या प्रवेशाची गोष्ट काय, एकदा त्यावर अमुक अमुक लिहावयाचे किंवा अशी अशी माडणी करावयाची हे मी प्रथम मनाशी ठरवितो. ते एकदा ठरल्यानतर भाषेची माडणी करणे एवढेच काम उरते व ते सोपेच असते " या त्यांच्या उत्तराने मी चकितच झालो मला स्वतःला ही गोष्ट अत्यत अवघड भासे; पण त्याना ते काम अगदीच सुलभ वाटे. हा केवळ त्याच्या प्रति-भेचा व प्रगल्भ बुद्धीचा प्रभाव होय यात शका नाही. कित्येक वेळा आमचे लिखाण चालू असतानाच अनेक माणसे भेटण्यास येत व येताना कांहीं कांही-कामेहि खिशात आणीत पण त्याहि कामाचा झटकन् परामर्ष घेऊन, त्याना वाटेस

लावून पुनः आपले मजकूर सांगण्याचे काम सुरू करीत; एकंदरीत त्यांना कामाचा उरक फार जलद असे.

मी त्यांचा लेखक अर्थात् माझा त्यांच्याकडे नित्य जाण्याचा परिपाठ असल्यामुळे व मी अगदी जवळ बसून लिहीत असल्यामुळे तात्यासाहेबांचे कांही ठळक ठळक स्वभावविशेषहि माझ्या नजरेस आल्यावाचून राहिले नाहींत पैकीं बसावयाची जागा वारवार बदलण्याची त्यांना फार हौस असे. आज टेबल येथे मांडलें तर चार दिवसांनी दुसरीकडे; एक दिवस मांडणी अशी तर दुसऱ्या वेळी दुसऱ्या प्रकारची असे त्यांचे वारवार चाले पोषाखात छानछोकी कधीच दिसावयाची नाहीं व मजकूर सांगत असतांना अंगात एक सदरा – तो बहुधा गुंड्या न घातलेला – असावयाचा किंवा जवळ एक साधे उपरणे असावयाचे. मजकूर सांगताना त्यांना मधूनमधून नेहमी ठसका येत असे. शेंगदाणे त्यांना फार प्रिय असत. अनेक वेळा तो त्यांना खाताना मी पाहिले आहे रागीट स्वभाव त्यांचा नसे. एकदोन वेळ कामा निमित्त मजवर ते रागावलेहि आहेत; पण तो राग अगदी क्षणिक व तेवढ्यापुरताच असावयाचा एकंदरीत तात्यासाहेबांचा स्वभाव फार गोड, भारदस्त व सौजन्ययुक्त असे असाच मला शेवटपर्यंत अनुभव आला

( ४ ) चित्ताकर्षक नाटक मंडळीचे नानबा गोखले व दत्तोपंत लिमयांचे धाकटे बंधु ओबा लिमये हे कंपनींतील प्रमुख नट असून कंपनीची अंतर्गत व्यवस्था त्यांच्याकडेच असे. हे दोघेहि माझे चांगले स्नेही होते. तात्यासाहेबांची बहुतेक नाटके हीच मंडळी करीत असून, त्या वेळी ही नाटकें अत्यंत लोकप्रिय असत ज्या ज्या वेळी या दोघां नटांना प्रवेशांत फेरफार किंवा कांही सूचना कराव्या लागत, त्यावेळा आम्ही सर्वजण तात्यासाहेबांच्याकडे जात असू त्यांनी शांतपणें त्यांच्या सूचना लक्षांत घेऊन योग्य ते फेरफार प्रवेशांतून तरी करावेत किंवा योग्य ती सल्लामसलत त्यांना देऊन त्यांची समजूत पाडावी. त्या वेळची त्यांची प्रश्नोत्तरे मला ऐकावयास मिळत. त्यावरूनहि तात्यासाहेबांचा शांत स्वभाव, रेखीव कल्पना व कामाचा उरक यांचा प्रत्यय येत असे.

सन १९१५ साली दत्तोपंत लिमये वारले. तेव्हांपासून केसरी कार्यालयांत सकाळीं तास दोन तास जाण्याचा माझा जो परिपाठ असे तो बंद पडला त्यानंतर तात्यासाहेबांच्याकडे निव्वळ लेखक म्हणून मी लिहिण्यास जाई. तेवढाच माझा संबंध येई. पण पुढे १९१७–१८ च्या सुमारास राजकीय क्षेत्रांत निरनिराळ्या उलाढाली झाल्या, त्यांत त्यांना रात्रींहि निवांत वेळ मिळेनासा झाला व माझेंहि काम अशा रीतीने सुटले तें कायमचेंच सुटलें यापुढें केवळ मी कार्यपरत्वें मात्र त्यांच्याकडे जात-येत असे; पण आमचा नित्याचा आणि नियमित असा संबंध सुटला.

( ५ ) फलज्योतिष शास्त्राचा माझा व्यासंग असून पुण्यांतील अनेक फल-ज्योतिष व गणित ज्योतिष संस्थांचा मी कार्यवाह आहें, ही गोष्ट तात्यासाहेबांना अवगत होती. आमच्या भेटींत जेव्हां ज्योतिषासंबधाने गोष्ट निघे त्या वेळीं अनेकदां ते मला म्हणत कीं, " हरीप, ज्योतिषशास्त्राचा तडकाफडकी प्रत्यय दाखविण्यास लढाईचे प्रसग, माझ्या मतें फार उपयोगी; कारण त्यांत नित्य उलाढाली होत अस-ल्यानें ग्रहादिमान पाहून ठळक ठळक गोष्टींचे अचूक भविष्य तुम्हा लोकांना आधीं का वर्तावितां येऊं नये ?" तात्यासाहेबाचा हा प्रश्न सर्वसाधारण माणसे विचार-तील असाच असे; पण या सोप्या दिसणाऱ्या प्रश्नाचे उत्तर भविष्य सांगून पड-ताळा घालून देणे किती अवघड व कठीण काम आहे हे तज्ज्ञाशिवाय मुळींच समज-णारे नाही. त्याची सागोपाग चर्चा करणे अगर स्पष्टीकरण करण्याचे हे स्थळहि नव्हे व प्रसगहि नव्हे सागण्याचे तात्पर्य इतकेच कीं, कोणातरी ज्योतिषाकडून आपल्या शकेस बिनचूक उत्तर मिळावे ही त्याची मनापासूनची इच्छा होती. सुदै-वाने असा एक बिनतोड व सोळा आणे उत्तर मिळण्याचा प्रसंग आला. खुद्द तात्यासाहेबाचे थोरले चिरजाव बापूराव केळकर यानी हिटलरच्या मृत्यूचे भविष्य आधीं वर्तवून छापून प्रसिद्ध केले होते व ते शभर टक्के बरोबर उतरले त्याची सविस्तर माहिती ताजी असल्याने पुनः सागण्याची जरूरी नाहीं; पण अशा रीतीनें तात्यासाहेबास अखेर घरच्याघरींच अचूक व निश्चित भविष्यवादी भेटला व त्यानें परस्पर उत्तर दिले !

( ६ ) पुण्यात शिक्षणविषयक अनेक सस्था जरी असल्या तरी ज्योतिर्गणित-विषयक सस्था नाही, ही उणीव येथील अनेक विद्वानाना भासत होती. श्री. तात्यासाहेब करदीकर, प्रिन्सिपॉल केशवराव कानिटकर, प्रो मो ल. चद्रात्रेय, प्रा. सखारामपत आपटे, श्री बाबासाहेब पटवर्धन, प. रघुनाथशास्त्री इत्यादि विद्वानानी विचारविनिमय करून "ज्योतिर्विद्या परिसस्था" नांवाची केवळ गणित-विषयक सस्था स्थापन करण्याचे ठरले व एक विनति-पत्रक तयार करण्यात आले. त्या विनति-पत्रकावर जेव्हा मी तात्यासाहेब केळकर याच्याकडे सही मागण्यास गेलो तेव्हा त्यानीं पहिल्याने तपशिलवार माहिती व जरूर ती विचारपूस केली व त्या वेळी त्यांना अत्यत समाधान वाटल्याचे माझ्या निदर्शनास आलें कारण त्याच वेळीं त्यानीं सस्थेबद्दल कळकळीने अनेक उपयुक्त सूचना केल्या व सस्थेकरितां देणग्या किंवा वर्गणी रूपाने फंड कसा उभारावा इत्यादि सल्ला दिला व नतर पत्रकावर खुषीने स्वाक्षरी केली. लोकोपयुक्त कोणतीहि गोष्ट अगर कोणतेहि सत्कार्य असो ते हातीं घेण्यास तात्यासाहेबाचें पाऊल सदैव पुढे असे.

( ७ ) "सह्याद्रि" मासिकांत ज्योतिर्विद्या परिसंस्थेचे इतिवृत्त देण्याबद्दल त्यांनीं आपण होऊन माझ्यामागें तगादा लावला होता व मजकडून लेख येतांक्षणींच

तो आवडीने छापण्याची व्यवस्था केली. तसेच आमच्या संस्थेचे एक प्रमुख सभासद श्री. आनकचद्र याचे "वेदांतील काही गोष्टींचा ज्योतिष्यक दृष्टया विचार" या विषयावर फर्ग्युसन कॉलेजमध्ये उपरिदर्शाच्या (एपिस्कोपच्या) साहाय्याने व्याख्यान झाले त्या वेळी तात्यासाहेब केळकर मी येणार आहे असे आधी कळवून उपस्थित राहिले. त्याना हे व्याख्यान इतके आवडले की, त्यानी ह्या व्याख्यानाचा अनुवाद आपल्या "सह्याद्रि" मासिकाच्या एप्रिल १९४६ च्या अकात स्वहस्ते केला.

(८) आमच्या संस्थेच्या स्मरणात कायमची राहील अशी तात्यासाहेबाच्या आठवणींची एक दुर्दैवी घटना सागावयाची आहे त्याच्या मृत्यूच्या आदल्या दिवशी आमच्या ज्योतिर्विद्या परिसंस्थेची एक छोटी सभा झाली, व तीत असे ठरले की, एका प्रश्नावर अधिकारयुक्त वाणीचा सल्ला घेण्याकरिता मी, मो. ल. चद्रात्रेय व प्रो ग चिं पराजपे यानी दुसऱ्या दिवशी दुपारीं ४ च्या सुमारास तात्यासाहेबाच्या घरी जाऊन त्याची गाठ घ्यावी व त्याना सल्ला विचारावा योगायोग असा चमत्कारिक आला की, नेमक्या त्याच वेळी त्याच्या बगल्यावर त्यांच्या शवाचे अत्यदर्शन घडले! त्या वेळी आम्हा सर्वांना ज्या मृतप्राय वेदना झाल्या त्यांचें वर्णन करणे दुस्तर आहे

(९) तात्यासाहेबाच्याकडे गेल्यावर त्याना "प्रकृति कशी काय आहे?" असे मी सहजच पण नित्य विचारीत असे व तेहि "बरी आहे" म्हणून उत्तर देत. त्याच्या निकोप व सुदृढ प्रकृतीबद्दल कोणालाहि हेवा वाटावा अशीच ती होती. त्याना शेवटपर्यंत जिवावरचा आजार असा झालेला माझ्या पाहण्यांत नाही साऱ्या आयुष्यात चार-दोन वेळा ते आंजारी असतील तेवढेच एरवी मोठे दुखणेबहाणे त्याना अजिबात ठाऊक नाही. एके दिवशी आमचे यासबधाने सहज बोलणे झालें. मी त्याना त्यावेळी विचारले की, चारचौघापेक्षा तुमची प्रकृति, स्वभावाची प्रसन्नता व शरीरयष्टि केव्हाहि पाहिला तरी एकसारखी दिसते, यातील इगित काय? त्यानी उत्तर असे दिले की, "हरीप, तुम्ही तर ज्योतिषी आहात, तुम्हाला याचे उत्तर आधी ठाऊक पाहिजे," इत्यादि बोलून ते म्हणाले, "कुडलीत ग्रहाचा योग काय आहे ते मला माहीत नाही किंवा त्याकडे मी कधीहि लक्ष दिले नाही; पण आरोग्याकरिता कोणताहि व्यायाम मुद्दाम असा मी केव्हाच घेतला नाही किंवा करीतहि नाही कामापुरते जे श्रम पडतात तेवढेच. बाकी एरवी प्रकृतीकरिता खास अशी माझी योजना नसते किंवा यम नियमांचे बधन मी पाळीत नाही" पुढे ते म्हणाले, "प्रकृति सुदृढ लाभणे ही गोष्ट दैवाधीन आहे पण ती तशी टिकविणे मात्र मनुष्याधीन आहे."



## कै. शंकर गणेश लवाटे

**( बी. ए., माजी सहसंपादक केसरी; माजी चिटणीस, पुणें सार्वजनिक सभा )**

( १ ) लोकमान्य मडालेला होते 'काळा'चे सपादक शिवरामपत पराजपे हेहि तुरुगात असून त्याचें पत्र बाबासाहेब सोमण चालवीत होते. त्या वेळीं गणेशोत्सवांत मी एक व्याख्यान दिले, ते 'काळात' छापले गेले ते त्या वेळच्या अधिकाऱ्याना न पटून त्यानी मला नोटीस काढली, व राजद्रोहाचा खटला का करू नये अशी विचारणा झाली माझे मुख्य सल्लागार तेव्हा तात्यासाहेब होते. हरिभाऊ आपटे यांनीहि त्या कामात मन घातले; व माझे छापलेले भाषण सीतारामपत दीक्षित सॉलीसिटर याच्या मार्फत फेरोजशहा मेथाकडून पाहवून आणविले सरकारला वाटेल तो लेख राजद्रोही ठरविता येतो अशी स्थिति आहे असा अभिप्राय आला त्या काळी एकदा राजद्रोही ठरले म्हणजे त्या मनुष्यास पुनः डोके वर काढण्याचा मुळीच सोय नव्हती लोकमान्यासारख्या अलौकिक पुरुषाची गोष्ट वगळी होती मी तेव्हा सार्वजनिक सभेचा असिस्टट सेक्रेटरी होतो तात्यासाहेब मुख्य चिटणीस होते सार्वजनिक सभेचे त्या वेळचे इतर नेते, अण्णासाहेब पटवर्धन, कृष्णाजीपत खाडिलकर, वासुदेवराव जोशी या सर्वांची माझ्याविषयी सहानुभूति होती. परतु सभेला भानगडीत पाडावयाची नाही असे ठरवून त्यांनी माझ्या भाषणाचा सार्वजनिक सभेच्या माझ्या नोकरपेशाशी काही संबध नाही असा ठराव केला. त्याच वेळेस बडोद्यास साहित्य संमेलन होते, तिकडे सगळी मंडळी निघून गेली. तात्यासाहेबानाहि जावयाचे होते; पण ते माझ्यासाठी अगदी शेवटी गेले. सरकारास ताड द्यावयाचे का त्याची माफी मागावयास तयार व्हावयाचे यांतले कोणते करावे असा प्रश्न होता तात्यासाहेब मी कोणताहि केले तरी त्याला अत्यत समाधानाने समति देण्यास तयार होते, व तसे मला सागून ते बडोद्यास गेले मागे, माझ्यावर स्नेह करणारे लक्ष्मणराव गोखले वकीलप्रभृतीच्या विद्यमान मी कलेक्टरसाहेबांपुढे हजर झालो अेक वर्षभर मद्यपाननिषेधाशिवाय दुसऱ्या कोणत्याच राजकीय विषयावर मी व्याख्यान देणार नाही एवढेच त्यानी मजपासून लिहून घेऊन माझा खटला निकालात काढला, माफी वगैरे काही मागावयास लाविले नाही 'नेमस्ता'चा आश्रय घेऊन मी हे कृत्य केले असे झाले! मडळी बडोद्याहून परत आली तात्यासाहेबहि आले मी नारायण पेठेच्या गुत्यापाशी पिकेटिंग करीत होतो तेथे ते मला भेटले, व सर्व मडळी तुमच्यावर फार खवळली आहेत व कदाचित् मला सार्वजनिक सभेची नोकरीहि सोडावी लागेल, असे त्यानी मला सागितले. पण त्याबरोबर हेहि सागून ठेवले की, जर मला सभेची नोकरी सोडावी लागली तर त्याबरोबर आपणहि आपल्या मुख्य चिटणीसाच्या जागेचा राजीनामा देऊ. परंतु इतर पुढारी मडळीचा राग तितक्या पल्ल्यापर्यंत गेला नाही व सर्वच जागच्या-

जागीं शांत झालें. तात्यासाहेबांच्या या वेळच्या प्रेमाचा मला कधीहि विसर पडणें शक्य नाही.

(२) १९१२-१३ सालची गोष्ट असावी. मी म्युनिसिपल निवडणुकीकरितां उभा राहिलो; तात्यासाहेबहि एक उमेदवार होते. मतदारांना विनतिपत्रें पाठविण्याचा खर्च मला पडू नये म्हणून तात्यासाहेबांचे व माझें असे एकच जोडसहीचें विनतिपत्र काढले. निवडणुकीचा दिवस आला. तेव्हा मत देण्याची पद्धति उघडी होती; कोणाला किती मते पडलीं हे तावडतोब कळे आम्ही दोघे उमेदवार एकाच पक्षाचे, त्यामुळे मते वाटली जाऊ लागलीं; त्यामुळे कदाचित् दोघेहि पडू असे भासावयास लागले. ही गोष्ट,त्या वेळचे चाणाक्ष चीफ ऑफिसर रा ब कुम्मठेकर याच्या नजरेस प्रथम आली; व त्यानीं ती आपली शंका तात्यासाहेबांना सांगितली तेव्हां तात्यासाहेब मला म्हणाले, ‘का शकरराव, आता कसे काय करावयाचे ?’ त्याबरोबर मी चटदिशी उत्तर दिले, ‘केसरीचा मान राहिला पाहिजे; हा मी मागे सरलो ’ इतके सांगून मी आपली उमेदवारी लगेच परत घेतली. पिकेटिंगच्या ताजेपणामुळे मी लोकाना काहीसा प्रिय होतो; तेव्हा मी नाव परत घेतल्यामुळे मतदारापैकी काहीना बरे वाटले नाही. मी मागे सरल्यामुळे माझी अडचण तात्यासाहेबास उरली नाही; ते सव उमेदवारात पहिले आले निवडणुकीचा निकाल लागल्याबरोबर तात्यासाहेबानी मला सांगितले की, ‘शकरराव, पुढील निवडणूक तुमची; मी तिला उभा रहावयाचा नाही; व या तीन वर्षात म्युनिसिपालिटीत काय व्हावे अशी तुमची इच्छा असेल ते मला सागा ’ त्याप्रमाणे तीन वर्षे लोटली व नवी निवडणूक आली तात्यासाहेब उभे राहिले नाहीत व मतदाराकडे स्वतः जातीने हिंडून सव प्रचार केवळ माझ्याकरितां केला. निवडणुकीत मी पहिला आलो. हे त्याचे प्रेमाचे व सरळ वर्तन मी कधी कसा विसरेन !

(३) १९२४-२५ साल असेल. मी तेव्हा लोकसग्रह नावाचे दैनिक चालवीत होतो त्यांत माझ्या शक्तीच्या बाहेर बुडालो कर्ज फार झालें जवळ तारण कांहीं नाही केसरींत मागे मीं कामावर असताना माझी एक हजार रुपयाची पॉलिसी उतरलेली होती व शिवाय १८९७ सालीं मी सन् लाइफ इन्शुअरन्स कपनीची एक कूपन-पॉलिसी उतरली होती. अशा माझ्याजवळ दोन पॉलिस्या होत्या. त्या जेव्हा पक्क होतील तेव्हां अडीच हजार रुपये मिळावयाचे; पण वरील प्रसंगीं त्यांची किंमत अगदींच थोडी उगवण्यासारखी होती दोन्ही पॉलिस्या घेऊन कोणी फार झालें तर ५००-६०० रुपये देतील अशी स्थिति होती; पण त्यानें माझें कर्जाचें भगदाड अशतः देखील भरणें शक्य नव्हते. तेव्हा मी तात्यासाहेबाना गाठलें; त्यांना हकीकत निवेदन केली. त्यानीं उदार मन करून,

त्या दोन पॉलिस्यावर केसरीतून मला पंधराशे रुपये देवविले; हे त्यांचे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं.

(४) १९२२ सालची गोष्ट असेल. माझ्या मुलीचे लग्न निघाले. आमच्या-जवळ पैशाचा खणखणाट! सर्व पुढाकार माझे परमपूज्य परममित्र सदाशिवराव बापट यांनी घेतला; पण ते तरी एकटे काय करणार? तेव्हां केसरीचा मी ऋणानुबंधी म्हणून मदतीदाखल तात्यासाहेब यांच्याकडून शंभर रुपये मुलीच्या लग्ना-प्रीत्यर्थ मजकडे रवाना झाले! इतके तात्यासाहेबांचें निर्व्याज प्रेम मी भोगीत होतो; परमेश्वर त्यांना सद्गति देवो!



## रामचंद्र विनायक पटवर्धन

### (सर्कस मॅनेजर, सांगली)

(१) साहित्यसम्राट् कै. तात्यासाहेब केळकर यांचा व माझा प्रथम परिचय ते कोल्हापुरास सन १८८९ साली राजाराम कॉलेजमध्यें उच्च शिक्षण घेण्यासाठी आले तेव्हा झाला त्या वेळी राजारामियन मडळींचा जेवणाचा एक क्लब होता. त्यात ते सभासद म्हणून दाखल झाले. या क्लबांत त्या वेळीं मी एक सर्वांत लहान सभासद होतो या गोष्टीचा उल्लेख कै. तात्यासाहेबांनी आपल्या 'गतगोष्टी' नामक पुस्तकात केलाच आहे तात्यासाहेबांच्या डोक्यावर त्या वेळीं सर्वांचें विशेष लक्ष जाईल असा भला मोठा शेंडीचा झुबका होता त्याची सर्व सभासद अतोनात थट्टा करीत असल्याचे मला पक्के आठवते परतु तात्यासाहेबाचा स्वभाव जात्या प्रेमळ, मनमिळाऊ व सोशीक असल्याने ही सर्व थट्टा ते न रागावता शातपणाने सहन करीत असत. पुढे राजकारणात पडल्यावर त्याच्या प्रतिस्पर्ध्यां-कडून वेळी-अवेळी होणाऱ्या टीकेला धैर्यानें तोंड देऊन आपल्या समतोल व कुशल विचारसरणीने टीकाकाराचा खरपूस समाचार ते घेत असत, हे त्यांचे लेख वाचणाऱ्याच्या प्रत्ययाला आलेच आहे उच्च शिक्षण पुरे झाल्यावर कै. तात्यासाहेब केसरी मराठा सस्थेंत दाखल झाले व मी देवल सर्कशींत शिरलो. तथापि त्याचा व माझा परिचय त्याच्या अतकालापर्यंत कायम टिकला. केसरी सस्थेत काम करीत असताना एकदां सर्कशीत राहून कांहीं दिवस देशपर्यटन करावे, अशी इच्छा त्याना झाली व त्यानी मला तसे पत्र लिहिले. लगेच मी 'अवश्य या' असे उत्तर धातले. परतु माझे पत्र पोचण्याला व त्यांच्यावर केसरीची विशेष जबाबदारी आकस्मिक येऊन पडण्याला एकच गाठ पडल्यामुळें त्यांना आपला देशपर्यटनाचा बेत रहित करावा लागला आम्ही एकमेकांपासून दूर होतों तरी मधून मधून होणाऱ्या पत्रव्यवहाराने आमचा स्नेह जागृत रहात असे मी सर्कशीच्या धद्यांत शिरलो म्हणून त्यांनी मला कधीं कमी लेखलें नाहीं.

उलट सर्कशीसारख्या बिकट धंद्याचे नेतृत्व पत्करून ते यशस्वी करून दाखविल्या बद्दल ते माझे नेहमी कौतुकच करीत असत. याचे प्रत्यंतर त्यांनी मला लिहिलेल्या एका पत्रातील वाक्यावरून कळून आले ते वाक्य असेः– "You are a lucky chap and a plucky manager" सर्कशीच्या धंद्यावर विशेषतः देवल सर्कशी-वर त्यांचा फार लोभ असे. जेव्हा जेव्हा मी त्यांना सर्कस पहावयास येण्याबद्दल निमंत्रण करी तेव्हा तेव्हा त्याचा आदरपूर्वक स्वीकार करून ते सर्कशीला भेट देत असत. एकदा तर देवल सर्कस खडकीस असताना कै तात्यासाहेबांच्या मनात सर्कशीला जावे असे आले ते आपली मोटार घेऊन मी उतरलो होतो तेथे म्हणजे कै डॉ गोपाळराव पळसुले यांच्या घरी आले व मला खडकीला सर्कस बघावयास जाऊ या असे म्हणाले मी लगेच कपडे घालून निघालो व मजबरोबर डॉ पळसुलेहि आले खडकीस जाताना वाटेत बुधवारांत मोटार थांबवून मी एक पुष्पहार व गुच्छ विकत घेऊन निघालो त्या वेळी तात्यासाहेब म्हणाले, 'हा पुष्पहार कोणासाठी?' मी म्हटले, 'तुमच्यासाठी' त्यावर ते बोलले की, "मी आज बोलावण्यावाचून सर्कशीला जात आहे; तेव्हा माझा सत्कार करणे उचित नाही' त्यावर मी म्हणालो की, 'तात्यासाहेब, आपल्यासारखे थोर देशभक्त व पुढारी आमच्या सर्कशीला अनाहूत येतात तेव्हा अशा प्रसंगी आम्ही आपले स्वागत अधिक आदराने व आनंदाने केले पाहिजे.' या उत्तराने तात्यासाहेबांचे समाधान कसे होणार? खडकीस आम्ही तंबूत शिरताच तात्यासाहेबांना अचानक आलेले पाहून प्रो विनायकराव देवलांना अतिशय आनंद झाला व त्यांनी तात्या-साहेबांचे यथोचित स्वागत केले तात्यासाहेबांचा स्वभाव जात्या विनोदी असल्यामुळे सर्कशीतील विदूषकाच्या नकला पाहून त्यांना मोठी मौज वाटे खेळ संपण्यापूर्वी दोन शब्द बोलण्याविषयी तात्यासाहेबांना मी विनंती केल्यावरून ते बोलावयास उठले त्यांनी पहिल्या वाक्यातच सांगितले की, 'देवल सर्कशीला येणे म्हणजे आपल्या घरी आल्यासारखे मला वाटते' या एका वाक्यावरूनच देवल सर्कसबद्दल त्यांना किती आपुलकी वाटत होती हे कळून येईल मला ते नेहमीं 'अरे रामभाऊ' या नावानें संबोधीत असत एकदा भेटीच्या वेळी ते मला विनोदाने म्हणाले, 'अरे रामभाऊ, तू आता सर्कसचा मॅनेजर म्हणून प्रसिद्धीस आलास; तेव्हा मी तुला अरे म्हणतो याबद्दल तुला राग येत नाहीना?' हे वाक्य ऐकून मी सद्गदित अन्तःकरणाने म्हटले की, 'तात्यासाहेब, मला राग तर येत नाहींच; पण मला आपण आपल्या कुटुंबीयापैकी एक मानून प्रेम करता याबद्दल उलट सानंद अभिमानच वाटतो.'

(२) कै तात्यासाहेबांना आपल्या भाषणात नेहमी विनोद करण्याची हौस असे. देवल सर्कसचा मुक्काम पुण्यास असताना हिंदुमहासभेच्या मदती-

प्रीत्यर्थ एक खेळ करण्यांत आला. तो खेळ कळब साखर कारखान्याचे चालक शेठ गुलाबचद याच्या अध्यक्षतेखालीं झाला. ह्या खेळास स्वातन्त्र्यवीर बॅ. सावरकर, दे भ अण्णासाहेब भोपटकर, कै तात्यासाहेब केळकर वगैरे बडी बडी मंडळी उपस्थित होती त्या दिवसाच्या कार्यक्रमात तात्यासाहेबांचे भाषण ठेवले नव्हते तथापि माझ्या आग्रहाच्या विनतीवरून त्यानी भाषण केले, पण ते सर्वांच्या शेवटी केले. अध्यक्ष शेठ गुलाबचद हे भाषण करताना बरेच अडखळले व सर्कसच्या वर्तुळात भाषण करावयास येताना तात्यासाहेबाच्या पायातील जोडा निसटला या गोष्टीचा फायदा घेऊन तात्यासाहेबानी आपल्या भाषणात सहज विनोद केला ते म्हणाले, "देवल सर्कशीतील सिंहव्याघ्रादि हिंस्र पशूनी आताच केलेलीं कामे पाहून आम्ही इतके आश्चर्यचकित झालो की, शेठ गुलाबचद याची जीभ भाषण करतांना एकसारखी अडखळली व माझ्या पायातील जोडा वर्तुळांत येतांना निसटून पडला!" हे वाक्य ऐकताच प्रेक्षकात एकदम मोठा हशा पिकला

(३) कै. तात्यासाहेब हे दिलेले वचन पाळण्यांत अत्यत दक्ष असत. तात्यासाहेब एकदा मिरजेस आल्याचे समजल्यावरून मी व कै. वैद्य गोविंदरावजी बिनीवाले असे मिळून त्याना भेटण्यासाठी सागलीहून मिरजेस गेलो भेटीत बऱ्याच गप्पा झाल्यानंतर सांगलीस येऊन एक व्याख्यान देण्याविषयीं आम्ही त्यांना विनति केली ती त्यांनीं प्रथम नाकारली; पण आमचा सत्याग्रह पाहून शेवटी त्यांनी ती मान्य केली. त्याचा निरोप घेऊन निघताना ते मला म्हणाले की, उद्या सांगलीस मी तुझ्याच घरी उतरेन; तें ऐकून मला मोठा आनद झाला व सागलीस परत आल्यावर त्याच्या स्वागताची सर्व तयारी मी करून ठेवली. कै. तात्यासाहेब केळकर सागलीस येणार ही बातमी सांगलीचे विद्वान् व सुप्रसिद्ध वकील कै. केशवरावजी छापखाने याना कळताच त्यांनीं तात्यासाहेबांची उतरण्याची व भोजनाची सर्व कडेकोट तयारी मला न कळविता करून ठेवली होती तात्यासाहेबांच्या स्वागतार्थ कै. छापखाने हे सागली स्टेशनवर आपला टागा घेऊन आले होते. स्टेशनवर उतरल्यावर बोलत बोलत आम्ही सर्वजण स्टेशनच्या बाहेर आलो. छापखाने यानीं केळकरांना आपल्या टाग्यांत बसण्याविषयी विनंति केल्यावरून ते टाग्यांत बसले. पण लगेच त्याना मला दिलेल्या वचनाचें स्मरण होऊन ते टांग्यांतून खाली उतरले व छापखान्यांना म्हणाले कीं, "मी रामभाऊंच्या घरी उतरण्याचे वचन दिले असल्यानें मी आता तुमच्या घरीं येऊ शकत नाहीं, माफ करा.' छापखान्यांनी आग्रहाची शिकस्त केली; पण त्या आग्रहाला बळी न पडतां तात्यासाहेब माझ्या घरींच आले व माझा पाहुणचार आनंदानें स्वीकारून संध्याकाळीं व्याख्याना-नंतर छापखान्यांच्या घरीं भोजन करून पुढें पुण्यास रवाना झाले. तसेच दुसऱ्या एका प्रसगीं सांगलीस आल्यावेळीं तासगांवच्या पाटीलकुळकर्ण्यांची सर्कस सागलीस

खेळ करीत होती. अर्थात् तात्यासाहेबांसारख्या थोर देशभक्ताचे पाय आपल्या सर्कशीला लागावे या बुद्धीनें सर्कसच्या मालकांनी तात्यासाहेबाना निमंत्रण केले. तात्यासाहेबांनीं सर्कशीला जाण्याचे कबूल केले त्या दिवशी रात्रीं खासगी बैठकीत महत्त्वाच्या विषयावर चर्चा चालू होती. त्यामुळे सर्कशीला जाण्याचे तात्यासाहेबाना विस्मरण झाले. सर्कसच्या मालकानी बराच वेळ वाट पाहिली व तात्यासाहेब येत नाहीत असे समजून ते मजकडे आले. लगेच मी बैठकीच्या जागी जाऊन श्री अतुकाका फडणीस याना बोलावून तात्यासाहेबाना निरोप कळविला. त्याबरोबर तात्यासाहेबाना दिलेल्या वचनाची आठवण होऊन चर्चा ऐन रगात आली असताना ती तशीच थाबवून ते चटकन उठून सर्कशीकडे गेले व तेथे थोडा वेळ बसून परत आले सर्कसच्या मालकानी तात्यासाहेबाचा यथोचित गौरव केला. या गोष्टीवरून कै. तात्यासाहेब हे आपल्या शब्दाला किती तत्परतेने जागत असत हे कळून येण्यासारखे आहे.

( ४ ) स्वत. ग्रथ लिहिणें व दुसऱ्याकडून लिहून घेणे याची कै. तात्यासाहेबाना मनापासून फार आवड असे. त्याच्याकडे केव्हाहि गेले तरी तें वाचनात व लेखनात निमग्न असलेले आढळून येत. सर्कशीच्या धद्यावर मी एखादे पुस्तक लिहावे अशी तात्यासाहेबाची फार इच्छा होती, व त्या कामी सर्व प्रकारचे साहाय्य करण्याचें आश्वासन त्यानी मला अत्यत आपुलकीने दिले होते. ज्या ज्या वेळी त्यांची व माझी भेट होई त्या त्या वेळी त्यानी मला अत्यत कळकळीने पुस्तक लिहिण्यासबधी आठवण करावी. ते नेहमी म्हणत की, सर्कससारख्या अगदी नव्या विषयावर पुस्तक प्रसिद्ध केल्यास मराठी वाङ्मयांत एका नवीन व उपयुक्त ग्रथाची भर पडणार आहे. परतु हें काम तात्यासाहेबाच्या हयातीत माझ्या हातून झाले नाही याबद्दल मला मोठा खेद वाटतो. सर्कशीवरील ग्रथांत कोणकोणते मुद्दे प्रतिपादिले जावे याचें एक विस्तृत टिपणहि तात्यासाहेबानी मला करून दिलें होते. यावरून प्रत्येकानें आपापल्या आवडत्या विषयावर पुस्तक लिहावे याबद्दल तात्यासाहेबांना किती तळमळ वाटत होती हे कळून येईल.

( ५ ) पुण्याच्या 'शिवाजी मदिरा'च्या मदतीसाठी १९२३ साली देवल सर्कशीने मुंबईच्या आपल्या मुक्कामात एक खेळ दिला त्याप्रसगीं भाषण करताना तात्यासाहेब बोलले की, 'शिवाजी मंदिर पुण्यात व त्याच्या मदतीचा खेळ मुबईत होतो ही गोष्ट सकृद्दर्शनी चमत्कारिक वाटेल; परतु घार जशी आपल्या घरट्यापासून व पिलांपासून आकाशात कितीही दूर फिरत असली तरी तिचे सर्व लक्ष आपल्या घरट्याकडे व पिलाकडे असते, तद्वत् प्रो. देवल याचे प्रेम पुण्याच्या शिवाजी मदिरावर असल्यामुळे त्यानी मुबईत खेळ दिला हे योग्यच झाले.'

❀

## गणेश वासुदेव मावळंकर
### ( बी. ए., एल्एल्. बी., अध्यक्ष, सेन्ट्रल असेंब्ली, दिल्ली )

( १ ) साहित्यसम्राट् कै. तात्यासाहेब केळकर म्हणजे स्वर्गस्थ लोकमान्य टिळकाचा उजवा हात, महाराष्ट्राचे नामवत पुढारी, प्रसिद्ध साहित्यिक, केसरी व मराठा पत्राचे सपादक, या नावलौकिकामुळें कै तात्यासाहेबाची माहिती १९०५ मध्यें मी कॉलेजात दाखल झालो तेव्हापासून मला चागलीच झालेली होती. त्यांच्याविषयीं प्रेम व आदर वाटत असे; परतु निकट दर्शनाचा व परिचयाचा योग मात्र १९१६ मध्येच आला

१९०७ साली सुरतेस देशनेत्याचे भिन्न भिन्न विचारप्रवाह वेगळे पडून कॉंग्रेसमध्यें दुफळी झाली व या दुफळीचा फायदा घेऊन सरकारने दडपशाहीचे सत्र सुरू केले व त्यात कै लोकमान्य वगैरे थोर लोकनेत्याच्या आहुति सरकारच्या दडपशाहीसत्राने घेतल्या. त्या कठीण काळात कै. तात्यासाहेबानी जें धैर्य, समतोलपणा व चातुर्य दाखवून लोकमान्याच्या ध्येयाची ज्योत महाराष्ट्रात व एक प्रकारें सर्व हिंदुस्थानांत तळपत ठेविली त्याबद्दल वाटणारा आदर व प्रेम कोणत्या तऱ्हेनें व्यक्त करावा ! त्याच्या त्यावेळच्या अपूर्व कामगिरीची कल्पना, तो काळ ज्यांनी पाहिला नाही त्यास येणार नाही. त्या पिढीतील पुढाऱ्यानीं जे प्रयत्न केले, त्याग केले, हाल-अपेष्टा भोगल्या, त्या सर्वांच्या पायावर कॉंग्रेसची पुढील प्रगति रचली गेली ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. असो.

( २ ) सुरतेची १९०७ ची दुफळी काही काळ तशीच चालू राहिली व १९१६ पर्यंत मुबईच्या राजकीय प्रांतिक परिषदा पण वेगवेगळ्या दोन होत होत्या. १९१६ सालची राष्ट्रीय पक्षातर्फें भरणारी प्रातिक परिषद बेळगांव येथे झाली. त्या परिषदेच्या कामासाठीं कै. तात्यासाहेबानी त्यावेळी गुजराथेत दौरा काढला होता. त्यांच्याबरोबर बहुतकरून डॉ. मुजे असावेत असे वाटते; पण नक्की स्मरत नाही. तात्यासाहेब सुरतेस आले होते व तेथून ते अहमदाबादेस आले. त्यांचा मुक्काम सुमारें १॥ दिवस माझ्यायेथेच होता. कै. तात्यासाहेबांच्या प्रत्यक्ष व निकट परिचयात येण्याचा हा पहिला योग !

कै. तात्यासाहेबाचे विनम्र, साधे व स्वाश्रयी वर्तन पाहून आम्हा घरच्या सर्व मडळींना फार आश्चर्य व कौतुक वाटले. सर्व दृष्टींनीं एवढे थोर पुरुष, परतु राहणी किती साधी व मोकळी ! मोठ्याशीं मोठे, लहानाशीं लहान, कोणालाहि त्याच्याशीं कसे बोलूं असा सकोच वाटावयाचाच नाही. या त्याच्या साधेपणाची व स्वाश्रयी वर्तनाची एका लहानशा गोष्टीनें कमाल वाटली. स्नान उरकल्यानंतर त्यांनीं आपले कपडे धुण्यास सुरवात केली. त्या वेळीं हल्लीच्याप्रमाणे नोकरचाकराची

वाण नव्हती व सुदैवाने आमच्या घरी गडी, शागीर्द वगैरे माणसे होतीच. कोणाहि पाहुण्याने स्वतःचे कपडे स्वतः धुण्याचे काहींच कारण नव्हते घरच्या मडळीस धुवावे लागले तरीहि त्यात वावगे नव्हते देशातील थोर नेत्यांची सेवा करण्याची सधि क्वचितच मिळते व तशी सेवा करण्यात एक प्रकारचा आनदहि असतो. तरीपण आपल्यामुळे कोणासहि त्रास होऊ नये व जेथे जावे तेथें पुनः पुनः प्रेमानें मडळीनी आपणास जवळ करावे, आपल्यासाठी कोणास तसदी पडल्यामुळे आपला कोणी कटाळा करू नये, आपण नेहमी स्वाश्रयी असावे अशा विचारसरणीमुळे कै तात्यासाहेबानी आपले कपडे आपणच धुण्यास सुरवात केली असली पाहिजे.

अर्थात् त्यानी सुरुवात केलेली पाहिल्याबरोबर त्यास मी ते काम करू थोडेच देणार होतों ? त्याना ते न करण्याची विनती करताना, “ आहेत माणसे तीं करतील ” असे मी सांगितले तरी पग ते म्हणाले, “ त्यात काय हरकत आहे ? आता काम नाही, वेळ आहे माझे धोतर मी धुतले तर काय अडचण आहे ! ” अडचण काय आहे ती आम्हास माहीत होती. आमच्या मनाची अडचण मोठी होती ! त्याच्याविषयींच्या आमच्या मनातील आदरामुळे त्यानी कपडे धुणे हे आम्हांला कसे खपणार ? ह्या एका लहानशा गोष्टीवरून कै तात्यासाहेबाच्या अगच्या अनेक गुणांचे व त्याच्या विचारसरणीचे दर्शन होते.

( ३ ) त्यानतर कै तात्यासाहेबाना भेटण्याचे पुष्कळ प्रसग आले. जेव्हा जेव्हा मी पुण्यास जाई तेव्हा तेव्हा त्यास मी अवश्य भेटत असे. कै तात्यासाहेबांना भेटणे म्हणजे त्यांच्याशीं चर्चा करण्यासाठीं किंवा बोलण्यासाठीं जाणे नव्हे, तर त्याना नमस्कार करून त्याच्याविषयी वाटणारा आदर व्यक्त करण्यासाठीं. इग्रजीत ज्याला Call करणे असे म्हणतात – ते करण्यासाठीं मी त्यांच्या घरीं जात असे. त्याच्याकडे जाण्यांत पुष्कळच मनोरजक व विविध अशी माहिती सहज बोलण्यांत मिळत असे, हाहि एक लाभ असे; पण तो आनुषगिक.

( ४ ) सन १९२४–२५ साली कै. तात्यासाहेब मध्यवर्ती विधिमडळाचे सभासद असतांना माझे मित्र शेठ कस्तुरभाई लालभाई हेहि सभासद होते कापडावरची जकात ( Excise Duty ) काढून टाकण्याचा ठराव त्यांनी विधिमडळामध्ये १९२४–२५ च्या बैठकीत आणला होता त्या ठरावाच्या पुष्टयर्थ सरकारी दप्तरांतून माहिती गोळा करण्याच्या कामासाठी व त्या माहितीची मांडणी कशी करांवी तें ठरविण्याच्या कामी शेठ कस्तुरभाईना मदत करण्यासाठी मी दिल्लीस सुमारे १०-१२ दिवस राहिलो होतो. त्या वेळी मध्यवर्ती विधिमडळांतील महाराष्ट्रीय मडळी – कै. तात्यासाहेब, लोकनायक अणे, सरदार मुतालीक, श्री बेळवी, नागपूरचे कै. अभ्यंकर वगैरे मंडळी दिल्लीस एका बंगल्यांत एकत्र रहात असत तेव्हां त्यांच्याकडे

२-४ वेळा जाण्याचा व बोलण्या-भेटण्याचा मला योग आला होता. अनेक विषयावर विस्तृत माहिती, विनोदप्रचुर बोलणे, भाषासौष्ठव व पावलोपावली दिसणारे त्यांचे गुण – साधेपणा, बहुश्रुतता, मार्मिकता – वगैरेमुळे त्यांच्याजवळ पुनः पुनः जावे व काही वेळ त्यांच्यासनिध घालवावा असे वाटे.

कै. तात्यासाहेबानी आपलें तारुण्य ज्या प्रकारच्या राजकीय काळांत देशसेवेसाठी अर्पण केले, तो काळ एक प्रकारे धकाधकीचा होता. ती धकाधकी केवळ सरकारशीच होती असे नसून लोकशाहीची प्रगति करण्यासाठीं जुन्या पिढीच्या कार्यकर्त्यांशीहि काही अशी धकाधकी करणे आवश्यक होते. नव्या-जुन्याचा झगडा हा नेहमीचाच आहे. परतु त्या काळात म्हणजे १८९०–९५ ते १९२५ पर्यंतच्या काळात तो जास्त तीव्र होता. कै तात्यासाहेबाची देशभक्ति किंवा कष्ट सोसण्याची तयारी कमी होती असे मला केव्हाहि वाटले नाही. परतु त्यांच्या स्वभावाची व मनाची ठेवण अशा प्रकारची होती की, पक्षाभिमान व त्यामुळे येणारा दृष्टीचा कलुषितपणा अगर सकुचितपणा त्यांच्यात नव्हता. ते न्याय-निष्ठुर व समदृष्टि असत व कोणत्याहि प्रश्नाकडे पहाण्याची त्यांची दृष्टि समतोल-पणाची असे. त्यामुळेच त्यांची भाषा मुद्देसूद व ठसकेदार असली तरीहि ती कटु प्रहार करू शकत नव्हती.

१९३७ साली मी विधिमंडळाचा अध्यक्ष निवडला गेल्यानतर कै. तात्या-साहेबांना भेटण्याचे प्रसग कमी आले. कै. रावबहादूर ग व्य. जोशी यांच्या तैल-चित्राचा अनावरण-समारभ भारत इतिहास सशोधक मंडळात माझ्या हस्ते झाला. त्या वेळीं कै. तात्यासाहेब मडळाचे अध्यक्ष म्हणून उपस्थित होते. त्यानी त्या वेळीं मनोरंजक जुन्या आठवणी सांगितल्या. त्यांच्या “ गतगोष्टी ” वाचण्याचा व त्यांचें लो. टिळकाचे चरित्र पुनः वाचण्याचा योग १९४२ च्या तुरुंगवासांत आला. त्यांच्या वर्तनांत “ आधी केले मग सांगितले ” हे तत्त्व होते याची मनोरंजक व उद्बोधक हकीकत श्री. कमलाबाईच्या “स्मरणसांखळीत” सापडते. साहि-त्याच्या सर्व प्रकारच्या क्षेत्रात तें किती निमग्न होते याची जाणीव त्यांच्या वाङ्मयाचे १२ भाग प्रसिद्ध झाले आहेत त्यांवरून कोणासहि सहज होते.



## बाळ गंगाधर खेर

(बी. ए., एल्एल्. बी., पंतप्रधान, इलाखा मुंबई)

(१) मोठ्या लोकांच्या आठवणी लिहितांना त्यातून परावर्तित होणारा मोठे-पणा स्वतःच्या अहंकाराला पोषक असतो असा एक आठवणी लिहिणाऱ्यावर आक्षेप येतो. या कारणामुळे मी मोठ्यांच्या आठवणी लिहिण्यास फारसा उत्सुक नसतो.

परतु लोकमान्य टिळकाच्या आणि आतां तात्यासाहेबाच्या आठवणी लिहिण्याच्या वेळीं श्री. बापटाचा प्रेमाचा अनिवार्य आग्रह नाकारणे अशक्यच झाले म्हणून चार ओळी लिहून पाठवीत आहे. तात्यासाहेबाच्या स्मृतीला एक पुष्पाजलि या दृष्टीनेच त्याजकडे पाहावे; नाही तर त्याजवरहि वादविवादाचे रण माजल्यास दुर्दैव! तात्यासाहेबांच्याच शब्दात म्हणतो, " करायला जावे चागल्या शुद्ध हेतूने आणि व्हावें कांहीं तरी विपरीत, यापेक्षा ते न करणे बरं ! "

( २ ) तात्यासाहेब केळकराना मी प्रथम महाराष्ट्र प्रातिक कमिटीच्या बैठकींत पाहिले; परंतु त्याचा व माझा परिचय लोकमान्याच्या मृत्यूनतर स्वराज्य पक्षाच्या सघटनेच्या प्रसगी झाला त्यावेळी आमच्या मणिलाल आणि खेर सॉलिसिटर्स या फर्मचे ऑफिस ५३ मेडोज स्ट्रीट येथें होते. परतु ज्या इमारतीत ते होतें तीवर नवा नबर ६५ असा घातलेला होता. जुना नबर ५३ होता. एक दिवस तात्यासाहेब पत्ता शोधीत शोधीत आमच्या ऑफिसात दाखल होऊन हुश्श करीत म्हणाले, " अहो, तुमच्या पत्रात तुमचा पत्ता ५३ मेडोज स्ट्रीट असा छापता, परतु वास्तविक घरावर नबर ६५ आहे. तुमचे ऑफिस शोधताना दमलो बुवा ! " मी म्हटले, " पण, ५३ मेडोज स्ट्रीट, या पत्त्यावर पाठविलेली पत्रें बरोबर पोचतात ". त्यावर नेहमीच्या विनोदी पद्धतीने ते उद्‌गारले, " अहो, पण मी पोस्टाने नाही आलो ! " त्याची माझी तेव्हा नुकतीच ओळख झालेली असल्याने मला त्याचा हा मनमोकळेपणा व विनोद हृदयगम वाटला. कारण फार थोड्या हिदी गृहस्थात विशेषतः पोक्त वयाच्या हिंदी गृहस्थात विनोदी वृत्ति आढळून येते. क्षणभगुर ससारांत बिचारे पर्वताएवढ्या दुःखाने इतके दबून गेलेले असतात की, त्याना " जवापाडे सुख " कधी नजरेसच पडत नाही आणि सदा दुःखी-कष्टी जीवास विनोद कसा सुचणार ! तात्यासाहेब या नियमाला मला अपवाद वाटले विनोद, चित्त स्वस्थ असल्यावाचून सुचत नाही दृढ विश्वासावाचून चित्ताला शाति प्राप्त होत नाही. हरिपत पडित वारले त्या वेळी अगदीं शेवटच्या क्षणी त्याची मुद्रा शात होती. ती पाहून कोणीतरी त्याना विचारले " कसे काय वाटते ? " तेवढ्या क्षीण अवस्थेंतहि पांच बोटे जुळवून, नैवेद्य दाखविताना करतात तशी करून ते म्हणाले, " समारोप चालला आहे समारोप ! " आतां आपल्या ध्यानांत येईल – स्थितप्रज्ञ टिळकांच्या अतेवासी तात्यासाहेबानी श्लोक लिहून कां मृत्यूची तयारी करून तनु त्यागिली !

( ३ ) इसवी सन १९२१ मध्ये लोकमान्यांची स्मृति टिकविण्यासाठी व त्यांचे कार्य चालू ठेवण्यासाठी म्हणून केसरीच्या आकाराचे "लोकमान्य" दैनिक मुबईत सुरू करण्यांत आले. त्याचे सपादक १९२३ पर्यंत श्री. काकासाहेब खाडिलकर होते. १९२३ मध्ये श्री राममाऊ मडलीक सपादक झाले. १९२४–२५ मध्ये स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमाचा जोराने पुरस्कार करण्यासाठी म्हणून मला

संपादक नेमण्यात आले. अर्थात् मी नावाचाच संपादक होतो. श्री. मंडलीक व श्री. ओगले सर्व काम चालवीत. मी एखादे वेळी लिही; परंतु रोज तास दोन तास येऊन देखरेख करण्याचा व मजकूर पाहण्याचा प्रयत्न करीत असे. मंडलीक हे जमदग्नीचे अवतार! तेव्हा उपसंपादकांत चकमक व्हावयाचीच. बहुतेक काम श्री. ओगलेच करीत. पर्वते, जोगळेकर वगैरे मंडळी स्टाफमध्ये होती. त्यावेळी तात्यासाहेब, श्री. जयकर व श्री. भोपटकर ही मंडळी महाराष्ट्र स्वराज्य पक्षांत प्रामुख्याने होती. त्यामुळे पक्षाच्या व "लोकमान्या"च्या कार्याच्या निमित्तानें माझा तात्यासाहेबांशी थोडासा संबंध आला. तीन महिन्याची माझी एडिटरी संपल्यानंतर काही दिवस पुण्याहून श्री अण्णासाहेब भोपटकरांनीं एडिटरचे काम केले. मग 'पेपर' आटोपला. या थोड्या काळातहि तात्यासाहेबांचा मोठेपणा प्रतीत झाला

(४) पुढे प्रतिसहकार वादाच्या निमित्ताने माझी आणि तात्यासाहेबांची कॉंग्रेस पक्षात फारकत झाली परंतु त्यांच्याविषयी माझा आदर – स्नेहभाव म्हणा हवा तर – कमी झाला नाही १९३७ मध्ये अधिकारस्वीकार केल्यानंतर पहिल्या प्रथम मी केलेल्या गोष्टींत पुण्यात तात्यासाहेबांच्या घरी जाऊन त्यांच्या घेतलेल्या भेटीचा उल्लेख केला पाहिजे. त्यावेळी तात्यासाहेबांनी माझ्याशीं अत्यंत मोकळेपणाने व कळकळीने चर्चा केली, ती मला मोठी बोधप्रद वाटली.

(५) यानंतर अगदी परवापरवाची आठवण म्हणजे १९४६ सालीं टिळक-पुण्यतिथीच्या वेळी कॉंग्रेस व इतर सर्व पक्षांनी एकमताने पुण्यतिथि साजरी करावी अशी योजना ठरली. तीत तात्यासाहेबांनीं आनंदाने भाग घेण्याचे कबूल केले होते. माझ्याकडे पत्र लिहून त्यांनी मला हे कळविले, तेव्हा मीहि मोठ्या उत्साहाने त्यांच्या सहकार्याचे स्वागत केले. पुढे (सर्वांस ठाऊक असलेल्या कारणांनी) हा बेत फिसकटला! त्या वेळचीं त्यांची मला आलेलीं दोन पत्रे मजजवळ आहेत. हीं पत्रे त्यांच्या दिलदार आणि निष्कपटी स्वभावाची उत्कृष्ट साक्ष देतात. विनाकारण कोणाच्या भावना दुखावल्या जाऊ नयेत म्हणून आजवर कोणासहि न दाखविलेलीं ही पत्रे, आता त्यात त्यांच्या स्वभावाचे प्रतिबिंब पडलेले आहे म्हणून, प्रसिद्ध करण्यास हरकत नाहीं.

## तात्यासाहेबांचीं दोन पत्रे

(१)

'पुष्करिणी', प्रभात,
पुणें ४.
दि. २५ जुलै १९४६.

रा. रा. बाळासाहेब खेर, पंतप्रधान, इलाखा मुंबई, यांसी सा. न. वि. वि.

रा. शंकरराव देव आज सकाळी मला भेटले. भेटीत असे ठरले की, ता. १

ऑगस्ट गुरुवारी सायकाळी साडेपाच वाजतां सर परशुरामभाऊ कॉलेजच्या मैदानावर लोकमान्य टिळकाच्या पुण्यतिथीची सभा तुमच्या अध्यक्षतेखालीं भरावयाची. सभेचे निमन्त्रण ( १ ) टिळक-स्मारक-मडळ ( टिळक-स्वराज्य सघ ), ( २ ) पुणे शहर कॉंग्रेस कमिटी, ( ३ ) महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटी या तीन सस्थान्च्या विद्यमाने द्यावयाचे सभेत इकडील वक्ते सर्व पक्षाचे मिळून सुमारे तीन-चार पूर्वनियोजित असेच बोलतील. आपल्या शिक्षण परिषदेस आलेल्या परप्रांतीय पाहुण्यापैकी कोणी प्रमुख व्यक्ति येणार किंवा बोलणार असताल तर तसे कळवावे. आपल्या मत्रिमडळातील गृहस्थांनाहि आमच्याकरिता निमत्रण देऊन आपण बरोबर आणावे. सभेची सर्व व्यवस्था व खर्च करण्याचे टिळक-स्मारक मडळाने आपल्याकडे घेतले आहे. आपण निमत्रण स्वीकारले याबद्दल आभार मानतो. कळावे.

( सही ) न. चि. केळकर

( २ )

केसरी आणि मराठा कार्यालय,
५६८ नारायण पेठ, पुणें २.
दि. २९–७–४६

श्री

रा. रा. बाळासाहेब खेर, पतप्रधान, यास कृ. सा. न वि. वि.

आपले ता. २७ शनवारचे पत्र आज ता २९ रोजा आता दोन प्रहरी अडीच वाजता मिळाले. पण त्यापूर्वीच ज्या प्रतिकूल घटना झाल्या त्याचा परिणाम म्हणून मी पूर्वी आपल्या पत्रांत लिहिलेली योजना फुकट गेली ! ! मौज ही की, काल रात्री महात्मा गाधी यांनाहि देवांनीं आमत्रण दिले! परतु कालपासून मला आलेलीं पत्रे, निरोप व असतोषपर संदेश इत्यादि लक्षांत घेतां वाटलें कीं, करायला जावे चागल्या शुद्ध हेतूने आणि व्हावें कांही तरी विपरीत ! यापेक्षां तें न केलेलेंच बरे. शंकरराव देव यांनीं आपल्या भेटींतील हकीकत व निरोप पंधरा मिनिटां-पूर्वीच येऊन सागितला. कारण आज सकाळी मी त्यांजकडे जाऊन संयुक्त सभेचा बेत रहित झाल्याचा निर्णय अत्यंत खेदयुक्त मनःस्थितीत कळवून आलो होतों. अद्यापि सार्वजनिक जीवनात आम्हा लोकाना पुष्कळ शिकावयाचे आहे इतकाच धडा या गोष्टीने पुन्हा मनावर ठसला कसेहि असो; ज्या शुद्ध भावनेने मी आपणाला निमंत्रण दिले होते त्याच भावनेने आपणहि तत्परतेने ते स्वीकारलें याकरितां मी आपलें मनःपूर्वक आभार मानतो.

( सही ) न. चि. केळकर



## जनार्दन सखाराम करंदीकर

(बी ए., एलुएलु. बी., माजी संपादक केसरी, विश्वस्त, केसरी-मराठा संस्था, पुणे)

( १ ) १९१६ च्या डिसेंबरात लखनौची सुप्रसिद्ध कॉंग्रेसची बैठक झाली. ते अधिवेशन म्हणजे टिळकान्च्या उत्कर्षाचा उच्चबिंदु होय. सुरतेच्या बखेड्यानंतर प्रथम त्यास कॉंग्रेसमध्ये प्रवेश मिळाला आणि प्रवेश मिळताच त्यानी ती सस्था हस्तगत केली. हिंदु-मुस्लिम पॅक्ट घडवून आणून स्वराज्याची एखमुखी मागणी ब्रिटिशा-पुढे याच अधिवेशनात माडण्यात आली तत्पूर्वी लो. टिळकानी होमरूल लीगची स्थापना करून ठेवलीच होती. हेतु हाच की, जें कॉंग्रेसमधून न साधेल ते होमरूल लीगमार्फत साधता यावे. पण लखनौ कॉंग्रेसमध्ये होमरूल लीगच्या चळवळीलाच पाठिंबा देण्यात आला. साराश, लखनौच्या कॉंग्रेसने होमरूल लीगच्या चळवळीला मुक्तद्वार ठेवल्याने टिळकाचे दोन्ही हेतु साधले. कॉंग्रेसचा त्यासबंधाचा ठराव होतांच लोकमान्य, केळकराना म्हणाले, ‘ तुम्ही आत्तांच्या आत्तां पुण्याला जा आणि येत्या केसरीत यावर अग्रलेख लिहा. येथून मजकूर लिहून पाठवून ते काम नीट होणार नाही. तुम्ही येथली सर्व चर्चा समक्ष ऐकली आहेत, तेव्हां या सर्वांचा इत्यर्थ काय तो तुम्हीच नीट जाणतां व तो तुमच्या भाषेत नीट उठून दिसेल; याकरिता तुम्ही अगदी पहिल्या गाडीने ताबडतोब निघा आणि हें काम करा ’. त्यावर केळकर हसून म्हणाले, ‘ कॉंग्रेसच्या ठरावांच्या बजावणीच्या कामाला तुमच्या चळवळीचे इजन आतापासून जोडले गेले, असाच याचा अर्थ ना ! ’ लोकमान्य म्हणाले, “ होय, हेच यांतले रहस्य आहे व ते तुम्ही जाणलें आणि ते तुमच्या भाषेने तुम्ही चांगले खुलवून पटवून द्याल; एवढ्याचकरितां तुम्हाला जलदीने जाण्याचा मी आग्रह करीत आहे. ”

झाले; टिळकांची ती आज्ञा शिरोधार्य मानून लगेच केळकरांनी गाशा गुंडा-ळला, रेल्वेचें तिकिट आणविले आणि ते पुण्याच्या वाटेला लागले आणि त्यांनीं ‘केसरी’त ‘ स्वराज्याचे निशाण रोवले ’ हा अर्थपूर्ण लेख लिहिला. इकडे कॉंग्रेसचे माडव-परतणे अद्यापि व्हावयाचेच होतें; त्याशिवाय इतर कितीतरी आनुषंगिक कार्यक्रम चालूच होते. याखेरीज अनेकांनी काशी, प्रयाग, अयोध्या वगैरें स्थळें पाहण्याचे दौरे मनातून योजिले होते. स्वतः टिळकांना व केळकरांना कानपूर वगैरे ठिकाणीं व्याख्यानाला जावयाचे होते; परतु हे सर्व सोडून केळकर मुकाट्याने पुण्यास आले; का तर ‘ तुमच्याशिवाय दुसरा कोणी येथील ठरावाचे रहस्य जाणणारा, पटवून देणारा नाहीं ’ असा टिळकांचा केळकराच्यावरचा पूर्ण विश्वास म्हणून !

( २ ) मुलीच्या लग्नाचा हुडा देण्याचें तर सामर्थ्य नाहीं, आणि चांगलें स्थळ मिळण्याची तर तीव्र इच्छा, अशा पेंचांत सांपडल्यामुळे आपले वडील अपत्य-

मोहाने कर्जाच्या भोवऱ्यात उडी घालून आत्मघात करून घेतील; यास्तव ही आपत्ति टाळावी म्हणून स्नेहलता नांवाच्या एका वगकन्येनें आत्महत्या करून घेतल्याचे दुःखद वृत्त प्रसिद्ध झालें. ही वार्ता प्रसृत होताच बंगाली वृत्तपत्रांनीं हुंड्याच्या चालीवर जारीने मोहीम सुरू केली आणि इकडील वृत्तपत्रातूनहि तिचा प्रतिध्वनि उमटूं लागला. केवळ तीक्ष्ण शब्दप्रहाराने जर एखादी दुष्ट चाल नष्ट होण्यासारखी असती तर हुंड्याची चाल त्या आठवड्यातील वृत्तपत्राच्या हल्ल्याने समूळ उच्छिन्न झाली असती ! पण तात्कालिक उचंबळलेल्या भावना आणि लौकिक व्यवहार याच्यांतले तारतम्य तात्यासाहेब केळकर हे बरोबर ओळखत असल्याने, केवळ भावनावश न होता त्या प्रश्नाच्या मुळाशी जाऊन व शक्याशक्यतेचा विचार करून त्यांनी 'हुंड्यावर बहिष्कार' हा मार्मिक अग्रलेख केसरीत अत्यत समतोल विचाराने लिहिला आणि केवळ भावनावश होऊन शिव्यशाप देण्याने हा प्रश्न सुटणार नाही, त्याची मुळे समाजरचनेत फार खोलवर रुजली आहेत; तेव्हा समाजाचा एकदर आर्थिक व्यवहार समूळ बदलेल तेव्हाच ही चाल नाहीशी होईल, असा त्यानी त्या लेखात निष्कर्ष काढला तो अग्रलेख दृष्टान्तादि अलकारानी व विनोदप्रचुर भाषेने तर नटलेला आहेच, पण त्याशिवाय सामाजिक चालीरीतीचा विचार केवळ उथळपणाने करून चालत नाही; अर्थशास्त्र, समाजशास्त्र व मानसशास्त्र इतक्या शास्त्राचा त्यात खोलवर विचार करावा लागतो; शिवाय विवाह हा शुद्ध धार्मिकविधि आहे, ही धार्मिक दृष्टीच प्रचलित झाली पाहिजे, अशा प्रकारचे गभीर प्रतिपादन त्यानी त्या लेखात केले आहे. भाषासौंदर्य व विचारगांभीर्य या दोहोंचा तर या लेखांत उत्तम मिलाफ आहेच; पण त्याशिवाय आपल्या समाजाची मनोरचना तात्यासाहेब किती बरोबर जाणत याचेहि प्रत्यतर त्या लेखावरून येते. त्यात त्यानी लिहिले होते की, 'स्नेहलतेच्या मूठभर चितेच्या आगीने क्षणांत तापलेले वैराग्याचे भाडे किती वेळ निवावयाचे थाबेल हा प्रश्नच आहे' साराश, 'हुंड्यावरील बहिष्कारा'ची ही मोहीम वळवाच्या पावसाच्या सरीसारखी आहे; तिचे अवडबर कितीहि मोठें दिसत असलें तरी अल्पावधीतच तिचा भर ओसरून सर्वत्र सामसूम होईल. हे त्याचे भविष्य ततोतत खरें ठरले. दोन आठवड्यांनी तो विषय इतका मागे पडला की, आतां इतिहाससशोधकांसच अशी एक चळवळ एकदा निघाली होती, असा शोध लावावा लागेल!

असो. गेल्या वर्षीच काही प्रसगाने पूर्वीचे लेख वाचीत असता केळकरांनीं स्वतः तो लेख वाचला व त्यांचा त्यानाच इतका आनद झाला की, 'हा लेख फारच चांगला साधला आहे' असे उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडले. त्यावर प्रस्तुत लेखकाने उत्तर केलें कीं, "तो लेख वाचून आतां तुमची स्मृति जागृत झाली; पण आम्ही तर तो लेख प्रसिद्ध झाल्या दिवसापासून त्याला अग्रस्थान दिलं आहे व त्याची आमची आठवण कधीच बुजली नाही"

(३) 'नावडतीचे मीठ आळणी आणि आवडतीचे ×× गोड' या म्हणीचा अनुभव व्यवहारांत हरघडी येतो. एकदां एखाद्या व्यक्तीविषयीं चांगले मत प्रचलित झालें म्हणजे मग त्याचें कसलेंहि कृत्य चांगलेच दिसूं लागतें; उलटपक्षीं ज्याच्याविषयीं एकदा मनात अढी बसली त्याने जीव तोडून केवढेंहि महत्कृत्य केले तरी त्याचे श्रेय त्याला मिळत नाही. असला विपरीत अनुभव केळकरांच्या बाबतींत अनेक वेळां आला आहे. लो. टिळक मंडालेला गेल्यावर केळकरांनी केसरी पत्र आपल्याकडे घेतले यामुळें कित्येक खाडिलकरभक्त अगदीं चिडून गेले होते. त्या वेळेपासून केळकराच्या लेखाकडे काकदृष्टीनें पाहून त्याला दूषण ठेवण्यासाठी ते अगदी डोळ्यांत तेल घालून टपून बसलेले असत. त्यासबधांत त्याची निराशाच झाली हे सांगावयास नकोच परतु या निराशेचें उट्टे ते उलट्या प्रकारानें काढीत याचेंच नवल वाटे. एकदा केसरी पत्रांत केळकरांनीं लिहिलेला एक उत्कृष्ट अग्रलेख प्रसिद्ध झाला तो वाचतांच एका खाडिलकरभक्ताने मला लिहून कळविले की, "आजच्या केसरीतला सडेतोड अग्रलेख पाहा; 'तुमच्या' केळकराचे पिळपिळीत लेख वाचून डोके उठत असे, आज खाडिलकराचा लेख वाचून मोठे समाधान वाटले "

हे पत्र वाचून मला आश्चर्याचा धक्काच बसला. मी त्या गृहस्थास उलट पत्र लिहून एवढेच मोघम कळविले की, 'मागील केसरीतील लेख तुम्हांस फार आवडला हे ठीकच झाले. मात्र तो अग्रलेख खाडिलकराचा नसून केळकरांचाच आहे.' एवढ्याने त्याचें समाधान झाले असते तर मग 'पूर्वग्रहदूषितत्वा'ची मौज कसली! माझें हे पत्र वाचताच त्या गृहस्थाने मला उलट उत्तर लिहिलें, "अहो, मी केसरीचा वीस वर्षांचा वाचक आहे. मी येथे घरीं बसून कोणता लेख टिळकांचा, कोणता केळकरांचा व कोणता खाडिलकरांचा हे नेमके ओळखतो माझा अंदाज चुकावयाचाच नाही. गेल्या आठवड्यात रा. केळकराचे जामात वारले, त्या दुःखांत ते असल्यामुळे खाडिलकरांनी हा लेख लिहिला, म्हणूनच तो इतका सरस वठला!"

जामाताच्या मृत्यूचा दुःखावेग विवेकाने आवरून केळकरांनीं आपल्या कर्तव्यात खड पडू न देता अविचलित मनाने उत्कृष्ट लेख लिहिला, या स्थितप्रज्ञतेचें त्याना श्रेय मिळावयाचें त बाजूलाच राहून, उलट हे उटावरचे शहाणे आपल्या मनःकल्पित तर्काने तो लेख खाडिलकरांच्या गळयांत बांधतात व केळकरांच्याविषयी त्याचे मन किती पूर्वग्रहदूषित झालें आहे त्याची प्रचीति आणून देतात, हे पाहून मला अत्यंत विषाद वाटला; आणि 'ब्रह्मापि च त नरं न रजयति' अशा कोटींतल्या या गृहस्थाशी वाद करण्यांत अर्थ नाहीं असें ओळखून मी त्यावर प्रत्युत्तर लिहिलेंच नाहीं. परंतु या व असल्याच आणखी कांहीं उदाहरणांवरून प्रारंभींप्रारभीं, लोकमत केळकरांच्या किती विरुद्ध होतें, याची प्रचीति आली. अर्थातच

लोकमताची एवढी जोराची लाट विरुद्ध असतां त्या लाटेंतून बचावून अखेरीस त्याच विरुद्धमतवाल्याकडून केळकरांनी शाबासकी मिळविली यांतच त्यांच्या कर्तबगारीचें खरे महत्त्व साठविलेले आहे.

( ४ ) एकदा बगाल सरकारने हिंदुमहासभेच्या पुढाऱ्यांस बंगाल प्रांतांत येण्याची बदी करणारा हुकूम प्रसिद्ध केला. त्याबरोबर प. मदनमोहन मालवीय यांनी तो निर्बंध तोडण्याचा निश्चय केला व त्याबरोबरच डॉ. जयकर, तात्यासाहेब केळकर इत्यादि पुढाऱ्यानींहि बगालमध्ये जाण्याचा सत्याग्रह करावा असें ठरले. त्याप्रमाणें तात्यासाहेब केळकर निघणार होते; इतक्यांत त्याच्या मातोश्रीची प्रकृति विशेष बिघडली व त्यातच त्याचा अतहि झाला अर्थातच केळकराचे जाणे लांबणीवर पडले. तात्यासाहेब केळकराच्या टीकाकाराना तेवढ्यात त्याच्यावर टीका करण्यास फावले, आणि त्यांनी 'थोर तुझे उपकार, आई ! थोर तुझे उपकार' या मथळ्याखालीं एक लेख लिहून, आईच्या मृत्यूची सत्याग्रह टाळण्याला आयतीच चागली सबब सापडली, अशा अर्थाची टीका केली ! परतु सत्याग्रहाचा बेत लांबणीवर पडला तरी तो केळकरानी सोडून दिला नव्हता. अर्थातच मातुःश्रीच्या मृत्यूनतर थोड्याच दिवसानी ते बगाल्यात गेलेच ! पण मध्यतरींच्या काळांत प. मदनमोहन यांच्या सत्याग्रहाचे प्रकरण चालून बंगाल सरकाराला आपला हुकूम परत घ्यावा लागला, त्यामुळे केळकर यांच्यावर खटला भरला गेला नाही; परंतु ते सत्याग्रह टाळीत होते ही टीका वायफळ ठरली.

( ५ ) स्वतःच्या मनाला पटल्याशिवाय कोणत्याहि चळवळीत स्वतः भाग घ्यावयाचा नाही, हा तात्यासाहेबाचा निर्धार असे व तो अगदी स्वाभाविक व रास्त आहे. असे असून देखील अनेक चळवळीचे पुढारी तात्यासाहेबावर निष्कारण व निराधार टीका करीत तात्यासाहेबाचे त्यास जाहीर आव्हान असे की, तुम्ही मजशी युक्तिवाद करून जी गोष्ट मला पटवून द्याल ती मान्य करण्याला मी तयार आहे, परतु केळकराच्या युक्तिवादापुढें आपला युक्तिवाद लगडा पडतो याची त्यास जाणीव असल्याने ते युक्तिवादाच्या भानगडीत न पडतां 'शेष अपशब्दैः पूरयेत्' या न्यायाने केवळ शिव्या देऊन आपल्या मनाचें समाधान करून घेत; परतु तेवढ्याने त्याचे काम कसे भागणार? तात्यासाहेबाचा पाठिंबा नाहीं, म्हणजे पैशाचाहि पाठिंबा नाही अशी त्या वेळी स्थिति असे. अर्थातच तात्यासाहेबांशी वादविवाद करून आपली बाजू सिद्ध करता न आली तरी अनेक चळवळींतले पुढारी तात्यासाहेबांकडे आर्थिक मदत मागण्यास येतच असत एकीकडून त्यांच्यावर अपशब्दांची झोड उठवावयाची व दुसरीकडून त्यांच्याकडे मदत मागावयास जाण्याचा लोचटपणा करावयाचा असला विलक्षण प्रकार चालू असे ! परतु केळकराची उदारमनस्कता एवढी मोठी होती की, त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या

हाडवैऱ्यांसहि त्याच्या जिवावरच्या अडचणीत मदत देण्याचें नाकारले नाहीं. तात्यासाहेब, आज आमच्या रिक्रूट कँपातील चूल अडली आहे अथवा आज सोलापुराला सत्याग्रही पाठवावयास रेल्वेच्या तिकिटाला पैसे नाहींत, असे गाऱ्हाणें कानीं पडतांच, हा इसम आपल्याविषयी कोठे काय बोलतो आणि लिहितो याचा विचारहि मनात न आणतां, तात्यासाहेब हे शक्य त्या प्रकारे मदत करून अडचण भागवीत असत. साराश, तात्यासाहेबानी आपले 'बुडत्यास हात द्यावा' हे व्रत अखेरपर्यंत कधी सोडले नाही!



## रामचंद्र गणेश सोमण

### ( स्पीकर वरिष्ठ कायदेमंडळ, मुंबई, वकील, सातारा )

( १ ) कै. तात्यासाहेबांविषयी माझी सर्वांत जुनी आठवण म्हणजे सन १८९३ ची आहे. त्या वेळी तात्यासाहेब कायद्याचा अभ्यास करीत होते. त्या वेळीं त्यांनी 'लीगल प्रोफेशन' या विषयावर एक निबध लिहून तो त्या वेळची सातारा येथील वकील मडळी व इतर स्नेही याच्यासमोर सातारा हायस्कूलच्या असेंब्ली हॉलमध्ये वाचून दाखविला होता. त्या निबधाची प्रत तात्यासाहेबांच्या लेखसंग्रहांत समाविष्ट आहे कीं नाहीं हे मला माहीत नाही. मी त्या वेळीं हजर होतो व त्या वेळच्या प्रमुख वकील मडळींनीं व इतर स्नेही मडळींनीं त्या निबधाची चांगली वाहवा केल्याचें मला पक्के स्मरते. त्या वेळींहि कै. तात्यासाहेब साताऱ्याच्या स्थानिक पत्रांतून क्वचित् प्रसंगीं इंग्रजी व मराठी लेखन करीत असत.

( २ ) कै. तात्यासाहेब एल्‌एल्‌. बी. पास होऊन साताऱ्यास वकिली करीत असताना लोकमान्यांनी स्थानिक स्नेह्यांच्या शिफारशीने होतकरू तरुण म्हणून त्यांस उचलले व सन १८९५–९६ मध्ये पुण्यास नेले. तात्यासाहेब लेखणीचे जसे बहाद्दर होते त्याप्रमाणे वक्तृत्वकलेत त्या वेळीं तरी ते मुळीच निपुण नव्हते म्हटले तरी चालेल. सन १८९९ साली सातारला आल्यावेळी त्यानी त्या वेळच्या शिवाजी क्लबच्या जागेत म्हणजे आजच्या गजानन व्यायाम शाळेच्या जागेत कै कृष्णाजीपंत तुळपुळे ह्यांच्या अध्यक्षतेखाली एक व्याख्यान दिले होते व व्याख्यान संपल्यानंतर 'वक्ता या नात्याने आपली कांहीं प्रगति झाली आहे काय'? असा आम्हां स्नेही मडळीस त्यानीं प्रश्न केला. अर्थात् पुण्याच्या केसरी ऑफिसमध्ये राहिल्यामुळे त्याची त्यासबधात पूर्वीच्या मानाने बरीच प्रगति झालेली होती असे आम्हांस मोकळेपणाने त्यास सांगावे लागलें.

( ३ ) सन १९०८ सालीं, लोकमान्यांना मंडालेची शिक्षा झाल्यानंतर तात्यासाहेब हे 'केसरी'चे संपादक झाले; त्यानंतर साताऱ्यास ते आले असतां,

कै. डॉ. भिडे यांच्या माडीवर "लोकमान्यांची केसरींतील धडाडी आपल्या लेखात अशतः तरी उतरते कीं नाही?" असा प्रश्न स्नेहीमडळीस केला असतां, तात्यांच्या त्या वेळच्या 'केसरी'तील लेखांची सडेतोड व तर्कशुद्ध भाषा याबद्दल आम्हांस समाधानच व्यक्त करावे लागले. आमचा हा अभिप्राय ऐकून तात्यांनाहि समाधान वाटले.

(४) एकदा मी पुणे येथें गेलो असता तात्याशी बोलत बसलो होतो. अशा वेळी तात्यांनीं मुबई सरकाराचे पूर्वीचे एक्झिक्यूटिव्ह कौसिलर व त्या वेळीं हिंदुस्थान सरकाराकडे गेलेले हिलसाहेब याचे एक पत्र त्यास आलेले मला दाखविलें. 'तात्यासाहेबांसारख्या संथ व नेमस्त मानल्या जाणाऱ्या गृहस्थाने 'केसरी'शी असलेली आपली सगत सोडली तर त्याचा हिंदुस्थानच्या सरकारात मोठा बडेजाव होऊन नेमस्ताचे अग्रणी म्हणून त्याचा लौकिक होईल' असा मजकूर सदर पत्रात होता असे मला आठवते सदर पत्र अर्थात् तात्याच्या सग्रही असेलच. तात्यांनीं सदर पत्रास काहीहि विचार न करिता एकदम नकारार्थी व सडेतोड उत्तर दिले हे सागावयास नकोच.

(५) सन १९२० साली लोकमान्याच्या भेटीस मी गेल्या वेळी काही गोष्टीबाबत त्यांचा सल्ला विचारला असता, ती गोष्ट क्षुल्लक असल्यामुळे तात्यानीच आपल्या अधिकारात या गोष्टीत तुम्हास सल्ला देऊन मोकळे का केले नाहीं असे आम्हास विचारिले. ही गोष्ट तात्याच्याजवळ येऊन बोललो असतां "आपण कोणतीहि गोष्ट लोकमान्याच्या सल्ल्याशिवाय आपल्या अखत्यारींत करीत नाही" असे तात्यानी आम्हास सागितले. लोकमान्याशी किती निष्ठेने व नम्रतेने ते वागत असत याची आम्हास त्या वेळी साक्ष पटली.

(६) लोकमान्याच्या निधनानतर 'गाधीयुग' सुरू झालें. अशा वेळीं मुबईचे गव्हर्नर जॉर्ज लॉईड यांनी तात्यांस मुलाखतीस बोलावून पुष्कळ वेळ त्याच्याशीं संभाषण केले. त्या सभाषणाचा आशय "गांधी-युगात त्याच्या राजकारणांत तात्यांनीं सामील होऊ नये व त्यांचें राजकारण हाणून पाडण्यास त्या वेळच्या केसरीनें मदत करावी" असा होता. अर्थात् गव्हर्नरसाहेबांना "गांधीचीच विचारसरणी सरकारच्या धोरणाला तोड देण्यास योग्य आहे व आपण गाधीच्या विरुद्ध सरकारला मदत करू शकणार नाही" असे तात्यानी स्पष्ट सांगितले. गव्हर्नरसाहेब साताऱ्यास आल्या वेळी त्या वेळचे लोकलबोर्डाचे अध्यक्ष यांची मुलाखत होत असतां "प्रत्यक्ष गांधीवादी असलेला मनुष्य मला पत्करेल; परतु गांधींशीं मतभेद असूनहि सरकारला मदत करण्यास तयार नसलेला केळकरांसारखा अस्तनींतील निखारा आपणांस पटत नाही; यामुळें केळकराच्या नादीं तुम्हीं कोणी लागता कामा नये"

असा गव्हर्नरसाहेबांनी अध्यक्षांस उपदेश केला व त्यानंतरच तात्याच्या गव्हर्नरसाहेबाशीं झालेल्या सडेतोड मुलाखतीचे वृत्त मला समजले !

(७) तात्यांच्या मृत्यूपूर्वी सुमारे २–३ आठवडे तात्या मोटारीने सागलीस निघाले असतां साताऱ्याजवळ त्यांची मोटार नादुरुस्त झाली व ती दुरुस्त होई-पर्यंत सुमारे दोन तास माझ्या घरी ते व मी अनेक गोष्टीवर बोलत बसलों होतो. इग्रज सरकार हिंदुस्थानच्या पदरात स्वातन्त्र्याची मोटली टाकून येथून आपला पाय स्वखुषीने का काढून घेऊ लागले याबद्दल बोलत असता, तात्याच्या आवडीचा विषय म्हणजे आयर्लंडचा इतिहास याचा उल्लेख करून व अगदी ताज्या काळापर्यंत तो इतिहास वाचल्यानतर आयर्लंडनेच इंग्लडच्या मुत्सद्दयांच्या मनांत असे वागण्याची प्रेरणा केली व मुख्यतः आतरराष्ट्रीय राजकारणात इग्लडला अब्रू राहिली नसल्यामुळे त्यानीं हिंदुस्थानाला स्वातन्त्र्य देण्याबाबत खुषीने पाऊल टाकलें आहे असे तात्यानी आपले मत सांगितले

(८) वरील आठवणी ह्या सार्वजनिक स्वरूपाच्या आहेत माझ्याबद्दल तात्याचे वैयक्तिक प्रेम होते, व एकदोन गोष्टीमध्ये ते विशेष व्यक्त झाले. त्या गोष्टीचा उल्लेख मी आता करणार आहे २६–२७ सालच्या हिंदुस्थान सरकारच्या कायदे-कौन्सिलाच्या निवडणुकीस तात्या उमेदवार म्हणून उभे होते त्याच वेळी माझे गुरु कै. दादासाहेब करदीकर हेहि स्वतन्त्र उमेदवार म्हणून उभे होते. मी कांग्रेसचा अनुयायी असला तरी स्वराज्य-पक्षाबद्दल मला सहानुभूति होती व त्या पक्षातर्फे तात्या उभे असल्यामुळे मी दादासाहेब याना पाठिंबा न देता तात्यानाच पाठिंबा दिला या गोष्टीबद्दल त्यांनी माझ्यापाशी मोठ्या प्रेमाने उल्लेख करून माझे आभार मानले.

(९) गेल्या वर्षांत माझ्या तोंडून कै. तात्या व अण्णासाहेब भोपटकर यांच्या-बद्दल विशेष अनुदार व नीचपणाचे उद्गार निघाले, असा माझ्याबद्दल तात्याच्या भोवती असलेल्या हिंदुमहासभेच्या प्रभावळीत एक वृथा प्रचार सुरू झाला होता. ही गोष्ट माझ्या कानी आल्यावर मी तात्याना पत्र लिहिले व त्याचे उत्तर म्हणून त्यांनी आपल्या मनांत हा प्रवाद ऐकूनहि काही विकल्प आलेला नाही अशी माझी खातरजमा केली. व्यक्तिशः अनेक ट्रस्टच्या बाबतींत तात्याचा सल्ला मी विचारीत असे. सार्वजनिक कामाचा ट्रस्ट करताना ट्रस्ट करणाराने ट्रस्टच्या रकमेवर असलेले आपले स्वत्व केव्हांहि आपल्या हाती ठेवू नये असा त्यानीं मला सल्ला दिला व त्या सल्ल्याचा मलाहि पुष्कळ उपयोग झाला. आमच्या दोघांच्या प्रेमात राजकारणातील आमच्या स्वतन्त्र भूमिकेमुळे केव्हाहि विकल्प आला नव्हता ही गोष्ट मी येथे आनदानें नमूद करतो व यावरूनच तात्यांच्या मनाच्या मोठेपणाची साक्ष सर्वांस पटो अशी अपेक्षा करतो.



## के. ना. वाटवे

( एम् ए., पीएच्. डी., प्राध्यापक, पुणें )

( १ ) माझा तात्यासाहेबाशी प्रत्यक्ष सबध १९२२ साली आला. त्याच्याच एका नातेवाइकाच्या विवाहासबधी वधूपक्षाकडून बोलणे करण्यासाठी मी त्यांजकडे गेलो होतों. त बोलणे ताबडतोब अनुकूल निकालात काढून त्यानी माझी चौकशी केली. मी नुकताच एम्. ए झालेला – व मराठी घेऊन झालेला – असे त्याना कळताच त्यानी मला 'केसरी'त काही लिहीत चला ' असे सांगितले त्या वेळी बनारस हिंदु युनिव्हर्सिटीत मराठीची एक जागा व्हावयाची असे घाटत होते. ही गोष्टहि मी काढताच तात्यासाहेब तत्परतेने म्हणाले, ' ठीक आहे. महाराष्ट्रियानी अवश्य, बाहेर जावे; मी तुम्हाला पडित मदन मोहन मालवीय यास देण्यासाठी चिठी देईन. मी त्या दिवशी त्याच्या घराबाहेर पडलो तो त्याच्या परहिततत्परतेने भारूनच ! तात्यासाहेबानी त्या दिवशी माझ्यासारख्या होतकरू तरुणाला दिलेले प्रोत्साहन त्या नाही तरी अन्य तऱ्हेने मला कसे उपकारक झाले हे मी पुढे सागणार आहेच.

( २ ) १९२४ साली मोरोपताच्या पुण्यतिथीचे अध्यक्ष तात्यासाहेब होते. पुणे येथील नू. म. वि हायस्कूलच्या सभागृहात व्याख्याने झाली. त्यात रा. ओडकशास्त्री व मिरजकरशास्त्री याच्या बरोबर आम्हेहि ' पताची सस्कृत कविता ' या विषयावर भाषण झाले या माझ्या भाषणाची तात्यासाहेबानी 'मार्मिक' अशी स्तुति करून मला आत्मप्रत्यय आणून दिला. यानतर सस्कृतसबधीची पुस्तके व इतर विषय आजवर त्यानी परीक्षण रूपाने व निबधाच्या द्वारां मजकडून 'केसरी' व 'सह्याद्रि' यामध्ये लिहवून घेतले. त्याच्या 'हास्यविनोदमीमासे'साठी त्यानी मला ' सस्कृतातील विनोद ' हा १०० पृष्ठाचा निबध लिहावयास सागितला. ग्रथ लिहावयास घेतला की तो शक्यतो लवकर लिहून टाकून मोकळे व्हावयाचे हा तात्याचा स्वभाव असल्याने माझ्या वरील निबधाचे लेखन चालू असता ते माझ्या घरीं बारवार येत व ' हा ! कुठपर्यंत आले ? ' म्हणून ढोसणी देत सपूर्ण झालेला तो निबध मी स्वतः त्यास माझ्या घरीच वाचून दाखविल्यावर त्याना फार समाधान झाले ' वा.. वा. फार छान ' असे त्यानी त्या वेळी काढलेले उद्गार माझ्या कानात सदैव घुमत राहतील व मला प्रोत्साहन देतील !

( ३ ) या ' सस्कृत विनोद ' प्रकरणांतूनच माझ्या पीएच्. डी. चा प्रश्न निघाला तात्यासाहेब मला म्हणाले, ' तुम्ही आतां फुटकळ लिहिणे सोडून द्या व एकाच विषयावर एकादा ग्रथ तयार करा तुम्ही हास्यरसाला हात घातलाच आहे. त्याबरोबर इतरहि रस घ्या व एक रसविषयक प्रबध लिहा ! डॉ. माधवरावांनी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेत व इतरत्र एक-दोन लेख लिहून ' रस-व्यवस्था हे शून्य-

संशोधन आहे ' असे मत माडले यावरहि स प. कॉलेजात तात्यासाहेबांच्या अध्यक्षतेखाली चर्चा झाली. नतर मी 'रसविमर्श' पीएच्. डी साठी लिहावा असे ठरले व तात्यासाहेबच त्याचे मार्गदर्शक अर्थातच झाले १९४० साली 'मार्गदर्शक' म्हणून त्यानी माझ्या अर्जावर सही केली. त्या वेळी ते हसत हसत मला म्हणाले, ' ह्या माझ्या सहीने माझे सनदशीर गुरुत्व तुम्ही पत्करले असे झाले ! ' मी लागलीच उत्तर केले, ' पण यापूर्वी पचवीस-तीस वर्षे तरी मी तुमचे बिन-सनदशीर गुरुत्व पत्करूनच होतो हे तुम्हाला कुठे माहीत आहे ? '

( ४ ) १९४१ साली बेळगावास पहिले सस्कृत साहित्य समेलन झालें तात्यासाहेबाचा उत्साह एवढा दाडगा की, त्याना तेथे उपस्थित राहण्याची विनती करता क्षणीच त्यांनी एक सुदर सस्कृत भाषण तयार केलें व बेळगावास समेलनासाठी येऊन त्यानी ते भाषण तेथे वाचन दाखविले ते विनोदप्रचुर व सुलभ असल्याने सर्वांस मोठे पसत पडले. त्यापुढचे अधिवेशन पुण्यास व्हावे असा बेळगावच्या शास्त्रीमडळीनी आग्रह धरला व मला तात्यासाहेबाना यासबधी विचारावयास सागितले. मी तात्यासाहेबास म्हणालो, ' पुण्यास आपण दुसरे समेलन का बोलावू नये ? ' यावर ते म्हणाले, ' कोण म्हणतो नको म्हणून ? माझ्यातर्फे निमत्रणाचे भाषण करा, ठोकून टाकू. त्यात काय आहे ? ' मी मोठ्या उत्साहाने झोकदार निमत्रण दिले, व सांगितले की, 'आम्हा पुणेकरामागे एक 'नरसिंह' उभा असून तो पुन्हा ' चिन्तामणि 'सुत आहे ! ! त्यामुळे आमचे समेलन द्वितीय असले तरी ते अद्वितीय करून दाखवू '. माझ्या भाषणाने तात्याना फार आनंद झालेला दिसला. ते मला विनोदाने म्हणाले, ' माझ्या नरसिंह व 'चिंतामण' या नावावर तर कोट्या ठीक केल्यात; पण 'केळकर' येवढाच शब्द आता शिल्लक राहिला ! ' मी म्हटले ' थांबा. ही कोटिप्रिय संस्कृत पडिताची सभा आहे; त्यामुळे शिल्लक राहिलेल्याहि शब्दावर कोटी होणार नाही म्हणून काय नेम ? ' मौज ही की, आम्हां दोघाना फार वेळ थांबावे लागले नाही. पुणेकरानी निमत्रण दिले याचे वर्णन करतांना तात्यासाहेबाना एका पडिताने जाता जातां ' सरस्वतीसदनकेलिकाराः ' ( सरस्वतीच्या मदिरांत क्रीडा करणारे ) असे म्हटलेच ! ! आम्हा दोघाच्या अपेक्षा सफल झाल्या म्हणून आम्ही खूप हसलो ! १९४२ साली पंडित राजेश्वरशास्त्री द्राविड यांच्या अध्यक्षतेखाली पुणे येथे भरलेले द्वितीय साहित्य समेलन केवळ तात्यासाहेबांच्या नेतृत्वामुळे खरोखरच अद्वितीय झाले, हे सर्वांस माहीतच आहे.

( ५ ) विशेषतः वाङ्मयचर्चेत तात्यासाहेबांचे मन खुले, मोकळे आणि आग्रहरहित असे. त्यामुळें ' बुद्धेः फलमनाग्रहः ' ही म्हण त्यांना लागू पडत असे. ' सुभाषित आणि विनोद ' या त्यांच्या पुस्तकात तात्यानी सुभाषित हा शब्द

Wit या अर्थी वापरला होता व सुभाषित Wit शी समव्याप्त व्हावे म्हणून सुभाषिताच्या अर्थाची त्यानी छाटाछाट केली व सुभाषिताची व्याप्ति वाढविणाऱ्यांना बोल लावला. या विषयावर त्यांच्याच अध्यक्षतेखाली झालेल्या माझ्या व्याख्यानात मी या गोष्टीस हरकत घेतली. 'एखाद्यास एक साधी नराणी नखे कापण्यासाठी पाहिजे असता त्यासाठी त्याने शस्त्रागारात जावे व तेथील तरवार, भाले, बरच्या, जबिया इत्यादिकांना ती शस्त्रे अवजड म्हणून-नावे टेवू लागावे त्यापैकी तात्यासाहेबाचा प्रकार आहे' असे मी म्हटले पण ही माझी धिटाई त्यांनी मानली. 'तुमचें म्हणणे ठीक दिसते; मी विचार करतो' असे ते दिलदारपणे म्हणाले व "हास्य-विनोद-मीमासे'च्या प्रस्तावनेत सुभाषित शब्द वापरण्यातील अडचण त्यानी प्रांजलपणे कबूल केली.

त्यांच्या या खुल्या वृत्तीमुळे त्याच्याशी वादविवाद अगदी मोकळेपणानें करण्यात आम्हास सकोच वाटत नसे. 'सविकल्प समाधि', 'हास्यरस हा रसराज आहे' इत्यादि अनेक विषयांवर त्यांचा आमचा मतभेद होई शेवटी ते म्हणत, "अहो, हीं वाङ्मयांतील मते. ज्याला जे पटेल ते त्याने माडावे. त्यात भीड कसली?" 'तोतयाच्या बडा'च्या शेवटी सुखनिधानाच्या 'अधःपात' या दुःखोद्गारानतर नाना व पार्वतीबाई याच्या तोडची दोन दोन वाक्ये तात्यांनीं घातली आहेत. "या वाक्याची जरूरी नाही 'अधःपात' या शब्दातील ध्वनीने ते सर्व सूचित होतें," असे कै. गडकऱ्यानी एकदां त्याना म्हटलें होते. तं त्याना पटल्यामुळे पुढील आवृत्तीत तात्यांनी ती भाषणे गाळली व ही गोष्ट तात्यानींच मला सागितली.

(६) तात्यासाहेबांच्या व माझ्या उण्यापुऱ्या बावीस-तेवीस वर्षांच्या संबधाचा शेवट घरोब्यात झाला होता. त्यांच्याबद्दल आदर बाळगणाऱ्या इतर अनेक लोकाप्रमाणे मला व आमच्या घरच्या मडळीना तात्यासाहेब हे घरच्या वडील माणसासारखे वाटत. १९४७ च्या मे महिन्याच्या १२ व्या तारखेस आमच्या विवाहाला पचवीस वर्षे पुरीं झाली. म्हणून आमच्या कुटुबांत असें ठरले की, त्याबाबत एक छोटासा घरगुती समारंभ करावा आणि ज्या भाग्यशाली दांपत्याच्या विवाहाला साठ वर्षे झालीं त्या श्री. तात्यांना व सौ. ताईंना भोजनास बोलावून त्याचा आशीर्वाद घ्यावा. मी जरा सकोचानेच तात्याजवळ ही गोष्ट काढली त्याबरोबर त्यांनी आनंदानें यावयाचे मान्य केले. आहेराच्या वेळी मुलगे, मुली, जावई, नातवडे यानी गजबजलेलें माझें कुटुम्ब पाहून व विशेषतः आम्ही पतिपत्नीनीं तात्याना लवून नमस्कार केला. त्या प्रसंगी, तात्याना गहिवर आला आणि ते म्हणाले, 'भरलेले घर' म्हणतात तसें तुमचे घर आहे. आनद होतो. तुमचा ससार ईश्वरकृपे सुखाचा होवो.'

( ७ ) माझ्या दोन्ही कन्यकांच्या विवाहाच्या वेळीं – दादर व पुणें येथें – तात्या आवर्जून उपस्थित राहिले. पुण्याचा विवाहसमारंभ सदाशिव पेठेतील ब्राह्मणकार्यालयात झाला. त्यासाठी आपल्या डेक्कन जिमखान्यावरील 'पुष्करणी' बंगल्यातून विवाहस्थळी येत असता त्याना वाटेत टांगा मिळाला नाही. तात्या व सौ. ताई दोघेहि चालतच आले ! त्यासबधाने बोलतांना विनोदाने ते म्हणाले, "आमच्या विवाहाच्या वेळी सप्तपदीतली कांही पावले चुकूनमाकून राहिली असली तर त्याची फेड आज आम्ही दोघानी बरोबर चालून ५६–५७ वर्षातील व्याजासुद्धा केली ! !"

( ८ ) तात्यासाहेबांचा 'हास्यविनोदमीमांसा' ग्रथ एम्. ए. परीक्षेसाठीं नेमलेला आहे. त्यावर मी सप्टेंबर १९४७ मध्ये स प. कॉलेजमध्ये एम्. ए च्या विद्यार्थ्यांसाठी व्याख्याने दिली त्या वेळी एका व्याख्यानास ते मुद्दाम उपस्थित राहिले व सप्टेंबर २३ व २४ रोजी त्यानी स्वतः दोन चर्चात्मक व्याख्यानें दिलीं. त्या वेळी 'अमक्या विनोदी वाक्यात विनोद कशामुळे उत्पन्न झाला' असा प्रश्न ते करीत होते, व विद्यार्थि-विद्यार्थिनीनी दिलेल्या उत्तराच्या विश्लेषणात ते रगून गेले होते. ही गोष्ट त्यांच्या मृत्यूपूर्वी फक्त एकोणीस दिवसांची होय. ता. २४ सप्टेंबर रोजी सायंकाळी तात्याना 'पुष्करणी' पर्यंत टांग्यातून पोहोचवून त्यांच्याशीं मी बोलत बसलो. तोच त्यांचा माझा शेवटचा सहवास. तेंच मला मिळालेलें शेवटचे संभाषणसुख. आक्टोबर १४ रोजी सकाळीं मी त्यांच्या भेटीला गेलो होतो. पण अखेरच्या विश्रांतीसाठी पहुडलेले तात्या त्या दिवशीं कोणाशींच बोलत नव्हते !



## गजानन विश्वनाथ केतकर

( बी. ए., एल्एल्. बी., संपादक नि विश्वस्त, केसरी-मराठा संस्था, पुणें )

( १ ) गुरुवर्य कर्वे यांच्या महिला-विद्यापीठाचें पहिलें प्रसिद्धक निघाले. त्या योजनेवर लो. टिळकानीं "स्त्रियांची युनिव्हर्सिटी" हा अग्रलेख लिहिला. टिळकांचा या योजनेस पाठिंबा हा अर्थातच मुक्तकंठ नव्हता; बराच मर्यादित होता. केळकरानीं आपला अधिक अनुकूल अभिप्राय कर्व्यांना लिहून दिलेला होता व तो प्रसिद्धहि झालेला होता. टिळकांनी केळकरांना आपला अग्रलेख वाचून पाहण्यास सांगितलें. केळकर वाचून 'ठीक आहे' असें म्हणाले. टिळक म्हणाले, तुमचे स्वतंत्रपणे मत प्रकट झालें आहे त्या दृष्टीनें कांही फरक वाटल्यास सुचवा. एव्हांना केळकर नेहमीच्या लगबगीनें जिना उतरावयास लागले होते. तेथूनच ते म्हणाले, "माझे स्वतंत्र मत प्रसिद्ध झालेंच आहे. पेपर ( केसरी ) तुमचा आहे हे लोक

ओळखतात; म्हणून हे आर्टिकल (अग्रलेख) आहे तसेंच राहू द्या. लोकाचा माझ्यासंबंधी काही गैरसमज होणार नाही; झाला तर मी पाहून घेईन."

(२) मराठ्यांतील काही लिखाणासंबधाने एकाने मानहानीचा अभियोग सुरू करण्याची सिद्धता केली होती. प्रकरण नगरपालिकेसंबधाचे होते. तडजोडीची बोलणी करण्यासाठीं मध्यस्थानी दोन्ही पक्षाना एकत्र आणले होते गायकवाड वाड्यातील अंगणातल्या चौरस लांकडी पीठावर ही बैठक चालू होती. उलट पक्षानें एक पत्रक काढले होते. त्याला तोंडीस तोंड म्हणून मराठ्याने उत्तर दिले असें केळकरानी समर्थन केले पत्रक काढलें हे प्रतिपक्षास मान्यच होते. तेव्हा प्रतिपक्षी म्हणाले, "आमचे आरोप पत्रकात राहिले; पण तुमच्या लेखातील उलट आरोप मात्र वर्तमानपत्रात (मराठ्यात) आले" केळकर म्हणाले "'मराठा' हे माझें पॅम्प्लेटच आहे माझ्या हातात वर्तमानपत्र नसते तर मी पत्रकच काढले असते आणि तुमच्या हातात वृत्तपत्र असते तर तुम्हीहि त्यातून पत्रक प्रसिद्धिले असते. तें नाही म्हणून तुम्हाला पत्रक काढून वाटावे लागले. यात फिट-फाट झाली असे समजा"

(३) टिळकाच्या केसरीतील लेखाच्या पहिल्या दोन भागात दोन लेख केळकराचे असताहि चुकून टिळकांचे म्हणून छापले गेले आहेत. भाषेवरून हे कोणासहि उमगण्यासारखे आहे. यापैकी एका लेखात चिमणीला सांपडलेल्या दाण्याची मुलाची गोष्ट मनोरंजक भाषेत दाखला म्हणून घेतलेली आहे. यासंबधीं शहानिशा करून घ्यावी म्हणून १९२५–२६ च्या सुमारास दिल्लीस असेम्ब्लीच्या बैठकीसाठी मुक्काम असताना मी तात्याना मुद्दामच म्हटले की, "टिळकाच्या एका लेखामध्ये लहान मुलाची चिमणीला सापडलेल्या मोत्याची गोष्ट फार चागली वर्णिली आहे." तेव्हा ते म्हणाले, "अरे, ती गोष्ट असणारे आर्टिकल टिळकांच्या लेखसंग्रहांत नजरचुकीनें छापलें गेलें! ती गोष्ट असलेले आर्टिकल माझे आहे हे मला नक्की आठवतें, पण हें बोलणे आता बरे नाहीं!"

(४) तोंडी लेख सागून दुसऱ्याकडून लिहून घेण्याच्या प्रसंगी केळकर कधीं कधीं या लिहिणाऱ्याचे मत विचारीत. रॅमसे मॅक्डोनाल्ड हे संयुक्त मंत्रिमंडळांत प्रथम मुख्य प्रधानपदावर आले असता हिंदुस्थानाने त्यांच्या अडचणीची परि-स्थिति लक्षांत घ्यावी असा भाग एका अग्रलेखाच्या शेवटी आला. तो लिहून झाल्या-वर त्यांनीं माझे मत विचारले. मॅक्डोनाल्ड याच्या बाजूच्या अडचणी आपण काय म्हणून सगाव्या असे माझे मत मीं स्पष्टपणे सागितले. तेव्हा ते माझ्या हातून येणाऱ्या लेखांत प्रतिपक्षाच्या बाजूचा थोडा तरी विचार होणारच. ती बाजू मी वगळण्यास तयार नाहीं. माझ्या हातून येणारा लेख हा केवळ एकेरी विचाराचा होणार नाही पण त्यास इलाज नाहीं. एकदा डॉ. जयकरांनी वरिष्ठ

न्यायाधिशाची जागा सरकारने देऊं केली असतां त्यांनी ती घेतली नाहीं. या त्यांच्या त्यागाबद्दल त्यानी स्फुट सागितले. पण त्यानतर लगेच दुसऱ्या स्फुटांत त्यानी जागा घेतली असती तरी ते लोकहिताचे झाले असते आणि त्याचा आर्थिक स्वार्थत्यागहि झाला - ना, अशी दुसरी बाजूहि त्यानी माडली मला सहज मत विचारले, तेंव्हा मी या दुसऱ्या स्फुटाने पहिल्यावर पाणी पडले इत्यादि सागितलें. अर्थात् त्याच्या दुहेरी लिहिण्यात काही वावगे आहे हे त्यांना मुळीच पटले नाही. पण अनिच्छेने आणि ढोबळ विचार करणाऱ्या जनतेची प्रवृत्ति लक्षात घेऊन त्यानी शेवटीं हे दुसरें स्फुट गाळण्यास समति दिली.

(५) १९२८ मध्ये तात्यानी रजा घेतली होती. हगामी सपादकत्व मजकडे होते पहिल्या अकाच्या आधीच्या सोमवारी सायकाळी ७॥–८ च्या सुमारास ते कार्यालयांत माझ्या टेबलाशी आले. मी मुद्रिताची एकेक प्रत त्याच्याकडे जशी होईल तशी पाठवीत होतो मी त्यांना विचारले, "दुपारी मुद्रिते (प्रुफे) पाठवलीं तीं मिळाली का ? त्यात काही कमीजास्त सुचवावयाचे आहे काय ?" ते म्हणाले, "प्रुफासंबधी किंवा उद्याच्या अकासंबंधीं मला काही सांगावयाचे नाहीं. पण कित्येक वर्षात सोमवारी संध्याकाळीं मोकळ्या मनाने फिरून आल्याचे मला आठवत नाही. आज इतक्या वर्षानीं सोमवारी सायकाळीं मी फर्ग्युसन कॉलेजकडे फेरफटका मोकळ्या मनाने करून आलों, याचा आनंद सागण्यासाठींच फक्त मी येथें आलों आहे" (त्या वेळी मंगळवारचा आठवडिक केसरी होता). या बोलण्यानें सूक्ष्मरीत्या वृत्तपत्रकाराने किती जबाबदारी मानली पाहिजे हेंहि कदाचित् त्यांना सुचवावयाचे असेल. मला मात्र या त्याच्या उद्गारावरून ते किती जबाबदारी मानीत असत याची कल्पना आली.

(६) माझ्या हगामी सपादकत्वाने १९२८ मध्ये केसरी निघत असतां बार्डोलीचा लढा निकरावर आला. तडजोडीची बोलणी चालू होती. त्यात मुन्शीलाल मेहतांचा हात होता. ते तात्याना भेटले आणि तडजोडीच्या अटीसबधी विश्वसनीय माहिती त्याच्याकडून तात्याना समजली. त्यांनी तडजोड कोणी कशी करावी यासबधीं विवेचक अग्रलेख लिहून छापावयासहि दिला. मी प्रुफे घेऊन त्यांच्याकडे गेलो व आरभी व शेवटी कांही शाब्दिक फरक सुचविले. मला हा सबंच लेख येऊ नये असें वाटते हे त्याना सहजच उमगले. ते एकदम म्हणाले, "हे आर्टिकलच तुला छापावेसे वाटत नाही असाच याचा अर्थ आहे." मी म्हणालो, "होय. शेवटीं तुम्ही सांगता तशीच काही तडजोड निघेलहि परतु आधी आपण लिहिले तर चळवळीचे पाठिराखे म्हणतील आम्ही त्यांचे पाय ओढले. ही साधि त्यांना कशाला द्यावी ?" तात्यानी सुचवलेली तडजोडच पुढे झाली हे खरे; पण त्यानी त्या वेळीं

हा तडजोडवादी अग्रलेख काढून ठेवण्यास समति दिली, या त्याच्या उदारपणाचें मात्र मला अद्यापिहि आश्चर्य वाटते !



## दामोदर विश्वनाथ गोखले

( बी. ए., एलूएल्. बी., पुणें )

( १ ) लो० टिळकांना साठ वर्षे सपून एकसष्टावें वर्ष लागत होते. त्या वेळीं त्यांचा सन्मान कसा करावा यासबधी विचार करण्याकरिता पुणे येथील सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात पुढाऱ्याची सभा भरली होती. सभा, भाषणें, मेजवानी वगैरे मामुली प्रकारच्या सूचना पुष्कळ आल्या श्री केळकर हे जवळ जवळ प्रथम गप्पच होते. यवतमाळचे तपस्वी डॉ. बाबासाहेब पराजपे याना जाहीर सभांचा कार्यक्रम पटेना. त्यानी स्पष्ट सागितले की, लोकमान्य जिवत परत येतील अशी आमची कल्पना नव्हती. ते सुखरूप परत आले याबद्दल आनद व्यक्त करण्याकरिता त्यांच्या चळवळीला मदत होईल असा समारभ पाहिजे. या भाषणानतर श्री. तात्यासाहेब केळकर हे त्या सभेत जोराने भाग घेऊ लागले. त्याच्या बोलण्यावरून असे स्पष्ट दिसले की, ते कांही तरी योजना मनात ठरवून आले होते. त्यांनीं हळूहळू आपली कल्पना पुढें मांडली. ती म्हणजे, एकसष्टाव्या वाढदिवसा-निमित्त एक लाख रुपयाची थैली लोकमान्याना आपल्या पक्षातर्फे अर्पण करावी, ही होय. यापूर्वी अशा तऱ्हेची थैली महाराष्ट्रात कोणाला अर्पण केली नव्हती; व त्या काळीं एक लाख रुपये म्हणजे फार मोठी रक्कम असे वाटत होते. श्री. तात्या-साहेब केळकर याची कल्पना सभेत जमलेल्या लोकाना पटली पण एक लाख रुपये जमविण्याची हिंमत कोणासहि वाटली नाही. श्री. केळकर यानी मात्र पूर्ण आत्म-विश्वासाने हे कार्य हातीं घेतले, व अगदी अल्पावधींत म्हणजे दहा बारा दिवसा-तच अत्यत परिश्रम करून, अनेक सहकाऱ्यांचे दौरे ठरवून व स्वतः ठिकठिकाणी जाऊन ही कल्पना यशस्वी केली. सभेंतच त्यांनी स्वतःचा एक हजाराचा आकडा टाकला; व त्यांच्या प्रोत्साहनाने तेथेच मोठी रक्कम जमली. अनेकांनीं आपल्या शक्तीबाहेर त्या वेळीं रकमा दिल्या. ही रक्कम लोकमान्य स्वतः कधीहि घेणार नाहींत, ते एक लाख रुपये राष्ट्रीय चळवळीलाच देतील, ही श्री. केळकर याची खात्री होती व तसेच पुढे झाले. त्यामुळे महाराष्ट्रात थैल्या देण्याचा पायडाहि पडला. पण श्री. केळकराची सत्त्वपरीक्षा यापुढेच या बाबतीत व्हावयाची होती. पैशाचा पाऊस पडू लागला. समारभाचा दिवसहि ठरला. त्या वेळी मुबईतील काहीं वडिलधाऱ्या पुढाऱ्यानी बातमी आणली की, सरकारला हे पाहवत नसल्याकारणाने समारभाच्या पूर्वीच लोकमान्याना अटक केली जाणार आहे. यावर उपाय म्हणून त्यांनी तोडहि अशी सुचविली की, हा निधि जमविण्याचे

.काम बंद करावे व समारंभ खाजगी रीतीनें करावा. श्री. तात्यासाहेबांच्या निश्च-यांच्या परीक्षेची ही वेळ होती. मुंबईतील व पुण्यातील हे मत असणारे पुढारी वडील तर होतेच, पण वजनदारहि होते. पण श्री केळकरानी या पुढाऱ्यांचे म्हणणें मान्य केले नाही. त्यानी थोडेसे रागावून पण आवेशाने जाहीर केले कीं, "लोक-मान्यांना अटक झाली तर लाख रुपयाची थैली त्यांच्या तसबिरीच्या पायाशीं अर्पण करीन, पण हा उपक्रम सोडणार नाही." अखेर केळकरांचा विजय झाला, हे सांगणे नकोच. वाढदिवसाच्या दिवशी लोकमान्यावर राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल नोटीस बजावण्यात आली. पण समारंभ मात्र फारच बहारीचा झाला. लोकमान्यांनीं एक लाख रुपये जनतेस परत केले व येथूनच त्याच्या कार्याच्या वाढीस सुरुवात झाली. महाराष्ट्रांतील हाच सर्वांत मोठा पहिला निधि; व त्याचे ब्रह्मदेवत्व श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याकडे जाते.

(२) लो टिळक चिरोल खटल्याच्या कामाकरिता विलायतेस जाण्यास निघाले, ती वेळ महायुद्धाची होती. आगबोटीहि बुडत होत्या, म्हणून कोलंबोच्या मार्गें विलायतेस जाण्याचे ठरले. लोकमान्यानी आपल्या चळवळीसंबंधींचीं धोरणे जवळच्या मंडळीस सांगितली. सार्वजनिक कामाची इतरहि पुष्कळ आवरा-आवर केली. पण 'केसरी-मराठा' छापखान्याची व वृत्तपत्राची त्याना समाधान होईल अशी व्यवस्था मात्र झाली नव्हती खरी. त्याना तितका वेळ व उसंतहि नव्हती. कोलंबोस गेल्यानतर ज्या दिवशी संध्याकाळीं आगबोटीनें विलायतेस जावयास निघावयाचे, त्या दिवशी दुपारी वर उल्लेखिलेल्या व्यवस्थें-तील एका उणीवेनें लोकमान्य बेचैन होते. त्याचे भाचे व 'केसरी' चे व्यवस्थापक कै. श्री. बाबासाहेब विद्वांस हे कांही तरी मृत्युपत्र अगर व्यवस्थापत्र करून ठेवणे बरे असा लोकमान्याना सल्ला देत होते. तथापि त्याचा निश्चय होत नव्हता. शेवटीं त्यानी श्री. तात्यासाहेबांचें मत विचारले. श्री. तात्यासाहेब हे लोकमान्यांच्या खाजगी प्रकरणात त्याना विचारल्याशिवाय कांही बोलत नसत; व तें थोडें अवघडहि होते. त्या वेळीं लोकमान्यानी विचारले म्हणून त्यांनीं सांगि-तलें कीं, "काय धोरण ठरवावयाचे असेल ते मनाशी ठरवा. पण मृत्युपत्र मात्र करून टाकावे हें उत्तम." श्री. केळकर याच्या या सल्ल्याचा परिणाम होऊन लोकमान्य व कै. विद्वांस हे लोकमान्यांच्या खोलीत गेले व दोन तास विचार-विनिमय करून त्यानीं मृत्युपत्र लिहिले. कोलंबोस लोकमान्याच्या बरोबर त्याचे कायदेपंडित स्नेही होते. पण हे मृत्युपत्र मात्र कोणालाहि दाखविले नव्हते. 'केसरी' व 'मराठा' ही पत्रे आणि छापखाना व त्याबरोबर गायकवाडवाड्यांतील पश्चिमेकडील जागा याचा 'पब्लिक ट्रस्ट' केल्याचें त्या मृत्युपत्रात लिहिले होते. हे मृत्युपत्र करण्याचा निश्चय त्यांनीं केला हेच ठीक झाले. कारण त्यामुळे श्री. केळ-

कर व श्री. विद्वांस यांना पुढची सध्या चालू असलेली व्यवस्था करतां आली. नाहीं तर काय झाले असते हे कल्पनेवरच सोडणे बरे. या श्रेयाचा मोठा वाटा श्री. केळकर याच्याकडे जातो.

( ३ ) श्री. केळकर याच्यावर, टिळकांना त्याच्या एकसष्टाव्या वाढदिवसानिमित्त जो आहेर करण्यांत आला, त्याबाबत अनेक प्रसग आले. त्या वेळी एक सद्‍गृहस्थ लोकमान्याकडे आले व त्यानी लोकमान्याना वरील निधीतून कांही रकमा दडपल्या गेल्या, असे सांगितले! उघड उघड त्याचा कटाक्ष श्री. केळकराना बदनाम करण्याचा होता लोकमान्याच्या लक्षात ती गोष्ट तावडतोब आली. ते सतापले व त्याचा सताप अनिवार होऊन त्यांनी वर उल्लेखिलेल्या गृहस्थाला "जिन्याची पायरी उतरून चालते व्हा," असे सांगितले "माझा श्री केळकरावर पूर्ण विश्वास आहे. त्यांच्याविरुद्ध असले मलिच्छ आरोप मी कधीहि ऐकून घेणार नाही. हे आरोप करणाराचेच तोंड काळे फुटेल; मी जी माणसे माझ्याजवळ केली व होमरूलच्याच काय पण सर्व सार्वजनिक कामात त्याच्यावर विश्वास टाकला, तो योग्य होता. या माणसावर आरोप करणे म्हणजे त्याना जवळ करणारा मी अक्कलशून्य आहे असे म्हणण्यासारखे आहे. ते मी कधीहि सहन करणार नाही " — असे तडकाफडकी उद्गार काढून खरोखरीच लोकमान्यांनी त्याना जिन्यावरून खाली केले श्री. केळकर यांच्यावर लोकमान्याचा केवढा विश्वास होता, हे या प्रकरणात चागलेच दिसले.

( ४ ) असहकारितेच्या काळात दारूबदीचा उपक्रम हा एक चळवळीचा प्रमुख भाग होता. धारवाडास अशाच तऱ्हेची दारूबदीची चळवळ चालली असताना दारूच्या दुकानावर निरोधन करणाऱ्या स्वयंसेवकावर तेथील फौजदारानी गोळीबार केला; व त्यात कांहीं जबर दुखापती झाल्या. धारवाडचे हे प्रकरण त्या वेळी फार गाजले. लोकात तर एवढी दहशत बसली होती की, दिवसाढवळ्या गांवात शुकशुकाट झाला होता! अशा या आणीबाणीच्या प्रसगी बेळगांवचे श्री. गगाधरराव देशपांडे यांनीं त्याच्या पुणें बेळगाववरील सहकाऱ्यासह तेथे जाऊन लोकाना धीर दिला व एक नवे धैर्य लोकांत निर्माण केलें. याच सुमारास श्री. तात्यासाहेब केळकर हेहि धारवाडच्या लोकाना धीर देण्यासाठी व चौकशीसाठी पुण्याहून तेथें गेले. त्या दिवशी तेथें भरलेल्या जाहीर सभेत श्री. केळकर यांनी जें भाषण केलें तें कर्नाटकातील लोक अद्याप विसरले नाहींत. त्यांनी त्या सभेत दारूबदीच्या चळवळीचे महत्त्व वर्णन केले लो टिळकानीं १९०८ पासून ही चळवळ कशी वाढविली याचे मार्मिक विवेचन केलें आणि शेवटीं स्वराज्य मिळविण्याकरिता असले लढ्याचे प्रसंग किती उपयोगी पडतात हे सागून, या लढ्यांत होणाऱ्या आत्मत्यागाची त्यानी स्तुति केली. या त्यागाच्या यज्ञातूनच

अखेर स्वराज्याची देवता अवतरेल असे त्यांनी आश्वासनपूर्वक सांगितले. श्री. केळकर यांच्या भावनात्मक भाषणांपैकी हे एक भाषण होते; व कर्नाटकात काही पोवाड्यात ते आजहि नमूद आहे!

( ५ ) १९३० सालच्या मिठाच्या सत्याग्रहाचा प्रारंभ होता. स्वराज्य पक्ष आणि प्रतिसहकार पक्ष यांचे पुढारी या नात्याने श्री. केळकर यांनी कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांच्या अनेक उपक्रमांना कसून विरोध केला होता. त्या विरोधाची मीमांसा या ठिकाणी करण्याचे कारण नाही अधिकाराच्या जागा कौन्सिलमध्ये शिरून काबीज कराव्या हे त्या विरोधाचे बीज होते, हे सहज समजण्यासारखे आहे. लढाऊ कार्यक्रम ठेवावा असा आग्रह होता इतकेच. १९३० साली मिठाचा सत्याग्रह सुरू करून कायदेभंगाची सुरवात कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनी केली. पण प्रकृतिभिन्नत्वाने व पूर्वीच्या विरोधाच्या दृष्टीनें श्री केळकर अगर त्यांचा पक्ष कॉंग्रेसच्या चौकटींत बसूं शकत नव्हता पण हा चढाईचा लढाऊ कार्यक्रम श्री. केळकर यांना मान्य होता. म्हणून या प्रश्नाचा विचार करण्याकरिता १९३० साली टिळक स्मारक मंदिरांत सभा भरली, त्या वेळी श्री केळकर यांनी पुढाकार घेऊन सत्याग्रहाला पाठिंबा दिला; व त्या चळवळीत आपल्या पक्षाने भाग घ्यावा असे ठरविले

श्री. तात्यासाहेब यांचा आग्रह येवढाच होता कीं, सत्याग्रहाची शिबिरे आपल्या पक्षामार्फत स्वतंत्र उभी करावी; त्यांच्या खर्चाकरिता कॉंग्रेसकडे तोंड वेंगाडूं नये; व वाटेल त्या वेळी हा सत्याग्रह मागे घेण्याची आपणांस मोकळीक ठेवावी. हे धोरण अर्थातच सर्वांना पटले; व मौज ही की, हे पटताच श्री. केळकर यांनीं स्वतः मिठाचा सत्याग्रह करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे तावडतोब ते पेणला निघून गेले व तेथे त्यांनी जाहीर सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारून बेकायदेशीर मीठहि तयार केले!

( ६ ) कै. तात्यासाहेब केळकर यांच्यावर जे अनेक अडचणीचे प्रसंग गुद-रले त्यात सर्वांत नाजूक, सर्वांत अवघड व सर्वांत भयंकर असा प्रसंग म्हणजे ते व लोकमान्यांचे दोन चिरंजीव यांनीं उत्पन्न केलेले तंटे व कुरबुरी होत. श्री. केळकर यांची या वेळी एका दृष्टीने परीक्षाच झाली. लोकमान्यांवरील निःसीम श्रद्धा, लहानपणापासून वाढविलेल्या दोन्ही चिरंजिवांबाबत प्रेम -- 'केसरी-मराठा' संस्था शाबूत व कार्यक्षम राहावी म्हणून तळमळ या भावनांची त्या वेळी ओढाताण होती. लोकमान्यांच्या चिरंजिवांनी श्री. केळकर यांच्यावरच दावा घेतल्यामुळे उत्पन्न झालेली परिस्थिति फारच गुंतागुंतीची होती. अशा वेळी लोकमान्यांच्या द्वितीय चिरंजिवांनी आत्महत्या केली व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे पत्र लिहून या हत्येचे पाप 'केसरी' संस्थेच्या विश्वस्तांच्या माथी मारले! त्या वेळी श्री. केळकर यांच्या शत्रुपक्षांनी

असणाऱ्या कांही वृत्तपत्रांतून त्यांच्यावर बेहद्द व बेसुमार असा अन्यायी हल्ला चढविण्यास सुरुवात झाली. एका पत्राने तर त्यांच्यावर या खुनाचा आरोप करण्यासहि कमी केलें नाहीं. प्रसग मोठा बांका होता. या वृत्तपत्रांतील लेखकाना वस्तुस्थितीची कल्पनाच नव्हती. पण काही गोष्टीची वाच्यता करणेंच केळकरांना शक्य नव्हते. एरवीं श्री. तात्यासाहेब केळकर याच्या स्वाभिमानाला धक्का देणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांचे 'बोडण' ते कसे करीत हे प्रसिद्ध आहे. पण या वेळी मात्र त्यांनी उत्तर दिले नाही ! त्यांच्या या मौनाबद्दल त्याना एकवार विचारलें असता त्यानी सांगितले की, " माझा स्वाभिमान दांडगा आहे. पण त्यापेक्षाहि लोकमान्य व त्याचे कुटुब याच्या प्रतिष्ठेची चाड मला अधिक आहे. माझ्यावर हल्ला करणाऱ्यांची भबेरी वाजविण्याचे सामर्थ्य माझ्यात आहे; व त्याना नेस्तनाबूत करण्याइतका मजजवळ पुरावाहि भरपूर आहे, पण मी ते करू इच्छित नाहीं. मी मुकाट्याने मार सोशीन; पण यात गुतलेल्या काही गोष्टींची वाच्यता करणार नाही. अखेर ईश्वरच मला न्याय देईल. " श्री. केळकर याच्या या उद्‌गारात त्याची भावनोत्कटता दिसते; व त्याबरोबरच गभीर चारित्र्यहि दिसते.



## दिनकर वासुदेव दिवेकर

(एम्. ए., सहसंपादक 'केसरी', पुणें)

(१) कै. तात्यासाहेब मोठेपणाकरिता अगर मानाकरिता कधीहि हपापलेले नसत. १९२३-२४ साली मध्यवर्ती असेंब्लीची निवडणूक झाल्यावर पहिले सरकार-नियुक्त अध्यक्ष सर फ्रेडरिक व्हाईट याच्यानंतर लोकप्रतिनिधिनियुक्त अध्यक्षाची निवडणूक व्हावयाची होती. विठ्ठलभाई पटेल निवडून आले. त्या वेळी सरदार मुतालिक याचे मत सरकारी उमेदवाराविरुद्ध पटेल यास तात्यासाहेबांनीं कसें मिळवून दिले व पटेल एकच मत अधिक पडून निवडून कसे आले तो इतिहास प्रसिद्ध आहे. त्या वेळी असेंब्ली स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष प. मोतीलाल नेहरू याची इच्छा तात्यासाहेबांनींच उभें राहावें अशी होती. मोतीलालजींनीं तात्यासाहेबांस एकदोन वेळा खाजगी भेटींत तसे सुचविलेंहि; तथापि त्यानी होऊन हा महनीय मान सोडून पटेल यासच पक्षातर्फे उभें केलें व स्वतः उभें राहण्याचें पडितजीस थोडें दुखवूनदेखील नाकारलें.

(२) कानपूर येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या वेळीं पतियाळा किंवा इदूर या दोनपैकी एका सस्थानांतून तीनचार दरबारी दूत अगदीं गुप्त रीतीनें त्यांची भेट घेण्यासाठी आले होते. त्या सस्थानांची दिवाणगिरी तात्यासाहेबांनीं स्वीकारावी अशी महाराजांची तीव्र मनीषा असल्यानें त्यांनीं निवेदन केलें; परंतु तात्यासाहेबांनीं त्यांस स्पष्ट नकार दिला.

( ३ ) त्याच्या उद्योगप्रियतेचीं उदाहरणे सहस्रशः सांपडतात. लो. टिळकांचा मृत्युलेख हे जसे एक उदाहरण आहे तसेंच त्यांनीं कानपूर येथें हिंदुमहासभेच्या अध्यक्षपदावरून जे भाषण केले त्याचें लेखन हे दुसरे गणलें जाईल. त्यांची अध्यक्षस्थानी नियुक्ति झाल्याची तार त्यांस ते कानपुरास राष्ट्रीय सभेच्या बैठकीसाठी निघण्यापूर्वी काही तासच मिळाली. पण त्यानी अध्यक्षपद त्या सबबीवर न नाकारतां पुण्याहून गाडीत बसण्यास निघण्याच्या घटकेपर्यंत भाषण लिहून पुरे केले ते घाईत लिहिलेले भाषण त्यानी श्री. अण्णासाहेबास दाखविले त्यास ते फार आवडले मग तात्यासाहेबानी ते भाषण कसे लिहिले त्याची कथा सागितली व विनोदानें विचारले, मी घाईगर्दीत कसे तरी लिहितो तेच सावकाशीच्या लेखापेक्षां अधिक सरस असते की काय ?



## नरहर विष्णु गाडगीळ

( बी. ए., एलूएलू. बी., दिल्ली सरकारचे मंत्री, मु. दिल्ली )

( १ ) १९१५ च्या सुमारास तात्यासाहेब याच्या सान्निध्यात येण्याचा प्रसग येऊं लागला व त्याचे कारण त्याचे चिरजीव बापू केळकर याची मजबरोबर असलेली मैत्री हे होय. त्या वेळी मीं, बाबा धारप, बापू जोशी, बापू केळकर, सदूभाऊ जोगळेकर, वगैरे मडळीचा एक तरुण सघ असून, आम्ही एकत्र जमून चर्चा करीत असू मधूनमधून मी केळकराच्या घरीं जाई. त्यांचे लक्ष चागल्या रीतीनें वेधण्याचे एका गमतीच्या प्रसगाने घडलें. नेने घाटावर पानसुपारीचा समारभ होता. तेथे तात्यासाहेब आले. जवळच लोड वगैरे होते. त्याला टेकून त्यानीं कुणाला तरी बसण्यास सागितले. सदरहू गृहस्थ भिडस्तपणे नाकारत होते. येवढ्यांत मी म्हणालो, प्रत्येकाला बैठक लागतेच; शखाला सुद्धा अडणी अगर जगमाचा खादा असावा लागतो तात्यासाहेबानीं मजकडे टवकारून पाहिलें. विनोद बोचक होता. तो गुदगुल्या करणारा असावा हे त्याचें सूत्र पुढें फार वर्षांनीं मला अवगत झाले. हेच सूत्र खरे प्रभावी ठरते हा अनुभव आहे.

( २ ) १९२०–२१ म्हणजे असहकारतेची वाढती कमान होती सार्वजनिक सभेंत कांहीं वकिलांची सभा भरून त्यांत वर्षभर वकिली सोडावी असा प्रश्न निघाला, त्या वेळी मी जिल्हा कमिटीचा चिटणीस होतों. धद्यात नाममात्र प्रवेश होता. मीं माझे नाव दिले. सभेनतर तात्यांनीं माझ्या परिस्थितीची चौकशी केली. पुढील बैठकींत मजसारख्याची व्यवस्था करण्याची तात्यांची इच्छा होती. बैठकीस लोक जमत; पण पुढील व्यवस्था हा प्रश्नच मागें पडला ! तात्यासाहेबांनीं मला स्वतः व्यवस्था करतों म्हणून सांगितलें. पण मीं नाकारलें. वर्षभर वकीली नाममात्र केली

व सर्व वेळ कॉंग्रेसच्या कामास देत होतो. अनेक वेळा तात्यांनी मदतीबद्दल विचारले. मी नाकारले, पण त्यांनी मात्र आपली जबाबदारी पार पाडण्याची केव्हाहि तयारीच दाखविली.

( ३ ) एका वाढत्या राजकारणात मतभेद झाले १९२५ साली तांबे प्रकरण झाले. गहजब झाला रात्रीं पुण्यातील सर्व कार्यकर्त्यांना तात्यानी आपल्या घरी बोलाविले. केले तें बरोबर आहे का व पुढे काय करावे असे दोन प्रश्न त्यानी विचारले. सुमारे शंभर मडळी होती पण दोनतीनजणच बोलले, व ते सर्व त्याचे कृत्य योग्य होते असे म्हणत होते मला विचारलें तेंव्हा मी सागितले, " तुम्ही चूक केलीत. तार धाडावयास नको होती एक तर ती मान्य करून मिटवावे नाही तर नेटाने नवीन मार्ग काढावा. " सर्व लोक रागाने मजकडे पाहत होते. त्या वेळेपासून मी दूरदूर होऊ लागलो पण त्यांच्या 'गत गोष्टीत' चूकच झाली असा अभिप्राय त्यानी व्यक्त केला! इतर लोक मी शिष्ट, अति शहाणा म्हणून समजू लागले; पण तात्यानी आपल्या खाजगी वर्तनात काहीहि फरक होऊ दिला नाही.

( ४ ) केसरीत मी कधीच लिहिले नाही. मराठ्यात मधूनमधून लिहीत असे. नांवाने अगर अन्य रीतीने त्यामुळे तात्यासाहेबाना असे वाटले की, माझी इच्छा सपादक मडळात यावं अशी आहे; व एक दिवशी १९२२ मध्ये त्यानी मला जेवण्यास बोलाविले व तसं विचारले. मी म्हणालो की, माझी तशी महत्त्वाकाक्षा नाही. मी लिहितो ते कांही तरी सेवा व्हावी या उद्देशाने. त्यानी विचारले, मग तुम्ही काय ठरविले आहेत ? मी म्हणालो १५ वर्षे वकीली करावयाची व नतर पूर्णपणे वेळ राजकारणास द्यावयाचा. तोवेळपर्यंत सामान्य राहणीला पुरेल येवढे मी मिळवीन. हे ऐकून त्याना फार आनद झाला व हेच मालवीयानी केले व हाच योग्य मार्ग आहे असे ते म्हणाले त्याप्रमाणे मी वागलो व धद्यांतसुद्धा मधूनमधून पक्षकार तात्यासाहेब याच्याकडून येत असत. राजकारण करणाऱ्यानी कोणावर चरितार्थासाठी अवलबून राहू नये, स्वावलबी असावे, असा त्याचा उपदेश असे. वैयक्तिक निःस्पृहता नसेल तर राजकारण बोटचेपे होते हा अनुभव सर्वत्रच येतो!

( ५ ) १९२९ मध्ये कॉंग्रेसचे अधिवेशन लाहोरमध्ये होते. मी त्यांच्याबरोबर राजा नरेंद्रनाथ याच्याकडे उतरलो होतो. स्वातंत्र्याचा ठराव त्याना सर्वस्वी पसत नव्हता. तेथील मुक्कामात व प्रवासांत चर्चा चाले. ठरावाला पाठिंबा दिला, आतां पुढे कसे होईल म्हणून चर्चा चाले. आता प्रचड चळवळ अटळ आहे. २६ जानेवारी १९३० ला प्रतिज्ञापत्रवाचन झाले. त्याच दिवशी नवी व जुनी पिढी यातील रेषा स्पष्ट झाली. तात्याचे मन द्विधा झाले व शेवटी त्यानी सत्याग्रहहि केला पण हीच गोष्ट सुरुवातीस केली असती तर—तर काही निराळाच इतिहास झाला

असता! वैयक्तिक धैर्य त्याच्यात नव्हते हा आरोप खोटा आहे. कारण मला प्रत्यक्ष त्या वेळची परिस्थिति माहीत आहे; पण हा समज केवढा व्यापक होता याचे एक उदाहरण देतो. अलिबाग लॉकपमध्यें मी असता एक पोलीस अधिकारी त्यांच्याबद्दल निंदास्पद बोलू लागला. त्याला मी सांगितले, 'तुम्हाला तात्या माहीत नाहीत व तुमची त्याना बोलण्याची लायकी पण नाही. थोर व चागल्या माणसाची निंदा करणे हे पाप आहे तसेच मुकाट्याने निंदा ऐकून घेणे हेहि पाप आहे तेव्हा मजसमोर तुम्ही बोलू नका.' 'तुम्ही खुद्द त्याच्यावर टीका का करता?' त्याने प्रश्न विचारला. मी उत्तर दिलें, "त्याच्या सार्वजनिक कार्यावर मी टीका करतो व तीहि सर्वमान्य सभ्यतेच्या मर्यादा सभाळून" अनेक मित्र माझ्यावर रागवतात का तर मी खाजगी भाषणात विरोधकावर टीका करीत नाहीं व सार्वजनिक भाषणात त्याना सोडत नाहीं. माझा दडक मित्रावर खाजगी टीका व त्याना सार्वजनिक पाठिबा; विरोधकावर सार्वजनिक टीका व खाजगी रीतीने गुणग्रहण असा आहे. तात्यानी खाजगी कुणाचीही निंदा केली नाहीं, किंबहुना असे होत असेल तेथें ते नापसती दर्शवीत. खाजगी व वैयक्तिक जीवन म्हणजे रणसंग्राम नव्हे अगर शनवारवाड्यापुढील मैदान नव्हे. या जगांत निर्दोष कोणी नाहीं, म्हणून, केवळ निंदा व दोषदर्शन करून समाज सुधारत नाही.

(६) १९२४ सालापर्यंत समोरासमोर उभे राहून युद्ध खेळण्याचा प्रसग आला नव्हता. निवडणुकीनिमित्त तो आला. प्रहार करणे जरूर होते. पण आघात करावयाचा नव्हता. पराभव करावयाचा होता, पण वैर उत्पन्न करावयाचे नव्हते. एकाच वेळी सामर्थ्य व सभ्यता दाखवावयाची होती. मराठी वर्तमानपत्रांतून माझ्या भाषणाच्या विपर्यस्त बातम्या येत होत्या. गैरसमज होणे साहजिक होते. माझी भाषणे कडक होती, पण त्यात निंदा नव्हती. भीष्माच्या पायापाशीं आदराचे चार बाण सोडून अर्जुन लढला तसेच माझें होत होते. तात्यांची योग्यता सागून मी धोरणावर टीका करी. बातमीदार पहिला भाग गाळून दुसरा लिहीत. वास्तविक त्याना आमचे सबध माहीत होते. उभे राहण्याचे ठरल्यानतर तात्यांच्या घरी जाऊन आशीर्वाद व चहा घेऊन आलो होतो. आशीर्वाद जरी शब्दांनीच त्यांनीं स्पष्ट केला नव्हता तरी मनोमन त्याची खात्री मला पटली होती.

जेव्हा निवडणुकीचा निकाल त्याना मध्यरात्री कळला त्याबरोबर त्यानी लिहिलेले अभिनदन-पत्र हे सौजन्याचा व खिलाडूपणाचा व अभिजात पुरावा असें. तें होते. "तुम्हाला मिळालेले यश अगदी योग्य आहे, त्याबद्दल मी तुमचे अभि-नंदन करतो. तुम्ही बिनविरोध निवडून यावे अशी माझी इच्छा होती. उद्यांच्या सभेत मजवर टीका करण्याची तुम्हास इच्छा होईल तरी व मला योग्य ठरेल अशी टीका करण्यास तुम्ही मोकळे आहांत. (You may, however, criticise me in

tomorrow's meeting as you desire or as I deserve.) मीं एका अक्ष-रानेंहि तात्यांच्या विरोधाबद्दल सभेंत उल्लेख केला नाहीं. निवडणुकीच्या हलकल्लो-ळात व तीव्र आघाताप्रत्याघातांत मैत्रीविषयक पुष्कळ अपघात ( Casualties ) होतात. पण मी असे म्हणू शकतो कीं, मी मित्र कमी न करतां शत्रूंना मित्र करून घेतले याचे श्रेय तात्यांच्या मजवर झालेल्या शिकवणुकीचाच परिणाम होय.

( ७ ) मध्यवर्ती असेंब्लीचें अधिवेशन सपले म्हणजे अगत्यपूर्वक मी त्यांना भेटे. तसेच प्रत्येक खेपेस तुरुगांतून सुटून आल्यानतरहि भेटे. आमच्या या भेटी म्हणजे तासदीडतास उत्कृष्ट वातावरणातील चर्चेचा आस्वाद घेण्याची सधिच होती. उतारवयातसुद्धा सकाळीं काव्यप्रकाशासारखे ग्रंथ एखाद्या कॉलेजमधील विद्यार्थ्याने वाचावेत इतक्या तन्मयतेने वाचताना त्याना मी पाहिले आहे रिकाम-टेकड्या चकाट्या पिटणे अगर कपूत बसून कुटाळक्या करणें हे त्यांना कधीच आवडत नसे, व प्रत्येक क्षण ज्ञानार्जनात खर्चण्याच्या कामी त्याची तत्परता असे. रोज चागल्या प्रथाची निदान शभर पाने वाचल्याशिवाय झोपावयाचे नाही असा त्याचा दडक होता, व एका वेळी निदान दोन कप चहा घेणें असा त्याचा शिरस्ता असे! पैकी दुसरे मी भक्तिभावाने उचलले आहे; पहिले अद्यापि नीट जमत नाही. मात्र कारागृहातील विश्रातीच्या वेळेचा ग्रथ लिहून सदुपयोग केला हे ऐकून त्याना फारच आनद वाटला व त्याप्रमाणे त्यानीं माझ्या पुस्तकावर अभिप्राय देऊन व्यक्त केला आहे. त्याच्या नेतृत्वाची बैठक विद्वत्ता होती.

( ८ ) १५ ऑगस्ट १९४७ ला स्वातत्र्य प्राप्त झालें. ते याच देही याच डोळां त्यानी पाहिलें. कॉंग्रेसविरोधकांपैकी अनेकांना पक्षाभिमानामुळें कसेसेंच वाटलें. तात्यांना आनंद झाला व त्यांनीं लेखांत व व्याख्यानात तो प्रकटहि केला. केवढें कार्यक्षेत्र निर्माण झालें आहे असें ते म्हणत. आता सर्व पक्षानीं एक होऊन देशाची प्रगति सपन्नतेकडे केली पाहिजे, असा त्याचा कटाक्ष असे. कॉंग्रेसनें व्यापक दृष्टि ठेवून सर्वपक्षीय मंत्रिमडळ बनविले हे चांगलें केलें असेंहि ते म्हणत. सप्टेंबर १९४७ मध्ये मीं पुण्यास मंत्री म्हणून आलों, तेव्हा खासगी बैठकींत तसेच शिवाजीमदिरांतील सभेत मध्यवर्ती मत्रिमडळाला पाठिंबा द्यावा, असें त्यांनीं स्पष्ट सागितलें "श्री. गाडगीळ याच्यावर आमचा विश्वास आहे. ते सांगतात कीं, मत्रिमंडळ दक्षतेनें वागत आहे. आमचे समाधान झालें. आमची सदिच्छा, सद्भावना व सहकार्य मत्रिमडळामागे आहे". हें त्यांचें वाक्य सदरहू सभेतील अध्यक्ष या नात्यानें उच्चारलेलें अद्यापि माझ्या कानाला सुखवीत आहे. पक्षापेक्षां देश श्रेष्ठ आहे, व्यक्तीचा अहंकार देशाच्या प्रतिष्ठेपेक्षां अधिक नाही, ही गोष्ट ते कालज्ञ होते म्हणून जाणत. या दृष्टीनें ते मुत्सद्दी होते. अतीतावर भाष्य करणारे नुसते इतिहासकार नसून भावी कालाला कलाटणी कशी द्यावी हें सांगणारे ते द्रष्टे होते.

विद्यमानात वयामुळे ते प्रयत्नविन्मुख दिसत असले तरी विचारसृष्टींत त्याचे अखड कार्य चालूच असे. विद्वान् पण निगर्वी, नेता पण अनुयायांना मोकळीक देणारा, रसिक पण सदभिरुचिपूर्ण, साहित्यिक असून व्यवहार जाणणारा असा हा विरळा नरश्रेष्ठ होता दैन्यावाचून जीवन त्यानी घालविले व आयासाशिवाय मृत्यूला जवळ केले. मराठीमार्फत ज्ञानदान दिले व मृत्यूमार्फत सृष्टीचे जीवनासाठी घेतलेले ऋण फेडले! त्याचे दोष जे काय असतील ते चितेवर सपले; त्यांचे गुण हाच त्याचा वारसा आहे व तो जितका वाढवू तितका अधिक वाढणारा आहे.



## महादेव चिंतामण केळकर

### (बी. ए., निवृत्त डे. कलेक्टर, तात्यासाहेबांचे ज्येष्ठ बंधु, जळगांव)

(१) चि. तात्यासाहेब मॅट्रिक झाले त्या वेळी मी फर्स्ट बी ए. नापास झालो व नाना पास झाले. माझी स्कॉलरशिप बद झाली. परतु नानास श्रीमत मिजरकर बाळासाहेबानी बी ए. च्या अभ्यासास एक वर्षाचा खर्च २५० रु. दिला. त्यामुळे ते डेक्कन कॉलेजात गेले वडिलांस पगार ५५ रु मला खर्च देऊन तात्यास कॉलेजात जाणे शक्य नव्हते. तथापि आमच्या मातुश्रींनी कर्ज काढून तात्याना कॉलेजात घातले यामुळे त्याचे पुढील शिक्षण झाले

(२) मॅट्रिकमध्ये असताना तात्या इग्रजी व सस्कृतचे पेपर इतके चागले लिहीत कीं, त्या वेळचे हेडमास्तर आण्णासाहेब अत्रे ते जपून ठेवीत एक वेळीं दाजीसाहेब खरे त्याच्याकडे उतरले असता त्यानी ते पेपर त्याना दाखविले व म्हणाले की, आमचा हा विद्यार्थी किती उत्तम लिहितो ते पाहा. पुढील मोठेपणाचे पाय पाळण्यांत दिसतात याचे हे उदाहरण आहे.

(३) तात्यासाहेब एल्एल्. बी. झाले व सातार्‍यास वकिली करू लागले. त्या वेळीं त्यांच्या डोक्यात एक वर्तमानपत्र काढण्याचा विचार होता. त्या वर्तमानपत्राचे नाव 'जज्ज' ठेवावे असे ते म्हणत. यावरून त्याच्या विचाराची चुणूक दिसते. पुढे दैवयोगाने ते लो. टिळकाकडे गेले व मग साहजिकच ते वर्तमानपत्राचे सपादक झाले व तेथे त्यानीं इतकें यश मिळविले!



## सौ. गिरिजाबाई केळकर

### (तात्यासाहेबांची भावजय, जळगांव)

(१) आमच्या काशिनाथबापूंचें लग्न झालें. नवी नवरी घरांत आली तेव्हा सगळीं मुलं मला विचारूं लागलीं कीं, आम्ही तर तुला वहिनी म्हणतों; मग

हिला काय म्हणायचे ? तात्या चटदिशी म्हणाले, ही माझी 'ए वहिनी' आहे. तुम्हीहि ए वहिनीच म्हणता; या तुमच्या नव्या वहिनीला अहो वहिनी म्हणा म्हणजे झाल !

( २ ) माझें लग्न झाले तेव्हा आमच्या घरात साक्षरतेपेक्षां जास्त शिकलेल्या बायका नव्हत्या. तेव्हा लग्न झाल्यानतर तीन वर्षांनी माझा प्रथम लेख मासिक मनोरजनात बक्षिस मिळून आला; तेव्हा आम्ही धुळ्याला होतो व भाऊजी पुण्यास होते ते पुढे लगेच धुळ्यास आले व मला पाहतांच हसत हंसत हात पुढे करून " काढा पेढे, काढा " म्हणाले. मला कांहीच अर्थ न कळल्यामुळे मी घोटाळले. मग जेवताना ते म्हणाले, " आपल्या घरात पहिली स्त्री लेखिका झाली म्हणून पेढे नाही का वाटले ? "

( ३ ) पुण्यास बुक-कमिटीच्या सभेला मी आले असताना एक गृहस्थ मला भेटायला आले व इग्रजीतच बोलू लागले तात्या जेवत होते ते खाली मान घालूनच बसले. त्या गृहस्थाला वाटल ह्या विदुषीबाई ( त्याला काय ठाऊक की, मी विदुषी नसून लोकाना बनवली आहे ) ह्याना इग्रजी येत असेल ते गेले व तात्या वर मान करून हसू लागले व मग म्हणाले, " वहिनी, डायरेक्ट मेथड पद्धतीनें तू इंग्रजी शिक बर ! पूर्वीच शिकावयाला पाहिजे होते, म्हणजे अशी मानहानी झाली नसती ! "



## द. के. केळकर

( बी. ए., प्राध्यापक, ग्रथकार, तात्यासाहेबांचे चुलत बंधु, मुंबई )

( १ ) तात्या लेख लिहीत असता कोणी भेटावयास आला की लेख बद करीत आणि तो निघून गेला की लगेच जेथे सोडला तेथून पुढे लिहावयास लागलीच सुरवात करीत त्यामुळे सगळ्या लेखाचे चित्र जणू काही त्याच्या डोळ्यापुढे उभेच असावे, किवा क्रमशः ते चित्र आपोआप विस्तृत होत जावे असे वाटे. लोक भेटावयास येत ते रोजच. पण एका दिवशीच्या प्रसगाची मला विशेष आठवण राहिली आहे गाधीयुग सुरू झाल्यावर टिळकाच्या अनुयायापैकी कांहीं अखेरपर्यंत तटस्थ राहिले व काही सुरुवातीला तटस्थ राहून नतर गाधी-पक्षात सामील झाले या सामील झालेल्यापैकी एक पुढारी परगावाहून पुण्यास तात्याच्याकडे उतरावयाकरिता रात्री आला होता. रात्री जेवण वगैरे झाल्यावर दहा वाजण्याच्या सुमाराला महात्माजींच्या मताविषयी चर्चा सुरू झाली. प्रथम प्रथम चर्चा दोन 'मित्रांत चालावी अशा स्वरूपाची सौम्य होती; पण सुमारे अर्ध्या तासानतर दोघाचाहि आवाज चढता चढता इतका चढला कीं, माडीवर जोराने चाललेला हा वादविवाद ऐकून आम्हा खालील

मजल्यावरच्याना भीति वाटूं लागली की, हे दोघे मित्र आता हातघाईवर येतात की काय ! दोघांचेहि आवाज उत्तरोत्तर वढतच चालले आणि दोघांच्यातला वादविवाद चालला तो रात्री सुमारे दोन वाजेपर्यंत चालला ! पण या प्रसंगाचा उल्लेख जो मी करीत आहे तो तात्या काही वेळा संतापूनहि बोलत, या करितां नव्हे; तर मला असे पुढे मांगावयाचे आहे की, रात्री दोन वाजेपर्यंत कडाक्याचा वाद झाला असताहि नेहमीप्रमाणे सकाळी सहा वाजता तात्याना व त्याच्या मित्राना चहा देण्याकरिता म्हणून मी माडीवर जेव्हा गेलो तेव्हा पाहतों तो तात्या नित्याप्रमाणे लेखन करीत बसलेले ! जणू काही रात्री काहीच घडले नाही तात्याच्या मेंदूला निरनिराळे कप्पे होते की काय कोणास ठाऊक ! म्हणजे असे की, भांडण-तंट्यात चार-दोन तास घालविले तरी वादविवाद संपताच तो मेंदूचा कप्पा जणू काही बंद करून टाकावयाचा; व दुसरा कप्पा उघडावयाचा, अशी तात्याची वागणूक असे. राजकारणांतली अनेक कामे करीत असताहि तात्या प्रचंड वाङ्मय निर्माण करू शकले, तेहि आपल्या मेंदूचे कप्पे पाडण्याची जी कला त्याना साध्य झाली होती त्यामुळेच करू शकले असे मला वाटते.

( २ ) या प्रकारचा आणखी एक प्रसंग मला आठवतो तो फेरोजशहा मेहेता याचा मृत्युलेख तात्यानीं लिहिला त्या वेळचा. तात्याचे थोरले बंधु अप्पासाहेब याच्या मुलीच्या विवाहसमारंभाकरितां आम्ही सर्व जळगावास आप्पांच्याकडे गेलो होतो. सध्याकाळची वेळ, लग्नसमारंभाची मोठी मिरवणूक निघणार होती तात्याहि कपडे घालण्याच्या तयारींत होते. इतक्यांत तात्याच्या नांवाने एक तार घेऊन तारेचा शिपाई आला तात्यानी तार फोडून पाहिली. तार मराठा पत्राच्या उपसपादकाची होती. सुप्रसिद्ध पुढारी फेरोजशहा मेहेता परलोकवासी झाले होते. ती शुक्रवारची संध्याकाळ होती. मराठा पत्र रविवारीं बाहेर पडावयाचें, तेव्हां शनिवारीं त्यांत लेख छापला जाणे आवश्यक होते, म्हणून उपसंपादकानी तात्याना तातडीची तार धाडली होती. तात्यानीं तार आप्पासाहेबाच्या हातांत दिली व म्हणाले, तुमची मिरवणूक चालू द्या ! मला आता लेख लिहून रात्रीं मेल जायच्या आंत टपालात टाकला पाहिजे, असे म्हणून त्यानी लगेच मला हाक मारली व कागद शाई घेऊन आम्ही वरच्या मजल्यावर जाऊन बसल्यावर सुमारे पाच मिनिटे होतात न होतात तोंच त्यानी मेहेतावर अग्रलेख सांगण्यास सुरवात केली. दीड-दोन तासात लेख पुरा झाला व लगेच स्टेशनवरच्या पोस्टात जाऊन मी तो ताबडतोब जाण्याची व्यवस्था केली.

( ३ ) राजकारणात उपस्थित केल्या गेलेल्या सगळयाच प्रश्नांशीं तात्या समरस होत नसत हे सांगावयास नकोच. एक प्रसंग मला आठवतो त्याचा उल्लेख

करतो. एकदा मोठे धरण बाधण्याचा प्रश्न उपस्थित झाला होता. आता धरण बांधावयाचें म्हणजे आसपासची अनेक खेडी उध्वस्त होणार होती, हे सांगावयास नकोच. त्यातील खेडुतांना अन्य ठिकाणी जमिनी घेण्यास व घरे बांधण्यास लागणारा पैसा देण्यास धरण बांधणारी कपनी तयार होती; पण आपले घरदार सोडून जाण्यास ते खेडूत साहजिकच नाराज होते तात्याची प्रकृति ठीक नसल्याने त्या वेळी हवा खाण्याकरिता आम्ही पुण्याजवळीलच हवाशीर अशा यवत नावाच्या खेड्यात आठ-पधरा दिवस राहण्यास गेलो होतो. तात्या तेथें असताना वर उल्लेखिलेला धरण बांधण्याचा प्रश्न उपस्थित झाला होता. खेड्यातल्या लोकानी या बाबतीत सत्याग्रह करावा व धरण बाधण्यास विरोध करावा, असे कांहीं लोकाचे मत होते व त्या मताचा पुरस्कार केसरीने करावा याकरिता पुण्याहून दहावीस मडळी एक दिवस दुपारच्या वेळी यवतास तात्याच्याकडे आली. मडळीनी आपली विचारसरणी सविस्तर तात्याच्यापुढे माडली. तात्याना ती सर्वस्वी पसत पडणे अशक्यच होते. ज्याना जमिनी व घरे सोडावी लागणार होतीं त्याना देऊ केल्यापेक्षा अधिक पैसा देण्याबद्दल आग्रह धरण्यास तात्या कबूल होते, पण धरण बाधण्यासच विरोध करावा हे तत्त्व मान्य करण्यास कबुली देणे हे तात्याना अवघड होते; त्या वेळी परकीय राज्य होते व धरणाच्या निमित्ताने का होईना पण खेडुताच्यामध्यें सत्याग्रहाच्या चळवळीची कल्पना रूढ करितां येईल अशीहि त्याच्या पुरस्कर्त्योना आशा होती. पण तात्याना धरणबाधणीला विरोध करणे कठीण वाटले तर नवल नाही. यामुळे तात्यानीं केसरीच्या पुढच्या अकात जो यासंबधी लेख लिहिला तो तात्याची भेट घेण्याकरिता पुण्याहून यवतास येणाऱ्याना सर्वस्वी पसत पडण्यासारखा नव्हता हे सांगावयास नकोच. आज काळ बदलला आहे व आपल्या सरकारने अनेक धरणे बाधण्याची योजना लोकाच्यापुढे माडली आहे. आज त्या कल्पनाना विरोध होत नाही हें सांगावयास नकोच. पण तात्याच्या बाबतीत वरील प्रसंगाचा उल्लेख करावयाचा तो अशाकारिता की, तात्याच्या बुद्धीस जी गोष्ट पटली नाहीं ती केवळ लोकाग्रहास्तव मान्य करणें तात्याना फार कठीण वाटे, हे स्पष्ट करण्याकरिताच होय. पुढे वर उल्लेखिलेले ते धरण बाधले गेले हे सागावयास नकोच!



## येसूताई आठवले

(तात्यासाहेबांची चुलत बहीण, पुणें)

(१) सुमारे ४२ वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्या वेळी माझे वय २०–२१ वर्षांचें व माझी धाकटी बहीण काशी हिचे १५ वर्षांचे असेल. आदल्या वर्षीच काशीचें लग्न झाले होतें. ती वझे याच्याकडे दिली. त्या वर्षी आम्हीं घरची सर्व मडळी म्हणजे

आमची आई, स्वतः मी, बहीण काशी व भाऊ प्रो. दत्तुकाका असे मिळून मिरजेहून बैलगाडीने नरसोबाच्यावाडीस जात होतो. आम्हांबरोबर मी आमच्या शेजारच्याच एका केळकर आडनांवाच्या घरातील दोन वर्षांचा छोटा मुलगाहि घेतला होता; कारण तो त्यांचा मुलगा सदा मजजवळच असे व माझी त्याला आईपेक्षांहि अधिक सवय लागली होती. प्रवासात असता एका खेड्याजवळ आम्ही आलो. दुपारचें अकरा बारा वाजण्याचा सुमार होता आणि तेथेंच आमच्या बैलगाडीच्या चाकाची धाव निघाली. जवळपास कोठेच पाणी, विहीर किंवा काही नव्हतें आणि धावेवर घालावयास थोडेंतरी पाणी हवे होते. म्हणून आमचा गाडीवाला दूर अंतरावर घरगुती दुकानासारखें एक खोपटे दिसलें तिकडे गेला व पाणी मागू लागला तेथें त्या वेळीं चारपाच टगे बसलेले होते, त्यानी त्याला धुडकावून लावले व पाणीबिणी कोठले आले आहे असे म्हणून त्याला परत लावला. पण माझी बहीण काशी ही स्वभावतःच धिटुकली व जहांबाज होती. ती पाणी देत नाहीत म्हणजे काय असे म्हणून आपली गाडीतील तपेली घेऊन खाली उतरली व त्या दुकानांतील लोकांकडे जाऊन जोराने म्हणाली, " अहो, गाडीची धांव निघाली म्हणून आम्हांस पाणी पाहिजे. प्यायलासुद्धां तुमचे पाणी नको आहे, " असें म्हणून तिने ती तपेली त्याच्यापुढे आदळली. गमत अशी झाली की, ती तपेली बसलेल्यापैकी एका इसमाने सहज उचलून घेऊन पाहिली, त्याबरोबर त्याच्या वृत्तीत एकदम परिवर्तन झालें व तो नरमपणाने म्हणाला, तुम्ही केळकराच्या घरची मडळी का ? व मग त्याने घरात जाऊन घागरभर पाणी आणून दिले व म्हणाला, आणखी लागले तरी पाणी न्या ! हा सगळा प्रभाव काशीच्या तपेलीवर ठोकलेल्या तात्याच्या नावाचा ! ही तपेली काशीला तिचे लग्न झाल्यावर दुर्गाताईने ( तात्यासाहेबांच्या पत्नी ) दिलेली होती. असो; हा प्रसग आमच्या विनोदाला प्रवासभर व पुढेंहि कायमचा उपयोगी पडला व काशी तर घरी आल्यावर सगळ्याना सागूं लागली की, माझ्या तपेलीने तुम्हाला पाणी मिळाले ! माझी तपेली दुसऱ्या कोणाला मिळावयाची नाहीं, असे ती जोरजोराने सागू लागली व त्या प्रवासातील ती गमत सागू लागली म्हणजे जो काही हशा पिके त्याला सीमा नाही. सांगण्याचे तात्पर्य हे कीं, तात्यांचे नाव त्या वेळींहि सगळीकडे इतके खेड्यांपाड्यांतूनसुद्धां माहित झालेलें होते.

( २ ) माझ्या लहानपणी तात्यांनीं मला अंगाखांद्यावर खेळविलेले आहे. मी जात्याच गोरीपान, देखणी व स्वच्छ असे व त्या वेळी आमच्या घरांत लहान मूल म्हणजे मीच तेवढी. यामुळे माझे कौतुक फारच होत असे. तात्या पहिल्यानें बिलायतेला गेले त्या वेळचा प्रसग. घरून निरोप घेताना सध्याकाळी तात्या देवघरात देवाला नमस्कार करून माजघरांत आले व तेथे घरातील सर्व मडळी जमली होती त्यात येऊन बसले. या वेळी आकाच्या सासूबाई काकी देशपांडेहि सातान्याहून मुद्दाम

आलेल्या होत्या. त्यानी तात्याच्या हातावर दही घातले त्या वेळीं तात्याचा नातू श्रीधर पांच-सहा वर्षांचा होता. तो तात्यांच्याजवळ बसला होता. मी जवळच तेथे उभी होते. तात्यांनीं मजकडे पाहिले व मला जवळ बोलावून लहान मुलासारखा माझ्या पाठीवरून हात फिरवला. श्रीधरला चमत्कारच वाटला. त्याला वाटले मी येवढी पोक्त बाई आणि तात्या माझ्याप्रमाणेच यांच्या पाठीवरून हात फिरवत आहेत; ते पाहून तात्याच श्रीधरला म्हणाले, "अरे श्रीधर, तू आता जेवढा लहान आहेस तेवढीच तुझी ही आत्याबाई होती तुझ्यासारखीच तरतरीत आणि स्वच्छ असे आणि तुझ्याप्रमाणेच तिला मी अगाखाद्यावर खूपखूप खेळविले आहे बरं का ? म्हणून आता घरातून बाहेर पडताना हिच्याकडे पाहून कसेसेच वाटत आहे !"

(३) माझ्या बालपणांतील गोष्ट; आई वगैरे नेहमी सागत.मला त्याची आठवण अर्थातच नव्हती. कारण मी त्या वेळी दोन अडीच वर्षांची होते घरात मी एकटीच तान्हें मूल. यामुळे नेहमी जो तो मला अगाखाद्यावर खेळवी तात्या तर मला घेत असत व मी त्याना फार आवडे एक दिवस ते शाळेतून घरी आले मी दारात खेळत होते. त्यांनी लगेच उचलून मला घेतलें; पण त्या वेळी त्याच्या खिशात टाक होता तो माझ्या पायात घुसला व मी किंचाळून रडू लागले. पायास रक्तहि आले तात्याना फारच वाईट वाटले; परतु आई बोलल्यामुळे तर त्याना ते अधिक लागले त्या वेळची ती टांकाच्या जखमेची खूण अद्याप माझ्या पायावर आहे. लहानपणी ती जखम पाहून कोणी हें काय लागले म्हणून विचारलें आणि आईने ती हकीकत सांगितली म्हणजे त्यांना वाईट वाटे. त्याच्या मृत्यूच्या अगोदर दोन दिवस आम्ही सर्व दुपारीं जेवावयास बसलों असता हीच गोष्ट तात्यानी कशावरून तरी बोलणे निघाले असता मुलास सांगितली.

(४) एक दिवस माझ्या आईने मला पुष्कळ मारले म्हणून मी मोठ्या-मोठ्याने रडत उभी होतें. इतक्यात तात्या घरीं आले. त्यांनीं मला उचलून घेतलें व ते आईलाच पुष्कळ बोलले व म्हणाले, "काकी, ही काही तुझ्या एकट्याचीच नाहीं समजलीस, आम्हां सर्वांचीच आहे. तिला अशी मारत जाऊ नको गडे. तिला असें मारू लागलीस म्हणजे माझ्या काळजात कसेसेंच व्हावयाला लागते बुवा !"

(५) माझें लग्न अगदीं लहानपणी म्हणजे मी पाच वर्षांची असतानाच झाले. सतराव्या वर्षी मी माहेरीं परत आले. पहिल्या प्लेगच्या दिवसांत माझ्या सासरची सर्व मडळी म्हणजे पति, सासू, नणद अशी गेली. फक्त मामजी म्हातारे तेवढे राहिले होते. वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत मी सासरीच होते. पुढे मामजीहि वारले म्हणून मी कायमची माहेरीं राहण्यास आले. त्या वेळी तात्याच मला मिरजेस येऊन पुण्यास घेऊन आले. माझ्या मामंजींनी वारण्याआधी घराची सर्व

व्यवस्था केली. त्यात मला फक्त पांचशे रुपये दिले व बाकी घरदार सर्व लेकीच्या नावाने करून टाकलें. त्याचा साहजिकच मला फार राग आला होता पुण्यास आल्यावर एक दिवस बोलत असताना मी रागाने म्हटले, "म्हातारड्याने मला कांहीं एक ठेवले नाही " पण तात्याना मी सासऱ्याबद्दल उच्चारलेले शब्द बिलकूल आवडले नाहीत व ते रागाने मला लगेच म्हणाले, "खबरदार असला शब्द पुन्हा तोंडातून काढशील तर – असे शब्द बोलू नयेत."

( ६ ) पुण्याच्या घरात मनमोकळेपणाने हसणारी, धिंगाणा घालणारी माहेरवाशीण म्हणून मी प्रसिद्ध आहे व अखेरपर्यंत तात्याच्या समोरहि तो माझा हक्क मी "सदर परवानगी " असल्यासारखा बजावीत आलें आहें. तात्याच्या मृत्यूपूर्वी अवघ्या दोनच दिवसांची गोष्ट आहे व तिची आठवण होऊन आतां मला चटका लागला आहे. त्या दिवशीं अगदीं सकाळी आम्ही बायकामंडळी स्वयपाकघरात भाजी वगैरे चिरीत बसलो होतों. इतक्यात नेहमींच्या परिपाठाप्रमाणें रात्री स्वतः आपल्या हाताने वर नेलेला पाण्याचा तांब्या स्वयपाकघरात घासण्याच्या जागीं ठेवण्याकरितां तान्या घेऊन आले व खाली वाकले. थंडीचे दिवस असल्यामुळें त्यांनीं धाबळीची गोंड्याची माकडटोपी डोक्याला घातली होती. ती पाहून मला इतके अनिवार हसू लोटले की, सागता सोय नाही. तेव्हा तात्याना कळेना व ते काय काय म्हणून हसत चौकशी करू लागले. तेव्हा मी सांगितले, दुसरे काही नाही; तुमची ही गोंड्याची टोपी बघितली म्हणून हसू आले इतकेच. त्यावर ते लगेच हसत म्हणाले, हात्तिच्या ! येवढेच ना ? नुसती टोपीच काय घेऊन बसलीस ? ही पहा जुन्यासारखी मी बाराबंदीसुद्धा अंगात घातली आहे, असे म्हणून त्यांनी शालजोडी दूर करून दाखवली व ते हसत हसत बाहेर निघून गेले.



## डॉ. कमलाबाई देशपांडे

( पीएच्. डी., प्रिन्सिपॉल; तात्यासाहेबांची कन्या, पुणे )

( १ ) उभ्या जन्मांत तात्यानी कधी घरात एखादा दागिना करून आणलेला अगर त्यांत लक्ष घातलेले आठवत नाही. पण एकदा त्यानी एकदम एक नथ आणवून सर्वांना आश्चर्यचकित करून सोडले.

१९४३ साली जिमखान्यावरील आमच्या बंगल्यात चोरी झाली व त्यांत ताईची नथ चोरीला गेली. देवपूजेच्या वेळी नथ नाकात घालावयाचा तिचा नेम असे व त्यामुळे ती नेहमी देवघरांत असे. त्या दिवशी ती स्वयपाकघराच्या कपाटांत राहिली व चोरीहि नेमकी त्याच दिवशी होऊन त्यांत नथ चोरीला गेली. त्यामुळें सर्वांनाच हळहळ वाटली; पण त्यात नथ गेल्याने जरा विशेष वाईट वाटले. ताई-

लाहि अर्थात् वाईट वाटलेच. पण अशा गोष्टीबद्दल हळहळत बसण्याची अगर मनस्ताप करून घेण्याची तिची वृत्ति नाही. आपला योग असतो तोवर वस्तु आपली असे म्हणत नाकावर नथेऐवजी कुकवाचे बोट टेकून तिने देवपूजा केली. ‘ जिन्नस असे कसे बाहेर ठेवले ? ’ म्हणून तात्या रागवावयाचे ते रागावणार, पण ते मुळींसुद्धां काहीं म्हणाले नाहीत, याचेच तिने सर्वांना कौतुक करून सागितले. तिचे नित्यक्रम नेहमींच्या शात व प्रसन्न मनाने चालू झाले. घरात मी त्या वेळी आजारी निजून होते. मलाहि राहवेना. ताईने मनाला लावून घेतले नाही तरी पूजा करताना नाकात नथ असावी अशी तिची एक प्रकारे धार्मिक श्रद्धा मला माहीत; आणि दागिना करून द्या असे न म्हणण्याची तिची पद्धत त्याहून माहीत. तेव्हा मींच एक नथ दुसऱ्या दिवशी विकत आणली व तिला दिली तिसऱ्या दिवशीं नवी नथ घालून ती देवपूजेला बसावयास व तात्या आघोळ करून देवघरात यावयास एक गाठ पडली, “ ही नथ कुठली ? ” त्यानी हसत विचारले.

“ ही आक्काने मला विकत घेऊन दिली. ” ताईने सागितले.

“ आता मी पण गमत सांगतो, ” तात्या म्हणाले; “ मीहि पण एक नथ मागविली आहे. माझा विचार होता की, नथ आल्यावरच देऊन मग सागावयाचे. पुण्यात मी दातारांना निरोप धाडला असता तर तुम्हाला कळले असते तुम्हा सर्वांना एकदम नथ दाखवून मला आश्चर्यचकित करावयाचे होते म्हणून मी मुंबईस लिहिले आहे. एकदोन दिवसात नथ येईल तू काही दागिना मागावयाची नाहींस म्हणून म्हटले आपणच द्यावा.”

सर्वच मडळी हसू लागली. कारण एक नथ चोरीला गेली पण दोन नथा मिळाल्या ! ‘ न मागे तयाची रमा होय दासी ! ’ हेच खरे.

( २ ) कै. ती. तात्याच्या स्वभावातील एक वैशिष्टय म्हणजे शक्य तेवढी दुसऱ्याची सोय पाहण्याची वृत्ति. मला आठवतें तसे आमचे घर म्हणजे सल्लामसलतीचे मुक्तद्वार. कोणीहि केव्हांहि यावे व आपली अडचण सागून त्याबद्दल सल्ला विचारावा. गावात राहत होतों तेव्हा व जिमखान्यावर आलो तेव्हांहि हीच पद्धत कीं, आलेल्या माणसाला तिष्ठत न ठेवता काम ऐकून घेऊन आपले मत सागून मोकळे करणें. अलीकडे दुपारी दोन तास ते झोपत; तेव्हा मात्र कोणीहि आलें तरी त्याना झोपेतून उठवावयाचे नाही असे धोरण असे. पुष्कळदा पानावर भात वाढला असला तरी चटदिशी उठून बाहेर बोलावयास जात व पानात वाढलेला भात काढून झाकून ठेवण्याची वेळ येई. स्वतःचे जेवण थोडे उशीरा झाले तरी चालेल, पण लाबून चालत आलेल्या माणसास तिष्ठत ठेवणे हे त्याना सकट वाटे. अलीकडे शेवटी महिना दीड महिना त्याची प्रकृति बरी नव्हती. मध्यतरी आठ-दहा दिवस

तर ते नुसते ताकावर होते. पण अशा वेळीहि जरा हुशारी वाटली कीं, पुनः उठून काम करण्याची वृत्ति बळावे. याच उपासाच्या दिवसांत एक दिवस भांडारकर इन्स्टिट्यूटमधून चिठ्ठी आली की, भांडारकर स्मृतिदिनाचे नियोजित अध्यक्ष येऊ शकत नाहींत, तेव्हा तुम्ही याल काय? त्यांनी होकार दिला व दोन दिवसात थोडी पुस्तके आणून 'कौटिलीय अर्थशास्त्रा'वर अध्यक्षीय भाषण केले. व्याख्यान माहितीपूर्ण व परिणामकारक झाले व व्याख्यान ऐकण्यास गेलेल्यांना ते आजारी आहेत, ताकावर आहेत, असे मी सागितले तेव्हा आश्चर्य वाटले.

( ३ ) या दिवसात काही वेळां ते मला सागत की, "आक्का, तू मधल्या हॉलमध्ये वाचीत बसतेस; तेव्हा कोणीहि आले तरी त्याना सांग, मी भेटू शकत नाही, आजारी आहे." पण हा नियम अमलात आणीपर्यंतच मोडण्याची वेळ येई! त्याना जरा विश्रांति मिळून हुशारी वाटली की, तेच आल्यागेल्याचा आवाज ऐकला की उठून माडीच्या दाराशी येत. एके दिवशी दुपारी रा. रा. बाबासाहेब साळवेकर व जगन्नाथमहाराज घरी आले. तात्यानी नुकतेच मला सांगितले होते की, "कोणीहि आले तरी त्याना मी भेटत नाही म्हणून साग!" पण बाबासाहेब मुद्दाम मुबईहून आलेले; म्हणून मी थोडी विचारात पडले व ताईला भेटण्यासाठी त्याना थाबवून घेतले येवढ्या वेळात तात्याना थोडे बरे वाटून ते उठून बसले होते व खाली बाबासाहेबाचा आवाज ऐकताच माडीच्या दारात येऊन त्यानी बाबासाहेब व जगन्नाथमहाराज यानाच वर हाक मारली व पुढे सभाषण सुरू झाले!

( ४ ) त्यानतर पुन्हा एके दिवशी त्यानी मला दुपारी हाक मारली व सागितले की, "मी आता झोपतो कोणीहि आल तरी मला बरे नाहीं, मी भेटत नाहीं असे साग" सुमारे एक तासाने रा बाबुराव भडभडे आले. डॉ ॲनिबेझंट याचा जन्मशताब्दि उत्सव एक ऑक्टोबरला होता. त्यानिमित्त काही काम होते. रा. भडभडे याना तात्या आजारी असून झोपले असल्याचे मी सागितले व त्यानी सध्याकाळी पुन्हा येण्याचे कबूल केले. सरासरी अर्धा तास गेला नाही तोच अहिल्याबाई होळकर कन्याशाळेकडून टागा आला कशासाठी आला हे मला माहीत नव्हते. म्हणून तात्याना जाऊन सागितले की, टांग्याला परत पाठविते. तोपर्यत त्याना हुशारी वाटू लागली होती निरोप ऐकताच ते म्हणाले, टांगा परत नको पाठवू. मी जाऊन येतो व उठून लागलीच कोटच अगात घातला. मला असेहि सांगवेना की, मी भडभड्याना तुम्ही आजारी म्हणून सागितले आहे. त्यासाठी तरी तुम्ही आता बाहेर पडू नका. मी आपली मनातल्या मनात म्हणत होतें की, आता त्याची व भडभड्याची रस्त्यात गांठ न पडो व माझ्याकडे खोटेपणा न येवो म्हणजे झाले!

भाद्रपद महिनाभर त्यांची प्रकृति कांही ना कांहीं कारणाने क्षीण होत होती. त्यांतच थोडे बरें वाटले व मधलें उपोषण सोडून दसऱ्याच्या दिवशी ते प्रथम मुलांबरोबरच दुपारीं जेवले ते दिवाळीच्या दिवशीं दुपारपर्यंत दुखणें कांहींच नव्हते व जरा हुशारी वाटली कीं जातीच्या तापटपणानें हिंडून काम करू लागत. त्यामुळें इतरांना त्याच्या क्षिणपणाची खरी कल्पना आली नाही. त्याना मात्र स्वतःच्या क्षीण होणाऱ्या शक्तीची कल्पना येऊन मृत्यूची चाहूल लागली असावी; पण शेवटच्या क्षणापर्यंत स्थितप्रज्ञाप्रमाणें व्यवहार करून त्यानी शेवटचा निरोप लिहून ठेवला!



## काशिनाथ नरसिंह केळकर

( तात्यासाहेबांचे ज्येष्ठ चिरंजीव, ॲडव्होकेट, ज्योतिर्विद व चित्रकार, पुणें )

( १ ) तात्याची अलीकडची वृद्धापकाळची अवस्था पाहून मला नेहमीं त्यांच्या आईची आठवण होई. ती त्यांच्याच सारखी गोरवर्ण व प्रसन्नचित्त होती. सतत काम करीत राहणे हा तिचा गुण तात्यांनी उचलला होता. जुन्या काळच्या ती पुष्कळ गोष्टी सागत असे. आजोबाना आम्ही दादा म्हणत असू व आजीला 'आई' म्हणत होतो. १८९७ साली पुण्यास प्लेग होता तेव्हा पुष्कळ माणसें सामान-सुमान टाकून भीतीने पुणे सोडून गेली. दादा व आई मिरजेस निघाली होती व तात्याना केसरीच्या कामामुळे येथेंच राहणे प्राप्त होते. त्या वेळी त्याचे वय अवघें पंचवीस वर्षांचें होते व आई मिरजेस जाणार म्हणून ते तिला स्टेशनावर पोचवावयास गेले होते. स्टेशनावर गर्दी कोण होती व सामानसुमानाचा खच पडला होता. आईशेजारीं कोणी एक बाई बसली होती, तिच्याशी तिचे सहज बोलणे सुरू होते. तात्यांच्या हुशार, तेजस्वी, तरुण मुद्रेकडे बाईने पाहून विचारलं, " हा मुलगा का तुमचा ? " आई म्हणाली. " होय; हा मला पोचवावयाला स्टेशनावर आला आहे. "

" तो नाहीं का तुमच्याबरोबर येणार मिरजेला ? " बाईनें विचारलें.

त्यावर आईने सांगितले, " त्याच्या कामाकरिता त्याला इथेच राहावयाचे आहे. "

सारे पुणे भीतिग्रस्त असता हा मुलगा पुण्यातच राहणार, याचे त्या बाईला फार कौतुक वाटलें व आईला ती म्हणाली, " लोक पुण्याबाहेर जातात ते सारी चीजवस्त, सोने, रुपे बरोबर घेऊन जातात तुम्ही मात्र हे 'सोने' मागे ठेवून जात आहांत ! "

आई यावर काय म्हणणार ? ती हसून म्हणाली – " होय. असे तर खरेच ! "

( २ ) आईचा सहवास तात्याना दीर्घकाळ लाभला. ते परम मातृभक्त होते. आईनें आपणाकरिता किती कष्ट पूर्वी केले हे ते जाणत होते. तात्याचा हिंदुस्थान-भर लौकिक होत असलेला पाहून तिला धन्यता वाटे. तात्या कोठेहि बाहेरगांवीं गेले तरी तिला कधीहि सागितल्याशिवाय जात नसत व अमुक दिवसानी परत येईन असें सागत त्यात बहुधा एक दिवसाचाहि उशीर करीत नसत. १९२६ सालीं ती अगदी थकली. तेव्हा बहुतेक हा तिचा शेवटचा आजार असे समजून परगा-वच्या सर्व कार्यक्रमाना नकार देऊन तात्या पुण्यातच राहिले. कलकत्त्याला त्यावेळीं ऑल इडिया कॉंग्रेस कमेटीची सभा होती व काही कारणाने सरकारने पंडित मालवीय यांवर बदीची नोटीस बजावलेली असताहि, सरकारी हुकुमाचा भग करून मालवीय सभेला हजर राहिले. आईच्या आजारामुळे तात्यानी दुसरी कोठलीहि गोष्ट मनावर घेतली नाही. शेवटी अखेरचा क्षण आला तेव्हा झटकन् पुढे होऊन तात्यानी आपली मांडी दिली, तेव्हा आईने प्राण सोडला ! तिचे वय झाले होते हे खरें; पण समोर दिस-णारी 'आई' नाहीशी झाली याचे दुःख त्याना जाणवलें, पण ते आवरून दुसऱ्याच दिवशी ते तावडतोब कलकत्त्याला रवाना झाले ! इतकी त्याची कर्तव्यनिष्ठा जबर होती. त्यावेळी टाईम्सच्या बातमीदाराने Mr. Kelkar proceeded to Calcutta, in spite of his mother's death " असे यथार्थ उद्गार काढले होते.

( ३ ) राजकारणात पुष्कळदा शत्रूचे मित्र होतात, मित्रांचे शत्रु होतात. मित्रातहि प्रामाणिक मतभेद इतके होतात की, खासगी मैत्री कितीहि दृढ असली तरी त्यावर थोडा तरी परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. याबद्दल विलायतेंतील फॉक्स व बर्क याचे उदाहरण प्रसिद्ध आहे. मोतिलाल नेहरू यांच्याशी तात्यांचा विरोध आला तेव्हा त्यानीच त्याला कृष्णार्जुनयुद्धाची उपमा दिली होती. पण कृष्णार्जुनाइतके नेहरूशी त्यांचे स्नेहसंबध केव्हाच नव्हते; पण श्री. बापुजी अणे कॉंग्रे-सच्या वार्किंग कमिटीत गेल्यामुळें मात्र कृष्णार्जुनयुद्ध खरे जुंपण्याची वेळ आली ! हा मतभेद तात्याना फार जाणवला असं त्यावेळच्या केसरीच्या अग्रलेखांवरूनहि दिसून येईल. १९३३ साली मुबईस मी प्रभातचा सपादक होतो. त्या वेळी तात्यांना भेटावयास सरदारगृहात गेलो होतो. त्या वेळी उमरावतीचे बामणगावकर, नागपूरचे गोपाळराव ओगले वगैरे मडळीहि तेथे आली होती. बापूजी अणे याच्याबद्दलच गोष्टी निघाल्या होत्या थोडेसे हसून बामणगांवकरांना तात्या म्हणाले, " बापूजी अण्यांशी आमचा मतभेद झाला, यापेक्षा आता जगांत कांहीं शिल्लक आहे का ! त्यांचें मन तुम्हांला वळवता आलें तर तुम्ही जरूर खटपट करून पाहा; पण वर्किंग कमिटीची जागा बापूजींनी प्रथम सोडली पाहिजे. तेथेच सारा खटका आहे ! त्यांनीं

वर्किंग कमिटीची जागा सोडली म्हणजे बापूजी पुनः आमच्याकडे येण्याला काहीच प्रत्यवाय नाही !"

(४) १९३२ सालीं म. गांधींनी मंदिरप्रवेशाची चळवळ चालविली होती, तेव्हां ते नुसतेच मोघम बोलत मंदिर-प्रवेश म्हणजे काही गाभाऱ्यात प्रवेश नव्हे किंवा देवतेच्या मूर्तीला स्पर्श करण्याचा हक्क नव्हे ! कारण असे झाले म्हणजे भांडणे होऊन रक्तपातापर्यंत मजल जाईल याकरिता ही गोष्ट स्पष्ट करून त्यांनीं 'समर्याद' विधान करावें, म्हणून मी महात्मा गांधींना एक पत्र लिहिलें होतें. त्याला त्यांनीं स्वहस्ताने ।५ ' ।७ उत्तरहि पाठविले. यावेळीं गांधी येरवड्याच्या तुरुंगांत होते व फक्त हवी ती सामाजिक चळवळ करण्याला (अर्थात् तुरुंगात राहून) त्याना सरकारने परवानगी दिली होती एक दिवस गांधीजींनी तात्यांना भेटण्याची इच्छा दर्शविली, म्हणून मीहि त्याच्याबरोबर येरवड्याच्या तुरुंगांत गेलो होतो. उन्हाळ्याचे दिवस असल्याने एका आम्रवृक्षाच्या छायेत गांधीजी उघड्या अंगानें बसले असून शेजारा महादेवभाई देसाई या मुलाखतीचें प्रत्येक अक्षर लिहून घेत होते. गांधींनी तात्याशी बोलताना "You are my enemy" असें उपरोधिक विनोदान पहिल्या दोन-चार वाक्यातच म्हणून, या सामाजिक कार्यात तुमचें मला सहकार्य पाहिजे अशी विनती केली. गांधीचे हे शब्द तात्यांना आवडले नाहींत; पण फक्त ते मुद्रेने दर्शवून तात्यांनी संवादाला सुरवात केली. आणि व्यावहारिक तोड म्हणून असे सांगितले की, मंदिर-प्रवेश हवा खरा; पण अस्पृश्यानाच नव्हे तर सर्वांनाच तो हक्क समर्याद असावा. मंदिरात गाभाऱ्याच्या समोर मूर्तीचे दर्शन घेता येईल अशी कोठे तरी एक सीमारेषा मानावी; तेथूनच सर्वांनी दर्शन घ्यावे गाभाऱ्यात कोणीच जाऊ नये !" गांधींना ही तडजोड पसंत पडली. नंतर माझ्याकडे वळून गांधी विनोदाने म्हणाले, "तुमच्या काशीनाथानेहि पत्रात मला असेच लिहिले आहे ! मग विचाराची उसनवारी तुम्ही त्याची केली की त्याने तुमची केली ?" यावर तात्यानी सांगितलें, "मी त्याचे विचार उसने घेण्याचे काय कारण ? सार्वजनिक आयुष्यात त्याच्यापूर्वी किती तरी वर्षें मी आधी आलो आहे. उसनवारी असली तर त्यानेच माझी केली असेल !" अशा प्रकारे सुमारे तासभर मुलाखत होऊन म्हणजे त्यात काही चिमटे, काही हास्यविनोद होऊन आम्ही निघून आलो !

(५) सन १९२४ साली ती. तात्याना दे. ब. दास याच्या सांगण्यावरून सुभाषचंद्र बोस यांनी एक पत्र पाठविले. तात्यांनी ते वाचल्यावर स्वतःजवळ ठेवण्याकरिता मी ते त्यांच्यापासून मागून घेतलें. ते पत्र विशेष महत्त्वाचे वाटल्यावरून मूळ अस्सल इंग्रजींत असलेलें ते पत्र खाली देत आहे.

CORPORATION OF CALCUTTA,

Municipal Office, 9–8–24.

My dear Mr. Kelkar,

Deshbandhu is down with colic pain and cannot write to you himself He has therefore asked me to write this letter to you.

As far as we have been able to judge, you probably dislike the idea of this corporation giving an address of welcome to Mr V J Patel, and your declining the address is probably due to that reason Mr Patel's activities in Bombay and his attitude [illegible] Mr Jayakar and other stalwarts of our party have no doubt antagonised you along with all other Swarajists in India But we beg of you to look at the question from the point of view of the Calcutta Corporation This Corporation is no doubt dominated by the Congressmen and particularly by Swarajists. But I desire to point out that there are Congressmen who are not Swarajists, and there are other members of the Corporation who are not Congressmen at all The proposal to present an address to Mr Patel was due, not to his activities as a Swarajist, but to the fact that he is the president of the Bombay Corporation I can assure you that if Mr. Patel had not happened to be the president of the Bombay Corporation, the address would not have been presented to him. You probably know that the resolution to present an address was passed without a single dissentient voice, and in proposing the names of the leaders the reasons were given in each case Calcutta and Bombay are sister corporations, and Mr Patel by virtue of his office alone, managed to get in the list to whom addresses would be presented Mr. Patel's attitude towards the Swaraj Party is a matter which affects us and not the public in general to the same extent. We could not therefore oppose the idea of giving him the address of welcome on account of his anti–Swarajist activities.

You will realise no doubt that the capture of the Calcutta Corporation has been like capturing the citadel belonging to the enemy. We are out to create a new tradition by offering welcome, not to the Governor or any governmental official, but to the representatives of the people This departure from the track is being looked upon with a critical eye by all our enemies abroad including the Government If you and Pandit Neheru decline to receive the address, the ceremoney will be a failure, and may have to be dropped, though we have already proceeded too far in making arrangements If this proposed ceremoney turns out to be a hoax, we shall stand humiliated before the public of Calcutta and the Government I hope you will spare us this humiliation since you have no desire to put us into a difficult or an awkward position If you look at the situation from the point of view of the Calcutta Corporation, you will not decline to receive the address

I am treating your telephonic message to me as a private one and I am writing this to you on behalf of Deshbandhu, myself and our party here, to reconsider your decision and finally agree to receive the address. If you agree I shall tear into pieces the wire you have already sent declining the welcome. At present hardly any one in my office knows about your decision.

We may if you so desire, present a seperate address to Mr Patel on another day. But you and Panditji must accept our welcome. It is for you to consider whether we should make a separate arrangement for Mr. Patel – But we must have *you* in any case.

Let us, Mr. Kelkar, be charitable to our enemies. What, after all, do we lose if we present an address to the president of the Bombay Corporation? Nobody knows more than Deshbandhu himself about Mr. Patel's × × × activities; but still Deshbandhu has taken up an attitude which I consider to be in

keeping with the lofty principles of the party to which we are all proud to belong.

Please send a reply to this by wire, and on behalf of Deshbandhu and our party here, I again request you to agree to accept the address of welcome. If you agree, you need not refer at all to the wire you have already sent. With best regards.

Yours sincerely,
( Sd. ) SUBHAS C. BOSE.



## यशवंत नरसिंह केळकर

### ( बी. ए , तात्यासाहेबांचे कनिष्ठ चिरंजीव, उपसंपादक केसरी, पुणें )

( १ ) आमच्या लहानपणी आम्हा मुलाना पर्वणीसारखे दिवस वाटावयाचे ते म्हणजे उन्हाळ्यातील मे महिन्याच्या सुटीचे. कारण त्यावेळी वसत व्याख्यानमाला, नाट्यसमेलन, इतिहासमंडळाचे समेलन वगैरे बाबी असत व बहुधा त्या काळात परगावचे अनेक नामांकित पाहुणे घरी उतरावयास येत किंवा तात्याना भेटावयास येत. यापैकीं श्री. कृ. कोल्हटकर, वासुदेवशास्त्री खरे व गो. स. सरदेसाई हे तर एकदा तरी एकत्र मिळून भोजनास यावे असे ठरलेलेंच असे व तो दिवस तात्याचा त्याच्यासाठींच जवळ जवळ काढून ठेवल्यासारखा असे. त्याची मनमुराद सभाषणे चोरून तासनूतास ऐकत आम्ही बसत असू. या वेळचा एक प्रसग आम्ही त्या वेळी गायआळींतील जुन्या घरी राहत होतो माजघरांत पाने माडली होती. माडीवरून माजघरात येण्याचा जिना अरुद असून पायऱ्यावरच्या फळया फार गुळगुळीत झाल्या होत्या भोजनास झाले म्हणून कळल्यावर चौघेंहि म्हणजे तात्या, सरदेसाई, कोल्हटकर व खरेशास्त्री खाली आले. खरेशास्त्री सर्वांत मागून येत होते. जिना अरुद व कांहींसा अंधेरा होता. खरेशास्त्र्यांचा पाय पहिल्याच पायरीवरून निसटला व ते अलिकडे क्रीडागणावर मुलांकरिता घसरगुड्या केलेल्या असतात त्यावरच्यासारखे शेवटच्या पायरीवर येऊनच थांबले! शास्त्रीबोवा वृद्ध व अगाने स्थूलहि होते यामुळें सर्वजण घाबरून धावत जिन्याशीं गेले. सुदैवानें शास्त्रीबोवाना इजा काहीच झाली नव्हती. तो लहानसा अपघातच टळला व मग शास्त्रीबोवासुद्धा सर्वचजण कोट्या करून हसूं लागले. इतरांच्या कोट्या ऐकल्यावर तात्यानीं कोटी केली, ती अद्याप स्मरते. ते म्हणाले, "जाऊं द्या. आज खैर झाली. आतां त्या बिचाऱ्या जुन्या जिन्यावर उगाच घसरू नका."

(२) आमच्या केसरींतील एकवेळचे सहसंपादक श्रीयुत मा. प. सोमण यांच्या घरीं कांही लग्नकार्य झाल्यामुळें त्यानीं तात्या, बाबा विद्वांस व केसरीच्या संपादकवर्गातील सर्व स्टाफचे लोक यांना जेवावयास बोलावले होतें. अर्थात् ती सर्व खाशांची स्पेशल पंगत असल्यासारखीच होती. जेवतांना बाबूराव गोखल्यांनी नेहमींच्या पद्धतीप्रमाणे आपण अगदी साधेभोळे आहो, असा भाव आणून बाबा विद्वांसाची वर्मे काढलीं व चिमटे घेतले पण बाबा विद्वांस बाबूरावाचे बारसे जेवलेले आणि फटकळपणे समर्पक पण ग्राम्य दृष्टांतहि बोलण्यास न भिणारे; यामुळे त्यांनीहि बाबूरावाच्या डावावर भराभर तोंडी करून दाखविल्या. अर्थात् सर्वच प्रकार विनोदाने हसतखेळत चालला होता असो; जेवण झाल्यावर आचवून मंडळी पानसुपारीच्या शोधास लागली पण तिची व्यवस्था खाली होत होती; यामुळे बऱ्याच जणानीं व तात्यानींहि कपडे चढविण्यास सुरवात केली. तेवढ्यात कोणीतरी मोठ्याने म्हणाला, "अरे! पानाचे तबक दिसत नाही कोठे! मग मुखशुद्धीला काय?" त्या वेळी तात्या गमतीने लगेच म्हणाले, "आम्हांला मुखशुद्धीची तितकी आवश्यकता नाही बाबाचे मात्र पाहा" तेव्हा तेथे मोठा हशा पिकला. बाबाचा अहोरात्र गडीमाणसाशी प्रसंग पडावयाचा व त्यामुळे त्याच्या पेशाला अनुरूप अशी भाषा त्याच्या तोंडी अगदी बद्धमूल झालेली असे त्याला अनुलक्षून तात्यानी विनोदाने ती मुखशुद्धीची कोटी केली होती.

(३) मोठेपणी स्वतःच्या वडिलाचा लौकिक निरनिराळ्या तऱ्हानी प्रतीत झाला तर त्याची बरोबर चिकित्सा करण्याइतके ज्ञान व समजूत वाढलेली असते, परंतु लहानपणी असा एखादा प्रसंग घडला म्हणजे आश्चर्य वाटते याबाबतचा माझा एक अनुभव पुढीलप्रमाणे आहे. मी बारा वर्षांचा असताना दक्षिण आफ्रि- तील गांधीच्या लढ्याकरिता स्वयंसेवक म्हणून घरोघर फिरून वर्गणी जमा केली होती. त्या वेळी नामदार गोखल्याचा पुतण्या विष्णु माझा जोडीदार होता प्लेगमुळें आम्ही झोपड्यात राहत होतो. यामुळे तो आमचा तेथला आळीकर म्हणून दोस्त झाला होता. मला वाटते आम्ही दोघानी दररोज रस्तोरस्ती हिंडून महिन्या दोन महिन्यात तीन-चारशे रुपये तरी सहज मिळवून दिले होते. सर्व्हंट ऑफ इंडियाचे सि. एस्. देवळे हे आम्हाला सह्या करून पावतीपुस्तके देत व दर दोन दिवसानी सायंकाळीं आम्ही सोसायटींत जाऊन जमलेल्या रकमेचा भरणा करीत असूं. सि. एस्. देवळ्यांना आमचे फार कौतुक वाटले व तें त्यानी तात्याच्याजवळ बोलूनहि दाखविलें.त्या दिवशी तात्यांनी आमच्या कामाची चौकशी करून हासत मला शाबासकी दिल्याचे चांगलें स्मरते. यानंतर मला वाटतें, इंग्रजी तिसरींत किंवा चौथींत असतांना पुण्यात स्मशानफंड जमविण्यास प्रथम सुरुवात झाली. त्या वेळींहि मी स्वयंसेवक म्हणून पुष्कळ दिवस काम केले. या फंडाचा भरणा श्री. ज. स. करंदीकर याजकडे करावा लागे, तेव्हा त्यांची माझी प्रथम ओळख झाली. त्यांनीहि माझे कौतुक केलें. या

वेळच्या स्वयसेवकपणांत दत्तु बरवे आता बी एजी, विठ्ठलराव बरव्यांचा पुतण्या, हा माझा जोडीदार होता याहि वेळी प्लेगमुळे आम्ही झोपड्यातच राहत होतो. सार्वजनिक फड मागताना स्वयसेवकाना किती विविध व विचित्र अनुभव येतात त्याचा प्रत्यय त्या वेळी मला प्रथमच भरपूर आला. त्या वेळी आम्ही थोडेसे जाणते असलो तरी १४–१५ च वयाचे कोणी स्मशानफड वर्गणी नाकारली तर या मनुष्याला मरण येऊन त्याची फजिती व्हावी म्हणजेच त्याला समजेल अशी आपसात आम्ही त्याची टिंगल करावी रामनारायण बगल्याशेजारी एका मराठा पाटलाची झोपडी होती आम्ही त्याच्या बागेत शिरलो व त्यास पत्रक देऊन याचना केली. तेव्हा त्याने शिव्या हसडून आपल्या कुत्र्यासच आमच्या अगावर छू म्हणून सोडले ! तेव्हां अक्षरशः भीक नको पण कुत्रा आवर अशी आमची स्थिति झाली होती असो. याच सुमारास आम्ही दुपारी ११–११॥ वाजता सध्या एल् जे आपट्याचा बगला आहे तेथे असलेल्या ब्राह्मणाच्या झोपड्यात वर्गणी मागत हिंडू लागलों. एका झोपडीत शिरलो, त्या गृहस्थांनी पत्रक वाचले परतु आमची आधी खूप हजेरी घेतली. सध्या विद्यार्थी फार उनाड व चोरटे झाले आहेत, वगैरे उपदेशाचा मोठा थोरला डोस त्यानी आम्हाला पाजला त्यावर आम्ही आमचे मिळविलेले आकडे दाखविले व म्हटले चारदोन आणे दिलेत तरी चालतील त्याबरोबर ते फारच उसळले व म्हणाले फार फाजील पोरे दिसतात ही नाव काय तुमचे, कोणत्या शाळेत शिकता वगैरे त्यानी विचारले मग मला माझे सबध नाव सागावेच लागले त्याबरोबर मात्र तो गृहस्थ एकदम नरमच आला व चकित झाल्यासारखा विचारू लागला, तू नरसिंह चिंतामण केळकराचा, तात्यासाहेबाचाच मुलगा ! मग हे आधी का सागितले नाहीस ? झालेल्या प्रकाराने जणू काही आपल्या हातून मोठी वाईट गोष्ट घडली असेच त्या गृहस्थास खचित वाटले व परिणाम असा झाला की, त्याच गृहस्थानीं स्वतः आमच्याबरोबर २५–३० ठिकाणी येऊन अर्ध्या पाऊण तासात रोख ३०–४० रु वर्गणी मिळवून दिली ! त्या दिवशी तात्याच्या लौकिकाचा असा परस्पर प्रत्यय आला. घरी आल्यावर हा अनुभव ऐकून सर्वांनाच मौज वाटली हे गृहस्थ म्हणजे सध्या पुणे येथील गाजणारे सर्जन बडोपत घारपुरे याचे चुलते होते. ते मला अर्थातच ओळखत नसतील; परतु मी ज्या ज्या वेळी त्याना पाहतो त्या त्या वेळी वरील प्रसगाची मला आठवण होते.



## श्रीधर गोपाळ देशपांडे

**( तात्यासाहेबांचे दौहित्र, चीफ एरोड्रम ऑफिसर, सँटाक्रूझ एअरपोर्ट, मुंबई )**

( १ ) जगज्जेत्या शिकदर बादशहानें एकदा एका साधूला विचारलें कीं, "तुला काय हवे ते माग" आणि साधूने म्हणे उत्तर दिले, "माझ्यापुढे उभा

राहिल्याने तुझी सांवली अंगावर पडते, तेवढी दूर करून अंगावर ऊन पडूं दे म्हणजे झाले आणखी कांही नको तुझ्याकडून!"

देवाने तात्याना जर विचारले असेल जन्माला घालण्यापूर्वी तर त्याचें मागणे असेच कांहीं असेल की, "नश्वर जगातली महत्त्वाकांक्षा आणि ऐश्वर्य-लोलुपता याची छाया माझ्यावर पडू देऊ नको, फक्त आजन्म ज्ञानाच्या उन्हांत तळपत बसू दे." देव म्हणाला, "तथास्तु" आणि त्या आशीर्वादाचे प्रत्यंतर म्हणजेच तात्याचे जीवनचरित्र साधी राहणी नी उच्च विचारसरणी.

( २ ) तात्या साधा हिशेब पुढे मांडीत "रोज एक पानभर लिहिले तर वर्षाला ३६५ पाने होतील. म्हणजे वर्षभरात अगदीं विनासायासाने माणसाच्या हातून एकदोन पुस्तके सहज लिहून होऊ शकतील" त्याप्रमाणे त्याच्या हातून अखंड लेखन बाहेर पडे. लायब्ररीतून पुस्तकाचा भारा आणीत चांगली लठ्ठ लठ्ठ पुस्तकें. पण तीन दिवसात त्या पुस्तकांची परत रवानगी ते करीत! पुस्तक प्रथम चाळून त्यातील नेमका भाग शोधून काढायचा, आणि त्यातील ग्राह्यांश चटकन आत्मसात करायचा की झाले पुस्तकवाचन सूक्ष्म बुद्धि व उत्तम ग्रहणशक्ति यामुळें ते कोणताहि विषय चटकन अभ्यासून इतक्या सुंदर तऱ्हेने विषद करून लिहीत की, तात्या म्हणजे ज्ञानार्जनाचे शब्दशः यंत्र झालें होतें. एका बाजूने ज्ञान आत्मसात करायच की लागलीच तें पुस्तकरूपाने सर्वांच्यासाठी लिहून तयार!

( ३ ) आणखी अेक तात्याचा गुण म्हणजे त्याची प्रखर न्यायप्रियता. त्या न्यायप्रियतेने ताजव्याची पारडी ते अितकी समतोल धरत की, आपपरभाव, स्नेहार्द्रता, किंवा भाडभीड त्या तोलावर निरुपयोगी ठरत. ही न्यायप्रियता खुद्द व्यवहारातच काय, पण कल्पनासृष्टीत सुद्धा ते तितक्याच कसोशीने अमलात आणात

माझी "ठेगणे अस्मान" कादंबरी वाचल्यावर ते म्हणाले, "त्या श्रवण श्रीकांत सोहोनींने बनू आठवलेबरोबर गुजराथ मेलने अेकदा प्रवास केल्यावर त्यानें शेवटी तिच्याशी लग्न न करणें हें फार अन्यायाचे आहे कादंबरीचा शेवट ते लग्न दुसरे असलें तरी झालेले दाखवून करावा" तात्याच्या मताने त्यांतील पुष्कळ भाग मी अितक्या स्पष्टपणाने लिहिणे अुचित नव्हते. पण अितर अनेकांचा अभिप्राय मला अनुकूल पडल्यामुळे त्यांनी आपला आग्रह सोडला; तरी पण काल्पित गोष्टीतहि त्याची न्यायदृष्टि किती सूक्ष्म होती व अनीतीची कल्पनाहि त्याच्या मनाला कशी खपत नसे हें स्पष्ट दिसते.

( ४ ) बाळबोध मराठी जितक्या सुंदर हस्ताक्षरात तात्या लिहीत, तितक्याच पूर्णांशाने बाळबोध मराठी वळणाचे जीवन तात्यानी स्वतः गिरविलें पूर्वीचे बाळबोध मराठी वळण म्हणजे कसे असे, असे जर मला कोणी विचारले

तर मी तात्याच्याकडे बोट दाखवीन ते राहिले ते बाळबोध मराठी वळण. आणि तात्यांनी आजन्म ते गिरविले, त्यातच त्याच्या चारित्र्याला ज्याप्रमाणें तेज चढते, त्याचप्रमाणे एकोणिसाव्या–विसाव्या शतकाच्या सधिकालातील महाराष्ट्राच्या सत्त्व गुणानी शोभून दिसणाऱ्या, साध्या नि उच्च राहणीचे प्रतीक होणाऱ्या "बाळबोध मराठी वळणाची" हि त्यान आपोआप स्तुति होते असे नाही कां ?

( ५ ) काही महान् व्यक्ति त्याच्या राष्ट्राच्या काही विशिष्ट कालखडामध्ये मूर्तिमत प्रतीकरूप होतात दुसऱ्या महायुद्धाच्या कठीण कसोटीच्या वेळी जीवनमरणाचा झगडा करणाऱ्या इग्लडचा मूर्तिमत प्रतिनिधि म्हणजे विस्टन चर्चिल. त्याच्या मुद्रेवरचा बुलडॉगप्रमाणें दिसणारा चिवटपणा, त्याच्या भाषणामध्ये प्रकट होणारे विचार नि त्याने केलेल्या अवघड कार्याची पूर्ती यामध्ये जणूं कांहीं सारे इग्लडच त्याच्या रूपाने प्रतीत होत होतें. त्याचप्रमाणें टिळकाच्या नतरच्या कालखडाच्या महाराष्ट्राचे मूर्तिमत प्रतीक म्हणजे तात्या होते. कुणालाहि हार न जाणारी बुद्धिसपदा, जाज्वल्य देशाभिमान, बिनमिजासीपणा इतका की, तो दोषाच्या सदरांत पडावा, गरीबी आणि सत्त्वस्थपणा या महाराष्ट्राच्या साऱ्या गुणावगुणाचे प्रतिबिंब तात्यामध्यें होतें. महाराष्ट्राच्या राजकारणांतील बुद्धिप्रामाण्याचा वाद, पण प्रत्यक्ष स्वातत्र्याच्या लढ्यामध्ये इतरांशीं सहभागी होण्याची गर्दी–आपल्याला न आवडणाऱ्या मार्गानेंहि–ही तात्यांच्या महाराष्ट्राची मनःस्थिति होती. तात्या गेले त्या वेळी महाराष्ट्राला ही जाणीव झाली.



## गंगाधर नीलकंठ गोखले
### ( प्रिन्सिपॉल, सागली इंजिनियरिंग कॉलेज )

डॉ. बेझट बाईच्यासारखी आयरिश वृद्ध बाई आपल्या हिंदुस्थानकरिता इतका जीव टाकते व आम्ही हिंदभूमीचे सुपुत्र ऐषारामांत लोळत असतों याचे मला फार वाईट वाटून मी माझी नोकरी सोडण्याच्या विचारांत होतो. तेव्हां या बाबतींत तात्यासाहेब यांचा सल्ला घ्यावा म्हणून मी त्यांच्याकडे गेलों व म्हणालो, "तात्यासाहेब, काय करू सांगा." ते म्हणाले, "नोकरी सोडल्याखेरीज देशसेवा करता येते. पोटाची सोय असल्याखेरीज कांहींहि कार्य करतां येत नाहीं व त्यामुळेंच पुढें देशभक्त फंडगुंड बनतात. नोकरी सोडणे फार मोठी चूक होईल." हा त्यांचा अनुभवाचा सल्ला मला पटला व अखेर त्याचा माझा असा तहनामा झाला की, मी दरमहा निदान शभर रुपयाची आजन्म तरतूद कुटुबपोषणार्थ करून त्याना दाखवावी व मग त्यांनीं आपली हरकत मागें घ्यावी. याप्रमाणें १९१७ मध्यें केलेला हा करार मीं १९२८ सालीं पेन्शन घेऊन पुरा केला. या-

प्रमाणें मला त्यानी मोठ्या चुकीपासून परावृत्त केले माझ्या हातून जर काही कार्य आज होत असेल तर त्याचे श्रेय कै. तात्यासाहेबासच आहे. अशी माझी श्रद्धा आहे.



## सरस्वतीबाई पेंडसे

### ( तात्यासाहेबांच्या नातेवाईक, पुणें )

( १ ) माझे वडील कै. ती. गणेश अनत ऊर्फ भाऊसाहेब लेले, बी ए, हे ती. कै तात्यासाहेब केळकर याचे थोरले बधु, कै ती. नानासाहेब याचे चागले स्नेही होते; डेक्कन कॉलेजमध्ये माझे वडील व कै. नानासाहेब केळकर समकालीन असून १८८५ सालच्या सुमारास बरोबर शिकत होते. दोघेहि बोर्डिंगमध्ये एकाच खोलीत असल्याने त्याची एकमेकाची चागली मैत्री होती शिक्षण पूर्ण झाल्यानतर दोघे जरी भिन्न व्यवसायाला लागले, तरी त्या दोघा मित्राचा पत्रव्यवहार शेवटपर्यंत होता. ती नानासाहेब केळकर मृत्यु पावल्याचे पत्र ती. तात्यासाहेबाकडून, ज्या वेळी माझ्या वडिलाच्याकडे आले, त्या वेळी ते पत्र हाती घेऊन, कापऱ्या हातानेच, माझ्या आईला माझ्या वडिलानी पत्र वाचून दाखविलें, व " माझ्या चागल्या मित्रापैकी एक मित्र आज मी गमावला " असे म्हणून नेत्रातून अश्रु गाळू लागले. त्या देखाव्याचे स्मरण मला अद्यापि चागलेच आहे. कै. ती. नानासाहेब केळकर जरी इहलोक सोडून गेले होते, तरी कै. तात्यासाहेबाचा व माझ्या वडिलाचा त्यानतर पत्रव्यवहार शेवटपर्यंत होत असल्यामुळे त्याचे स्नेहसबध दृढ झाले.

( २ ) केसरी सस्थेचा पुण्याचा गायकवाड-वाडा, ज्यात हल्ली केसरी ऑफिस आहे, तो पूर्वी केसरी संस्थेच्या मालकीचा नव्हता; बडोद्याच्या महाराजाकडून विकत घ्यावयाचा होता; तो विकत घेण्याकरिता व त्या बाबतीत काही रकमेची व मुदतीची तडजोड करण्याकरितां, कै. तात्यासाहेब केळकर माझ्या वडिलाकडे बडोद्यास आले होते, व आमच्याच घरी उतरले असल्याने मला त्या वेळेचेहि चागले स्मरण आहे. वर्तमानपत्रात तेथला कांही मजकूर छापावयाचा असल्यास माझ्या वडिलांकडे पत्रे येत, व देण्यासारखा मजकूर असल्यास लिहून पाठविला जाई, हेहि मला चागले स्मरते. हा मैत्रीचा सबध १९०६ सालापर्यंत चालू असून, त्याचे रूपातर थोड्या दिवसानी पेंडसे व लेले घराण्याशीं झाले, व त्यामुळेच जास्त सबध आला. १९०६ साली माझें लग्न झाले. लग्न जुळविण्याच्या बाबतींत ती. तात्यासाहेब यानी आपल्या मैत्रीचे स्मरण ठेवून जी खटपट केली, तिचे रूपातर हल्लीच्या नात्याच्या सबधांत झाले आहे. ही निरंतरची स्मृति माझ्या ध्यानात शेवटपर्यंत राहणारी

आहे. हा नात्याचा संबंध म्हणजे ती. दुर्गाताई केळकर यांची मी भावजय असून, त्या माझ्या वन्स लागत आहेत. त्यांच्याबद्दल माझी पूज्य बुद्धीहि तशीच आहे. कै. तात्यासाहेब हयात असतांना मी पुष्कळ वेळा ती. ताईस विनोदाने म्हणत असे कीं, "आपले डोळे मिटल्यास मला फार आनंद होईल" व त्याहि मला म्हणत असत की, "तुझे बोलणें खरे होवो." पण ईश्वरी घटना अतर्क्य असते हेच खरे.

(३) १९१० साली चि. अक्काचे लग्न झाले. तिला देशपांडे नावाच्या देशस्थ घराण्यात दिल्या कारणाने, त्या वेळी त्याच्यावर समाजाकडून पुष्कळ टीका झाली; तथापि तात्यासाहेबांनी ती टीका मनावर न घेऊन धैर्याने सोसली व त्याच्या घरातील इतर सर्व मंडळींनीहि धैर्याने टक्कर दिली. तात्या न बोलके पण कर्ते सुधारक होते

(४) १९२२ साली चि. बापुराव केळकर त्याचे लग्न झाले, त्या प्रसंगी मीं हजर होते. त्या वेळी लग्नसमारंभास पुष्कळ लोक आले होते, व सर्वात मोठ्या मुलाचे लग्न व पहिलेच कार्य असल्याने, सर्वांस आनंद व उत्साह वाटत होता. लग्नसमारंभात वाद्ये वाजवावयाची नाहीत, असे तत्त्व ठरवून कृतीत आणिले. तात्यासाहेबांनी सर्वांस तसे निक्षून बजाविले होते की, बायकामंडळीत वाद्याबद्दल गोष्ट निघाल्यास "मी वाद्ये साफ वाजविणार नाही, कोणाचे या बाबतीत ऐकणार नाही, भीड चालणार नाही, असे सर्वांस स्पष्ट सांगा." तात्यासाहेबांची सामाजिक मते जरी पुष्कळ सुधारलेली असली, तरी घरगुती बाबतींत त्यांची मते पूर्ण सनातनी दिसत. दरवर्षीची रामनवमी, तिची जेवणावळ, श्राद्ध, पक्ष वगैरे नित्य नैमित्तिक कर्मे सनातनी मताप्रमाणे होत असत.

(५) ती. तात्यासाहेबाकडे माझे [illegible] सुरू झाल्यापासून त्याचे घर नेहमीं पाहुण्यांनी भरलेले दिसे व मी नेहमी विनोदाने म्हणे, "आपले घर वटवृक्षाप्रमाणे आहे" "पण याचे श्रेय तिच्याकडे (ताई) आहे" असे ते उलट म्हणत !

(६) कै. तात्यासाहेबांस मी भक्तिभावनेने जेवावयास मधूनमधून बोलावीत असे व ते सवड असल्यास येताहि असत

एकदा सकाळी ९–१० च्या सुमारास आमच्याकडे ते आले. मी नित्याच्या सवयीप्रमाणे चहा, दूध वगैरे देते असे म्हटले; त्यावर "चहा, दूध सर्व ठिकाणी मिळतें, परंतु सुठीची कढी (ताकाची) कोठे मागतां येत नाहीं, व मिळणे कठीण असते. शक्य असेल तर ती दे" असे ते म्हणाले. मला त्याच्या या बोलण्याचें फार कौतुक वाटले.

(७) तात्यासाहेबास सर्व कोकणी पदार्थ मनापासून आवडत. काकडीची गोडाची घिरडी, खांडवी, तसेच काही रुचिपालट, भाज्या, हेहि प्रकार ते आवडीने मागून

घेत. एकदां असेच आमच्याकडे ते जेवीत असता, एकप्रकारची भाजी केलेली होती. ती त्यांस फार आवडली. त्यानीं मला हाक मारून विचारिलें, “ मामी, भाजी फार आवडली, परतु ओळखीची दिसत नाही, हिचे नाव काय ? ” “ ह्या भाजीचें नांव चंदनबटवा असे आहे व हिची गोळाभाजी चांगली होते, ” असें मीं त्यास सांगितलें. त्यावर ते हंसून म्हणाले, “ एकदां आमच्या घरी ये व तुझी बटवा भाजी तिला करण्यास साग.”

( ७ ) महायुद्ध जोरात चालू असताना, मुबईवर बॉब हल्ला होईल असें समजून पुष्कळ लोक मुबईहून पुण्यास आले. कोणी कोकणान गेले ज्यास जिकडे आश्रय मिळेल तिकडे तो जाऊ लागला. नाना तऱ्हेच्या गोष्टी लोक बोलू लागले. मी येथे २-३ लहान मुलाना घेऊन असल्यामुळे मलाहि आता काय करावे ह सुचेना कै तात्यासाहेबास मी आमच्याकडे बोलाविले व विचारले; “ बॉब हल्ले होतील म्हणून मुबईचे लोक येथे बरेचसे येत आहेत, किवा दुसरीकडे जात आहेत; आपण कसे करावयाचे ? आपण कोठे जाणार आहा किवा काय ? मी कोठे जावे, मला मार्ग सागा ” कै. तात्यासाहेब ह्यावर हसून म्हणाले, “ मामी, ही सर्व हूल अुठली आहे. पुण्या–मुबईवर हल्ला होत नाही, येथून उठून आपण जाणार कोठे व किती दिवस ? मरण व सकटे यावयाची असल्यास ती चुकत नाहींत. स्वस्थ चित्ताने राहा. मी कोठे जाणार नाही, व तूहि येथेच राहा,” असें सागून धीर देऊन गेले. नेहमी माझ्या दुःखी मनःस्थितीत मी अस्वस्थ मनाने तात्यासाहेबास काहीं काही भाबावलेले प्रश्न विचारीत असे, त्या वेळेस मला ते म्हणत, “ सुखाबरोबर दुःखाची तयारी करून ठेवावी लागते, त्यास तू अपवाद कशी होशील ? तुला वेदान्त आवडतो ना ? मग हाच वेदान्त कृतीत आण ”



## वामन हरी देशपांडे

( जी. डी. ए. आर. ए., ऑडिटर, मुंबई )

( १ ) सन १९३७–३८ सालची गोष्ट असावी वेस्टर्न इडिया इन्शुअरन्स कंपनीची सिल्व्हर ज्युबिली होती त्यानिमित्त त्या कपनीचा ऑडिटर म्हणून मुद्दाम मी मुबईहून सातारला गेलो होतो. समारभाचे अध्यक्ष तात्यासाहेब होते. समारभ सपल्यानतर परत घरी जाताना तात्यासाहेब समोरच दिसले. त्याना नमस्कार केला. तत्क्षणीच ‘ उद्या घरी येऊन भेटा ’ असे त्यानी सागितले आणि याच ‘ उद्याच्या ’ भेटीत मी शिक्षण प्रसारक मडळी पुणे या सस्थेचा ऑडिटर झालो !

माणसाची पारख होणें व योग्य कामाकरिता योग्य त्या व्यक्तीचा हमखास उपयोग करणें, हे मोठेपणाचें लक्षण तात्यासाहेबाच्या अगीं पुरेपूर होते. अनेक

प्रकारच्या उलाढालीत त्याना निरनिराळ्या प्रकारच्या माणसांची जरूर लागे. त्यांच्या ह्या लोकसंग्रहात मी जमा होतो अशाच एका प्रसंगानें त्यांनी मजकडे भोर संस्थानच्या धान्य-खात्याच्या तपासणीचे काम सोपविले. त्या वेळी ते त्या संस्थानच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष होते. काम अतिशय जबाबदारीचें व जिकीरीचे, त्यामुळें ते पुरे करण्यास वेळहि फार लागे. त्यात एका कामाचा तात्यासाहेबानी आपल्या अधिकारांत निकाल लावला होता. पण ऑडिटर म्हणून त्यावर टीका करण्याचा मजवर प्रसंग आला. ही बाब अतिशय नाजूक व जबाबदारीची; यामुळे टीका करण्यावांचून मला गत्यंतरच नव्हते. हे एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल इनमीन् तीन माणसांचे पैकी एक संस्थानचे दिवाण, दुसरे राजेसाहेबांचे खाजगी कारभारी व तिसरे खुद्द अध्यक्ष म्हणजे तात्यासाहेब! अशा स्थितीत हा मतभेद झालेला. माझा रिपोर्ट त्याच्याविरुद्ध झालेला. तेव्हा हे कसे काय होणार ह्या विवंचनेत मी होतो. मी माझ्या रिपोर्टाचा कच्चा ड्राफ्ट त्याना वाचून दाखविला व त्यांच्या चेहऱ्यावर त्याचा काय परिणाम होतो ते पाहत राहिलो, पण आश्चर्य हे की, अगदी अनपेक्षित असेच उत्तर त्यांच्याकडून मिळाले ते म्हणाले, "ठीक आहे; तुम्ही म्हणता तसे असले तर आमचा मूळचा ठराव बदलून घेऊ. त्यात कमीपणा कसचा!" या त्यांच्या उद्गारामुळे माझ्या विवंचनेचा निरास झाला. या प्रसंगाचें राहून राहून मला नवल वाटते. कारण आमच्या ह्या व्यवसायाच्या निमित्ताने इतर काही थोरामोठ्या लोकाबरोबर उद्भवलेले अनेक खारट-तुरट प्रसंग ध्यानात घेऊन त्यांची वरील प्रसंगाशीं तुलना केली असता, तात्यासाहेबांच्या ह्या उत्तरामुळे आमच्या व्यावसायिक अनुभवांत बहुमोल भर पडली हें खास!

(२) याच कामाच्या निमित्तानें तात्यासाहेबांच्या सहवासात भोरला दोन दिवस राहण्याचा मला योग आला. त्यामुळे त्यांची काम करण्याची पद्धति, त्यांचा उरक, टापटीप व सर्वांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेऊन निर्णायक निकाल करण्याची हातोटी वगैरे गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव आला. एके रात्री त्यांच्या जेवणाचे ताट त्यांनीं आम्ही बसत असू त्याच दिवाणखान्यात मागविलें. आचारी ताट ठेवून गेला; पण जेवण झाल्यानंतर ते उचलावयास कोणीच आले नाही बराच वेळ वाट पाहून मी स्वतः ते उचलण्यास पुढे झालो ते पाहून मला बाजूस सारून स्वतः ते त्यांनीं बाहेर नेऊन ठेवले. ही बारीकशीच गोष्ट पण तिचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. तसेच सकाळी ते माझ्या अगोदर उठत, सर्व प्रातर्विधि आटोपीत व "देशपांडे अुठा, चहा तयार आहे" म्हणून हाक मारून अुठवीत. ह्यामुळे मी लज्जित होओ!

(३) गायनशास्त्रामध्ये त्यांचा माझा मतभेद होता. किंबहुना मी त्यांचा विरोधक होतो. भगवानांचा मराठीकरणाविषयीची त्यांचीं मते मला कधींहि

पटली नाहींत. अुलट त्यांच्या विचारप्रणालीवर अेका लेखात मी अुघड अुघड व कडक टीका केली होती व तेवढ्यानेहि माझे समाधान न होतां "तुमच्यासमोर मनमोकळेपणाने भाडतां येत नाही, म्हणून हा लेख मुद्दाम पाठवीत आहे" असे स्वतंत्र पत्र लिहून त्यासोबत या लेखाचे कात्रण पाठाविले. त्याला त्याचे अुत्तर तीस-पसतीस मुद्द्याचे आले. प्रत्यक्ष गाठ पडली तेंव्हा "तुम्हाला मी अितके लांबलचक व आवर्जून व मुद्देसूद पत्र लिहिले; पण त्याची तुम्ही साधी पोच सुद्धां पाठविली नांहीन," असे म्हणून ते मजवर खूपच रागावले! मराठी-करणाच्या बाबतीत वादाचा मुख्य मुद्दा उच्च संगीतांत शब्दाच्या अर्थाची अपेक्षा कितपत ठेवावी असा होता, व त्या अनुरोधाने उच्च संगीतात स्वरानाच प्राधान्य आहे, शब्दांना नव्हे, असे आमचे म्हणणे आमच्याशी त्यानी वाद घेतला. पण जळगावच्या साहित्य समेलनात त्यांनी आमच्या मुद्द्याचा अनुवाद केल्यामुळें अर्थातच आम्हाला त्याच्या अभिजात प्राजलपणाविषयी सादर धन्यता वाटली.

(४) मुंबईस एकदा त्यांचें रेडिओवर भाषण झाले. तेथे पूर्वी ठरल्याप्रमाणें त्यांची माझी भेट झाली तेथून ते, त्याचे चिरंजीव बापूराव व मी माटुंगा येथील बापूरावांच्या घरी जाण्याकरिता बोरीबदरवर आलो. तिकिटे काढण्यास अर्थातच मी पुढे झालों; पण मला थोपवून, "बापू, तू थर्ड क्लासचीं तिकिटे काढून आण," असे म्हणून त्यांनीं स्वतः बापूरावाच्या जवळ पैसे दिले. मी तिकीटे काढली असती तर तीं फर्स्टक्लास अगर सेकंडक्लासची काढली असती हे ओळखून त्यानी ही चपळाई केली! कारण दुसऱ्याला तोषिस लागूं द्यावयाची नाही व कोणाचा बारीकसासुद्धां उपकार घ्यावयाचा नाही हा तर त्याचा बाणा!



## नारायण बाळकृष्ण केळकर

(बी. ए., ऋणानुबंधी, खानदेशचे रहिवासी, हल्लीं मुक्काम पुणें)

(१) सन १९२३ पासून तात्याचा व माझा विशेष परिचय झाला. मी पुण्यास १९३४ मध्ये राहावयास आल्यापासून तो दृढतर झाला. त्याची व माझी नेहमीं भेट होत असे व अनेक सुखदुःखांच्या गोष्टी ते अतिशय मोकळ्या मनाने माझ्याशी बोलत असत.

१९२६ मधील असेंब्लीच्या निवडणुकीसाठीं तात्यानी खानदेशात दौरा काढला होता. नवापूर येथील कार्यक्रम आटोपून आम्ही नवापूर स्टेशनवर आलों. बरोबर मंडळीहि बरीच आली होती. रात्रीं ९॥ ची वेळ. गाडीस सुमारे पाऊण तास उशीर होता. स्टेशनवर गडबड असावयाचीच. पण तशा धाद्लीत व गड-बडींत उघड्या प्लॅटफॉर्मवर तात्यांनीं वळकटी पसरली व आश्चर्याची गोष्ट ही कीं,

१० मिनिटांत ते घोरूं लागले ! त्याहून आश्चर्याची गोष्ट म्हणजे गाडी येण्याच्या १० मिनिटे आधी ते आपण होऊन जागे झाले !

( २ ) तळोदे, शहादे, शिरपूर, चोपडें, यावल, वगैरे तालुक्यास जाताना तापी नदी ओलांडावी लागते. साधारणतः अधिकारी, प्रतिष्ठित किंवा श्रीमान् लोक या भागांत प्रवासास आले म्हणजे नदी उतरतांना त्याना जरूरी असली तर कोळी व भिल्ल खांद्यावर बसवून नदीपार करीत व त्याचे जोडेहि हातात घेत. ही गोष्ट नित्याच्या परिपाठातील असल्यामुळे कोणाला काहीं त्याचें वाटत नसे. पण तात्यानी मात्र नदीपार होतांना कोळ्यास आपले जोडे उचलू दिले नाहीत किंवा कोणाच्या खांद्यावरहि ते बसले नाहींत. यासबंधी आम्ही सहज बोलत असताना "स्वतःचे काम करावयास मनुष्याला लाज वाटण्याचे कारण काय ?" असें तात्यानीं उद्गार काढले ! अर्थात् आम्हा सर्वांना चोरटयासारखे झाले हे सागावयास नकोच.

( ३ ) निवडणुकीच्या वेळीं दौऱ्यावर असताना तळोदें व शिंदखेडें येथें पोलिसाने उद्धटपणा दाखविला. त्या वेळी तात्याना अतिशय संताप येऊन त्यांनीं पोलिसाची अशी खरडपट्टी काढली की सांगता सोय नाहीं ! त्याचे खरें कर्तव्य काय याची त्यास जाणीव करून देऊन त्यानीं त्यास घराबाहेर हाकलून दिलें ! आपली चूक लक्षांत येऊन पोलीस शरमिंदा झाला व येथें आपली टुरटुर चालावयाची नाही असें वाटल्याने तो मुकाट्यानें चालता झाला !

( ४ ) तात्या भिडस्त असले तरी भ्याड नव्हते व कोणाच्याहि तोंडावर ते स्पष्टपणें बोलत असत. एकदां धुळ्यास ते मजकडे चहाफराळास आले असतांना एक बडे सरकारी अधिकारीहिं आले व पायांतील बूट तसेच ठेवून बैठकीवरील खुर्चीवर येऊन बसले. पण तात्यांना तें न आवडून "देशी पद्धतीने घातलेल्या बैठकीवर मडळी बसली असताना बुटासह येऊन बसणे हें अयोग्य होय," असे त्यांनी उघड बोलून दाखविलें. अर्थात् सदर अधिकारी बूट काढून बैठकीवर मुकाट्याने येऊन बसला !

( ५ ) एकदा भेट झालेली असली म्हणजे तात्या त्या गृहस्थाची ओळख सामान्यतः विसरत नसत. धुळ्यास माझ्याकडे ते आले असतांना जमलेल्या मडळीत फारसें न पाहिलेल्या लोकांची तात्याना आठवण राहते की नाही हे पाहावे, अशी कुजबुज सुरू झाली. "तुमची अमुक वेळी भेट झाली होती" असे तात्यानी त्या गृहस्थास सागून आम्हा सर्वांस चकित केले ! तसेच धुळे व चाळिसगाव येथे सुमारे वीस वर्षांपूर्वी पाहिलेल्या एका गृहस्थास ते पुण्यास आले असताना तात्यानी त्यांस नेमकें ओळखलें !

( ६ ) तात्या निगर्वी असले तरी स्वाभिमानी असत. लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लीचे सभासद असताना त्यानीं व्हॉईसरॉय, त्याचे सेक्रेटरी, इतर युरोपियन

सभासद याची आपण होऊन ओळख करून घेण्याचा कधीहि प्रयत्न केला नाही. एवढेच नव्हे तर, जातां येता होणाऱ्या गांठीभेटींत शिष्टाचार म्हणून कोणास कधीं "गुडमॉर्निंग"हि केले नाही, असे ते मजजवळ बोलले होते व हे एकदोनदा त्यानीं भरसभेंतहि सांगितल्याचे मला आठवते अॅसेंब्लीचे सभासद असतांना तात्याची वागणूक अतिशय भारदस्तपणाची असे. त्यांच्याबद्दल युरोपिअन सभासदास सदैव आदर व त्याच्याबद्दल एक प्रकारचा वचक वाटत असे, असे एका प्रमुख खासदाराने मजजवळ बोलून दाखविले होते.

( ७ ) तात्याच्या या स्वभावाचा धुळ्यासहि एक अनुभव आला. आपल्या पुतणीच्या विवाहानिमित्त ते धुळयास आले असतांना विवाहाच्या दिवशी पाहुण्यांच्या स्वागतार्थ ते प्रवेशद्वाराशींच उभे होते व आल्यागेल्याचे ते यथोचित स्वागत करीत. जिल्ह्यातील बहुतेक सर्व प्रमुख अधिकारीहि यावयाचे होते. त्यावेळी मात्र तात्या प्रवेशद्वाराशीं थांबले नाहींत ! मुद्दाम मंडपाच्या एका बाजूस कोणास न दिसेल अशा ठिकाणी जाऊन उभे राहिले ! तात्यासाहेब धुळयास आल्याचे अधिकाऱ्याना माहीत असल्यामुळें त्यानी होऊनच तात्यांच्या भेटीची इच्छा दर्शविल्यामुळे आप्पासाहेबानी तात्यास बोलावून अधिकाऱ्यांची ओळख करून दिली. पण शिष्टाचारास अनुसरून अवश्य तेवढे बोलणें झाल्यावर तेथें न बसता तात्या तेथून उठून निघून गेले !

( ८ ) ता. २२-९-१९२५ रोजी धुळयास कलेक्टरच्या अध्यक्षतेखाली " बेबी वुइक "चा बक्षीससमारंभ होता. तात्याहि त्याचवेळीं धुळ्यास आले असल्यानं त्यानीहि दोन शब्द सांगावे अशी चालकास स्वाभाविकच इच्छा झाली. पण केसरीच्या संपादकाचा संपर्क समारंभास लागलेला कलेक्टरला कसा रुचणार ! त्याने या गोष्टीस हरकत घेतली ! पण चालकास हा अपमान वाटून त्यानी आग्रह धरल्यामुळे कलेक्टरला परवानगी देणें भागच पडले ! पण तात्यांच्या व्याख्यानात राजकारणाचा वासहि येता कामा नये, अशी अट त्याने घातलीच ! तात्यानी आपल्या भाषणास सुरुवात केली तीच मुळीं ' वुईक बेबी ' असते म्हणून बेबी वुइक साजरा करावा लागतो, या विनोदी वाक्याने. त्यांचे व्याख्यान खुद्द कलेक्टरालाहि आवडलें. त्याबद्दल त्याने तात्याना धन्यवाद दिले व त्यांच्या व्याख्यानास मनाई करण्याचा जो विचार मनात आला होता, त्याबद्दल प्रांजलपणें खेद व्यक्त करून त्याने तात्याची उघड माफीहि मागितली !

( ९ ) माझे वडील तीर्थरूप बाळकृष्ण गणेश केळकर हे पोलीस खात्यात नोकरीवर असले तरी अत्यंत सत्त्वशील व धर्मनिष्ठ होते. त्यांच्या मृत्यूनंतर मी त्यांचे चरित्र लिहून काढले व तें तात्यास वाचावयास दिले त्यांनी सर्व हस्तलिखित काळजीपूर्वक वाचलें. " चरित्र अतिशय चांगलें आहे, बोधप्रद आहे, तुम्ही

ते अवश्य प्रसिद्ध करा. एक वेळ श्राद्ध न केलें तरी चालेल, पण चरित्र प्रसिद्ध करून पितृऋण अवश्य फेडा." असें त्यानी मला सांगितलें.

( १० ) ता. २१ नोव्हेंबर १९४१ रोजी सायंकाळी मी सहज तात्यांकडे गेलों. माडीवर जाऊन पाहतो तो पेटी-तबला सुरू असून तात्या गातांना दिसले! मी चाटच पडलो!! पद संपल्यावर पेटीवाला व तबलजी परत गेले. तात्या एकटेच आहेत असे पाहून "हिटलरने जगड्व्याळ युद्ध सुरू करून सर्व जगाला धक्का दिला! तुम्ही या वयात गाणें शिकावयास आरंभ केल्याचें पाहून तुमचे निकटचे स्नेही देखील खचित चकित होतील!" असे मी म्हणालो. त्यावर तात्यांनीं केलेला खुलासा मोठा आश्चर्यकारक होता "माझ्या नाटकांतील पदें मला स्वतःला तरी म्हणता यावी व वेळहि जावा या हेतूनें मी हा उद्योग सुरू केला आहे," असें ते म्हणाले. यावरून तात्यांची ज्ञानलालसा व व्यासंगाची हौस किती विलक्षण होती हे प्रत्ययास येते!

( ११ ) स्वतःच्या कौटुंबिक गोष्टीहि तात्या मजजवळ अनेकदां मोकळेपणानें बोलत असत. असेच आम्ही एकदां बोलत असतांना आपल्या प्रकृतीबद्दल व एकंदर कौटुंबिक स्वास्थ्याबद्दल मजजवळ अतिशय समाधानाचे उद्‌गार त्यानी काढले. 'माझा उत्कर्ष झाला याचें कारण माझी पत्नी होय, तिच्या सत्प्रवृत्तीचेंच हे फल आहे' असे तात्या नेहमीं म्हणत असत. याचें आम्हांस नित्य प्रत्यंतर येई. कारण तात्याना प्रापंचिक गोष्टींकडे लक्ष द्यावें असा हव्यास नव्हता व वेळहि नव्हता. पण ताईनीं ती बाजू उत्तमरीतीने सांभाळली यांत शंकाच नाहीं. किंबहुना इतक्या तत्परतेने, निष्ठेने व निरलसतेने पतीची सेवा हौसेने व मनःपूर्वक करणारी ताईसारखी साध्वी विद्यमान काळात आढळणे दुर्मिळच होय!

( १२ ) ताईबद्दल तात्याना याप्रमाणे विलक्षण आदर वाटत असल्यामुळेंच स्वतःस तत्त्वतः न पटले तरी ताईच्या समाधानासाठी तात्या बहुतेक सर्व धार्मिक गोष्टी घरात करीत. त्यांच्या घरीं रामजन्मोत्सव दरवर्षी नियमाने साजरा होत असे. त्या वेळीं तात्या हटकून सोवळे नेसत हे पुष्कळांच्या पाहण्यांत असेलच. त्या वेळी ते एखाद्या कर्मठ ब्राह्मणाप्रमाणे वागत!

( १३ ) कोणीहि तात्यांचा सल्ला घ्यावयास गेल्यास त्याची बाजू ते समजावून घेत व सर्व दृष्टींनीं विचार करून आपले मत काय आहे हे सांगत. पण "आपल्या बुद्धीस जे उचित वाटेल तेंच मनुष्यानें करावें, दुसऱ्याला निमित्ताचे धनी कधी करू नये" असेंच तात्या शेवटी सांगत. एकदोन वेळां कांहीं कारणानिमित्त मीच त्यांना सल्ला विचारला असतांना त्यांनी मला वरील धोरणानुसारच उत्तर दिलें.

❋

## श्रीमंत अनुबाई वहिनीसाहेब घोरपडे
### ( श्रीमंत बाबासाहेब यांची स्नुषा, इचलकरंजी )

( १ ) ती. तात्यासाहेब केळकर यांच्या घराण्याचा व माझ्या पितृघराण्याचा घरोबा होता, तसेच कै. तात्यासाहेब व माझे श्वशुर कै. श्रीमत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, अधिपति इचलकरजी, हे दोघेहि १८९० च्या सुमारास कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्ये सहाध्यायी होते व त्याचे मित्रत्वाचे सबध अखेरपयत राहिले माझे वडील कै गोविंद वासुदेव ऊर्फ तात्यासाहेब कानिटकर व माझ्या मातुश्री श्रीमती काशीबाई कानिटकर हे दोघेहि वाङ्मयसेवा करणारे, विद्वानाच्या सहवासात आनद मानणारे, वक्ते वगैरे असल्याने कै. तात्यासाहेब केळकर याचा व माझ्या मातापितराचा स्नेहसबध अनेक वर्षांचा होता तात्यासाहेब आमच्याकडे इचलकरजीस एकदर दोन वेळा आले होते व आमच्या उन्हाळ्याच्या गिरिनिवासालाहि त्यानी भेट दिली होती इचलकरजीस एका सस्थेच्या उद्घाटन समारभाच्या निमित्ताने ते आले असताना त्यानी आपल्या भाषणात सस्थानिकाच्या बद्दल एक गमतीदार उपमा दिली ती सर्व श्रोत्याना फार पसत पडली ते म्हणाले, " सस्थानिक एकवीस वर्षाचे होताच त्याना राज्याधिकार दिले जातात व ज्या मानाने सस्थान लहानमोठे असेल त्या मानाने हजारो अगर लाखो लोकाचे भवितव्य एका एकवीस वर्षाच्या तरुणाच्या हाती सोपविले जाते सस्थानिकाना अनियत्रित सत्ता असते व ब्रिटिशाच्या अतर्गत राज्यकारभारात ढवळाढवळ न करण्याच्या धोरणामुळे जुलमी राजांच्या प्रजेला न्याय मिळणेहि कठीण पडते. आपण श्रीकृष्णजन्माचे वर्णन वाचतो. त्यात जसे जन्मत.च श्रीकृष्णाला चार हात फुटले तसे एकविसावे वर्ष लागताच सस्थानिकाना एकदम एखाद्या मोठ्या राज्याचा अनियंत्रित कारभार करण्याची अक्कल फुटते, अशीच ब्रिटिशांची समजूत दिसते "

( २ ) १९२७ च्या उन्हाळ्यांत तात्यासाहेब श्रीमंत सरकाराच्या आमत्रणावरून 'माधवगिरी'स [ बेळगांवापासून चाळीस मैलांवर असलेलें आमच्या दौलतींतील गिरिनिवासाचें रम्य स्थान ] काही दिवस विश्रातीसाठी आले होते त्या वर्षी मी व माझीं मुलेंहि स्वारीबरोबर होतो. कै. तात्यासाहेब यांची तब्येत बरी नसल्यामुळे ते विश्रांति व हवापालट या दुहेरी हेतूनें जरी त्या थड ठिकाणी येऊन राहिले होते, तरी त्यांचा लेखनाचा व वाचनाचा जो अखंड कार्यक्रम चालू असे तो पाहून आम्हांला अतिशय कौतुक वाटे. मी त्या वेळीं एका सनातनी विचाराच्या श्वशुराची सून असल्याने जरी तात्यासाहेबांशी चर्चा वगैरे करण्याचा प्रसग आला नाहीं, तरी कांही वेळां आम्ही सर्व सध्याकाळी एकदमच फिरावयास जात होतों, त्यामुळें त्यांचें विनोदी भाषण अनेक वेळां ऐकण्यास मिळे. तें ऐकून अतिशय आनद होई.

आमच्या सरकारांच्या मोटारीचा ड्रायव्हर इमाम अतिशय वेगानें मोटार चालवीत असे. एकदा तात्यासाहेब त्याच्या मोटारींतून माधवगिरीहून वेंगुर्लें, सांवतवाडी वगैरे पाहून आले. माधवगिरीहून सांवतवाडीस जातांना अबोलीचा घाट लागतो. त्या घाटांत फार वळणे आहेत इमाम ड्रायव्हरने घाटांतूनहि अतिशय वेगात गाडी कशी चालविली व एका ठिकाणी भयंकर अपघात होण्याची वेळ कशी आली, त्याचे मजेदार वर्णन तात्यासाहेबांनी परत आल्यावर भोजनाच्या पंक्तीत केले. ते म्हणाले, "बाबासाहेब, आज आपल्या ड्रायव्हरने खूप वेगात गाडी सोडली; व घाटात एका वळणावर पुढून एक मोटार आल्याने त्याने आपली मोटार इतक्या जोराने बाजूला घेतलीन् की, मला तर वाटले आता कड्या-वरून आम्ही खाली कोसळणार आणि आमची गच्छती तिथेंच होणार! मी तर डोळे घट्ट मिटूनच देवाचे नाव घेतले, पण 'माधवगिरी'वर श्रीखंडपुरी आमची वाट पाहत होती ना? त्यासाठी सुखरूप आलो परत आज!!"

(३) कै तात्यासाहेबाशी प्रत्यक्ष बोलण्याचा एकच व तोहि दुर्दैवानें अखेरचाच प्रसंग म्हणजे १६ जानेवारी १९४७ रोजी झालेल्या आमच्या भेटीचा होय पुणे येथे मी गेलें असता कै. तात्यासाहेबाना मी निरोप पाठविला की, मला आपल्याला भेटण्याची इच्छा आहे, तेव्हा आपण केव्हा मोकळे असाल तेव्हा मी आपणाकडेहि येऊन भेटू शकेन परंतु त्यानी लगेच उलट निरोप पाठविला, "मी आज मोकळा आहे. गाडी पाठवा व मीच येऊन भेटतो." तात्यासाहेबांच्या ह्या निरोपामुळे मला आनंद तर वाटलाच; पण त्यांच्या स्वभावांतील सौजन्याने मला उपकृत वाटलें थंडीच्या दिवसात सकाळी आठ वाजण्याच्या सुमारास ते माझ्यासाठीं घराबाहेर पडले व कानिटकराच्या वाड्यात आम्ही भेटलो कांही गोष्टीत मला त्यांचा सल्ला पाहिजे होता, तो त्यानी एखाद्या आप्ताच्या कळकळीने दिला. माझ्या मातुःश्री काशीबाई कानिटकर ह्यानाहि तात्यासाहेब भेटले व त्यांची वृद्धावस्था पाहून तात्यासाहेबाना गहिंवरून आले. बराच वेळ बसून त्यांनी सर्व कुटुंबियाची आस्थापूर्वक चौकशी केली. पूर्वकाळातल्या कांहीं आठवणीहि त्यानी काढल्या. माझ्या मातुःश्रींच्या आत्मचरित्राबद्दल विषय निघाला, तेव्हा मी म्हटले, "त्यांचें आत्मचरित्र बरेचसें लिहून झाले आहे; पण अद्याप पुरें झालें नाहीं ते पुरे करावयाचे आहे." त्यावर एखाद्या वडील माणसाने अधिकारानें सांगावे तसें ते म्हणाले, "तुम्ही करा कीं ते काम! काशीताईंचे आत्मचरित्र म्हणजे समाजसुधारणेचा व स्त्रीशिक्षणाचा एक इतिहासच होईल व ते चरित्र पुरे करून प्रसिद्ध करण्याचे काम व्हायला पाहिजे." कै. तात्यासाहेबानी आमच्या कै. ती. सरकारांचा व त्यांचा स्नेह कसा टिकला ह्याबद्दलहि सांगितले. ते म्हणाले, "बाबासाहेबांचा व माझा राजाराम कॉलेजपासू-नचा परिचय. राजकारणांत जरी आमचा तीव्र मतभेद अनेक वेळीं असे, तरीहि

ते एक विद्वान्, सदाचरणी व कर्तृत्ववान् अधिपति होते, विद्यादानाचे कार्य त्यांनी अखेरपर्यंत केले व राज्यकारभार उत्तम केला. ह्या सर्व गुणामुळे त्यांच्याबद्दल मला फार आदर वाटे. शिवाय राजकारणातील मतभेदाचा परिणाम आमच्या स्नेहावर न होऊ देण्याची बाबासाहेब विशेष काळजी घेत असत."



## काशीनाथ नारायण धारप

### (बी. ए., एल्एल्. बी., ॲडव्होकेट, मुंबई)

(१) १९३५ ख्रिस्ताब्दात हायकोर्टाला उन्हाळ्याची सुटी झालेली होती व लगेच माझे मित्र श्री. सदाशिवराव बापट याचे मला पत्र आले की, गु. तात्यासाहेब दरवर्षाप्रमाणे देवगडास गेले आहेत, ते तेथे एकटेच आहेत व तुम्हाला व मला त्यांनीं ४।८ दिवस देवगडास येण्याबद्दल फार आग्रहाने सांगितलं आहे. तरी तुम्ही पुण्यास या व तेथून आपण बरोबर देवगडास जाऊ. मी त्याप्रमाणे पुण्यास गेलों, परतु श्री बापट काही आकस्मिक अडचणीमुळें देवगडास येऊ शकले नाहीत, म्हणून मी एकटाच सातारा-कोल्हापूर मार्गाने मोटारने देवगडास गेलो दुपारी चार वाजतां मी तात्यांच्या घरी पोचलो. तात्या त्या वेळी शेजारच्या गावी गेले होते व तेथून ते सध्याकाळी परत येणार होते. तात्यांचे चिटणीस श्री. आपटे यानी माझी स्नानाची, फराळाची व्यवस्था केल्यावर वेळ होता म्हणून मी व आपटे देवगडाच्या बदरावर व किल्ल्यावर फिरावयास गेलों. तेथून परत येताना आम्हाला उशीर झाला व काळोख खूप पडला तात्यासाहेब देवगड गावापासून मैल दोन मैल माळरानावरील बगल्यात राहत होते. आमच्याबरोबर दिवा वगैरे काही नव्हता व काळोखांतून धुळींतून तर आम्हास जावयाचे, देवगडास फुरशाचा उपद्रव फार, यामुळे तात्यासाहेब गावाहून परत आल्यावर आम्ही बाहेर फिरावयास गेलेले तोपर्यंत परत आलो नाही हे पाहून काळजीने अत्यत अस्वस्थ झाले त्याच्या जिवाची बरीच घालमेल झाली माडवात ते एकसारखे इकडून तिकडे येरझारा घालीत होते. मला सुरक्षित परत आलेला पाहून त्यांना अति हर्ष झाला पण मग एकदम ते उसळले व आपट्याच्यावर तोंड टाकून त्याना म्हणाले, "धारपाना येथील माहिती नाही, पण तुम्हाला तर सर्व ठाऊक आहे ना? दिवाबत्ती बरोबर नसताना इतका उशीर होऊन काळोख पडल्यावर तुम्ही त्याना घेऊन बाहेर राहिलांत कसें! कुणाला फुरसें चावले असते तर केवढा प्रसग ओढवला असता?" मी सर्व दोष मजकडे घेण्याचा प्रयत्न केला; पण मला ते बोलूच देईनात व जास्तच खवळले मी आपट्याना खूण करून बाजूस जाण्यास सागितले

व युक्तीनें दुसऱ्याच विषयावर बोलणे काढले. हळूहळू ते शांत झाले. घरीं आलेल्या पाहुण्याच्या सुरक्षिततेबद्दल कोण ही काळजी व आस्था !

देवगडास मी ५–६ दिवस होतो. त्या मुक्कामात मला तात्यांच्या प्रेमळ वागणुकीचा व मनमोकळ्या बोलण्याचा यथेच्छ लाभ मिळाला. एवढ्या मोठ्या चतुरस्र पंडिताशी व राष्ट्रीय पुढाऱ्याशी निवांतपणें गांठ पडलेली ! त्याचा मीं भरपूर उपयोग करून घेतला; व निरनिराळ्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक व साहित्यासंबंधी विषयावर मनमुराद चर्चा केली. कित्येक वेळां त्यांच्या मताचा कल पाहून बळेंच उलट बाजू घेतली बेळप्रसंगी वादहि घातला. कदाचित् वितंडवाद सुद्धां झाला असेल. परंतु त्या थोर मनाच्या पुरुषानें माझा कोणताहि अविनय मनावर घेतला नाहीं. माझें ज्ञान तें किती ! परंतु तात्यांनी मी जणू काही त्यांच्याबरोबरीचा आहे अशी माझ्याशी वागणूक ठेवली होती आणि ही त्यांची अगदी सहज प्रवृत्ति होती. कृत्रिमतेचा त्यांत लेशहि नव्हता. मी मनांत अगदी चूर होऊन गेलो व म्हटले, माझ्याशी जर यांची ही अशी वागणूक तर श्री. माधवराव अणे वगैरेसारख्या खऱ्या बरोबरीच्या स्नेह्याशी हे कसे वागत असतील !

एक दिवस लढाऊ राजकारणाचा विषय बोलण्यात निघाला लो टिळक व म गांधी यांनी केलेल्या निरनिराळ्या चळवळी, त्यांच्या कार्यपद्धति, त्यांची उद्दिष्टे, लोकसंग्रह वगैरेबद्दल पुष्कळच ऊहापोह झाला. मी म्हणालों, "आपल्या पक्षाची स्वतंत्र अशी कोणतीच मोहीम होत नसल्यामुळे व म गांधीच्या चळवळीला ब्रिटिश सरकारविरुद्ध लढ्याचे स्वरूप येत असल्यामुळें आपल्यापैकी पुष्कळ कार्यकर्ते त्यांत सामील होतात; नव्हे त्यांना त्यांत सामील व्हावेंच लागते. परंतु चळवळीचें नियंत्रण आपल्या हातीं असत नाही; व तिचा शेवट केव्हा, कोठे, कसा करावा याचे अष्टाधिकार एकट्या म गांधींच्या हाती असल्यामुळे त्यांच्या वैयक्तिक लहरीप्रमाणे ती चळवळ परत घेतली जाते व भलत्याच बिलामती राष्ट्राच्या गळ्यांत पडतात तेव्हा तुम्हांला पटणारी अशी एखादी चळवळ योग्य प्रसगीं तुम्ही पुढाकार घेऊन केलीत तर आपल्या पक्षांतील सर्व लोक त्यांत मोठ्या अभिमानानें व हिरीरीने भाग घेतील" (स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी सुरू केलेल्या भागानगर व भागलपूरच्या निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळींत हा अनुभव पुढे आलाच). यावर गु तात्यासाहेब म्हणाले, "तू म्हणतोस तें खरे आहे, परंतु माझ्या स्वभावामुळे मी असल्या चळवळीचें पुढारीपण पत्करू शकत नाहीं. माझा स्वभाव फार हिशेबी आहे. असल्या चळवळी यशस्वी करण्यासाठी लोकांना वाटेल तो त्याग करावयास सांगण्याला अंगी जो एक प्रकारचा बेदरकारपणा असावा लागतो तो माझ्यांत नाही. परंतु आपल्यापैकी कोणी जर अशी उठावणी करून निघेल तर मी सर्वस्वी

त्याचा पाठपुरावा करीन. मला त्यांत बिलकूल कमीपणा वाटणार नाहीं. उलट माझ्या अंगावर मूठभर मांस चढेल.''

(२) खिस्ताब्द १९२६ च्या मार्च-फेब्रुवारींतील प्रसंग पुराण वस्तु-संरक्षण खात्याचे शिल्पज्ञ श्री. चंद्र यांना बरोबर घेऊन गु. तात्यासाहेब केळकर छत्रपति श्रीशिवाजी स्मारकाचे एक विश्वस्त म्हणून महाराजाच्या छत्रीची पाहणी करण्यासाठी रायगडावर गेले होते श्री. बाबुराव गोखले वगैरे आणखी दोनतीन पुण्याची मंडळी बरोबर होती. रायगडानजीकच्या महाड गांवचा मूळ रहिवासी म्हणून मीहि बरोबर होतो. रायगडावर जाऊन येण्याची सर्व व्यवस्था महाडचे माझे स्नेही श्री. बापूराव जोशी व श्री दत्तोपंत वैद्य वकील यांनी उत्तम केली होती व तेहि आमच्याबरोबर गडावर आले होते ठरल्याप्रमाणे आम्ही सर्व बैलाच्या छकड्यातून महाडहून दुपारी दोन वाजता निघालो व कोंझरपर्यंत जाऊन तेथून पुढे किल्ल्याचा चढ दोन अडीच मैल पायीं चढून पाचाडास रात्री मुक्काम केला पहाटे उठल्यावर दोनप्रहरी भोजनास गडावर मुक्काम करावा किंवा गड उतरून परत पाचाडास यावे याबद्दल मतभेद झाला. श्री बापुरावांचे म्हणणे की, एकदम इतका पल्ला घेणे तात्यांना निभणार नाही तरी दोनप्रहरच्या भोजनाचा बेत गडावर करू व थोडे ऊन खाली झाल्यावर गड उतरून येऊन रात्रीं महाडास जाऊ माझें म्हणणे की, सकाळच्या थंड वेळेतच सर्व कार्यक्रम उरकावा गड चढून गेल्यावर तेथेच थोडी विश्रांती घेऊन अल्पोपहार करावा व नंतर छत्रीची पाहणी करून त्याच पावली गड उतरून पाचाडास यावे व तेथे स्नान, भोजन वगैरे उरकावे आणि काही वेळ आणखी थोडी विश्रांती घेऊन कोंझरास जाऊन पुढे छकड्याने महाडास जावे, म्हणजे महाडासहि दिवसाउजेडी पोचू. चढ थोडा, तीन-चार मैल सपाटी व परत येताना सहा मैल सर्वच उतार असल्यानें तात्या-साहेबानाहि त्रास जाणवणार नाही. तात्यासाहेबानीं माझ्या म्हणण्याप्रमाणें करण्याचे ठरविलें.

तात्यासाहेबाचे वय त्या वेळीं पन्नावन्न-छपन्न वर्षांचे होते. म्हणून मी व दत्तो-पंत वैद्य वकील दोघे पिण्याच्या पाण्याच्या पिशव्या बरोबर घेऊन त्यांच्या एकसारखे मागे-पुढे होतो. पहाटे पांच वाजता गड चढण्यास सुरुवात केली. आमच्या अपेक्षे-पेक्षां पुष्कळच जलदीने तात्यासाहेब आपला स्थूल देह आवरून गड चढत होते. वाटेत फारच थोड्या वेळा त्यांनीं पाणी वगैरे घेतले. ठरल्याप्रमाणें गडावरील सर्व कार्यक्रम उरकून आम्ही आकरा वाजतां पाचाडास परत आलों. तात्यांचे पाय बोलू लागले होते; पण त्यांनी दाद दिली नाही. स्नान, भोजन वगैरे सर्व विधि थट्टामस्करीत व गप्पाविनोदांत सावकाश उरकले. आम्रफलांचें मधुर व थंडगार पन्हें सर्वजण यथेच्छ प्यालो व थोडी विश्रांती घेऊन दुपारच्या भर उन्हांत तोंडा-

वर सूर्य घेऊन पाचाडाहून कोंझरपर्यंत उतरून आलो. बैलांची उत्तम जोडी असलेल्या नाते येथील श्रीमान् शेठ शंकरभाई वरीया यांच्या छकड्यांत त्याच्याचबरोबर तात्यांची प्रथम पुढे महाडास रवानगी केली व बाकी सर्व मंडळी मागून सोईप्रमाणे गाडीतून अगर पायीं चालत महाडास आलो. तात्यासाहेब आमच्यापूर्वी तास दीड तास अगोदर महाडास पोचले होते. श्री. बापुराव जोशी याच्या घरीं पाहुणे मंडळीचा मुक्काम होता. घरांतील मंडळीजवळ मोकळेपणाने बोलून विचारपूस करून तात्यानी आपली सर्व सोय लावून घेतली होती. मुळीच संकोच बाळगला नाही तात्याचे पाय सुजून तळलेल्या घारग्या-सारखे फुगले होते. तरी ते त्याबद्दल काहीच बोलले नाहीत! मात्र ही गोष्ट श्री. बापुरावाच्या वडील भावजयेच्या लक्षात आली होती आम्ही घरी पोचल्यावर तिने प्रथमच आम्हास तात्याचे पाय सुजले असल्याचे सांगितले आम्ही हळूहळू विचारपूस करण्यास सुरुवात केली तात्या काही दाद लागू देईनात अखेरीस बापू-रावांनीं त्याच्याजवळ बसून युक्तीने त्याचा एक पाय चटकन् उचलून हातांत घेतला. पाहतात तो काय चागलाच सुजलेला! नुसता हस्तस्पर्शहि तात्याना सहन होत नव्हता आम्हाला तात्या काहीच कळू देईनात अखेर मोठ्या मिनत-वारीने त्यानी गड्याकडून पायाना खोबऱ्याचे तेल वगैरे लावून घेण्याचे कबूल केले. मग हळूहळू पायाना तेल चोळून बराच वेळ गरम पाण्याने शेक दिल्यावर त्याना बरं वाटले. दुसऱ्या दिवशी सकाळच्याला ते साफ मोकळे झाले

येताना व जातांना महाडास श्री बापूरावाच्या घरी झालेल्या मुक्कामात तात्या जणू काही स्वतःच्या भुलामाणमान आहेत अशा मोकळेपणाने व निःसंकोच वृत्तीने वागत होते. त्यामुळे एवढा मोठा पाहुणा घरी आला असून कोणाला कांही अवघड वाटले नाहीं व त्याच्या बडदास्तीत आपल्याकडून कांही चुकल्यामुळें त्याची गैरसोय झाली की काय अशी कोणाच्या मनाला रुखरूखहि लागली नाही. सर्व वातावरण कसे आनंदाने भरलें होते.



## ल. र. साने

(दिवाण, संस्थान भोर)

(१) कै. तात्यासाहेब केळकर यांचा व माझा प्रत्यक्ष असा संबंध १९४५ अखेरपर्यंत फारसा आला नव्हता. पुण्यांतच बालपणापासून मी वाढल्यानें एक-दोन प्रसंगी त्याचा परिचय झाला, पण अर्थात् तो तेवढ्या कामापुरताच होता. सुदैवाने भोर संस्थानात श्रीमंत राजेसाहेब याच्या हाताखालीं काम करण्याची संधि मला मिळाली व १९४५ सालच्या अखेरीस श्रीमंतानी मुद्दाम कै. तात्यासाहेबांना

बोलावून घेऊन भोरच्या राज्यकारभाराच्या बाबतीत त्याचा सल्ला घेतला व त्यानंतर तात्यासाहेब हे भोरच्या सरकारी मंडळाचे ऑनररी अध्यक्ष म्हणून काम पाहू लागले. त्या कारभारी मंडळाचा मीहि एक सदस्य असल्याने तात्यासाहेबाबरोबर वारवार बोलण्याचालण्याचा व कामकाज करण्याचा फायदा मला मिळाला. तात्यासाहेबांच्याकडे मी केव्हाहि गेलो तरी ते तयारच. मोकळ्या मनानें प्रश्नाची चर्चा करावी, साधकबाधक गोष्टीचा विचार करावा व मग निश्चित धोरण ठरवावे ही कामाची पद्धत जणू ठरून गेली होती. तात्यासाहेब याचे वैशिष्ट्य हे की, ते कित्येक वेळा स्पष्ट म्हणत की, " हे बघा, साने, मला दैनंदिन राज्यकारभाराची अंगेउपांगे यांची तितकीशी माहिती नाही, या दृष्टीने तुम्ही निःशंक मनाने मला तुम्हाला योग्य वाटेल ते सांगा; मी काही सर्वज्ञ नाही, मलाहि शिकावयाचे असे पुष्कळ आहे." केवढी ही त्यांची शालीनता ती केवळ वरवरची नव्हती, तर खरोखरच अंतःकरणापासूनची होती त्यांच्यापुढे येणारा प्रश्न कितीहि बिकट असो, त्याची सोडवणूक ते मोठ्या सफाईने उत्तम तऱ्हेने करीत. एक ना दोन किती तरी उदाहरणे देता येतील.

( २ ) येथे फक्त एकदोन प्रसंग नमूद करण्याचे योजिले आहे. भोर संस्थानातील एका तालुक्याच्या गावातील प्रसिद्ध मंदिरालगतच्या वाटेने हरिजनांनी इतर लोकांप्रमाणे जावे अशाबद्दल एकदा काम चालू झालें हरिजनमंदिरप्रवेश वगैरे प्रश्नाबाबत तात्यासाहेबांची मते जगजाहीर होतीच, त्यास अनुसरून त्यांनी या प्रश्नाकडे बघितले; पण काही विशिष्ट अडचणी त्यांच्यापुढे आल्यावर त्यांनी त्यांच्या नेहमीच्या मिळते घेण्याच्या धोरणानुसार आपले म्हणणे त्या कामी पुढाकार घेतलेल्या सनातनी इसमांना समजावून सांगितले. त्या वेळी मीहि त्यांच्या घरी त्या चर्चेच्या वेळी होतो अगदी शांतपणाने व खेळीमेळीच्या वृत्तीने तात्यासाहेबांनी मोकळ्या दिलाने चर्चा केली; पण आलेल्या सनातनी गृहस्थांनी वकिली बाण्याने बोलण्यास सुरवात करताच तात्यासाहेब एकदम म्हणाले की, "मीहि कायद्याचा अभ्यास केलेला आहे. तुमच्याप्रमाणेच कायदा थोडाबहुत मलाहि कळतो. असे प्रश्न कायद्याच्या काटेकोरपणाने न हाताळता समजुतीने सोडविले पाहिजेत." पण ही विचारसरणी आलेल्या गृहस्थांना न पटून ते आपले पूर्वीचेच घोडे तसेच दामटू लागले, हे पाहून कधीहि न रागावणारे तात्यासाहेब इतके रागावले की, त्यांचे त्यांना भान राहिले नाही. चेहरा तांबडा लाल झाला. डोळे गरगर फिरू लागले. मी तरी तात्यासाहेबांना इतके रागावलेले तोपर्यन्त पाहिले नव्हते. मीच मध्यें पडून त्या सनातनी वकिलांना खाली घेऊन गेलो व अशा तऱ्हेने ती वेळ मारून नेली.

( ३ ) तसेच आणखी फक्त एका प्रसंगी तात्यासाहेब असेच कमालीचे रागावलेले मी पाहिले. आमची कारभारी मंडळाची सभा पुण्याच्या

पंतसचिवांच्या वाड्यात चालू होती. त्या वेळीं कारभारी मंडळाच्या एका सन्माननीय सभासदानीं एका कामात भरमसाट, अप्रस्तुत व गैरवाजवी विधानें केलीं. ती पाहून तात्यासाहेब इतके गरम झाले की, तेथल्या तेथे तात्यासाहेबांनी कौन्सिल सेक्रेटरीला आपले म्हणणे लिहून घेण्यास सांगितले व ते त्या सन्माननीय सभासदास तेथेच दाखविले केळकरान्च्या रागाचा पारा भलताच वर गेलेला, अशा स्थितीत काम चालू ठेवणे योग्य नाही, असे पाहून मीच त्या वेळी काम दुपारपर्यन्त बद ठेवाव असे सुचविले व त्यामुळे वेळ निघून गेली त्याच दुपारी त्या सन्मान्य सभासदानी तात्यासाहेब याच्याकडे क्षमेची याचना करून ते प्रकरण तेथेच सपवावे अशी लेखी विनती केली व तात्यासाहेबानी तितक्याच सहज सुलभतेने ती स्वीकारून सकाळी नमूद केलेले म्हणणे कौन्सिलच्या प्रोसिडिंगमधून रद्द केल्याचे उद्गार तसेच विशाल अत.करणाने जाहीर केले !

काही जरूरीच्या कामासाठी मी तात्यासाहेब याच्याकडे रात्री अवेळी गेलो असताहि मी आलो आहे असे ऐकताच ताबडतोब येऊन शातपणाने माझ्याशी विचारविनिमय करून कामाचा निकाल लाविला

( ४ ) आता अखेरची एकच गोष्ट नमूद करावीशी वाटते. गेल्या ता १८ ऑगस्टला हिज हायनेस श्रीमत राजेसाहेब याचा राज्यारोहणाचा रजतमहोत्सव भोरास होणार होता. त्या वेळी भोर स्टेट बँकेतर्फे श्रीमताना मानपत्र व रात्रौ मेजवानी देण्याचे मुक्रर झालें होते. बँकेच्या डायरेक्टर बोर्डाचा चेअरमन या नात्याने मीं तात्यासाहेबाना मेजवानीला येण्यास विनती केली. ते त्याच दिवशी सायकाळी भोरहून परत पुण्यास येणार होते, पण मी आग्रहाची विनती केल्याने त्यांनी आपला पहिला कार्यक्रम रद्द करून राहण्याचे कबूल केले. मला फार आनद झाला ठरल्याप्रमाणे रात्रीं भोजन झाल्यावर बँकेच्या डायरेक्टरांसमवेत बराच वेळ गप्पागोष्टी करून मग ते दुसरे दिवशी पुण्यास गेले. त्यांचा स्वभाव भिडस्त, सहसा नाही म्हणून लोकास नाराज करावयाचे नाहीं. या वेळीं त्यानीं कायदे-कौन्सिल व हिंदी राजकारण ह्याबद्दल आपल्या जुन्या मजेदार कित्येक आठवणी सागितल्या.

तसेच त्यानीं मॅजजवळ पुष्कळ वेळा असे स्पष्ट सागितले की, भोरच्या राज्यकारभारांविषयी वर्तमानपत्रावरून माझें जे जरासें प्रतिकूल मत होऊ लागलें होते, किंबहुना झाले होते, ते मात्र प्रत्यक्ष अनुभवानतर बदलले आहे. टीका रास्त व योग्य केव्हाहि करावी, पण ती द्वेषमूलक केव्हाहि नसावी असा त्याचा दंडक होता. प्रत्यक्ष अनुभव घेतल्यानतर तात्यासाहेब म्हणत कीं, " कोठले सस्थान 'आयडियल' आहे ! पण राईचा पर्वत करणाऱ्या टीकाकारानं ही गोष्ट नेहमी लक्षांत ठेविली

पाहिजे कीं, त्याच त्याच गोष्टी पुनःपुन्हा वर्तमानपत्रात उगाळल्याने त्याचे महत्त्व आपोआपच नाहींसें होतें." शेवटी शेवटी तर तात्यासाहेब त्याच दृष्टीने भोरविषयीं येणाऱ्या टीकेकडे पाहत असत.

(५) कै. तात्यासाहेब हे खरोखरच मेरूसारखे होते कितीहि बिकट प्रश्न असो तो ते इतक्या उत्तम तऱ्हेने सहज सोडवीत कीं, मला तर फार कौतुकच वाटे. मी त्यांना पितृतुल्य मानी व त्याचीहि मजवर अल्पावधीतच वात्सल्यपूर्ण कृपा बसली. खेळीमेळीनें सर्वांस सुखावह काम करण्याची त्यांची हातोटी त्यांनाच साधली होती. असो. तात्यासाहेब याच्याविषयी कितीतरी लिहिता येईल; पण तो मोह आवरता घेऊन तात्यासाहेब याना माझी प्रेमाची श्रद्धाजलि मोठ्या सद्भावाने अर्पण करतो.

तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ॥
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥

वरील श्रीज्ञानेश्वर महाराज याच्या शब्दात तात्यासाहेब याच्या लेखनाचा थोडक्यांत आढावा घेता येईल असे वाटते



## वि. पां. दांडेकर

### (एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, बडोदें)

(१) गुरुवर्य तात्यासाहेब केळकर यांचे जीवन एखाद्या निर्मळ व सतत वाहणाऱ्या जिवत झऱ्याप्रमाणे होते. तृषार्त कसाहि असो, गरीब असो की श्रीमत असो, एकटा आलेला असो की कोणाच्या मध्यस्थीने आलेला असो, त्याची तहान तत्परतेनें नाहीशी करण्याचे कार्य झरा करतो. तात्यासाहेबाचें तसें होते. कोणी केव्हांहि त्यांच्याकडे जावो. ते त्याचें म्हणणे शांतपणे व सहानुभूतीने ऐकून त्याचे होईल ते काम करीत. इ. स. १९२६ साली माझी व तात्यासाहेबांची पहिली गाठभेट झाली. तत्पूर्वी त्यांची व माझी मुळीच ओळख नव्हती. त्याच्या वाङ्मयाचा मी एक चाहता होतो व दुरून, मी जेव्हा पुण्यास जाई तेव्हा, त्याचे दर्शन घेऊन मी समाधान मानीत असे. जर्नॅलिझम किंवा वृत्तपत्रीय शिक्षण आपणाला तात्यासाहेबांजवळ घेतां आले तर फार बहार होईल, असा मनांतल्या मनांत विचार करीत उन्हाळ्याच्या सुटीचे दिवस मी घालवीत होतो. येवढ्या थोर पुढाऱ्याची आपणाला भेट कशी घेता येईल आणि त्याच्याजवळ जर्नॅलिझमचे पाठ देण्याची विनती कशी करतां येईल या काळजींत एक दिवस एक पत्र मी तात्यासाहेबांना लिहून टाकिले. पत्रांत भेटीचा उद्देश व केव्हा भेटतां

येईल याविषयी मजकूर होता. तिसऱ्या दिवशी माझ्या पत्राचे मला उत्तर मिळालें. ते तात्यासाहेबांच्या हस्ताक्षरांत होतें व त्यांत त्याच दिवशीं तिसऱ्या प्रहरीं भेटून जाण्याविषयी लिहिले होते. एका अनोळखी व सामान्य माणसाच्या पत्राला उत्तर देण्याची कोण ही तत्परता ! किती पुढारी अशी उत्तरे देत असतील? पत्रात सांगितलेल्या वेळी तात्यासाहेबांच्या गायआळींतील घरी मी गेलो. दारावर टकुटक् करताच खाकरत खाकरत त्यानी दार उघडले व ते बाहेर आले. इतक्या जवळून मी त्यांना त्यापूर्वीं कधींहि पाहिलें नव्हते. धोतर नेसलेले, उघडे-बंब असें त्यांचे तेजस्वी नि गौरवर्ण शरीर पाहून मी जुन्या पद्धतीनें खाली वाकून त्यांना नमस्कार केला. मी त्याच्याकडे पाहिले तो त्याच्या ओठाच्या कडांतून स्मित बाहेर येण्याकरिता धडपडत होते. साहित्य-सम्राटासमोर साहित्याच्या क्षेत्रांतील एक भणगभिकारी या नात्यानें उभा राहून मीं माझ्या येण्याचा हेतु त्याना भीतभीत कळविला. तो ऐकून ते म्हणाले, " अस्स ! जर्नॅलिझमच अस वेगळ शिक्षण काही नसत; लिहिता लिहिता ते सर्व जमत. उद्या तुम्ही याच वेळी या." त्यांच्या आज्ञे-प्रमाणे दुसऱ्या दिवशी त्याच्या घरी जातांच ते मला म्हणाले, " सध्या लीग ऑफ नेशन्सविषयी बरीच चर्चा चालली आहे. या विषयावर येथे बसल्या बसल्या काहीं स्फुट विचार लिहा पाहू. मग काय करावयाच ते सागतो." त्याची आज्ञा हा महाप्रसाद समजून व मनातल्या मनात विचाराची गुफण करून मी वीस पचवीस ओळींचा मजकूर लिहिला. लीग ऑफ नेशन्सवर गारुडी व त्याच्या पोत-डीचे रूपक योजून मी सर्व मजकूर सजविला होता. मजकूर तयार होताच मी तो त्याना दाखविला व परीक्षेच्या परिणामाच्या साशकतेने मी त्याच्या चेहऱ्याकडे पाहू लागलों. दोन तीन मिनिटांत त्यानीं तो मजकूर वाचून संपविला. त्यांच्या मुद्रेवर मला समाधान दिसले. ते मला म्हणाले, "तुम्ही चागले लिहिले आहे. जात्यावर बसले कीं ओवी आठवते ती ही अशी. यात भरीला थोडा मजकूर घालून मी तो येत्या केसरीच्या अकांत छापायला देतो." असें म्हणत तात्या-साहेबानीं आपलें पेन हातात घेऊन माझ्या दोन परिच्छेदांखालीं तिसरा एक परिच्छेद जोडला व तो सर्व मजकूर लि. आ. म. ( लिहून आलेला मजकूर ) या सदराखाली केसरींत पुढें प्रसिद्ध केला. हा लेख एक मौल्यवान् ठेवा म्हणून मीं माझ्याजवळ जपून ठेविला आहे. घोगडीला शालजोडीचें ठिगळ लावावें तसा माझ्या मजकुराखाली त्यांचा मजकूर दिसतो ! थोडाहि गुण दिसताच त्याला उत्तेजन देण्याचा हा केवढा मनाचा मोठेपणा ! तात्यासाहेबांनी माझ्या पहिल्याच लेखाला जें अपूर्व उत्तेजन दिले तसे किती सपादक देत असतील ? माझ्या-सारख्या सर्वस्वी अनोळखी मनुष्याकरितां आपला महत्त्वाचा वेळ किती पुढारी घालवीत असतील ? अगदीं प्रथम भेटीला तात्यासाहेबांकडून मिळालेलें प्रोत्साहन

मला आजतागायत पुरलें आहे. एखादी गोष्ट हिंमतीने आपण करू शकू हा विश्वास त्याच्याच कृपेमुळें माझ्या ठिकाणी निर्माण झाला. निर्मळ झऱ्यासारखे परोपकारार्थ त्याचे जीवन होते असे जें मी म्हणतो ते यामुळेच.

( २ ) हाती घेतलेलें काम उरकण्यांत तात्यासाहेब वाघासारखे होते काम केवढेहि मोठे असो, ठराविक वेळेच्या आंत ते संपविण्याचे त्याचे चातुर्य व कसब हीं अजब होती. टिळकचरित्राचा पहिला खंड प्रसिद्ध होऊन पाच-सहा वर्षे झालीं तरी उरलेले खंड प्रसिद्ध होईनात, असे पाहून त्यांच्या असंख्य वाचकांनीं त्यांना ते लिहिण्याविषयीं अगदी गळ घातली. राजकारणाच्या व्यापापुढे तात्यासाहेबांना घडीची उसत मिळेना; पण त्यांनी ठरविले की, १९२७ साल संपण्यापूर्वी उरलेले टिळकचरित्र लिहून पुरें करावयाचे पुण्यात राहून हे होणें शक्य नव्हतें म्हणून ते मुद्दाम पाचगणीजवळ असलेल्या दांडेघर येथे जाऊन राहिले त्याच्याबरोबर त्या वेळीं लेखक म्हणून मीहि होतो ता २ ऑक्टोबर १९२७ ते २० ऑक्टोबर १९२७ पर्यंत आम्ही श्री. साठे याच्या बंगल्यात राहिलो बंगला उंच व निवान्त जागी होता व तेथून कृष्णानदीचे खोरें मोठे रमणीय दिसे टिळकासारख्या लोकोत्तर पुरुषाचे चरित्र लिहायला जसे स्फूर्तिस्थान असावे तसें हे होतें. त्या जागी रोज बारा बारा तास तात्यासाहेब आम्हा दोनतीन लेखकाना आलटून पालटून मजकूर सांगत. ज्या वेळीं आमच्यापैकी कोणीच हजर नसे त्या वेळी ते स्वतःच लिहीत बसत! टिळकचरित्राच्या पहिल्या खंडाच्या मानाने दुसरा व तिसरा हे खंड तितकेसे सरस उतरले नाहींत व ते तात्यासाहेबांनी स्वतः लिहिले नाहींत, अशा प्रकारची खोटी हूल काही निंदकानीं उठवलेली मीं ऐकिली आहे. त्यांपैकीं पहिला भाग हा मतभिन्नतेचा विषय होऊ शकला, तरी दुसरा भाग अगदीं धादांत खोटा आहे असें मी सांगू इच्छितो. टिळकचरित्राचा उत्तरार्ध हा अथपासून इतिपर्यंत स्वतः तात्यासाहेबांनी लेखकाना तोंडी मजकूर सागून तयार केला आहे; इतकेंच नाहीं तर, हा मजकूर लिहीत असताना चरित्रनायकाशी अनेक वेळां अगदीं समरस झालेले मी तात्यासाहेबाना पाहिले आहे. टिळक आणि क्रांतिकारक यांच्या परस्पर संबधाविषयी मजकूर सांगताना एका रात्री तात्यासाहेब इतके रंगले कीं, घड्याळांत बारा वाजून गेल्याचेंहि त्यांच्या लक्षात आले नाहीं! त्या अठरा-बीस दिवसांत तात्यासाहेब अगदीं टिळकमय बनले होते अनेक फाइली व हजारों पत्रे धुंडाळून ते मनातल्या मनांत विषयाची रूपरेषा आखीत आणि मग आम्हांला भराभर मजकूर सांगत. रात्रीचे काय सहा-सात तास ते झोपतील तेवढेच. बाकीच्या वेळांत ते चरित्राच्या कामातच गुतलेले असत. शेवटी त्यांच्या इच्छेप्रमाणे व संकल्पाप्रमाणे त्यानी टिळकचरित्राचा उरलेला सुमारे सात-आठशे पानांचा मजकूर तेवढ्या अठरा दिवसांत तयार केला!

( ३ ) तात्यासाहेबांची साहित्यविषयक काहीं विशिष्ट मते होती. त्यांपैकीं बरींचशी लेखरूपाने प्रसिद्ध झाली आहेत. त्याच्याशी गप्पागोष्टी करीत असतांना मला जी काही विशेष वाटली ती येथे देतो भाषाशैलीसबधाने तात्यासाहेबांचें असे मत होते की, तिचे अनुकरण होऊ शकत नाही व कोणी करू नये. जसें प्रत्येकाचे चालणे, बोलणे हे वैशिष्ट्यपूर्ण असते तशी त्याची शैलीहि असते मनुष्याचे प्रतिबिब भाषाशैलीत पडते भाषाशैलीप्रमाणे वर्णनशैली किंवा वर्णनाच्या पद्धतीसबधी त्याचे असे मत होते की, वर्णन सूचक असावें, सपूर्ण नसावे शेवटच्या टोकापर्यंतचे, अथपासून इतिपर्यंतचे वर्णन नसावे. एक पायरी अलीकडचें वर्णन असावे याच्याकरिता अर्थातच सयमाची जरूरी असते. या बाबतीत पाचगणी [illegible] एका सध्याकाळी आमच्या गप्पा चालल्या असताना त्यानी 'लाऊकन' या सुप्रसिद्ध शिल्पकृतीवर लेसिंगने जे लिहिले आहे त्याचा उल्लेख केला. लेसिंगने असे सागितले आहे की, खरी कला ही उपान्त्यावस्थेत असते, अन्तिम अवस्थेत नसते. ( ऑल आर्ट इज पेनल्टिमेट, नॉट अल्टिमेट ) [illegible] मराठी कादंबरीकार सर्व काही वर्णन करून सागतात, या पद्धतीवर त्याचा आक्षेप त्यानी विस्तारानें त्या दिवशी माडला लिहिणे अवास्तव किंवा भावनेच्या फाजील आहारीं गेलेलें नसावे, असे तिसरे एक त्याचे खास मत होते. खुद्द लेखकाच्याच तर्कबुद्धीला न पटणारे असे पुष्कळ वाङ्मय प्रसिद्ध होते. ते अर्थातच त्याना आवडत नसें. आपण वर्णन केलेल्या गोष्टी सभाव्य आहेत किवा नाहीत, यासबधी लेखकाने स्वतःच स्वतःला प्रश्न विचारून समाधान करून घ्यावे, असे ते म्हणत.

( ४ ) माझ्या लक्षात आलेल्या [illegible] काही आवडीनिवडीसबधानें चार शब्द लिहितो तात्यासाहेबाना शेगादाणे फार आवडत असत, हे आतां सर्वांनाच माहीत झाले आहे, आणि ज्यांना त्याच्या इतर गुणांचे अनुकरण करता येत नाहीं ते शेंगादाणे खाऊन तात्यासाहेबाचे अनुकरण करितात ! जेवताना त्याना मधूनमधून चमच्याने आमटीचे घोट घ्यायला आवडत असे पांचगणीच्या मुक्कामांत हे मी पाहिले. आमच्या बरोबरचा गोपाळराव स्वयपाकी तात्याच्या पानांत एक चमचा ठेवी पुढे ह्या चमच्याचा उपयोग माझ्या लक्षात आला. दुपारचे भोजन झाल्याबरोबर अर्धा पाऊणतास ते न चुकताना झोप घेत झोपतांना तोडावर बारीकसें पाघरूण घेऊन त्याना झोपण्याची सवय असे. पाचगणी येथे असतांना बूट-पाटलोण, कोट असा पोषाक करून ते सकाळी फिरायला जात. परतु हा पोषाक त्यांना घालायला आवडत नसे व तो त्याना धड घालताहि येत नसे सामान्यपणें तात्यासाहेबांना सुपारीचेहि व्यसन नव्हते, असे म्हणायला हरकत नाही टिळकांचे शिष्य असूनहि त्याना सुपारीचें व्यसन लागलें नाही हे आश्चर्य आहे. परतु क्वचित् त्यांना मन प्रसन्न बनविण्याकरितां छोटयाशा उत्तेजकाची जरूरी भासे एका लाकडी कुपीत अत्तराचा

फाया किंवा सुगधी तपकीर ठेवून, ती कुपी मधूनमधून ते हुगीत असत अगदी एकदाच मीं त्याना पाचगणीच्या मुक्कामात सिगरेट ओढताना बघितले. मला पाहताच ते म्हणाले, "काही तरी 'सेन्सेशन' ( उत्तेजन ) असावे म्हणून मी ओढतो." तात्यासाहेबाना चहा विशेष आवडे आणि एका कपाने त्याचे समाधान न होता ते बहुधा दीड दोन कप चहा घेत सर्व व्यवसायात त्याना प्रोफेसराचा व्यवसाय विशेष आवडत असे. पुण्याला जेव्हा केव्हा मी जाई तेव्हा त्याचे, मला पाहताच, हसत हसत पुढील वाक्य ठरलेले असे "जन्माला यावे आणि प्रोफेसर व्हावे" तात्यासाहेबाना आपले वाङ्मय ( वृत्तपत्रीय सोडून ) दुसऱ्याना – अर्थातच समान शील अशा रसिकाना – वाचून दाखवायला आवडत असे पुणे व पाचगणी अशा दोन्ही ठिकाणी तात्यासाहेबानी मला अनेक वेळा आपल्या कविता व नाटके वाचून दाखविली आहेत चद्रगुप्त व कृष्णार्जुनयुद्ध ही दोन्ही नाटके त्यानी मला अथपासून इतिपर्यंत वाचून दाखविली वाचत असताना ते अगदी तद्रूप होऊन वाचीत.

( ५ ) आणखी एकच महत्त्वाची आठवण सागतो इ. स १९४५ च्या ऑगस्टमध्ये काही कामानिमित्ताने मी पुण्यास गेलो होतो. पुण्यास गेल्यावर एक दिवस तात्यासाहेबांकडे जेवावयाला जावेच लागे. त्याप्रमाणे ता १३ ऑगस्ट रोजी मी त्याच्याकडे जेवायला गेलो. पक्तीत रा अण्णासाहेब व बापूसाहेब केळकर हेहि होते. जेवताना ज्योतिषासबधी गोष्टी निघून मुबईच्या एका ज्योतिषाने त्या वर्षाच्या दिपवाळीत तात्यासाहेबाच्या मृत्यूचे भविष्य वर्तविल्याविषयीं खुद्द त्यांनीच सागितले. ते सागत असताना अगदी हसत हसत तात्यासाहेब बोलत होते "असल्या भविष्याचा माझ्या मनावर काहीदेखील परिणाम होत नाही," असे त्यांनी त्या वेळी सागितले जेवण झाल्यावर त्याची वामकुक्षी घेण्याची सवय मला माहीत असूनहि मी त्याच्या मागोमाग वर गेलो व म्हणालो, "तात्यासाहेब, पुनर्जन्मासबधाने आपले काय मत आहे?" त्यावर क्षणाचाहि विचार न करता ते म्हणाले, "पुनर्जनन आहे, पुनर्जन्म नाहीच मुळी. मेल्यावर मनुष्याच्या देहाचे कण मातीत किंवा हवेत मिसळतात हे कण यदृच्छेने व काही रूपाने एकत्र येऊन त्याना जो जन्म मिळत असेल तो फार झाले तर पुनर्जन्म म्हणून मानता येईल. येरव्ही काही नाही आहे या शरीराचा येवढ्याचसाठी अधिकाधिक लोकाकरिता उपयोग करीत राहणे हे माझे जीवित तत्त्वज्ञान आहे." तात्यासाहेबाच्या या उद्गारात आणि मृत्यूच्या काही तास पूर्वी त्यानी लिहून ठेविलेल्या दोन श्लोकात किती विलक्षण साम्य आहे, हे वाचकानी ताडून पाहावे.

❋

## वामन कृष्ण परांजपे

### ( बी. ए., एलएल्. बी., वकील, पुणें )

केळकराच्या कैलासवासामुळे अनेक गुण निराश्रित झालेले आहेत. त्यापैकी गुणग्राहकता, माणुसकी, पक्षाधतेचा अभाव, ग्राह्याग्राह्यविवेचनशक्ति, उद्योगशीलता आणि अष्टपैलूपणा हे प्रमुख होत. ह्या गुणाना दुसऱ्या कोणाकडे केव्हा थारा मिळेल तो मिळो, पण तूर्त तरी हे गुण 'निर्वासित' झालेले आहेत, यांत शका नाही. सुजनता ही तर त्याच्या स्वभावाची शोभा होती. म्हणूनच सद्विचार, सत्सग आणि सदुद्योग याचे सतत खत मिळणाऱ्या त्याच्या स्वभाववृत्तीच्या वेलीवर वर दिलेल्या सद्‌गुणाची सुदर फुले सदोदित फुललेली दिसत असत. आणि म्हणूनच मतभेदाच्या आणि पक्षभेदाच्या चिखलातून त्याचे हृदयकमल लीलेने वर येऊ शकत असे आणि उमलून डौलाने डुलत असें! खाली दिलेल्या तीन आठवणी ह्या वर सागितलेल्या वृत्तीच्याच द्योतक आहेत.

( १ ) कै शिवरामपत पराजपे याच्या मृत्यूनतर त्यानी लिहिलेलें 'पहिला पाडव' हे कर्ण-चरित्रावर लिहिलेले नाटक रगभूमीवर आले होते. पहिला किंवा दुसराच प्रयोग असेल स्थळ किर्लोस्कर थिएटर, कपनी महाराष्ट्र नाटक मडळी तात्यासाहेबाना कपनीने मुद्दाम निमंत्रण केलेले असले पाहिजे, हे उघडच आहे. त्या वेळी महाराष्ट्र नाटक मडळीचा नटसच चागला होता आणि विशेषतः टिपणीस व पोतनीस हे नामाकित नट अनुक्रमे कर्ण आणि कुती याच्या भूमिका अतिशय उठावदार व परिणामकारक रीतीने करीत असल्यामुळे नाटकाला चागलाच रग भरत असे तात्यासाहेब पहिल्या रागेत मध्यालगतच्या पहिल्याच खुर्चीवर बसलेले होते सदर नाटकाच्या दुसऱ्या अकातला शेवटला प्रवेश कर्ण आणि कुंती यांच्या भेटीचा असून त्याचा हा सभाषण-प्रसग कमालीच्या करुणरसानें अत्यंत ओथबलेला आहे कर्ण हा कौरवाच्या पक्षाचा सेनापति आणि पांडवांची माता कुंती ही [illegible] पण जन्मदात्री आई! त्याचे हे सभाषण म्हणजे दोन कर्तव्यांचा निष्ठुर झगडा. नाती तुटण्याचा तसाच आतडी तुटण्याचा तो प्रसग! अशा रीतीनें विलक्षण परिस्थितीत आणि कात्रीत सापडलेल्या मातापुत्राचा हा अतःकरण पिळवटून काढणारा प्रवेश जेव्हा रगू लागला, त्या वेळी रसार्द्र झालेल्या तात्यासाहेबाचे अत करण हेलावून जाऊ लागले. दुसऱ्या दिवशी कर्ण आणि अर्जुन याचे हिरीरीचे युद्ध व्हावयाचे होते आणि [illegible] कोणीतरी एक कुतीच्या पोटचा गोळा दुसऱ्या गोळ्याच्या हातून मरावयाचा होता! अशा रीतीने या प्रवेशात कुती आणि कर्ण याच्या अगतिकतेतून आणि दैवगतीच्या विचित्र निष्ठुरतेतून निर्माण झालेला आणि अखेर विलापानीं विव्हल झालेल्या कुतीला मूर्छा आल्यामुळे

कळसापर्यंत पोचलेला तो करुण रस ज्या वेळी नाट्यगृहातील सहृदय प्रेक्षकाच्याकडे वळून पावती मागू लागला, त्या वेळी हे लक्षांत आलें की, तात्यासाहेबानी आपली पावती केव्हाच देऊन टाकलेली होती. त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा चालल्या होत्या आणि आपल्या उपरण्याने ते वारवार आपले डोळे पुशीत होते।

( २ ) सन १९३७ मध्यें कॉंग्रेसने पहिल्यादा आधिकार-स्वीकार केला त्या वेळीं मुबईच्या कॉंग्रेस मन्त्रिमडळाने एक बेत मनात योजला होता तो असा की, गुजराथेतल्या सुप्रसिद्ध बार्डोलीच्या लढ्यात ज्या शेतकऱ्याच्या जमिनी गेल्या किंवा ज्या लोकाचे नुकसान झाले किंवा ज्यानी त्याग केला त्याना सरकारतर्फे मोबदला देण्यांत यावा ह्या सुमाराला कॉंग्रेस पक्ष आणि लोकशाही स्वराज्य पक्ष याच्यामधली तेढ आणि चुरस अतिशय तीव्र झालेली होती. लोकशाही स्वराज्य पक्षाचे पुढारी श्री जम्नादास मेथा हे त्या वेळी कौंसिलात आपल्या तिखट व खोचदार वक्तृत्वानें कॉं सरकारावर भडीमार करीत होते अशा वेळी जेव्हा कॉ सरकारने बार्डोलीच्या सत्याग्रह्याच्या मोबदल्याचा बूट काढला तेव्हा तोडीस तोड म्हणूनच की काय जम्नादासानींहि आपली एक प्रतियोजना काढली. जम्नादासाची योजना अशी कीं, जर बार्डोलीवाल्याना मोबदला द्यावयाचा तर महाराष्ट्रात पूर्वीपासून म्हणजे टिळकाच्या राष्ट्रीय चळवळीपासून किंबहुना १८५७ पासून ज्यानी ज्यानी चळवळींत भाग घेतला आणि स्वार्थत्याग केला त्यांचीहि यादी करावी आणि त्यांनाहि सरकारनें मोबदला द्यावा. कॉ. सरकारच्या योजनेला जम्नादासाचे हे प्रत्युत्तर होते लगेच ह्या कल्पनेचा पाठपुरावा करण्याकरिता आणि त्याला पाठिंबा मिळविण्याकरिता जम्नादासांनीं टिळकमदिरात जाहीर सभा भरविली आधीच सभेतील वातावरण जम्नादासाना आणि त्याच्या योजनेला अनुकूल असे होते त्यातच जम्नादासाच्या कॉंग्रेसवरील खमग आणि कडक टीकेची भर पडल्यामुळे श्रोतृसमाज पूर्णपणे त्याच्या बाजूला झुकला. आणि ते ज्या वेळेला आपले भाषण सपवून खाली बसले त्या वेळी अत्यत उत्साहानें टाळ्याचा कडकडाट करून श्रोत्यांनीं आपला सतोष आणि संमति व्यक्त केली.

ह्या सभेला तात्यासाहेब केळकर हजर होते. त्यामुळें संकल्पित कार्याला अधिक पुष्टि मिळण्याच्या अपेक्षेने त्यांना बोलण्याची विनती करण्यांत आली. प्रथम ते भाषण करण्याला किंचित् नाराज दिसले; परतु सभेनें टाळ्यांच्या रूपाने वारंवार आग्रह केल्यामुळे ते बोलावयास उठले. तात्यासाहेबानीं पहिलेंच वाक्य उच्चारलें तें असें –

" तुम्ही मला बोलायला अतिशय उत्साहानें आग्रह करतां आहांत.खरें; पण मी जें बोलणार आहे ते तुम्हांला माहीत असत, तर हा आग्रह मला तुम्हीं केलाच नसता ! तुम्हांला कडू लागेल—अप्रिय वाटेल असच माझ या बाबतींत मत आहे. "

अशी प्रस्तावना करून तात्यासाहेबानी आपला दृष्टिकोन निर्भीडपणाने सभेपुढे मांडला. त्यांचें म्हणणें असें होतें की, एकाने गाय मारली म्हणून आपण वासरूं मारावे अशा इरेस पेटून आपण तत्त्वच्युत होत आहोंत. स्वार्थत्यागाला मोबदला देऊ पाहणे ही गोष्ट मुळातच घातुक आणि अनिष्ट आहे. एका पक्षाचें सरकार झालें कीं, लगेच त्याने आपल्या पक्षांतील चळवळ्याना नुकसानभरपाई अगर मोबदला देणे म्हणजे एक प्रकारें राजकीय लाच दिल्यासारखेंच होय ! म्हणून अशी घातुक प्रथा पाडण्यालाच विरोध केला पाहिजे. कॉं. सरकारने ही घातुक टूम काढली म्हणून आपणहि तशीच काढणें ही तत्त्वाच्या दृष्टीनें मोठी चूक आहे. याकरितां आपण कॉंग्रेस सरकारच्याच मूळ कल्पनेचा निषेध केला पाहिजे.

तात्यासाहेबाच्या ह्या विचारसरणींतलें अचूक तत्त्वशोधन तर मार्मिक श्रोत्याना पटलेंच; पण उघडउघड सभेचे मत आपल्या दृष्टिकोनाच्या विरुद्ध आहे, हे दिसत असतांहि सभेतल्या चुरशीच्या वातावरणाच्या वर जाऊन निःपक्षपाती बुद्धीने विवेक करून आपले खरे मत स्पष्टपणें मांडण्यांत तात्यासाहेबांनीं जो निर्भीडपणा प्रकट केला, त्याची छाप सुज्ञ आणि बुद्धिनिष्ठ श्रोत्यांच्यावर अधिक पडली, यांत सशय नाही.

( ३ ) मी कै शिवरामपत परांजपे यांचें चरित्र लिहून १९४५ च्या सप्टेंबर महिन्यांत प्रसिद्ध केले अर्थातच त्याची एक प्रत मीं तात्यासाहेबाकडे भेट म्हणून पाठविली होती. ह्या ग्रथात केळकराच्यावर प्रखर टीका आहे परतु माझ्या अपेक्षेला धक्का देणारी गोष्ट अशी की, तात्यासाहेबांच्याकडे पुस्तक पाठविल्यापासून चारच दिवसाच्या आत त्यानीं लिहिलेलें पत्र माझ्या हातांत पडलें. त्यांत त्यांनीं 'माझी तिसरी पिढी असतानाहि' इतकी जुनी माहिती 'एखाद्या माहितगाराप्रमाणे' दिल्याबद्दल मला धन्यवाद दिले होते आणि 'अनेक अंगानीं उत्कृष्ट ग्रथ' लिहिल्याबद्दल माझें मोकळ्या मनाने अभिनदन केलें होतें !

पण एवढ्यावरच हे थाबलें नाही. एवढाच प्रकार घडला असतां तर कदाचित् ही आठवण नमूदहि केली नसती. वरील गोष्टीनंतर सुमारे चार महिन्यांनतरची हकीकत जाहिरातीच्या कामासबंधात मी गायकवाडवाड्यांत शिरत होतो. दरवाजाच्याच बाहेर उभ्या असलेल्या एका टाग्यात तात्यासाहेब नुकतेच चढून बसले होते आणि त्याचा टागा चालू झाला होता खर म्हणजे मीं तात्यासाहेबाना वाड्याच्या दरवाज्यातून आत शिरत होतो तेव्हां पाहिलें होते. पण मी आंत वळून आपल्या कामाला चाललों होतो. इतक्यात 'अरे' अशी तात्यासाहेबाच्या नेहमींच्या घोगऱ्या स्वरात मोठ्यांदा मारलेली हांक मला ऐकू आली. त्यानीं मला ओझरतें आत शिरताना पाहिलें होतें. मी लगबगीने बाहेर आलों. त्यानीं टागा थाबविला होता. मी नमस्कार

करून अदबीनें किंचित् अंतरावर उभा राहिलों त्यांनी बोलण्यास सुरुवात केली — " अरे, फार चांगल पुस्तक लिहिलं आहेस तूं " तेव्हां मीं म्हटलें, " तात्यासाहेब, आपण अभिनंदनाचं पत्रहि पाठवलं होतं आणि त्याला मीं आभाराचं उत्तर धाडलं होतं तें मिळालं ना ? " त्यावर ते म्हणाले, " अरे तें खरं, पण मीं पुन्हां दुसऱ्यांदा वाचलं सबंध पुस्तक फारच उत्तम लिहिलं आहेस . " पण येवढ्यानेंहि त्यांचे समाधान झाले नाही त्यांनी मला हाताला धरून पुढें ओढून पाठ थोपटली. त्यानंतर इतर कांही औपचारिक कुशल प्रश्न विचारून झाल्यानंतर त्यांनीं मुख्य मुद्द्याला हात घातला मी पुढे काय करणार आहें, पुढला ग्रंथ कोणता लिहावयाला घेतला आहे, सतत लेखनाचा अभ्यास-व्यासंग ठेवतोस की नाहीं, याची त्यांनी अत्यंत आस्थेवाईकपणानें चौकशी सुरू केली मला या चौकशीत तात्यासाहेबांचे लेखनकलेविषयीचें खरे प्रेम, जानिवंत जिव्हाळा आणि लेखनकलेच्या अभिवृद्धीसंबंधीची अंतर्यामीची आस्था व ओढ स्वच्छपणाने दिसून आली. त्यांनीं प्रकट केलेली खिलाडू वृत्ति तर आल्हादकारकच होती. घरी आल्यावर त्या दिवशीच्या डायरांत मी पुढील नोंद करून ठेवली — ' आज पुस्तक लिहिल्याचे चीज झाले ! '



## शंकर रामचंद्र दाते

( बी. ए., संपादक काळ, पुणें )

( १ ) सुमार अठ्ठावीस वर्षापूर्वीची गोष्ट. सन १९१९ सालीं मी एका शिकविणीच्या निमित्ताने उस्मानाबाद या गावी सुमारे एक महिना राहिलों होतों तेथें माझी श्री रामचंद्रराव मास्तर यांची गाठ पडली पुण्यात असताना त्यांच्यासंबंधाने मला विशेष कांहीच माहिती मिळाली नव्हती. पण एका मित्राने मला त्यांचे नाव व पत्ता देऊन त्यास भेटण्यास सांगितले होते एक दिवस मी त्यास भेटावयास गेलों असता त्यांनी मला आपण कोण, कोठले म्हणून विचारले उस्मानाबादसारख्या शहरांत माझ्यासारख्या पुणेरी गृहस्थाचे आगमन पाहून त्यांच्या मनावर आश्चर्य व किंचित् भीतीहि दिसू लागली होती. पण मला आपणास भेटण्याविषयीं अमुक गृहस्थाने सांगितल्यावरून मी भेटावयास आलों, असे मी त्यास सांगतांच त्यांनी एकदम उठून मोकळ्या मनाने माझें स्वागत केले, व विश्वासानें माझ्याशी ते बोलू लागले. हे रामचंद्रराव मास्तर म्हणजे नाशिकच्या जॅक्सन खुनाच्या खटल्यात दीर्घकालीन शिक्षा भोगून बाहेर पडलेले व सी आय डी च्या सासुरवासामुळे तिला चुकवून मोगलाईत जाऊन राहिलेले क्रांतिकारक देशभक्त रामभाऊ भावे हे होत. त्यांची माझी पुढे बरीच सलगी झाल्यानंतर त्यांनी आपल्या वनवासाच्या व क्रांति-

कारक चळवळीच्या अनेक गोष्टी मला सांगितल्या. त्यात त्यांनी तात्यासाहेब केळकर यांची एक गोष्ट सांगितली. ते म्हणाले – " मी जेव्हा तुरुंगांतून सुटून आलो तेव्हां घरादारास मुकलेला, स्नेह्यासोबत्यास अतरलेला, निराधार व निराश्रित अशा अवस्थेत पुण्यास आलो. तो काळ असा होता कीं, आम्ही क्रांतिकारक तुरुंगात असलो किंवा बाहेर असलो तरी आमच्या मागे सी आय डी चा ससेमिरा अक्षय्य असे. तुरुंगातून बाहेर आल्यावर ज्यांच्याबद्दल आम्हांला अतिशय आदर वाटत असे किंबहुना ज्याच्या शिकवणीनें व विचाराने आम्ही क्रांतिकारक मार्गात दाखल झालों, त्याना एकवार भेटावे व त्यांची सल्लामसलत घ्यावी हा विचार साहजिकच मनात आला; परतु दुःखाची गोष्ट अशी की, ज्या मडळीना भेटावे अशी आम्हास उत्कठा लागली होती ते लोक आम्हास टाळण्यास निमित्त शोधीत व आम्हास दूर दूर करीत असा अनुभव आला ! त्यामुळे तर माझ्या मनाला अधिकच दुःख व वेदना झाल्या.

या वेळी मला जर कोणी आशेचा ओलावा दाखविला असेल व आधाराचा शब्द बोलला असेल तर ते तात्यासाहेब केळकर हे होत ! वास्तविक पाहता तात्यासाहेब क्रान्तिकारक प्रवृत्तीना नाउमेद करणारे गृहस्थ असल्यामुळे मवाळ म्हणून आम्ही त्याची हेटाळणी करीत असू; पण ज्याचा आम्ही आधार अपेक्षिला त्यांनी आम्हास सोडून दिल्याचा व ज्यांच्यापासून आम्ही कधींहि साहाय्याची अपेक्षा केली नाहीं त्या तात्यासाहेब केळकरानी मात्र आम्हास आधार देऊन जवळ केल्याचा प्रत्यक्ष अनुभव आला

मी जेव्हा तात्यासाहेबाना भेटावयास गेलो, तेव्हा त्यानी माझे मोठ्या प्रेमभराने स्वागत केले; एवढेच नव्हे तर त्यानी मला आपल्या घरी ठेवून घेण्याचीहि तयारी दर्शविली व आर्थिक साहाय्यहि केले तात्यासाहेबांच्या जवळून पैशाची मदत घेताना मी मनात अतिशय खजील झालो होतो मी सकोचतो आहें हे त्याच्याहि लक्षात आले, तेव्हा ते मला म्हणाले – ' हे पहा भावे ! तुमच्यासारख्या स्वाभिमानी माणसाला मजसारख्यापासून १०–२० रु घेण्यास सकोच वाटावा हे मलाहि समजू शकते फुकट कोणाचे आपण घ्यावे हे स्वाभिमानी मनाला पटू शकत नाही हे खरे, पण तुम्ही तसा सकोच बाळगण्याचे कारण नाही. आणि तुम्ही ज्या परिस्थितीत आहांत त्या परिस्थितींत तर आमच्यासारख्यावर तुमचा हक्कच आहे. त्यातून तुमच्या मनास समाधान वाटत नसलेच तर तुम्ही असे करा की, रोज तासभर घरी येऊन माझ्या मुलांस शिकवीत जा; म्हणजे, आपण कोणाचे फुकट घेतले नाही असेहि समाधान तुम्हास लाभेल व तुमची अडचण तात्पुरती का होईना पण भागू शकेल ! '

तात्यासाहेबाच्या ह्या निर्व्याज, प्रेमळपणामुळे मला त्याच्याबद्दल केवढा

आदर वाटू लागला व कृतज्ञता वाटली याचे शब्दाने वर्णन करणे कठीण आहे. त्या वेळीं सबध पुण्यात मला धीर देणारे व मदत करणारे दोनच पुढारी भेटले; ते म्हणजे तात्यासाहेब केळकर व भाऊसाहेब लवाटे हे होत ”

( २ ) पुण्यास काही दिवसापूर्वी डॉ. शामाप्रसाद मुकर्जी हे आले असता त्याना, शेट माणिकचद यांनी एक मोठी मेजवानी दिली. त्या मेजवानीस पुण्यांतील अतिशय निवडक असे सुमारे ४० लोक बोलावले होते जेवणे झाल्यावर त्यानीं प्रत्येकास स्वतत्र हार व गुच्छ दिले होते पान-सुपारी होऊन बाहेरची बहुतेक मडळी निघून गेल्यावरहि आम्ही १०–१२ जण जावयाचे राहिलो होतो. पुढे कॉफी घेण्याची गोष्ट निघाली तेव्हा सहाजिकच जाणे थोडें लांबले

आमच्या गळ्यात घातलेले हार आम्ही सर्व एकत्र ठेवल्यामुळे हाराचा ढीग बराच मोठा दिसत होता हार घालणाराने एखाद्याच्या गळ्यात हार घातल्यास तो गळ्याला टेकल्या न टेकल्याबरोबर काढून ठेवण्याची पद्धत पडली आहे. माणिकचंदजी याचे बधु वालचद शेटजी म्हणाले, हे हार घालण्याकरता असून ठेवण्याकरता नाहीत म्हणून ज्याने त्याने आपला हार घातला पाहिजे; हार घालून बसण्याचा आग्रह सुरू झाला व एकमेक एकमेकाना आग्रह करून हार घालू लागले. शेवटी आम्ही दहाबाराजणानी एकमेकाना हार घालून घेतले; व जाईपर्यंत ते काढावयाचे नाहीत असे ठरले आमचा हा गोंगाट इतका वाढला होता की, शेजारच्या हॉलमध्ये तात्यासाहेब केळकर बसले होते, त्याना तो ऐकू गेला; तेव्हा आमचे काय चालले आहे हे पाहण्यासाठी ते हळूच आत आले, तो आम्ही सर्वजण खुर्च्यांवर गळ्यात हार घालून बसलेले त्यानीं पाहिले ! तेव्हा आम्ही जरा चपापलो व गळ्यातील हार काढून जरा आटोपशीर बसू लागलो, तेव्हा तात्यासाहेब खेळीमेळीत म्हणाले “ होता तसेच बरे दिसता ! जणू सर्कसच भरली आहे ! तुम्ही गळ्यातून हार काढण्याचे कारण नाही.” पण आम्ही सकोचतो आहोत हे पाहून त्यानी स्वत. पलीकडच्या खोलींतून एक हार आणला व स्वतःच्या गळ्यांत घालून आमच्यामध्ये येऊन बसले व हसत म्हणाले, “ आता तरी तुम्हास सकोच वाटण्याचे कारण नाही ना ! ”

तात्यासाहेब थोरात थोराहून थोर होते, तर लहानात लहानाशी मिसळून वागण्यात त्याना आनद वाटे तात्यासाहेब हे महाराष्ट्रातील लोकाना आपल्या कुंटुबातील वडील माणूस असे नेहमी वाटे, त्याचे कारण त्यांच्या सर्वांशी मिळूनमिसळून वागण्याचा प्रेमळ व निर्मळ स्वभाव होय.



## माधवराव वि. किबे

(सरदार, इंदूर)

(१) इंदुरास महाराष्ट्र साहित्य संमेलनाची बैठक ठरविली गेली. ते दिवस संशयाचे, म्हणून सोवळे असे साहित्यिक, श्री. आगाशे यांची अध्यक्षस्थानीं योजना केली. पण लहानापासून थोरांची इच्छा ही की, तात्यासाहेबांनी समारंभास यावे. त्याप्रमाणे ते आग्रह केल्यावरून व काही त्रास होणार नाही असें पूर्ण आश्वासन मिळाल्यानें, आले ते केव्हा येणार हे नक्की न कळल्याने त्यांच्या स्वागतार्थ स्वागताध्यक्ष कै. जनरल मतकर किंवा कार्याध्यक्ष कै. डॉ. गो. रा. तांबे हे स्टेशनवर जाऊ शकले नाहींत. कांही स्वयंसेवक हजर होते. त्या दिवसांत प्रत्येक सार्वजनिक कार्यांत पडणाऱ्यावर पोलिसाची देखरेख असे. अशा व्यक्ति नंबराने ओळखल्या जात. प्रस्तुत लेखकाचाहि नंबर होता. तात्यासाहेबांचा होता, यांत आश्चर्य नाहीं. येथील पोलिसांस बातमी आली की, अमुक नंबर येत आहे. तात्यासाहेब गाडीतून उतरतांच त्यांना पोलिसांनी घेरले व चौकीवर चला म्हणूं लागले. तात्यासाहेबांनीं सांगितलें कीं, "मी येणार नाहीं. वाटल्यास उचलून न्या." इतक्यात ही बातमी मला कळली. मी ती फोनने मुख्य प्रधान, मेजर दुबे, यांस कळविली. तावडतोब पोलिसांस हुकूम गेला. स्वागताध्यक्ष आदि स्टेशनवर हजर झाले व तात्यासाहेबांची क्षमायाचना करून त्यांना मोठ्या आदबीनें उतरण्याच्या ठिकाणीं नेले.

(२) इ. १९२१ च्या उन्हाळ्याचे दिवस आम्ही सहकुटुंब सिंहगडावर जाऊन राहिलो होतों लोकमान्यांचा बंगला श्री रामभाऊ टिळकांनी आम्हांस मोसमाकरिता राहण्यास दिला होता. एके दिवशी ११ च्या सुमारास श्री. तात्यासाहेब स्वामी सत्यदेव यांना घेऊन गडावर फिरून बंगल्याजवळ आले. आम्हां उभयतास पाहून विनोदाने ते म्हणाले, "लोकमान्यांच्या बंगल्यात जो राहत असेल तो आम्हास जेऊ घालील. त्यावर आमचा हक्कच आहे! असें समजून आम्ही तर आलो, पाहा बुवा!" अर्थात् त्यांच्या पंक्तीचा आम्हांस अनायासे लाभ झाला

❋

## दत्तात्रेय व्यंकटेश बेळवी

(बी. ए., एलएल्. बी., ॲडव्होकेट, बेळगांव)

(१) तात्यासाहेबांची स्वारी आपल्या मंडळीसह इ स. १९३९ मध्ये मुंडाजेहून पुण्यास परत जाताना बेळगावांत नेहमीप्रमाणें आमच्या येथें मुक्कामास येणार होती. गाडी येण्याची वेळ सकाळची असल्यामुळे आम्ही त्यांची वाट पाहत दरवाज्यात उभे होतो. इतक्यात त्यांना घेऊन येण्याकरिता स्टेशनवर

गेलेल्या आमच्या मोटारीचा हॉर्न ऐकू आला व लगेच मोटार दरवाज्यात उभी राहिली. मोटारीचा दरवाजा उघडताच त्यांची हातात धरण्याची काठी मोटारच्या दरवाज्यांतून खाली पडली. तेव्हा मी म्हटले, "तात्यासाहेब, काठी खाली पडली." तेव्हा तात्यासाहेबांनी लगेच हसून उत्तर दिले, "नाही, नाही, पडली नाही. वडील तुम्ही. तेव्हा तुम्हाला काठीने माझ्या आधी घाईने विनयपूर्वक दंडवत घातला!"

(२) मागे एकदा तात्यासाहेब बेळगावास आले असता येथील मिशन हायस्कुलात अेक सार्वजनिक सभा भरली होती. अध्यक्षस्थानी तात्यासाहेब होते. समारोपादाखल भाषण करताना त्यानी खालील विनोदी गोष्ट सागितली "पाश्चात्य देशात कधी कधी अगदी जख्खड म्हातारेसुद्धा लग्नाच्या मडोळ्या बाधून घेण्यास तयार असतात एकदा एका नव्वद वर्षांच्या श्रीमत म्हाताऱ्यास लग्न करण्याची हुक्की आली त्याने एक पचाऐंशी वर्षाच्या म्हातारीस वधू म्हणून पसत केली लग्न-समारभ पार पडल्यावर तेथे हजर असलेल्या वराच्या एका मित्राने त्यास थोडें बाजूस नेऊन विचारले, "आजोबा, आता आपणास मुलेबाळे होण्याचे काही वय नाहीं तेव्हा एक गोष्ट विचारतो, रागावू नका. या वयात आपण लग्न कशासाठी केलेत?" तेव्हा त्या मिस्किल म्हाताऱ्याने उत्तर दिले, "खरे सागू? रात्री एकट्याला भीति वाटते म्हणून!" ही गोष्ट ऐकून सभेत एकच हशा पिकला

(३) तात्यासाहेबानी आपले 'गतगोष्टी अथवा माझी जीवनयात्रा' हे पुस्तक प्रसिद्ध केल्यानतर, मी एकदा पुण्याला नेहमीप्रमाणे त्याच्या येथेच उतरण्यास गेलो असता केळकराच्या पूर्वजाचे मूळगाव जे ढोकमळें त्याची मला आठवण होऊन घरात शिरताना मी मोठ्याने म्हणालो, "Is His Grace The Duke of Dhokamale at Home"? माझा आवाज व विनोद ऐकून तितक्याच विनोदाने तात्यासाहेबानी उत्तर दिले, "Yes, His Grace is at home and he welcomes his Vassal!"



## हणमंतराम रामनाथ

### (रावबहादूर, नगरशेठ, पुणें)

(१) माझा आणि देशभक्त तात्यासाहेब यांचा सबध सुमारे इसवी सन १९०५ सालापासून आला व तो अखेरपर्यंत वृद्धिंगत होऊन जिव्हाळ्याने कायम राहिला. मी माझे गृहकार्य अगर समाजकार्य अगर व्यापारातील अडचण कोणतेंहि.कार्य असो, प्रत्येक महत्त्वाच्या कामांत मी त्याचा सल्ला घेत

असें व ते फार योग्य असा सल्ला मला देत असत. त्यांच्या सल्ल्याचा मला फार उपयोग होत असे. खरोखर, योग्य सल्ला असा तात्यासाहेबांनीच द्यावा.

( २ ) पुणे शहर म्युनिसिपालिटीत सुमारे २५-३० वर्षें त्याच्याबरोबर मी काम करीत होतों. प्रत्यक वर्षी म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष बदलावा ही कल्पना देशभक्त तात्यासाहेबानी सुचविली. पूर्वीची परपरा एकच अध्यक्ष पुष्कळ वर्षें राहावा अशी होती, ती त्याना पसत नव्हती. दरसाल अध्यक्ष बदलण्याची मूळ कल्पना त्याची. ती त्यानीं अमलांत आणिली.

( ३ ) देशभक्त तात्यासाहेब हे सर्व पक्ष एकत्र आणून ते शक्य तेवढे एक-विचारे कार्य करतील अशी नेहमी खटपट करून त्याप्रमाणे घडवून आणीत. समेट—एकी—सघटन करणे हा त्याचा हातखडा असे. एकीत कसे सामर्थ्य आहे हे त्यानी आम्हास वारवार पटवून द्यावे.

( ४ ) "ताराचद रामनाथ आयुर्वेदिक हॉस्पिटल" चे आज दिसत असलेले प्रचड कार्य त्यानीच माझ्याकडून करवून घेतले. त्यानी या कामी अतिशय मेहनत घेतली स्वतःचे समजून त्यानी ते कार्य केले मी जी अल्पस्वल्प सदर सस्थेला मदत केली ती त्याच्याच स्फूर्तीने व आज्ञेवरून केली. कोणत्याहि लोकोपयोगी कार्यास तन-मन-धनाने मदत करण्यास ते सदैव तत्पर असत त्याच्या मृत्यूने माझा मोठा सल्लागार नाहीसा झाला



## क. ह. हमदेरे

( बी. ए., हिंदुमहासभेचे आधारस्तंभ, मुंबई )

( १ ) पाकिस्तानविरोधी परिषद डिसेबर १९४४ मध्ये दादरला मुबई प्रातिक हिंदुसभेतर्फे तात्यासाहेब याच्या अध्यक्षतेखाली भरली होती फार दिवसानी प्रकटपणे सार्वजनिक सभेत राजकारण विषयावर मुबईत तात्या-साहेब बोलणार म्हणून सभेस मोठा श्रोतृसमाज जमला होता. योगायोगाने सभेच्या स्वयसेवकापैकी कोणा स्वयसेवकाची व फ्री प्रेस व विश्वमित्र या वृत्त पत्राचे बातमीदार याची बोलाचाली होऊन मारामारीपर्यंत प्रकरण वाढत गेलें. व्यासपीठापर्यंत गडबड वाढत जाऊन सभेच्या कामात व्यत्यय येऊ लागला परि-षदेचा कार्यवाह म्हणून माझ्याकडून थोडक्यात परिस्थिति समजावून घेतल्याबरोबर तात्यासाहेबानी समयसूचकतेने व चतुराइने वातावरण शात करून सभेचे काम पुढे चालू केले अध्यक्ष म्हणून पुढे येऊन त्यानी सागितले कीं, "वृत्तपत्रांचे प्रतिनिधि हे आपले सन्माननीय निमत्रित पाहुणे होत, त्याचें काम त्यांना स्वस्थपणे व त्याच्या सोईप्रमाणें करता येईल इतकी सुरक्षितता उत्पन्न

करून देणे हे स्वयसेवकाचें कर्तव्य आहे. सभेच्या कार्यकर्त्यांनीहि बातमीदारांचा विश्वास राहील, अशी व्यवस्था करावयास पाहिजे. परिषदेच्या प्रचारकार्याच्या स्वार्थी व सकुचित दृष्टीने पाहिले तरी बातमीदारास समाधानकारक वातावरण उत्पन्न करून दिल्यानेंच परिषदेच्या कामास मदत होणार आहे " इतके बोलल्यावर रिपोर्टराकडे वळून ते म्हणाले की, "बातमीदारानीहि कार्यकर्त्यांच्या अडचणी व व्यवस्थेच्या आणि आवरशक्तीच्या मर्यादा याचा विचार करून आपल्याच समाजातील ही सभा आहे ही जाणीव ठेवावी अधिकृत कार्यकर्त्यांना वगळून कोणा तरी अनधिकारी स्वयसेवकाच्या वर्तनाने चिडून जाऊन आपल्याच तक्रारींचा गवगवा करून सभेच्या कामात व्यत्यय येईल या थरापर्यंत गोष्टी नेणें इष्ट नसतें, हे त्यानी ध्यानात धरावे अनुभवी वृत्तपत्रीय सपादक म्हणून मी सांगतों की, बातमीदारांनींसुद्धा आपण स्वत. समाजाचे एक घटक आहोंत व सभेचे काम जरी स्वतःच्या राजकीय मताप्रमाणे नसले तरी सर्व पक्षाच्या मतप्रदर्शनास सधि मिळणे आवश्यक असते हे ध्यानात बाळगून परिषदेच्या कार्यकर्त्यांबरोबर खेळीमेळीनें सहकार्यच केले पाहिजे. या दृष्टीने कार्यवाह ढमढेरे यानी केलेल्या प्राजल खुलाशानें हें प्रकरण मिटावयास पाहिजे "

याप्रमाणे तात्यासाहेब अध्यक्ष म्हणून पुढे होऊन बोलताच सभेमधील वातावरण शात होऊन सभेचे पुढील कामकाज सुरू झाले

अध्यक्ष म्हणून किती कौशल्याने व शिस्तीने केळकर काम करतात हे पुष्कळ लोकाना ऐकून ठाऊक होते; परतु प्रत्यक्ष वेळ आल्याबरोबर नेटाने सभेचे काम पुढे चालू करण्याची त्यांची तडफ व सौजन्य पाहून सर्वांस फार कौतुक वाटले. या गडबडीत सुद्धा समतोल वृत्ति राखून वागण्याचा त्याचा 'उभयपक्षी' स्वभाव अवचित जागा होऊन दोन्ही बाजूच्या लोकास त्यानी स्पष्टपणे स्वकर्तव्याची जाणीव करून दिली, हे पाहून दोघासहि धन्यता वाटली.

( २ ) इतके झाल्यावर या बातमीदाराच्या तक्रारी मिटल्या असे आम्हा सर्व कार्यकर्त्यांस वाटले पण हट्टी व खोट्या अभिमानाच्या आहारी जाणाऱ्या त्या बातमीदारानी यापुढे मजल मारली. वर्तमानपत्रांची सघव्यवस्था वाढत आहे, त्याचा गैरफायदा घेऊन वृत्तपत्राच्या बातमीदाराचा अवमान व हक्कांची पायमल्ली झाली असा गवगवा करून मुबईतील सर्व वर्तमानपत्रात परिषदेची हकीकत, भाषणें, ठराव वगैरे काही छापून प्रसिद्ध केले जाऊ नये अशी व्यवस्था रातोरात त्यानी घडवून आणली. दैनिक फ्री प्रेसने तर फक्त सभेत मारामारी होऊन बातमीदारांचा जीव धोक्यात आला व सभेत गोंधळ माजून राहिला, एवढ्याच अर्थाची हकीकत, सभेचा रिपोर्ट म्हणून प्रसिद्ध केली। ही विपरीत घटना पाहून आम्हा कार्यकर्त्यांस फारच आश्चर्य वाटले! पण प्रसिद्ध झालेल्या विकृत रिपोर्टाचें

निराकरण करण्यास आपले कथन म्हणून प्रसिद्धीस दिले तरी ते कोणी छापणार नाहीं असा वाजवी धाकहि पडला माझे मित्र काशीनाथपंत खानविलकर यांच्या सूचनेप्रमाणे ते व मी तात्यासाहेब यांच्या निवासस्थानी डॉ. अभ्यंकर यांच्या घरी गेलो. आमची अडचण व इच्छा तात्यासाहेबांना समजतांच ते म्हणाले की, "विरोधी पक्षांतील असलो तरी फार जुना अनुभवी वृत्तपत्रकार म्हणून माझ्या स्वतःच्या म्हणण्याला फ्रीप्रेसचे सदानंद मुद्दाम प्रसिद्धि नाकारू शकणार नाहींत, तेव्हां हा सर्व खुलासा मी आपल्या सहीनेच प्रसिद्धीस देतो " अंगात कपडे घालून पुण्यास जाण्यास निघालेले तात्यासाहेब लगेच खाली बसले व लिहून घ्या म्हणून सांगून काशिनाथपंत खानविलकर यांस त्यांनी सुबोध व सुसंगत असे पत्र थोडक्यात कथन केले या गोष्टी वेळच्या वेळेस झालेल्याच बऱ्या म्हणून पुण्यास जाऊन प्रसिद्धीस पाठविण्यापेक्षा मी आताच लिहून देतो असे ते म्हणाले. आजच्या आज ते पत्र फ्री प्रेसकडे व सध्याकाळच्या वर्तमानपत्राकडे नेऊन द्या म्हणजे तेवढे तरी काम होईल, असे त्यांनी आम्हास बजावून सांगितले व ते लगेच पुण्यास गेले "वर्तमानपत्राच्या संस्थेचे घटक म्हणून हे बातमीदार व त्यांचे संपादक आपल्या हक्कावर व मोठेपणावर गदा आली म्हणून एवढा गवगवा करून अकांडतांडव करतात; परंतु त्या परिषदेचा अध्यक्ष एक प्रख्यात जुना व नामांकित वर्तमानपत्राचा संपादकच होता व त्याच्या प्रकट विचारास व सभेतील निवेदनास साधी प्रसिद्धीहि न देता त्याचा आपण अवमान करीत आहोत हे मात्र बेट्यांच्या लक्षात येत नाही " असे विनोदाने त्यांनी उद्गार काढले.

तात्यासाहेबांच्या अंदाजाप्रमाणें फ्रीप्रेसचे सदानंद व बॉबे सेन्टिनलचे हॉर्निमन् यांनी त्यांचे सविस्तर पत्र आपापल्या दुसऱ्या अंकातून प्रसिद्ध केले

( ३ ) स्वपक्षीय सामान्य व्यक्तींच्या कार्यासहि प्रोत्साहन देऊन आपल्या पक्षाचे कार्य संघटित करून वाढविणे याकडे तात्यासाहेबांचें फार लक्ष असे. अशा कांही प्रसंगी स्वतःच्या वैयक्तिक मोठेपणास धक्का पोचतो किंवा कसे याबद्दल बेफिकीर राहून ते केवळ कार्याकडेच ध्येयपूर्तीच्या दृष्टीनें पाहत असत, याचा मला एक अनुभव आला होता.

मध्यवर्ती कायदे मंडळाचा हिंदुमहासभेचा मुंबई शहरातर्फेचा इच्छुक म्हणून १९४५ सालच्या निवडणुकीत मी उभा होतो. प्रचाराची सर्व साधनें आम्हास अर्थातच दुर्मिळ होती. वैयक्तिक पत्रकाचा उपयोग केव्हांहि मर्यादितच होतो. कॉंग्रेसच्या प्रकट सभा, प्रचाराच्या बैठकींचे कार्यक्रम, वर्तमानपत्रातील वेळोवेळीं कॉंग्रेस पुढाऱ्यांची प्रसिद्ध होणारी कथानके यामुळे दक्षिणी समाजाचे बाहेरचे मतदार यांस कॉंग्रेसची बाजू समजत असे, परंतु हिंदुमहासभेची मते व कार्यक्रम याबद्दल मात्र त्यांच्यात पुरेपूर अज्ञान होतें. आपल्या तर्फेचे विचार त्यांच्या कानावर

जावेत म्हणून माझे मित्र रा. काशिनाथपंत खानविलकर व मी मुंबईतील निरनिराळ्या संपादकास भेटून विनंती करीत होतो, परंतु आम्हास कोणी प्रोत्साहन देईना. टाईम्स ऑफ इंडियाचे ॲक्टिंग संपादक जेहूसाहेब यांच्याबरोबर या विषयावर चर्चा केली; तेव्हा निवडणुकीमधील वादग्रस्त मुद्द्याबद्दल खुलासेवजा पत्रव्यवहार हिंदुसभेच्या प्रमुख पुढाऱ्याकडून येईल तर तो टाईम्समध्ये प्रसिद्ध करून तुमच्या निवडणुकीच्या कामात या नाही त्या रूपाने मी मदत करू शकेन. एरवी [illegible] खर्च घेऊन सुद्धा मी तुमचा मॅनिफेस्टो साराशानेहि प्रसिद्ध करू शकणार नाही, असे त्यांनी स्पष्ट सांगितले इतके झाल्यावर मुंबईतील हिंदुसभेच्या मुख्य पुढाऱ्यांना भेटून तसा प्रयत्न अयशस्वी झाला हे पाहून माझे सन्मित्र काशिनाथपंत खानविलकर यांनी सुचविले की, आता या कामास लायक व काम हौसेने करतील व राहिलेल्या थोड्या दिवसात काम व्हावयाचे, म्हणजे तात्यासाहेब केळकरच आपल्या कामी मदत करतील तर, शक्य आहे. लगेच आमच्या एका मित्रास पुण्यास मुद्दाम पाठवून ही सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली. तेव्हा तात्यासाहेब म्हणाले, " मला यात काही कमीपणा वाटत नाही. वर्तमानपत्रात पत्र प्रसिद्धीला पाठविणे यात काही कमीपणा व काही निवेदन प्रसिद्धीला पाठविणे यात जास्त मोठेपणा आहे असा मला फरक वाटत नाही. जेहूसाहेब पत्ररूपाने का होईना आपल्या धोरणाचा पुरस्कार करण्याची संधि देतो आहे ना, घ्या त्याचा भरपूर फायदा. " असे म्हणून तेथेच आमचे मित्र काळचे संपादक मामा दाते होते त्यास त्यांनी पत्राचा मसुदा सांगून हिंदुसभेचे धोरण उगाच कांगावखोरपणे प्रतिपादले जाते त्याप्रमाणे जातिनिष्ठ नसून खरे राष्ट्रीय विचाराचेच आहे, याबद्दल थोडक्यात लिहून हिंदुसभेच्या उमेदवारासच सुबुद्ध मतदारांनी मते द्यावी, असे त्यात प्रतिपादल होते. जेहूसाहेबांनी लगेच दुसऱ्याच दिवसाच्या टाइम्समध्ये प्रमुखस्थानी व ठळक ठशाचा मथळा देऊन तात्यासाहेबांचे पत्र छापले. अगदी थोडक्या अवधीत आमचे काम खुल्या दिलाने व उत्साहाने तात्यासाहेबांनी करून आम्हास फार प्रोत्साहन दिले, यामुळे आम्हास धन्यताच वाटली. त्यांची कार्यतत्परता व माझ्यासारख्या सामान्य माणसाचा कार्यसिद्धीकरिता पाठपुरावा करण्याची तयारी पाहून त्यांच्याबद्दलचा आदर द्विगुणित व्हावा यांत काय नवल ?



## मोतीराम बाळकृष्ण वेलकर

### ( एल्.एम्. अँड एस्., डॉक्टर, मुंबई )

कै. लोकमान्य टिळक हयात असताना त्यांच्या नेतृत्वाखाली चालत असलेल्या अनेक राष्ट्रीय चळवळीतील कै. केळकरांच्या निकट सहवासाची मला

आठवण होते. मुख्यतः त्याचा व माझा अत्यंत निकट असा परिचय विलायतेत असताना झाला सन १९१९ साली लोकमान्य टिळकाच्या नेतृत्वाखाली कॉंग्रेस आणि होमरूल लीगचे मॉन्टेग्यूचेल्म्सफर्ड सुधारणाच्या बाबतीत जे शिष्टमंडळ विलायतेत गेले होते त्यात टिळकाच्या पक्षातील बाबू बिपीनचद्र पाल, दादासाहेब खापर्डे, नरसोपंत केळकरासमावेत आम्ही सदस्य होतो. लडन येथे वेस्टएड येथील टॅलबट रोडवर श्री. जव्हेरी नावाच्या गुजराथी गृहस्थाने लो. टिळकाच्या मडळीस राहण्याकरता आपला भव्य बगला खाली करून दिला होता. हे गृहस्थ व्यापारी असून आपल्या कुटुबासह १५–२० वर्षे विलायतत कायमची वस्ती करून राहिले होते. त्या बगल्यात टिळक आणि खापर्डे याच्या खोल्या पहिल्या मजल्यावर असून दुसऱ्या मजल्यावर नरसोपन्ताची खोली माझ्या खोलीला लागून होती, व दुसऱ्या बाजूला वासुकाका जोशा याची खोली होती. विलायतेच्या वास्तव्यांत कित्येक महिने नरसोपन्ताच्या निकट सहवासाचा लाभ मला मिळाला होता. जेवणाच्या वेळी अगर त्याना अत्यत आवडणाऱ्या शेगदाण्यावर ताव मारताना किंवा पार्लेमेटमध्ये हिंदीसुधारणाच्या बाबत जॉइट कमिटीच्या बैठकीस हजर राहण्याकरता जात असताना आणि इग्लडच्या निरनिराळ्या भागात व्याख्यानाच्या दौऱ्यावर असताना आम्ही दिवसातून बहुतेक चोवीस तास एकत्र असू त्या निकट सहवासात त्याच्या अलौकिक बुद्धिमत्तेचे आणि विशाल अतःकरणाचे मला अगदी जवळून दर्शन झाले. त्याच्याबरोबर झालेली सभाषणे नेहमी उत्साहदायक असून बुद्धीला आणि मनाला तजेला आणीत. त्याच्या खोलीमध्ये केव्हाहि जा, अेकतर ते टेबलावर लिहीत बसलेले असावयाचे, केसरीकरता किंवा विलायतेतील कॉंग्रेसच्या "India" वगैरे साप्ताहिकाकरता आणि तसेच हिंदुस्थान व इग्लडातील इतर वर्तमानपत्राकरता काही तरी लेख लिहिताना ते आढळत. नाही तर आरामखुर्चीत बसून विलायतेतील बुक-स्टॉल्समधून घेतलेली नवी व जुनी पुस्तके वाचण्यामध्ये गढून गेलेले दिसत. अनेक विषयावरील जुनी व नवी पुस्तके खरेदी करण्याचे त्यांना एक तऱ्हेचे वेडच होते कितीदा तरी तात्यासाहेबाबरोबर अशा पुस्तकाच्या दुकानामध्ये जाऊन पुस्तके वाचून पसत झालेली खरेदी करण्यात कित्येक तास घालविलेले मला आठवतात ही बुकस्टॉल्स म्हणजे लायब्ररीच जुनी व नवी पुस्तके विक्रीची मोठमोठी दुकाने होत या ठिकाणी दुर्मिळ व अमोलिक जुने व नवे ग्रथ विकत घेण्याची सोय असते. त्या दुकानात इतर पुस्तकालयाप्रमाणे पुस्तके आरामशीर रीतीने बसून वाचण्याची सोय केलेली असते. आपल्या विलायतेतील वास्तव्यात नरसोपतांनी अशा दुकानातून कितीतरी अमौलिक पुस्तके खरेदी करून आपल्या स्वतःच्या घरच्या लायब्ररीतील ग्रंथभाडार सपन्न केलें हे मला आठवते.

( २ ) व्याख्यानाच्या दौऱ्यावर असताना मला एक प्रसग आठवतो. एका दौऱ्यावर तात्यासाहेबांची व माझी दोघाची निवड झाली होती. ब्रिस्टोल, बर्मिंगहॅम, टॉन्टन् आणि वेस्टन सुपरमरे वगैरे ठिकाणी आमचीं व्याख्यानें झाली वेस्टन सुपरमरेच्या व्याख्यानाला जो समाज जमला होता तो बहुतेक हिंदुस्थानातील मोठमोठ्या अधिकारावरून निवृत्त झालेला इग्रज अधिकारीवर्ग, त्यांच्या बायका वगैरे मडळीचा होता तेथें नरसोपन्ताचा निस्पृहता हा गुण चागला दृष्टोत्पत्तीस आला. हिंदुस्थानच्या स्वातत्र्याच्या चळवळीसबधीं बोलताना त्यांनीं असें सागितलें कीं, हिंदुस्थानच्या राजयन्त्रावर खरी हुकमत सेंट्रल गव्हर्नमेंटची नाही, पार्लमेंटची नाहीं, क्राऊनची म्हणजे राजाचीहि नाही आणि व्हाइसरॉयचीहि नाही; तर तीं ब्रिटिश सरसेनापतीची, इडियन सिव्हिल सर्व्हिस म्हणजे कमिशनर – कलेक्टरची आणि इग्रज भाडवलदार याची आहे. इडियन सिव्हिल सर्व्हिससबधाने बोलताना सर्व्हिसमधून निवृत्त झालेल्या त्या सभेत बहुसख्येने हजर असलेल्या त्या समाजापुढे ते म्हणाले, “There was the Indian Civil Servant who, as the chairman truly said, was neither an Indian nor civil nor a servant. He answered the same description as the ‘Holy Roman Empire’ which was neither Holy, nor Roman, nor an Empire,” या त्याच्या उद्गारावर एकच हशा पिकला; परतु हिंदुस्थानातून निवृत्त होऊन परतलेल्या इग्रजी ऑफिसराची हे भाषण ऐकून डोकी भडकलीं व सभेचें वातावरण बरेच प्रक्षुब्ध झालें तरी न डगमगता नरसोपन्तानी आपले भाषण तसेंच पुढे रेटीत नेलें, आणि हिंदुस्थानच्या स्वातत्र्याची कैफियत अत्यत निर्भय-रीतीनें त्या समाजापुढें मांडली.

( ३ ) याच वेळीं त्यांच्या मानी स्वभावाची साक्ष देणाऱ्या दुसऱ्या एका प्रसगाची आठवण होते. तो प्रसग दिल्ली येथील जुन्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या बैठकीच्या वेळीं घडला. कॉंग्रेसची असहकारतेची चळवळ सुरू असताना कै. मोतीलाल नेहरू व कै. चित्तरजनदास यांनीं कौन्सिलप्रवेश करण्याकरिता कॉंग्रेस-मध्येंच स्वराज्य पक्षाची नुकतीच स्थापना केली होती. आणि नवीनच निवडणुकी होऊन तात्यासाहेब महाराष्ट्रातर्फे लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें निवडून गेले होते. हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या प्रातातील कायदेकौन्सिलात स्वराज्य-पक्षातर्फे निवडून आलेल्या सभासदांची सभा स्वराज्य-पक्षाचे अध्यक्ष दासबाबू यांनीं दिल्लीस बोलाविली होती. मुबई कायदेकौन्सिलचा सभासद म्हणून मी त्या ठिकाणी इतरांसमवेत हजर होतो. असेंब्ली हॉलमध्ये प्रेक्षकांच्या गॅलरीत बसण्यासाठीं माझ्याकरितां एक पास मिळावा म्हणून नरसोपत मला असेंब्लीच्या सेक्रेटरीच्या ऑफिसमध्ये घेऊन गेले. तेथील इंग्लिश अधिकाऱ्याकडे त्यांनीं पासाची मागणी

केली. तो इंग्लिश अधिकारी जुन्या उर्मट अरेरावी वळणाचा होता. तो म्हणाला, " Wait, I am busy at this moment, I will see to it afterwards." आणि त्यांच्या बोलण्याकडे लक्ष न देतां काम करू लागला. नरसोपत आपल्या मानी स्वभावानुसार एकदम उसळले व उद्गारले, " You don't think I am going to dance attendance on you to secure the pass You ought to know whom you are addressing. You are here to cater for our comforts and our requirements. You must remember the Old Regime is gone since the Congress has entered Assembly." याचा परिणाम असा झाला की, तो वरचढ अधिकारी नरमला आणि नम्रतेने दिलगिरी प्रदर्शित करून त्याने चटकन् एक सोडून दोन पासेस नरसोपंताच्या हातात दिले !

( ४ ) कौन्सिलची प्रश्नोत्तरे व ठराव यासंबधी अनेक वेळा अत्यत उपयुक्त सल्ला त्यांनी मला दिला आहे बॅरिस्टर सावरकराच्या सुटकेसबधींचा ठराव मी जेव्हां मुबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये आणला त्या वेळी पुण्यात सदाशिव पेठेंत त्यांच्या घरी मी राहिलो होतों. तेव्हां ठरावावर मीं भाषण करण्यासबंधीं आम्ही बोलत असताना नरसोपंतानी माझ्या भाषणासाठी काही महत्त्वाचे मुद्दे दिल्याचें मला आठवते तसेंच त्याच्या दिल्ली येथील वास्तव्यांत कौन्सिलमध्ये पहिले प्रश्न त्यांच्याच सल्लयानें आणि त्यांनी दिलेल्या सामग्रीवरून मीं पाठवल्याचे मला पक्के आठवते. अशा रीतीनें मला त्यानी पुष्कळ उपकृत करून ठेवले आहे

( ५ ) कामाची तडफ किंवा इंग्रजीमध्ये ज्याला डिस्पॅच म्हणतात तो त्याचा विशेष गुण होता. कितीहि कामाचा ढिगारा असेना का, कामें तडफीनें हातात घेऊन उरकून टाकावयाचीं व हातावेगळीं करावयाचीं, हा त्यांचा गुण अनेक सभाच्या बैठकीच्या वेळीं ते अध्यक्ष असताना विशेष दृष्टोत्पत्तीस येई. सभेची कार्यक्रमपत्रिका कितीहि भरगच्च असो, त्यांतील विषय वादविवादांत गुरफटून न देता तडकाफडकीनें निकालांत काढण्याकडे त्याचा नेहमी कटाक्ष असे. प्रत्येक वेळीं त्याचें हे वागणें नियमांना धरून होते किंवा नाही ह्याबद्दल दुमत असूं शकेल. मला असें पक्के आठवतं कीं, कित्येक प्रसगीं कमिटीच्या बैठकीच्या वेळीं, महत्त्वाचे प्रश्न निकालासाठीं आलेले असताना सभासद विषयाच्या बाजूनें किंवा विरुद्ध बाजू आपापसांत इतर सभासदाना समजावून देण्याचा प्रयत्न करीत. अध्यक्ष केळकर लगेच उद्गारत, " ही कमिटी सर्व सुज्ञ व समंजस मडळीची आहे. प्रत्येकजण पूर्ण विचार करून व आपले मत बनवून या कमिटींत हजर आहे तुम्हीं आपल्या भाषणानें आपापसात जास्त तें काय ??गणार ? व त्यांचें मतपरि-

वर्तन ते काय करणार? तुम्ही फक्त 'होय' का 'नाहीं' बोला. ठरावाच्या बाजूने आहांत कीं विरुद्ध आहात येवढेच सांगा. सभेचा फुकट वेळ खाऊ नका." कांही कांही वेळी त्यांचें असें वागणे जरूरीचे होतें; पण नेहमीच अशा तऱ्हेचें वागण बरोबर होतें असें नक्की सागता येणार नाही.

( ६ ) केळकराच्या 'केसरी'च्या सपादकीय लेखाबद्दल टिळकानीं काढलेले उद्गार मला या आठवणीत सागावेसे वाटतात. ग्लासगो येथील मजुराच्या सभापुढे टिळकाचे व माझे अशी दोघाची भाषणे होऊन आम्ही परत येत होतो. तेव्हा वक्तृत्वकलेसबधाने बोलतां बोलता स्वत.च्या 'केसरी'तील लेखासबधाने ते म्हणाले, "केसरीतील लेख लिहीत असताना भाषासौंदर्याकडे मी फारसे लक्ष देत नाही. अलकारिक आणि डौलदार भाषा लिहिण्यात आमचे केळकर माझ्यापेक्षा सरस आहेत. पण माझ्या अतःकरणात असलेले विचार जितक्या सोप्या भाषेत कळवितां येतील तितके कळविण्याचा मी प्रयत्न करीत असतो. मनात घोळत असलेले विचार सरळ बाहेर पडलेल्या भाषेने लोकाच्या समोर ठेवल्याने त्यांच्या मनावर तात्काळ परिणाम होत असतो भाषासौंदर्याकडे व सौष्ठवाकडे तात्या जास्त लक्ष देतात त्यामुळें कधीं कधीं विचारावर नसते दडपण येण्याचा संभव असतो. भाषेला सौंदर्य असेल तर उत्तमच; परतु मुख्यतः ते विचाराला कधींहि मारक होता कामा नये येवढे साभाळले म्हणजे झाले काही झाले तरी माझ्या गैरहजेरीत केळकरानीं आपल्या लेखनकौशल्याने 'केसरी'द्वारे मोठी राष्ट्रसेवा केली आहे."

( ७ ) केळकराच्या सान्निध्यात असताना त्याच्या चारित्र्यात एक गोष्ट अत्यत प्रामुख्याने मला आढळून आली ती ही कीं, त्याचे जीवन एखाद्या योग्या-सारखें होते. विलायतेत असताना आम्ही सकाळी व सायकाळी लो. टिळक, दादा-साहेब खापर्डे, वासुकाका जोशी व टिळकाचे प्रायव्हेट सेक्रेटरी श्री. नामजोशी अशी आमच्या त्या कुटुबातील मडळी जेवणाकरिता एकत्र बसत असू येथे माधवराव भट म्हणून आमचा आचारी आपल्या दक्षिणी पद्धतीप्रमाणे वरण, भात, भाजी, आमटी आणि पोळी असे जेवण तयार करीत असे. मात्र आम्ही ते इग्रजी पद्धती-प्रमाणें सर्वजण काट्या-चमच्यानें जेवत असू. जेवण सुरू झाल्याबरोबर नरसोपत वरण-भात, भाजी-आमटी एकत्र करीत व झटपट खाऊन ताट चटकन् रिकामे करून उठत असत! इग्रजीमध्यें बोलायचे झाले आणि तसे आम्ही जेवतांना त्याच्या समक्ष बोलत असू की, "Mr Kelkar does not care for the nicities of the pallet, he believed more in eating to live rather than living to eat." व्याख्यानाच्या दौऱ्यावर असतांना पुष्कळदा हॉटेल-मध्ये राहण्याचा प्रसग येत असे. नरसोपंत शाकाहारी होते तेव्हा नेहमीं "जेवणा-

करिता काय काय पदार्थ करण्यास सांगू" असें विचारले असता ते त्रासलेल्या आवाजाने म्हणायचे "काहीं तरी सागा झाल. कसलेहि व काहींहि पदार्थ असलेले जेवण मला चालते" इतकी त्यांची राहणी साधी होती. परतु पचपक्वान्नाबद्दल आसक्ति नसणाऱ्या ह्या योगी पुरुषाला विदग्ध साहित्याची मात्र मनमुराद लूट करण्यामध्यें अलोट आनद वाटत होता!



## गोपाळ पांडुरंग महाजन

( म्युनिसिपल कौन्सिलर, पुणें )

( १ ) सुमारे २०–२२ वर्षांपूर्वी माझ्या गुडघ्यामध्ये पाणी साठत होते तेव्हा पुणे येथे सर्व डॉक्टर लोकानी ऑपरेशनशिवाय गत्यतर नाही असे सागितलें. तेव्हा मी रा. अन्तूकाका फडणीस याच्यामार्फत ही गोष्ट तात्यासाहेबांच्या कानावर घातली तेव्हा तात्यासाहेबानीं सागितले कीं, मुबई येथे मी जाईन त्या वेळी तेथील डॉक्टर लोकाचा सल्ला घेऊ. एके दिवशी तात्यासाहेब मुबईला गेल्याचे कळले. तेव्हा मी मुबई येथे सरदारगृहात गेलो. काहीं वेळानें डॉ. भाजेकर तेथे आले. त्यावेळीं अतूकाकाना मीं म्हटले की, डॉक्टराना माझा पाय दाखवा. तेव्हा त्या डॉक्टराना तात्यासाहेबानी पाय पाहण्यास सागितले पाय पाहून त्यानी सागितले कीं, हें फ्रॅक्चर आहे. माझ्या दवाखान्यात आल्यावर मी सर्व काहीं करीन. नतर दुपारी डॉ देशमुख यांच्याकडे तात्यासाहेब मला घेऊन गेले. तेव्हा त्यानी पाय तपासून पाहिला "मलम देतो, ऑपरेशनची जरूरी नाही" असे सागितले; पण असे न करता डॉ. भाजेकर याच्याकडेच जाऊन उपचार करावा असे ठरले म्हणून डॉ. भाजेकराकडे जाऊन ऑपरेशन करावयाचे ठरविले. तात्यासाहेबानी त्या डॉक्टरांस सागितले की 'हा माझा मनुष्य आहे माझ्याप्रमाणे यास समजून काळजीनें काम करा.' तेव्हा डॉक्टर भाजेकर यानी मजकडून एक पैसाहि न घेता ऑपरेशन चागल्या रातीनें केले व माझा पाय बरा झाला

( २ ) १९३७–३८ साली पुणे म्युनिसिपालटीत प्रथम मी निवडून आलो निकाल ऐकल्यावर तात्यासाहेब याच्याकडे मी गेलो. त्यांना वंदन करून मी म्हणालों, 'निवडून आलो.' त्या वेळी ते पाच मिनिटें हसतच राहिले व नतर 'ठीक झालें' असे म्हणाले विशेष हे की, दुसऱ्या दिवशी त्यानी मला पन्नास रुपये पाठवून दिले!



## नारायण सदाशिव जोशी

### ( पेन्शनर मामलेदार, मुंबई )

( १ ) बहुतेक १८९०–९१ साल असावें. या वर्षी मी न्यू इंग्लिश स्कूल पुणें येथे मॅट्रिकच्या वर्गात होतों. फर्ग्यूसन कॉलेजांत प्रिव्हियसच्या वर्गात केळकर होते. त्यांचें इंग्रजी विषयावर प्रथमपासूनच प्रभुत्व होतें. त्या वेळच्या सर्व विद्यार्थ्यांत त्यांच्या विद्याव्यासंगाबद्दल सर्वांना फार आदर वाटत असे त्याना इंग्रजी विषयांत प्रावीण्य मिळविल्याबद्दल युनिव्हर्सिटीतून बक्षिसहि मिळाले होतें. हे युनिव्हर्सिटी कॅलेंडरांत नमूद आहे.

( २ ) पक्के वर्ष आठवत नाही, पण ते १९०१ असावे. डेप्युटी कलेक्टर कै. रा. ब. हरी विनायक साठे यांना स्पेशल ड्यूटीवर नेमले होतें. सर्व्हे खाते बंद करण्याचें चालू होते. त्या खात्यातील सर्व विषयांचें ज्ञान मुख्यतः चालू सिव्हिलियन, युरोपियन व इतर लोकांना मिळावे ह्याकरिता सर्व्हे आणि सेटल्मेंट मॅन्युअल तयार करण्याचे काम सरकारनें सदर साठे याच्याकडे सोंपविलें होते. त्यांस मदतनीस म्हणून त्यांच्या हाताखाली माझी नेमणूक झाली होती. साठे यांचे इंग्रजीचें ज्ञान चांगलें होते. तथापि आपला ग्रंथ युरोपियन लोकांच्या हातात जाणार तेव्हां त्यानीं त्यास नांवे ठेवू नयेत, लेखनांत चुका होऊ नयेत म्हणून पुस्तक वाचून त्यांत इंग्रजी भाषेसंबंधानें वगैरे चुका झाल्या असल्यास त्या दुरुस्त व्हाव्या अशासाठीं साठे यांनीं केळकर यांना विनंती केली होती. सर्व्हे आणि सेटल्मेंट हा कांहीं केळकरांचा विषय नव्हे; पण त्यांनीं तो ग्रंथ काळजीपूर्वक वाचण्याचे परिश्रम घेतले व त्यांत थोड्याबहुत सूचनाहि केल्या हे विशेष होय.

( ३ ) केळकरांचे व्याही प्रो. लागू पुणे येथे वारले. स्मशानयात्रेस केळकर आले होते. मीहि हजर होतों. लागू याची शरीरयष्टि मोठी व भरभक्कम होती. शव नेण्यास सहा माणसें लागलीं ! वाटेत मध्यतरीं तिरडी मधोमध मोडते कीं काय असे केळकरांच्या सूक्ष्म नजरेस आले. त्यामुळे ते अति अस्वस्थ दिसले. पण त्यांची समयसूचकता अशी कीं, त्यांनीं लगेच माझ्या हातांत टेकण्याची काठी होती ती माझ्याजवळून मागून घेतली व तिरडीच्या मध्यभागावर जीं दोन माणसें होतीं त्यांच्या खांद्यांवर भार पडेल अशा खुबीनें त्यानीं ती स्वतः बसवून दिली. स्मशानांत प्रेत खालीं ठेवल्यावर अलगत त्यानीं काठी काढली व ती मला परत दिली. स्नेहस्मृति म्हणून ती मी जपून ठेविली आहे !

❋

# कै. ग. वि. साळवेकर

( बी. ए., मालक सरदारगृह, मुंबई )

( १ ) १९२७ च्या सप्टेंबर महिन्यात माझे वडील ती. विसूभाऊ ऊर्फ तात्या साळवेकर ज्या वेळीं अत्यवस्थ आजारीं झाले त्या वेळीं सन्यास घेण्याचा त्यांनीं निश्चय केला. परतु त्यापूर्वी ' ती तात्यासाहेब यांच्याशी मला बोलावयाचे आहे तरीं तार करून त्याना बोलावून घे ' अशी त्यानी मला आज्ञा केली. त्याप्रमाणे मीं तार केली व तात्यासाहेब केळकर आले आमच्या तात्यांनी, तात्यासाहेब केळकर यांना अत्यंत कळकळीने सांगितले की, "माझा काल अगदी समीप आला आहे व उद्यां मी सन्यास घेणार आहें. बाबू लहान आहे; परतु तो समंजस असून पितृभक्त आहे. त्याला मी तुमच्या स्वाधीन करीत आहे. माझ्या ठिकाणीं आतां त्याला तुम्हीच वडिलांप्रमाणे आहांत. तुमच्या सल्लयाने व आज्ञेप्रमाणें त्याने वागले पाहिजे असें मीं त्याला सागितले आहे त्याच्यावर आपलें लक्ष असू द्यावें." तात्यासाहेब यांनीं उत्तर दिलें कीं, " आपण त्याच्याबद्दल कांहीं काळजी करू नका व मी त्याला योग्य ती सल्लामसलत देत जाईन." तात्यासाहेब यांनीं याप्रमाणें आश्वासन देतांच वडिलांचे डोळे भरून आले व त्यांना फार समाधान वाटले

( २ ) मला लिहिण्याला अत्यंत आनद वाटतो की, तात्यासाहेब यांनी मला वेळोवेळीं सल्लामसलत तर दिलीच, पण मी एकदां अडचणींत असतां त्यांनीं मला फार मोठ्या रकमेनें पैशाची सुद्धा मदत केली होती. त्यांचे हे उपकार मी कधीहि विसरणे शक्य नाहीं.

( ३ ) मला पहिले अपत्य मुलगी झाली. त्या वेळीं बारशाचा समारभ पुष्कळ थाटाने झाला. त्या वेळीं तात्यासाहेब हजर होते. त्यानंतर दुसऱ्या खेपेला मुलगा होईल अशी सर्वांची अपेक्षा होती; परतु मुलगीच झाली ! हें वृत्त मीं तात्यासाहेब यांना कळविले व दुसरीहि मुलगी झाल्यामुळे आमचा थोडासा हिरमोड झाल्याबद्दल मीं त्याना लिहिलें या पत्राचे उत्तर त्यानीं मोठ्या गमतीचे पाठविलें. तें असें – " मुलगी झाली तरी तेंहि पुत्ररत्नाप्रमाणे कन्यारत्नच आहे. दोहोंनाहि "रत्न" हे उपपद लावतात. तरी निराश होण्याचे कारण नाहीं. आतां मात्र पुढल्या खेपेला नक्की मुलगा होईल. हे माझें भविष्य लिहून ठेवा ! " मला सागण्यास अभिमान वाटतो कीं, तात्यासाहेब याचे हे भविष्य खरें ठरलें व मी त्यांना गमतीने म्हणालों, " तात्यासाहेब, आपण भविष्य अचूक वर्तवितां, हा आपला गुण आम्हांला नव्यानेच समजला." यावर ते कांहीं न बोलतां अगदीं मनापासून हंसले ! !

❋

## रामचंद्र केशव बाळ

### ( रावबहादूर, निवृत्त सेशन जज्ज, पुणें )

( १ ) तात्यासाहेब यास मी प्रथम १८८९ मध्ये पाहिले. त्या वेळी ते मिरजेहून फर्ग्यूसन कॉलेजमध्ये नुकतेच आले होते. परंतु ती भेट कॉलेज-वर्गात न होता आमची आट्यापाट्या खेळण्याची मुरलीधराच्या देवळाजवळ एक बखळ होती तेथें एकदां ते सध्याकाळी आले त्या वेळीं झाली. नंतर ते लवकरच कोल्हापुरास राजाराम कॉलेजमध्ये गेले. त्यानंतर त्यांची गाठ 'डेक्कन' कॉलेजमध्ये बी. ए च्या वर्गात पडली. आम्ही दोघेहि रेसिडेन्सीत राहत होतो पुढे कॉलेजमध्यें संस्कृत 'मृच्छकटिक' करण्याचें ठरले. त्यात तात्यासाहेब यानी नटीची भूमिका पत्करली होती. नाटकाच्या तालमी होत त्या वेळी मी तेथे मधूनमधून जात असे. त्यामुळे थोडा जास्त परिचय होऊ लागला.

एल्एल्. बी. ची परीक्षा झाल्यावर तात्यासाहेब सातान्याहून काही दिवसांनीं पुण्यास केसरी संस्थेमध्ये लोकमान्याचे मदतनीस म्हणून आले व मी नोकरी वरून पुण्यास सुट्टींत येई तेव्हा भेट होत असे. अशा वेळी तात्यासाहेब जरी त्याचा समाजांतील दर्जा वाढत चालला होता तरी, जुनी ओळख ठेवून अगत्यानें विचारपूस केल्याशिवाय राहत नसत. त्याबद्दल आनंद वाटे. कारण दुसरे काही कॉलेज-सहाध्यायी गाठ पडल्यावर ओळख आहे असेंहि दर्शवीत नसत !

( २ ) तात्यासाहेबाच्या उदार स्वभावावरून एक लहानशी हकीकत सांगावीशी वाटते. माझे एक स्नेही मजबरोबरच न्यायखात्यात नोकर होते. त्याच्या मनांत लोकमान्य टिळकांच्या गायकवाड वाड्यातील वाचनालय पाहावयाचे होते. लोकमान्य त्या वेळी हयात होते. पण त्याच्याकडे न जाता कै रा. धोंडोपंत विद्वांस याच्याकडून ते काम करवून घेण्याचें होतें परंतु ते भेटले नाहीत त्या वेळी तात्यासाहेब तेथें होते. त्यांनीं आम्हा दोघास नेऊन ते पुस्तकालय दाखविले. त्या दोघा परस्पर-विरोधी स्वभावाच्या दोन स्नेह्याच्या सान्निध्याने माझ्या मनात असा विचार येऊन गेला की, त्या दोघानीं आपापल्या जागाची अदलाबदल करणे योग्य झाले असते. माझे हे दुसरे स्नेही सरकारी नोकरींत होते तरी त्या वेळच्या मानाने त्याचे विचार ज्वलज्जहाल वाटत. मी चटकन् बोलून गेलो, "You should have changed places." मी काय म्हणालो याचे त्या वेळीं त्या दोघास आकलन झालें की नाहीं हें समजले नाही. तात्यासाहेबाच्या स्मरणात ती गोष्ट आली असावी असे दिसलें नाहीं. परंतु मला काय वाटले ते काहीं मंडळीस पुन्हा सांगितलें. तात्यासाहेब न्यायखात्यात आले असते तर त्यास केसरी संस्थेकडून जो अखेर अखेर तनखा मिळे त्यापेक्षा किती तरी पटीने जास्त मिळाला असता व तसें मला उद्देशून एक

दोन प्रसंगीं त्यानी बोलूनहि दाखविलें होतें. परतु एकदा तेच म्हणाले कीं, " मग मला हल्ली जी मान्यता मिळाली आहे ती मिळाली असती किंवा नाही ही शका आहे. सार्वजनिक आयुष्यातील मान्यता नोकरीत मिळणें कठीणच."

( ३ ) त्यांच्याबद्दलची आणखी एक लहानशी हकीकत देतो. आम्ही दोघे जरी डेक्कन कॉलेजात शेवटच्या वर्षांत होतो तरी आमचे ऐच्छिक विषय निराळे होते. मीं तत्त्वज्ञान हा विषय घेतला होता तर त्याचा भाषाविषय होता. म्हणून एका भोजनप्रसंगीं ते माझ्याकडे आले असताना त्यानी मला एक सप्रेम भेट म्हणून त्याचें ' भारतीय तत्त्वज्ञान ' पुस्तक दिले. जरी त्यानी बोलून दाखविले नाही तरी त्या भेटीचे औचित्य माझ्या लक्षात आले.

( ४ ) जेव्हां खाजगी रीतीने न्यायानिवडीचा प्रश्न येई त्या वेळीं मला ते अगत्याने त्या पचमडळीपैकी एक नेमीत एक वेळ तर त्यांच्यासह आम्ही तिघे पच होतो.

( ५ ) त्याचप्रमाणे स्नेह्यास व इतरासहि मदत करण्याचा प्रश्न उद्भवला असता त्याची तयारी असे. एका विवाद्य प्रकरणात माझा पाठपुरावा करून त्यांनी मला उपकृत करून ठेविले आहे.



## बाळकृष्ण श्रीधर कोल्हटकर

### ( सरकारी निवृत्त शिक्षक, पुणें )

सन १९०१ साली दिवाळीच्या सुट्टीत तात्यासाहेब, मीं, रा. ब कृष्णराव जोशी, कृष्णराव दीक्षित व नाना ( तात्याचे थोरले भाऊ ) असे पांचजण भीमाशकरास ट्रिपला गेलो होतो तेथून नेरळच्या वाटेने जंगलांतून उतरलो त्या वेळीं तात्या म्हणाले, " या वाटेने जाण्यांत तुम्ही 'फूलहार्डिनेस' करतां." पुढें आमच्यांत कांही गोष्टीवरून वाद सुरू झाला परतु अखेर त्यात अतिशय तीव्रता आली, कडवटपणा उत्पन्न झाला तेव्हा तात्यासाहेब म्हणाले, " मित्रामित्रात इतका कडाक्याचा वाद व त्याचे पर्यवसान असें होणे इष्ट नाहीं. त्याने मैत्री तुटते." त्याबरोबर आम्हीं एकदम वादविवाद बद केला. आज त्याला ४६ वर्षें झालीं परतु त्याचे ते शब्द व प्रसग माझ्या डोळ्यापुढे उभा आहे. यावरून त्याचा भाडणें मिटविण्याचा स्वभाव दिसून येतो



## रामचंद्र विनायक पटवर्धन

### ( बी. ए., एल्एल्. बी., महर्षि पटवर्धन यांचे चिरंजीव, पुणे )

( १ ) टिळक पंचांग प्रसिद्ध होऊं लागल्यापासून कांही वर्षे जुन्या मताभिमान्यांमध्यें मोठी खळबळ उडूं लागली. परतु वादविवादांत त्यांना यशाची आशा दिसेना. अशा काळांत एकदा तात्यासाहेब बेळगांवास गेले असतां तेथील कांहीं मंडळीनीं या प्रश्नांत तुम्ही तोडजोड घडवून आणा, अशी तात्यासाहेबांना फार गळ घातली. तात्यासाहेबांचीं मते निश्चित आणि खबीर; पण स्वभाव अतिशय भिडस्त असल्यानें त्यांना मोठी पचाईत पडली पण गळ घालणाऱ्या लोकांस त्यांनी शेवटी सागितलेंच की, " परपरागतपद्धति किंवा शास्त्रार्थ यात कालमानानुसार फरक पडणे संभवनीय आहे हे कळू शकते; पण गणितानें निघणाऱ्या उत्तरात किंवा निष्कर्षातहि तोडजोड होते, असे असेल तर तुम्हीच स्वतः पुण्यास या आणि तो चमत्कार सर्व मडळीस तुम्हीच समजावून सागा म्हणजे झालें. त्याला माझी तरी मध्यस्थी कशाला पाहिजे ? "

( २ ) पुणे वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या वार्षिक पारितोषिकसमारभाच्या प्रसंगीं आजपर्यंत अध्यक्षस्थानी जे जे विराजमान झाले ते ते सर्व अर्थातच उत्तम विद्वानापैकीच होते परतु त्य.मध्ये सस्कृतात भाषणे करणारे अध्यक्ष फारच कमी याचें कारण उघडच असे की, श्रोत्यापैकी अभिजात अशा संस्कृताचें ज्ञान असणारे श्रोते फारच थोडे असतात एकदा पारितोषिक-समारभाचे अध्यक्ष तात्यासाहेब हेच होते. त्यामुळें श्रोतृगणहि नेहमींपेक्षा फार मोठा होता परतु सर्वांना आश्चर्य वाटले ते हे कीं, तात्यासाहेबानी भाषण केलें तें सस्कृतातच केलें, आणि संस्कृत भाषणाचा उत्कृष्ट नमुना म्हणून ते भाषण अतिशय श्रवणीय असेच झालें परंतु श्रोत्यांपैकीं पुष्कळाना त्यातील रसास्वाद घेणे इच्छा असूनहि अशक्य झाले म्हणून त्यांपैकी एकानें विनती केली की, आपल्या भाषणांतील माधुर्य व विनोद समजण्याकरिता आपण आणखी तसेच दुसरे भाषण मराठीत करा ही विनंती तात्यासाहेबानीं तत्काळ मान्य केली आणि सस्कृत भाषण पूर्ण झाल्यावर पुनः दुसरे सुदर भाषण त्यानी मराठीत केलें

( ३ ) केसरींतील एका जाहिरातीसबधाची माहिती तात्यासाहेबाना कोणी तरी विचारली असता त्यानी सांगितलें कीं, केसरीत आलेली कोणतीहि जाहिरात न पाहिलेला असा कोणी असेल तर तो मी; आणि आतील मजकूर न पाहणारे असे कोणी असतील तर ते आमचे धोंडोपत बाबा. कारण, जाहिरातीचे व इतर कामाचे लचाड त्याच्यामागें एकसारखे इतकें असतें कीं, त्याना इकडे तिकडे पाहण्यास फुरसत मिळेल तर शपथ !

( ४ ) फलज्योतिषासंबधानें त्यांच्या भाषणात एकदा असें आलें कीं, फलज्योतिषाच्या सत्यतेविषयीं माझी स्वतःची जरी ठाम खात्री नसली तरी ज्यांच्या विद्वत्तेविषयीं शंकाच नको असे बडोद्याचे दाजीसाहेब आपटे, आणि आपल्या येथले तात्यासाहेब करंदीकर यांच्यासारखे चिकित्सक दृष्टीने पाहणारे चाणाक्ष लोक जर त्या शास्त्रावर पूर्ण विश्वास ठेवणारे आढळतात, तर मी तरी तें खोटें आहे असें कसे म्हणू ? आणि शिवाय योगायोगाची गोष्ट म्हणा पाहिजे तर, पण माझ्या जीवनक्रमात प्रत्येक बारा बारा वर्षांनी असें काही तरी घडत आले आहे कीं, त्यामुळें माझ्या आयुष्याला महत्त्व येत गेले, असें सागून पहिल्या बाराव्या वर्षी अमुक घडलें, त्यानंतरच्या बाराव्या वर्षी अमुक झाले असे क्रमवार त्यानी सांगितलें.

( ५ ) बऱ्याच वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. तेव्हा माझा "मराठा" पत्राशी संबध होता. त्यामुळे तात्यासाहेब हे त्या वेळी गायआळीतील घरात रहात होते, तेथे मी जात असे तात्यासाहेबांचे वडील चिरंजीव श्री बापूराव हे न्युमोनियाने अतिशय आजारी असल्याचे ऐकल्याने मी तेथे गेलो, तो बापूरावाची प्रकृति चिंताजनक असल्याचे दिसले. पण तात्यासाहेब तेथे नव्हते. म्हणून आतील जिन्यानें माडीवर गेलो. तो तात्यासाहेब लेखनकार्यात अगदी गढून गेले होते. मी त्याच्यासमोरच बसलों तात्यासाहेबाची मुद्रा अत्यत चिंताग्रस्त असल्याचे दृष्टोत्पत्तीस आले. तेव्हा याच वेळी हे काय करता असें मी विचारताच ते म्हणाले, " बापूची अवस्था कठिण आहे हे खरें; पण तुमच्या अण्णासाहेबांच्याच सल्ल्याने उपचार चालू आहेत व शुश्रूषाहि व्यवस्थित आहे, मग मीहि आणखी तेथेच बसून अधिक ते काय करणार ? दुःखावेगाचा जोर दाबून धरण्यास दुसरा कांही मार्ग दिसेना, म्हणून लेखनकार्याने तरी कांही जमतें काय ते पहावे असे मनात येऊन कालपरवापासून हे लिखाण लिहीत असतो; त्यामुळें मनाला बरे वाटते," असें म्हणून ते स्वस्थ राहिले तात्यासाहेब हे लोकमान्याचे सच्छिष्य शोभतात खरे, असे माझ्या मनांत येऊन मी उठलो व परत बापूसाहेब तापानें फणफणत होते तिकडे गेलो "आपत्सु महता चित्त शैलकाठिन्यकर्कशम् " ही भर्तृहरींची उक्ति तात्यासाहेबाना कशी तंतोतत लागू पडते हें मात्र स्पष्ट दिसलें



## शंकर दामोदर पेंडसे

( एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, नागपूर )

( १ ) अखंड वाचनाने आणि विचाराने, राष्ट्राच्या सामाजिक व राजकीय प्रगतीविषयींचे कांहीं सिद्धान्त तात्यांनीं निश्चित केले होते. त्यामुळे या प्रगतीकरितां

आपली लेखणी ते अव्याहत चालवीत असताहि अप्रिय प्रसंगानी किंवा प्रकारांनीं त्यांची वृत्ति विचलित होत नसे. प्रातिनिधिक अशा सरकारी व बिनसरकारी संस्थांच्या कारभारात चालणारे.उद्वेगजनक प्रकार त्याच्या नजरेस आणून, हिंदुस्थान हा खरोखर लोकशाहीला योग्य आहे काय, असे त्याना विचारतां ते म्हणाले – " हळुहळू हीं स्थिति सुधारत जाईल आणि 'जसे लोक तसे त्यांचें राज्य' हा अबाधित सिद्धांत लक्षात ठेवला तर या प्रकाराबद्दल हळहळण्यात काय अर्थ ? "

( २ ) नागपूर येथील राजाराम वाचनालयाच्या हीरकमहोत्सवाचे अध्यक्ष म्हणून एक-दीड वर्षापूर्वी तात्या येथे आले होते त्याच्या भाषणाला जुन्या व नव्या पिढींतील सर्व लोक इतक्या मोठ्या सख्येने उपस्थित झाले होते की, तात्याच्याविषयी एखादा राजकीय पक्ष कसाहि वागला तरी लोकामधील त्याच्याविषयीचा आदर कायम होता, असे सहज दिसून आले त्या वेळी " साहित्यसम्राट् " या पदवीला अनुलक्षून तात्या विनोदाने म्हणाले, " सिंहासन आणि छत्र हीं दोन सम्राट्पदाचीं चिन्हे आहेत. त्यांपैकीं वाङ्मयसमेलनाच्या अध्यक्षपदाचे सिंहासन मला अनेकवेळा लाभले आहे पण आज माझ्या शेजारी बसलेल्या पुरीच्या शकराचार्यांच्यावर धरलेल्या छत्रांत मधूनमधून माझाहि प्रवेश होत असल्यामुळे सम्राट्पदाचें दुसरे चिन्ह जें छत्र तेंहि मला लाभले आहे ! " व्याख्यानाच्या आरभीच केलेल्या या विनोदाने तात्यांनी सभा ताब्यात घेतली व पुढील व्याख्यान चागलेच रगले.

( ३ ) १९३० मधील गोष्ट आहे. "केसरी" द्विसाप्ताहिक झाला होता. त्याकरिता सपादकवर्गात आणखी काही लेखक घेण्याची योजना तात्याच्या मनात घोळत होती. एक दिवस मला बोलावून ते म्हणाले, " तुमची आज मी परीक्षा घेणार आहे. सायमन कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला आहे. त्याच्या साराशाची तीन कॉलमची प्रुफें तयार आहेत, तीं घेऊन जा व या रिपोर्टाचे गुणदोष विवेचन करणारा लेख मला उद्या सकाळीं आणून द्या " त्याप्रमाणे केसरीकचेरीत जाऊन मी रिपोर्टाच्या साराशाची प्रुफे आणली व रात्री त्यावर तीन कॉलमचा लेख लिहून सकाळी तात्याना नेऊन दिला. या लेखाच्या प्रारभीं तात्यांनीं स्वतः एक सुदर परिच्छेद लिहिला व " सायमन सत्याग्रहीचा अपशकून फळला " असा मथळा देऊन, अग्रलेख म्हणून १४ जून १९३० च्या केसरीच्या अकांत दुसऱ्या दिवशीं तो प्रसिद्ध केला

( ४ ) तात्या स्वत. कोणालाहि दुखवीत नसत. त्याना अन्याय झालेला पाहवत नसे सामाजिक व राजकीय क्षेत्रांतील अन्यायामुळें त्याचे मन कळवळून जाई, एवढेच नव्हे तर नाटकातील काल्पनिक अन्यायाहि त्याना पाहवत नसे. पुण्याला श्री प्र. के अत्रे यांच्या एका नाटकाला आम्ही गेलों होतों. रगभूमीवर

एक करुणरसपूर्ण प्रवेश चालू असताना मीं जवळच बसलेल्या तात्यांकडे मुद्दाम पाहिलें तेव्हां त्यांच्या डोळ्यांतून अश्रु वाहत आहेत आणि उपरण्याने ते पुनः पुनः पुशीत आहेत असे मला दिसले. " लोकोत्तराणां चेतांसि मृदूनि कुसुमादपि. "

( ५ ) आपल्या लेखनांतील काही कांहीं प्रसग तात्या आपल्या अतःकरणांतील सर्व भावना ओतून तन्मयतेने लिहीत. अशा रसपूर्ण स्थलाचा वाचकांच्या मनावर कसा परिणाम होतो हे जाणण्याचीहि त्याना उत्सुकता असे. " गतगोष्टी अर्थात् माझी जीवनयात्रा " हे पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झालें होते. त्यानतरच्या उन्हाळ्याच्या सुट्टींत त्याना नेहमीप्रमाणे भेटलो असता या पुस्तकातील कांहीं उत्कृष्ट स्थळाबद्दल मी बोलत होतो त्या वेळी विशेषतः त्यानीं आपल्या मातुःश्रीविषयी केलेल्या वर्णनाबद्दल बोलत असता, तात्या आनदपूर्ण चर्येनें तें ऐकत होते. ती वर्णने स्वत· लिहीत असता त्यांना झालेला आनद, रसिक वाचकालाहि झालेला पाहिला म्हणजे लेखनाची सार्थकता झाली असे वाटून त्याना आनंद व समाधान होई. हे त्याच्या बोलण्यावरून दिसून येई वाङ्मयकलेचा आनद तात्यांनींच खरा भोगला. वाङ्मयानदाच्या सविकल्प समाधीत गुगून गेलेले तात्या हे एक स्थितप्रज्ञ योगीच होते



## सौ. मालतीबाई पेंडसे

**( प्रा. पेंडसे यांचें कुटुंब, कै. धोंडोपंत विद्वांस यांची कन्या, नागपूर )**

( १ ) ती तात्या कोठेहि परगावी गेले म्हणजे तेथील ऋणानुबधी व आप्त मडळींना अगत्यानें भेटल्याशिवाय राहत नसत अशा मडळींची ते एक यादीच तयार करीत व वेळांत वेळ काढून त्यांना भेट देत सकाळचा व दुपारचा ठरलेला भेटींचा कार्यक्रम नियमित वेळी पार पडावा असा त्याचा कटाक्ष असे. गेल्या १५-२० वर्षांत. नागपुरास ते दोनदा आले पहिल्या खेपेला ते कै. दादासाहेब ओगले याजकडे शहरात उतरले होते तेथून ठरल्याप्रमाणे अगदीं सकाळींच प्रथमतः ते आमच्याकडे आले. आल्याबरोबर थेट स्वयंपाकघरांपर्यंत जाऊन त्यांनीं आम्हांस कुशल प्रश्न विचारले; पण चहाला थोडा वेळ आहे असे पाहताच ते म्हणाले, "हें पाहा; चहाकरिता थाबलो तर सकाळच्या भेटीचे सर्व कार्यक्रम कसे बरें आटोपतील ! " म्हणून त्यानी लगेच बरोबरच्या मडळीसह खाद्यपदार्थ थोडेथोडे मागून घेतले व पुढील ठरलेल्या ठिकाणी भेटीकरितां ते निघून गेले. किती हे अगत्य व प्रेमळपणा !

( २ ) अगदीं अलीकडे राजाराम वाचनालयाच्या हीरक महोत्सवाकरिता ते आले. त्या वेळी त्यांनीं आठवणीने यादी करून सर्व ऋणानुबधी व आप्त लोकाच्या आस्थेने व स्वस्थतेने भेटी घेतल्या व कोठल्याहि लहानमोठ्या सस्थेचें निमत्रण

नाकारले नाही. वेळांत वेळ काढून सर्व सस्थांना त्यांनी भेटी दिल्या व प्रत्येक ठिकाणी थोडथोडी भाषणे केली. आपण पुनः नागपूरला येणार नाही हे त्याना जणुं काय कळलेच होते ! !



## चिं. द्वा. देशमुख

(सी. आय. ई., गव्हर्नर, रिझर्व्ह बँक, मुंबई)

नोकरशाहीच्या घटकाचा राजकारण किंवा साहित्य या क्षेत्राशी फारच थोडा सबध असतो. त्यात माझी लोकसेवा जवळजवळ वीस वर्षे दुसऱ्या प्रांतांत झाल्यामुळे, तात्यासाहेब केळकराशी ओळख होण्याची सुवर्णसधि बऱ्याच उशीरा लाभली. प्रत्यक्ष भेट घडण्यापूर्वी त्याच्या साहित्यसेवेची, भाषाप्रभुत्वाची व राजकारणाशिवाय आस्थेची ढोबळ माहिती होतीच. ती कोणा महाराष्ट्रियाला नसावी ? व अशा प्रभावी व्यक्तीशीं परिचय असावा अशी बऱ्याच दिवसापासून माझी उत्कठाहि होती शेवटी प्रत्यक्ष योग बृहन्‌महाराष्ट्र कॉमर्स कॉलेजच्या नाम-करणविधीच्या निमित्ताने पुण्यास गेलो तेव्हा आला. ती माझी पुण्याची भेट पुणेकराच्या आपुलकीच्या स्वागतामुळें स्मृतिपटलावर सुवर्णाक्षरानी नोदली गेली आहे, व त्या वेळेचा एक डोळ्यात भरण्यासारखा भाग म्हणजे साहित्यसम्राटाचा अपूर्व परिचय त्या एकदोन दिवसाच्या धामधुमीत परिचय घट्ट झाला किंवा व्यक्तिगत सभाषण विशेष झाले असे म्हणणे अतिशयोक्ति होईल, पण ओळख झाली ती पुसट असूनहि परिणामकारक. प्रथमदर्शनीच आजपर्यंत ऐकलेले वर्णन खरे असा प्रत्यय आला त्याची भव्य शरीरयष्टि, सोज्ज्वल मुद्रा, विद्वत्तेचे सात्विक तेज या सर्व गोष्टीची पहिल्या दृष्टिक्षेपातच जाणीव झाली. थोड्या प्रासगिक बोलण्यावरून त्याच्या सौजन्याची, विनोदी वृत्तीची व विचारशील बुद्धीची प्रतीती आली. मनात विचार आला कीं, पुण्याला माझ्या मधूनमधून खेपा होतातच; त्यात केळकराच्या भेटीचा पुनःपुनः योग येऊन ओळख वाढविता येईल, तर मोठा लाभ होईल, पण विधिलिखित निराळे होते. त्याच्या निधनाचे दुर्वृत्त कळल्यावर सार्वजनिक तोटा झाल्याची जाणीव वैयक्तिक हानीच्या आकलनाने दुणावली. कै. तात्यासाहेब केळकर गेले खरे, पण त्याच्या लोकोत्तर प्रभावाची छाप महाराष्ट्राच्या साहित्यावर व विचारसरणीवर अजरामर राहील यात शका नाही



## रा. ना. गद्रे

( एम्. ए., एलूएल्. बी., प्राध्यापक, पुणें )

(१) नू म वि. हायस्कुलात १९४३ मध्ये 'शिक्षकसघ' स्थापण्यात आला. त्याच वेळीं शि प्र. मडळीच्या आर्जीव-सभासद-मडळाने शाळेतील शिक्षकाच्या वेतनाचा विचार करण्यासाठी एक समिति नेमली होती. या समितीने तयार केलेल्या अहवालाची प्रत शि. प्र मडळीच्या 'नियामक मडळा' ने त्यावर मान्यतेचा शिक्कामोर्तब करण्यापूर्वी शिक्षकसघाच्या सदस्यास मिळाली तर हवी होती. तात्यासाहेब नियामक मडळाचे अध्यक्ष मी शिक्षकसघाचा ४४-४५ मधील कार्यवाह आणि इतर दोन शिक्षक यानी तात्यासाहेबाच्या घराची वाट धरली. त्याना सर्व गोष्टी निवेदन केल्या आणि सागितले की, "अहवाल आमच्यासाठी असल्या-मुळें तो अगोदर आम्हांला पाहावयास मिळाल्यास नियमभग होणार नाही शिवाय एकदा तो नियामक मण्डळाने मान्य केला म्हणजे त्यांत बदल करता येणार नाही." थोडा वेळ विचार करून शान्तपणे त्यानीं आश्वासन दिले की, "मी स्वतःसाठी अहवालाची प्रत मागून घेतो आणि तुम्हास पाहण्यास देतो. शिवाय नियामक मण्डळाच्या येत्या सभेत अहवालाची चर्चा पूर्ण न करता पुन्हा एकदा या अहवालावर शिक्षकसघाचे म्हणणे ऐकून घ्यावें असा ठराव करून घेतो." या आश्वासनाने आम्हांला आतिशय धीर आला. आम्ही निघण्याच्या वेळी त्यानी एक मोलाचा सल्ला दिला "शाळेच्या उत्पन्नापैकी जेवढी रक्कम अहवालांत पगारखाती खर्च व्हावयाची आहे तेवढ्यात तुम्ही आपले पगार जर सुव्यवस्थित बसवून दाखविलेत तर ते मिळण्याची जिम्मेदारी मी घेतो." हे शब्द ऐकून आम्ही उठलो ते अगदी आनदाने. आमचे म्हणणे आकडेमोडीने सिद्ध करण्याची गणितागत पद्धति आम्ही यापूर्वीच थोडीशी अवलबिली होती आता तिचा नेटाने पाठलाग आम्ही केला, कोष्टकें तयार केलीं व ती तात्यासाहेबाना नेऊन दाखविलीं. त्यानी सर्व गोष्टी समजून घेतल्या आणि 'ठीक, आता निष्काळजी असा' असे सागितले. नियामक मडळाच्या नंतरच्या सभेंत शिक्षकसघाचे सर्व म्हणणे मान्य झालें हे सागावयास नकोच नियमभग न करता व्यावहारिक अडचणींतून कसा मार्ग काढावा यासाठी प्रसगोपात्त उपाययोजना सुचविणे यांत तात्यासाहेबासारखा समयज्ञ विरळा; शिवाय तात्यासाहेब नियामक मडळाचे अध्यक्ष. शिक्षकाशीं बोलण्याचे, त्याचें म्हणणे अनेकवार ऐकून घेण्याचे त्याचे सौजन्य अनुपमेयच !

(२) दुसरा एक प्रसग. १९४५ सालच्या जून महिन्यात महाराष्ट्रात बऱ्याच ठिकाणीं नवीन कॉलेजें निघणार होती. नू. म. विद्यालयात काहीं शिक्षक कॉलेजांत अध्यापनाचे काम करतील अशा योग्यतेचे होते. त्यापैकीं एका शिक्षकास अशा नवीन निघणाऱ्या एका कॉलेजात अध्यापकाची जागा मिळाली. ते शिक्षक 'कायम'

होते. कायम सेवकाने नोकरी सोडण्यासाठी सहा महिन्याची पूर्वसूचना नियमाप्रमाणे द्यावयास पाहिजे. शाळेच्या त्या वेळी असलेल्या मुख्याध्यापकानी त्या कॉलेजात जाणाऱ्या शिक्षकाविषयी अत्यत उदार धोरण ठेविले होते हे मान्य केले पाहिजे तरी पण तीन महिन्याचा पगार पुरेशी पूर्वसूचना नाही म्हणून त्या शिक्षकास भूर्दड पडणार होता त्या शिक्षकाबरोबर मी तात्यासाहेबाकडे गेलो "शाळेंतील शिक्षक कॉलेजात प्राध्यापक होतात हा शाळेचा गौरव आहे. शिवाय तीन महिन्याचा पगार घेऊन सस्थेचा मोठासा आर्थिक फायदा होईलसे नाहीं. परतु व्यक्तीच्या दृष्टीने हे पैसे पुष्कळच आहेत वर्षाच्या अखेरीस हे शिक्षक जात असल्याने नवीन चागला शिक्षक शाळेसाठी मिळणे दुरापास्त नाही. सस्थेची गैरसोय न करता व्यक्तीने स्वतःचा उत्कर्ष करून घेणे हे न्याय्य होय." हा आमचा मुद्दा तात्यासाहेबाना पटला "शक्य ते अवश्य करीन, तुम्ही निष्काळजी असा" असे त्यानी सागितले. साक्षेपाने ही गोष्ट मनात वागवून तात्यासाहेबानी आपला मोलाचा शब्द वेचला. कारण त्या शिक्षकाची प्राव्हिडट फडाची सर्व रक्कम त्याला मिळाली. तीन महिन्याच्या पगाराइतके द्रव्य त्यातून कमी केलेले नव्हतें. "नियमाला सुद्धा केव्हा केव्हा मुरड घालावी लागते, कारण नियम माणसाची सोय पाहण्यासाठीं असतात" असे ते म्हणत !



## गोविंद नरहर पंढरपुरे

### ( शास्त्री, आचार्यकुल, पुणें )

तात्यासाहेब केळकर याचा व माझा परिचय गीतारहस्य व शकराचार्य याचे तत्त्वज्ञान यासबधींच्या सवादामुळे झाला. मी राहणारा चिंचवडचा; दर सकष्टीला चिंचवडला मी जाणारा. जाताना कोणी तरी प्रख्यात व्यक्तीला बरोबर नेऊन तेथील लोकाना काही तरी पारमार्थिक विचार मी ऐकवीत असे. एकदा अशीच विनंती तात्यासाहेबांना मीं केली. त्यानी मला होकारहि दिला ऐन वेळेला मोटार घेऊन मी दाराजवळ गेलो; पण तात्याना मलेरियाचा ताप आला होता. ताप १०२ अशावर होता ते पाहून मी म्हटले, "तात्यासाहेब, राहू द्या, आज नको, पुन. केव्हा तरी मी आपल्याला घेऊन जाईन." तात्या म्हणाले, "नाही, मी आज येणारच. हे पाहा, येथे बसून मी बायकामुलासमोर कण्हत बसणार पण तेथे आलो तर निदान देवासमोर तरी कण्हत बसेन व त्यामुळे मला बरे वाटेल." इतक्या वृद्धापकाळीं या त्यांच्या आत्मविश्वासाचा माझ्या तरुण मनावर विलक्षण परिणाम झाला व तो या क्षणापर्यंत जशाचा तसाच कायम आहे



## द. वि. परांजपे

( निवृत्त सरकारी नोकर, पुणें )

( १ ) सुमारे ४०-५० वर्षांपूर्वीची गोष्ट. पुणे शहरात प्लेगचा कहर उसळला होता. माझे वडील बन्धु प्लेगच्या आजारातून बचावले होते; परतु रुग्णशय्येवरच होते. आमच्या कुटुबाची परिस्थिति त्या वेळी अत्यन्त बिकट होती. गाठीला पैसा नव्हता आणि पैशाविना बधूंची नीट शुश्रूषा होणार नव्हती. घरात वडील बन्धू-खेरीज मिळवणार कोणीच नव्हते मातुःश्री व आम्ही सर्व लहान रोपटीटोपी पोर. वडिलाच्या हयातीत अभिमानाने दिवस काढल्यामुळे कोणापुढे तोड वेगाडायची सवय नाही; पण प्रसगामुळे हात पसरायचा म्हटले, तरी कोणापुढे ? अशा स्थितींत मी व मातुःश्री पुण्याच्या त्या वेळच्या निर्जन रस्त्यातून कोठे शिरावे म्हणून विचार करीत शून्य हवेल्याकडे पाहत हिंडत होतो. पहता पाहाता टकल्याच्या हवेली-पाशी आलो चौकात कोपऱ्यावर गोळ्याचा वाडा आहे. आम्ही सहज वर बघितले तोच वरील खिडकीतून एका व्यक्तीने बाहेर डोकावले. त्याच वेळीं आमच्या पुढून जाणाऱ्या दोघा इसमापैकी एकाने त्या व्यक्तीकडे अगुलीनिर्देश करून दुसऱ्यास म्हटले, ‘ बघितलेस ते एन्. सी. केळकर. ’ ते लोक पुढे गेले व ती बाहेर डोकावणारी व्यक्तीहि खोलीत गेली; पण रस्त्यावरून जाणाऱ्या त्या माणसाच्या मुद्रेवर अगुलीनिर्देश करीत असताना जो भाव उमटला होता, त्याने मात्र माझ्या मनाची पकड घेतली ‘ एन् सी केळकर ’ काय अगर दुसरा कोणी काय ? नावात त्या वेळी जादू वाटली नाही नावाचे महत्त्व त्या वेळी फक्त एकाच व्यक्तीसबधी माझ्या मनांत जाणवत होतें आणि ती व्यक्ति म्हणजे ‘ लो. टिळक ’; परतु अगुलीनिर्देश, चेहेऱ्यावरील भाव आणि नामोच्चार या त्रयीमुळे माझ्या मनाचें आकर्षण इतके झाले की, मी झपाझप जिना चढून त्याच्या खोलीचें दार उघडले !

खोलीत प्रवेश करताच पाहतो तो पुस्तकानी खोली खेचून भरली होती आणि एका वेताच्या खुर्चीवर बसलेले ‘ एन्. सी. केळकर ’ वाचनात अगदीं गढून गेले होते. धसमुसळ्यासारखा आत येणाऱ्याची म्हणजे माझी चाहूल त्याना लगेच लागली व माझ्याकडे पाहत ( मातुःश्री बाहेरच उभ्या होत्या. ) ते म्हणाले, ‘ कोण पाहिजे ? ’ मी म्हटलें, ‘आपणच’. तात्यासाहेब उद्गारले, ‘ माझ्याशी काय काम आहे ? ’ तोड वेंगाडणे जिवावर आल्यामुळे थोडा वेळ मी काहीच बोललों नाही. यावर ते पुनः म्हणाले, ‘ तुम्हांला काय पाहिजे ? ’ ‘ पधरा रुपये ! ’ मीं ताडकन् उत्तर केले.

“ काय ? पधरा रुपये ? ” अर्थातच तात्यासाहेब आश्चर्यानें उद्गारले. कारण एक अगदीं अनोळखी इसम असा तडकाफडकी दार उघडून खोलींत येतो काय

आणखी पधरा रुपये मागतो काय! आतां वरीक मातुःश्री पुढे झाल्या आणि तात्यासाहेबास त्यांनी एकदर हकीकत सांगितली आणि म्हटलें, 'पंधरा रुपये आम्हाला उसनवार पाहिजे आहेत. चार-सहा महिन्यांत हातीं येतांच परत करू.' यावर चटकन् उठून तात्यासाहेबांनी रुपये काढले व मातुःश्रींच्या हातावर ठेवून म्हटलें, "तुमचा मुलगा आधी चागला बरा होऊं दे; मग सावकाश परत करा पैसे." पुढे, चार-सहा महिन्यांचीच गोष्ट बघु पूर्ण बरे होतांच आमच्याकडे सत्यनारायणाचे व्रत झालें व तात्यासाहेबास तीर्थप्रसादास बोलावले. त्याप्रमाणें ते अगत्याने आले. तीर्थप्रसादानतर मातुःश्रींनी मजकडून तात्यासाहेबास त्यांजकडून उसनवार घेतलेले रुपये परत करविले. विडा प्रसाद वगैरे घेऊन इतर मडळी सर्व गेली, तरी तात्यासाहेब बसूनच होते. पण थोडया वेळानें ते उठून निरोप घेण्यासाठी म्हणून मातुःश्रीकडे येऊन म्हणाले, "काकू, मजकडून उसने घेतलेले पैसे तुम्ही परत केलेत हे ठीकच झाले मीहि ते घेऊन भरून पावलो. आणखी तुम्ही ऋणमुक्त झालात. आतां माझी पाळी! मी आपल्याला तुमच्याचपैकीं एक समजून या सत्यनारायणाच्या खर्चाचा सामायिक वाटा म्हणून हे पैसे परत देतो. तुमच्याचपैकीं मी झाल्याने उपकार होत नाही. तुमच्या मनांत ऋणी असल्याची जाणीव राहिली नाही व माझ्या मनांत उपकाराची भावनाहि उरली नाहीं!"

वरील आठवणींत तात्यासाहेबांच्या अगच्या अनेक गुणांबरोबरच त्यांच्या स्वभावसहज तडजोड-प्रवृत्तीचीहि प्रचीति येते!

( २ ) आमची परिस्थिति किंचित् सुधारली तरी बेताचीच. तात्यासाहेबांशी थोडा अधिक परिचय वाढल्यामुळे व त्याचे वजन त्या वेळीं बऱ्याचशा सस्थातून वाढल्यामुळें मी त्याच्यामागे नोकरीचा लकडा चालू केला. बरेच दिवस कुठेंच जमेना. शेवटीं मीं एक दिवस म्हटलें, "इतर ठिकाणचे सोडून द्या; पण केसरी ऑफिसमध्यें एखादी जागा मला तुम्हांला खास देता येण्यासारखी आहे!" 'केसरी'चें नाव काढताच त्यांनीं मजकडे अशा कांहीं चमत्कारिक नजरेने बघितले की, वरील विनंतीस प्रेरणा देणारी माझ्या अतरगातील भावना जणू कांही ते आपल्या दृष्टींतील किरणांनीं बाहेर ओढीत असावेत. ती त्यांनी बाहेर काढलीच याविषयीं शका नाही. ती म्हणजे लेखक होण्याची जबर आकाक्षा. माझ्या वरील विनतीस उत्तर म्हणून जे त्यांनी दिले ते मासलेवाईक होते. ते म्हणाले, "हे पहा, केसरी ऑफिसात किंवा दुसरीकडेहि कुठें तूर्त जमणार नाही. पण माझ्या घरात वरीक तुला एखादी जागा देण माझ्या हातात खास आहे. अस कर; उद्यापासूनच कामावर रुजू हो कसा." मी साहजिकच गोधळून गेलो. त्यावर ते थोडे हसून म्हणाले, "अरे, घरात म्हणजे मडईतून भाजी आण, पचा नेसून आणखी खाया-

वर फडके टाकून पाटपाणी कर अशी एखादी शार्गीदांची जागा तुला नाही देत. लेखकाची नसली तरी मानाची आहे. आमच्या मुलाना उद्यापासून शिकवीत जा. सध्या ही शिक्षकाची नोकरी पत्कर बाहेरच्या नोकरीचे पुढे पाहू !"

( ३ ) पण माझ्या मनात त्या वेळी लेखक म्हणून मिरवण्याची जी जबर हौस होती व जी तात्यासाहेबानी थोडीशी पुरवली त्यासबंधी पुढील चार ओळी लिहिल्याशिवाय ही आठवण पुरी होणार नाही.

मी माझे लिखाण उठल्या सुटल्या तात्यासाहेबाना वाचून दाखवीत असे. मीचसा काय, पण कै. गडकऱ्यासारखे काही [illegible] लेखकहि आपल्या लिखाणाच्या गुडाळ्या हातात घेऊन तात्यासाहेबांना त्यातील भाग वाचून दाखवावा, म्हणून त्यांच्याकडे हेलपाटे घालताना मी नित्य बघत असे एक दिवस मी असाच एक लेख घेऊन तात्यासाहेबाकडे गेलो. वाचून दाखवू का ? म्हणून हळूच थोड्या आडपडद्याने मी सूचित करणार तोच ते म्हणाले, 'हे पाहा, आता किनई कटाळा आला आहे दे ठेवून. मीच वाचीन ' चार दिवसानी मी पुनः गेलोच. मला कुठला दम निघायला ? थोडा वेळ इकडे तिकडे करून मी म्हटले, "वाचलात का लेख ?". "वाचला अरे, मी एकट्यानेच काय ? उद्या हजारोजण तुझा लेख वाचतील. मात्र जितक्या लोकानी तुझा लेख वाचला असेल तितके दिवस तू माझ्यावर आपल्या लिखाणाचे वाचन लादू नको !" असे ते म्हणाले.

दुसऱ्या दिवशी खरोखरच तसे घडून आले कारण तो लेख 'डॉ सन्यत्सेन' त्या दिवशीच्या 'केसरी'त छापून आला होता त्यानतर माझे चार-दोन लेख 'चान गत्रभा केसरीत आले. पुढे ज्या काही सात-आठ कादबऱ्या मी लिहिल्या त्याहि तात्यासाहेबाच्या परानी वाङ्मयीन वातावरणात वावरत असल्यामुळेच लिहिल्या गेल्या यात शका नाही.



## काकासाहेब ओंकार

### ( इनामदार, पुणे )

( १ ) सन १९२९ सालातील गोष्ट. मी तात्यासाहेबाकडे जुन्नर येथील श्री. रघुनाथराव जोशी वकील याना मजबद्दल परिचय-पत्र द्यावे. अशी विनती करण्यास केसरी ऑफिसमध्यें गेलो होतो.

माझ्या कामाबद्दल आमचे काही बोलणे चालले असताना परगांवचे दोन गृहस्थ तात्यासाहेबांकडे आले. ते तात्यासाहेबांच्या विशेष परिचयाचे असावेत असे त्याच्यामध्ये चाललेल्या सभाषणावरून दिसून येत होते

बरीच बोलणी झाल्यावर त्यांतील एक गृहस्थ दुसऱ्या गृहस्थाकडे नजर टाकून तात्यासाहेबांना म्हणाला, "तात्यासाहेब, या माणसास मी अनेक वेळा पैशाची मदत करीत आलो आहे परतु मला जर एखाद वेळी नड पडली तर हा मात्र बिलकूल मदत करीत नाही. याला काय माणुसकी म्हणावी ?" यावर तात्यासाहेब सस्मित चेहरा करून म्हणाले – "तुम्ही त्याना अनेक वेळा पैशाची मदत करीत आलात व ते फेडीत आले. असचा ना ? का त्यानी त्यातले काही बुडविले ?" ते गृहस्थ म्हणाले – "छे हो ! तसे मी कसें म्हणेन ? माझी पै न् पै त्यानी परत केली आहे त्याबद्दल माझी तक्रार नाही. माझी तक्रार आहे ती येवढीच की त्याला जरूर लागते तशी मलाहि लागते. परतु मी रक्कम मागितली की– जवळ पैसे – काही तरी सबब सागून हा रक्कम देण्याचे टाळतो, याबद्दल माझी तक्रार आहे" यावर तात्यासाहेब म्हणाले, याचे उत्तर अगदी सरळ आहे. तुम्ही त्याला पैसे देत आलात व ते तो बिनचूक फेडीत आला. याचा अर्थ असा होतो की, तुमचा त्याच्यावर पूर्ण विश्वास आहे व त्या [illegible] तो पात्र असल्याचे तो सिद्ध करीत आला; तुमचा विश्वास गैरवाजवी ठरू दिला नाही. तुमची पारख खरी ठरली. हा तुमचा विजय नव्हे का ?

आता तो तुमच्या उपयोगी पडत नाही याचे कारण त्याला तुमचा तितका विश्वास वाटत नसावा तुम्ही विश्वासास पात्र असल्याचे त्याला पटवून दिले की तुमची तक्रार दूर होईल. खर ना ?"

तात्यासाहेबाच्या या विनोदी व मार्मिक विवेचनाने आम्ही सर्वचजण हसू लागलो !

( २ ) तात्यासाहेबाच्या वयास ६१ वे वर्ष लागले म्हणून १९३२ साली पुणे म्युनिसिपालिटीने त्याचा सत्कार केला. त्या प्रसगी मि. बेग या मुसलमान गृहस्थाने हिंदूबद्दल आस्थेवाईक विवेचन करून तात्यासाहेबाबद्दल धन्योद्गार काढले यावर तात्यासाहेबानी भाषण केले. मि बेगच्या भाषणास अनुसरून ते म्हणाले, "मि बेगसारखी समजूतदार माणसे मुसलमान समाजात जर असतील तर वादच कुठे राहणार ? आम्हाला चीड येते ती एवढीच की, आमच्या देवावर व आमच्या बायकावर हे लोक हात टाकतात आमच्या लोकाचे कपटाने धर्मांतर करतात. असल्या गोष्टी त्यानी सोडल्या की, आम्ही आणि ते सख्या भावासारखे वागूच वागू !"

मनुष्याच्या स्वास्थ्यास विघातक असलेल्या गोष्टीस आळा घालण्याकरिता शासनपद्धति निर्माण करण्यात आलेली आहे असे तात्यासाहेब म्हणत. शासनपद्धतीचा उपयोग न करता उपदेशाचे नुसते अवडबर माजविल्याने काय अनर्थपरंपरा ओढवते याचे प्रत्यतर हल्लीचा काळ देत नाही काय ?

(३) सन १९२५ सालामधील प्रसग. कीर्तनालकृति कुमारी शांताबाई ओंकार वयाच्या बाराव्या वर्षी याच सालांतील एप्रिल महिन्यांत दिवगत झाली. तिच्याबद्दल तात्यासाहेबाना फारच कौतुक वाटत असे. तिच्या मृत्यूनतर ३-४ महिन्यांतच तिच्या मावशीने तिचे चरित्र लिहून प्रसिद्ध केले. त्या पुस्तकाची एक प्रत मी सिमल्यास तात्यासाहेबांच्याकडे अवलोकनार्थ पाठविली. ते त्या वेळी असेब्लीच्या कामात गढून गेले होते, तरी त्यानीं ते पुस्तक वाचून लगेच त्यावर विस्तृत अभिप्राय व मला सात्वनपर पत्र पाठविले. त्यांत त्यानी लिहिले होतें की, "इतक्या लहान वयात पुस्तकरूपानें चरित्र लिहिले जाण्याचे जिच्या भाग्यात होते अशी ही बहुधा पहिलीच मुलगी असावी. मुलीच्या गुणाबरोबर तिला मिळालेल्या जवळच्या आस्थेवाईक आप्ता-बद्दलहि अभिनदन करणे जरूर आहे" माझ्यासारख्या सामान्य माणसाशींदेखील ते किती आपुलकीने वागत, किती समरस होत, याचे हे उदाहरण होय कितीहि दुःखीकष्टी मनुष्य त्याच्याकडे जावो ते आपल्या अमोल विचारसरणीनें, पौराणिक व ऐतिहासिक दाखल्याने त्याचे दु.ख त्याला सह्य होईल असे वागत. पुढे ते स्वतः मजकडे समाचारास आले; त्या वेळी ओघाओघाने ते म्हणाले, "मला मुळींच दुःख देऊ नकोस असे ईश्वराजवळ मागणे केव्हाहि वाजवी होणार नाही मागणेच झाल्यास जी दुःखे माझ्या वाट्यास आली असतील ती मजवर येऊ देत; परतु तीं मला सहन करण्यास, त्याच्याशी झुजण्यास मला धैर्य व सामर्थ्य दे, अशी मागणी त्याच्याजवळ करणेच योग्य होईल."



## श्री. कृ. बेलवलकर

(एम्. ए., पीएच्. डी , प्रोफेसर, पुणें)

(१) डेक्कन कॉलेजचे एक माजी ख्यातनाम विद्यार्थी म्हणून कॉलेजच्या वार्षिक समेलनाचे निमत्रण श्री. नरसिंह चितामण केळकर यांच्याकडे प्रतिवर्षी न चुकता जाई, व तेहि वेळात वेळ काढून दोन प्रहरच्या सहभोजनाला, निदान तिसऱ्या प्रहरच्या 'ॲड्रेसला' तरी उपस्थित होत असत एकदां – बहुधा १९०३ साल असावे – मी तात्यासाहेबाच्या समोरच्या पंक्तीतच भोजनास बसलो होतो त्या वेळी पाहिलेली व अजूनहि लक्षात राहिलेली विशेष गोष्ट म्हणजे पानात काहीहि न टाकण्याचा त्याचा नियम. प्रस्तुत प्रसगी तात्यासाहेबानी समेलनातील भोजनावळीचा अपवाद म्हणून उल्लेखण्याइतके आपले पान निर्मळ केले होते. एका कोपऱ्यात थोडे मीठ राहिलें होते, पण दोनतीनदा बोटाने त्याची चव घेऊन व वर पाणी पिऊन तेहि त्यानी फुकट घालविले नाही!

(२) त्यानंतर कांहीं वर्षांनीं समेलनप्रसगी विद्यार्थ्यांनी "तोतयाचें बंड" या तात्यासाहेबांनीं रचिलेल्या ऐतिहासिक नाटकाचाच प्रयोग करून दाखविण्याचे ठरविले, व तात्यासाहेबांनी विद्यार्थ्यांच्या विनतीस मान देऊन प्रयोग पाहावयास येण्याचें कबूल केले व तो प्रयोग शेवटपर्यंत त्यांनीं पाहिला. त्या वेळी मी कॉलेजच्या 'स्टाफ' मध्येच असल्याने माझी खुर्ची तात्यासाहेबाच्या जवळच होती, व माझे मित्र प्रोफेसर आर डी रानडे हेहि जवळच होते. रानड्यांनीं नाटकाचे पुस्तक वाचले नव्हते, म्हणून प्रवेश सपतांच पुढचा प्रवेश काय आहे व त्यांत काय होणार आहे याची ते माहिती विचारीत. त्या वेळी मी तात्यासाहेबाना म्हटले, "तुमच्या नाटकास जसा हवा तसा प्रेक्षक मिळाला आहे. हे माझे मित्र नाटकाच्या सविधानकाशी पूर्णपणे अपरिचित आहेत व उतावीळपणे आगामी प्रवेशाची माहिती विचारीत आहेत, यावरून त्यांना खेळ आवडलासे दिसते". तात्यासाहेब उत्तरले, "कृपा करून त्याना आगाऊ माहिती मुळींच पुरवू नका, आणि खेळ सपल्यावर त्याचे जे मत बनेल ते मला सांगा." पण माझ्या मित्राच्या टोचणीमुळे मला तसे करता आले नाही या वेळी नाटकाचा मध्यबिंदु – तिसऱ्या अकातील पोवाड्याचा प्रवेश – सुरू होता, व तो आमच्या विद्यार्थ्यांनी इतका कांही रगविला की, तात्यासाहेब स्वत. म्हणाले, "हा प्रवेश धदेवाईक कंपन्याच्या खेळांतहि इतका रगलेला मी आजवर पाहिला नाही"

( ३ ) शेवटच्या २-३ युरोपियन प्रिन्सिपॉलाच्या अमदानीत डेक्कन कॉलेजला शिक्षणसस्थात तत्पूर्वी असलेले मानाचे स्थान कमी कमी होऊ लागले होते भारी पगाराच्या अध्यापकांच्या केंद्रीकरणामुळे खर्चाचे प्रमाण वाढले व विद्यार्थ्यांची संख्या घटू लागली त्या वेळी, एक तोडगा म्हणून, पहिल्या वर्षाच्या सायन्सचा क्लास कॉलेजात उघडण्याचें ठरले. त्याकरिता लागणाऱ्या जादा खर्चाच्या मजुरीस कायदेकौन्सिलांत विरोध होण्याचा सभव असल्यामुळे त्याबाबत नरसिंह चिंतामण केळकर यांच्याशी रदबदली करण्याचे काम प्रिन्सिपालनी मला • • हे दौत्य अनिर्वाह म्हणून मी स्वीकारिलें, व तात्यासाहेबास सदाशिव पेठेतील त्याच्या घरीं जाऊन भेटलो. भेटीचें कारण कळताच तात्यासाहेब एकदम उसळून म्हणाले, "आम्हीं कशासाठीं, कां म्हणून, डेक्कन कॉलेजचा पक्ष उचलून धरावा? आमच्या पक्षाला हितकर राहोच, पण रुचेल असे तरी डेक्कन कॉलेजने आजवर काय केले आहे की आम्हीं त्याची कड घेऊन लिहावे?" या स्पष्ट प्रश्नास मला अर्थात् उत्तर देता आले नाही. तथापि, कॉलेजच्या पूर्वेतिहासाकडे लक्ष देऊन, सायन्स क्लासच्या खर्चाच्या मागणीस, ती मजूर होतच असेल, तर आम्ही विरोध करणार नाहीं एवढेच मोठ्या मिनतवारीने तात्यासाहेबानी मान्य केले, व माजी विद्यार्थी या नात्याने डेक्कन कॉलेजचें असलेले ऋण फेडले.

( ४ ) पण दुसऱ्या एका माजी विद्यार्थ्यानें – त्याचा नामनिर्देश करावयासच पाहिजे असे नाही – हाती थोडी सत्ता येताच डेक्कन कॉलेज विकून टाकून त्याचें नावहि उरू नये, यासाठी भगीरथ प्रयत्न केलेले सर्वांस ठाऊक आहेतच. त्याबाबत माजी विद्यार्थि-संघाने केलेल्या कामगिरीचा उल्लेख येथें येवढ्याचसाठीं करावयाचा की, फिर्यादीचे काम डिस्ट्रिक्ट कोर्टात चालू असता, श्री. केळकर ती चर्चा ऐकण्यास मुद्दाम एके दिवशी आले त्या वेळीं कोर्टापुढे माझी उलटतपासणी चालू होती मध्येच एक कायद्याचा मुद्दा उपस्थित केला गेल्यानें उलटतपासणी ५।७ मिनिटे स्थगित करावी लागली, व डिस्ट्रिक्ट जज नानावटी यानी सौजन्याने साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभे न राहतां खालीं खुर्चीवर बसण्याची मला परवानगी दिली. मी तात्यासाहेबांशेजारींच बसलों. त्या वेळीं ते मला हळूंच म्हणाले, "या खटल्यात तुम्हास यश मिळावे व डेक्कन कॉलेज नामशेष होऊ नये असे मला मनापासून वाटते; कारण कॉलेजची यापुढची व्यवस्था तुमच्या माजी विद्यार्थि-संघाकडे आल्यास त्याचा भविष्यकाळ भूतकाळाइतकाच ऊर्जित होणे अशक्य नाही "

( ५ ) डेक्कन कॉलेजानंतर ज्या एका पुण्यांतील संस्थेशीं माझा अगदीं आरंभापासून संबंध आला त्या भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूटशीं श्री. तात्यासाहेब केळकर यांचाहि जवळजवळ आरंभापासून संबंध होता. ही संस्था स्थापन करण्याचा उपक्रम डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या ७८ व्या वाढदिवशी ( ६ जुलै १९१५ ) आनंदाश्रमात एक जाहीर सभा बोलावून केला गेला. त्या सभेस तात्यासाहेब उपस्थित नसले तरी त्या वेळी नेमल्या गेलेल्या कार्यकारणीचे श्री तात्यासाहेब हे एक सदस्य होते पुढील १२ महिन्यांत संस्थेकरितां स्वतःची वास्तु विकत घेऊन काहीं विवक्षित मागण्या मुंबई सरकाराकडे मागण्याकरितां डेप्युटेशन नेण्यापर्यंत मजल आली हे डेप्युटेशन ५ जुलै १९१६ रोजी त्यावेळचे मुंबई प्रांताचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यास भेटलें. या डेप्युटेशनमध्येंहि केळकरांचा समावेश करण्यांत आला होता डेप्युटेशनकरिता कौन्सिल हॉलमध्ये आल्याबरोबर केळकरांनी तेथील व्हिजिटर्स बुकांत सही करून येण्याचा उद्देशहि लिहिला ते पाहून आमच्यापैकी काहींनी तात्यासाहेबांचेंच अनुकरण केलें. असे करण्याचे कारण विचारता तात्यासाहेब म्हणाले, "आमच्यासारख्यांना गव्हर्नराच्या भेटीस जाण्याचा प्रसंग आला असता, त्याच्या हेतूबद्दल इतरांना तर्कवितर्क करण्याची संधि न देता, आपणच स्वदस्तुरचे स्पष्टीकरण करणें बरे नव्हे काय ? " या वेळी अर्थात् लोकमान्य हयात होते.

( ६ ) कारणपरत्वें तात्यासाहेब अनेक वेळा माझ्या घरीं आले आहेत, व मीहि त्यांच्या घरी गेलो आहें. अगदी प्रथम त्यांचा मजकडे येण्याचा प्रसंग अजूनहि

मला आठवतो. त्या वेळीं मी नारायण पेठेतील देशमुखांच्या वाड्यात राहत असे. पुढील दार ओढून घेतलेले असल्यामुळे रस्त्यावरूनच त्यांनीं मला हांक मारिली. मी माडीवरून खाली येऊन त्याना सामोरा गेलो व आम्ही दोघेहि माडीवर गेलो. जिन्यावर प्रथम त्यांनी जावे म्हणून मी दारांतच थबकलो. त्या वेळी ते म्हणाले, " अहो, पौर्वात्य पद्धत म्हणजे घरच्या यजमानाने पुढे होऊन पाहुण्यास वाट दाखवावयाची. ही तुमची पाश्चात्य पद्धत झाली. पण ती ठाऊक नसणाऱ्या एखाद्याला वाटावयाचे, हे मागे कां थबकले; त्याना काही सशय वगैरे आला की काय ? म्हणून तोहि थबकून रहावयाचा ! "

(७) महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीसबधाने तात्यासाहेबाची शेवटची कामगिरी म्हणजे गेल्या [illegible] (ता १९ सप्टेंबर १९४७) भीष्मपर्व-प्रकाशनाचा जो समारभ झाला त्या वेळी नियोजित अध्यक्ष आयत्या वेळी न आल्याने – अवघ्या २ दिवसाचीच पूर्वसूचना असतानाहि – तात्यासाहेबानी स्वीकारिलेले अध्यक्षस्थान, व ' कौटिलीयाचे अर्थशास्त्र ' या विषयावर त्यांनी केलेले अध्यक्षीय प्रवचन. तात्यासाहेबानी या प्रस[ंगा] प्रकट केलेले या विषयावरील विचार एखाद्या चिकित्सक सशोधकास शोभेसे होते. तें समग्र भाषण भाडारकर इन्स्टिट्यूटच्या २८ व्या वर्षाच्या 'ॲनल्स' मध्यें ( पृष्ठे १२८–१३० ) प्रसिद्ध झाले आहे. समारभ सुरू व्हावयाच्या पूर्वी, तयार झालेली भीष्मपर्वाची आवृत्ति मी त्याच्या हाती दिली. ती चाळून पाहून व शेवटी Critical Notes दिलेल्या पाहून त्याना बरे वाटले; तरी पण, 'आता हे सर्व केव्हा वाचावयाचे' असे म्हटल्यासारखा भाव त्याच्या चर्येवर प्रकट झाल्यासारखे मला वाटले. भीष्मपर्वाच्या संपादकीय जबाबदारीतून मुक्त होताच त्याहून मोठे अधिक जबाबदारीचे शातिपर्वाच्या सपादनाचे काम मी अगावर घेतल्याचे समजून त्याना फार समाधान झाले, व जणू काहीं पहिले जबाबदारीचे काम पूर्ण पाडल्याबद्दलचे हे मला बक्षीसच दिले जात आहे असें त्यानी त्याला स्वरूप दिले. हे नतरचे काम तात्यासाहेबाच्या अपेक्षेपेक्षाहि अगोदर सपविण्याचा मी त्याच वेळी मनाने निश्चयहि केला पण आता तो निश्चय तडीस गेला तरी त्याचे चोज करणारे तात्यासाहेब त्या वेळी कोठे असणार !

(८) केळकर यांच्या ३०–४० वर्षांच्या परिचयातील जे थोडे प्रसग, स्मरणशक्तीस विशेष ताण न देता, मला आठवले ते वर नमूद केलेच आहेत. या आठवणीच्या शोधार्थ गतकालात वावरत असता तेवढ्यापुरता तात्यासाहेबाशी साक्षात् सहवास मी अनुभवीत आहे असा सुखकर आभास निर्माण झाला; पण हे सुख आता शोकपर्यवसायीच ठरणारें असल्याने आणखी एकच आठवण देऊन मी आटोपते घेतो. तात्यासाहेबानीं मला 'सह्याद्री' करिता श्रीशंकराचार्यांच्या कालासंबधी अेक लेख लिहावयास सागितले. लेख पुरा होताच

तो 'पुष्करिणी'त जाऊन त्याच्या हवालीं केला व चार शब्द बोलून मी जावयास उठलो असता ते म्हणाले, "थाबा; घाई नाही ना ? मोक्ष व जीवन-मुक्ति याबद्दल तुमचें काय मत आहे ? " तात्यासाहेबानी काही महिन्यांपूर्वी "ऐलथडीचा मोक्ष" या विषयावर टिळक-स्मारक-मदिरांत एक व्याख्यान दिलें होते, ते मी ऐकले होते व या विषयासंबधीं त्याची केवळ बुद्धिप्रामाण्यवादाच्या भूमिकेवरून बनलेलीं मते मला परिचित होतीं. त्यापलीकडे जावयास ते तयार नव्हते. आत्मनित्यता म्हणजे व्यक्तिनित्यता (permanence of the individual) न मानता, ज्ञातिनित्यता (permanence of the species) मानण्यास ते तयार होते अर्थात् अनुरूप पुत्रोत्पत्ति हीच त्याच्यामते आत्म-नित्यता याच भूमिकेवरून पुढे गेल्यास मनुष्याच्या [1] आठवणी, त्याने मागे प्रथित करून ठेविलेले विचार – जर मनुष्याने स्वतः आपल्या हयातीत जे प्रोत्साहनाचे अथवा नवचैतन्य देण्याचे कार्य केले असेल तेच कार्य करण्यास ते समर्थ असतील तर – तोहि एक आत्मनित्यतेचा प्रकार म्हणता येईल. येथपर्यंत मजल घेण्यास तात्यासाहेब राजी होते; पण त्याच्या पुढच्या न्यायप्राप्त पायऱ्या म्हणजे वेदनित्यता,[2] विभूतिवाद व अवतारवाद मी त्याच्या गळी उतरवू शकलो नाही त्याच्या शेवटच्या कवितेत आत्मनित्यतेच्या प्रश्नास दुरूनहि स्पर्श केला गेला नाही हे या बाबतीन विशेष सूचक आहे वरच्या (theoretical) भूमिकेहून थोड्याशा खालच्या (practical) भूमिकेवर आल्यास, समत्वस्वरूप कर्मयोग व 'अद्वेष्टा सर्वभूताना' इत्यादि (भ. गी ११, १२–१३–१९) जीवन्मुक्ताची लक्षणे जीवन्मुक्ताच्या अगी बाणली पाहिजेत हे तात्यासाहेबाना समत होते व चित्तस्वास्थ्याकरिता प्राणा-यामादि साधनाची उपयुक्तता (पण आवश्यकता नव्हे !) ते मानावयास तयार होते, पण त्याच्या पलीकडे जाऊन समाधिअवस्था आणि 'ब्रह्म'-साक्षात्कार त्याच्या बुद्धिवादाच्या चौकटीत मला तरी नीट बसविता येईना

जीवन्मुक्तास सृष्टिनिर्मितीचे कोडे यथार्थपणे उकलितां आले पाहिजे या मुद्द्यास केळकराचें उत्तर असे की, या कोड्याचे कोणते उत्तर यथार्थ हे ठरवावयाचे कोणी व कसे ? जीवन्मुक्तास 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तु' शक्ति असली पाहिजे, त्याला सर्व 'सिद्धि' वश असल्या पाहिजेत, ह्या मुक्तीच्या भोळ्या पौरा-णिक कल्पनाना अर्थात् ते दुरूनहि स्पर्श करावयास तयार नव्हते

अखेरीस मी असा मुद्दा उपस्थित केला की, ज्या जीवन्मुक्त पुरुषानें ऐलथडीच मुक्ति मिळवून अखिल जीवनाचे खरे रहस्य आत्मसात् केले त्याला

---

१ भवभूतीने लिहिले आहे – 'न खलु स उपरतो नाम यस्य वल्लभो जन स्मरति.'

२ ...

वस्तूच्या व व्यक्तीच्या गुणदोषाचे पूर्ण ज्ञान असले पाहिजे. फार लाब कशाला, हिंदुस्थानचे पुढे आणखी ८–१० वर्षांनी काय होणार आहे हे त्याला आज अचूक सांगता आले पाहिजे या अचूकतेची प्रतीति आपणास कालातराने ताडून पाहूतां येण्याजोगी आहेच एवढा एकच मुद्दा तात्यासाहेबाना पटलासे दिसले.

आमच्या दुर्दैवाने, पण तात्यासाहेबाच्या सुदैवाने, 'ऐलथडीचा मोक्ष' अनुभवून तात्यासाहेब आता 'पैलथर्डीस' गेले आहेत. तेथे काही हाती लागण्याजोगें असलेच तर, त्याचे यथार्थ ज्ञान – त्याच्या आजवरच्या वृत्तपत्रकाराच्या पेशास अनुसरून – ऐलथडीवरच ठेचकाळणाऱ्या आम्हा मुमुक्षूस त्यानी करून दिले पाहिजे हीच आमची अपेक्षा व त्याना शेवटची आग्रहाची प्रार्थना !



## श्रीमंत महाराज यशवंतराव होळकर

( अधिपति, संस्थान इंदूर )

कै. नरसिंह चिंतामण केळकर याचा मराठी साहित्याच्या विविध क्षेत्रात सारखाच अधिकार होता त्यामुळे त्याना लोकमताने देण्यात आलेली 'साहित्य-सम्राट्' ही पदवी अत्यत सार्थ होती कोणताहि विषय सरळ, सुबोध भाषेत, तर्कशुद्ध व सप्रमाण रीतीने माडण्यात ते सिद्धहस्त होते. 'केसरी' पत्राचे सपादकत्व यांच्याकडे असलेल्या प्रदीर्घ कालात प्रचलित राजकारणाची विद्वत्तापूर्ण, निर्भीड, निर्भय, तर्कशुद्ध व राष्ट्रीय दृष्टीने चिकित्सा करण्यात 'केसरी' पत्राची बरोबरी महाराष्ट्रात तर दुसरे कोणतेहि पत्र करू शकत नव्हतेच; पण इतर प्रातातहि त्याच्या तोडीची फारच थोडी पत्रे होती

राजकारणातील हीच समतोल विचारसरणी साहित्याच्या क्षेत्रातहि कै. तात्यासाहेब केळकर याच्या सर्वच लिखाणात सुस्पष्ट दिसून येते त्याच्या मताशीं, कित्येक महत्त्वाच्या बाबतीत, अलिकडे देशातील कित्येक नामाकित विचारवताचा व पुढाऱ्याचा मेळ बसेनासा झाला होता. पण मतस्वातत्र्याचा हा प्रश्न बाजूला ठेवला तर केळकराची दीर्घकालीन मराठी साहित्याची सेवा, त्यानी देशाच्या उद्धाराप्रीत्यर्थ केलेले बहुविध प्रयत्न व महाराष्ट्रातील त्याचा थोर दर्जा याविषयी तर दुमत होऊच शकत नाही, हे निर्विवाद आहे



## गंगाधर बाळकृष्ण देशपांडे

( बी. ए , एलूएलू. बी., कर्नाटकचे कॉंग्रेस पक्षाचे पुढारी, बेळगांव )

( १ ) १९२१ साली माझ्यावर कलम १२४ अ प्रमाणे खटला भरण्यात आला होता या खटल्याचे वारट सुटल्याची हकीकत मला पुण्याला समजली. त्या

वेळी मी तात्यासाहेबाच्या घरीच उतरलो होतों. १२४ अ कलमाखाली दीर्घ मुदतीची शिक्षा सांगितली आहे. अशा स्वरूपाचा हा खटला कर्नाटकांत पहिलाच होता व गांधीच्या असहकाराच्या चळवळीला जोर चढत चालला होता व त्या चळवळींत मी प्रामुख्याने भागहि घेत होतो. या सर्व परिस्थितीमुळें माझ्यावरील खटल्यात मला बरीच मोठी शिक्षा होईल असें वाटले. घरी वृद्ध मातोश्रीशिवाय घरचें असें कोणी नव्हते. म्हणून तुरुंगात जाण्यापूर्वी त्यांना एकदां भेटावे व घरच्यासंबंधी कांही व्यवस्था त्याना सांगून त्यांचा निरोप घ्यावा अशी माझी इच्छा होती. पण पकडवॉरंट चुकवून हे सर्व साध्य होणें कठीण होते. मी पुण्यास केळकरांच्या घरीं आहे ही गोष्ट काही गुप्त नव्हती. माझ्यावर वॉरंट सुटल्यापासून केळकराच्या घरावर पोलिसांची सारखी पाळत होती. तेव्हां आईला भेटण्याची इच्छा तडीला कशी न्यावी हा प्रश्न मला पडला. या बाबतींत मी तात्यासाहेबाचा सल्ला घेतला. बेळगांवच्या पोलिस सुपरिंटेंडेंटला तार करून मी पुण्यास आहे व बेळगांवला येण्याला मला पांच-सहा दिवस लागतील, तोपर्यंत माझ्यावरील वॉरंट बजावण्याकरितां पुण्यास पाठवूं नयें, अशी तार करून उत्तर मागवावें असा त्यांनी सल्ला दिला. हा बेत थोडा धाडसाचाच होता तथापि त्याप्रमाणे करण्याचे मी ठरवून पोलिस सुपरिंटेंडेंटना तार केली व ही बातमी बेळगावला माझ्या स्नेह्यांना तारेनें कळवून पोलिस सुप-रिंटेंडेंटचा काय बेत ठरतो ते कळवण्यास लिहिलें. माझे स्नेही पोलिस सुपरिंटेंडेंटला भेटले व दोघांच्या विचारे माझी ५।६ दिवस वाट पहावयाची असे ठरलें. तथापि वेळेवर हजर होण्याकरिता पुण्याहून बेळगावास कसे जावयाचें व घरीं जाऊन आईला भेटण्याची व्यवस्था कशी करावयाची हे प्रश्न माझ्यापुढें होतेच. त्याबद्दलची योजनाहि तात्यासाहेबानी सुचवली. मुदतीच्या आत बेळगावला तर जावयाचें, पण वाटेत किंवा बेळगांवच्या स्टेशनावर वॉरंट बजावण्याचा मोका टाळण्याकरिता मोटारीने पुण्याहून बेळगावचा प्रवास करावा असे तात्यासाहेबाच्या विचाराने ठरलें. तथापि पुण्याची मोटार घेतल्यास पोलिसाना समजणे संभवनीय होतें म्हणून अतूकाका फडणीस यांना सातार्‍याला पाठवून तेथून एक मोटार आणवली व त्या मोटारीने मी बेळ-गावला रात्री येऊन पोचलो बरोबर अतूकाका व बाबूराव गोखले याना देण्यात आले होते. आईची भेट झाली घरची व्यवस्था करावयाची ती केली व पोलिसांना कळविले त्यानी "घाई नाही, दुसर्‍या दिवशी सकाळी येऊ" असा निरोप पाठवला. त्यामुळे सबंध रात्र व दुसर्‍या दिवशी सकाळच्या ९ वाजेपर्यंत वेळ मिळाला.

तात्यासाहेबाचा सल्ला किती योग्य होता व त्यानी सुचविलेली सावधगिरी प्रसंगाला किती अनुसरून होती हे दिसून येईल. कोणत्याहि प्रकारची लबाडी, छपवाछपवी पदरात न घेता सर्व कामे तडीला गेली.

(२) १९२९ एप्रिलमध्ये बेळगांवाला चवदावे महाराष्ट्र-साहित्य संमेलन

भरले होते. त्यापूर्वी कर्नाटकांत कानडी लोकांनी या समेलनाच्या विरुद्ध खूप चळवळ केली होती व समेलनाला अपशकून करण्याची तयारी चालविली होती. श्री. बळवी व मी अस्सल कर्नाटकी असूनहि कानडी लोकानी चालवलेली दगल आम्हां दोघांना मान्य नव्हती व साहित्य समेलन निर्विघ्नपणे पार पडावे म्हणून आम्ही शक्य ते प्रयत्न करीत होतो बेळगांव जिल्हा व विशेषतः बेळगाव शहर कर्नाटकांत का महाराष्ट्रात हा वादाचा मुद्दा होता. कॉंग्रेसच्या घटनेप्रमाणे सबध बेळगाव जिल्हा हा कर्नाटकात सामील करण्यात आला आहे व त्याला अनुसरून १९२४ साली कर्नाटक प्रांतात भरावयाची राष्ट्रीय सभा बेळगावांत भरविण्यात आली म्हणून कानडी लोकानी हा वाद उपस्थित करू नये म्हणून मी माझी पराकाष्ठा करीत होतो. या प्रयत्नाला यश मिळावे म्हणून समेलनाचे नियोजित अध्यक्ष शिवरामपत पराजपे याची समेलनापूर्वी मॉ भेट घेतली व आपण सर्व कॉंग्रेसला मानणारे आहोत व कॉंग्रेसच्या घटनेप्रमाणे बेळगाव जिल्हा कर्नाटकाचा भाग आहे येवढी गोष्ट अध्यक्षीय भाषणात घालण्याबद्दल सुचवले शिवरामपतानी इतके केले असते तर वाद विकोपाला गेला नसता पण, शिवरामपतानी तसे करण्याचे नाकारले आपल्या भाषणात या विषयाचा उल्लेखच करणार नाही असे त्यांनी मला स्पष्ट सागितले.

याच वेळी केळकराची मी भेट घेतली. केळकराची समेलनाला जाण्याची इच्छा नव्हती पण केवळ माझ्या आग्रहाने त्यानी येण्याचे मान्य केले इतके पदरांत पडल्यानतर केळकराना बेळगाव जिल्हा हा कॉंग्रेस-घटनेप्रमाणे कर्नाटकाचा भाग आहे अशा अर्थाचा ठराव माडण्यास विनती केली. केळकरासारख्या थोर महाराष्ट्रीय पुढाऱ्याने अशा प्रकारचा ठराव माडण्याचे पत्करल्यास कर्नाटकातील चळवळ शांत होईल अशी माझी कल्पना होती. ही साधी व न्यायाची विनती केळकरानी मान्य केली. त्यामुळे मला आनद झाला व येवढयाने कर्नाटकातील वादळ दबेल असे मला जे वाटले होते तें खरे ठरले. केळकर जर हा ठराव माडत असतील तर आम्ही विरोध करणार नाही असे विरोधकाच्या पुढाऱ्यांनी मला आश्वासन दिले. पुनः मी समेलनाच्या पूर्वी पुण्याला जाऊन त्याचे येण्याचे निश्चित करून आलों. केळकर ठरल्याप्रमाणे आले व त्यानी ठराव मांडला व मी अनुमोदन दिलें. पण अध्यक्षानी ठराव नियमबाह्य ठरविला त्यामुळे ठरावावर मतमोजणी झाली नाही. पण समेलनाच्या प्रसगी शिष्टाचाराला सोडून जे प्रकार होणार अशी भीति वाटत होती ती मात्र नाहीशी झाली व समेलनाचे काम यशस्वी रीतीने पार पडले. याचे सर्व श्रेय केळकराना आहे हे मात्र मी विसरणार नाही. केळकर हे महाराष्ट्राचे अभिमानी, मराठी साहित्याचे सम्राट् असूनहि कानडी मराठी वाद जेथें जेथें म्हणून उपस्थित होण्याचा सभव असे तेथे तेथे ते न्यायाला धरून वागले

व कानडी लोकावर अन्याय होऊ दिला नाही, अशी अनेक उदाहरणे मला माहीत आहेत.

( ३ ) १९३० सालीं मी रत्नागिरीच्या तुरुगांत असतां एक दिवस जेलचे सुपरिंटेडेट माझ्याकडे आले व मला म्हणाले की, "पचवीस हजाराचा एक ट्रस्ट करण्यात आला आहे व ट्रस्टीपैकी तुम्ही एक आहा. ऑफिसमध्ये येऊन ट्रस्टचा कागद वगैरे पहा." कोणता ट्रस्ट व कोणीं केला याची मला मुळीच कल्पना आली नाही, किंवा कोणी तरी ट्रस्टीमध्ये माझे नाव घालील ही कल्पनाहि मला नव्हती. शिवाय ते दिवस दडपशाहीचे होते व मी तर शिक्षाच भोगत होतो. त्यामुळे सुपरिंटेडेटला आलेल्या कागदपत्राचा नीटसा उमज झाला नसावा असे मला वाटले ऑफिसमध्ये जाऊन मी ट्रस्टचा कागद पाहिला. तेव्हा मला आश्चर्य वाटले. लोकमान्य टिळक पर्सफडातून २५००० रु. कर्नाटकाकारिता राखून ठेवून त्या रकमेच्या व्याजाची व्यवस्था करण्याकारिता जे ट्रस्टी नेमले होते त्यात माझे नाव होते ही सर्व व्यवस्था तात्यासाहेबानी केली होती. वास्तविक या वेळी तात्यासाहेबाचा व माझा राज कारणात तीव्र मतभेद उत्पन्न झाला होता कर्नाटकात पर्स फड जमविण्यात मीं प्रामुख्याने भाग घेतला होता व टिळकाच्या धोरणाला अनुसरूनच मी राज-कारणात भाग घेत असे. या गोष्टी लक्षात आणून व स्वतःच्या मतभेदाकडे दुर्लक्ष करून केळकरानी माझे नाव टस्ट्रीत घातले होतें. यावरून केळकराचे सौजन्य व मनाचा मोठेपणा दिसून येतो.

( ४ ) असहकारितेच्या १९२१ च्या चळवळीत मी मुबईस विद्यार्थ्यांनीं कॉलेजे, शाळा वगैरे सस्थावर बहिष्कार घालावा म्हणून प्रयत्न करीत होतो. या चळवळीला मदत म्हणून मुबईचे जमनजी शेठ यांनी दहा हजार रुपये दिले होते. ही रक्कम खर्च करण्याची जबाबदारी मुख्यतः माझ्यावर होती. तरी तात्यासाहेबांनीं या कामी मला मदत करण्याकारिता कै अण्णासाहेब नेने व श्री. बाबुराव गोखले यांना सागितले होते. मुबईस विद्यार्थ्यांच्या पुष्कळ सभा आम्ही घेत होतो. "केसरी"तून सुद्धा तात्यासाहेबानी या विशिष्ट चळवळीला उचलून धरले होते. काही महाराष्ट्रीय विद्यार्थी "आम्ही केळकरांचें मत या बाबतीत घेतो व नतर काय ते ठरवू" असे म्हणत होते. केळकराचे लेख व त्यानी मला केलेली मदत ही लक्षात घेता ते विरुद्ध मत देतील ही कल्पना मला येणे शक्य नव्हते. म्हणून मी बेधडक अशा विद्यार्थ्यांना केळकरांना विचारा असे सागत असे. कांहीं विद्यार्थी केळकराकडे जाऊन आल्यानतर, त्यानी कॉलेज सोडू नका, असे सांगितलें आहे, असे मला सांगू लागले. मला आश्चर्य वाटले. पुढे कांहीं दिवसांनीं माझी व त्याची भेट झाली तेव्हा त्याच्याकडून खुलासा मागितला. तेव्हा त्यांनी मला

सांगितले की, " जे विद्यार्थी माझा सल्ला घेण्याकरता येतात त्याच्या मनांत कॉलेज सोडण्याचे नसतेच. त्यांच्या व माझ्या बोलण्यांत हे मला दिसून आले, म्हणून त्यांच्यावर जबरदस्ती करून भलतेच प्रलोभन दाखवून त्याच्या शिक्षणक्रमात व्यत्यय आणावा असे मला वाटलें नाही म्हणून अशाना कॉलेज न सोडण्याचा सल्ला दिला ही गोष्ट खरी आहे. गांधींना विचारलें तर तेहि असेच सांगतील अशी माझी खात्री आहे." या उत्तराने माझे समाधान झाले व केळकरानीं केले ते योग्यच होतें असे मला वाटले. पण, त्यांच्याकडे गेलेल्या विद्यार्थ्यांना मात्र "आम्हांला केळकर कॉलेज सोडू नका म्हणून सांगतात व ते आमचे पुढारी आहेत म्हणून आम्ही कॉलेज सोडीत नाही" असे म्हणण्यास फावले! यांत केळकरांकडे कांहीं दोष नव्हता, पण बदनामी मात्र त्यांची झाली. बाकी असे अनुभव केळकरांना पुष्कळच आले आहेत. माझे व त्यांचे पुष्कळ मतभेद होते. तथापि त्यांचे वर्तन दुटप्पी आहे असे मला कोणी सांगू लागला तर मी त्यांचे म्हणणे खरे मानून वागत नसे. त्यामुळे आमच्या स्नेहात अंतर आले नाहीं.

(५) १९४६ च्या ऑगस्ट पहिलीच्या पूर्वी काही दिवस मी केळकरांच्या भेटीला गेलो होतो. त्या वेळी ते टिळकपुण्यतिथीच्या निमित्त भाषण करणार होते व त्याला अनुसरून त्या आठवड्याच्या केसरीत देण्यासाठी पक्षोपपक्ष यासंबंधाने एक लेख सांगण्यात गुतले होते मला पाहून त्यानी लेख सांगण्याचे बंद केले व त्याच विषयासंबंधाने त्यांनी भाषण सुरू केले. त्याच्या बोलण्याचा आशय पुढीलप्रमाणे होता :– "सार्वजनिक कार्यात व विशेषतः राजकारणात एकाच पक्षाचे नेहमी वर्चस्व असते असे नाही काही कालपर्यंत मी प्रभावी असलेल्या पक्षाच्या प्रमुखात एक होतो. पण आज तो पक्ष अल्पसंख्य झाला आहे तुमचेंहि तसेच झाले आहे आज दुसरे पक्ष जोरात येत आहेत. त्यामुळे तुम्ही आण्णासाहेब लठ्ठे याना पाठिंबा दिला तरी तुमचे सर्व साधले नाही त्याना कॉंग्रेसचे तिकिट मिळाले, पण मंत्रिपद मिळाले नाही, वगैरे " लठ्ठयाना मंत्रिपद मिळावे म्हणून मी प्रयत्न केला नव्हता असे सांगितले. त्याना ते खरे वाटले तो लेख केसरीत प्रसिद्ध झाला आहे व त्यांच्या कल्पना आज मूर्त स्वरूपात येण्याची चिन्हे दिसत आहेत गेल्या वर्षीच्या टिळकपुण्यतिथीच्या दिवशी तात्यासाहेबांचे भाषण होऊन "टिळकपक्षा" च्या धोरणासंबंधाने त्यानी ऊहापोह केला त्या वेळी त्यानी माझा उल्लेख करून माझ्या राजकीय मतात बदल झाल्याचे सांगितले पाकिस्तान-निर्मिति झाल्यामुळे हिंदुस्थानच्या राजकारणाच्या जुन्या धोरणात बदल करावे लागणार असे माझें मत झाले आहे, हे अगदी खरे आहे डॉ शामाप्रसाद मुकर्जीसारख्या हिंदुमहासभेच्या पुढाऱ्याला मध्यवर्ती मंत्रिमंडळात घेणे त्याचप्रमाणे श्री. माधवरावजी अणे याना बिहारचे गव्हर्नर नेमणे या घटना

कॉंग्रेसचा देखील दृष्टिकोन बदलल्याच्या निदर्शक आहेत. म्हणून अशा प्रसंगी तात्यासाहेबाची मला आठवण होते त्यांच्या सहकार्याची व मार्गदर्शनाची या नवीन परिस्थितीत पुष्कळाना आवश्यकता वाटणे स्वाभाविक आहे मलाहि तसेंच वाटत होते. पण नि . . निराळीच आहे! ता. १ ऑगस्टला मी अमळनेरला होतों व ता. १४।१०।४७ रोजी मी तेथे असतानाच त्याच्या मृत्यूची बातमी ऐकण्याचा प्रसंग आला! व अमळनेरहून परत बेळगावला जाताना त्याच्याशी वाटाघाट करण्याचा माझा बेत आ-या जागी- जिरला!



## शंकर गणेश दवणे

(एम्. ए., वरोडा-चांदा)

(१) सन १९२३ सालची गोष्ट कॉंग्रेसच्या गोटात फेर आणि नाफेरवाद जोरात सुरू होता दास, नेहरू व केळकर याच्या खटपटीने स्वराज्य पक्ष स्थापन होऊन कॉंग्रेसने कौन्सिल प्रवेशाला मान्यता दिली होती खुद्द तात्यासाहेब मध्यविभागातर्फे मध्यवर्ती लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या निवडणुकीसाठी स्वराज्य पक्षातर्फे उभे होते. निवडणुकीच्या दौऱ्यात तात्यासाहेब भुसावळला आले. त्या वेळीं त्याचे तेथील गांधी-चौकांत मतदाराना उद्देशून भाषण झालें. असहकारितेच्या युगांत अनेक लहानमोठे पुढारी भुसावळला येऊन गेले होते शिवाय भुसावळ गाव म्हणजे दे भ. आण्णासाहेब दास्ताने याचा बालेकिल्ला असा त्या वेळी एक सार्वत्रिक समज होता. तात्यासाहेबाचे व्याख्यान झाले इतर ठिकाणाप्रमाणेच भुसावळ येथील या सभेतहि कट्टर कॉंग्रेसवाद्यानी कौन्सिल-प्रवेशाला आपला विरोध केलाच. तो पाहून 'मी भुसावळकराना जाणून आहे' असे तात्यासाहेब म्हणाले. या सभेचा विशेष हा की, त्या वेळी तात्यासाहेबाचे वडील बंधु श्री महादेव चिंतामण केळकर हे खासगी नात्याने पूर्वखानदेशतर्फे मुबई विधिमडळाच्या निवडणुकीसाठीं उभे होते. 'त्याना तुम्ही आपली मते देऊ नका स्वराज्यपक्षीय उमेदवारालाच ती द्या' असे तात्यासाहेबांनी मतदाराना खडसावून बजावले. या . . . तत्त्वनिष्ठेचा मतदारांवर फार अनुकूल परिणाम झाला आणि . . . ती सभा जिंकली. कौन्सिल-प्रवेशाच्या पुष्ट्यर्थ त्यानी खालीं दिलेला दाखला आपल्या भाषणात दिला:—

व्याघ्रस्य महदालस्यम् सर्पस्य च महद्भयम्।
पिशुने चैव दारिद्र्यम् तेन जीवन्ति मानवाः।

(२) तात्यासाहेबाना मीं प्रथम १९२५ सालीं पत्र लिहून त्याच्या हस्ताक्षराची मागणी केली. लगेच सिमल्याहून लेजिस्लेटिव्ह असेब्लीच्या कामात ते असू-

नहि त्यानी मला पत्र लिहिले. तात्यासाहेब आपल्या पत्रात म्हणतात :– " ...... हस्ताक्षरे सग्रहित करण्याचा तुमचा हौशी उद्योग केवळ मुलानाच असतो असे नाही. याचे प्रत्यतर पाहावयाचे असल्यास पुण्याच्या इतिहासमडळात जाऊन पाहावे. माझे हस्ताक्षर जपून ठेवण्याइतके चागले नाही येवढेच जरा वाईट वाटते असो. इग्रजी हस्ताक्षराकरता मी असेच कोणी मागिल्यास ज्या चार ओळी नेहमी लिहून देतो त्याच तुम्हासहि लिहून पाठवाव्या असे वाटून पाठवीत आहे :–

Shall I ask the brave soldier
Who fights by my side
In the cause of our country
If our creeds agree ?
Shall I give up the friend
I have valued and tried
If he kneel not before
The same alter with me ?

मी पत्रात तात्यासाहेबाना अमुकच लिपीत हस्ताक्षर पाठविण्याचे लिहिले नव्हते. पण तात्यासाहेबानी पत्र मोडी लिपीत लिहून, त्यात एक इग्रजी उतारा आणून पत्ता बाळबोध लिपीत लिहिला आणि दोन भाषा आणि तीन [illegible] त्यानी आपले हस्ताक्षर मला उपलब्ध करून दिले याबद्दल मला धन्यता वाटली ' माझें हस्ताक्षर जपून ठेवण्याइतके चागले नाही ' असे तात्यासाहेबानी जरी वरील पत्रात म्हटले असले, तरी त्यांच्या हस्ताक्षराची ओळख महाराष्ट्राला नवीन करून देण्याचे कारण नाही. ते अगदी ठळक, सुवाच्य आणि वळणदार असे होते. १९२७ साली तात्यासाहेबाच्या कर्णमुळावर मुबईला ' कैकिणी–टिळक ' इस्पितळात ऑपरेशन झाले. तशाहि स्थितीत [illegible] माझ्या एका पत्राला दिल्लीहून उत्तर दिलें हे त्यांचे सौजन्य मी कधींहि विसरणार नाही

( ३ ) १९२७ साली तात्यासाहेबाची प्रत्यक्ष गाठ पडली त्या वेळी ते गायआळीत स्वतःच्या घरी राहत होते मी माझ्या नावाची चिठ्ठी आत पाठविली " भेटीस येणाऱ्याने चिठ्ठी चपाटी पाठविण्याची जरूरी नाही " असे ते मला म्हणाले. " तुम्ही यादवराव दवणे याचे कोण ? " असा त्यानी मला प्रश्न केला माझे आ[illegible] ती. कै. यादवराव माधवराव दवणे हे कै. बाबासाहेब पेडसे याच्या हाताखाली पुण्यास कमिशनरच्या ऑफिसात काम करीत असत त्याची आणि कै बाबासाहेब विद्वास याची नित्य बैठक असे " असे सागितले. तात्यासाहेबाना सगीताचा नाद फार. माझे चुलत आजोबा ती. कै. मार्तंडराव यादवराव दवणे हे तालज्ञानांत तरबेज असा त्याचा लौकिक होता. त्याची आणि तात्यासाहेबाची मैत्री असे श्रीपाद कृष्ण

कोल्हटकराच्या आत्मवृत्ताच्या पृ ३३ वर त्याच्या नांवाचा उल्लेख आहे. ' तुम्हाला गाणे येते काय ? ' असा प्रश्न तात्यासाहेब मला नित्य विचारीत. आमचे घराणे मूळचे वेरूळ येथील जुने तेथील आमच्या वाड्यात काही जुने ऐतिहासिक कागदपत्र आहेत काय असाहि तात्यासाहेब मला प्रश्न करीत वेरूळच्या लेण्यावर 'सह्याद्रि'साठी एखादा लेख लिहिण्याचीहि त्यानी मला आज्ञा केली होती पण तात्यासाहेबाच्या शताशहि उद्योग व उरक माझ्यात नसल्याने ते काम माझ्याकडून अद्याप व्हावयाचेच आहे ! माणसाला कितीहि अडचणी सोसाव्या लागल्या तरी उच्च शिक्षण हे " झालेच पाहिजे " हा तात्यासाहेबाचा उपदेश मी नित्य उराशी बाळगून असें. ' ज्ञानार्जनाच्या कामी अर्धेच काय पण सगळे आयुष्य गेले तरी काय चिंता ? ' असे ते म्हणत. या त्याच्या उपदेशाच्या बळावर मी बी ए व पुढे एम्. ए. झालो. तेव्हा त्याना फार समाधान वाटले. नागपूर विद्यापीठात एम्. ए. ला मराठ्याचा सर्व इतिहास न ठेवता फक्त पानिपतच्या तिसऱ्या युद्धापावेतोच ठेवण्याचा कोणी उपद्याप केला, हे तात्यासाहेबाना आवडले नाही.

( ४ ) तात्यासाहेबाच्या घरी त्याच्या टेबलावर वाचनाची पुस्तके आणि पत्रव्यवहार व्यवस्थेशीर रीतीने लावून ठेवलेला असे. 'केसरी' कचेरीतील एखादे गृहस्थ त्याच्या हाताशीं नेहमी असत. टेलिफोनवरून केसरीची प्रुफे मागविण्याचीहि गडबड चाले लेखकास ते खोलीत येरझारा करीत मोठ्याने मजकूर सागत. त्याच्या भेटीस येणाऱ्यात बूटसूट घातलेल्या लोकापासून तो तहत नखशिखात खादीचा शुभ्र पोशाख केलेले गृहस्थ असत. नेपोलियन बोनापार्टचा एक लहानसा 'बस्ट' 'पेपरवेट' म्हणून ठेवलेला मी त्याच्या टेबलावर पाहिला आहे भेटीस आलेला गृहस्थ नेहमीं समाधान वृत्तीनें त्याच्या घराबाहेर पडत असे. चालू राजकारणाचा अभ्यास करावयाचा तर त्यासाठी ' गव्हर्नमेंट ऑफ इडिया ॲक्ट ' ( १९३५ ) वाचण्याची त्यानी मला शिफारस केली होती ' Administration of a country is governed by the Act on which it is based ' असे ते म्हणत. मराठी भाषेचा अभ्यास करण्यासाठी त्यानी मला कै. हरिभाऊ आपट्याच्या कादबऱ्या वाचण्याची शिफारस केली होती. या कामी मदत म्हणून कै. वाग्भट देशपाडे व हरिभाऊच्या चरित्रकर्त्या कु गोदावरीबाई केतकर याची नांवे त्यानी सुचविली होती पैकी कै. वाग्भट देशपाडे यानी मला बहुमोल मदत केली.

( ५ ) डेक्कन [illegible] शारदेचा उत्सव एकदा तात्यासाहेबाच्या अध्यक्षतेखाली पार पडला. मडळाचे अध्यक्ष प्रा श्रीकृष्ण निळकठ चापेकर हजर होते. व्यासपीठाच्या मागे राजा रविवर्मा याचे शारदेचे भव्य चित्र [illegible] टांगले होतें. त्याच्याकडे पाहून तात्यासाहेबांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात शारदेचा मुकुट, तिचे हात, तिची वीणा, त्या वीणेच्या तारा, शारदेचे अलकार याची आणि वाङ्मयां-

तील रसालंकाराची उत्कृष्ट तुलना करून असे सुदर रूपक केले की, सर्व उपस्थित साहित्यिक आनदाने डोलू लागले.

(६) फर्ग्यूसन कॉलेजांतील ॲफी थिएटरात बॅ जयकर याचें एकदा व्याख्यान झाले. व्याख्यान अगदी रगात आले होते. जयकर याच्या ओघवती इग्रजी वार्णीने विद्यार्थि-वर्ग अगदी तन्मय झाला होता. इतक्यात स्टेजच्या पाठीमागील दाराने तात्यासाहेब . . ` - . उपरणे घेतलेले असे हळूच येऊन खुर्च्यांच्या मागील रागेत बसले, तोच 'एन् सी. केळकर!' अशी विद्यार्थ्यांनी एकच आरोळी ठोकून सर्व थिएटर दणाणून सोडले आणि टाळ्यांचा एकच कडकडाट केला बॅ जयकर याना आपले ऐन रगात आलेले भाषण थांबविणे भाग पडले. त्यानी मागे वळून पाहिले आणि स्मित केले. सभेच्या चालकांनी तात्यासाहेबाचा हात धरून खुर्चीवर पुढे आणून बसविले पुनः जयकराचे भाषण पूर्ववत् सुरू झालें. फर्ग्यूसन कॉलेजच्या विद्यार्थ्यांपुढे तात्यासाहेबाचेहि भाषण दुसऱ्या एका अशाच प्रसगी झाले त्या वेळी तात्यासाहेबानी विज्ञान आणि गणितशास्त्र यातील निरनिराळे दाखले देऊन विषय इतका रगविला की, त्याचे व्याख्यान झाल्यावर प्रि. महाजनी यानी मुद्दाम पुढे येऊन तात्यासाहेबाशी हस्तांदोलन केले व उत्कृष्ट भाषणाबद्दल त्याचे अभिनदन केले

(७) १९२७–२८ साली डॉ मुजे एकदा पुण्यास आले होते. किर्लोस्कर थिएटरात त्याचा सन्मान करण्यात आला. लोकाची त्या वेळी इतकी गर्दी लोटली होती की, थिएटराची गॅलरी 'कर कर' वाजू लागली तेव्हां अध्यक्ष या नात्याने तात्यासाहेबाना सभा स्थगित करावी लागली दुसऱ्या दिवशी सायकाळी शिवाजी मदिरात सभेचे राहिलेले काम पुरे करण्यात आले श्रोत्यांना शिवाजी मदिर अगदी फुलून गेले होते. आपल्या अध्यक्षीय भाषणात तात्यासाहेबानी डॉ. मुजे याना 'हिंदूचे पठाण' ही सार्थ पदवी बहाल केली. डॉ मुजे यांनीहि लोकमान्याच्यामागे आपण तात्यासाहेबाना गुरुस्थानी मानतो असे मोठ्या अभिमानाने सागितले.

(८) याच सुमारास एका सायकाळी तात्यासाहेबाच्या अध्यक्षतेखाली बेझटबाईचें किर्लोस्कर थिएटरात व्याख्यान झाले. बाई इतक्या वृद्ध पण त्यांचे भाषण त्यांच्या लौकिकास साजेल असे ठसकेबाज झाले. तात्यासाहेबांचे अध्यक्षीय भाषणहि इग्रजीतूनच झाले अध्यक्षीय टेबलासमोर थिएटरमधील 'फूट लाइट्स्' लावण्यात आले होते तात्यासाहेबानी आपल्या अध्यक्षीय भाषणाच्या सुरुवातीस 'फूट लाइट्स्' या शब्दावर अशी सुदर कोटी केली की, त्या योगाने बेझटबाई फार खूष झाल्या. तात्यासाहेबांचे सर्व भाषण बाईंनी इतक्या एकाग्र चित्ताने ऐकले कीं, आपली खुर्ची स्वहस्तें अध्यक्षीय

टेबलाजवळ ओढून घेऊन कानाला हात देऊन त्या तात्यासाहेबाचा शब्दन् शब्द लक्षपूर्वक ऐकत होत्या. तात्यासाहेबाच्या तोंडून जसजसे राजकीय तात्त्विक बोल बाहेर पडत होते तसतसा बाईंचा चेहरा विचारमग्न झालेला दिसत होता. यावरून अव्वल दर्जाच्या भारतीय राजकीय पुढाऱ्यात तात्यासाहेबांना किती मोलाचें स्थान होतें याचे प्रत्यतर त्या वेळी पुणेकराना आले.

( ९ ) याच वेळी तळेगाव दाभाडे येथील गणपतिविसर्जनाचा प्रश्न मुसलमानानी उपस्थित केला होता तळेगाव येथे जी हिंदुधर्मपरिषद झाली तीस तात्यासाहेब हजर होते याशिवाय श्री तात्यासाहेब करंदीकर, विश्वासराव डावरे इ. हिंदुधर्माभिमानी पुढारीहि हजर होते या परिषदेत तात्यासाहेबाचे भाषण फार आवेशयुक्त असे झाले "गणपतिविसर्जनाच्या बाबतीत वेळप्रसगीं सत्याग्रह करावा लागल्यास मी स्वतः पुढे होईन" असे तात्यासाहेबानी सागताच लोकाचा आत्मविश्वास दुणावला आणि त्यानी टाळ्याचा एकच गजर केला.

( १० ) केसरी-मराठा सस्थेची काहीना काही तरी सेवा आपल्या हातून घडावी असा तात्यासाहेबाच्या मागे माझा नेहमीच लकडा असे. १९३० साली त्यानी माझा महाराष्ट्र-विद्यापीठावरचा लेख केसरीत प्रसिद्ध केला त्यानतर 'मातृभाषा हें शिक्षणाचें माध्यम', 'जर्मनीतील निवडणूक' हे लेखहि त्यांनी छापले. केसरीचा ज्युबिली महोत्सव झाला त्या वेळी मी महोत्सवानतर "लो टिळकाच्या केसरीची गेली पन्नास वर्षे" हा लेख लिहून तात्यासाहेबाच्याकडे पाठविला तो योग्य वेळी प्रसिद्ध करण्यात येईल असे त्यानी मला कळविले. पण महिन्यामागून महिने लोटले तरी लेख प्रसिद्ध होईना, तेव्हा मी निराश झालों पण पुढे त्या वर्षीचा टिळक पुण्यतिथीचा केसरीचा अक मी उघडून पाहतो तो त्यात माझा वरील लेख पांच कॉलमात पानभर आलेला मी पाहिला ! योग्य वेळी लेख देण्याच्या तात्यासाहेबाच्या हातोटीचें मला या वेळी प्रत्यतर आले. १९३५ साली 'सह्याद्रि' निघाला; त्या वेळीं तात्यासाहेबानी मला लेख लिहिण्याची अनुज्ञा दिली होती "जें आपण लिहू ते सर्वच छापले जावे असा आग्रह होतकरू लेखकानें धरू नये अनेक पानें लिहून आपणासच तीं फाडावी लागतात" असे ते म्हणत १९३५ साली नागपुरास अखिल भारतीय शिक्षण परिषद आणि लिबरल फेडरेशन यांचीं अधिवेशने भरणार होती. या प्रसगी केसरी – मराठ्याचा प्रतिनिधि म्हणून तात्यासाहेबानीं माझी नेमणूक केली होती. मला जे त्यांनी अधिकार-पत्र दिलें त्यात टाईप करणाऱ्याने खालीं Proprietor, the Kesari and the **Mahratta** असे टाईप केले होतें. तात्यासाहेबानी आपल्या हाताने **Proprietor**, हा शब्द खोडून त्याऐवजी Trustee असा शब्द घातला व सही केली

( ११ ) १९४५ साली तात्यासाहेब नागपुरास राजाराम वाचनालयाच्या

महोत्सवासाठी आले होते. ते नागपुरास येण्याच्या अगोदरच मुद्दाम पुण्यास पत्र लिहून मीं त्यांना घरी येण्याचे आमंत्रण दिले होते. तात्यासाहेबांचें आगमन म्हणजे नागपूरस्थ साहित्यिकांना ती एक पर्वणीच होती. स्टेशनवर त्यांना बरीच मंडळी सामोरी आली होती ज्या दिवशी तात्यासाहेब आले त्याच दिवशीं सायंकाळीं मी त्यांना भेटलो ॲडव्होकेट गोखले यांच्याकडे ते उतरले होते. प्रवासाच्या दगदगीने आणि नागपुरातील विविध कार्यक्रमाने ते अगदी थकून गेल्यासारखे दिसले. इकडचें तिकडचे बोलणें झाल्यावर मी तात्यासाहेबांना घरीं येण्याबद्दल हळूच सूचना केली. ती त्यांनी ताबडतोब मान्य केली त्या वेळीं मला अपरिमित आनंद वाटला ते म्हणाले, 'उद्या सायंकाळी येतो.' तात्यासाहेब घरीं येणार ही बातमी घेऊन आनंदित होत्साता मी घरी आलों आणि घरच्या मंडळींना आणि वडिलांना ही बातमी कळविली, तेव्हा सर्वांनाच आनंद झाला माझ्या मित्रमंडळींना ही बातमी कळवितांच त्यांनी एक निराळाच बूट काढला माझे सिटी कॉलेजातील मित्र प्रा. पहाडे आणि प्रा. देशपांडे यांना तात्यासाहेबांना एकदा अगदीं जवळून घरी खाजगी बैठकींत पाहण्याची इच्छा झाली. तात्यासाहेबांशीं बरोबरीच्या नात्याने बोलणारे कोणी तरी पाहिजे म्हणून डॉ. मुंजे व श्री. दाजीशास्त्री चांदेकर यांसहि बोलाविण्याचे ठरविण्यात आले. तात्यासाहेबांना मोठ्या थाटाचा अल्पोपाहार देण्याचा आमचा विचार होता. आमंत्रण देण्याकरिता प्रा पहाडे व मी डॉ. मुंजे यांच्याकडे गेलो, तों तेथे आम्हाला तात्यासाहेब आणि डॉ. मुंजे हे एकत्र बसलेले आढळले थोड्या वेळानें तात्यासाहेब उठले आणि माझ्याकडे एकदम वळून मला म्हणाले, "चला मी तुमच्याकडे आताच येतो" हे वाक्य तात्यासाहेबांच्या तोंडून बाहेर पडताच माझी एकच गाळण उडाली! घरीं काहीच तयारी नव्हती चांदीचे तबक तर राहोच पण साधे पितळी तबकहि नव्हते. प्रा पहाडे व मी एकमेकांच्या तोंडाकडे पाहू लागलो कधीं नव्हत तात्यासाहेब घरी येणार आणि हा दिवस आपल्या आयुष्यात सुवर्णाक्षरात लिहून ठेवण्यासारखा होणार असें असल्याने "आपण यावेळीं येऊ नका" असे तात्यासाहेबांना म्हणणे म्हणजे ती एक नामुष्कीची गोष्ट होती तात्यासाहेब आणखी पुढे म्हणाले, "पाहा, मी आपण होऊन तुमच्या घरी येतो म्हणून म्हणतो तर तुम्ही काहींच बोलत नाहीं". हे ऐकून मी पार विरघळून गेलो! माझी ती केविलवाणी स्थिति पाहून डॉ मुंजानाहि हसूं येऊ लागले शेवटीं मनाचा हिय्या करून 'चला' असे म्हणालो. दारापुढे मोटार उभी राहिली. सुदैवाने तीर्थरूप घरीं होते. त्यांच्या बैठकीवर मीं तात्यासाहेबांना नेऊन बसविले सुरुवातीसच ते म्हणाले, "मला तुमचे हें अत्तर द्या, गुलाब द्या, लवंगा, वेलदोडे द्या, पण खाण्याचा पदार्थ मात्र देऊ नका." शेवटीं

अशा रीतीनें सर्वच प्रश्न त्यानीं सोडवून टाकिला! शेवटीं सौभाग्यवतीने व मुलाबाळांनीं त्याना नमस्कार केले व तात्यासाहेबानी आशीर्वाद दिले. परत जातांना जिना उतरत असतांना माझे वडील त्याना म्हणाले, "आपल्यासारख्या थोरांनीं आमच्या घरीं पायधूळ झाडली हे आमचे महद्‌भाग्य होय". त्यावर तात्यासाहेब चटकन म्हणाले, "छे छे पायधूळ कसली? माझ्या पायावर मुळीच धूळ नाहीं. ते चागले स्वच्छ आहेत की!" शेवटी तात्यासाहेबांनी आम्हा सर्वांना प्रेमाने निरोप दिला आणि जन्माचे ऋणी करून ठेविलें

(१२) तात्यासाहेबाच्या नागपूरच्या या मुक्कामांत तेथील साहित्य सस्थानी त्याना नागपूर विद्यापीठाच्या पदवीदानसमारभाच्या दिवाणखान्यांत मानपत्र दिले साहित्यिकांच्या मेळाव्यात तात्यासाहेब नेहमींच रगून जात. त्याप्रमाणे येथेहि झाले. "जन्मभर केसरी-मराठा सस्थेशी सबध आल्याने मी इतके लेखनकार्य करू शकलो" असे ते म्हणाले. कित्येक साहित्यिक उच्च दर्जाचे असतात, विचारवतहि असतात, पण त्याच्या लेखणीचा आणि कागदाचा मेळ बसत नाही आणि त्यामुळे त्याच्याकडून म्हणावी तशी ग्रथनिष्पत्ति होत नाही असें ते म्हणाले 'साहित्यिक' कोणाला म्हणावे यासबधीहि एक नवीन मुद्दा तात्यासाहेबानी साहित्यिकापुढे माडला जे कलाविलासात रगलेले असतात त्यानाच आपण मुख्यत्वे साहित्यिक असे समजतो पण जे लोक विज्ञान व शास्त्र यात निपुण असतात त्यानाहि आपण साहित्यिक समजले पाहिजे आणि त्यानाहि साहित्य सम्मेलनासारख्या सस्थेचे अध्यक्षस्थान दिले पाहिजे असा त्यांचा आग्रह दिसला १९१८ साली तात्यासाहेबानी मराठ्याच्या इतिहासाचे वाङ्मयश्राद्ध म्हणून 'मराठे आणि इग्रज' हा ग्रथ लिहिला. तो ग्रथ निरनिराळया इतिहासज्ञाकडून लिहवून घेतला जावा अशी तात्यासाहेबाची मूळची मनीषा होती हे फारच थोड्याना माहीत असेल. पण ऐनवेळी कोणी पुढे आला नाही तेव्हा तात्यासाहेबानीच तो ग्रथ एका हाती लिहून पुरा केला. ग्रथ बाहेर आल्याबरोबर त्याच्या प्रती भराभर खपू लागल्या याबद्दल महाराष्ट्राने तात्यासाहेबाचे कौतुक केले पण उलट तात्यासाहेबानीं महाराष्ट्राची कीव केली. ते म्हणाले, "मी माझ्या मराठे आणि इग्रज या ग्रथात पदरचे असें फारच थोडें घातले आहे ज्या गोष्टी घडल्या त्याचीच एका विशिष्ट पद्धतीनं माडणी केली आहे. ग्रथ ज्यावेळी भराभर खपू लागला त्या वेळीं याहि गोष्टी लोकाना माहीत नसाव्या याबद्दल मला वाईट वाटलें!"

(१३) १९४६ च्या डिसेबर महिन्यात मी पुण्यास जाऊन तात्यासाहेबाना भेटलो. डेक्कन जिमखान्यावर 'पुष्करिणी'च्या फाटकात मी जाऊन उभा राहिलों त्या वेळीं तात्यासाहेबाची नातवंडे अगणांत खेळत होतीं त्यापैकीं एक १०–१२ वर्षांचा चुणचुणीत नातू मला पाहून म्हणाला, "कोण पाहिजे?" "तात्यासाहेब" असे

मी उत्तर देतांच "थाबा" असे म्हणून त्याने पळत पळत ओसरींत जाऊन शाळे-सारखी एक मोठी घटा 'टणकन्' वाजविली ! त्याबरोबर दार उघडून तात्यासाहे-बांनीं बाहेर डोकाविलें व 'या' म्हटलें. अलीकडे वृद्धापकाळामुळे तात्यासाहे-बांना ऐकू कमी येत असे. त्यामुळें बाहेर भेटीस येणाऱ्या माणसाची वर्दी देण्यासाठीं ही घटेची योजना करण्यात आली आहे हे नतर मला समजले. तेव्हा मला मोठी मौज वाटली. दिवस थडीचे आणि वेळ सकाळची असल्यामुळें तात्यासाहेबानी डोक्याला एक टापशी बाधून अगात बनातीची बाराबदी घातली होती. तेव्हा मला कै. आगरकराची आठवण झाली कारण आगरकरहि अशाच पोषाखात घरीं बसत असत असें सागतात. चहापान करता करता मराठीतील वर्तमानपत्रें हा विषय निघाला. तेव्हां मी म्हणालो, "केसरीसारख्या केवळ तत्त्वदृष्टीने चालविल्या जाणाऱ्या वर्तमानपत्राची परपरा आतां महाराष्ट्रातून तुटत चालली आहे. वर्तमानपत्रांच्या धद्यातहि आता भाडवलशाही सुरू झाली असून जसा पैसा तसे मत असे होऊ लागलें आहे." त्यावर तात्यासाहेब मला लगेच म्हणाले, "पण तसे झाल्याने काहीच बिघडत नाहीं वकील जसा पैसे घेऊन आपल्या अशिलाची बाजू कौशल्याने माडतो तसेंच लेखकानी केल्यास त्यात विशेष नांवे ठेवण्यासारखे काहीं नाहीं." तात्यासाहेबांच्या या उत्तराने माझें बोलणे खुटले. नतर तात्यासाहेबांना मी अभिवादन करून त्याचा निरोप घेतला. तात्यासाहेबाची आणि माझी ही शेवटचीच भेट असा जर कोणीं मला त्या वेळीं इषारा दिला असतां तर मी आणखी कितीतरी वेळ तात्यासाहेबांच्या चरणांजवळ पाठ घेत बसून राहिलों असतों !



## सदाशिव कृष्ण काळे

(चित्रकार, पुणें)

(१) सध्याकाळीं साधारण सहाची वेळ असेल. रा बापूरावाकडे मी गेलों होतों. ते घरीं नव्हते. श्री. तात्यासाहेब त्या वेळीं आपल्या बगल्याच्या अगणात शतपावली करीत होते. मी फाटक उघडून आंत गेलो व त्याना नमस्कार केला. या, बसा. कोणाकडे आलांत वगैरे मामुली प्रश्न त्यानीं विचारले. ते व मी तेथील बाकावर बसलों. कांहीतरी बोलावयाचे म्हणून सहज म्हटले, "आपण यदा भोरास श्री. शकराजी नारायण यांच्या उत्सवास आला होता ना?" ते म्हणाले "हो, श्रीमतांनी बोलाविलें होतें, आलो सहज." मी म्हटले, "मीहि पण त्या वेळीं तेथें होतों." "तुमचें नांव काय?" त्यानी विचारले. मी म्हटलें "काळे", "श्री शकराजी नारायण याचें मोठें चित्र तेथें रगविले आहे ते काळे तुमचे कोण?" असे त्यानी विचार-तांच मीं पटकन उत्तर दिलें, "मीच तो." लगेच त्याच्या गालावर थोडें हास्य दिसले.

मी पडलों चित्रकार. त्याच्याशी काय बोलावें हेंच समजेना; पण लगेच त्यांनीच चित्रकलेविषयी बोलण्यास सुरवात केली. मग काय विचारतां ! माझ्या आवडत्या विषयाची बरीच माहिती त्याच्याकडून मला मिळाली व माझे बरेंच समाधान झाले. मी विचारले, " चित्रकलेचा काही पारमार्थिक बाबतीत लाभ होतो का ? " ते म्हणाले, " काय झाले न व्हावयाला ? अहो, तुम्ही एकदां तुमच्या कामात रगून गेलात म्हणजे आणखी काय पाहिजे तुम्हाला ? आपण आपला आवडता उद्योग सतत करीत असल म्हणजे त्यात सर्व कांहीं आले. तोच आनद – तोच मोक्ष. पण काहो, आमच्या बापूला नुसते पोर्ट्रेट पेन्टिंग शिकावयाचें झालें तर किती दिवस लागतील ? " मी निरुत्तर झालो व याना काय उत्तर द्यावें हेच समजेना. माझ्या मनाची गोंधळलेली परिस्थिति पाहून त्यानी लगेच विषयास कलाटणी देऊन दोन हातांनीं साधारण एक आकार दाखविला व विचारले कीं, " एवढे पेन्टिंग करण्यास किती खर्च येतो ? " मी म्हटले, " त्यास लागणाऱ्या खर्चापेक्षा त्या पेन्टिंगवर जी काय मेहेनत केली असेल त्याचीच खरी किंमत." हे ऐकून ते म्हणाले, " अगदीं बरोबर बोललात. आमचेहि तसेंच आहे. नुसत्या कागद-पेन्सीलची काय किंमत ? घटवून घटवून काय उतरेल ते खरें ! "

( २ ) मी जाण्याकरिता उठलो. उठता उठतां माझ्या खिशातून एक श्रीपांडुरगाचा प्रिन्ट काढला व त्याच्या हातावर ठेवून आदरपूर्वक नमस्कार केला. त्यांनीं विचारले " हा प्रिन्ट तुमच्याच चित्राचा का ? " होकारार्थी मीं मान डोलावली. ते म्हणाले, " श्रीज्ञानेश्वराचें एखादें चित्र आहे का तुमच्याजवळ ? जर तुमचे चित्र मला पसत पडले तर मी त्याचा अवश्य उपयोग करीन."

दुसऱ्या दिवशीं त्यानी मजकडे आपला मनुष्य पाठवून मीं तयार केलेलें श्री ज्ञानेश्वराचे चित्र नेले व थोड्याच दिवसात तें चित्र त्याच्या ज्ञानेश्वरी या पुस्तकांत झळकलेले माझ्या दृष्टीस पडलें ! कोणत्याहि माणसाची तावडतोब पारख करून त्याचा काय फायदा समाजाला करून देतां येईल ह्याची पूर्ण पारख श्री. तात्यासाहेबांच्यासारख्या थोर माणसांतच आढळून येते.



## वा. चिं. भानु

### ( पुणें सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक )

( १ ) पुणे सें को. बॅकेशीं श्री. तात्यासाहेब केळकराचा घनिष्ट सबध होता व तो त्यानीं, तसाच अखेरपर्यंत ठेवलाहि होता. ही बँक १९१७ साली स्थापन होण्यास त्याची सक्रिय सहानुभूति कारणीं लागली होती. त्यांनींच प्राथमिक मोठी ठेव आणून दिल्यानें, बॅक नोंदविण्याचें काम सोपें झालें होतें. पहिलीं सहा-सात वर्षें या

बँकेचे ते चेअरमन म्हणून बिनविरोध निवडून येत असत. बँकेच्या निवडणुका त्या वेळी भक्तिभावाने होत. आजकाल त्यांना बाजारभाव आलेले दिसतात तसे त्या वेळी नव्हतेच. ज्या ज्या इतर सस्थाशीं श्री. तात्यासाहेबांचा निकट सबंध होता, त्या सस्थांच्या शिलका याच बँकेत असत. त्यामुळे जशी एकाद्या अपत्यावर बापाची मर्जी असते, तशीच श्री. तात्यासाहेबांची पुणे से. को बँकेवर होती व बँकेच्या एकदर कारभाराकडे त्यांचे आस्थेवाईक लक्ष सदोदित असें.

सन १९३१–३२ सालची गोष्ट आहे श्री दा वि गोखले हे बँकेच्या डायरेक्टरांच्या बोर्डाचे अध्यक्ष होते. बँकेचा वार्षिक अहवाल आणि ताळेबंद छापून प्रत्येक सभासदाकडे रवाना झालेला होता व बँकेची वार्षिक साधारण सभा, चारदोन दिवसावर आलेली होती. बँकेच्या प्रमुख कार्यवाहांनी श्री. तात्यासाहेब याच्या घरीं जाऊन बँकेच्या सापात्तिक स्थितीबाबत व एकदर प्रगतीची यथार्थ कल्पना दिली होती याच सुमारास श्री. तात्यासाहेबाच्या काहीं निकटवर्ती इसमांनी त्याच्या घरी जाऊन बँकेच्या अतर्गत कारभारासबधीच्या काहीं अतिरजित गोष्टी त्याच्या कानात सागितल्या. त्या त्यानीं ऐकल्याहि, व त्या मडळीच्या आग्रहावरून वार्षिक सभेच्या वेळी मुद्दाम ।·। हजर राहण्याचेहि कबूल केले. असा कोणी आग्रहच केला व गळ घातली तर ती त्याना मोडवत नसे

सभेच्या दिवशी सुरुवात होण्यापूर्वीच पधरा मिनिटें, श्री तात्यासाहेब सभागृहात उपस्थित झालेले होते. बँकेच्या नियमानुसार बोर्डाचे अध्यक्षच अशा सभांचे अध्यक्ष असतात, त्याप्रमाणे श्री दा वि गोखले सभाध्यक्ष होते नियोजित वेळी सभेच्या कामास प्रारभ होऊन, एकेक विषय हातावेगळा होत होता बँकेचा वार्षिक अहवाल, ताळेबंद व नफातोटा पत्रके मजुरीसाठी सभेपुढें रीतसर सूचना व अनुमोदन मिळून माडण्यात आली तेव्हा “या विषयाबद्दल ज्या कोणास काहीं बोलावयाचें अगर फेरबदल करण्याची दुरुस्ती सुचवावयाची असेल, त्यानी बोलण्यास प्रारंभ करावा. मात्र कार्यक्रम पत्रिकेवर असलेले सर्व विषय याच सभेत आज उरकणे असल्याने, वक्त्यानी वेळेचे बधन राखावे बोलणारानी प्रत्येकी पाचदहा मिनिटे घ्यावीत.” अशी अध्यक्षानी सूचना दिली. अध्यक्ष खाली बसताच, श्री. तात्यासाहेब ताडकन् उठून उभे राहिले व म्हणाले, “मला या विषयावर बोलावयाचे आहे. पण ५।१० मिनिटात माझे बोलणें सपणार नाही.”

अध्यक्षानी विचारले, “आपणांस किती वेळ लागेल? वेळेचे बधन असावे हें आपणांस मान्य आहे ना?”

“मला अर्धा तास लागेल. कदाचित् तास दोन तासहि लागतील काय सागावे?” तात्यासाहेब अमळ रागानेच उद्गारले. पूर्वग्रहाने तात्यासाहेबाचें मन गढूळ झालेलें

आहे, हृ पाहून अध्यक्ष म्हणाले, " ठीक आहे. आपला व या बॅकेचा स्निग्ध जिव्हाळा व आपला अधिकार लक्षात घेऊन मी आपल्याला असे सागतो की, एक दोन तासच काय, पण चार तास नव्हे आपली मर्जी असेल तितका वेळ, केवळ अपवाद म्हणून, आपणास भाषण करण्यास मी वेळ देत आहे. मात्र मी सुरुवातीस सागितलेले बधन इतरावर राहील. तात्यासाहेब आपण आपल्या भाषणास सुरुवात करावी. "

तात्यासाहेबानी, त्याना घरी जाऊन भेटलेल्या मडळीनी पुरविलेल्या माहितीच्या आधारावर, अहवाल, ताळेबद वगैरे भागाचे सविस्तर परीक्षण करून व कांहीं निष्कर्ष काढून, चार दोन शका प्रदर्शित केल्या त्याचे भाषण साधारणपणे अर्धा ते पाऊणतासपर्यंत त्याच्या नेहमीच्या पद्धतीने मोठे खुमासदार झाले. श्री तात्यासाहेब अमळ रागावले असले म्हणजे कसे शब्द योजून बोलत याची कल्पना सर्वांस आहेच

अध्यक्षाच्या सागण्यावरून बॅकेच्या प्रमुख कार्यवाहाने श्री. तात्यासाहेब यानी उपस्थित केलेल्या टीकास्पद मुद्याना उत्तरे दिलीं व त्याच्या सर्व शंकाचे भरपूर पुराव्यासह निराकरण केले. या खुलाशाने श्री [illegible] भेटलेल्या मडळीचे समाधान झाले किंवा नाही ते मला सागता येणार नाहीं, पण श्री तात्यासाहेबाच्या चेहऱ्यावरून व त्याच्या एकदर आविर्भावावरून मात्र, त्या खुलाशाने त्याचे स्वत:चे पूर्ण समाधान झालेले सभोतालच्या मडळीच्या तेव्हाच लक्षात आले. [illegible] अध्यक्षानी त्याना विचारलेच, " कार्यवाहानी आताच दिलेल्या उत्तरानतर, [illegible] उपप्रश्न किंवा काही नवीन प्रश्न विचारणे असेल अगर जादा माहिती हवी असेल तर आपण विचारावे उत्तरे देण्यास मी सागतो." तात्यासाहेब हसत हसत उठले व नेहमींच्या गोड स्मितपूर्वक शब्दात म्हणाले, " माझे पूर्ण समाधान झाले आहे. आता मला काही एक विचारावयाचे नाही. अन् नतर काहीं वाटलेच, तर उद्या बॅकेच्या ऑफिसमध्ये जाऊन मी विचारीन आतां फक्त एकच विनती करावयाची आहे. समोर तिकडे रा. भान् सभेच्या कामकाजाची टिपणे घेत आहेत ते मला दिसतय. तेव्हा त्याना म्हणावे, की मी, इतका वेळ जे काय बोललों ते बोललो नाही असे समजावे, व तशी टाचणात नोद त्यानी घ्यावी ! ! "

बँकेचा एक नोकर या नात्याने, दरसालप्रमाणे, मी या वार्षिक सभेचा वृत्तात म्हणून नोटूस घेत होतो

अध्यक्षानी मजकडे वळून मला विचारले, " भान्, तुम्ही कोठपर्यंत नोटूस घेतल्या आहेत ? "

मी उठून उभा राहून उत्तरलों, " मॅनेजिंग डायरेक्टर याच्या खुलाशानतर श्री. तात्यासाहेब केळकर यांचे शंकानिरसन झाले व ते म्हणाले —

कीं, ' इतका वेळ मी जें बोललो ते मी बोललोंच नाहीं असे समजून त्याची तशी नोंद घ्यावी.' येथपर्यंत मी नोट्स घेतलेल्या आहेत. "

तात्यासाहेबांनीं हसत हसत मला उद्देशून विचारलें, " सभेच्या टाचणांत तेंहि नोंदवून घेतले आहे काय ! "

" होय, सभेत होणाऱ्या कामकाजाचे टाचण मी घेतो आहें " मीं त्याना उत्तर दिले.

ते खूपच मोठ्यादा हसू लागले व साऱ्या सभेतहि हास्यरस निर्माण झाला. श्री. तात्यासाहेबांचा गैरसमज केव्हाच नाहीसा झाला होता ! !

या प्रसगीची ही आठवण मी कधीहि विसरणें शक्य नाहीं सभेत हजर असणाऱ्या सर्वांना त्या प्रसगाची आठवण राहीलच. कारण या प्रसगाने श्री. तात्यासाहेबांच्या स्वभावातील आपुलकीची तीव्र भावना, हल्ला चढविण्याची वृत्ति, समाधान होताच ते कबूल करून माघार घेण्याची प्रवृत्ति आणि विनोदाचा स्वीकार कौतुकपूर्ण करण्याची तयारी याचे दिग्दर्शन भरपूर होतें आहे.



## बाळकृष्ण मार्तंड चौंडे

### ( प्रसिद्ध गोरक्षण कार्यकर्ते, वाई )

गोवर्धन सस्थेचें कार्य सुरू झाल्यापासून त्याची आर्थिक व्यवस्था पचामार्फत होत जावी, यावर माझा पहिल्यापासून कटाक्ष. प्रारभीं वाईक्षेत्रापुरतीच कार्याची मर्यादा असल्यामुळे, स्थानिक मडळीच्या देखरेखीखाली जमाखर्च होत असे. नंतर पुण्या-मुबईस कार्य आल्यावर व महाराष्ट्रातील श्रीमान प्रतापशेट अमळनेरकर, येवल्याचे शेट वल्लभदास मुरलीधर यान्च्यासारख्या दानशूरानी मोठमोठ्या रकमाचे साह्य केल्यावर सस्थेच्या सर्व मिळकतीचा ट्रस्ट करण्यात येऊन महाराष्ट्रांतील काही प्रमुख ट्रस्टीच्या देखरेखीखाली सस्थेचा सर्व कारभार चालू झाला त्यानतर मुबईचे गोवर्धन भवन ३॥ लाख रुपयास सस्थेसाठी खरेदी देण्याचे ठरलें तेव्हा ही नवी मत्ता सस्थेच्या ट्रस्टडीडमध्ये समाविष्ट करताना भारी किमतीचा स्टँप भरण्याचा प्रसग आला, म्हणून तात्यासाहेबांचा सल्ला घेण्यासाठी मी त्याच्याकडे गेलो त्या वेळी अत्यत सहानुभूतीने विचार करून तात्यासाहेब म्हणाले, "हजारो लोकाच्या लहानमोठ्या रकमाचे साह्य तुमच्या सस्थेस झाले आहे ट्रस्टडीडमुळे सर्व देणगीदाराना सस्थेच्या कारभारात आपला हात आहे, असे वाटत नाहीं. सध्या लोकशाहीचे युग आहे. यासाठी सस्था रजिस्टर करून टाकलेली बरी असे मला वाटते. " ट्रस्टींच्या समतीने मी तात्यासाहेबांच्या या बहुमोल सूचनेला

'हो'कार दर्शवितांच त्यांनीं घटनेचीं स्थूल रूपरेषा श्रमपूर्वक स्वतः तयार करून दिली व नतर श्री. तात्यासाहेब गोखले वकील यांच्या साह्यानें तिला कायदेशीर स्वरूप देऊन सस्था रजिस्टर करण्यात आली.

( २ ) 'कांहीं कामासाठी आपणाकडे भेटावयास केव्हा येऊ ?' अशी मीं पत्रद्वारें तात्यासाहेबाच्याकडे विचारणा केली होती. त्या पत्राच्या उत्तरांत 'मला कांहीं कामासाठी तिकडच्या भागात यावयाचे आहे. मीच तुम्हास येऊन भेटेन,' असे लिहून तात्यासाहेब स्वतःच सस्थेच्या कचेरींत आले. १९३० ते १९३२ च्या दरम्यानची ही गोष्ट असेल. सस्थेच्या कामाविषयींची चर्चा आटोपल्यावर चालू राजकीय परिस्थितीसबधीं बोलणें निघालें असता तात्या साहेबांच्या तोंडून खालील उद्गार निघाले, "लोकाच्या दृष्टीने माझी देशभक्ति दोन आणे कमी ठरली तरी हरकत नाहीं. पण केवळ लोकरजनाकरितां मी तुरुगात जाणे मला योग्य वाटत नाही. मी स्वतः तुरुगांत जाण्यापेक्षां बाहेर राहून माझ्या हातून केसरींचे लेखन अथवा इतर जें कार्य होत आहे, तें तुरुगांत जाण्यापेक्षा जास्त महत्त्वाचे आहे, असे जोपर्यंत मला वाटत आहे, तोंपर्यंत मी तुरुगात जाण्याचा मार्ग पत्करणार नाही व त्याबद्दल कोणास कांहीं वाटलें तरी त्याची पर्वा मी करणार नाहीं."



## शं. स. डोळे
### ( धेनुदास, पुणें )

( १ ) भोजनोत्तर वामकुक्षी करण्याचा तात्यासाहेबाचा नित्यनेम. त्यांना कसलेच व्यसन नव्हते; पण वामकुक्षीची मात्र तल्लफ होती असे म्हणण्यास हरकत नाही. त्या वामकुक्षीतहि त्यानी आपणहून एका सत्कार्यास साह्य करण्याच्या इच्छेने विक्षेप आणला ही आठवण नमूद करण्यासारखी आहे. सस्थेच्या कार्यावर वृत्तपत्रातून काही आक्षेप घेण्यात आले होते. सस्थेच्या नियामक मडळातील एका अधिकाराच्या जागेवर तात्यासाहेब असल्यामुळें या बाबतीत स्वतः लक्ष घालण्याची आपल्यावर जबाबदारी आहे, हे ध्यानी घेऊन तात्यासाहेब सस्थेच्या कार्यकारी मडळाच्या दि. ५।८।३८ च्या सभेस ऐन उन्हाच्या वेळीं उपस्थित राहिले. वास्तविक ती वेळ त्याच्या वामकुक्षीची होती अगात सदरा, डोक्यावर टोपी व अगावर एक उपरणे घेऊन टाग्यातून तात्यासाहेब सभेच्या ठिकाणीं आले सभेंतील वादविवाद त्यानी ऐकला. सर्व कारभाराची चौकशी केली खोलात जाऊन कागदपत्राचे आधारहि पाहिले व काही सूचनाहि केल्या. इतकेच नव्हे तर लगेच दि. १२-८-३८ च्या 'केसरी' त स्वतः लेख लिहून आपलें

मत जगजाहीर केले. यावरून कोणत्याहि संस्थेतील अधिकाराची जागा नुसत्या मानाकरिता न अडवितां कार्याच्या खऱ्या तळमळीनेच ती तात्यासाहेब स्वीकारीत असतील, असे अनुमान काढल्यास ते चुकीचे होणार नाही. ज्या गोवर्धन संस्थेच्या नियामक मंडळावर आपण आहोत, जिच्या कार्यांत आपण थोडेबहुत लक्ष घालतों, तिची भरभराट व्हावी, एका राष्ट्रोपयोगी कार्याची प्रगति व्हावी, म्हणून सर्व तऱ्हेची पूर्ण खात्री करून घेतल्यानंतर सदरहू लेखांत तात्यासाहेबांनीं जनतेस केलेली सूचना म्हणजे गोवर्धन संस्थेस मिळालेला अखंड आशीर्वाद होय. त्या लेखांत शेवटीं तात्यासाहेब लिहितात – "गोरक्षण-गोवधबंदी यासंबंधी चौंडेमहाराजांनी जितका मतप्रसार केला तितका कोणाच्याहि हातून झाला नाहीं आणि होणार नाही. म्हणून जनतेनें निःशंक चित्ताने व सढळ हाताने त्यांना साह्य करावें असे मला वाटते."

(२) 'आधी केले मग सांगितले' हा श्रीसमर्थांचा दंडक तात्यासाहेबांच्या कृतींत होता. वरील आठवणींत उल्लेख केलेल्या ज्या सभेत तात्यासाहेब उपस्थित होते त्या सभेच्या प्रसंगीं संस्थेच्या कारभाराची बारकाईने माहिती त्यांनी घेतली. तेव्हा संस्थेवर कर्जाचा बोजा आहे व ते कर्जहि जास्त व्याजाच्या दराचें आहे, असें त्यांना आढळून आलें. त्यांनी कार्यकर्त्यांस सुचविलें की, "तुम्ही चार साडेचार टक्के व्याजाच्या दरानें ठेवी घेण्याचें जाहीर करा, हितचिंतकांकडून ठेवी मिळवा आणि जास्त दराचें कर्ज ताबडतोब फेडून टाका." एवढा कोरडा उपदेश करूनच तात्यासाहेब थांबले नाहीत. लगेच "मी माझी स्वतःची ५०० रु. ची ठेव देतों," असें म्हणून ठेवीची रकम तत्काळ संस्थेकडे त्यांनी पाठविलीहि! १९३२ सालीं त्यांच्या वाढदिवसाच्या वेळीं त्यांनी गोरक्षण संस्थेस एक हजार रुपयांची देणगी दिली हें प्रसिद्धच आहे.



## विष्णु महादेव भट

(एम्. बी. बी. एस्., डॉक्टर, येवलें)

(१) कै. तात्यासाहेबांच्या महत्त्वाच्या काहीं आठवणी माझ्या हृदयावर आजन्म कोरलेल्या आहेत. मी १९१५ मध्यें तुरुंगांतून सुटून आल्यावर १९१६ मध्यें केसरी-मराठा संस्थेंत सहसंपादक म्हणून लो० टिळकांनी मला घेतलें. प्रारंभींचा माझा मराठ्याचा मजकूर कधीं कधीं तात्या नजरेखालून घालीत व उपयुक्त सूचना देत. अनेक वेळां तोच मुद्दा लिहावा लागला तरी हरकत नाहीं, पण मोजक्या, नेमक्या, चुरचुरीत शब्दांत विषय प्रतिपादन व्हावें, यावर त्यांचा मोठा कटाक्ष असे. केसरीच्या वर्तमानसारांत एकदा चर्चिलच्या आईच्या पुनर्विवाहाबद्दल मीं तीनचार ओळींतच ती बातमी दिली होती. पाश्चात्यांत कन्यादानासारखी

पद्धति थोडीशी आहे. लग्न लावताना वधूकडचा 'Best man' कुणी तरी व्हावा लागतो. आईच्या पुनर्विवाहाच्या वेळी खुद्द इलींचे चर्चिलसाहेब हेच 'Best man' झाले होते! त्याचें वर्णन "आईचें कन्यादान चिरंजिवांनीं केले!" असे मी म्हटलें होते त्यावर तात्यानी एकदम पसतीचा शेरा मारला आणि असेच स्वल्पाक्षर बव्हर्थ लिहिणे पाहिजे, म्हणून मला बजाविले होते.

(२) ज्या विषयावर लिहावयाचे त्याचा शक्य तितका अभ्यास करून तात्या लिहीत मलाहि तीच पद्धति आवडे. त्यामुळे माझ्या लेखाकडे तात्याचे व लो. टिळकाचेहि लक्ष वेधले होते. मॉटफर्ड सुधारणाच्या आगोदर, वाटाघाटी चालू असता, टिळकांनी तात्याना जेव्हा ( A Case for Home Rule ) इष्ट सुधारणाचा खलिता लिहावयास सागितले, तेव्हा त्यानी त्या कामी आपला मदतनीस म्हणून मला घेतले होते आणि त्याबद्दल तात्यानी मजजवळ प्रशसोद्गारहि काढले होते. वास्तविक मी त्याचा शिष्यच होतो. पण त्यानी मला तसे कधी भासू दिले नाही आणि त्या खलित्याच्या प्रस्तावनेत त्यानी आपला मदतनीस म्हणून माझा उल्लेखहि केला होता त्यांच्या या ममत्वामुळेच त्यांनी मला पुन्हा मेडिकल कॉलेजमध्ये जाऊन एम् बी बी एस्चा कोर्स पुरा करण्यासाठी टिळकाच्याजवळ गळ घातली होती.

तात्यानी वेळोवेळी मला जी मदत केली ती मी आजन्म विसरणे शक्य नाही. त्याच्या आग्रहामुळेच लोकमान्यानी मला परवानगी दिली तात्यानी टिळकाना अशीहि दुसरी गळ घातली होती की, उद्या 'केसरी' बद झाला तर आम्ही सगळे वकिली वगैरे काही तरी करू. भटाना कोणतीच पदवी नसल्याने त्याना फारच जड जाईल त्यातूनहि भट बडखोर असल्याने सरकारी भानीमुळे त्याना कोणी खाजगी नोकरीहि देणार नाहीं तेव्हा भटाना या सधीचा फायदा घेऊच द्या. या सर्व युक्तयाप्रयुक्तयाचा परिणाम होऊन मी ग्रँट मेडिकलमध्ये टिळकाच्या समतीने दाखल झालो याबाबतीतले तात्याचे मजवर शतश उपकार आहेत. टिळक वारल्यावरहि त्यानीं पैशाची मदत तशीच चालू ठेवली होती. ममत्व म्हणतात ते हे

(३) अेम् बी बी अेस् मी पहिल्या सपाट्यातच पास झालो, याबद्दल त्याना फारच आनद झाला. त्या भरातच ते म्हणाले की, "भट, आता तुम्ही वैद्यकीचा धदा करा." माझी इच्छा होती की, पास झालो तरी केसरीतच राहावे. पण तात्या म्हणाले की, वैद्यकीचा धदा हा प्रत्यक्ष अनुभवानेच शिकता येतो. येथे केसरीत तुम्हाला त्याचा अनुभव मुळीच मिळणार नाही आणि शिकलेले सर्व वाया जाईल, तरी तुम्ही धदा करावा हेच योग्य. तुम्हाला वाटले तर केसरीत केव्हाहि लिहीत जा. केसरी तुमचाहि आहे. मलाहि तें पटले, आणि मी या व्यवसायात शिरलो. पण पुढे जेव्हा तात्याची एकसष्टी झाली, तेव्हा मी पुण्यास गेलों होतो. केसरीच्या

नव्या इमारतींहि पूर्ण झाल्या होत्या. संपादकाच्या सर्व संचाला पुरून उरलेली एक खोली शिल्लक होती. त्यापूर्वी मी येवल्याहून केसरीत अधून मधून लिहीत होतोंच. ते लेखहि त्यांच्या नजरेस पडले होते. मला पाहतांच ते म्हणाले की, " भट, पुन्हा केसरींत येतां का ? तुमच्यासाठी एक खोली रिकामी आहे. " मीहि त्यांना "हो" म्हटलें. पण मग तेच म्हणाले कीं, " तशीच जरूर वाटली तर मी बोलवीन तेव्हां मात्र या. " परंतु मग तशी जरूर त्यांना वाटली नाहीं, आणि मीहि पुन्हा केसरींत गेलों नाहीं.

( ४ ) लोकमान्यांच्या निधनानंतर कांहीं दिवस केसरी संस्थेची व त्यांच्या मालमिळकतीची सुरळीत व्यवस्था लागेपर्यंत देण्याघेण्याचे व्यवहार कांही काळ तहकूब होते. त्याप्रमाणे, मी कॉलेजमध्यें असतां, माझ्या कुटुंबाला मिळणारी मदतहि तीनचार महिने बंद होती त्यामुळे आमच्या घरची फारच तारांबळ उडाली. तेव्हां माझ्या पत्नीनें तात्यांना या अडचणीची जाणीव होईल असा निरोप पाठवला तात्यांनी ताबडतोब ४ महिन्यांची रक्कम २०० रु एकदम बाबांच्या मार्फत पाठवून दिले. आणि घरीं स्वतः येऊन सांगितले की, " केव्हांहि अडचण आली तर मला कळवीत जा. मुंबईस भटांना कळवू नका. उगाच त्यांना काळजी लागेल आणि अभ्यासांत व्यत्यय येईल. टिळक गेले असले तरी तुम्हांला पन्नास रुपये दरमहा केसरीनें न दिले तर मी देईन ! " याचप्रमाणे कै बाबा विद्वांसांनीहि येऊन आश्वासन दिलें होतें. अंतरींचा जिव्हाळा असल्याशिवाय इतके कोण करणार ?



## मनुताई अभ्यंकर

### ( बालमनोहर मंदिर, सातारा )

माझे मामंजी कै ती दत्तात्रेय रघुनाथ अभ्यंकर व प. पू कै तात्यासाहेब केळकर यांचे जन्मस्थान एकच असल्याने त्यांची मैत्री अत्यंत जिव्हाळ्याची आणि आजन्म अशी होती. तात्यासाहेबांनी आपल्या जीवनक्रमात जे अनेक व्यासंग केले ते सर्व सांभाळूनहि आपली मैत्री त्यांनी कशी टिकवली याचें मला नेहमी आश्चर्य वाटते. त्यांचा हा एक गुण माझ्या ध्यानात आला तो प्रसंग मी केव्हांच विसरणार नाहीं. माझे वडील ती रा स जोशी, रि प्रिन्सिपॉल ट्रे कॉ पुणे, हे सांगलीस असतांना मी त्यांच्याजवळ राहत असे १९४४ च्या मे महिन्यात कै. ती. तात्यासाहेब हिंदुमहासभेच्या कांही कामाकरितां सांगलीतील हिंदुमहासभेचे चिटणीस श्री. पंडितराव दांडेकर यांच्याकडे आले होते. त्यांच्या घराशेजारींच आम्ही राहत होतों. हे समजताच ती. तात्यासाहेब स्वतः केवळ मजकरिता म्हणजेच पर्यायाने आपल्या दिवंगत मित्राच्या सुनेचा क्षेमसमाचार विचारून आपल्या मैत्री-

तील जिव्हाळा व्यक्त करण्याकरिता आले. अलीकडे वृद्धापकाळामुळे त्यांचे पाय दुखत असत. परतु स्वतःचे शारीरिक दुःख बाजूला सारून अनेक सार्वजनिक कामांचा अमोल वेळ खर्चून ऐन दुपारी तीन वाजता जिना चढून धापा देत माडीवर आमच्याकडे आले आणि मला चार समजुतीच्या उपदेशपर गोष्टी सागून गेले. त्या प्रसंगानें माझ्या मनात असलेला त्याच्याविषयीचा आदर द्विगुणित झाला यांत आश्चर्य नाही.



## वासुदेव बळवंत जोशी

( बी. ए., एल्एल्. बी., ॲडव्होकेट, मुंबई )

कै. लोकमान्य टिळकाच्या मुबई येथील स्मारक-कमिटीने म गाधी यांना चौपाटीवरील टिळक-पुतळ्याच्या अनावरण-समारभासाठी निमत्रण दिले होते परतु म. गांधी हे मुबईस असताना त्या वेळच्या म गाधींच्या सैतानी सरकारच्या अधिकाऱ्याच्या ताब्यात नवयुगचा प्रेस देण्यासाठी ते ता ३१।७।२०रोजीं रात्रीच्या गाडीनें साबरमतीस गेले म्हणून अशा वेळी कमिटीने श्री मा श्री. अणे यांना निमत्रण दिले व त्यानी आयत्या वेळीं समारभास हजर राहून पुतळा अनावरण केला मी त्या समारभास चौपाटीवर हजर होतो त्या वेळीं त्या सभेत श्री मा. श्री. अणे याचे आभार मानताना कै तात्यासाहेब केळकर म्हणाले की, " एक अणे आले व सोळा आणे काम केलें " ह्या एका वाक्यांत किती विनोद व शब्दावरील कोटीचे औचित्य व समारभाचे सपूर्ण यश दर्शविलें गेलें आहे, हे न सागता समजण्यासारखें आहे.



## सौ. शांताबाई नाशिककर

( लेखिका, पुणें )

( १ ) सन १९१८ मध्यें माझे पति श्री दि वि गोखले हे वारले त्या वेळीं माझ्या आईवडिलाच्या ( कै ती विद्याधर वामन भिडे आणि कै. सौ सरस्वतीबाई ) हृदयावर भयकर आघात झाला. त्याची मनस्थिति व्याकुळ होऊन गेली आणि या प्रसगीं काय करावें, कुणाला विचारावे, या दुःखनिवारणाचा उपाय काय, कोण आपल्याला मार्ग दाखवील या प्रश्नानीं त्यांना सुचेनासें झालें. तासन् तास तीं उभयता विचार करीत, अश्रु ढाळीत, माझ्याकडे त्यांना बघवेना. त्यांच्या मनात असे विचार घोळूं लागले कीं, विधवानीं कुकू लावायला काय हरकत आहे? त्या उभयतानीं तर या विषयावर साधकबाधक चर्चा

केलीच. शिवाय आल्यागेल्या विद्वान् स्त्री-पुरुषांजवळहि आपले विचार मांडून दोघे त्यांच्याजवळ वादविवाद करीत. लोक अनुमति दर्शवीत; परंतु म्हणत, सर्व कबूल; पण समाजाला ते पटले पाहिजे ना? समाजाला पटले पाहिजे म्हणजे थोर व्यक्तींनी या विषयाला चालना दिली पाहिजे. म्हणजे आधी आपण सुप्रतिष्ठित स्त्री-पुरुषाना भेटून त्यांच्यापुढे हा विषय मांडला पाहिजे, पटवला पाहिजे हे माझ्या आई वडिलांना कळून आले त्या वेळी लो टिळक म्हणजे सर्व हिंदुस्थानचे अनभिषिक्त सम्राट होते आणि त्यांचे पंतप्रधान म्हणजे श्री. न. चिं. केळकर. लो. टिळक जुन्या विचाराचे होते. माझ्याबद्दलची हकीकत मुंबईला श्री छत्रे यांनी त्यांना सहजगत्या सांगितली असता ते कळवळून उद्गारले, "काय करणार बिचारी? काळापुढे कुणाचे काही चालत नाही धीर धरून दुःख गिळले पाहिजे खरे "

श्री न चिं केळकर हे सुधारणावादी. शिवाय त्यांच्या मुलीवरील वैधव्यापत्तीमुळे एकप्रकारे समदुःखी, तेव्हा त्यांनाच या विषयावर विचारले पाहिजे असे ठरवून माझ्या वडिलांनी त्यांना निरोप पाठवला की, आमच्याकडे याल का ? आणि तेवढ्या निरोपावर त्या वेळी कीर्तीच्या अत्युच्च शिखरावर विराजमान असलेले श्री तात्यासाहेब केळकर आमच्या घरी आले याबद्दल माझ्या आईवडिलांना धन्य धन्य वाटले श्री केळकर चांगले दीड-दोन तास बसले मी त्या वेळी केवळ पधरा वर्षांची असल्यामुळे त्या बैठकीत बसले नव्हते परंतु मागूनच्या घरातील बोलण्यावरून मला थोडी हकिकत समजली. ती म्हणजे श्री. केळकर हे आमच्या घरी आले एवढेच नव्हे तर आपल्याला कशाकरिता बोलावले असावे हे तर्काने ओळखून आपल्या खिशात एक पुनर्विवाहासबधी स्वलिखित असे लहानसे छापील पुस्तक वडिलांना देण्याकरिता ते घेऊन आले होते कुंकवाचा विषय त्यांच्या पुढे मांडताच ते खिशातील पुस्तक बाहेर काढून ते म्हणाले, "विधवेने कुंकू लावणे इत्यादि गोष्टी किरकोळ झाल्या. खरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे पुनर्विवाह हीच. तुमच्या मुलीचा तुम्ही पुनर्विवाह करून द्या झाल्या गोष्टीबद्दल नुसते दुःख करून तुमच्या मुलीची परिस्थिति सुधारणार नाही." माझे आईवडील ज्या ज्या शंका विचारीत त्यावर ते आपलें पुस्तक उघडून त्यातून चटचट उतारे वाचून दाखवून विवरण करीत आईने विचारले की, तुमच्या चंद्राताईचा पुनर्विवाह का करून देत नाही? मोठ्या लोकांनी एखादी विरुद्ध गोष्ट केली तरी लोक काही बोलू शकत नाहीत, फारसा विरोध दर्शवीत नाहीत मग आमच्यासारख्या लोकानीं पुढे पाऊल टाकले तरी तितकासा त्रास होत नाही. तेव्हा श्री. केळकरानी उत्तर दिले की, "माझ्या मुलीने पुनर्विवाह केला तर मला आवडणार नाही असे नाही; पण मी याबद्दल तिला पुष्कळ विचारलें; परंतु तिने मला स्पष्ट सांगितलें की, मला पुनः लग्न करायचे

नाहीं. " श्री केळकर येऊन गेल्यामुळे माझ्या आईवडिलांच्या मनाला बराच विरंगुळा वाटूं लागला. शिवाय माझ्या बाबतीत त्यांनी बऱ्याच सूचना केल्या असाव्या असे वाटतें कारण पूर्वी माझ्यासबधींच्या सर्व गोष्टी घरात माझ्या अपरोक्ष चालत. परतु श्री केळकर येऊन गेल्यानतर त्याचें पुस्तक मला आईने वाचायला दिलेंच आणि शिवाय पुनर्विवाहासबधी स्पष्टपणे माझ्यासमोर घरात वादविवाद होऊ लागले. माझे वडील त्याना अष्टपैलू हिरा म्हणत. गणमात्रावृत्ताच्या कविता लिहिणारे केळकर सारेगमचें सगीत कसे आकलन करू शकतात हे कोडे त्याना कधी उलगडले नाही !

( २ ) पुढे १९४४ साली श्री [illegible] वाचनालयाच्या मदतीकरितां एक नाट्यप्रयोग होणार होता. त्याच्या प्रयोगाला उपस्थित राहावे म्हणून श्री. केळकर याना आमन्त्रण देण्याकरिता मी त्याच्या पुष्करिणी निवासात सौ यमुताई सहस्रबुद्धे याच्याबरोबर गेले असता मी तुमच्या घरी मागे आलेलो आहे म्हणून त्यानी मला आठवण दिली !

त्याना बोलावणे केल्यावर, माझी पुस्तके मी आपणाकडे पाठवीन असे मीं म्हटले, तेव्हा ते म्हणाले, " जरूर जरूर; मी वाचून अभिप्राय देईन मी तुमची ' लग्नाचा बाजार ' ही कादबरी वाचलेली आहे मला ती आवडली फार."

मी खरोखर माझी सर्वच पुस्तके पाठवायला हवी होती; परंतु मला वाटले याना कुठला इतका वेळ मिळायला ! ते कसले आपल्या कादबऱ्या वाचतात नि अभिप्राय देतात !

असा विचार करून मी फक्त " माझी कोरीव लेणी " आणि " नीलेचा दिलरुबा " अशी दोन पुस्तके त्याच्याकडे पाठविली अभिप्रायार्थ म्हणून त्या वेळी त्यानीं पोच दिली. मला वाटले, झाले, सपले ! पुस्तके पाठविल्याचे आता विसरून जावे हे बरें.

आनदाश्चर्याची गोष्ट अशी की, चारपाचच दिवसानी साहित्यसम्राटानी स्वहस्तें लिहिलेले पत्र मला आले त्यात त्यानी " कोरीव लेणी " वर सविस्तर अभिप्राय दिलेला होता. धन्य त्याच्या सौजन्याची व कर्तव्यजागृतीची !



## विनायक मोरेश्वर शारंगपाणी

**( यवतमाळ )**

पुष्कळ वर्षापूर्वी यवतमाळ जिल्ह्यात राजकीय जिल्हा सभा लोकजागृतीकरिता होत असत. मी स्वतः प्रत्येक जिल्हासभेला हजर राहून एखाद्या ठरावावर भाषण करी. अशीच एक जिल्हासभा केळापूर तालुक्यातर्फे पाढरकवड्यास झाली.

अशा जिल्हासभेस कोणीतरी बाहेरचा प्रसिद्ध देशभक्त बोलावण्याचा वहिवाट असे. पांढरकवड्याच्या सभेला कै. तात्यासाहेब अध्यक्ष होते आमच्या गावचे प्रिय पुढारी बापूजी अणे हे स्वागताध्यक्ष होते. मला वाटते सुमारे पचवीस वर्षांपूर्वीची ही गोष्ट असावी मी गोरक्षणाचा ठराव माडला व त्यावर माझे भाषण झाले. यानतर मी पुणें येथें १९३७ साली आलो. नतर काही प्रापचिक कारणामुळे १९४२ अखेरपावेतो तेथें वास्तव्य करणे भाग पडलें. माझी व तात्यासाहेबाची चार महा महिन्यानीं कोठेंतरी विश्राम-मडळात किंवा रस्त्यात भेट होई. तेंव्हा ते मला दरवेळेस नमस्कार करावयाचे व हसतमुख करून म्हणावयाचे की, " यवतमाळचे तुम्ही गोभक्त ना ? " विलक्षण स्मरणशक्तीचा मला हा नमुना वाटतो



## लीलाबाई पटवर्धन

### ( क. माधवराव पटवर्धनांचें कुटुंब, पुणें )

( १ ) नऊ-दहा वर्षें झाली त्या गोष्टीला तात्यासाहेबाच्या आमत्रणावरून माधवरावांच्याबरोबर चहाफराळाकरिता मीहि त्याच्या घरी गेले होते त्याचा माझा जरी प्रत्यक्ष परिचय नसला तरी त्याच्या सुविद्य कन्या व माझ्या गुरु डॉ. कमलाबाई देशपाडे यांचा माझा दाट परिचय होता त्याच्याबद्दल माझ्या मनांत अत्यत आदर व मजबद्दल त्याची आपुलकीची भावना मी माधवराव पटवर्धनाची पत्नी होण्यापूर्वीपासून जशी आज आहे तशीच तेंव्हाहि होती. कै० माधवरावाना तात्यासाहेबाबद्दल फार आदर होता. त्याच्या भाषाशुद्धीच्या चळवळीसबधी तात्यासाहेबाना मोठे कौतुक वाटत असे. आम्ही ज्या दिवशीं त्यांच्याकडे चहाला गेलों होतों त्या दिवशीच्या विविध गप्पात भाषाशुद्धि हा विषय प्रामुख्याने होताच भाषाशुद्धीवरील चाललेल्या वादात तात्यासाहेबांनींहि भाग घेतला होता. कारण त्याच सुमारास तात्यासाहेबाच्या परवानगीने माधवरावानीं आपला 'भाषाशुद्धिविवेक' हा ग्रथ त्याना अर्पण केला माधवरावासंबंधींची हीच भावना माधवरावाच्या मृत्यूनतर तात्यासाहेबानीं ठेवली होती; आणि त्यामुळेंच त्यांची माझी थोडी ओळख झाली माधवरावाच्या मृत्यूनतर कोल्हापूर सरकारकडून मला काहीं वार्षिक वेतन किंवा 'ग्रॅच्युइटी' तरी मिळावी ह्याकरिता मुख्य प्रयत्न तात्यासाहेबानीं केले व स्वत:च्या सहीने एक पत्र त्यावेळचे कोल्हापूरचे दिवाण रावबहादूर सुर्वे याजकडे पाठविण्याकरिता एक दिवस सकाळी स्वतःच आमच्याकडे घेऊन आले व तें त्यांनी माझे वडील रा. बाबासाहेब गरूड यांच्या स्वाधीन केले.

( २ ) माधवराव वारल्यावर मीं एका वर्षातच माधवरावाचा ' मधुलहरी व इतर कविता ' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्या सुमाराला प्रा. वामन मल्हार जोशी

मजकडे आले होते. कोणातरी मोठया साहित्यिकाची प्रस्तावना या ग्रथाला घ्यावी व ती तात्यासाहेबाचीच घ्यावी अशी सूचना मला त्यानी केली. मीं म्हटले, ' माझा त्याचा इतकासा परिचय नाही नुसत्या माझ्या जाण्याचा उपयोग कितपत होईल त्याची मला शका वाटते. '' वामनराव मला म्हणाले, " चल, मी तुला तेथे घेऊन जातों. " त्यानतर एक दिवस सकाळी मी व वामनराव तात्यासाहेबाच्याकडे गेलो, आम्ही तोडातून शब्द काढतांच तात्यासाहेबानी दोन शब्द त्या पुस्तकाला लिहिण्याचे ताबडतोब मान्य केले. माधवरावाच्या मृत्यूनतर स्थापन झालेल्या स्मारकसमितीचे ते अध्यक्ष होते हे सर्वश्रुत आहेच

( ३ ) ही जी ओळख झाली ती पुढे ते विसरले नव्हते. त्यांच्या जाण्यायेण्याची वाट माझ्या 'निवान्त' बगल्यावरूनच. कित्येक वेळी ते जेव्हा पायी जात तेव्हा माझी त्याची गाठ पडे एक दिवस सध्याकाळी मी शाळेतून पायींच येत होते ' ·।' समोरून येताना मला दिसलें माझ्याकडे त्यानी पाहिले आणि ते क्षणभर उभे राहिले व अगत्यपूर्वक त्यांनी माझी विचारपूस केली असे ते अनेक वेळ मला वाटेत भेटत परतु भेट झाल्यावर त्यांनी कधी कुशलप्रश्न व विचारपूस केली नाही असे झाले नाही. १९४६ साली मी आपल्या 'निवान्त' बगल्याचा दुसरा मजला वाढवला बगल्याचे काम सुरू असताना एक दिवस तात्यासाहेब मला माझ्या · ·.'। - । भेटले. त्यानी मला विचारले, " घराला दुसरा मजला बाधता काय ? भाड्याने थोडी जागा देणार की नाही ? " मी म्हटले, " हो, भाड्यानें देण्याकरिताच तर दुसरा मजला बाधते " " अजून शाळेला जाता का ? " मीं उत्तर दिले, " जोपर्यंत काम करवते तोपर्यंत करणार आहे नाहीं त्या दिवशीची सोय म्हणूनच माडी बाधते आहे " तात्यासाहेब लगेच म्हणाले, " शाबास, छान ! अशाच धैर्याने वागा " का कोणास ठाऊक ते पुढे सटकल्यावर माझ्या डोळ्यात मला न कळत अश्रु उभे राहिले व मी आपल्या विचारातच घरांत शिरले परतु मला एक प्रकारचा उत्साह व मनाला आनदहि वाटला कारण एका फार मोठ्या माणसाने माझे कौतुक केले होते व धीर दिला होता वास्तविक ज्याच्यामुळे माझा व तात्यासाहेबाचा थोडाबहुत सबध आला ते जाऊनहि आठ वर्षें झालीं तरी तात्यासाहेब मला विसरले नव्हते. माझी चौकशी ते आपल्या आप्तस्वकीयांप्रमाणेच करीत.



## गणपतराव गोडबोले

( बी. अे., अेलूअेलू. बी., वकील, सांगली )

( १ ) अेका खासगी भाषणात तात्यासाहेब याना असा प्रश्न विचारण्यात आला कीं, " आपण कित्येक लोकांवर अनेक उपकार केलेले आम्हास माहीत असून

त्यांनीच आपली निंदा करीत सुटावें हे आश्चर्य नव्हे काय?" तात्यासाहेब म्हणाले, "हल्लीचा काळच असा आहे की, हे असे घडणारच. कारण एक तर अशा निंदे-पासून ज्याच्यावर आपण उपकार करतो तो काही दुसराच लाभ साधीत असतो; शिवाय तुम्ही ज्यावर उपकार केलात त्याच्यापासून मोबदला का अपेक्षावा? आजचा मनू असा आहे की, ज्याच्यावर आपण उपकार केले त्याची फेड अनुप-कराने होणे हा नियम. अपवाद हा की, त्याने कृतज्ञ असावे. सर्वांनी केलेल्या उपकाराची कोणालाच परतफेड करता येणार नाही; परतु जाणीवबुद्धि ठेवणे मात्र खचित शक्य आहे तशी कोणी ठेविली तर त्याचे उलट आपण आभार मानावे अशी वस्तुस्थिति असल्यामुळे मला या निंदेबद्दल काहीच वाटेनासे झाले आहे! उलट निंदा ही मनुष्याला शुद्धीवर ठेविते, ती अप्रत्यक्ष गुरूचे काम करते असेच मी समजतों!"

(२) गु. तात्यासाहेब काही कारणाने सागली मुक्कामी माझे पाहुणे होते त्या वेळीं कवि साधुदास यानी आपले एक पुस्तक परीक्षणासाठीं त्याच्याकडे दिलें. ग्रंथ सुमारे तीनशे पानाचा होता पुस्तक घेऊन ते खोलीमध्ये सुमारे एक तास बसले व नतर साधुदास याना अभिप्राय तोंडी देऊ लागले. मी विचारले, "तात्यासाहेब, इतक्यांत वाचून झालें?" त्यावर ते म्हणाले, "यात तुम्हाला आश्चर्य का वाटले? वाचनाचा चांगला व्यासग ठेवला म्हणजे मागील पुढील मजकुरावरून मधला मजकूर ध्यानी येतो, तो अगदी अक्षरशः वाचावा लागत नाही हा थोडाफार सरावाचा प्रश्न आहे."



## सौ. मालती दांडेकर

### (लेखिका, बुधगांव)

(१) विद्युत्-रेखा या माझ्या पुस्तकाच्या निमित्ताने तात्यासाहेब याच्या परिचयाचा सुयोग आला. मला त्याच्याकडून प्रस्तावना घ्यावयाची होती. परंतु माझी ओळख नव्हती मुळीच! तेव्हा माझे मेहुणे कॅप्टन नूलकर याच्याबरोबर मी एकदा त्याच्याकडे गेले त्यानी माझा हेतु सागताच तात्यासाहेबानी प्रसन्न हास्य करून म्हटल – "सह्याद्रीमध्ये कधी काही लिहिल आहात का?' मी नम्र उत्तर दिल की, 'सुखी ससार' अकात मी एक निबध दिला होता, अन् 'विशुद्ध प्रेमकथा' अकातहि माझी गोष्ट प्रसिद्ध झाली आहे 'वादळ' नांवाची!" ते मग म्हणाले – "म्हणजे 'विशुद्ध प्रेमाची' तुम्हाला स्पष्ट कल्पना आहे एकूण! हे ठीक आहे. नाहीतर हल्लींच्या नव्या लेखकाना नेमकी हीच गोष्ट समजत नाहीं! बर वाचून दाखवा, तुमचा एखादा विद्युत्-रेखेतला लेख पाहू –?"

मीं 'तपस्विनी' हा लेख वाचला. जन्मभर कुटुंबासाठीं झिजणाऱ्या एका बालविधवेच्या तापस जीवनाचे ते शब्दचित्र ऐकून तात्यासाहेब क्षणभर गंभीर झाले. अन् म्हणाले – "छान साधलं आहे. मला आवडलं. तुम्ही नव्या लेखिका असला, तरी उत्तम स्त्री-जीवनचित्रे रेखाटाल असे दिसते. मी याला अवश्य प्रस्तावना लिहीन. बाकी तुम्ही आता वाचल ना? तशा तपस्विनी समाजात किती असतात? पूर्वीच्या एकत्र कुटुंबातून एखादी तरी अशी स्त्री असे. आमच्याहि घरांत एक तपस्विनी होती अगदी हेच आयुष्य! बर, मला छापील प्रुफें पाठवा. हस्तलिखित वाचताना जरा त्रास वाटतो. प्रुफे पाहून प्रस्तावना पाठवीन. तुम्हीं चांगलं लिहिलं आहे. असाच व्यासंग ठेवा!"

( २ ) यानंतर तात्यासाहेबांना माझ्या माहेरच्या घराण्याची बारीक चौकशी केली सासरचीहि केली. त्या उतारवयातहि त्यांची मुद्रा लोकांचा आदर वेचून घेईल अशी प्रसन्न, गंभीर दिसली. नव्या माणसाबरोबरहि ते तास-दीड तास किती रंजक भाषण करू शकतात याची आम्हाला साक्ष पटली. त्या तास-दीड तासातहि त्यांची बहुश्रुतता अन् चतुरंग विद्वत्तेची झळाळी त्यांच्या संभाषणातून प्रकट होत असलेली पाहण्याचं भाग्य मला लाभलं. नव्या कलावंताला उत्तेजन देण्याचा दुर्मिळ गुण मला तेथे आढळला त्या थोर व्यक्तीच्या परिचयाचा हा अमूल्य दीड-तास मला भाग्याचा वाटतो अगदी! खरंच! किती सुंदर, मार्मिक प्रस्तावना दिली तात्यासाहेबांनी माझ्या विद्युत्‌रेखेला! पण त्यापेक्षाहि त्यांचा सहज-गत्या मला मिळालेला आशीर्वादच मला अधिक स्फूर्ति देतो – "तुम्ही उत्तम स्त्रीजीवन-चित्रे रेखाटाल असे वाटते. असाच व्यासंग ठेवा!" हा तो आशीर्वाद!



## लक्ष्मण विनायक आगाशे

**( एम्. ए., प्राध्यापक, पुणें )**

( १ ) झाली पांच वर्षे त्या गोष्टीला एक दिवस मी बाजारातून घरीं आलो तों माझ्या थोरल्या बंधूंनी मला हाक मारून सांगितलं, "ते गेले न् तू आलास! आत्ता तात्यासाहेब केळकर येऊन गेले, त्या आपल्या लेखाबाबत." माझ्या वडि-लांच्या मृत्यूनंतर त्यांचें हे पहिलेच अनौपचारिक येणे होते आमच्या घरीं, त्यामुळे मला थोडी चुटपुट लागून राहिली पण त्याच वेळीं तात्यासाहेबांच्या असामान्य व्यक्तिमत्वातील एक पैलू मला दिसला! माझ्या बंधूंनी ( त्र्य. वि. आगाशे ) सह्याद्री-साठीं 'काल व आकाश' याविषयीं आधीच्या अंकात आलेल्या एका लेखावर एक खंडनात्मक अभ्यासपूर्ण लेख लिहिला होता त्या लेखाबाबत संपादकांशी थोडासा मतभेद झाल्यामुळे मी तो लेख [illegible] एके दिवशी

सध्याकाळी नेऊन दिला व सर्व हकिकत निवेदन केली व "मी पुन्हा चार-पाच दिवसांनीं येईन" असें सागून परतलों. दुसऱ्याच दिवशीं सकाळी तात्यासाहेब घरी येऊन उभे! त्यांनी रात्रींच तो लेख वाचून सपवला व सकाळी आमच्या घरीं आले व त्या लेखावर चर्चा करून त्यांनी तो लेख समग्र छापला! हा त्यांचा कामाचा उरक व आस्थेवाईक स्वभाव हे गुण त्याचे विशिष्ट व्यक्तिमत्त्व बनविण्यास कारणीभूत झाले आहेत.

"( २ ) अभ्यासू माणसाना अनेक प्रकारे साहाय्य करण्याची तात्यासाहेबांची तत्परता आठवली की, खरोखरच किती माणसे किती तऱ्हेने, त्याच्या निधनामुळे पोरकीं झाली आहेत याची कल्पना येते गेल्या युद्धातील हिटलरच्या सरशाचा काल होता. त्याचे 'स्वस्तिक' गाजून राहिले होते. डॉ. अरुडेल वगैरे हिटलरच्या स्वस्तिकाच्या अशुभतेबद्दल बरेच लिहून राहिले होते त्या वेळी "Which is the correct Swastik 卍 or 卐 ?" ह्या मथळ्याचा एक सशोधनात्मक व वरील मडळीच्या मताच्या खडनात्मक प्रबध माझ्या बधूनी लिहिला. तो प्रसिद्ध करण्यापूर्वी तात्यासाहेबाचे मत अजमावण्यासाठीं तो त्यांना वाचावयास दिला. तो वाचून ते म्हणाले, "हा लेख चागल्या विचारवताच्या पुढे येईल अशा रीतीनें प्रसिद्ध केला पाहिजे." लगेच त्यानी "प्रबुद्ध भारत" ह्या मासिकाचे नाव सुचवले व ताबडतोब, लेखासोबत धाडण्यासाठी, एक सुदर परिचय-पत्र लिहून दिले. इतकेच नव्हे, तर त्याचे मराठीत भाषांतर करून आणावयास सागितलें, सह्याद्रीत छापण्यासाठी बधूच्या अतिशय खराब व अनिश्चित प्रकृतीमुळे ते भाषातर करणे तसेच अर्धवट पडलें आहे अजून ही गोष्ट निराळी!



## कै. लक्ष्मीबाई कोल्हटकर

### ( श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम, माटुंगा )

तात्यासाहेब यांची चिरस्मरणीय देणगी – त्याचे सस्थेवरील प्रेम व त्यांचा माझा जुना परिचय असल्यानें ते मुबईस आल्यावेळीं सस्थेला आपुलकीनें वरचेवर भेट देत असत. प्रत्येक वेळीं मी त्याना येथील महिलाच्या कांही सत्यकथा निवेदन करीत असे. अशाच एके वेळी मी त्याना खालील नवी नवलकथा सागितली :–

"कोकणातील एका मराठा स्त्रीचा नवरा बेळगावला मिलिटरींत होता. तो एकदा दोनच दिवस घरीं येऊन गेला. लगेच काही दिवसांनीं ती स्त्री आपल्या माहेरी राहावयास गेली. थोड्याच दिवसात ती गरोदर असल्याचा सशय आई-

वडिलाना आला. नवरा दूर असल्यामुळें तिचे वाकडें पाऊल पडले असावे असे स्वाभाविकच आईवडिलाना वाटले त्यानी तिला तसें विचारताच तिने परोपरीने निर्वाळा दिला परतु आईवडिलाना तो पटला नाही. जातीमध्ये बोभाटा होण्यापूर्वी अब्रूला भिऊन त्यानी मुलीला आश्रमात पोचविले. ती मुलगी घाबरून गेली नवऱ्याला पत्राने कळवावे तर तिला लिहितावाचता येत नव्हतें आश्रमात मुलीची वागणूक चागली होती स्वभाव सालस होता. तिची उदासीनता पाहून मी तिला मायेने माहिती विचारता तिने खुलासा केला, "नवऱ्याची व माझी रात्री भेट झाली होती त्याच्याशिवाय इतर माझा कोणाशीच संबंध आलेला नाही" इत्यादि सगतवार माहिती सागून ती रडू लागली मला ते पटले व वाईटाहि वाटले मी तिला समजावले परळला तिचा भाऊ राहात होता त्याला बोलावून सर्व सागितलें नतर तिच्या नवऱ्याला ही गोष्ट समजताच तो बेळगावाहून थेट मुबईला आला आणि तिच्या भावाला घेऊन आश्रमांत आला. घरातील अडाणी माणसाच्या गैरसमजुतीमुळे माझ्या बायकोला गुन्हेगार समजून येथे यावे लागलें याचे त्याला फार दु:ख झाले त्याच्या बायकोच्या वर्तनाचा त्याला पूर्ण विश्वास होता लवकरच सर्व समजले व बायको भेटली म्हणून त्याला अत्यत आनद झाला उभयताची भेट अपूर्व वाटली. होणारे मूल माझेंच आहे असे स्वाभिमानानें सागून सस्थेचे आभार मानून तो बायकोला आनदाने घरी घेऊन गेला."

ही हकिगत ऐकताच तात्यासाहेबाना मोठे आश्चर्य व कौतुक वाटले; कारण थोडे दिवसापूर्वी त्यानी एक अशीच कादबरी लिहिली असून येथेहि त्याच स्वरूपाची घटना घडून यावी, हा योगायोग विलक्षण वाटून त्याचें निदर्शक म्हणून "जगाची रीत" ही त्यानी लिहिलेली कादंबरी सर्व हक्कासह आश्रमाला देण्याचा त्यानी सकल्प केला आणि तसें त्यानी सेक्रेटरीना कळविले त्याचें उत्पन्न सस्थेला मिळाव अशी ही साहित्यपरिचय देणगी साहित्यसम्राटाकडून आम्हाला कायमची मिळाली आहे. त्या कादबरीला ना. डॉ मुकुदराव जयकर यांनी प्रस्तावना लिहिली आहे

"मूळ नाव, गाव वगळूनदेखील बायकामुलाच्या कहाण्या लिहून स्वतत्र पुस्तक छापले असता आपल्या चुका समजावून देणारे समाजसुधारणेला अत्यत उपयुक्त असे ते पुस्तक ठरेल," असे त्यानी उद्गार काढले व तसें पुस्तक निघावे अशी त्यानीं इच्छा प्रदर्शित केली.

❋

## ग. स. महाजनी

### ( रँग्लर, माजी प्रिन्सिपॉल फर्ग्युसन कॉलेज, पुणें )

( १ ) तात्यासाहेब यांची व माझी अगदी प्रथम केव्हा भेट झाली हे आठवत नाही. परंतु त्यांच्याशी एकच वाक्य बोलण्याचा शेवटचा योग आला. तो त्यांच्या निधनाच्या पूर्वी नऊ दिवस. तो असा :– रविवार तारीख ५ ऑक्टोबर रोजी सायंकाळी क्रिकेटपटु प्राध्यापक देवधर यांच्या कन्येच्या विवाहाबद्दलची पानसुपारी टिळकतलाव रस्त्यावरच्या भावेस्कूलमध्ये होती तिकडे मी व माझी पत्नी असे उभयता जिमखान्याच्या इमारतीच्या बाजूने जात होतो पुढील मैदानावर, राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा काही कार्यक्रम चालला होता व तात्यासाहेब जवळ चौथऱ्यावर बसून तो पाहत होते डोक्यास पगडी होती व जवळ एक दोन गृहस्थ होते आम्हाला पाहिल्याबरोबर "का कुणीकडे ?" असा त्यांनी हसतमुखाने प्रश्न केला "लग्नाला जाऊन येतो" असे मी उत्तर दिले "ठीक" म्हणून तात्यासाहेब हसले व त्यांनी मान हलविली तें दृश्य मात्र विसरणे शक्य नाही ही शेवटची भेट न [illegible] जाण्यास आणखीहि एक कारण आहे, ते असं तात्यासाहेबांना उत्तर देऊन चालू लागतांच माझी पत्नी मला म्हणाली, "चुकलं तुमचं ! 'जातो आम्ही द्वारकापुरा' एवढंच तुम्ही म्हणाला असतात तरी 'लग्नाला' असं [illegible] खास उमगले असते इतके ते रसिक आहेत ?" 'खरंच चुकलं, संधि गेली' असं मी बोललो व आम्ही पुनः मागे वळून पाहिले तो ती स्वारी हसत हसत [illegible] गृहस्थाशी बोलत होती

( २ ) लेखनात, संभाषणात मार्मिकपणे व अलंकारिक रीतीने विचार प्रदर्शित करणारी माणसे थोडीच, पण त्यांच्यापेक्षाहि गुणग्रहण करणारे व त्यापासून खरा आनंद ज्यांना होईल असे विद्वानहि पण विरळाच "वृद्धांच्या गुणग्रहणानें तरुण कार्यकर्त्यांच्या अंगावर मूठभर मांस चढते" असे उद्गार तात्यासाहेबांनीच फर्ग्युसन् कॉलेजच्या हीरक महोत्सव प्रसंगी भाषण [illegible] काढले होते. पण सर्वच वृद्धांच्या गुणग्रहणाने मात्र नव्हे ही पुस्ती जोडली पाहिजे. गुणग्रहण करणारे वृद्धहि तसेच अधिकारी पाहिजेत [illegible] ही अशी महनीय व्यक्ति होती कीं, साहित्यक्षेत्रात कोणत्याहि नामवंत लेखकाला त्यांची शाबासकी शिरोधार्य वाटावी; असा हा लेखकाचा पुरस्कर्ता लेखक गेला व महाराष्ट्राचे एक पर्व संपले."

( ३ ) फर्ग्युसन कॉलेजचा मी १९२९ मध्ये प्रिन्सिपॉल [illegible] एक दोन वर्षांतच तात्यासाहेब आमच्या सोसायटीच्या कौन्सिलचे सभासद निवडून आले. हा संबंध अखेरपर्यंत राहिला, एवढेच नव्हे, तर शेवटी ते कौन्सिल व गव्ह-

निंग बॉर्ड। दोन्हींचे उपाध्यक्ष होते. ज्या कॉलेजमध्ये आपण एकेकाळी विद्यार्थी होतो त्याच्याशीं एक अर्ध शतकानन्तर असा सबध आला ह्याबद्दल त्याना अभिमान वाटे व त्यामुळे सस्थेतील काम करणाऱ्या आम्हा तरुण लोकांना फारच उत्साह येई. वयाच्या दृष्टीने मी त्याच्याहून एक पिढीहून जास्तच लहान – म्हणून सस्थेच्या कामाशिवाय त्याच्याकडे जाण्याचा फारसा योग येत नसे पण अडी-अडचणीला प्रिन्सिपल म्हणून मी जेव्हा त्याच्याकडे जाई, त्या वेळी त्याच्या थोरपणाची कल्पना येई वागण्यात, वागविण्यात व बोलण्यात ते कधीहि वयाचे अतर भासू देत नसत !

( ४ ) केळकराचे लिखाण विस्तृत आहे व व्यापकहि आहे साहित्याच्या प्रत्येक दालनात त्यानी पाऊल टाकले त्याच्या ग्रथाचे ग्रथनामावलीकरण करायला प्रतिकेळकरच हवा ! मी त्याचे व्याख्यान सहसा चुकवीत नसे. त्याचे कारण म्हणजे त्याच्या मार्मिक कोट्या व उपमा ! " उपमा कालिदासस्य भारवेरर्थ-गौरवम् " हे आपणाला माहीत आहे. पण एका प्रसगी सरदार किबे याच्यापेक्षा त्याच्या पत्नीचे साहित्य " काकणभर अधिक " ही तात्यासाहेबानी केलेली शब्द-योजना पाहून श्रोत्याच्या टाळ्या व सौ किबे याच्या "काकणा"चा आवाज ऐकून कालिदासानेसुद्धा आनदाने धन्योद्गार काढले असते !

( ५ ) लो टिळकाच्या पश्चात् त्याचे राजकारण टिकविण्याची व केसरीच्या सपादकत्वाची जबाबदारी केळकरानी तत्परतेने व निष्ठेने सभाळली एका विविक्षित पक्षाच्या प्रणालीत काम करीत असतानासुद्धा त्याच्या मनाची बैठक व्यापक होती आणि षष्ठ्यब्दिपूर्तीनतरच्या पधरा वर्षांत तर तात्यासाहेबाची सार्वजनिक आयुष्यात पक्षातीत अशीच भमिका राहिली. विविध पक्षातील अनेक लोक त्याचा सल्ला विचारीत, आणि प्रत्येकाला त्याच्या पारस्थिताशी समरस होऊन ते हिताच्या गोष्टी सागत ते जेव्हा आमच्या सोसायटीच्या कौन्सिलवर निवडून आले तेव्हा ते टिळकपक्षीय आणि आता सोसायटीत त्याचे कसे जमणार अशी काहींनीं शका व भीति प्रदर्शित केली होती; पण त्याचे जमले एवढेच नव्हे तर त्याचा सबध व त्याचे सभासदत्व सस्थेच्या उत्कर्षाला पोषक झालें असो " समग्र केळकर "च्या लेखकाबद्दल एक आठवण लिहायलासुद्धा ज्या शब्दसपत्तीची जरूरी आहे ती माझ्याजवळ नसल्यामुळे मी येथेच लेखणी आवरती घेऊन तात्यासाहेबाच्या स्मृतीस अत्यत नम्रभावाने प्रणाम करतो

❋

## पां. वा. काणे

( एम्. ए., एलूएल्. बी., एल्‌एल. एम्., कुलगुरु, विद्यापीठ, मुंबई )

( १ ) सन १९२१ मधील बडोदा साहित्य संमेलनाच्या वेळची गोष्ट आहे हे संमेलन फार मोठ्या प्रमाणावर झाले व अनेक कारणानी ते गाजले; त्यातील दोन कारणे सागण्यासारखी आहेत एक साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून तात्यासाहेब यानी केलेले भाषण व दुसरे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ट्रस्टी प्रि रा. ग. पाध्ये याच्याबरोबर बडोदे येथील मडळीनी आयत्या वेळी सुमारे पाऊणशे सभासद करून त्याची मते घ्यावी असा आग्रह करून जो खटका उडाला तो या दोन्ही गोष्टीत तात्यासाहेबाचे काम उत्कृष्ट झालें तात्यासाहेबाचे अध्यक्षीय भाषण बरेच विस्तृत, रमणीय कल्पना व चिरस्मरणीय शब्द, उपमा, दृष्टात इत्यादि अलकारानी खचून भरलेले असे होऊन, मराठीतील अत्यत उच्च दर्जाच्या वाङ्मयात त्याची गणना होईल. ह्या विस्तृत भाषणाच्या अखेरीस त्यानी प्रश्न उपस्थित केला की, वाङ्मय वाचल्याने मनाला जो आनद होतो तो का व कसा ? या प्रश्नाचें विवरण करता करता त्यानी एकदम पुढे दिलेले उद्गार काढले, " या आनदाने एक प्रकारची तल्लीनता येते व तो आनद फारच उत्कट झाला तर त्यापासून समाधिहि लागू शकेल. या दृष्टीने पाहता ' खरी सविकल्प समाधि उत्पन्न करू शकेल ते वाङ्मय ' अशी नवीन व्याख्या मी बनविली आहे वाङ्मयाची कोणतीच व्याख्या समर्पक होऊ शकत नाही हे मी जाणतों, तरी ही व्याख्या आपल्या विचाराकरिता मी सादर करीत आहे " या व्याख्येनें तेथे जमलेल्या साहित्यसेवकात वादाची मोठी दगलच उडाली, ती मला चागली आठवते काहीचें म्हणणे कोणत्याहि पदार्थाची व्याख्या करताना जे शब्द उपयोगात आणावयाचे ते परिचित असावे आणि त्यानी सुशिक्षित सामान्य माणसाला त्वरित अर्थबोध झाला पाहिजे. समाधीचा स्वतः अनुभव तर फारच थोड्या मनुष्याना असतो व ती दुसऱ्याने घेतलेलीहि पाहणारे लोक थोडे. सविकल्प हा शब्द तर अनेकाना परिचित नाही हे दोन्ही शब्द ( सविकल्प समाधि ) योगशास्त्रातील पारिभाषिक शब्द आहेत त्याचा उपयोग करून वाङ्मयाची व्याख्या केली तर ती विद्वानानाहि नीटशी कळणार नाही मी सस्कृत साहित्यदर्पण या अलकारशास्त्रावरील पुस्तकाचे इग्रजी टीपासह सपादन केले असल्यामुळे बऱ्याचजणानी माझ्याशी याबाबतीत चर्चा केली मी सागितले की, तात्यासाहेबाची व्याख्या कदाचित सामान्य जनाना कठीण असेल व व्याख्या करताना परिचित शब्दानी अपरिचिताचे वर्णन करणे अवश्यक असाव, तरी तात्यासाहेबाची व्याख्या विचारणीय आहे कारण, वाङ्मय किंवा काव्य याची व्याख्या करिताना अनेक सस्कृत साहित्य शास्त्रकारानी कठीणच शब्द वापरले आहेत उदा-

हरणार्थ 'वाक्य रसात्मक काव्यम्' किंवा 'काव्यस्यात्मा ध्वनिः' हे शब्द पाहा रस म्हणजे काय किंवा ध्वनि म्हणजे काय याचे विवरण करण्याकरितां ग्रन्थ खर्ची पडले आहेत काव्य या शब्दाची सामान्य कल्पना तरी साधारण मनुष्याला असते, परतु रस आणि ध्वनि या कल्पना विद्वानाशिवाय कोणासहि फारशा परिचित नाहीत. या दृष्टीने तात्यासाहेबानी केलेली व्याख्या विचारार्ह व स्वागतार्ह आहे असे माझे मत होते व ते मी त्या वेळी प्रतिपादिले दुसरी गोष्ट म्हणजे त्या संमेलनात उडालेला रा ब पाध्ये व स्थानिक मडळीतील खटका या बाबतीतहि तात्यासाहेबानी उत्तम तडजोड सुचविली व ती रा ब पाध्ये व साहित्य परिषदेचे अधिकारी ( त्यात मीहि होतों ) यानी मान्य केल्यामुळे तेहि वादळ शात झालें.

( २ ) १९२१–२२ साल असावे त्या वेळी महात्मा गाधी यांच्या अहिंसक असहकाराच्या चळवळीची ऐन गर्दी होती त्या कार्यक्रमात खादीपरिधान, चरखा, कोर्टावर बहिष्कार, शाळा ओस पाडणे, पदव्याचा त्याग वगैरे अनेक कार्यक्रम बोलले जात होते. जन्मभर लोकमान्य टिळकाच्या सप्रदायात असणाऱ्या मोठमोठ्या मडळींनी आपल्या पगड्या फिरवून खादी टोपी घालून आपले उत्तमाग भूषविलें त्या वर्षी लोकमान्य टिळकाच्या प्रभावळींतील एका विद्वान् गृहस्थानीं माझ्याकडे हायकोर्टात दाखल करण्यासाठी एका अपिलाचे कागद दिले. दोन्ही कोर्टात त्याच्या विरुद्ध निकाल झाला होता व मिळकत किंवा वादाचा मुद्दा फारसा महत्त्वाचा नव्हता. अपील कसे तरी दखल झाले होते. पुढे तें चालविण्याच्या वेळेपूर्वी काही दिवस ते गृहस्थ मजकडे काय तक्रारी करावयाच्या वगैरे चर्चा करण्यासाठी आले. चर्चा झाल्यानतर थोडे चेष्टेच्या हेतूने मी त्याना म्हटले कीं, आपण गाधीवादाचे अनुयायी, कोर्टावर बहिष्कार हे तर प्रधान अग, असे असता आपण क्षुल्लक कारणासाठी हायकोर्टाकडे धाव घेता हे मला आपल्या खादी तत्त्वाला धरून दिसत नाही. ते म्हणाले, "अहो, तुम्हाला तो कार्यक्रम बरोबर समजला नाही आम्ही सर्व माणसाविरुद्ध कोर्टात जाणार नाही बहिष्कार घालू असा त्याचा अर्थ नाही तर आमचा प्रतिस्पर्धी गाधीवादी, अहिंसक, सत्याग्रही असेल त्याच्याविरुद्ध फारतर कोर्टात जाणार नाही!" गृहस्थ मोठे असल्यामुळे जास्त न बोलता मला अर्थ कळला नव्हता, आपण ... ठीक झाले असे म्हणालो. पुढे बोलता बोलता त्या वेळी मुळशी सत्याग्रहाची चळवळ चालू होती तो प्रश्न निघाला त्या वेळी जान किंवा जमीन अशी भाषा बोलली जात होती. मी म्हणालो की, केसरीने जान किंवा जमीन हे तत्त्व करडेपणानें अमलात आणणे बरे नव्हे असे लिहिले आहे, असे मला वाटते तरी त्यावर तुमचे म्हणणे काय? तेव्हा त्या गृहस्थानी तात्यासाहेबाबद्दल अतिशय अनुदार उद्गार काढून त्याच्यावर भलतेच आरोप केले. तेव्हा मी म्हणालो, तुम्ही दोघे थोर पुरुष, टिळकाच्या तालमींतले

व एकमेकांबद्दल असें माझ्यासारख्या तिऱ्हाईत व वयाने बऱ्याच लहान मनुष्याला सागता याचे मला आश्चर्य वाटते व विषादहि वाटतो. तेव्हां पुनः त्यानीं तेच बोलून खुटा बळकट केला ! मी पुढे तो वाद सोडून दिला. नतर मीं आपल्या एका मित्राजवळ या उद्वेगजनक प्रकाराबद्दल बोललो. तेथून पसरत पसरत ती बातमी कशीतरी तात्यासाहेबाच्या कानी गेली. एक दिवस मी आपल्या खोलींत रविवारीं लिहीत बसलो असता, एकदम तात्यासाहेब व आणखी दोनचार मडळी मजकडे आली मी काय काम व तात्यासाहेबानी मुद्दाम मजकडे येण्याचे का ठरविले वगैरे विचारिले तात्यासाहेब म्हणाले, माझ्याबद्दल टिळकाच्याच अनुयायापैकी एक मोठे गृहस्थ तुमच्याजवळ काही बोलले असे ऐकतो तरी त काय ते सागा. मी विचारात पडलो पक्षकाराने वकिलास सागितलेली, एखाद्या खात्यासबधीची माहिती किंवा वकिलाने पक्षकारास दिलेला सल्ला दुसऱ्याला सागण्याचा अधिकार वकिलाला पक्षकाराच्या परवानगीवाचून नाही तशाप्रकारचे त्या मोठ्या गृहस्थाचे उद्गार जरी नव्हते तरी मला ते शब्द जशाचे तसे तात्यासाहेबास सागणे इष्ट वाटेना कारण ते शब्द पुढे केसरीत किंवा इतरत्र प्रसिद्ध झाले तर माझ्यावर बऱ्याच अडचणीचा प्रसग गुदरण्याचा सभव होता तेव्हा मी तात्यासाहेबांना म्हटले, ते मी सागू इच्छित नाही मला फक्त वाईट वाटते ते इतकेच की, आपल्या पक्षातील आपणाला मित्र वाटणारी काही मडळी आपल्याविरुद्ध आहेत, हे आपल्याला माहीत नाहीं मी, ते काय म्हणाले ते आपण जर त्याची, माझी व आपली खासगी बैठक भरवून विचाराल तर सागेन, भिणार नाही; पण सार्वजनिक चर्चा व्हावी हे मला समत नाही तात्यासाहेब म्हणाले, सार्वजनिक चर्चा होणार नाही मग मी त्यांच्यापुढे काही अटी ठेविल्या त्यातील मुख्य म्हणजे त्यानी किंवा बरोबर आलेल्या कोणीहि स्वतः किंवा परस्पर केसरी किंवा दुसऱ्या कोणत्याहि वर्तमानपत्रात मी सागेन ते प्रसिद्ध करिता कामा नये व जर पत्रात प्रसिद्ध झालें तर ते खोटे आहे, असे ते मोठे गृहस्थ कधीच म्हणाले नाहीत असे मी प्रसिद्ध करीन ही अट मान्य झाली नतर मीं सर्व सागितले पुढे अनेक वेळा पाहिले की ते मोठे गृहस्थ तात्यासाहेबाबरोबर व तात्यासाहेब त्याच्याबरोबर अगदी खेळीमेळीने बोलताहेत, तेव्हा मला तात्यासाहेबाच्या सयमाची धन्यता वाटली हा सयम मोडण्याचाहि एकदा प्रसग आला होता; पण तात्यासाहेबानी त्याहि वेळी मोह आवरला, यामुळे तात्यासाहेबाबद्दलचा माझा आदर द्विगुणित झाला हल्ली वर्तमानपत्रात एकमेकाच्या वैयक्तिक कृतीबद्दल येणाऱ्या उखाळ्यापाखाळ्या वाचल्या म्हणजे तात्यासाहेबानी खरोखर फारच अपूर्व सयम दाखविला असे मान्य करणे भाग आहे धन्य त्याची !

❋

# ग. वि. पटवर्धन

## ( रावबहादूर, स्मॉलकॉज जज्ज, पुणें )

( १ ) तात्यासाहेबांचा विशेष गुण मला दिसला तो हा की, आपल्या-कडून शक्य ती दुसऱ्यास मदत करणे. माझ्या एका मित्रास नोकरीबद्दल शिफारस-पत्र पाहिजे होते. ते मी त्यास मागितले तेव्हा क्षणाचाहि विलंब न करतां ते म्हणाले, " नोकरी कोठे आहे व कोणास पत्र देऊं तेवढे सांगा, म्हणजे देतो. " व तसे लगेच ताबडतोब करण्यात आले.

( २ ) पुणे येथील वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या कार्यास तात्यासाहेबांनी बहुमोल मदत केली आहे. सन १९२५ मध्ये त्या संस्थेची साधारण सभा भरली असता काही धर्मार्थ संस्थांकडून मोठमोठ्या रकमेच्या मागण्या आल्या होत्या. त्या सभेचे अध्यक्ष तात्यासाहेब होते व सुमारे २-३ शे सभासद उपस्थित होते. त्या वेळी अध्यक्षाचे काम त्यांनी, बराच वादविवाद उत्पन्न झाला असता, फार कुशलतेने व नानुर्याने पार पाडले व सर्व मागण्या बहुमताने नामंजूर झाल्या. या-नंतर पुढे ३-४ वर्षे सभेच्या व्यवस्थापक मंडळाचे कार्याध्यक्ष व कार्यवाह यामध्ये दोन पक्ष होऊन तंटे चालू होते व संस्थेतहि बरेच वादग्रस्त प्रश्न उत्पन्न झाले होते. हे सर्व ८।१०।३९ च्या साधारण सभेपुढे निर्णयाकरिता मांडले गेले. यापैकी प्रत्येक प्रश्नाचा निकाल या साधारण सभेने करणे फार दुर्घट होते. या सभेचे अध्यक्ष तात्यासाहेब होते. त्यांनी ही बिकट परिस्थिति पाहून यातून मार्ग काढण्याचा उपाय सुचवला. तो असा की, ज्याअर्थी साधारण सभेकडून या सर्व प्रश्नांचा निकाल समाधानकारक रीतीने करणे अवघड आहे व त्यास काला-वधीहि बराच लागेल त्याअर्थी हे सर्व प्रश्न सोडविण्याकरिता तीन पंचांची एक समिति या सभेने नेमून तिच्याकडे हे काम सोपवावे व तिने जरूर ते कागद-पत्र पाहून कोर्टपद्धतीने मुद्दे काढून पुरावा घेऊन एक महिन्यात निकाल द्यावा. ही उपाययोजना सर्वांस पसंत पडून तशा अर्थाचा ठराव सभेने एक-मताने पास केला, व त्याअन्वये सभेने श्री तात्यासाहेब यास एक पंच नेमले व दुसरे दोन त्यांनी निवडून घ्यावे असे ठरवले. त्याप्रमाणे त्यांनी मला व रा. ब रा. के. बाळ पेन्शनर स्मॉलकॉज जज्ज पुणे यास निवडून घेतले व मला या पंच-मंडळाचे अध्यक्ष नेमले. आम्हा तिघांनी सर्व पुरावा घेतला व ठराव लिहिण्याचे काम तात्यासाहेबांनी करावे असे मी सुचविले. पण त्यांनी मलाच ते काम सांगि-तले व त्यास कार्यबाहुल्यामुळे सवड होणें कठीण असल्याचे जाणून मी त्यांच्या विनंतीस मान देऊन ठराव लिहिला व तो त्यास पसंत पडून त्यावर तिघांनी ता. २८।११।३९ रोजी सह्या केल्या. पंचाकडून निर्णय करण्याचा ठराव त्यांनी

युक्तीने घडवून आणला या सर्व प्रसंगी त्यांचे सौजन्य व निगर्वी स्वभाव मला उत्कटतेने दिसून आला. तसेच सार्वजनिक संस्थेबद्दल व कार्याबद्दल त्यांची आस्था व कळकळ ही स्पष्टपणे निदर्शनास आली



## गो. ल. आपटे

### ( बी. ए , एलएल. बी., वकील, पुणें )

कांही वर्षांपूर्वी पुणे येथे नाट्यमहोत्सव मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला होता तो पुण्यातला पहिलाच व आतापर्यंतचा तरी शेवटलाच नाट्य-महोत्सव होता त्यात एके रात्री आमच्या सोशल क्लब या नाट्य-संस्थेने तात्या-साहेबांच्या नितांतरम्य अशा 'तोतयाचें बंड' या प्रसिद्ध नाटकाचा प्रयोग केला. या प्रयोगांत मी स्वत., तसेच सुधाबाई आपटे, मामा लेले अशा मंडळींनी हौसेने कामे केली होती तात्यासाहेबांना हा प्रयोग पाहण्यास मुद्दाम बोलावणे पाठविले होते. नाट्य-प्रयोगास सुरुवात होण्यापूर्वीच तात्यासाहेब आंत रंगपटात आले मोठी-छोटी कामे करणाऱ्या सर्व नटांशी ते आपुलकीने बोलत होते. माझे सुखानधानाचे काम त्यांनी पूर्वीहि बरेच वेळा पाहिले होते नाटकाच्या तिसऱ्या अंकातील नाना, पार्वतीबाई यांच्या सुप्रसिद्ध गाठभेटीच्या प्रवेशाच्या वेळी मी वुइंग्मधून, बाहेर पुढ-ल्याच रांगेत बसलेल्या तात्यासाहेबांच्या मुद्रेकडे मुद्दाम पाहत होतो तात्यांना हे नाटक फार आवडे वरील प्रवेशांतील सुधाबाई व मामा लेले यांचा संवाद चालू अस-ताना तात्या अगदी तद्रूप होऊन गेले होते व त्या संवादाचा उच्च बिंदु गाठला गेला, तेव्हा तात्यांच्या डोळ्यातून अक्षरश अश्रु झिरपले! जबाबदार व्यक्तीकडून केवळ गैरसमजामुळे, खऱ्या देशभक्तावरहि केव्हा केव्हा कशी निष्कारण आग पाखडली जाते व त्यामुळे सज्जनाचाहि कसा कोंडमारा होतो याचे स्वत च रंगविलेले चित्र रंगभूमीवर पाहून तात्यांच्या हळव्या व सात्त्विक हृदयाला भडभडून आले होते!



## नारायण भास्कर खरे

### ( डॉक्टर, माजी दिवाण, संस्थान अलवार )

तात्यासाहेबांचा व माझा दाट परिचय नव्हता, तरी पण त्यांच्या-सारख्या आमरण त्यागवृत्तीने राष्ट्रसेवा व वाङ्मयसेवा करणाऱ्या महाराष्ट्राच्या या महनीय पुढाऱ्याच्या चरणी आपलीहि श्रद्धांजलि अर्पण व्हावी असे वाटणें साहजिकच आहे. केवळ ह्याच बुद्धीने मी हा मजकूर लिहिण्यास उद्युक्त झालो आहे

( १ ) त्यांची व माझी पहिली ओळख ४० वर्षांपूर्वी वऱ्हाडात खामगाव

मुक्कामी झाली कै लो मा टिळकांच्या वऱ्हाडातील दौऱ्याच्या वेळी तात्यासाहेब खामगांवास आले होते. मी त्या वेळेस खामगावास असिस्टट सर्जन होतों. केळकरांचा मुक्काम कै श्रीपाद कृष्ण कोल्हटकराकडे होता त्याचा व माझा थोडा परिचय झालेला होता त्यानी मेजवानीच्या वेळी मलाहि भोजनास बोलाविले होतें, तेव्हाच केळराची माझी ओळख झाली त्या वेळेस मी दोन-चार महिन्यापूर्वींच कॉलेजमधून बाहेर पडून नोकरीला लागून बाहेरच्या मोठ्या जगात पदार्पण केले होते. म्हणून अशा थोर आणि प्रसिद्ध माणसाची ओळख झाल्यामुळे मी स्वतःच मोठा झालो अस मला वाटायला लागले दोघेहि 'तात्या' साहित्यिकच, तेव्हा भोजनोत्तर [illegible] चालल्या असताना साहजिकच वाङ्मयावर चर्चा सुरू झाली; बोलता बोलता [illegible] शृंगाररसाकडे चर्चेचा ओघ वळला. दोघेहि तात्या अगदी रगात आले होते मी अगदी अनभिज्ञ असूनहि मधूनमधून लहान तोंडी मोठा घास घ्यायचा प्रयत्न केला [illegible] केळकरांची ऋजुता, साधेपणा आणि रसिकता यांची माझ्या मनावर जी छाप पडली ती कायमचीच

(२) यानतर त्यांची व माझी भेट नागपूरला १९२५ सालीं त्या वेळीं अत्यत [illegible] ताबे प्रकरणाच्या वेळी झाली त्या वेळी नागपुरांत स्वराज्यपक्षाची सभा होती. त्या सभेला केळकर नागपूरला आले होते, आणि ते माझ्याच घरी उतरले होते या सभेनतरच स्वराज्यपक्षाची दोन शकले झालीं, व [illegible] सहकारिता पक्षाचा जन्म झाला या सभेमध्ये डॉ. मुजे यांजवर कै बॅरिस्टर अभ्यकर यानी जोराचा हल्ला केला होता. अशा त्रस्त वातावरणात केळकरांची समयज्ञता, विवेक आणि बुद्धिवाद याचा चागलाच प्रत्यय आला. मी अभ्यकर पक्षाचा आणि केळकर विरुद्ध बाजूचे आणि तशांत माझे पाहुणे, पण केळकराच्या निःसीम सौजन्यामुळे त्याच्या सहवासाचे दोन-तीन दिवस मोठ्या आनदात गेले

(३) त्यानतर केळकरांची व माझी भेट १९२९ मध्ये लाहोर येथें कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या वेळी झाली याच अधिवेशनाच्या वेळीं जवाहरलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं पूर्ण स्वातत्र्याचा ठराव पास झाला आणि मध्यरात्रीं "इकिलाब जिंदाबाद" चा हैदोसधुल्ला झाला. याच "इन्किलाब जिन्दाबादचें" पर्यंसान शेवटी "इन्किलाब जिन्नाबाद" मध्ये झाले आहे! या अधिवेशनाच्या वेळीं गांधी आणि केळकर याचा मोठा कडाक्याचा वाद झाला केळकरांचें म्हणणे असें कीं, ज्याअर्थी तुम्ही पूर्ण म्हणजे साम्राज्याच्या बाहेर असे स्वातत्र्य हें ध्येय ठरविले आहे, त्याअर्थी तुम्हीं आतां अहिंसेच्या जोखडानीं आपले हातपाय बाधून घेऊ नका, कारण असें स्वातत्र्य अहिंसेनें कधीं मिळणार नाहीं व टिकणार तर नाहींच नाहीं. या प्रसगीं केळकराची तडफ आणि

वाक्पटुता पाहण्यासारखी होती स्वराज्याच्या मार्गावर प्रतियोगित्वाचा दीपस्तंभ उभारून लोकमान्य टिळक कालवश झाले तो दीप अखेरपर्यंत केळकरानीं तेवत ठेवला, म्हणजे एका अर्थाने केळकर हे द्रष्टे होते पण गाधी हे 'नेता' झाले आणि अखेरपावेतो राहिले, म्हणून देशाचा घात झाला. गाधीच्या तथाकथित अहिंसेच्या आणि असहकारितेच्या जोडगोळीने भारतमातेचा शिरच्छेद केला आहे. देशाचे अत:शत्रु हे लिगी मुसलमान आणि बहि:शत्रु हे इग्रज या दोघाच्या रक्त आणि कृष्णकारस्थानापुढे गाधीच्या अहिंसेने सपशेल शरणागती पतकरून व मातृद्रोह करून पाकिस्तानाला समति दिली या कारस्थानाचा सुगावा मी व्हाईसरॉयच्या कौन्सिलमध्ये असताना कॅबिनेट मिशन हिंदुस्थानात आले होते, त्या वेळी मला लागला होता आणि मी व्हाईसरॉयची नाराजी पतकरून त्याचा स्फोटहि वर्तमानपत्रात केला होता व काही प्रतिष्ठित कॉंग्रेसवाल्याना त्याबद्दल सूचनाहि दिली होती परतु काहीं उपयोग झाला नाही. ज्या अधिकारलोलुपतेबद्दल कॉंग्रेसवाल्यानीं प्रतियोगी पक्षाला नावे ठेवली त्याच अधिकारपदाच्या लोभाला ते शेवटी बळी पडले. आपला लोभ आवरून जर कॉंग्रेसवाले, केळकरानी दाखविलेल्या मार्गाने गेले असते तर, पाकिस्तान न होताहि देश स्वतत्र झालाच असता.

(४) १९२४ पासून १९३८ पावेतो मी केळकराच्या विरोधी पक्षातच होतो. केसरीमधून माझ्यावरती हल्ले होत असत व मीहि 'तरुण भारत' मधून केळकरांच्या पक्षावर हल्ले करीत असे. तरीहि १९३८ मध्ये कॉंग्रेसमधून माझे 'खरेत्राण' झाल्यानतर केळकरानी ज्या आत्मीयतेने आणि आदराने माझ्याशी वागणूक ठेवली ती मी कधींहि विसरणार नाही. १९४२ किंवा १९४४ मध्ये पुण्यास टिळक पुण्यतिथीच्या वेळीं केळकर अध्यक्ष होते आणि मी मुख्य वक्ता होतो त्या वेळेस समारोपाच्या वेळीं " व्हाइसरॉयच्या कौन्सिलचा मेबर असूनहि, इतक्या छातीठोकपणे व बेडरपणे बोलणारा दुसरा गृहस्थ मी पाहिला नाहीं, " असे जे त्यानी उद्गार काढले ते अजूनहि माझ्या कानात घुमत आहेत



## कृ. ग. फुलंब्रीकर ऊर्फ मास्तर कृष्णा

(गायनकलाभिज्ञ, नटसम्राट्, पुणें)

तात्यासाहेब हे राजकारणी व साहित्यसम्राट् होते, तरी त्याना सगीताचे खरे प्रेम असल्याने त्यांच्या अगी रसिकवृत्ति पूर्ण बाणलेली होती, व याच कारणाने त्याचा माझा परिचय झाला.

(१) सन १९११ साली मी नाट्यकलाप्रवर्तक कपनीत असताना प्रसिद्ध कादबरीकार कै श्री हरी नारायण आपटे यानीं लिहिलेल्या 'सत सखू' या नाट-

कोतील विठ्ठलाच्या कामाबद्दल मला पारितोषक म्हणून एक खिशांतील घड्याळ, व डोक्यास बांधण्याचा जरीचा रुमाल, तात्यासाहेबांच्या हस्ते दिला गेला, व त्या वेळी प्रथमच मीं तात्यासाहेबांना पाहिले.

( २ ) तात्यासाहेबांचा किर्लोस्कर कंपनीशी निकट संबंध होता. कुठल्याहि परिस्थितींत योग्य सल्लामसलत देऊन कंपनीत एकजूट असावी व संस्था उत्तम प्रकारे चालावी, या दृष्टीने त्यांच्या विचारसरणीचा उपयोग फार होत असे. खरा सल्ला देण्याबाबत तात्यासाहेबांचा लौकिक सर्वश्रुत आहे. माझे गुरुवर्य गायनाचार्य भास्करबुवा बखले यांनीं इ. स. १९११ सालीं स्थापन केलेल्या किर्लोस्कर भारत-गायन समाजाचे हितचिंतक म्हणून तात्यासाहेब होते. त्या वेळी समाजाचे गायनाचे जलसे होण्याचे ठरले त्या वेळीं सुरवातीस एक विद्यार्थी व होतकरू गायक या नात्याने माझा गाण्याचा कार्यक्रम ठेवावा असे ठरून जाहिरातीत सुटसुटीत असे माझे नांव काय द्यावें असा खल झाला. त्या वेळीं तात्यासाहेबांनी असे सुचविलें की, लहान मुलाला मास्टर असे संबोधितात; तेव्हा 'मास्तर कृष्णा' असे सुटसुटीत नांव छापावे व त्याप्रमाणे ते छापले गेले तो छापण्याचा ठसा अद्याप कायम आहे. लोकमान्यामुळे जसे 'बालगंधर्व', तसे तात्यासाहेबामुळे 'मास्तर कृष्णा' हे नाव कायम झाले !

( ३ ) मी गुरुवर्य बखलेबोवाकडे शिक्षण घेत असताना पुण्यास किर्लोस्कर नाट्यगृहात चित्ताकर्षक नावाची नाटक मंडळी खेळ करीत होती तात्यासाहेबांनी लिहिलेलें 'तोतयाचे बंड' हे नाटक प्रथमच रंगभूमीवर त्या कंपनीने करण्याचे ठरले. नाटक गद्यमय होते, पण त्यात दसऱ्याची शिलंगणाची स्वारी यावर एक लावणी योग्य रीतीने तशाच पद्धतीने म्हटली जावी, याकरिता माझी योजना करून त्याप्रमाणें माझ्या गुरुजींना सांगण्याकरिता तात्यासाहेब हे भारत गायन समाजात आले, व त्यांच्या 'मास्टर कृष्णा'कडून ही लावणी म्हटली जावी असे त्यांनी बुवासाहेबांना सांगितले. सुरुवातीचा प्रयोग ३।४ दिवसानीच व्हावयाचा आहे. तेव्हा शक्य तो लवकर ती बसवून द्यावी असे म्हटल्यावर मला लावणीची तालीम सुरू झाली व उत्तमप्रकारें बसल्यावर तात्यासाहेबानी ती ऐकली व ते खूष झाले नंतर श्री. तात्यासाहेबांच्या देखरेखीखाली प्रयोगाच्या दिवशी मी डोक्यास तुरा खोवलेला फेटा, अंगांत मुडीछाट सदरा, गळ्यात ताईताचा गंडा, हातांत चांदीचे कडे, असा पोशाख करून बरोबर तुण-तुणे, डफ असा फड घेऊन एका प्रवेशात ती लावणी ( पंचकल्याणी घोडा अबलख ) म्हटली व प्रेक्षकानी टाळ्यांनी त्याचे स्वागत केलें तात्यासाहेब आत येऊन मला शाबासकी देऊन कंपनीतील मंडळीस म्हणाले, " माझी योजना चुकली नाही ना ? " योजकस्तत्र दुर्लभः

( ४ ) काही वर्षांनंतर गंधर्व कंपनीने 'संतकान्होपात्रा' नाटक बसविण्यास घेतले. अर्थातच पदाच्या व अभंगाच्या चाली देण्याचे काम माझ्याकडेच असल्याने त्या नाटकातल्या पदाच्या व अभंगाच्या चाली बहुतांशी मी दिल्या व पुढे नाटकाचे प्रयोग सुरू झाले. कंपनी मुंबईस होती व मी पुण्यास मध्यंतरी माझ्या घरी २।३ दिवसाकरिता आलो होतो. तेवढ्या अवधीत मुद्दाम एके दिवशी तात्यासाहेब माझ्या घरीं आले. सकाळी सात वाजण्याचा सुमार होता मी नुकताच उठलों होतो. तात्यासाहेब एकदम माडीवर आले त्याचा तो पुणेरी जोड्याचा आवाज ऐकून माडीवर कोण आले म्हणून पाहण्यास माझी पत्नी खोलीचे दार उघडून हॉलमध्यें आली व 'कोण आहे?' असे विचारताच, 'घरचाच पाहुणा आहे! मास्तर कृष्णा आहेतना?' असे म्हटल्यावर मला माझ्या पत्नीने येऊन, 'अहो, बाहेर गॅलरींत तात्यासाहेब बसले आहेत', असे मला सांगितले मी तातडीनें बाहेर येऊन "सकाळीच इकडे कोठे?" असे विचारले ते म्हणाले, "अहो, तुम्ही कान्होपात्रा नाटकातून अभंगाला चाली लावल्या त्या फार उत्तम आहेत असे वर्तमानपत्रात वाचले. तेव्हा तुमच्या तोंडून त्या ऐकाव्या आणि ही सकाळची वेळ ऐकण्यास चांगली म्हणून आलो." "मी जरूर ऐकवितो" असें म्हणून तीन-चार अभंग त्यांना ऐकविलें. त्यांना ते अतिशय आवडले हे त्यांनीं मनमोकळेपणाने बोलून दाखविले न बोलवता आपण होऊन माझ्या घरीं येऊन गाणीं ऐकली, यावरून त्यांचे संगीतावरील प्रेम व रसिकपणा दिसून येतो.

( ५ ) संगीतावरील प्रेमामुळे व मराठी भाषेच्या अभिमानामुळे हिंदुस्थानी चिजाप्रमाणें आपणहि मराठीतून ख्याल वगैरे बांधावे, व ते गवयांनी गावे, अशा कल्पनेने त्यांनी काही गाणी केली व काही गवयांना ती म्हणण्यासहि सांगितली; तसे मलाहि त्यांनी सांगितले. माझ्याजवळ ती पदे दिलीं. मी ती म्हणून पाहून त्यांनाहि ऐकविली व हिंदुस्थानी चिजेवर मराठीतून गाणे रचून त म्हणण्यास काय अडचण आहे, तीहि सांगितली. "चिजेतील शब्दाच्या सोपेपणामुळे गाण्यास सुंदर अशा हिंदुस्थानी चिजेवर मराठीतून ख्याल बांधण्यापेक्षा, मराठीतून स्वतंत्र पदे करून, शिवाय संतांचे प्रेमळ असे असंख्य अभंग आहेत ते म्हटल्यास बरे नाहीं का? व ते सोपेहि आहेत; शब्दाच्या व अर्थाच्या दृष्टीने त्या अभंगावर हिंदी चीज तशी बांधणे जसें कठीण, तसाच हाहि प्रकार कठीण आहे," असे मी म्हणालो या बाबतींत त्यांचे व माझे बरेचसे स्पष्ट बोलणे झालें. त्यावर ते म्हणाले की, "काही अडचणी असतात, त्या आम्हांला स्पष्ट शब्दात सांगायला कोणी धजत नाहीत. 'तात्यासाहेबांना स्पष्ट कसें सांगायचें बुवा', या भिडेने आम्हाला खऱ्या अडचणी कळत नाहीत. तुम्ही स्पष्ट बोललात हे एक प्रकारे बरें वाटले." मात्र यामुळें

त्याचें हिंदुस्थानी गाण्यावरील प्रेम यत्किंचितहि कमी झालें नाहीं. तर ते हिंदुस्थानी गाण्याचा लाभ सर्रास घेतच असत.

( ६ ) गायनक्षेत्रांत माझी पचवीस वर्षांची सेवा झाल्याबद्दल पुण्यास झालेल्या समारभास तात्यासाहेब हे अध्यक्ष लाभले. त्यानीं माझा परिचय कसा व केव्हांपासून झाला याबद्दल काही आठवणी सागून समयोचित असे भाषण केले. आठवणी इतक्या बरोबर सागितल्या की, मलाहि त्यांचे पुन्हा स्मरण करून दिले. त्याच्या स्मरणशक्तीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. माझ्या गाण्यावरील प्रेमामुळें त्यानी माझ्या पद्धतीचे गायन शिकण्याची इच्छा बोलून दाखविली. त्याप्रमाणे मी माझे शिष्य, हरीभाऊ देशपांडे, बापुराव अष्टेकर, व अप्पा भोपे याना क्रमाक्रमाने त्याच्याकडे पाठवीत असे. ऑर्गनचे स्वर गोड असतात, तेव्हा त्यानी माझ्याकडील ऑर्गनहि मागून नेला होता माझ्या शिष्यांनीं त्याना म्हणण्यास लावावे, व त्याची साथ करावी व काहीं पदे शिकवावीं, असा क्रम सुरू झाला. वंदेमातरम्‌ची माझी चालहि स्वतः ऑर्गनवर वाजवून त्याबरोबर त्यानीं म्हटलेली आहे आवाजाबद्दलची त्यांची तक्रार मात्र ते स्वतःच करीत असत. अशा आवाजांतहि इतक्या वयात लहान मुलाप्रमाणें, त्याचे शिकण्याचे व म्हणण्याचें धाडस, चिकाटी व प्रेम पाहून आश्चर्य वाटते.

( ७ ) मुबईचे सरदारगृहाचे मालक कै. बाबुराव साळवेकर यांच्याकडे त्यांच्या चिरंजिवाच्या वाढदिवसानिमित्त माझें गायन झाले होते तात्यासाहेब गायन ऐकण्यास आले होते प्रतिष्ठित मडळींकरिता टेकण्यास तक्के ठेवले होते. तात्यासाहेब प्रथम तक्क्याशी टेकून बसले होते माझ्या दोन चिजा सपल्यावर, तिसऱ्या चिजेस मी सुरुवात करताच ती अपरिचित रागातील चिजेची ठेवण, व त्यातील शब्दरचना ऐकून त्यानी आपल्या वयाकडे लक्ष न देता, गाण्याकडे लक्ष देऊन ते एकदम पुढे येऊन बसले! ते जवळजवळ अखेरपर्यंत तसेंच बसले होते. भैरवीच्या अगोदर मी हिंडोल राग म्हटला. ती चीज त्याना फार आवडलीहि. ही चीज ऐकून तात्यासाहेब म्हणाले कीं, "या चीजेंतील शब्दलालित्य किती तरी सुंदर असून त्याची उठावण हिंदोळया ( झुल्या ) प्रमाणें वाटतें, हा खरा हिंडोल." खरा मार्मिकपणा व रसिकपणा याची साक्ष आणखी दुसरी काय पाहिजे ?

( ८ ) ज्या वंदेमातरम् प्रकरणाकरितां रेडिओवर मी गाणार नाहीं असा मी निश्चय केला होता, त्या प्रकरणाचा गोड निकाल लागून रेडिओवरची वंदेमातरम्‌ची बंदी कॉंग्रेस सरकारनें उठविली, व मी मानाने वंदेमातरम् रेडिओवर म्हणून माझ्या गाण्यास सुरवात केली. त्याबद्दल माझा सत्कार झाला. या सत्कार-

सभारंभाचे अध्यक्षस्थान तात्यासाहेबानी स्वीकारून गायनकलेबद्दल उत्कृष्ट भाषण केलें व त्यानंतर लवकरच ते नादब्रह्मात कायमचे लीन झाले!



## गोविंदराव धर्माजी वर्तक

### (बी. ए, मंत्री, मुंबई सरकार)

(१) समाजसुधारणेसंबधाने तात्यासाहेबांची मते कशी प्रगतीपर होती त्याची प्रचीति बत्तीस वर्षांपूर्वी त्यांचें प्रार्थनासमाजात झालेले व्याख्यान ऐकून मला व माझ्या सहकारी विद्यार्थ्यांना आली विधवाविवाहदिनानिमित्त तें व्याख्यान होतें त्या वेळी राजकारणाच्या आघाडीवर असलेल्या केसरीचे धोरण सामाजिक सुधारणेसंबधाने तितकेसे प्रगमनशील नव्हते त्यामुळे विधवाविवाहासारख्या विषयावर तात्यासाहेब काय म्हणतात ते ऐकण्याकरिता कॉलेजातील इतर साहाध्यायांबरोबर मी मुद्दाम गेलों होतों. विधवाविवाहाचें प्रतिपादन करताना त्यांनी हिंदुस्थानांतील बालविधवांचें करुण चित्र पुढे मांडून त्या विषयाची सांगोपांग चर्चा केली. विधवाविवाहासंबधानें निरनिराळ्या स्मृतींत परस्परविरोधी वचने आढळतात याचा उल्लेख करून ते म्हणाले की, "पूर्वी जसे तत्कालिन आचाराना धरून स्मृतिकारांनीं स्मृतिग्रंथ लिहिले, तसेच आजची परिस्थिति लक्षात घेऊन समाजाची धारणा व्हावी म्हणून नवी स्मृति निर्माण करणारे स्मृतिकार का निघू नयेत?"

(२) प्रतिपक्षाविषयीं हेटाळणीचे उद्गार न काढता युक्तिवादानें प्रतिपक्षाच्या चुका दाखवून आपल्या पक्षाचे समर्थन करण्याची वृत्ति पहिल्यापासूनच तात्यासाहेबांच्या ठिकाणीं दिसून येत होती १९२० साली सोलापूर येथें तात्यासाहेबांच्या अध्यक्षतेखाली इलाखा प्रांतिक परिषद भरली होती कायदेमंडळात कॉंग्रेसविषयी ज्यांची निष्ठा कसोटीला लागेल त्यानाच लोकांनी निवडून द्यावें अशा आशयाचा ठराव तेथे झाल्यानंतर, निरनिराळ्या जिल्हा-सभांतून तसे ठराव मंजूर करण्यांत आले यासाठीं डहाणु येथे कै दादासाहेब करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं ठाणें जिल्हापरिषद भरली होती आणि त्या सभेस तात्यासाहेब स्वतः उपस्थित होते ठाणे जिल्हासभेत असा ठराव होऊ नये म्हणून नेमस्तानी जोराने प्रयत्न चालविला होता. परिषदेच्या मंडपाजवळ असलेल्या पिंपळाच्या पारावर भरलेल्या प्रचार-सभेत कांही नेमस्ताग्रणींनीं असा ठराव पास होऊ नये म्हणून भाषणे केलीं. भाषणे चालू असताना मधूनमधून श्रोतृवर्गांतून विरोध होत होता त्याच वेळीं तात्यासाहेब कुणाला भेटण्याकरिता पाराच्या रस्त्याच्या बाजूने जात होते. त्याना लोकानी आग्रह करून सोलापूर ठरावाची भूमिका समजावून देण्यासंबधी विनंती केली तात्यासाहेबांनीं नेमस्तपक्ष हा राष्ट्रीय पक्षाच्या मागे वीस वर्षे

कसा असतो याचे विनोदाने वर्णन करून बिनतोड युक्तिवादानें ठरावाची भूमिका समजावून दिली. त्यामुळे नेमस्तांना सभेतून हळूच पाय मागे घेवून आपल्या निवास-स्थानी परत जावे लागले!

( ३ ) सहजगत्या विनोदी उत्तर देऊन दुसऱ्याला धीर देण्याची वृत्ति तात्यासाहेबाच्या ठिकाणीं होती, याचे प्रत्यन्तर अनेकाना आलेले आहे १९४६ च्या नोव्हेंबरमध्यें सहकारदिनसप्ताहात श्री वैकुठभाई मेहता याचे पहिले व्याख्यान ठेविले होते या सभेस तात्यासाहेब हजर होते. महाराष्ट्रात सहकारी चळवळी वर श्री वैकुठभाईनी अनेक वेळा आपले विचार मराठी भाषेतून माडलेले असल्यामुळे सभेतहि त्यानी मराठींत बोलावे अशी त्याना मडळीनीं विनती केली. वैकुठभाईनी तात्यासाहेबाकडे बोट दाखवून उत्तर दिले की, "महाराष्ट्राचे साहित्याचार्य बाजूस बसले असताना, मराठीत बोलण्याची मला भीति वाटते" त्याबरोबर तात्यासाहेब विनोदाने म्हणाले की, "अहो, मला अलीकडे ऐकावयाला कमी येते तुमच्या मराठी बोलण्यामध्ये काही चुका झाल्यास, मला ऐकू कमी येत असल्यामुळे त्या समजणार नाहीत ही एक सोयच झाली आहे असे समजून तुम्ही आपल्या भाषणास बेलाशक मराठीतच सुरवात करा!" तात्यासाहेबाचें असे आश्वासन मिळाल्याबरोबर वैकुंठभाईं यांना आपलें भाषण मराठींतच केलें हे सांगण्याची जरूरी नाही

( ४ ) सौजन्यपूर्ण वागणूक हा तात्यासाहेबाचा एक स्वभावविशेष होता, १९४६ साली मुंबई सरकारचा मुक्काम पुण्यास असताना नूतन मराठी विद्यालयाच्या चालक मडळीचे सस्था पाहण्याचे आमत्रण होते. निरनिराळ्या वेळी जाऊन सस्था पाहण्यात चालकाचा वेळ घेण्यापेक्षा सर्वांनी मिळून एकदम जावे असा बेत करून श्री. वैकुठभाई मेहता, श्री तपासे आणि मी असे तिघे दोन वाजण्याच्या सुमारास सस्था पाहण्यास गेलो. तेथे गेल्यावर पाहुण्याच्या स्वागतार्थ तात्यासाहेब हजर असलेले पाहून आम्हास आश्चर्य वाटले. दोन प्रहरच्या गैरसोयीच्या वेळी या उतारवयात त्यानी सस्थेचा ऋणानुबधी म्हणून हजर राहावे, अशी आमची अपेक्षा नव्हती. म्हणून पाच दहा मिनिटे आमच्याबरोबर फिरल्यानतर आम्ही त्याना विनती केली की, दुसऱ्या मडळीबरोबर फिरून आम्ही सस्थेच्या कार्याची माहिती समजावून घेतो. आणि मग आपणाला भेटतो; तोपर्यंत आपण विश्रांति घ्यावी सुमारे एक तासापेक्षा अधिक वेळ सस्थेच्या आवारात फिरून शैक्षणिक प्रयोगाची प्रात्यक्षिके चालत असलेली आम्ही पाहिला आणि तात्यासाहेब ज्या प्रशस्त खोलीमध्ये बसलेले होते तेथे गेलो, अल्पोपाहाराच्या वेळी, आपण भर दोन प्रहरी त्रास घेऊन येण्याचे विशेष प्रयोजन नव्हते असे मी त्याना म्हणालो. त्याबरोबर त्यानी सौजन्यपूर्वक उद्गार काढले की,

"तुमच्यासारखे पाहुणे संस्थेच्या आमन्त्रणावरून संस्था पाहण्यास आले असतांना संस्थेचा ऋणानुबंधी म्हणून स्वागतासाठीं उपस्थित राहणें हें माझें कर्तव्य असल्यामुळे मी आलो आहे आणि तुम्ही येथून परत गेल्यानंतरच मी घरीं जाईन."



## ग. दे. तपासे

### ( बी. ए., मंत्री, मुंबई सरकार )

( १ ) महाराष्ट्रांतील नामवत पुढारी, मराठीचे खंदे लेखक, आणि मार्मिक व विनोदी वक्ते म्हणून तात्यासाहेबांची कीर्ति मी लहानपणापासून ऐकत होतो. त्यांना मी अनेकदां पाहिले होतें व त्यांचीं भाषणें अनेक वेळा ऐकिलीहि होती. तथापि त्यांचें निकट सान्निध्य मला थोडेंच मिळाले व तेंहि अगदी अलीकडेच.

( २ ) कांही महिन्यांपूर्वी श्री. हरिभाऊ फाटक यांनीं महाराष्ट्र हरिजन मंदिरप्रवेश-मंडळाची दुसरी सभा पुण्यास बोलाविली होती. त्या सभेस डॉ. आण्णासाहेब कर्वे व तात्यासाहेब हजर होते त्या वेळी तात्यासाहेबांच्याबरोबर समक्ष बोलण्याची संधि मला मिळाली. हरिजनांना मंदिरप्रवेश मिळावा व तोहि त्यासाठीं कायदा होण्यापूर्वींच मिळावा याविषयींची तात्यासाहेबाची उत्कट इच्छा व तळमळ त्यांच्या बोलण्यात व्यक्त होत होती त्या सभेला तात्यासाहेब हजर आहेत, एवढ्यानेंच त्यांच्याविषयीं मला एकप्रकारचा आदर वाटत होताच सदर सभेंत बराचसा वादविवाद झाल्यावर तात्यासाहेबानीं महाराष्ट्रांतील व विशेषतः पर्वती व आळदी येथील प्रसिद्ध देवालये कायदा मजूर होण्यापूर्वीच हरिजनांना कशा प्रकारें खुलीं होतील याविषयीं उत्कृष्ट सल्ला त्या वेळीं दिला, व नुसता सल्ला देऊनच न थांबतां त्याबाबतींत तशा उतारवयातहि स्वतः इतराबरोबर झिडण्याची आपली तयारी पण त्यांनीं दर्शविली ! हातीं घेतलेलें कार्य वेळीं श्रम सोसूनहि तडीस नेण्याची त्याची नेहमीं तयारी असे. ती या वेळींहि दिसून आल्यामुळें तात्यासाहेबांविषयींचा माझा आदर दुणावला. तात्यासाहेबाचा निकट सहवास मला अगदीं अल्पसाच लाभला, तरीहि त्याच्या थोरपणाविषयीं नितांत आदर वाटण्याइतपत तो प्रभावी होता, हे येथें नमूद करण्यास मला अभिमान वाटतो. ही अल्पशी स्मृतिकुसुमांजलि कै० तात्यासाहेबाच्या चरणीं मी मोठ्या आदराने व भक्तिभावानें अर्पण करीत आहें.



## कुं० सो० फिरोदिया

( 'स्पीकर' मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्ली )

तात्यासाहेबाचा व माझा प्रथम परिचय सन १९१६ साली ते अहमद-नगर जिल्हा कॉन्फरन्सचे अध्यक्ष म्हणून नगरास आले तेव्हां झाला. मी परि-षदेचा एक सेक्रेटरी होतों त्या वेळीं लोकमान्यहि सन्मान्य पाहुणे म्हणून नगरास आले होते व त्यांचीं त्याच वेळेस होमरूलवर दोन व्याख्याने झालीं. या व्याख्याना-बद्दल त्यांच्यावर पुढें खटला झाला, पण ते सुटले. या परिषदेच्या वेळीं विषय-नियामक कमेटीचें काम तात्यासाहेबांनीं ज्या रीतीनें चालविलें त्यापासून मी पुष्कळ शिकलों. टिळक - केळकरांच्या होमरूल चळवळीत तेव्हां मी होतों. केसरी ग्रुपच्या लोकांशीं माझा संबंध लोकमान्यास १९२० सालीं पुण्यास थैली अर्पण केली तेथपर्यंत चांगलाच होता या समारंभालाहि मी हजर होतो. पण १९२१ सालापासून राजकारणात फाटे फुटले म्हणून दुर्दैवाने माझा संबंध दुरावला.

तात्यासाहेब हे मोठे निःस्वार्थी देशभक्त, साहित्यसम्राट् या पदवीला योग्य व सर्वांशीं मिळते घेण्याचा त्यांचा स्वभावच असे; म्हणून मतभेद झाले तरी आम्हां परस्परांच्याबद्दलचा आदरभाव नाहींसा झाला नाहीं तात्यासाहेबांना वरिष्ठ विधि-मंडळाच्या निवडणुकींत मीं यथाशक्ति साहाय्य केलें आहे. तात्यासाहेबांच्या निधनानें महाराष्ट्राचा एक मोठा सन्मान्य पुढारी नाहींसा झाला. त्यांच्या निधनानें झालेली हानि लवकर भरून निघणें शक्य नाहीं मृत्यूच्या आधीं त्यांनीं ज्या कविता लिहिल्या व यमराजाला आव्हान दिले, त्यावरून तर ते खरे स्थितप्रज्ञ झाले होते यात शंका राहत नाही, अशी माझी भावना आहे.



## काकासाहेब कालेलकर

( बी. ए., सत्याग्रहाश्रम, वर्धा )

( १ ) तात्यासाहेब यांचा व माझा परिचय फारच थोडा म्हटला पाहिजे. कॉलेजचें शिक्षण संपताच १९०८ मध्यें केसरी कार्यालयांत विनावेतन काम करावें अशा हौसेनें ॲक्च्युअरी मराठे यांच्या मार्फत लोकमान्यांच्याकडे मीं विनती केली. त्यांनी मला तात्यासाहेबाच्याकडे पाठवून दिलें. अवैतनिक काम कर-णार आहे याची खात्री करून घेतल्यानंतर तात्यासाहेबानीं मला स्वतःचे लेख 'डिक्टेट' करायला सुरुवात केली. माझे अक्षर गचाळ असलें तरी सुवाच्य होतें आणि त्यांची सांगण्याची गति आणि माझी लिहिण्याची गति यांचा मेळ बसल्यानें ते मजकडून मुबलक लिहून घेत. पुढे त्यांनीं मला बारीकसारीक संपादकीय

टिप्पणें लिहावयास सांगितलें. माझें इंग्रजी चांगलें आहे असे म्हणून प्रोत्साहनहि दिलें. मीं जें लिहिलें तें सर्व त्यांनीं मराठ्यांत प्रसिद्ध केलें

(२) अशा रीतीनें गायकवाडवाड्यात कधीकधी लोकमान्यांची तात्यासाहेबांशीं होणारी चर्चा ऐकावयास मिळे. तात्यासाहेबांची बाजू नेहमी नेमस्त आणि सार्वजनिक कार्याच्या सिद्धांताला धरून असे आणि ती माझ्या जहाल वृत्तीला प्रथम जरी कशीशीच वाटे, तरी चर्चेच्या शेवटी त्याचेंच म्हणणें खरें आहे असें पटावें लागे. लोकमान्य देखील केव्हां केव्हा तात्यासाहेबांचा मुद्दा स्वीकारण्याइतकी-पड घेत, यामुळें तात्यासाहेबांच्या बुद्धिमत्तेविषयीं मला आदर वाटू लागला. अशा रीतीनें आलेला संबंध जर वाढला असता तर माझ्या आयुष्यास निराळेंच वळण लागलें असतें. पण माझ्या मातुश्रींच्या शेवटच्या आजारामुळे मला घरी जावें लागलें.

(३) तात्यासाहेबांचा याचवेळी किंवा यापूर्वी दुसरा संबंध आला होता, तो पुण्यांतील दारूच्या गुत्त्याच्या पिकेटिंगमुळे तेथेंहि तात्यासाहेबांच्या वृत्तींतील जबाबदारीचाच परिचय आम्हाला आला पिकेटिंग करणाऱ्या स्वयंसेवकाच्या दंडाला लाल फीत बांधलेली असे एकदा एक बराच लहान मुलगा पिकेटिंग करण्यासाठी तयार झाला. आम्ही कौतुकानें त्याच्या दंडाला तांबडी फीत बांधली. देखरेखीसाठी तेथें आलेल्या तात्यासाहेबांनीं ती काढावयास लावली! ते म्हणाले कीं, "ही सार्वजनिक चळवळ आहे इतक्या लहान मुलाला यांत घेता कामा नये. सर्व दृष्टीनें हें अनिष्ट आहे"

(४) केव्हां केव्हां पुण्याला गेलों म्हणजे तात्यासाहेबांना मी भेटून येई. त्यांचें वागणें अतिशय सौजन्याचें असल्यामुळे त्यांना भेटल्यानें प्रसन्नताच वाटे. त्यांच्यावर कोणी नाहक टीका केली म्हणजे त्यांना आतोनात दु:ख होत असे. केव्हा केव्हा ते चिडून जात. एकदा त्यांना भेटावयाला गेलों असता असेंच काहींसे बोलणें निघालें. तेव्हां ते म्हणाले कीं, "प्रतिपक्षाविषयीं वाईट असा एक शब्दहि बोलावयाचा नाहीं हें तुमच्या गांधींना साधतें, आम्हाला नाहीं तें जुळत! गांधींनीं मात्र कधीं चुकून देखील या व्रताचा भंग केला नाहीं तो एक योगच म्हटला पाहिजे. धन्य त्यांची!"

(५) राष्ट्रभाषेच्या बाबतींत त्यांना एकदोनदा भेटण्याचा मला प्रसंग आला होता. हिंदी साहित्य संमेलनाच्या पुण्याच्या अधिवेशनात त्यांनी हिंदींत भाषण केलें होतें. भाषारसिकच ते! त्यांनीं मला विचारलें कीं, "माझ्या भाषणाची हिंदी कशी काय होती?" त्यांच्या भाषासौष्ठवाची मुक्त कंठानें स्तुति करण्याची संधि मी काय म्हणून सोडीन? मला जे वाटलें तें सर्व त्यांना मीं सांगितलें

माझें प्रामाणिक मत आहे कीं, तात्यासाहेबांची मराठी भाषा विष्णु-

शास्त्र्यांच्या आणि लोकमान्यांच्या मराठी भाषेहून जास्ती कमावलेली आणि प्रभावशाली आहे. त्यांनीं इतक्या निरनिराळ्या विषयांवर इतकें कांहीं मुबलक लिहिलें आहे, आणि जें लिहिले आहे तें इतके कांहीं सुंदर व सुबक आहे कीं, मराठी भाषेचें अध्ययन करणाऱ्याला केळकर – साहित्य वाचल्यावांचून गत्यंतर नाहीं. आणि त्याने एकट्या केळकर – साहित्याचेच मार्मिकपणें अध्ययन केलें तर त्याच्या मराठीत कच्चेपणा उरणार नाही.

( ६ ) कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीत त्याना अत्यत मानाचें स्थान असूनहि तीव्र मतभेद होतांच वेगळे उभे राहण्यात त्यानी जी नैतिक हिंमत दाखविली तिच्याबद्दल मला नेहमीं आदरच वाटलेला आहे. महाराष्ट्राची सर्वांगीण सार्वजनिक सेवा, राजकीय तपःश्चर्या आणि मराठी भाषेची अनन्य उपासना यांत सबध आयुष्य एकनिष्ठेने व्यतीत करणाऱ्या या वदनीय राष्ट्रपुरुषाचें ऋण महाराष्ट्र कधींहि विसरणार नाहीं !



## सौ. इंदिराबाई देवधर

( क्रिकेटपटू प्रा. देवधरांच्या पत्नी, पुणें )

( १ ) १९२१ साल असावे. दारूगुत्यावर पिकेटिंग करण्याची चळवळ जोरात चालू होती. सूतकमिटीतर्फे स्त्रियाची एक जाहीर सभा शिवाजीमदिरांत भरून, ह्या चळवळीला पाठिंबा देण्यात आला. सभेंत सुमारे पंचवीस तीस स्त्रियांनी पिकेटिंगसाठी आपली नावे दिली त्यात मींहि आपले नाव दिले होते. ह्या सभेनतर लगेच त्याच ठिकाणी पुणे शहरवासियांची एक जाहीर सभा तात्यासाहेबांच्या अध्यक्षतेखाली होऊन त्यात पिकेटिंगच्या चळवळीचा कार्यक्रम ठरणार होता. म्हणून तत्पूर्वी स्त्रियाची जाहीर सभा घेऊन तीत पास झालेला ठराव, व चळवळीत भाग घेण्यास तयार असलेल्याची नांवे ह्या सभेला सादर करण्यात आली. निरनिराळ्या वक्त्याची आवेशपूर्ण भाषणे झाली स्त्रियाच्या उत्साहाचेंहि सर्व वक्त्यानी कौतुक केलें. अखेरीस आपल्या समारोपाच्या अध्यक्षीय भाषणांत तात्यासाहेब म्हणाले, "मला ह्या चळवळीसाठी, तुरुगात जाण्यास तयार असलेले ५०० वृद्ध लोक मिळाले, तरी ही चळवळ यशस्वी झाली असे मी म्हणेन त्यासाठीं सर्व कुटुंबाचा भार ज्याच्यावर आहे त्यानीं अगर विद्यार्जन सोडून विद्यार्थ्यांनीं वा कोणीहि तरुण स्त्रियांनीं तुरुगात जावें असे मला वाटत नाहीं साठ वर्षांच्या पुढील पेन्शनर मडळी पुण्यात पुष्कळ आहेत. त्यांनीं ह्या चळवळींत भाग घेण्यास प्रथम पुढें यावें." एकाद्या कुटुंबाच्या कल्याणाचा सर्वस्वी भार ज्याच्यावर असतो, तो मनुष्य कुटुंबांतील मंडळींना मार्गदर्शन करतांना ज्या तळमळीनें व जबाब-

दारीनें बोलेल, त्याच तळमळीने व जबाबदारीने तात्यासाहेबांनी त्या दिवशीं आपले भाषण केले. " आज स्पष्ट बोललो नाही तर मी माझ्या कर्तव्याला चुकलों असे होईल " असेच जणू त्यांना वाटत होते असे दिसले आणि राजकारणांत असें भावनाप्रधान होऊन चालणार नाही, हा तात्यासाहेबांच्या बोलण्याचा निष्कर्ष माझ्या मनावर ठसला

(२) १९२६ साली गिलीगन याच्या नेतृत्वाखाली इंग्लंडचा क्रिकेटसंघ हिंदुस्थानांत आला होता त्या वेळी ह्या संघाबरोबर झालेल्या सामन्यात प्रो देवधराचा खेळ चांगला झाला. त्याचे वर्णन इंग्लंडमधील वर्तमानपत्रांतून आले होतें. त्याचीं एक दोन कात्रणं पुढे काहीं दिवसांनी तात्यासाहेबांनी अभिनंदनपर पत्रासहित आपणहून प्रो देवधरांना पोस्टाने धाडली होती " माझ्या सहज वाचनात आलं. परदेशातील पत्रातूनहि तुमच्याबद्दल धन्योद्गार निघालेले पाहून आनंद वाटला मुद्दाम तुम्हाला वाचण्यासाठी म्हणून ही कात्रणे पाठविली आहेत." वगैरे मजकूर सोबतच्या पत्रात होता इतक्या कामाच्या व्यापातून लहान सहान गोष्टीसुद्धां हे न चुकता कशा करू शकतात व इतके अगत्य बाळगतात याचे मला आश्चर्य वाटले व त्यांच्याबद्दलचा आदर दुणावला

(३) १९२९ अगर ३० सालची गोष्ट आहे. भारतस्नेह – संवर्धक मंडळा-मार्फत लोकमान्य – टिळकपुण्यतिथि लिमये यांच्या वाड्यात साजरी करण्यांत आली. त्या वेळीं तात्यासाहेब केळकरांच्या अध्यक्षतेखाली माझें व्याख्यान झाले. माझ्या भाषणानंतर आणखीहि एकदोन स्त्रिया बोलल्या नंतर समारोप करतांना तात्यासाहेब विनोदानें म्हणाले, " आजच्या व्याख्यात्याच्या भाषणात व नंतर ज्या स्त्रिया बोलल्या त्यांच्या भाषणातहि, टिळक स्त्री-शिक्षणाला प्रतिकूल होते वगैरे कांहीं विधानें येतात काय म्हणून मी पाहत होतो पण तसे कोणीहि म्हटले नाहीं. उलट स्तुतीच झाली. तर मग ही जी टिळकांची निंदा कधीं कधी ऐकू येते, ती सर्व पुरुषांचीच कारवाई बर कां ! "

(४) पी. वाय. सी. हिंदु जिमखाना स्त्री-शाखेतर्फे 'नंदादीप' नावाचे एक हस्तलिखित षाण्मासिक काढण्यात येत असते तात्यासाहेब गणपति-उत्सवांत पानसुपारीसाठीं म्हणून स्त्री-शाखेच्या बॅडमिंटन हॉलमध्ये आले असतां, त्यांना षाण्मासिकाचा अंक दाखविण्यात आला व त्याबद्दलचा अभिप्राय कळविण्यास विनंती केली त्यांनी मोठ्या आनंदाने तो अंक घरी वाचण्यास नेऊन, आवर्जून व स्मरणपूर्वक असा उत्तेजनपर अभिप्राय पाठवून दिला. 'साहित्यसम्राट्' म्हणून ज्यांची कीर्ति त्यांनी आपला अंक वाचून त्यावर अभिप्राय दिला, याचे सर्व भगिनींना विशेष महत्त्व वाटले. थोराकडून मिळालेलें उत्तेजन हें खरोखर शक्ति-

वर्धक औषधाप्रमाणें असतें; परंतु सर्वांस सर्वांना हें औषध देणारे तात्यासाहेबांच्या-सारखे धन्वंतरी थोडेच !



## नीलकंठ शंकर नवरे

( बी. ए., बी. टी., प्रिन्सिपॉल ट्रेनिंग कॉलेज, पनवेल )

( १ ) मी त्या वेळीं इंग्रजी सहाव्या इयत्तेत होतों. १९१२ च्या मे महिन्यांत पुणें येथील वसंत-व्याख्यान-मालेमध्यें जुनागड कॉलेजचे संस्कृतचे प्रोफेसर आणि प्रसिद्ध वक्ते प्रा. महादेव मल्हार जोशी याचें प्रा. वि. गो. विजापूरकर यांच्या अध्यक्षतेखाली 'बाणभट्ट' या विषयावर सुंदर, मधुर आणि परिणामकारक व्याख्यान झालें. मी तें कधींहि विसरणें शक्य नाहीं. मालेचा एकनिष्ठ श्रोता या नात्याने माझ्या रोजनिशीत आणि हृदयात जीं काही व्याख्याने कोरलेलीं आहेत, त्यापैकी तें एक आहे. व्याख्यानोत्तर नरसोपत ( त्या काळी आम्ही त्याना तात्यासाहेब म्हणत नव्हतो आणि इतर वक्तेहि नरसोपतच म्हणत. ) उपवक्ते म्हणून म्हणाले की, "कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमधील आमचे संस्कृतचे प्रोफेसर आपटे यांनी आम्हांस बाणभट्टाची संस्कृत कादंबरी शिकविली. त्या वेळी ते म्हणत :- To go through Bana, is to go through a dense and dark forest full of thorns. मधूनमधून ते आम्हास कंदील लावण्यास सांगत पेनसिलीच्या खुणा हेच ते कंदील ! व्याख्याते प्रो. जोशी याना माझी अशी विनंती आहे की, त्यांनी कादंबरींतील लांब लांब समासांची छाटाछाट करून एक सुटसुटीत पुस्तक तयार करावें. म्हणजे माझ्या सारख्या संस्कृतप्रेमी गृहस्थास ते वाचण्यास सुकर होईल." यावर प्रोफेसर महाशयांनीं आपण अमुक अमुक करू असे कोणतेच आश्वासन दिले नाही. पण मी मात्र आपल्या सुप्त मनात एक खुणगाठ बांधीत होतो. ती कोणती ? तर कादंबरीच्या सुलभीकरणाचें काम इतरांनी कोणीं केलें नाही तर आपण पुढें कादंबरीचा अभ्यास करून ते करावयाचें ! ही माझी कुमारावस्थेंतील इच्छा प्रौढावस्थेत पूर्ण झाली. १९२८ सालीं मी प्रथम मराठींत कादंबरीकथा लिहिली. तीत कादंबरी कथानकातील गुंतागुंती टाळून आधुनिक कादंबरी लिहितात तशी ती पुनर्रचना करून लिहिली. प्रस्तावनेत केळकराकडून मिळालेल्या स्फूर्तीचा मी सानंद व कृतज्ञतेनें उल्लेख केला आहे तो त्यास मुद्दाम नेऊन दाखविला. तो पाहून त्यानीं समाधान व्यक्त केले. त्यानंतर १९३५ साली मीं याच धर्तीवर संस्कृत कादंबरीकथा लिहिली. केसरींतून निवृत्त झाल्यावर केळकरानीं माझ्याकडून संस्कृत कादंबरीकथा मुद्दाम मागवून घेऊन ती संपूर्ण वाचली.

मी संस्कृत नाटकाच्या कथा मराठींत लिहिलेल्या आहेत हे त्यांना माहीत होतें. त्यावर त्यांनीं अभिप्रायहि दिला होता. त्याची आठवण मी भेटीस गेलो असतां त्यांनीं दिली आणि अशा प्रकारच्या कथा आणखी लिहिल्या असल्यास 'सह्याद्री'-साठीं द्या असे त्यानी सुचविले; त्याप्रमाणे माझी 'रत्नावलि' ही नाट्यकथा सह्याद्रींत देण्याची व्यवस्था त्यानीं केली संस्कृत वाङ्मयाचे केळकरांचें प्रेम विशेषच होतें.

(२) संस्कृत वाङ्मयात कालिदासाची उपमा देण्याची चातुरी अनुपम आहे, याविषयी रसिकात मतभेद नाही. तात्यांचे लेख वाचीत असता त्याच्या आल्हाददायक व समर्पक उपमा पाहून 'उपमा नरसिंहस्य' असे उद्गार इतराच्या-प्रमाणें माझ्या तोंडून अनेक वेळा येत

उपमा कालिदासस्य । भारवेरर्थगौरवम् ॥
दडिनः पदलालित्य । माघे सन्ति त्रयो गुणाः ॥

याच धर्तीवर १९४४ साली गडकऱ्यांच्या २५ व्या स्मृतिदिनानिमित्त मीं खालीलप्रमाणें श्लोक रचला आणि एका जाहीर सभेंत तो मी म्हणून दाखविला

उपमा नरसिंहस्य । श्रीपादस्यार्थगौरवम् ॥
कृष्णस्य पदलालित्य । रामे सन्ति त्रयो गुणा. ॥

या श्लोकात केळकर, कोल्हटकर, खाडिलकर या गडकऱ्याच्या समकालीन वाङ्मयवीराच्या लेखनशैलीचें वर्णन मी केले आहे हा श्लोक तेव्हा अनेक वृत्तपत्रे व मासिके यांनी उद्धृत केला होता

त्यानतर तात्याच्या 'पुष्करणीत' मी गेलो असता वरील श्लोकासबधी बोलणे ओघाओघाने निघाले. आता तात्या काय बोलतात हे मी उत्सुकतेने पाहत होतो. तो ते स्मितपूर्वक 'हा' असे म्हणून कालिदासाच्या उपमेकडेच वळले 'Beauties from Kalidas' अथवा 'कालिदास-सूक्तिमजुषा' या श्री केशव अप्पा पाध्ये यानी लिहिलेल्या ग्रथाला आपण इग्रजींत प्रस्तावना लिहिल्याचे त्यांनीं सांगितले. तींत "यथोचित उपमा देण्यात कालिदासाचा हात धरणारा संस्कृत कवी दुसरा कोणी नाही, असे मी सोदाहरण दाखविले आहे

मध्येतपोधनाना किसलयमिव पाडुपत्राणाम् ।

'पिकलेल्या पानामध्ये एकादे कोवळे पान दिसावे तशी ऋषींच्यामध्ये शकुतला दिसते आहे' हे कालिदासाने केलेले शकुतलेच्या नाजुकपणाचे व मुग्धावस्थेचें वर्णन आपणाला फारच आवडतें," असे ते म्हणाले

(३) १९३७ साली केळकर आपला 'हास्यविनोदमीमासा' हा ग्रथ लिहीत होते. त्या प्रसगी माझी भेट झाली असतां ते म्हणाले, "तुम्हीं महाराष्ट्र साहित्य

पत्रिकेंत स्त्रियांच्या बऱ्याच म्हणी प्रसिद्ध केल्या आहेत हे मला माहीत आहे. त्यांतून कांहीं विनोद, म्हणी आढळल्या तर पाहाव्या म्हणून मी म सा पत्रिकेचे अंक साहित्य परिषदेच्या कचेरीतून आणविले आहेत. त्यातील कांहीं म्हणी माझ्या 'हास्यविनोदमीमांसा' ग्रथात घेतल्या आहेत. 'वाक्-प्रचार व म्हणी' या संबधी तात्यासाहेबानी एक निबध लिहिला आहे. याचा उल्लेख मी त्यांच्यापाशीं केला व म्हटलें, "आपण म्हणीची व्याख्या चकारयुक्त केली आहे 'चिमुकलें, चतुरपणाचे व चटकदार वचन.' तशीच मीहि केली आहे पण सकारयुक्त. 'सुबोध, सूचक, समजस व सुटसुटीत वचन.' माझ्यापाशी असलेल्या म्हणींचा एक हप्ता मी सह्याद्रीमध्यें द्यावा अशी इच्छा तात्यानी प्रदर्शित केली आणि तदनुसार मला नवीन वाटणाऱ्या व नुकत्याच ऐकलेल्या काहीं म्हणी मी त्यांच्याकडे पाठविल्या; त्या त्यानी सह्याद्रीत १९४३ मध्यें प्रसिद्ध केल्या आहेत

( ४ ) 'नवलपूरचा सस्थानिक' ही कादबरी तात्यासाहेबानी केसरीत प्रकरणशः प्रसिद्ध केली ती वाचीत असता मला तीत एकदोन प्रमाद आढळले तात्यांनीं रघुवशातील रघु राजाविषयी केलेला निर्देश चुकीचा आहे असे मी सोलापूराहून पत्रद्वारे त्याच्या नजरेस आणले त्याचें उलट डाकेने उत्तर आल त्यात ते म्हणतात, "तुम्ही जो निर्देश चुकीचा आहे असे म्हणता तो मी केलेला नसून कादबरीतील पात्राने केलेला आहे त्याचा दोष माझ्याकडे कसा येईल? पण हा विनोद झाला कोण वाचक किती सूक्ष्मतेने वाचतात हे मला कळून आले हा या कादबरीपासून मोठा लाभ झाला असे मी मानतो तुम्हास आणखी काही दोष आढळल्यास कळवावे ही कादबरी लिहिण्यात सस्थानी राजकारण रगविणें हेच माझे मुख्य उद्दिष्ट होय ! जावयापुढे माडलेल्या चादीच्या ताटाखाली केळीचे पान ठेवतात तसे इकडील सस्थानातून हरघडी घडणाऱ्या राजकारणाला मी कथानकाची जोड दिली आहे इतकेच" रसिकता आणि प्राजलपणा याचा कोण हा गोड संगम !



## भास्करराव जाधव

### ( एम्. ए., एलएल्. बी., कोल्हापूर )

( १ ) तात्यासाहेब व मी एकाच वर्षी मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झालो तरी त्यांचा माझा प्रत्यक्ष परिचय बरेच दिवस झाला नाहीं ते पुण्यास टिळकांच्या राजकारणांत रगत होते. मी कोल्हापुरास शाहू महाराजाच्या तालमीत वेदोक्ताच्या व ब्राह्मणेतर पक्षाच्या समाजकारणात वावरत होतो आमच्या दोघांच्या व्यवसायांत एकत्र येण्याचे प्रसग आले नसताहि त्यांच्या विषयींचा माझा आदर वाढतच होता टिळकांच्या जहाल राजकारणात जरी त्यांचा वरिष्ट दर्जा

होता तरी ते स्वभावतः उदारमतवादी असल्यामुळे त्या राजकारणात तात्यासाहेब हिरिरीने पडत नसत असा माझा समज असे. सुवर्णमध्य गाठण्याकडे त्यांचा नेहमी कल असे. ही माझी त्यांच्याविषयीं असलेली कल्पना सन १९१९ साली आम्हा उभयतांची लडन येथे गाठ पडली, तेव्हा प्रत्ययास आली. त्या-वेळीं आमचे बोलणे कोणत्या विषयावर झाले हें आता आठवत नाही परतु त्यांच्याविषयीं माझा फार अनुकूल ग्रह झाला टिळक कैलासवासी झाल्यानतर टिळक पक्षाचे धोरण हळूहळू उदारमतवादाकडे सरकू लागले, असा माझा समज होऊ लागला राजकारणापेक्षा साहित्यातील तात्यासाहेब केळकराची कामगिरी विशेष प्रशसनीय आहे साहित्य क्षेत्रातील प्रत्येक दालनातील त्यांची कृति कमी-अधिक मानाने यशस्वी झाली आहे. ते खरोखरच साहित्यसम्राट् होते

(२) त्याची आणखी एका प्रसगाने आठवण होते. डॉ मुजे यांचें मुबइ येथील ब्राह्मण समाजात व्याख्यान झाले. त्या प्रसगी तात्यासाहेब अध्यक्ष होते. डॉ मुजे याच्या आग्रहावरून त्या सभेस मी हजर राहिलों होतों विषय डॉक्टरसाहेबाचा आवडीचा ‘ब्राह्मणानीहि मांसाशन करण्याची आवश्य-कता’ हा होता व्याख्यात्यानी जोरदारपणे आपला विषय प्रतिपादिला त्या वेळीं तात्यासाहेबाचे अध्यक्षीय भाषण फारच वाखाणण्यासारखे झाले डॉ मुजे याच्याशी ते सहमत नव्हते; पण त्यानी त्यांच्या मतावर कडक टीका केली नाही प्राचीन काळीं सर्वच लोक मासाशन करीत हे नाकारता येण्यासारखे नव्हते तात्यासाहे-बानी आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणे सुवर्णमध्य गाठण्याचा प्रयत्न केला! भाडण करणे, दुसऱ्या पक्षाचा पाणउतारा करणे, हे त्यास पसत नसे एकदरींत ते फार थोर मनाचे, उदार स्वभावाचे व दुसऱ्याचें अत.करण न दुखविणारे सद्गृहस्थ होते असा आमचा अनुभव आहे.



## रा. ब. आठवले

(एम्. ए., प्राध्यापक, अहमदाबाद)

(१) एकदा उन्हाळ्याच्या दिवसात पुण्यातील टिळकतलावावर मी पोहण्याकरिता सकाळी दहानतर गेलो होतो. त्या ठिकाणी तात्यासाहेब आले व माझ्या शेजारीं तलावात पोहू लागले. बराच वेळ ते सफाईनें उताणे पोहत होते. त्या वेळी त्यांचें वय पासष्ट वर्षांचें तरी असावें. ‘पोहण्याने अग मोकळें होतें, म्हणून कधी कधी मी मुद्दाम पोहायला येथें येतो’ असे त्या वेळीं ते मजजवळ बोलले

( २ ) " 'सविकल्पसमाधि' ह्या, काव्यास्वाद घेणाऱ्या रसिकाच्या चित्तवृत्तीचें वर्णन करताना आपण वापरलेल्या शब्दाबद्दल, आपले मला कौतुक वाटतें." मीं एकदां तात्यासाहेबाना म्हटले "ह्या शब्द अत्यंत समर्पक व प्राचीन संस्कृत साहित्य शास्त्रातील परंपरेला धरूनच आहे हे आपलें अभिनंदनीय वैशिष्ट्य. आपण ह्या शब्द संस्कृत साहित्यशास्त्रातील एखाद्या ग्रंथांतून घेतला आहे की काय ?" मीं विचारले 'नाही' तात्यासाहेब म्हणाले, "मला ह्या शब्द अगदीं अचानक सुचला का ह्या शब्द तुम्हाला जुन्या संस्कृत साहित्यात कोठे आढळला आहे की काय ?" त्यानी मला विचारले 'हो', मीं म्हटलें "रसगंगाधरावरील नागेशभट्टाच्या टीकेत ह्या शब्द वापरलेला आहे" असे म्हणून मी त्याना त्या टीकेत सविकल्पसमाधि ह्या शब्द काढून दाखविला. आपण मराठी साहित्यशास्त्रात रूढ केलेल्या सविकल्पसमाधि ह्या शब्दाला अशा रीतीने प्राचीन संस्कृत साहित्यातून आधार मिळालेला पाहून तात्यासाहेबाना मनापासून आनंद झाला

( ३ ) अहमदाबादेत सुमारे नऊ वर्षांपूर्वी साहित्यसम्राट् तात्यासाहेब यांचा भव्य सत्कार महाराष्ट्र समाजातर्फे झाला त्या वेळीं त्याना चांदीच्या सिंहासनावर बसविण्याचा अपूर्व योग आला व साहित्यसम्राट् या त्यांच्या बिरुदाला साजेसा ह्या उचित प्रकार झाला ह्या सत्कारसमारंभांत त्यांना येथील अखिल महाराष्ट्रीयाकडून मानपत्र देण्यात आलें (ह्या प्रसंगाचें छायाचित्र केसरीच्या केळकर अंकात आले आहे.) ह्या प्रसंगी त्यानी केलेल्या भाषणांत ते म्हणाले, "माणसाने आपली जगात कीर्ति व्हावी अशा रीतीनें वागावे अशा अर्थाचे जें श्रीसमर्थांचे वचन आहे त्याचा माझ्या दृष्टीने मी असा अर्थ बसविला आहे :— एखादा गृहस्थ वारला असे कळताच, बोलावणें आले नसतांहि, आपण होऊन त्याच्या स्मशानयात्रेला बरेचसे लोक – त्याचे खास इष्टमित्र नसलेलेहि – जर जमा झाले तर खुशाल समजावें की, ह्या गृहस्थ कीर्ति मिळवून गेला. इतपत कीर्ति किंवा वाहवा मिळवून कुणी गेला तरी त्याचे इहलोकचे जीवन मी धन्य समजेन. माझ्या जीवनयात्रेला हीच कसोटी माझ्यामागे लोकानी लावावी !"

( ४ ) "आम्ही कॉंग्रेसशीं कधीच फटकून वागलो नाही – फटकून वागण्याचें आम्हाला कारण काय ? कॉंग्रेस ही आमचीच आहे असे आम्ही मानीत आलों आहों १९२९ पर्यंत आम्ही ऑ इं कॉंग्रेस कमिटीमध्यें होतोहि. पण आमचीं राजकीय मते गांधीपक्षाला मानवेनात, त्या मताबद्दल तो पक्ष आमचा द्वेष करू लागला व आमची इच्छा नसतानाहि गटबाजीच्या जोरावर आम्ही कॉंग्रेसच्या बाहेर ढकलले गेलों. अजूनहि मानाने व मतस्वातंत्र्य कायम ठेवून आम्हाला कॉंग्रेसमध्ये जाता आलें तर त्याकरिता माझी पूर्ण तयारी आहे." टिळक-पुण्यतिथीच्या प्रसंगीं माझें पुण्यास प्रकट व्याख्यान झालें; त्याच्या आदल्या

दिवशीं त्या समारंभाचे नियोजित अध्यक्ष म्हणून तात्यासाहेब याना भेटायला मी गेलों असता ते मला वरीलप्रमाणे म्हणाले होते.

( ५ ) “ शहरांतील गजबजीपासून दूर एकाद्या खेड्यात एक छोटेसें घर असावें, भोवताली एक टुमदार फुलबाग आणि फळबाग असावी. ( बागेत कलमी आंब्याचीं झाडे असणे मला फार आवडते. ) अशा ठिकाणी वर्षातून १।२ महिने तरी निवान्त राहावें; व काव्यशास्त्रविनोदात – मुख्यतः विद्यानदात व कुटुंबांतील नजीकच्या मडळीच्या प्रेमळ सहवासात आनदाने दिवस घालवावे – हे माझ्या वृद्धावस्थेतील जीवनाचें ध्येय आहे. त्या ध्येयाच्या दृष्टीने मी कोकणात अशा तऱ्हेचें एक ठिकाण तयार केले आहे व तेथें मी दरवर्षी जावयाचे ठरविलेहि. पण नियमितपणे दरवर्षी जाणें होत नाही त्या माझ्या आदर्शस्थलाची व जीवनाची थोडीशी चुणूक त्या माझ्या ‘पुष्करिणी’त तुम्हाला पाहायला मिळेल.”

एकदा पुण्यातील ‘पुष्करिणी’च्या बागेत संध्याकाळी तात्यासाहेबाशी बोलत बसलों असता त्यानी मला ‘ वृद्धाचे आदर्श जीवन ’ याविषयी वरील कल्पना सांगितली. “ धन्यो गृहस्थाश्रमः ” व “ यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनयगुणगणोपेतः। तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमस्त्याधिकम् ” ह्या सस्कृत सुभाषिताची मला या प्रसगी आठवण झाली, व तात्यासाहेबाच्या आदर्श जीवनाविषयी कौतुक वाटले



## रा. वि. ओतूरकर

### ( एम्. ए., प्राध्यापक सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें )

इ. स. १९३३ सालातील जुलै महिन्यातील एक प्रसग. तात्यासाहेब सदाशिव पेठेतील आपल्या घरात राहत होते. दुसऱ्या कायदेभगाच्या चळवळीतील सत्याग्रही सुटले होते. सामुदायिक कायदेभगाची चळवळ पुढे चालू ठेवावी की तहकूब करावी याबद्दल धोरण निश्चित करण्यासाठी पुण्यास कॉंग्रेस पुढाऱ्याची परिषद टिळकमदिरांत दोन दिवस भरली होती लो ना अणे सर्वाधिकारी या नात्याने अध्यक्ष असत लो. ना अणे नेहमींप्रमाणे तात्यासाहेबांकडेच उतरले होते पहिल्या दिवशीं तात्यासाहेब हजर नव्हते दुसऱ्या दिवशी सकाळीं तात्यासाहेबाच्या घरी पंजाबचे काही कॉंग्रेस पुढारी तात्यासाहेब व अणे या उभयतास भेटण्यास गेले. हे पुढारीहि बहुधा पहिल्या दिवशी हजर नसावेत. कारण त्यानी प्रारभीचे कुशल प्रश्न झाल्यावर पुढील प्रश्न केला. सभाषण इग्रजीत झाले.

प्रश्न .– काल काय धोरण ठरलें ?

लो. ना. अणे :– काल सध्याकाळपर्यंत सभा चालली. निर्णय ठरला नाही. आज पाहू आता, काय धोरण ठरेल ते.

तात्यासाहेब :– ( हसत ) You see, conclusions, like dishes ought to be fresh that they may be relished ! ( अहो, आजकाल खायच्या पदार्थाप्रमाणे पुढाऱ्याचे निर्णय देखील गरमागरम व ताजेताजे असावे लागतात म्हणजे त्यांचा स्वीकार होत असतो ! )

लो. ना अणे :– But you see, there must be appetite for it ! ( होय, खरे आहे, पण ते पचवण्याजोगी भूकहि आहे की नाही तेहि पाहावे लागतें ! हो कीं नाही ? )

सर्वजण हसले त्या बैठकीत सामुदायिक कायदेभग तहकूब करण्याचा निर्णय घेतला गेला फक्त महात्माजीनीं वैयक्तिक कायदेभगाचा प्रयोग करावा – ( ' कायदेभगाचे तत्र मला काय ते समजते ' इति महात्माजी ) असे ठरले कांही महिन्यानतर वैयक्तिक कायदेभगाचा प्रयोगहि तहकूब झाला.

प्रस्तुत लेखक त्या वेळी वृत्तपत्राचा प्रतिनिधि असल्याने पुढाऱ्याच्या परिषदेस वरील प्रसगी तात्यासाहेबाच्या घरी उपस्थित होता.



## रा. प. सबनीस

( एम्. ए., प्राध्यापक, पुणें )

जमखिंडीच्या माजी अधिपतीनी आपले वडील सर परशुरामभाऊ याचे स्मारक करण्याच्या निमित्ताने सस्थानातील विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणहि प्राथमिक व दुय्यम शिक्षणाप्रमाणे मोफत देण्याचे ठरविलें त्याचा पहिला बेत जमखिंडीला कॉलेज काढण्याचा होता पण विश्वविद्यालयाने अर्धवट कॉलेजाना मान्यता न देण्याचे धोरण अवलबिले होतें व पूर्ण कॉलेज करण्याइतका निधि जमला नव्हता. इकडे न्यू पूना कॉलेजवर शास्त्रशाखेचे वर्ग काढल्यामुळे व नवीन इमारत बांधल्यामुळे कर्जाचा जबर बोजा पडला होता. तेव्हां कॉलेजला मोठी देणगी दिली तर दोन्ही पक्षांची सोय होईल असा विचार निघाला न्यू पूना कॉलेज हे वैशिष्ट्यशून्य नांव ठेवतांना महाराष्ट्राला भूषणभूत अशा एकाद्या व्यक्तीच्या नांवाशी पुढे मागे महाविद्यालय निगडीत करावे असा उद्देश होता. परशुरामभाऊ या नावांत महाराष्ट्राच्या दृष्टीने जादू होती. तेव्हा या महाविद्यालयाचे चालक जमखिंडीकरांबरोबर वाटाघाटी करण्यास तयार झाले.

दोन्ही पक्षाचा तात्यासाहेबांच्यावर विश्वास असल्यामुळे त्यांच्यापुढें निरनिराळे मुद्दे ठेविले जात होते व त्यावर ते निर्णय देत होते. मध्यंतरी संस्थानाच्या बाजूनें असा युक्तिवाद पुढे आला कीं, जमखिंडी संस्थानचे ५० विद्यार्थी जर नसले तर संस्थानला बाहेरच्या विद्यार्थ्यांचीदेखील शिफारस करण्याचा हक्क असावा. तेव्हां तात्यासाहेब म्हणाले –

" तुमच्या बोलण्यावरून माझ्या लहानपणची एक गोष्ट आठवते. कोल्हापूरजवळच्या एका खेड्यांतून आम्ही बैलगाडीतून कोल्हापूरला यावयास निघालो होतों. अटी वगैरे आमच्या मामांना ठरविल्या होत्या वाटेत त्याची व गाडीवाल्याची काहीं बोलाचाली झाली तेव्हा रागारागाने ते खाली उतरले व म्हणाले, " मला गाडींत बसवून न्यावयाचे असा करार आहे. मी गाडीत बसणे शक्य नाही, इतका त्रास तू मला दिला आहेस मी आता चालत जाणार, मात्र गाडीत माझ्या वजनाचा धोंडा ठेविल्याशिवाय सोडणार नाहीं ! "

संस्थानचे जे प्रतिनिधि आले होते त्याना आपले म्हणणें मुकाट्याने सोडून द्यावें लागलें पुढे एका प्रसगीं ते हसत हसत म्हणाले, " तात्यासाहेबांच्या त्या धोंड्यानें आमच्या युक्तिवादाचा कपाळमोक्ष मात्र झाला ! "



## वि. प्र. मोहगांवकर

### ( एम्. ए., एलूएल्. बी., प्रिन्सिपॉल रा. आ. कॉलेज, वाशीम )

१९३२ सालची ही हकिकत आहे. मी त्या वेळी इंदूरच्या ख्रिश्चन कॉलेजमध्यें बी ए ला होतो. कॉलेजच्या मराठी वाङ्मय मंडळाचा मी त्या [illegible] अध्यक्ष होतों. तात्यासाहेब केळकर याना आम्ही उज्जयनी येथून कॉलेजच्या मराठी वाङ्मय मंडळाच्या वार्षिक समेलनासाठी पाचारण केलें होते उज्जयिनी येथे ते कविसंमेलनासाठीं आले होते आमच्या आमंत्रणाचा त्यानी मोठ्या तत्परतेने स्वीकार केला. ' तरुण महाराष्ट्र मंडळा'च्या या वार्षिक संमेलनाला शहरातील सर्व नामांकित लोक व साहित्यिक तर उपस्थित होतेच, पण विशेष नवलाची गोष्ट ही कीं, सारा ख्रिश्चन समाजहि बहुसंख्येनें उपस्थित होता प्रसगाचे औचित्य ओळखून तात्यासाहेबानीं अत्यंत सुंदर असें भाषण केलं ते भाषण सगळेचे सगळे येथे देणें शक्य नाही. पण चारदोन वाक्ये नमुन्यादाखल म्हणून येथें मुद्दाम सादर करतो.

" या कॉलेजला ख्रिश्चन कॉलेज म्हणतात. ख्रिस्ती मिशनऱ्यांनी मराठी भाषेवर अत्यंत उपकार केलेले आहेत. मराठी भाषेची भिक्षेची झोळी प्रथम या मिशनऱ्यांच्या औदार्याच्या खुंटीवरच अडकविण्यांत आली होती. आज

मराठीच्या द्वारीं हत्ती झुलत असले तरी तिच्या विपन्नावस्थेंत ज्यांनीं तिला जवळ केले त्यांचे व त्यांच्या उपकारांचे स्मरण करणें औचित्याला धरून आहे." तात्यासाहेबांचें भाषण झाल्यानंतर प्रिन्सिपाल स्कॉट यांनीं त्याचे आभार मानले व 'ही खरी गुणग्राहकता व औदार्यबुद्धि' या शब्दांत त्यांचा गौरव केला. परकीयाकडूनसुद्धां प्रशंसोद्गार काढविण्याचें सामर्थ्य व कुशलता त्यांच्या ठिकाणीं होती ही गोष्ट या प्रसंगानें स्पष्ट झाली.



## वासुदेव बळवंत गोगटे

### ( एलूएल्. बी., वकील, पुणें )

( १ ) माझे वडील कै. बळवंत रामकृष्ण गोगटे, बी. ए, हे मिरज हाय-स्कूलचे हेडमास्तर होते व तात्यासाहेब हे त्यांचे विद्यार्थी. यामुळें वडिलांचा व तात्यासाहेबांचा लोभ चांगला. इ स १९२९ सालीं मी जेव्हां पुण्यास कॉलेजच्या शिक्षणासाठीं फर्ग्युसन कॉलेजात दाखल झालों, त्या वेळीं वडिलांनीं मला मुद्दाम तात्यासाहेबांच्याकडे नेऊन माझ्यावर लक्ष ठेवण्यास तात्यासाहेबांना सांगितलें होतें व मलाहि वरचेवर तात्यासाहेबांची भेट घेण्यास बजावलें होतें त्याप्रमाणें मी अधूनमधून तात्यासाहेबांकडे जात असे, व त्यांच्याकडून वाचावयास पुस्तकें आणीत असे १९३० च्या ऑक्टोबर महिन्यांत माझे वडील कैलासवासी झाले. १९३० च्या जून महिन्यात पुण्यास ज्युनियर बी. ए. च्या वर्गात मी अभ्यास करीत होतो त्याच वेळीं सोलापूरचा कुप्रसिद्ध मार्शल लॉ पुकारला गेला होता. मल्लाप्पा धनशेटी, सारडा, शिंदे आदि सोलापूरच्या चार पुढाऱ्यांना फांशी देण्यात आले होते त्या वेळीं प्रथम गृहमंत्री असलेले ना. अर्नेस्ट हॉटसन हे मुंबई प्रांताचे तात्पुरते गव्हर्नर नेमण्यात आलेले होते. सोलापूरच्या या जुलूम जबरदस्तीच्या बुडाशी हॉटसन साहेबाचा हात प्रामुख्यानें होता व ते या जुलुमाला जबाबदार होते अशी माझी समजूत होती व म्हणून आपल्या लोकांवर झालेल्या जुलमाचा निषेध अत्यंत तीव्र स्वरुपांत व्यक्त करावा या हेतूनें ना. हॉट सन याजवर गोळी झाडण्याचे मी मनाशी ठरविले होतें त्यासाठी दोन रिव्हॉल्व्हर्स मी [illegible] होती व हॉटसनसाहेब कोठ भेटतील या प्रसंगाच्या शोधात मी होतो २० जुलै १९३१ रोजी मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे उद्घाटन होते व त्या दिवशी त्या ठिकाणी हॉटसन गव्हर्नर उद्घाटनासाठी येणार अशी माहिती मला मिळाली होती तेव्हा त्या वेळी तेथेच त्यास गोळी घालावी असे मी ठरविले होतें. म्हणून असेंब्लींत जाण्यासाठी प्रवेशपत्रिका मागण्याकरिता मी तात्यांच्याकडे गेलों व त्यांच्याजवळ प्रवेशपत्रिका मागितली. कशासाठी म्हणून त्यांनीं विचारलें.

त्या वेळीं फर्ग्युसन कॉलेजमध्ये लुटपुटीचे पार्लमेंट विद्यार्थी चालवीत असत. त्या पार्लमेंटात मी एक मंत्री आहें, तेव्हा प्रत्यक्ष असेब्लीचें काम कसें चालते हे पाहावें व त्यावरून आपल्या पार्लमेंटमध्यें आपणास चांगले काम करता यावें, यासाठी मला असेंब्लीची प्रवेश-पत्रिका पाहिजे अशी थाप मी तात्याना दिली ! तेव्हा त्यांनी मला केसरी कार्यालयासाठीं म्हणून एक चिठी दिली व प्रवेश-पत्रिका केसरींतून घेण्यास सांगितले पण केसरीचा बातमीदार वेगळा नेमला गेला असल्यामुळे, मला प्रवेशपत्रिका मिळाली नाहीं. तेव्हा मी निराश होऊन परत आलो त्यानतर २२ जुलै १९३१ या दिवशी दुपारीं १–१॥ वाजता फर्ग्युसन कॉलेजमध्ये हॉटसनसाहेब आले व त्याच्यावर गोळ्या झाडण्याची मला संधि मिळाली; पण २ गोळ्या झाडूनहि हॉटसनसाहेब वाचले ! मला ८ वर्षे सक्त मजुरीची शिक्षा झाली हा सर्व प्रकार महाराष्ट्राला ठाऊकच आहे. या खटल्याच्या चौकशीत तात्याशी माझा सबध आला तो असा:— "स्वदेशी कापड वापरण्याचा प्रचार घरोघर हिंडून करावा" यासबधींचे एक पत्रक माझ्या खोलीच्या झडतींत पोलिसाना सापडले होते हे पत्रक तात्यानीं लिहिले होते व त्यावर पहिली सही तात्यांची होती व नतर दे. भ. न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ यांची सही होती व नंतर इतरहि पुण्याच्या पुढाऱ्यांच्या सह्या होत्या. हे पत्रक घेऊन सी. आय्. डी. खात्याचे अधिकारी खा. ब. कोठावाला हे तात्याच्याकडे गेले होते. त्या वेळी 'हे पत्रक मी वासुदेवास दिले होते. तो माझे शिक्षक श्री. बळवंतराव गोगटे याचा मुलगा असल्यामुळे माझ्याकडे नेहमी येत जात असे व आपणास स्वदेशीचा प्रचार करावयाचा आहे असे तो म्हणाला, म्हणून मी हे पत्रक त्यास दिले' असा स्पष्ट खुलासा तात्यानी पोलिसांजवळ केला

(२) सन १९३७ साली मी तुरुगातून सुटून आल्यानतर तुरुगात असताना 'विनायक' नावाची एक राजकीय कादबरी लिहिली होती. ती माझे मित्र वा. वि. साठे यानी माझ्या सुटकेनतर प्रसिद्ध केली. तिची प्रत तात्याना भेट देण्यासाठी म्हणून घेऊन मी त्याच्या भेटीला गेलो. प्रथम त्यानी २० जुलै १९३१ च्या भेटीचा विनोदाने उल्लेख केला व 'वा रे! थापाड्या!' असे ते हसत हसत मला म्हणाले. त्या भेटीच्या वेळी तात्यांनी अगदी सद्गदित अतःकरणाने माझे स्वागत केले व माझ्या कादबरीचेहि त्यांनी पुढे कौतुक केले. केसरीत त्या कादबरीवर चागला अभिप्रायहि दिला.

(३) तात्याची जन्मभर आठवण राहावी अशी एक ठेव तात्यानी माझ्याजवळ देऊन ठेवली आहे व ती अगदी मृत्यूपूर्वी तेराच दिवस. पुण्यातील 'श्रीशिवाजी मंदिर सस्था' या संस्थेचे तात्या हे विश्वस्त होते. या ट्रस्टचे मूळचे ट्रस्टी तीन (१) लो. बाळ गंगाधर टिळक, (२) प्रो. हरी गोविंद लिमये व (३) नरसिंह चिंतामण केळकर. यांतील पहिले दोन विश्वस्त दिवगत झाल्यानंतर तात्यासाहेब

हे एकटेच विश्वस्त राहिले. त्यानंतर त्यांनीं पुढें आपल्या जोडीला श्री. ल. ब. भोपटकर याना विश्वस्त म्हणून घेतले. या ट्रस्टचा मुख्य हेतु श्रीशिवाजी महाराजांचा वार्षिक उत्सव थाटाने व्हावा व जाहिर सभा या ठिकाणीं व्हाव्यात असा होता व त्यासाठीच येवढी विस्तीर्ण जागा घेण्यात आलेली होती. या ट्रस्टचे काम तात्यानी फारच उत्तम रीतीनं चालविलें.

मृत्यूपूर्वीं एके दिवशीं मुद्दाम मला त्यानी आपल्या घरी बोलाविलें व मी आता या सस्थेंतून (शिवाजीमदिर) निवृत्त होऊ इच्छितो व पुढची जबाबदारी तूं आपल्यावर घे असे त्यानीं मला सागितलें लो. टिळकांचे नातू श्री. जयंत श्रीधर टिळक यांना पण माझ्याबरोबरच या सस्थेचे विश्वस्त म्हणून तात्यांनीं नेमले. लो टिळक या सस्थेचे विश्वस्त होतेच; त्यांच्या जागी त्यांचे कर्तृत्ववान नातू आले ही एक अत्यत उचित अशीच घटना होय आग्रह करून त्या दिवशी मला त्यानी स्टॅंप आणावयास लावले व त्यावर ट्रस्टडीड लिहून त्यानी तीन विश्वस्तांची नेम-णूक केली. ते तीन ट्रस्टी म्हणजे, (१) श्री ल. ब. भोपटकर, (२) वासुदेव बळवत गोगटे व (३) जयत श्रीधर टिळक आम्हाला अशी कल्पनाहि नव्हती की, या ट्रस्टडीडवर सही केल्यापासून १४ व्या दिवशी पहाटे तात्या एकाएकी आम्हाला सोडून जातील!



## कै. गो. गो. मुजुमदार
### (राजकवि, साधुदास, सांगली)

(१) सन १९२९ च्या सप्टेंबरमधील गोष्ट. 'मराठीची सजावट' हा माझा ग्रथ दोन भागात छापून निघत होता, आणि त्यांतील दुसऱ्या भागाला प्रस्तावना लिहिण्याचे तात्यासाहेबानी मला अभिवचन दिले होते. कार्यबाहुल्या-मुळे तात्यासाहेबाना पुणें मुक्कामी फुरसत झाली नाही आणि ते सप्टेंबरच्या प्रारभीं मध्यवर्ती विधिमंडळाच्या बैठकीसाठीं सिमल्यास निघून गेले. मी त्याना एक निकडीचे पत्र लिहून आठवण दिली त्याबरोबर त्यांनी सिमल्याहूनच तावडतोब प्रस्तावना लिहून पाठविली ही प्रस्तावना त्याच्या लौकिकास साजेशी मार्मिक तर आहेच, पण पुस्तकाचे छापील फॉर्म आपल्याबरोबर नसताना केवळ वाचलेल्या आठवणीवरून त्यानी ती कशी लिहिलेली असावी याचा मला फार विस्मय वाटला इतका शब्दाचा धड, आठवणीचा खबीर साहित्यिक मला दुसरा आढळला नाही

(२) तात्यासाहेब एकदा सागलीस आले होते आणि येथील सुप्रसिद्ध वकील रा. गणपतरावजी गोडबोले याच्या घरी उतरले होते. कांहीं तरी विशेष निमित्तानें त्यांचा सत्कार चालला होता आणि अनेक सस्था व व्यक्ति त्यांना हार

समर्पण करीत होत्या. मीहि सदर समारंभास उपस्थित होतों, पण बरोबर हार नेला नसल्यामुळें माझी फार कुचबणा झाली. तेव्हां मीं तेथल्या तेथेंच एक श्लोक करून 'हा माझा हार' असे म्हणून तो श्लोक त्यांना अर्पण केला. कौतुकप्रवृत्तिक तात्यासाहेब लगेच मार्मिकपणें म्हणाले, 'हार गडबडीनें गुफला आहे, पण फार सुगंधी आहे!'

(३) तात्यासाहेबांना मी गुरुजी असें संबोधित असे. एकदा या शब्दाला हरकत घेऊन ते मला म्हणाले, 'मीं तुम्हाला साहित्यांतील कसलेच धडे दिले नसतांना तुम्ही मला गुरुजी कां म्हणता?' मी उत्तर दिलें, 'तुम्हीं मला धडे दिले नाहीत; पण मी ते तुमच्या लेखनशैलीवरून घेतले आहेत. महाभारतांतील एकलव्यानें द्रोणाचार्यांना कळू न देता त्याची विद्या उचलल्याचा जुना दाखला आहेच. मात्र माझी निष्ठा एकलव्याइतकी जबर नसेल म्हणून आपलें शिष्यत्व मिरविण्या-इतपत पात्रता माझ्या अंगी आली नाहीं, इतकीच गोष्ट!' यावर तात्यासाहेब कांहीं बोलले नाहींत. कारण तोंडावर स्तुति करणें त्यांना आवडत नसे; पण त्यांच्या स्मितावरून माझा कोटिक्रम त्यांना पटला असावा यांत शंका नाही.



## सर भवानीशंकर नियोगी

(सी. आय. ई., माजी हायकोर्ट जज्ज, नागपूर)

(१) दे. भ. तात्यासाहेब यांचा माझ्याशी लोकमान्य टिळकांचे अनुयायी या नात्याने स्नेहाचा परिचय दीर्घकालाचा होता तात्यासाहेबानींच १९०८ सालच्या एप्रिल महिन्यांत गायकवाडवाड्यामध्यें मी नागपुरातील राष्ट्रीय मंडळाचा एक होतकरू तरुण आहे म्हणून माझी लोकमान्यांशीं ओळख करून दिली तात्यासाहेबांच्या भेटीचा अखेरचा योग ते नागपुरास १९४५ च्या आक्टोबर महिन्यात राजाराम लायब्ररीच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त आले होते तात्यासाहेब हे कट्टर बुद्धिवादी ही गोष्ट त्यांच्या साहित्यसेवेइतकीच प्रसिद्ध आहे मला या बाबतीत अनुभव आला तो मी येथे नमूद करतों.

१९१५-१६ साली मी कै. अच्युतराव कोल्हटकरानीं सुरू केलेल्या 'मेसेज' या इंग्रजी दैनिकाचा मुख्य संपादक होतों. तेव्हा तात्यासाहेब यानीं आगाऊच मला अशी सूचना केली कीं, सार्वजनिक कार्यें केवळ तारुण्यातील उत्साह व अंधश्रद्धा यावर यशस्वी होत नाहीत. त्याप्रमाणे अखेरीस खास लोकमान्यां-च्याच सल्ल्याप्रमाणें मला 'मेसेज'च्या भानगडींतून अंग काढून घ्यावे लागलें! पुढ १९२१ साली महात्मा गांधी यानीं कॉंग्रेसची सूत्रें हातांत घेऊन 'एक वर्षात स्वराज्य' अशी घोषणा करून असहकाराची चळवळ

सुरू केली. तदनुरोधानें मीहि आपला वकिलीचा व्यवसाय स्थगित केला होता व धारवाडला शिवलिंगाप्पाने गोळीबार केला त्या प्रकरणाची चौकशी करण्याकरितां ठरविलेल्या मडळामध्ये माझी नेमणूक झाली होती धारवाडला जात असतांना मुद्दाम मी पुण्यात उतरून तात्यासाहेबाना भेटलो. तेव्हां ते म्हणाले, " काय शकरराव ! तुम्ही मेसेजच्या चक्रव्यूहातून निघून महात्म्याच्या होमकुंडांत पडलात याबद्दल मी तुमचे अभिनदन करू काय ? " पुढे संभाषणामध्यें त्यांनी सत्य व अहिंसा या शब्दाने कदाचित् कांही भाविक लोक गाधींचे अनुयायी बनतील; परतु कॉग्रेसचे भजनीमडळींत रूपातर केल्याने स्वराज्याच्या घड्याळाचा काटा मागे जाईल अशी त्यानीं भीति प्रदर्शित केली. मी विनोदाने म्हणालो कीं, ' ज्याअर्थी लोकमान्याचे मत सर्व पक्षांनी कॉग्रेसमध्ये राहूनच कार्य करावें असें होतें, त्या अर्थी कॉंग्रेस हे भजनीमडळ झालें तर आपल्यालाहि टाळ वाजविल्याशिवाय गत्यतर नाही ! ' ते म्हणाले, ' असेंच केवळ नाही, निराळा सुसघटित राजकीय पक्ष काढूनसुद्धा आपल्याला कॉंग्रेसमध्यें राहता येईल व आपले म्हणणे जोराने माडता येईल. टिळक तत्त्वज्ञान अमर आहे.' त्याप्रमाणे त्यांनीं प्रयत्न केला. १९४५ च्या आक्टोबरमध्ये ते नागपुरास आले होते. तेव्हा कॉग्रेसच्या धोरणासबधीं त्याचे मत बदलले होते असे मला दिसलें नाही. परतु सप्टेंबर १९४६ च्या सह्याद्रीच्या अकातील त्यांच्या लेखांत त्यांनी " कॉग्रेस पुढाऱ्यांच्या शहाणपणाचा किंवा गाधींच्या अनुयायाच्या भोळसट वृत्तीचा विजय असो; परतु राजकीय चळवळ करणारा एक नामाकित पक्ष म्हणून गांधी व गाधीप्रणीत कॉग्रेस यानीं बाहेरच्या जगावर छाप पाडली, याकरतां तरी त्यांचें अभिनंदन अवश्य केले पाहिजे, " असें प्राजलपणे कबूल केले. यावरून त्यांच्या कॉग्रेसशी असणाऱ्या विरोधाचें मूळ विकारवशतेंत, हटवादीपणांत, एककल्लीपणांत, असूयेत अगर दुष्टबुद्धींत बिलकूल नसून तत्त्वात होतें हे स्पष्ट दिसते.

( २ ) राजकीय विषयाप्रमाणे साधुसत म्हणून गाजलेल्या व्यक्तीच्या बाबतींत सुद्धा ते बुद्धिवादाचीच भूमिका घेत असत. नागपुरात काही वर्षांपूर्वी गुलाबराव महाराज या नावाचे सत होऊन गेले. त्यांच्याबद्दल असा सार्वजनिक ग्रह झाला होता कीं, ते आंधळे असून सुद्धां कोणत्याहि ग्रथातील मजकूर, तो ग्रंथ केवळ उशाशीं ठेवून निजल्यावर, त्याच्या बुद्धीत तो उतरत असे ! १९४५ सालीं तात्यासाहेबाना मला पत्रद्वारे त्यांच्याबद्दल माहिती विचारली. मीं त्यांना लिहिलें कीं, जर मला कोर्टापुढे साक्षीदार या नात्यानें हा प्रश्न कोणी केला, तर खुद्द मला वरील चमत्काराबद्दल कांहीं माहीत नाही असेंच सांगावें लागेल. ते नागपुरास १९४५ सालीं आले होते; तेव्हा यासंबंधानें आम्ही बोलत असताना ते म्हणाले, ' तुम्हीं जें उत्तर दिलें त्यालाच मी बुद्धिवाद म्हणतों. एरवी अध भावनांचा गोंधळ हा असाच चालावयाचा ! '

❋

# बाबू रामचंद्र शिंदे ऊर्फ बाबू टांगेवाला

( क्रिकेट खेळाचे शोकीन, पुणें )

( १ ) महाराष्ट्रात जे थोर लोक होऊन गेले त्यात तात्यासाहेब एक महापुरुष होऊन गेले. ते वारले तेव्हां मीं सर्व दिवस टागा सोडून दिला. तो सबध दिवस मी रडत होतों. शेवटी त्याच्या प्रेतयात्रेत सामील झालों. असा पुरुष पुन्हां होणें नाही. राजे, महाराजे, विद्वान् त्यांचे गुण गातात मी तर बोलून चालून अडाणी टांगेवाला. पण त्या सर्वापेक्षा तात्याचे गुण मीच विशेष चाखतों तात्या गेल्याने महाराष्ट्राचें नुकसान झाले, अखिल भारताचे नुकसान झाले. त्याच्यासारखा मुत्सद्दी व राजकारणी अगदीच क्वचित्. तसेंच त्याचे खाजगी वर्तन अती गोड कोणीहि त्यांच्याकडे गेला तरी त्याला योग्य सल्ला देऊन त्यास हसत ते वाटेस लावीत, असा त्याचा मला बराचवेळा अनुभव आलेला आहे माझा टागा त्याच्याकडे नेहमी जात असे. टाग्यात बसल्यावर त्याच्याबरोबर जे कोणी असत त्यास ते सागत की, " हा आपला बाबू आहे, माणसात एखादातरी उत्कट गुण असावा, तसा याच्यांत क्रिकेटबद्दलचा आहे. " हे ऐकून मला आनन्दाचे भरते येई माझ्या टाग्यांत बरेच मोठे लोक बसले असतील; पण असे कोणीच बोलले नाही, म्हणून गहिंवर येतो.

( २ ) एकदा टाग्यांतून जात असता ते म्हणाले, " बाबू, तू माझ्या घरी येऊन जा. " त्याप्रमाणें मी गेलों त्यानी माझी मुलाखत घेतली व ती सह्याद्री-मध्यें माझ्या फोटोसकट छापली. अक बाहेर पडला तेव्हा लोक मला म्हणू लागले, " अरे बाबू, तू आता फार मोठा झालास! साहित्यसम्राट् तुला लेखक मिळाले! " मी त्यांस म्हणे, " खरेंच मी भाग्यवान्, तात्यानी मला सबध देशांत प्रसिद्ध केले. त्याच्यामुळे मी जगजाहीर झालो! "

( ३ ) एकदा टाग्यातून जात असता मी त्याना म्हणालो, " तात्या, तुमच्यावर लोक फार टीका करतात! " ते शांतपणें म्हणाले, " अरे, त्याच्याकडे लक्ष द्यावयाचें नसतें. आपलें काम तुझा घोडा जसा डोळे मिटून चालला आहे तसें करावयाचें असतें. तुलाहि नाही का तुझे टागेवाले नावे ठेवीत? मग तू कधीं क्रिकेट खेळणाराला हार घालण्याचे किंवा कप देण्याचें कमी केले आहेस का? "

( ४ ) एकदा असेंच टाग्यातून चाललों असता, बोलण्याच्या भरात, मी आपली मान वळवून त्याच्याशी सारखा बोलत होतों तेव्हां ते म्हणाले, ' अरे, पुढे घोड्याकडे पाहा; तो वाट सोडील. ' तेव्हा मी म्हणालो, " तो माझा घोडा आहे. माझ्यापेक्षांहि त्याला तुमचें बोलणे आवडते. म्हणून तो आपले कान तुमच्याकडे टवकारून पावला पावलाने चालला आहे. काळजी नको " हे ऐकून ते खूपच हसले.

(५) एकदां टांगा चालू असता मी त्यास विचारलें, 'तात्या, लोक मला म्हणतात, बाबू, तात्यांच्या संगतीने तू आतां फार मोठा झालास!' त्यावर ते म्हणाले, "मग यांत काय बिघडलें! तें खरेच आहे आताच पाहा; तूंहि टांग्यात, मींहि टांग्यांत जवळजवळ आहोंतच! यांत फरक कोणचा? दोघेहि सारखेच!"

(६) प्रो. देवधर याची मॅच होती. तेव्हां तात्या मला म्हणाले, "काय बाबू! कप बक्षीस ठेवावयाचे असतील; तसेच फुलाचे हार आणणार असशील?" मी म्हणालों, "ही मॅच मोठी. माझे बक्षीस लहान, कसे चालेल?" ते म्हणाले, "अरे, फूल नाही फुलाची पाकळी तू दिलीस तरी त्या पाकळीला फुलाचाच सुगध आहे. कारण तू गरीब इतके करतोस हे काय थोडे आहे? माझ्या आयुष्यात तुझ्यासारखा क्रिकेटचा इतका शोकिन मी गड्या पाहिला नाही"

(७) त्याच्या बगल्यावरून मी टांगा घेऊन जेव्हा जेव्हा जातो, तेव्हा तेव्हा मला असा भास होतो की, तात्या अजन आंत आहेत मला हाक मारतील; फार काय पण, घोडाहि तेथे थोडा थबकतो, यामुळे ते गेल्यासारखे मला वाटत नाहीं।



## धनंजय रामचंद्र गाडगीळ

(प्रिन्सिपॉल, अर्थशास्त्रज्ञ, पुणें)

(१) तात्यासाहेब याची माहिती होण्याचा अगर व्याख्याने ऐकण्याचा योग माझ्या लहानपणी आला नाही त्याचे पहिले जाहीर व्याख्यान मीं सुरतेस ऐकले १९२८ साली बार्डोलीच्या लढ्याच्या वेळी बहुतेक विख्यात पुढाऱ्यांनी बार्डो-लीस व सुरतेस भेटी दिल्या; व त्यांपैकी अनेकाची व्याख्यानेहि झाली. तात्या-साहेबाचे व्याख्यान इग्रजीत दीड तास झाले, ते मला विशेष आवडल्याने अजूनहि स्पष्ट आठवते कारण त्यात वृथा शब्दावडबर न माजविता तात्त्विक भूमिकेची स्पष्ट माडणी व व्यावहारिक धोरण पत्करण्याची भूमिका याचा सुदर मिलाफ केला होता भाषाहि उत्तम होती.

(२) तात्यासाहेब याचा व माझा खरा परिचय पुण्यास मी १९३० सालीं आल्यानतरच झाला. महाराष्ट्रात स्वतत्र विद्यापीठ स्थापन करण्याप्रीत्यर्थ खटपट करण्याकरिता एक समिति पुण्यात स्थापिली गेली व तिचा मी चिटणीस झालो. या कामी तात्यासाहेबाचा सल्ला व मदत घेण्याचा प्रसंग वारवार येई. केव्हाहि त्यांच्याकडे गेलें असता त्यांजकडून साहाय्य तत्परतेने व आस्थेवाईकपणें होई. आपल्या हातीं असलेल्या प्रत्येक कार्याची त्यास कशी आठवण असे याबद्दलचा अनुभव विद्यापीठसमितीच्या अनुषंगानेंच मला आला. १९३२ सालीं त्यांनी राजेंद्र

टेबल कॉन्फरन्सचे निमंत्रण स्वीकारले, तेव्हा कॉन्फरन्सला जाण्यापूर्वी गव्हर्नरांची भेट झाली असता विद्यापीठाविषयी बोलणे निघून त्याबद्दलचा गव्हर्नरांचा ग्रह तात्यासाहेबाना अनुकूल वाटला ही संधि योग्य आहे असे लक्षात येताच बोटावरूनच त्यांनी मला पत्र लिहिले व पुढील मार्गपद्धति व तिचा उठाव याबद्दल त्यानी सूचना दिल्या. त्यास अनुसरूनच काम होऊन १९३३ मध्य शिष्टमडळ व त्यांतून उद्भवलेली परिषद ही घडून आली या परिषदेत शेवटीं महाराष्ट्र विद्यापीठाच्या आक्षेपकास तात्यासाहेबांनी दिलेले मुद्देसूद व बाणेदार उत्तर हजर असलेल्यांस सस्मरणीय असे झाले.

( ३ ) तात्यासाहेबाच्या कार्यपद्धतीचा आणखी एक विशेष माझ्या प्रत्ययास आला तात्यासाहेबानी आपल्या आई-वडिलाच्या स्मरणार्थ एक पारितोषिक-योजना जाहीर करून हे पारितोषिक महाराष्ट्र विद्यापीठ अस्तित्वात आल्याबरोबर त्याच्या-मार्फत दिले जावे अशी तरतूद केली विद्यापीठ अस्तित्वात येईपावेतों योजना चालविण्याकरितां त्यानी तीन विश्वस्त नेमले. एक स्वतः अगर केळकर घराण्याचा प्रतिनिधि, दुसरे शि. प्र. मडळीचे चिटणीस अधि-कारतः व तिसरे मला नेमलें. वास्तविक पारितोषिक मराठी प्रथास द्यावयाचे व याबाबत माझा अधिकार अत्यल्प. माझ्यापेक्षा अधिकाराने अधिक व तात्यासाहेबांशी कितीतरी जास्त परिचित अशा पुण्यात अनेक व्यक्ति असता माझी निवड का केली याचे मला प्रथम आश्चर्य वाटले पण नतर ही नेमणूकहि अधिकारतः असावी अस माझ्या लक्षांत आले. भावी विद्यापीठाचा प्रतिनिधि म्हणून तात्यासाहेबानी विद्यापीठ-समितीच्या चिटणिसाची नेमणूक केली समि-तीची घटना पुरती बाधलेली नसल्यामुळे नेमणूक अधिकारतः करता आली नाहीं, यामुळें व्यक्तिशः केली असावी पण यात यथोचित पद्धतीचा स्वीकार करण्याचा त्याचा कटाक्ष दिसून आला



## कै. डॉ. बा. शि. मुंजे

**(संस्थापक, भोसले लष्करी शाळा, नाशिक ).**

( १ ) १९२८ किंवा १९२९ साल असेल मी त्या वेळेस सेंट्रल असेंब्लीचा मेंबर होतों. असेंब्लीमध्यें मी बहुधा फौजी विषयावरच बोलत असे एके दिवशीं फील्ड मार्शल सर वुइलियम बर्डवुड, कमाण्डर-इन-चीफ, याच्याशीं माझें बोलणें झालें. ते म्हणाले, "हिंदुस्थानच्या डिफेन्सचा प्रश्न फार भानगडीचा व कठीण आहे त्याची असेंब्लींतील तुम्हां लोकाना विशेषशी कल्पना नाहीं. तुम्ही लोक पुस्तकें वाचतां व वाटेल तसें बोलता." मी म्हणालो, "असेल तसें; पण प्रसंग जर याल तर

आम्ही आपल्या सरहद्दीवरील डिफेन्सच्री सर्व ठाणी व व्यवस्था पाहून घेऊं, म्हणजे आम्हांला त्यासंबधींची कल्पना येईल." ते म्हणाले, "ठीक आहे, पाहतो काय व्यवस्था करता येईल ती" नतर काही दिवसांनी असेब्लीतील निवडक अशा कांहीं माणसांची एक लहानशी टोळी या कमांडर-इन-चीफने आपल्या इंग्रजी मिलिटरी ऑफिसर्सच्या देखरेखीखाली पाठविली. त्यामध्ये कै श्रीनिवास आयगार, कै. प. मदनमोहन मालवीय, कै. प मोतीलाल नेहरू, कै. नरसोपंत केळकर, अणे व मी अशी मडळी होतों त्या वेळेस मलाकद, खैबर, जडोला, रझमक, डेराइस्माईलखान वगैरे सरहद्दीवरील फौजेची ठाणी आमच्या पाहण्यात आली. खरोखरच तो प्रांत मोठा बिकट प्रात आहे तेव्हां ज्या दिवशी आम्ही खैबर मुक्कामी पोहोचलो, त्या वेळेस आम्ही सरकारचे हिंदुस्थानी पाहुणे म्हणून आमच्या भेटीकरिता १०–१५ पठाण मडळी आली. त्यामध्ये सर्व लोक जरी बिलकूल पठाणासारखे दिसत होते तरी त्यामध्ये काही मडळीच्या कपाळावर गंध लावलेलें होतें! ही मडळी जेव्हा आली तेव्हा त्यापैकी काहीच्या मस्तकावर गंध पाहून मला मोठे आश्चर्य वाटले तात्यासाहेब माझ्याजवळच उभे होते. त्यास मी म्हणालों, "तात्यासाहेब, पठाण लोकाच्या मस्तकावर चदन ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे." तात्यासाहेब म्हणाले, "त्याना विचारल्यावर उलगडा होईल." मी त्यांस म्हणालो, "आपण सर्व पठाणच का?" ते म्हणाले, "होय, आम्ही सर्वच पठाण" "मग तुमच्यापैकीं काहीच्या मस्तकावर हिंदूप्रमाणे चदन कसें दिसते?" ते म्हणाले, "होय, आम्ही सनातनी हिंदु आहोत." मी म्हणालों, "आर्यसमाजी हिंदु का?" ते म्हणाले, "नाहीं, नाही. आम्ही आर्यसमाजी हिंदु नाही. आम्ही बिलकूल सनातनी हिंदु अ.होंत" तेव्हा तात्यासाहेबास मोठा विस्मय वाटला. ते जसे टोळीनें आमच्या भेटीला आले त्या वेळी त्यांनीं आपल्याबरोबर एक दुबा – बोकड – आणला होता. आम्ही सर्व त्या बोकडाकडे पाहून मनांतल्या मनात विचार करू लागलों. तो दुबा – बोकड – पाहून मी तात्यासाहेबाम म्हटलें, "हा दुबा कशाकरिता असेल? पाहुणचाराकरितां तर नाही? विचारून पाहावें" मी त्या पुढाऱ्यास म्हणालो, "क्यों पठाण, आपसे मिलकर बडी खुशी हुई, लेकिन यह बकरा किस वास्ते?" त्या पठाणाचा म्होरका जो होता तो म्हणाला, "साहेब, यह आपके मेहमानीवास्ते लाया है हम इसको दुबा बोलते है." जवळच श्रीनिवास आयगर व बापूजी अणे वगैरे मडळी होती. त्याना मोठे गूढ पडलें कीं, आतां या दुब्याचे काय करावें! तेव्हां मी सर्वांस उद्देशून तात्यासाहेबास बोललों, "आपल्या सर्वांच्या तर्फे मी या दुब्याचा स्वीकार करतो. मी सनातनी ब्राह्मण आहे, मला हा दुंबा चालतो!" सर्व मडळी मोठ्यानें हसली. तात्यासाहेब मला म्हणाले, "वा, डॉक्टरसाहेब मोठी मौज केली!"

(२) आठ-दहा वर्षे झाली. माझ्याशीं आणि कै. श्री. भाई परमानंद यांच्याशी मोठा वादाचा आणि झगड्याचा प्रश्न उपस्थित झाला होता. वाद व झगडा जो झाला तो त्याच्या आमच्या खाजगी प्रश्नासंबधीं नव्हता किंवा हिंदु-महासभेचें धोरण किंवा राजकारण यासंबधींहि नव्हता. तो केवळ सार्वजनिक बाबी-संबधी होता. तो झगडा जरी ७–८ वर्षे चालला तरी त्यामुळे भाईजीसंबंधाने माझ्या प्रेमांत व आदरात बिलकूल फरक झाला नाही. भाईजी व भाईजीच्या मंडळींनीं वर्तमानपत्रांत जरी वाद उपस्थित केला तरी मी उत्तर देऊन वाद वाढविण्यास कारणीभूत झालो नाही जो वाद होता तो एकाच गोष्टीबद्दल आणि ती गोष्ट ही कीं, दीड-दोन लक्ष रुपये खर्च करून जी हिंदुमहासभेची इमारत रीडिंग रोड, नवी दिल्ली, येथे बांधण्यात आली होती ती इमारत कोणाची ? भाइ-जीच्या खाजगीची की भाईजींनी नवीन जी सोसायटी – Servants of Hindu Society – रजिस्टर्ड केली होती तिची किंवा हिंदुमहासभेची ? माझे म्हणणे एव-ढेच की, ती सर्व इमारत हिंदुमहासभेची व ती सर्व इमारत हिंदुसभेच्या ताब्यांत असावी. वादाचा व झगड्याचा मुद्दा येवढाच. प्रथम लवादाने या प्रश्नाचा निकाल लावावा म्हणून प्रयत्न करण्यात आला. परंतु सर मन्मथनाथ मुकर्जी लौकरच वारले म्हणून ते आर्बिट्रेशन थांबले पुढे सरकारी कोर्टांत तो झगडा चालला आम्ही वादी होतो. भाईजी प्रतिवादी होते. परंतु शेवटी दोन वर्षांपूर्वी नरसोपंत केळकर यांना आर्बिट्रेटर नेमून निकाल लावून घ्यावा असें बहुमतानें ठरले नरसोपंतांना आर्बिट्रेटर नेमण्याच्या मी विरुद्ध होतो कारण, त्यांचा स्वभाव मला माहीत होता की, [illegible] भांडणाची गोष्ट आणि मित्रामित्रात जर भांडणें उपस्थित झालीं तर 'अर्धं त्वया अर्धं मया' हा न्याय ते लावीत असत मला ही गोष्ट पसंत नव्हती मला कायद्याचा व न्यायाचा निकाल पाहिजे होता की, "ही इमारत कोणाची, हिंदुमहासभेची की इतरांची ?" पुढे बहुमतानें नरसोपंत केळकर हे आर्बिट्रेटर नियोजित झाले. म्हणून मी लाचार झालों. परंतु अशा प्रकारची तडजोड न व्हावी म्हणून, आणि कायद्याने आणि न्यायाने जो निकाल होईल तो देण्यांत यावा म्हणून मी एक युक्ति काढली. मी तात्यासाहेबास प्रत्यक्ष भेटलों नाही; कारण त्यांचा स्वभाव मला माहीत होता; कारण अशा प्रकारच्या भानगडीत ते कोणाच्याहि मानमुरवतीकडे पाहत नसत. त्यांना जें बरे वाटे त्याप्रमाणे ते करीत असत म्हणून मी त्यास पत्र लिहिलें, "अर्धं त्वया अर्धं मया या तत्त्वावर हा झगडा मिटविण्यांत येऊ नये; आपण कोर्टाप्रमाणें सर्व साक्षी कागदपत्र पाहून काय-द्यानें व न्यायाने निकाल द्यावा "

अशा प्रकारचें पत्र लिहिल्यावर काही दिवसानंतर जेव्हा त्यांची माझी प्रत्यक्ष भेट झाली, तेव्हां बोलण्यामध्ये तात्यासाहेब म्हणाले, " तुमचें पत्र मिळालें.

तुमच्या म्हणण्याचा मी विचार केला आहे. तुम्ही ज्या कारणाकरिता माझ्या आर्बिट्रेटरच्या निवडणुकीस प्रतिकूल मत दिले होते ती कारणे खरी आहेत." मी म्हणालों, "तात्यासाहेब, हा कांही वाटणी किंवा पार्टिशनचा झगडा नाही. हा झगडा शुद्ध मालकीसबधीं आहे ही हिन्दु महासभेची इमारत कायद्यानें व न्यायानें कोणाची एवढाच प्रश्न आहे. यामध्यें निदान माझ्याकडून तरी भाईजीच्या मित्रत्वामध्यें व्यत्यय येणार नाही व त्या दृष्टीने मी हा झगडा चालवीतहि नाहीं" पुढें हे अशा प्रकारचे कोर्ट केसरी ऑफिसमध्ये भरविण्यांत आले आणि आनदाची गोष्ट ही की, तात्यासाहेब केळकर यांनी बिलकूल कोर्टाप्रमाणे काम चालविलें त्यानीं वादी-प्रतिवादीच्या जबान्या घेऊन व कागदपत्र पाहून बिलकूल कायद्याचा व न्यायाचा निकाल आमच्या बाजूने दिला. अशी तात्यासाहेबाची न्यायबुद्धि होती. अशा प्रकारचा न्यायप्रिय मनुष्य, आमच्याबरोबर काम केलेला, दिवगत झाला म्हणून फार दुःख होते आणि पुण्यात किंवा उभ्या महाराष्ट्रात त्याच्यासारखा मनुष्य त्याची जागा भरून काढण्यास दुसरा नाही हे त्याचा शत्रुहि ( त्यास शत्रु असल्यास ) कबूल करील.



## डॉ. देवदत्त रामकृष्ण भांडारकर

### ( एम्. ए., पीएच्. डी., कलकत्ता )

( १ ) केळकर यास प्रथम मी पुण्यातील आनदोद्भव थिएटरमध्ये पाहिले सन १८९१ साली डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी 'मृच्छकटिक' नाटक करून दाखविले. त्या वेळेस अर्थात् माझे परमपूज्य वडील प्रोफेसर रामकृष्ण गोपाळ भाडारकर हे हजर होते. नाटक उत्तमोत्तम झाले नरसोपत यास दोन भाग ( Parts ) देण्यात आले होते त्याची अगयष्टि सुदर व मोहक होती चवथ्या अकांत शर्विलक वसतसेनेच्या मदनिका दासीला भेटावयास गेला, तेथें दोघाची अचानक गाठ पडली त्या वेळेस शर्विलकाने तिच्या अप्रतिम सौंदर्याच्या वर्णनपर 'मदनमपि गुणैर्विशेषयन्ती रतिरिव मूर्तिमती विभाति येयम्' हा श्लोक मोठ्या सुस्वरात गायला त्या वेळेस टाळ्यांची मोठीच गर्जना झाली. माझे वडील स्वभावतःच फार गभीर होते. तथापि विद्यार्थ्यांनीं मदनिकेच्या ( अर्थात् नरसोपतांच्या ) सौंदर्याच्या व मोहकतेच्या प्रशसापर हा टाळ्यांचा गजर केला. वडिलाकडे मी थोडी दृष्टि वळविली, पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे माझे वडीलदेखील नरसोपताकडे पाहून सकौतुक हसत होते! चवथा अक सपल्यानतर पुष्कळ लोक म्हणजे शिक्षक, शास्त्रीबुवा, विद्यार्थी वगैरे चर्चा करू लागले की अधिक सुदर व मोहक कोण? वसतसेनेचा पार्ट ज्यानें घेतला तो कीं मदनिका? पण दोघेहि मोठे सुदर व मोहक होते असेच सर्वांचे मत पडले.

(२) त्या मृच्छकटिक नाटकामुळे त्याची माझी चांगली ओळख झाली. त्यामुळे आमचा परिचयहि झाला व तो वाढत गेला सन १८९१ साली व त्यानंतर एक वर्ष फर्ग्युसन कॉलेजची इमारत बांधली जात होती. त्या वेळेस दसऱ्याचें सीमोल्लंघन तेथें मोठ्या थाटाने होत असे. त्या वेळेस त्या वेळचे मोठमोठे लोक जमत होते प्रिन्सिपाल आगरकर, लोकमान्य टिळक, रा नामजोशी, प्रो जिनसीवाले इत्यादि मंडळी येत असे व आकस, चुरसभाव पुरा विसरून एकमेकांची सप्रेम भेट घेत असत मी तेथें अवश्य जात असे. नरसोपंत मला शोधून काढीत व कडकडून भेटल ते मला सोने ( आपट्याची पानें ) देत व मीहि त्याना देई.

(३) चारपाच वर्षांपूर्वी मी पुण्यास गेलो होतो एके दिवशी पर्वती पाहावयास गेलों पायऱ्या चढता चढता माझ्यापुढे नरसोपंतास मी जाताना पाहिलें. त्याच्याबरोबर एक वयातीत बाई होती म्हणून मी हलकेच "यथा यथा लगति शीतवातः" हा श्लोक पुटपुटला माझे शब्द त्यांच्या कानी पडले व त्यानी पाठीमागें वळून विनोदयुक्त हास्य केले व नमस्कार केला. त्याचा विनोद व सुभाषित यांचा मला बरीच वर्षे परिचय होता म्हणून कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या बी. ए. परीक्षेला त्याचे 'सुभाषित व विनोद' हे पुस्तक मी लावून ठेवले होते; सध्या त्याचें 'गद्यगुच्छ' हे पुस्तक ठेविले आहे एकदरीत पाहता केळकर हे अष्टपैलू होते; ज्याचा ज्याचा त्याच्याशी परिचय झाला होता त्याच्या स्मृतिपथावरून ते कधीहि नाहीसे होणार नाहींत, अशी माझी खात्री आहे.



## वा. रा. पुराणिक

### ( माजी व्हाइस चॅन्सेलर, युनिव्हर्सिटी, नागपूर )

(१) साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर याना महाराष्ट्रातील प्रसिद्ध पुढारी व लेखक या नात्याने मी बरेच वर्षांपासून ओळखत असे. महाराष्ट्रात किंबहुना साऱ्या हिंदुस्थानात त्याचे नाव इतके दुमदुमले आहे की, त्यांना न जाणणारी व्यक्ति क्वचित्च सांपडेल. त्यांचा माझा विशेष परिचय १९४६ सालअखेर नागपुरातील राजाराम वाचनालयाचा सुवर्णमहोत्सव झाला त्या वेळी झाला. मी त्या वाचनालयाचा बरेच वर्षांपासून अध्यक्ष आहे व राजारामपंत दीक्षित —ज्याच्या नावाने ते वाचनालय प्रसिद्ध आहे—त्याचा व तात्यासाहेबांचा चागला स्नेहसंबंध होता हें ऐकून माहीत होतें, म्हणून मी व वाचनालयाच्या कार्यकारी मंडळानें तात्यासाहेबास या प्रसंगीं बोलवावें असें ठरविलें व तात्यासाहेबांस आग्रहाचं आमंत्रण ( पत्र व तारद्वारें ) पाठविलें त्यांनीं आधी वृद्धापकाळात इतक्या दूरचा प्रवास व दगदग सहन करवणार नाहीं या सबबीवर येण्याचें नाकारलें व

वाचनालयास उपदेशपर आपला आशीर्वाद पाठविला; परंतु आपल्या उत्तरांत तात्या-साहेबांनीं जी कळकळ व आत्मीयता दाखविली त्यावरून कार्यकारी मंडळाने पुनः आग्रह करून पाहुण्याचें ठरविले व त्याच्या चागल्या परिचयाचे दोन गृहस्थ पुण्यास त्या कामासाठी मुद्दाम पाठविले अखेरीस आपल्या भिडस्त स्वभावा-प्रमाणे त्यांनी प्रसगास येण्याचें ठरविले व त्याप्रमाणे ते आले. त्यांच्या या सौजन्यामुळे नागपुरकराना फार आनद वाटला व येथें त्यांचे मोठ्या प्रेमानें व थाटाने स्वागत करण्यात आले या वेळीं जवळजवळ आठवडा-भर त्याचा नागपूरला मुक्काम झाला व या अवधींत त्यांनीं आपल्या समतोल बुद्धीच्या भाषणानी, विद्वत्तेनें व विनोदी स्वभावाने नागपूरकरांवर अशी छाप बसविली कीं, त्यांनीं आणखी कांहीं दिवस राहून निरनिराळ्या विषयांवर व्याख्यानें द्यावी अशी त्याना आग्रहाची विनती करण्यात आली माझा व त्यांचा दाट परि-चय याच आठवड्यात झाला. या वेळीं मी नागपूर विश्वविद्यालयाचा कुलगुरु होतों व म्हणून सर्व साहित्यिक सस्थातर्फे व विश्वविद्यालयातर्फे तात्यासाहेबाना मानपत्र अर्पण करण्याचा मान मला देण्यांत आला. त्या मानपत्राला उत्तर देताना तात्यासाहेबानीं मराठी वाङ्मयावर जे मार्मिक व विनोदी भाषण केलें ते अद्यापहि सर्वाच्या लक्षात आहे. यात साहित्याच्या निरनिराळ्या अगाचे विश्लेषण व वाङ्मयात विनोदाचें स्थान कोणते व कसे असावें यावरील विचार फारच मार्मिक व सुदर होते.

( २ ) विषय कोणताहि म्हणजे राजकीय, सामाजिक अथवा साहित्यिक असो, तात्यासाहेब बोलू लागले म्हणजे त्याच्या विचाराचा समतोलपणा लागलीच लक्षात येत असे व त्याच्या बुद्धिवैभवाबद्दल व चातुर्याबद्दल खात्री पटत असे. विरुद्ध पक्षाचे काय म्हणणे आहे हे नीट समजून घेऊन त्यातील गुणदोष लक्षात घेऊन आपले मत ते बनवीत असत व आपले मत ते अशा रीतीने मांडत असत कीं, उलट पक्षाच्या मडळीत त्याच्याविषयीं आदर कायम राहात असे. निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या विषयावर चर्चा होत असताना हे त्याचे गुण सहज लक्षात येत त्याच्या अगी वसत असलेले सौजन्य व त्याचा विनोदी स्वभाव याचा अनुभव त्यांच्या सान्निध्यात असताना वेळोवेळीं येत असे ते एवढे मोठे '[illegible]' व प्रसिद्ध 'देशभक्त'; परतु लहानथारांशी, सर्वांशीं, ते मिळून मिसळून वागत असत व आपल्या विनोदाने सर्वांना हसवून उपदेश करीत असत.

( ३ ) त्याचा वृद्धापकाळ लक्षात घेतां त्याच्यावर कामाचा बोजा जास्त पडूं नये म्हणून आमचे कार्यकारी मडळ फार झटत असे; परतु तात्यासाहेब कोणासहि 'नाहीं' म्हणण्यास तयार नसत. इतकेंच नव्हे तर त्याच्या पूर्वपरिचयाचे जे लोक नागपुरात होते त्याच्या घरीं आमन्त्रणाशिवाय देखील खेप टाकून आल्याशिवाय

त्यांना राहावले नाही. दुपारची थोडी वामकुक्षी झाली की एकाद्या तरुणाप्रमाणे ते पुनः काम करण्यास तयार असत.

(४) याच मुक्कामात त्यांचें नाटकावरील प्रेम व त्या कलेतील त्यांची तन्मयता ही आमच्या लक्षात आली त्याच्या सन्मानार्थ जी नाटके करून दाखविण्यात आली, ती त्यानी जागरणास न जुमानता पूर्ण पाहिलीं व रंगभूमीबद्दल, विशेषतः मराठी रंगभूमीबद्दल, आपले विचार त्यानी येथील नाट्य-प्रेमी मंडळीस सांगितले तात्यासाहेबाच्या मुक्कामाचा आठवडा निरनिराळ्या कार्य-क्रमांनीं भरला होता त्या सर्व कार्यक्रमाला नेमल्या वेळी हसतमुखाने हजर राहून त्यांनी नागपूरकरास निरनिराळ्या विषयावर आपले विचार सागून उपकृत केले. त्यांच्यासंबधीं लिहावे तितके थोडेच आहे तात्यासाहेबाच्या निधनाचे वर्तमान ऐकून नागपूरकरास धक्का बसला मराठी वाङ्मयाचा खरा 'हिरा' गमावला गेला यात शंका नाही



## दत्तो वामन पोतदार

(बी ए., प्राध्यापक, महामहोपाध्याय, पुणें)

(१) मी बी. ए. होतांच अमेरिकेत पुढील शिक्षणासाठीं जावे असा एक विचार माझ्या डोक्यांत आला. काही छात्रवृत्ति जाहीर झाल्या होत्या तेव्हा शिफारसपत्राची गरज पडली. तात्यासाहेबानी कसलेंहि आढेवेढे न घेता एक छोटेसे उत्कृष्ट शिफारसपत्र दिले! त्यानी आपले काम केले. आता आमचे नाणे चालले नाही; त्याला त्याचा काय उपाय?

(२) एकदा असे झाले. बहुशः इ. स १९११–१२ साल असावे. कै राजवाडे रात्रौ ९–९॥ च्या सुमारास मला बरोबर घेऊन तात्यासाहेब केळकराकडे गेले. कै. वासुदेवशास्त्री खरे याचे केळकर शिष्य, आणि कै. वासुदेवशास्त्री याचे ऐतिहासिक लेखनसग्रहाचे काम आर्थिक पेचामुळे मदावले होतें. तो पेच सोडवून शास्त्रीबुवांचे काम जोराला कसे लावावे ही विवचना सोडविण्यासाठीं राजवाडे यांनी नरसोपतापाशी आग्रहाने चर्चा केली! त्या वेळी राजवाडे आणि खरे यांचे खरे सौरस्य कसे होते याचा मला प्रत्यय आला. आणि नरसोपताविषयी राजवाडे जरी कधीं कौतुकानें बोलत नसत तरी या काली त्याना अखेर तात्यांच्याकडेच जाणें उचित वाटले याची मला मौज वाटली

(३) भारत इतिहास संशोधक मंडळासाठी प्रथम हल्लीच्या शिवाजी मंदिराच्या जागेंतच एक पट्टी मिळवावी अशी खटपट होती. शिवाजी मंदिराची मोकळी जागा केळकरानी हिय्या करून घेतली होती परंतु पुढे पंढरपुरला परिषद

झाली त्या वेळीं केळकर यांनी शेजारची व समोरची बेहेरे यांची बखळ जागा मंडळासाठी मिळावी ही योजना ठरविली ती जागा हस्तगत करण्याच्या कामी त्रास काहीं थोडा नाही झाला. एकदा तर भररात्री ९।१० वाजता जोराचे वादळ झालें. रस्त्यात गुडघा गुडघा पाणी ! पण वेळ टळली तर मालक फिरण्याची धास्ती माझ्या पोटात धस्स करीत होती ! काय करणार ? कसे होईल म्हणून चिंता ! पण नरसोपत तश्श्या पावसात अगरखा पागोटे घालून निघाले. रस्त्यात विजेचे दिवे नव्हते त्या वेळी. हातात कंदिल, वरून विजा चमचमताहेत ! अशा थाटात आम्ही निघालो ! मालक सर्दच पडला आणि कबुली झाली ! अशी ही जागा आपल्या मंडळास मिळाली ! आणि त्या काळी नरसोपताचे हे असे अकृत्रिम साह्याय्यच कारणीभूत झाले ! प्रथम ही जागा दीर्घ मुदतीच्या भाडेपट्टयानें मिळविली होती. पुढे विकत घेण्याचा मोका आला. त्याहि वेळीं ते काम पार पाडले ! व तेहि नरसोपतांनीच आपली रक्कम आयत्या वेळी पुढे करून आणि मालकाची समति मिळवून ! !

( ४ ) इ. स. १९१७ सालची गोष्ट. आम्ही सारे म्हणजे पत पराडकर, मी, तात्यासाहेब इंदूरला मराठी साहित्य समेलनासाठी निघालो त्या वेळी वाटेत नरसोपतांनी आपली कल्पना माझ्यापुढे माडली की, "१८१८ ला मराठी राज्य बुडाले १९१८ ला त्या गोष्टीला शभर वर्षें पूर्ण होतील. तेव्हा मराठी राज्याचा आढावा घेणारा एक ग्रथ या निमित्ताने प्रसिद्ध करावा. खरे शास्त्री याचे साहाय्य मी मिळवीन, पण इतरांची मदत पाहिजे, कामें व विषय वाटून घेऊ." झाले; याद्या झाल्या, टिपणे सुरू झाली पण काम रेगाळत पडले; तेव्हा तात्यासाहेबानी स्वतःच एकट्याच्या हिम्मतीवर ' मराठे आणि इग्रज ' हा सर्वोत्कृष्ट ग्रथ लिहून शतसांवत्सरिक श्राद्धसकल्प सिद्धीस नेला ! असा त्याचा दाडगा उरक आणि आत्मश्रद्धा ! !

( ५ ) हल्ली मी ज्या 'लोककल्याण' वास्तूत राहतो त्यातहि तात्यासाहेबाचा सबंध आलाच. मी चिंचवडास राहण्यास जावयाचा बेत केला आणि सहज ती गोष्ट त्याच्या कानावर घातली ! दुसऱ्या दिवशी तात्या सकाळी उठून 'पुष्करणी' बंगल्यातून गांवांत थेट माझे मित्र धोंडूमामा साठे यांच्या घरीं गेले आणि माझा बेत मोडून काढून माझी स्थापना या 'लोककल्याण'गृहात करण्याचा आग्रह त्यांनी केला ! आणि अखेर तसेच घडले ! !

माझा ग्रंथसंग्रह मी जुन्या घरातून नव्या लोककल्याणमध्ये आणला गठ्ठयाचा डोंगर पडला. तो पाहून तात्यासाहेब म्हणाले, "बोला, हा कधी लावणार ? तुमच्याच्याने कांही हा डोंगर हालविणे होणार नाही !" मी म्हणालो – "सहा महिन्यांनी या आणि पाहा." मी खरोखरीच तो पर्वत हालवून लावून टाकला आणि खरोखरीच तात्यासाहेब एका दिवशीं पुष्करिणी बंगल्यावरून चालत नदीवरून आले ते थेट लोककल्याणांत ? डोंगर हाललेला आणि पुस्तके लावलेली पाहून त्यास फार फार

समाधान वाटलें! चौथ्या मजल्यावर शांतता, उजेड, वारा सारखा वाहता हे दृश्य पाहून तात्यासाहेब म्हणाले, "–बस्स, मी येथेंच वाचनास आणि अभ्यासास बसणार!" याहून आणखी काय पाहिजे?

गोडींत माणसाला सहज चढवून काम करून घेण्याच्या त्यांच्या हातोटीचे, प्रेमळपणाचे, विद्याप्रेमाचे आणि साधेपणाचें हे स्वानुभवाचे उदाहरण माझ्या मनावर कोरून ठेवावे तसें ठसून राहिलें आहे."

(६) काही वर्षें मी मुंबई युनिव्हर्सिटीच्या वाङ्मयशाखेचा (आर्टस् फॅकल्टीचा) सभासद होतो. तेथे मराठी अभ्यास मंडळावर तात्यासाहेबांची निवड व्हावी म्हणून प्रयत्न करण्याचे मी मनात आणलें. मला भय वाटत होते की, मुंबई युनिव्हर्सिटीत अशी गोष्ट घडवून आणणे जरा कठिणच काम आहे! झालें तर पाहा! पण न झाले तर, तर तात्यासाहेबासारख्या साहित्यसम्राटाला फुकट पणाला लावले हा अपशब्द मात्र लागणार! म्हणून मुनशी, काणे प्रभृतींचे पाठबळ मिळविले. तात्यासाहेबाची समति पाहिजे, तर ते एकाएकीं कानाजवळचे हाड कुजल्याचें नजरेस आल्यामुळे सिमल्याहून तडक निघून मुबईस इस्पितळांत पडलेले! ती गुप्त बातमी काढून त्याहि स्थितींत तात्यासाहेबाची भेट घेऊन त्यांची सही मीं मागितली आणि त्यांनीं दिली!! पण आमचा सारा बार फुकट गेला! युनिव्हर्सिटींतल्या खेळयानीं निराळाच डाव केला!! पण तात्यांनी चकार शब्दानें मला दुखविले नाही!



## न. का. घारपुरे

(एम्. ए., पीएच्. डी., प्रोफेसर, पुणें)

(१) 'ईस्ट ॲण्ड वेस्ट असोसिएशन' ही सस्था आम्ही जानेवारी १९३४ मध्यें स्थापन केली. परदेशाला जाऊन आलेल्या लोकांनीं एकत्र यावें, विचारविनिमय करावा, परदेश व हिंदुस्थान यातील शैक्षणिक, सास्कृतिक मैत्री दृढ व्हावी ह्या उद्देशाने ही सस्था कार्य करीत असे. सस्थेतर्फे मधूनमधून जेवणाचा कार्यक्रम होत असे. एका जेवणाला सर राधाकृष्णन्, दे भ. सरोजनी नायडू, श्री तात्यासाहेब केळकर इत्यादि बरेच थोरथोर लोक आले होते. जेवणाचा बेत टिळक स्मारक मदिराच्या गच्चीवर सायकाळी ८॥ वाजता होता. तात्यासाहेब त्या वेळी जवळच राहत होते. उन्हाळ्यामुळे उकडत होते. म्हणून तात्यासाहेब अंगात नुसता सदराच घालून आले होते. आम्हा सर्वांना जरा आश्चर्य वाटले तात्यासाहेब म्हणाले, "अहो, उकडते आहे काण! शिवाय टिळक स्मारक मदिर मला घरच्यासारखेच आहे." थट्टेने ते पुढ म्हणाले, "शिवाय जेवणाकडे माझें

लक्ष तुमच्यापेक्षा जास्त लागेल." आम्ही सर्वच हसू लागलो यावरूनच मला आठवते कीं, असहकारितेची चळवळ जोरात असतांना स्वदेशीवर तात्यासाहेबाचे शिवाजीमदिरात व्याख्यान चालले होते व ते म्हणाले, "ज्याना स्वदेशीच कापड वापरावयाचे आहे, त्याना ते शक्य आहे आपल्या देशात कपडे लागताहेत तरी किती? माझेच पाहाना. मी हा गळ्यापर्यंत बद बटनाचा कोट घालतो, त्यामुळे आंत सदरा घालावा लागत नाही, कापड वाचते, स्वदेशीचा प्रश्न तेवढाच सुटतो," असे म्हणून त्यानी कोटाच्या दोनचार गुडया काढून दा ।वि-या, तो आत सदरा नव्हता! असा त्याचा मार्मिक गा येग्गा होता

(२) माझे मित्र श्री नीलकठ चितामण गद्रे यानी १९२५ मध्ये 'कृष्ण-कारस्थान' हे (कसवधाच्या आख्यानावर) नाटक लिहिले ता ।ा भाना वाचून दाखवून त्यानाच ते अर्पण करण्याविषयी परवानगी घ्यावयाची होती -।गाहे बाची व माझी ओळख म्हणून मी त्याप्रमाणे त्याना विचारले त्यानी समति दिल्यावर नाटकाचे दोन अक त्याना समक्ष वाचून दाखविले. त्यानी ते ऐकून घेऊन काही सूचनाहि केल्या व नाटक चागले आहे असा अभिप्राय दिला व अर्पण करण्यासहि परवानगी दिली. त्याप्रमाणे गद्रे यानी नाटक त्याना अर्पण केले व छापील प्रत देण्याकरिता ते व मी त्याच्याकडे गेलो चादीच्या तबकात प्रत ठेवून ती त्याना अर्पण केली व नमस्कार करून आशीर्वाद मागितला तात्यासाहेब म्हणाले, "अहो, हे नाटक तुम्हीं मला अर्पण केले ते ठीक झाले, परतु त्याला हे चादीचे पुष्टीपत्र हो कशाला! त्यात वाङ्मयानद आहे काय?" गद्रे याना वाईट वाटेल म्हणूनच त्यांनी तबकाचा स्वीकार केला व स्वतःचे र्वा ।ान पुस्तक गद्रे याना त्यांनी परत भेट म्हणून दिले गद्रे याना किती धन्यता वाटली हे सागावयास नको

(३) कै रावसाहेब महादेव मोरेश्वर कुटे, बी. ए, याचे चरित्र लिहिण्यास मी घेतले आहे हा ग्रथ बहुतेक तयार होत आला आहे कै कुटे याच्यासबधी तात्यासाहेबाना काही माहिती ागाग्राग विचारावी या उद्देशाने मी त्याच्याकडे गेलो होतो कुटे याच्या विद्वत्तेबद्दल त्यानी आदर व्यक्त केला व ।ााळा प्रमाणे आठवण सांगितली:— "मी प्रथम पुण्यास दि ८ ऑक्टोबर १८८८ ला आलो. पुण्यात पाऊल ठेवतो तो मला सगळे वातावरण अगदी विषण्ण व सुन्न दिसले व म्हणून मी चौकशी केली तेव्हा मला समजले की, पूना हायस्कूलचे कर्तबगार हेडमास्तर व विद्वान् सस्कृतज्ञ महादेव मोरेश्वर कुटे वारले असून लोक दहन-भूमीकडे चालले होते मीहि तिकडे गेलो तेथे कुट्याचे मला प्रथमचे व शेवटचे दर्शन झाले. पुण्यातील महादेव गोविंद रानडे वगैरे तत्कालीन मोठमोठ्या लोकाची कुंट्यांबद्दलचीं भाषणे ऐकली. एवढीच माझी आठवण आहे. माझे पुण्यास प्रथम येणे मला आठवले की, कुटे डोळ्यापुढे उभे राहतात!!"



## रामचंद्र गोविंद ऊर्फ तात्यासाहेब जाधवराव

### ( इनामदार, भुइंजकर, जि. सातारा )

( १ ) तात्यासाहेब याच्याबद्दल मराठे समाजात गाढ लोकप्रियता होती, हे ते सेंट्रल असेंब्लीच्या निवडणुकास उभे असतां सिद्ध झाले. त्या वेळी सातारा जिल्ह्यात सत्यशोधकाचा फार जोर होता, वजनदार ब्राह्मणेतर उभे असून त्याची व्याख्यानबाजी सारखी चालू होती तात्यासाहेब एकदाच जि ह्यात हिंडून गेले व इतक्या मोठ्या बहुमताने निवडून आले कीं प्रतिपक्षी चकीतच झाले. आश्चर्य की, कित्येकाच्या अनामत रकमाहि जप्त झाल्या. त्याचा सारा प्रचार वाया गेला आणि अखेर मराठ्यानी तात्यासाहेबानाच मते दिली. भुइंजेपुरते मला माहीत आहे की, आमचे आजोबा ती० खंडेराव रायाजीराव याचे मत तात्यासाहेबानाच मिळणार हे कळताच पचक्रोशीतील सोळा गावानाल मराठ्यानी आपली सर्व मत केळकरानाच दिली !

( २ ) १९२८ सालची गोष्ट, लोकमान्य टिळक व ! ाग ाहेब यावर ते केवळ ब्राह्मण म्हणूनच कित्येक मराठ्याचा आक्षेप असे व ते थोर गृहस्थ मराठ्यांनी चालविलेल्या सत्कार्यास हातभार लावण्यात कुचराई करीत असा दुष्टपणाचा प्रचारहि होत असे पण माझ्या अनुभवाप्रमाणे ही वस्तुस्थिति नसून खोटी गोष्ट आहे. पूज्य जिजामातेच्या पाचाड येथील समाधीचा जीर्णोद्धार व एकादे स्मारक करण्यासाठी कै. सेनापति सरदार यशवंतराव खंडेराव दाभाडे, मी व आणखी काही मडळींनी योजना केली था प्रकरणी सशोधनाच्या कामी केवळ तात्यासाहेब केळकराच्यामुळेच आम्हास यश लाभले

( ३ ) तात्यासाहेब लोकसग्रहाची एकहि सधि घालवीत नसत, तसेच समदृष्टीने कोणाच्याहि गुणाचे चीज करीत. याचा अनुभव १९३६ साली मलाच आला. मी मुंबई विधिमडळाच्या निवडणुकीस सातारा उत्तरभागातर्फे अखेर लो स्व. पक्षातर्फे उभा होतो. ही निवडणूक मी अखेरपर्यंत का लढवू शकलो नाही हा इतिहास सागण्यासारखी वेळ अजूनहि यावयाची आहे तेव्हा मी वस्तुतः कॉंग्रेसच्या तिकिटावरच उभा राहावयाचा; पण सातारा जिल्ह्यातील विलक्षण राजकारणामुळे मला नकार मिळाला हे बॅ. रामराव देशमुखाना कळताच त्यांनी मला दे. भ. अण्णासाहेब भोपटकराना भेटण्यास कळविले अखेर मला तात्यासाहेब केळकराकडे नेण्यांत आले. त्यानी ताबडतोब सारी व्यवस्था करवून मजबद्दल ११-१२-१९४६ च्या केसरीत उत्तम मजकूर लिहून लो. स्व. पक्षातर्फे पाठिबा दिला.

( ४ ) १९३९ ते ४४ पर्यंत मी सातारा जिल्हा युद्धमडळाचा सभासद व ऑ टे.

रि. ऑफिसर म्हणून काम केले. त्या वेळी तात्यासाहेबाचा या बाबतीतील दृष्टिकोन समजावून घेण्यासाठी त्यांची मी पुण्यास भेट घेतली. त्याचा दृष्टिकोन सुप्रसिद्धच आहे. सागावयाचे हे की, त्यांनी प्रसिद्धिविन्मुखतेनें बसल्याबसल्याच या बाबतीत एवढे काम केलेले मला दिसले की, मला मी करीत असलेल्या कामाच्या क्षुल्लकपणाची खरोखर लाजच वाटली !



## डॉ. नवले

### ( संपादक दीनबंधु, पुणें )

( १ ) श्री. केळकर हे लोकमान्य टिळकाच्या बरोबर १९०५-०६ सालात स्वदेशी बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण याचा प्रसार महाराष्ट्रात करण्यासाठी दौरे काढीत होते. दरसाल ते कॉंग्रेस अधिवेशनास त्याच्याबरोबरच जात असत. त्यामुळेच [illegible] गोड सहवास मला अनायास लाभला. १९०८ साली जेव्हा टिळकाच्यावर हायकोर्टमध्ये खटला सुरू झाला, तेव्हा इदुप्रकाश प्रेसमध्ये रात्रीचा दिवस करून सबध केसची टिपणे वगैरे घेऊन प्रसिद्ध करण्याच्या कामात मी तात्यासाहेबाना मदत करीत असे त्या वेळी त्याची अहोरात्र काम करण्याची चिकाटी दिसून आली

( २ ) सुरतेस कॉंग्रेस मोडली तेव्हा नवीन राष्ट्रीय पक्ष स्थापन करण्यामध्ये केळकराचाच भाग होता पुढे टिळक सुटून आल्यावर १९१५ साली पुणे येथें रा ब. जी व्ही जोशी याच्या [illegible] जी पुणे जिल्हा सभा भरविली गेली त्यातहि केळकराच्याबरोबर मी काम केले त्या वेळी त्याची तडफ, दूरदृष्टि व समाजसघटना वगैरे गुण दिसून आले

( ३ ) १९२० - मला पार्लमेंट [illegible] 'चेम्सफर्ड रिफॉर्म स्कीम' साठी साक्षीकरिता जावे लागले त्या वेळी नुकतेच लो. टिळक व केळकर जाऊन आले होते. त्या वेळी लो टिळकानी त्याच्या राहिलेल्या कामासबधीची काही खाजगी पत्रे मला दिली होती [illegible] तात्यासाहेबानीहि ओळखीसबधाची मला पत्रे दिली होती त्याचाहि मला फार उपयोग झाला

( ४ ) लंडनमध्ये कॉंग्रेसप्रणीत इडिया साप्ताहिक पत्र मिस् नॉर्मगटनबाई चालवीत असे व लडनमध्ये असताना त्याच्याबरोबर सपादकाचे काम तात्यासाहेब करीत असत. तेव्हा 'केळकर गेले तर डॉ नवले तुम्ही आता आम्हाला मदत केली पाहिजे' असे त्या बाई मला म्हणाल्या त्यानी केळकराविषयी खालील उद्गार काढले कीं, "Mr Kelkar is the great politician of India and best English writer I like him very much"

(५) १९२० ऑगस्टमध्ये लो. टिळक वारले त्या वेळेस मी इंग्लडात होतो. त्यांची शोकप्रदर्शक सभा रसेल्स स्क्वेअर, शेक्सपिअर हॉलमध्ये मी भरविली होती. त्या सभेस हाऊस ऑफ् लॉर्डस्, हाऊस ऑफ कॉमन्स, लेबर पार्टी वगैरेमधील बरीच प्रमुख मडळी जमली होती टिळकाच्या गौरवपर भाषणात केळकराचाहि उल्लेख येत असे कारण टिळकाच्या सेक्रेटरीचे काम केळकरच करीत असत नतर टिळकासबधी खाजगी वैयक्तिक मते घेण्यासाठी मी कित्येकाच्या गाठीभेटी घेतल्या त्या वेळी केळकरासबधीहि पुष्कळानी उद्गार काढले ते माझ्या डायरीतून खालीलप्रमाणे देत आहेः–

१ मि मॉटेग्यू, स्टेट सेक्रेटरी ऑफ इडिया म्हणाले, " मि. टिळक गेले तरी त्याचा उजवा हात मि. केळकर, ग्रेट मराठा लीडर, हे त्याचे कार्य खात्रीने पुढे चालवितील व इग्लिशाना सळो की पळो करून सोडतील असे वाटते "

२ मि लॅन्सबेरी, लेबर लीडर, मेबर ऑफ पार्लमेट, बोलले – " Mr. Kelkar is a thorough gentleman, eminent Editor and true son of India. I like him very much "

३. सर शकर नायर, असिस्टट स्टेट सेक्रेटरी फॉर इडिया, उद्गारलेः– " टिळकाची 'केसरी' व 'मराठा' ही पत्रे टिळक गेले तरी, केळकर बद पडूं देणार नाहींत. केळकरासारखा महाराष्ट्रियन पुढारी असल्यामुळे कॉंग्रेस व प्रागतिक यामधील ते दुवा आहेत ते वर्तनाने जरी राष्ट्रीय असले तरी हाडाने खरे प्रागतिक आहेत. "

४. मरहूम लॉर्ड सिंह, जॉइट पार्लमेटरी स्टेट सेक्रेटरी फॉर इडिया, म्हणाले, " Mr. Kelkar is a hero of Maharashtra He was the right hand of Mr Tilak. "

५. श्रीमत सर सयाजीराव गायकवाड हे त्या वेळी लडनमध्ये होते. ते केळकराचे चहाते. त्यानी असा शेरा दिला की, " टिळक गेले तरी केळकर मागे असल्यामुळे टिळकाचे कार्य ते खात्रीने पुढे उत्तम [illegible] चालवितील. त्याच्यासारखा शात, दूरदृष्टि व समजस महाराष्ट्रियन दुसरा कोणी नाहीं "

६. सर जॉन राईस, एम्. पी , यानी बोलून दाखविले कीं, " Mr. Kelkar is an extraordinary gentleman and best leader of Bombay "

७. मि. एडवर्ड, पोलीस कमिशनर हे सेवानिवृत्त होऊन लडनमध्ये इडो ब्रिटिश अ‍ॅसोसिएशन काढून तिचे सेक्रेटरी बनले होते. ते जरा मिस्किलपणे म्हणाले – " मी बॉबेचा पोलीस कमिशनर असताना मला टिळकाना पकडण्याची संधि मिळाली. केळकर फार धूर्त असल्याने ते कधी माझ्या तावडीत सापडले नाहीत ! "

८ लॉर्ड सिडनहॅम, मुंबईचे माजी गव्हर्नर, हे मुंबईहून पेन्शनीत गेल्यानतर लंडनमध्ये एका गल्लीतील दोन खणाच्या ब्लॉकमध्ये राहात होते व काही सस्थानिक ानाशी धरून त्याच्याकडून पैसे उकळून इंडो-ब्रिटिश ॲसोसिएशनचे चेअरमन बनले होते. त्यांच्या भाषणामध्ये पुढील मजकूर आला :-- "मी मुंबईचा गव्हर्नर - - ाना मुबई इलाख्यांत ॥ वणवा पेटाविण्यांत केळकर अग्रगण्य होते. केसरीकडे सर्व केळकरच पहात असत, म्हणून टिळकांना तिकडे विशेष बघावे लागत नसे. सरकारविरुद्ध 'केसरी' त अग्रलेख केळकरच लिहीत असत. त्याची लेखणी अतिशय तीव्र असल्याने तेच केसरीत विषारी लेख लिहीत टिळकाइतकेच केळकरहि मोठे मुत्सद्दी आहेत. केळकर हे 'हिडन् स्टेट्समन ' अग- ाने केव्हा काय करतील याचा नेम नाही "

९ स्व छत्रपती शाहूमहाराज, कोल्हापूर, म्हणाले, "केसरीमध्यें 'आमचे स्वराज्यद्रोही छत्रपति' हा लेख टिळकानी केव्हांहि छापून प्रसिद्ध केला नसता केळकरांनी हा लेख छापून माझे तोंडच बंद केलें व आमच्या ऑफिसमधील मूळ फाइली कशा व केव्हा नेल्या हे कोडेंच आहे" केळकराच्या-विषयी असे मोठ्मोठ्याने उद्गार आहेत. अशा अनेक आठवणी वर दिल्या आहेत. कारण त्यांचा आमचा ४० वर्षांचा सबध होता व त्यांच्या सहवासामुळेंच मला सपादकीय कामामध्ये पडावे लागले. "बहुजनसमाजाची दुसरी बाजू आम्हांपुढें आल्याशिवाय त्यांची खरी स्थिति कशी कळणार ? त्याची बाजू तुम्ही अवश्य पुढें मांडा जरी तुम्ही आमच्यावरहि टीका केलीत तरी आपल्या मैत्रीत अंतर येणार नाही कारण कोर्टामध्यें दोन वकील जरी परस्परविरोधी असतात तरी त्याच्या-तील मैत्री कधी कमी होत नाही", असें त्यांनी मला अनेकवार सांगितले व माझ्या या कामात मला त्यानीच उत्तेजन दिले.



## विश्वास बलवंत डावरे
### ( धर्मवीर, पुणें )

( १ ) बहुधा १९२३ साल असावें. भवानी पेठेतील एका श्रीमान् व्यापाऱ्याच्या दुकानावर पहाटेपूर्वी हल्ला झाला. या हल्ल्यात त्या दुकानातील भय्या रघुवीरसिंग यानें एका दरोडेखोरास पकडलें. दरोडेखोर सशस्त्र होता. त्याने रघुवीरसिंगाच्या अंगावर मोठाले वार केले. पोटावरील वार फारच भयकर होता. पण तशा जखमी स्थितीतहि दरोडेखोरास पळून जाऊ देण्यास रघुवीरसिंगाने अवसर दिला नाही व पकडून ठेवले. या जखमांमुळें रघुवीरसिंग कित्येक दिवस हॉस्पिटलमध्यें होता व नंतर प्रकृति सुधारून तो परत सुखरूपपणे घरी आला.

दरोडेखोर गुन्हेगारास योग्य शासनहि न्यायालयाकडून मिळाले. रघुवीरसिंगाच्या या शौर्याची हकीकत आम्ही तात्यासाहेबास निवेदन करून अशा गृहस्थास एक कट्यार, मानपत्र व काहीं रक्कम बक्षिस द्यावी हा आमचा मनोदय व्यक्त केला; व त्या जाहीर समारभाचें अध्यक्षस्थान तात्यासाहेबानी स्वीकारावे अशी विनती केली. मानपत्र व रक्कम देण्यात काहीं विशेष नव्हते, पण कट्यार जाहीर रीतीनें बक्षीस द्यावयाची म्हणजे त्या वेळच्या हत्याराच्या कायद्याच्या दृष्टीनें धोक्याचे होते. प्रसगी देणारा व घेणारा दोघेहि गुन्हेगार ठरणार! पण आमचा उत्साह पाहून तात्यासाहेबानी तो धोका पत्करला व समारभाचे अध्यक्षपद स्वीकारले. समारभ जाहीरपणे अत्यत यशस्वीपणें पार पाडला व "स्वतःच्या प्राणावर बेतली असता आततायीचा वध करणे हे कसे धर्म्य आहे" हे तात्यासाहेबानी सोप्या भाषेत निवेदन करून कट्यार, मानपत्र व रक्कम भय्या रघुवीरसिंग यास दिली.

समारभ सपल्याच्या दुसऱ्या दिवशीच भय्या रघुवीरसिंग यास त्या कट्यारीसह फरासखान्यात बोलावून नेले. चौकशी व्हावयाची ती झाली; पण यात तात्यासाहेबानी प्रामुख्याने भाग घेतला या एकाच गोष्टीमुळे त्यावर खटला न भरता कट्यारीसह त्यास सोडून दिले! सदर कट्यार त्या गृहस्थाने मरेपर्यंत उजळ माथ्याने शीख जसे कृपाण वापरतात त्याप्रमाणे वापरली.

प्रसंगी धोका पत्करून कायदेभगहि करावयाचा व शौर्याचा गौरव करण्यास पुढे व्हावयाचे ही तात्यासाहेबाची वृत्ति या प्रसगी स्पष्टपणे दिसून आली.

(२) प्रतिसहकार पक्षातर्फे पुणें शहरासाठी डॉक्टर लोहोकरे याना उमेदवार उभे करण्यात आले होते व त्याचे प्रतिस्पर्धी म्हणून कॉंग्रेसवाल्यानी शेठ लल्लूभाई याना उभे केलें होते. तो प्रसग मोठा चुरशीचा होता निवडणुकीच्या दिवशी सूर्योदयापूर्वी आदल्या रात्री डॉक्टर लोहोकरे हार्ट डिझीसच्या विकारानें एकाएकी कालवश झाले! ही वार्ता आम्हास पहाटे दोन वाजता कळली मृत्यूमुळे आमच्या मनास धक्का बसला खरा. पण निवडणुकीचें पुढे काय होणार हा प्रश्न आमच्यापुढें उभा राहिला. प्रतिपक्षी बिनविरोध निवडला जाऊ नये ही आमची इच्छा होती. आम्ही तावडतोब डेक्कन जिमखान्यांत डॉ. लोहोकरे यांच्या बंगल्यावर जेथे त्याचा मृत देह होता तेथें गेलों तेथे प्रतिसहकार पक्षाची म्हणजे टिळकपक्षाची मंडळी जमली होती, त्याच्यापुढें हा निवडणुकीचा विषय ठेवला

"निवडणूक होणारच, ती थाबणें कठीण" असे उत्तर वेगवेगळया पुढाऱ्याकडून मिळाले. आमचे समाधान होईना. शेवटी तेवढ्या रात्रीं आम्ही श्री. तात्यासाहेब यांच्या घरीं जाऊन त्यांना उठविलें व डॉ. लोहोकरे यांच्या मृत्यूचे दुःखकारक वृत्त कळवून "निवडणूक कशी थाबविता येईल" अशी पृच्छा केली.

डॉ. लोहोकरे याच्या मृत्यूमुळे आलेला दुःखाचा आवेग कमी होताच त्यानीं आम्हास सागितले कीं, “आत्ताच्या आत्ता [श्री. दि. वा.] दिवेकर याच्या घरी जा, त्याना उठवा व त्याच्याकडून केसरी लायब्ररीतील निवडणुकीबाबतचे नवीन रूलसचे पुस्तक घ्या व मजकडे या.” त्याप्रमाणे आम्ही केल्यावर निवडणुकीच्या नियमाच्या पुस्तकामधील एका कलमाचा आधार त्यांनी दाखविला व ताबडतोब कलेक्टरची भेट घेण्यास सागितले. त्यानतर आम्ही व श्री. रामचद्र गोविंद दडवते वकील, कलेक्टर, यास त्यांच्या बगल्यावर जाऊन भेटलों व योग्य ते ॲफिडेव्हिट दिले. त्याचा इष्ट परिणाम होऊन सरकारी चक्रे फिरू लागली. पण निर्णय लवकर मिळेना. दरम्यान सकाळी स्मशानयात्रा निघाली ती चालू असताच आठ वाजता निवडणुकीचे काम सुरू होऊन मतदान होऊ लागले लोहोकरे याच्याविरुद्ध पक्षाची मतनोंदणीची धादल व त्याची राक्षसी मनोवृत्ति पाहून आम्हासच काय पण सर्वच टिळकपक्षीय गृहस्थास फार वाईट वाटले. पण लोहोकरे याची स्मशानयात्रा बुधवारात फरासखान्याशेजारीं असलेल्या निवडणूक-मडपाजवळ येण्यास व तेथे निवडणुकीचे काम थाबविण्यात आले याची ओळख पटविणारा घटानाद होण्यास एकच वेळ आली कलेक्टर, कमिशनर, गव्हर्नर याची वाटाघाट होऊन निर्णय घेण्यास इतका वेळ साहजिक लागला या निवडणूक-तहकुबीने आमच्या प्रयत्नाचे साफल्य झाल्याचे समाधान आम्हास लाभले, पण त्याचबरोबर तात्यासाहेबाच्या दीर्घ वाचनाचा, स्मरणशक्तीचा व समय-सूचकतेचाहि अनुभव येऊन त्याच्याबद्दलचा आमचा आदर दुणावला.

(३) तळेगाव-दाभाडे येथील मशिदीवरून सवाद्य मिरवणूक नेण्याच्या हक्का-वर गदा आल्याने सन १९२७ साली आमच्या नेतृत्वाखालील तेथील लढा रगला होता. टाळ, वीणा किंवा मृदुग या पाच वाद्यापैकी कोणतीहि ५ वाद्येच वाजवावींत असा अधिकाऱ्यांचा मुसलमानास खूष करण्याच्या दृष्टीने विक्षिप्तपणाचा आग्रह होता व ही गोष्ट मानण्याचे तळेगावच्या हिंदूनी साफ नाकारले होते व शातताभग होण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली होती.

या वेळी तात्यासाहेबाकडे त्या वेळच्या कलेक्टरचे (टयूडर ओवन हे त्याचे नाव) पत्र आले. त्यात त्यानी लिहिले होते की, डावरे व गुजाळ याना आवरा, समजावून सांगा व एक वर्ष माझ्या म्हणण्याप्रमाणें घड्‌ द्या म्हणजे पुढील वर्षी तुमच्या म्हणण्याचा विचार पूर्ण सहानुभूतीनें करण्यात येईल.

तात्यासाहेबानी ते पत्र आमच्याकडे पाठविलें. आम्ही तात्याना स्पष्ट कळविले की, कलेक्टरवर आमचा विश्वास नसून त्याच्या म्हणण्याचा विचार कर-ण्याची आवश्यकता आम्हांस वाटत नाहीं. कलेक्टरचे म्हणणे आम्हास मान्य

नाहीं. पण आमचे पुढारी या नात्याने आपण काही आज्ञा करीत असाल तर ती मात्र आम्ही मान्य करूं.

आमचे ते पत्र ! •. . ती. • ' कलेक्टराकडे पाठविलें. ते कलेक्टरनें पाहिल्यावर पुन्हा त्याने तात्यासाहेब व अण्णासाहेब भोपटकर यांच्याशीं वाटाघाट चालविली या वेळी तात्यासाहेबांच्या मुत्सद्देगिरीचा चांगला उपयोग झाला व त्याचाच परिणाम म्हणून कलेक्टरने ता ७ सप्टेंबर १९२८ रोजी मुसलमानास उद्देशून स्पेशल ऑर्डर काढून तळेगावच्या मुसलमानाना स्पष्ट कळविलें की, "हिंदूंची सदर रस्त्याने वाद्ये वाजवीत जाण्याची वहिवाट अडीचशे वर्षांपासून आहे. हल्ली जेथे मशीद आहे त्या ठिकाणी ५० वर्षांपूर्वी मशीद नव्हती. त्या जागी एका हिंदूचे दुकान होते व त्या दुकानाचे रूपांतर मशिदीत करण्यात आलें हिंदूच्या हक्कांत ढवळाढवळ करण्याची डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटची मुळींच इच्छा नाहीं. हिंदूंची कोणतीहि आगळीक नसता तुम्ही मुसलमानच भांडणे उकरून काढता तुमच्यावर हिंदूंना बहिष्कार घातला तो तुमच्या कृत्यामुळेंच तुम्ही ओढवून घेतला आहे यापुढे हिंदूंविरुद्ध आगळीक केल्यास तुम्हांस योग्य शासन करण्यात येईल"

यानंतर लवकरच तळेगाव येथील हिंदूचे वाद्याबाबतचे हक्क अधिकाऱ्यांनीं बिनतक्रार मान्य केले, व तळेगांवच्या मिरवणुकी पूर्व वहिवाटीस अनुसरून मशिदींवरून सवाद्य जाऊ लागल्या व आजहि जात आहेत

कलेक्टर काहीहि म्हणणे ( हिंदूतर्फे ) मान्य करण्यास तयार नव्हता व हिंदूवर जुलमाचा वरवंटा फिरवीत होता त्याच कलेक्टरला वठणीवर आणण्यास तात्यासाहेबांची मुत्सद्देगिरीच या वेळीं उपयोगीं पडली पण "तुम्ही जोर धरला, गुंजाळांनीं पाठपुरावा केला, म्हणून हिंदूंना यश लाभलें", असें म्हणून श्री. तात्यासाहेब यांनीं सर्व श्रेय इतरांस देऊन टाकलें, हें या वेळीं आमच्या निदर्शनास स्पष्टपणे आले मनाचा मोठेपणा यापेक्षां दुसरा कोणता असूं शकेल?



## वि. ग. पटवर्धन

( बी. ए., एलएल्. बी., मुनसफ, इचलकरंजी )

( १ ) श्रीमंत बाबासाहेब घोरपडे हे बहुधा उन्हाळ्यांत माधवगिरी या हवा खाण्याच्या ठिकाणा वास्तव्य करीत तेथील मुक्कामांत चार दिवस राहण्यासाठी कोणातरी बड्या गृहस्थास आमन्त्रण देण्याची त्यांची प्रथा असे. तिला अनुसरून १९२८ सालीं त्यांनी तात्यासाहेबांना असेच आमंत्रण दिलें होतें. त्याचा स्वीकार करून तात्यासाहेब आपले चिरंजीव बापूराव यांसह माधवगिरीला राहावयास आले होते

परत जाताना त्याचा मुक्काम काहीं तासच आजऱ्यास होता व तो मजकडे होता. तेव्हा टिळक-चरित्राचा शेवटचा भाग लिहिण्याचे काम चालू होते. त्याबाबत २–३ चकोर मजकूर त्यानी आपल्या चिरंजिवास तोडाने सांगितला, व त्यानी तो लिहिल्यावर लगेच टपालाने पुण्यास रवाना केला यावरून तात्यासाहेबाची निरलसता, वेळ फुकट न दवडण्याचा कटाक्ष व उद्योगप्रियता दिसून येते.

( २ ) तात्यासाहेबाच्या विद्वत्तेचा लाभ आजरेकराना व्हावा अशी श्रीमताची इच्छा होती व तिला अनुसरून छोटी सभा अतिथिगृहात घेतली. तात्यासाहेबानी सहकारी चळवळ या विषयावर चार शब्द श्रोत्याना सांगितले त्या वेळी 'अनाचारो हि मालिन्यम् अत्याचारस्तु मूर्खता' या त्याच्या आवडत्या तत्त्वाला धरून अत्यत सोप्या भाषेत त्यानी विवरण केले. त्या वेळी अध्यक्ष कोणी व्हावे याचे कोडे पडले. सहकारी सोसायटीच्या चिटणिसास अध्यक्ष कोणी दिसेना. श्रीमताची आज्ञा तर होती की, सभा व्यवस्थित झाली पाहिजे तात्याच्या ध्यानात ही अडचण आली व मला सकोच अगर भीति वाटू नये म्हणूनच स्वतः त्यानी मुनसफ अध्यक्ष होतील असे चिटणिसाना सागून त्यांची अडचण व माझा संकोच नाहीसा केला मी तेथे तेव्हा मुनसफ होतो. त्यात तात्याचे सौजन्य व दुसऱ्याची अडचण जाणण्याची सहृदयता दिसून आली.

( ३ ) तात्यांना [illegible] सरकारी मोटार दिली होती. ड्रायव्हर इमाम नावांचा होता त्याला फार वेगाने म्हणजे ताशीं ५०–६० मैलाच्या वेगाने मोटार हाकण्याची खोड होती निपाणीजवळील तवंतीच्या घाटातहि अशीच बेदरकार गाडी त्याने चालविली. तात्यानी पुण्याहून पोचल्याबरोबर लिहिलेल्या पत्रात मुद्दाम श्रीमंतांना सूचना दिली की, हा ड्रायव्हर अगोदर बदला केव्हा अपघात करील याचा नेम नाहीं. तात्यांचें मित्रप्रेम असें होते

( ४ ) नवीन होतकरू लेखकास उत्तेजन देण्याचा गुण तात्यांचा प्रसिद्धच आहे. माझे पहिले पुस्तक 'ब्राह्मणातील बेकारी, कारणे, उपाय' हे मी त्यांच्या कडे अभिप्रायार्थ पाठविलें थोड्याच दिवसात अभिप्राय आला त्यांत त्यांनी पुढील शब्दात मला उत्तेजन दिलें "ब्राह्मणातील बेकारी या विषयाचा इतक्या जिव्हाळ्याने व तपशिलवार विचार करणारें हें एकच पुस्तक माझ्या [illegible] असून, या प्रश्नांकडे जोरानें लक्ष वेधण्याची कामगिरी याने होईल यांत शका नाही" 'युद्धोत्तर समाजरचना' या माझ्या दुसऱ्या पुस्तकातील समाजव्यवस्थेचें प्रकरण फारच आवडले असे लिहून त्यांनीं पृच्छा केली कीं, हुकमी "समाजव्यवस्था कोण करणार?' 'बेकारीचा कृतान्त काळ' हें माझे तिसरें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर त्यानी डॉ. गु. कर्वे याच्यामार्फत मला निरोप पाठवला कीं, लहानसा स्वतंत्र लेख सह्याद्रीत यांच विषयावर लिहा, अवश्य प्रसिद्ध करतों. पण तो योग येण्याच्या आंतच

तात्यासाहेब इहलोक सोडून गेले ! तथापि नूतन लेखकास उत्तेजन देण्यास ते किती दक्ष असत, हे वरील गोष्टीवरून प्रतीत होते; आणि म्हणूनच प्रत्येक नवख्या लेखकास आपला आधारच गेला असें वाटते



## वासुदेव शिवराम कोल्हटकर

### ( राष्ट्रीय कीर्तनकार, संस्थापक धर्मचैतन्य संस्था, पुणे )

( १ ) मी शिवजन्माच्या आख्यानाचे पुस्तक तात्यासाहेबाच्या हस्ते प्रकाशन करावे, म्हणून त्यास विनती करावयास गेलो होतो. पुस्तक छोटेसेच म्हणजे अवघ्या ५० पानाचेंच होते एक अल्पवयस्क कीर्तनकार, मध्यस्थावाचून घेऊन आलेला आणि तात्यासाहेबासारख्या गाढ्या विद्वानाची गाठ ! वरवर पाहता हा केवळ पोरकटपणा होता असेच कोणीहि म्हणेल. पण तात्यासाहेबानी आपल्या हातातले काम बाजूला ठेवून माझे पुस्तक हातात घेतले आणि आपली चपल आणि रहस्यग्राही दृष्टि पुस्तकावरून फिरविली. पाचदहा मिनिटात पुस्तकाचे स्वरूप ध्यानात घेऊन ते मला काही प्रश्न करू लागले त्याचा पहिलाच प्रश्न असा होता की, "तुम्ही पहिले कीर्तन केव्हा केले तें तुम्हास सागता येईल काय?" मी म्हटले, "अगदी बालपणी म्हणजे ७-८ वर्षांचा असताना खेळातच मी कीर्तन करीत असे पण १३-१४ व्या वर्षी मी देवळात कीर्तन केले आहे." हे ऐकल्याबरोबर तात्यासाहेबानी हातातले पुस्तक खाली ठेवले आणि ते मला म्हणाले, "हल्ली तुम्ही स्वतःच रचलेलीं आख्याने किती आहेत ?" तेव्हा मी म्हटलें, "हल्ली मी एक वर्ष सतत असें कीर्तन करू शकेन, इतकी आख्यानें रचलेली आहेत." हे ऐकल्याबरोबर तात्यासाहेबानी आपला चष्मा काढून ठेवला आणि जरा साशकपणाने ते मला म्हणाले, "ही सर्व आख्याने तुम्ही कोठे प्रत्यक्ष कीर्तनात लाविलीं आहेत काय ?" तेव्हा मी म्हटले, "ती मी पुण्यातच रचलीं आणि पुण्यातच प्रत्यक्ष कीर्तनातहि उपयोगात आणिली आहेत" तेव्हा तात्यासाहेब म्हणाले, "कीर्तन हा माझा फार आवडता विषय आहे, पण तो वाटतो तितका सोपा नाहीं. चागला कीर्तनकार म्हणजे पौर्णिमेचा चद्र आहे. त्याला अनेक कला अवगत असाव्या लागतात. असा कीर्तनकार म्हणजे खरोखरच जनतेचा कठमणि झाल्याशिवाय रहाणार नाही. पण या दृष्टीनें कीर्तन विषयाचा अभ्यास केला पाहिजे. तुमचा प्रयत्न स्तुत्य आहे. पुन्हां केव्हातरी मी तुमच्याशी बोलेन."

( २ ) १९४२ मध्यें पुण्याच्या सहस्रावधि श्रोत्यांनी तात्यासाहेबाच्या अध्यक्षतेखाली माझा एक सत्कार-समारभ केला. ज्या सत्कारात आपण अध्यक्ष म्हणून भाग घेणार त्यासबधी अधिकात अधिक प्रत्यक्ष माहिती असणे बरें

म्हणून माझें महिनाभर कीर्तन सुरू असता एके दिवशीं पूर्वसूचना न देताच तात्यासाहेब एखाद्या सामान्य श्रोत्याप्रमाणें अचानक कीर्तनास येऊन बसले कीर्तन संपल्यावर ते माझ्याशी तेथेंच बराच वेळ बोलत बसले होते. माझ्या कीर्तनाबद्दल ते काय म्हणाले तें मला सांगायचे आज कारण नाही परंतु सामान्यपणें कीर्तनाबद्दल आमचा जो संवाद झाला त्यातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे.

तात्यासाहेब म्हणाले, " कलेच्या दृष्टीने सामान्यतः मी नाटकाच्या खालोखाल कीर्तनाला महत्त्व देतो; आणि असामान्य कीर्तनकाराच्या कीर्तनाला कलेच्या दृष्टीनें देखील मी नाटकापेक्षा अधिक श्रेष्ठ समजतो मात्र खरोखरच ते असामान्य असायला हवे. असे कीर्तन आणि नाटक एकाच वेळी असतील तर नाटक सोडून मी कीर्तनालाच आधी जाईन "

मी म्हटले, " कीर्तनातील संगीत, विनोद आणि वक्तृत्व यासंबंधी आपले काय मत आहे ? " तेव्हां तात्यासाहेबांनी नेहेमीच्या त्यांच्या स्वभावाप्रमाणें यासंबंधीं एक सुंदर उपमा दिली. ते म्हणाले, " कीर्तन हे सरोवर धरले तर वक्तृत्व हे त्यांतील निर्मल उदक आहे. कमळे हे त्यातील संगीत आहे आणि त्यात मधूनमधून गुंजारव करणारे भ्रमर हा विनोद होय कीर्तनात उत्तान शृंगार तर नसावाच, पण उत्तान विनोदहि ।।।।। सहसा नसावा कीतनकाराची भूमिका नटापेक्षा फारच उच्च असावयास पाहिजे आणि हेच नाटकात आणि कीर्तनात खरे महत्त्वाचे अंतर आहे "

मी म्हटले, " काही लोक कीर्तनात आधुनिक चालीची पदे नसावीं असे म्हणतात; त्याबद्दल आपले काय मत आहे ? " तेव्हा तात्यासाहेबानी मला विचारले की, " आधुनिक चाली नसाव्या की आधुनिक पदे नसावी ? आक्षेपकाचे म्हणणें तरी काय ? ते जर आधुनिक पदेच नसावी असे म्हणत असतील तर आधुनिक जगात त्यांनी रहावेच का हे मला समजत नाही, आणि ते जर आधुनिक चाली नसाव्या असे म्हणत असतील तर मी त्यांना असे विचारीन की, चालीनी बिचाऱ्यानी काय केले आहे ? रसनिर्मितीला अनुकूल अशा चाली निवडून जर कोणी त्याच्यावर रसाळ पदे केली तर ते भूषणास्पदच होईल. मात्र एखादी विरुद्ध रसाला पोषक अशी लोकप्रिय चाल ज्या प्रसंगांत गावयाची असेल त्या प्रसंगात त्या चालीच्या मूळ पद्यस्मरणाने विरुद्ध रस निर्माण न होण्याची वक्त्याने काळजी घेणे अवश्य आहे आता स्वतःला काव्यशक्ति नाही म्हणूनच दुसरा कोणी कविता करीत असेल, त्याच्यावर कांही तरी करून टीकाच करावयाची एवढ्याचसाठी जर कुणाला टीका करावयाची असेल तर बोलणेंच खुंटले. तात्पर्य, तारतम्य हें सर्वांस, सर्व ठिकाणी, लागू पडणारे तत्त्व आहे, हे लक्षात असलें पाहिजे "

( ३ ) एकदा मी सहज पुष्करिणीच्या पवित्र जलाचा घोटभर तरी आस्वाद घेऊन यावे म्हणून तात्यासाहेबाकडे गेलो. तेव्हा माझ्या सुदैवाने तात्यासाहेब ज्ञानेश्वरीहृदय या पुस्तकाची मुद्रिते तपासीत होते त्यावेळी तात्यासाहेब अगदी मोकळ्या मनाने आपले हृद्गत मोकळे करीत माझ्याशी बोलू लागले ते म्हणाले, "मी जे ज्ञानेश्वरीवर लिहीत आहे त्याचा अर्थ फार वेगळा आहे. मी जें ज्ञानेश्वरी-संबधी लिहिले आहे त्याहून अधिक ज्ञानेश्वरीत काही नाही असा त्याचा अर्थ नाही. अथवा या विषयात मी पारगत झालो आहे, असेहि मला वाटत नाही. तुम्ही म्हणाल, मग तुम्ही हे लिहिता कशाला ? पण असे पहा की, माझ्याहूनहि अधिक कळणारे जसे काही लोक असतीलच, तसेच माझ्याइतकेहि न कळणारे काही आहेतच की नाही ? त्याना माझ्या या लिखाणाचा उपयोग झाल्यावाचून रहाणार नाही; आणि हे पाहा, तुम्हाला मी एक सागून ठेवतो ते लक्षात असू द्या ज्या विषयाचा आपणाला अभ्यास करावयाचा असेल, त्या विषयासबधी आपण काही तरी लिहावयाचे आहे असे ठरवावे म्हणजे त्या विषयाचा अभ्यास अधिक चांगला होतो माझ्या पुष्कळ लिखाणाला हा नियम मी लागू केलेला आहे. ग्रथकार म्हणून ग्रथ लिहावयाचा अशा आढ्यतेने मी कोणतेच लिखाण केले नाही."



## गोविंद गणेश भागवत

( निवृत्त सस्कृत शिक्षक, संस्थान बडोदें )

( १ ) सन १८९२ सालची गोष्ट. सातारा न्यू इग्लिश स्कूलमध्ये ( रा जोशी यांच्या ) मी मॅट्रिकच्या वर्गात विद्यार्थी होतो. त्या वेळीं सातारा हायस्कूलमध्यें एके दिवशी तात्यासाहेब केळकर यांचें इग्रजीत फारच उत्तम व्याख्यान झालें. त्या वेळी केळकर नुकतेच बी ए होऊन एलूएल् बी चा अभ्यास करीत होते. त्यास मिशीहि फुटली नव्हती द यस्कुलातील शिक्षक मडळी, विद्यार्थी व शहरातील कांहीं ठळक वकील मडळी व इतर शाळेतील विद्यार्थी असा श्रोतृसमाज होता तात्यासाहेबांच्या व्याख्यानाचा विषय "वकिलीच्या धद्यांतील दोष" असा होता हा विषय त्यानी निबधरूपाने लोकापुढे माडला त्यांत त्यानीं या विषयाचें सोप-पत्तिक विवेचन केलें होते त्यावरून त्यांची प्रतिपादनशक्ति कळून आली. विषयप्रतिपादनाची व इग्रजी भाषेची सर्वांनीं फार प्रशंसा केली. व्याख्यान संपल्यानतर हायस्कुलांतील शिक्षक रा रा सदाशिव बापूजी गाडगीळ यांनी भाषण केले त्यात व्याख्यान्याच्या इतर गुणांचे त्यांनीं फारच वर्णन करून ते म्हणाले, "एखाद्या वकिलाच्या अंगीं हे दोष असले तरी सबंध वकीलवर्गावर या दोषाचा आरोप करणे योग्य होणार नाही, हें लहानमूर्ति केळकराच्या ध्यानी

येईलच ! " खासगी रीतीनें पुढे केळकरानी आपली चूक कबूल केली. प्राजळपणा हा त्यांचा जन्मस्वभावच होता.



## रामचंद्र जनार्दन गोखले

(बी. ए., माजी प्राध्यापक, पुणें)

( १ ) तात्यासाहेबाचे वडील बधु कै. नानासाहेब ह्याची १८९१ साली साताऱ्याच्या सरकारी हायस्कुलामध्ये दुय्यम शिक्षक म्हणून नेमणूक झाली, त्या वेळीं माझा त्याच्याशी सबध विद्यार्थी या नात्याने आला, आणि त्याच्या प्रेमळ स्वभावामुळे त्याचा लोभ मजवर जडला पुढे त्याची बदली पुण्यास झाल्यावर १८९७ साली चित्रशाळेजवळील पराजपे याच्या वाड्यात बिऱ्हाडकरू म्हणून एकमेका शेजारी राहण्याचा योग आम्हा दोघाना आला तात्यासाहेब हे पुण्यास याआधीच लोकमान्याचे मदतनीस म्हणून आले होते व १८९७ साली हे दोघे बधु पराजपे याच्या वाड्यात एकत्र रहात असल्याने वडील बधूच्यामुळे माझा तात्यासाहेबाशी परिचय झाला त्या वेळी मी बी. ए चा अभ्यास करीत होतो व मला शिक्षणासाठी पैशाची अडचण पडली म्हणून मी नानासाहेबाच्याकडे कर्जाची मागणी केली. आश्चर्याची गोष्ट की, ती त्यांनी ताबडतोब मान्य केली. कर्जाबद्दल तारण म्हणून मी आपली विमापॉलिसी त्याच्या नावे करून दिली. पण ' तिची जरूरी नाही ' असे त्याचे पूर्वीपासून म्हणणे होते हे त्याचे मजवर उपकार व शेजारी रहाणे यामुळे माझा दोघा बधूशी स्नेह वृद्धिंगत होत गेला पुढें नानासाहेब बदली होऊन धुळ्यास गेले ( त्याचे कर्ज मी वेळेवर फेडले हे सागणे नकोच. )

( २ ) १९०२ अखेर तात्यासाहेबाना व मला नवीन भाड्याची जागा पाहण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. त्या वेळी माणकेश्वरच्या विष्णूजवळील गोळे याचें घर तात्यासाहेबानी भाड्यानें घेतलें व त्यात आम्ही दोघानी आपापल्या जरूरीप्रमाणें जागा वाटून घ्यावी असे ठरले पण एक अडचण अशी उत्पन्न झाली की, त्या घरात दोन स्वयपाकघराची सोय नव्हती तेव्हा नानासाहेबानी असे सुचविलें की, दोघांनी एकाच ठिकाणी जेवण करावे व खर्च अजमासे वाटून घ्यावा त्याप्रमाणे आम्ही व्यवस्था केली व ती उत्तम रीतीने चालली याविषयींचा उल्लेख तात्यासाहेबानी आपल्या 'गतगोष्टी' या पुस्तकात पुढीलप्रमाणे केला आहे – " तो प्रयोग यशस्वी झाल्याचा पुरावा हाच की, गोखले व मी याचा स्नेह व ऋणानुबध आजतागायत अबाधित आहे. नातेवाइकापेक्षा समानशील स्नेह्याचा संबध अधिक टिकतो व सुखप्रद होतो अशी माझी खात्री आहे. " ( पृष्ठ २०३ ).

( ३ ) दोन वर्षानतर १९०४ अखेर माझी नेमणूक नाशिक हायस्कूलमध्ये

झाल्यावर ही व्यवस्था बद पडली. त्या वेळेपासून केळकर कुटुब हे आमच्या नातेवाईक कुटुबासारखे झाले आहे आम्ही एकत्र रहात असतां तात्यासाहेबाचे वडील व मातोश्री मधूनमधून रहाण्यास येत असत वडील हे अत्यत सात्त्विक वृत्तीचे होते. मातोश्री या इतक्या सुस्वभावी होत्या की सुनाना त्या आईप्रमाण वाटत असत.

या दोन वर्षाच्या कालात तात्यासाहेबाचे जे स्नेही आमच्याकडे येत असत, त्यापैकी कै श्री कृ कोल्हटकर याची [illegible] मला विशेष आहे. कारण या दोघा स्नेह्यांची बैठक म्हणजे हास्यविनोदाची एक अप्रतिम मैफल असे.

( ४ ) क्रिकेट, टेनिस, बिलियर्ड्स हे सर्व खेळ तात्यासाहेब खेळले आहेत. क्रिकेटच्या एका मॅचमध्ये ते आपल्या [illegible] सुमारास खेळण्यास आले होते असे मला आठवते



## ग. वि. कौजलगी

### कॉंग्रेस-कार्यकर्ते, इगळी, जि. विजापूर )

( १ ) इस्लामपूर, तालुका वाळवे, जिल्हा सातारा येथे मी कांग्रेसच्या [illegible] कार्य करीत असता तात्याशी विरोधाचे अनेक प्रसग येत. तात्यानी महाराष्ट्र प्रातिक कॉंग्रेस [illegible] राजिनामा सादर केला, त्या वेळी वाळवे तालुक्यातील सर्व प्रातिक कॉंग्रेस [illegible] सदस्यांच्या सहीने ' तात्याचा राजिनामा मजूर करावा ' असे जाहीर पत्रक काढून मी महाराष्ट्र प्रातिक कॉंग्रेस कमिटीच्या सभेत वाटले होते वाळवे तालुक्यातील बत्तीस शिरोळे येथील नागरिक कै बाळाजी दामोदर हसबनीस यानी आपल्या इस्टेटीतून मला काही मदत मिळावी, अशी इच्छा आपल्या मृत्युसमयी प्रकट केली त्या वेळी मी नागपूर राष्ट्रीय झेडा सत्याग्रहानिमित्त अकोला जेलमध्ये होतो. कै हसबनीसाना आपल्या इस्टेटीपैकी एका जमिनीचे बक्षिसपत्र तात्याच्या नावे केले होते तात्याना कै. हसबनिसाच्या वारसाकडून ते समजल्यावर त्याना मी काही सुद्धा विचारले नसता त्यानी मला खालीलप्रमाणे पत्र लिहिले

" कै. हसबनीस यानी मला बक्षिस दिलेल्या जमिनीची विक्री करून त्याच्या किंमतीचा विनियोग त्याच्या वारसाच्या विचारे तुम्ही जसा करावयाचा ठरवाल त्यास माझी मान्यता आहे "

वास्तविक कै. हसबनिसानी या जमिनीचे बक्षिसपत्र वैयक्तिक तात्याच्या नावे केले होते मला त्याची मदत करण्याची इच्छा असली तरी ती त्यांच्या इतर इस्टेटींतून करावी असे त्याना सहज म्हणता आले असते. याच [illegible] मी त्यांना काही

विचारले नव्हते. विरोधी मताच्या कार्यकर्त्यासंबधी त्याचे अशा प्रकारचे औदार्य व सचोटी प्रकाशित करणे हे मी माझे पवित्र कर्तव्य समजतो



## रघुनाथ विष्णु साठे

(रावसाहेब, सेवानिवृत्त सरकारी अधिकारी, पुणे)

(१) माझ्या मुलीच्या लग्नाकरिता मी स्थळे शोधित होतो. मी एकदा तात्यासाहेबाच्याकडे त्याच्या नातेवाईक मुलाची चौकशी करण्यास सकाळी गेलो. तात्यासाहेब लिहित बसले होते मला पाहून त्यानी पेन खाली ठेविलें व माझ्या कामाविषयी विचारपूस करून मला पाहिजे असलेली माहिती पत्र पाठवून मागवितो व नंतर कळवितों असे सौजन्याने त्यानी सागितले व त्याप्रमाणे माझ्या पत्त्याची नोद व काम आपल्या डायरीत लिहून घेतली एवढेच नव्हे तर, काम ताबडतोब व्हावे म्हणून लागलीच एक कार्ड जलद लिहून माझ्याजवळच पोस्टात टाकण्यास दिले उत्तर आले म्हणजे तुम्हास कळवितो असे सागून माझी बोळवण केली. मला धन्य वाटले की, एवढा मोठा राजकारणी गृहस्थ, त्याच्याकडे मी एका खाजगी बाबतीत गेलो व त्यानेहि प्रेमळपणाने माझे काम पाच मिनिटात आढेवेढे न घेता केले! पुढे त्याना समजले की, पत्र लिहिलेल्या नातेवाइकाचे लग्न ठरले आहे. तेव्हा मला उगीच हेलपाटा पडू नये म्हणून दुसऱ्या दिवशी सकाळी माझ्या घराचे दार तात्यासाहेब स्वत. ठोठावू लागले माझ्या मुलीने दार उघडले, तो समोर तात्यासाहेब! तिला आमच्या घरी त्याचे येणे विस्मयकारक वाटले मी त्याचे स्वागत केले नतर त्यानी येण्याचे कारण सागितले. मी त्यास म्हणालो, माझ्याकरिता श्रम व वेळ खर्च करण्याचे कारण नव्हते. परतु त्यास ते पटले नाही त्याचा येण्याचा हेतु माझी गैरसोय व निराशा होऊ नये असा होता नतर त्याना माझ्या मुलीला हाक मारून व बी. ए ला विषय काय घेतले त्याची चौकशी करून तिच्याकरिता एक नवे स्थळ सुचविले. त्या स्थळाकडे मी गेलो होतो. पण मुलाचे वडील चमत्कारिक स्वभावाचे दिसले म्हणून त्या स्थळाचा नाद सोडून दिला होता तात्यासाहेबाचे त्या घराण्याशी नाते असल्यामुळे त्यानी प्रयत्न करण्याचे अगावर घेतले लगेच ते स्वत. त्या मुलाकडे जाऊन व आमच्या घरी येण्याची वेळ ठरवून, सध्याकाळी मला चिठ्ठीने कळविले की, उद्या सकाळी साडेसात वाजता आम्ही मुलगी पहाण्यास येतो व त्याप्रमाण बरोबर वेळेवर तात्यासाहेब मुलासह माझ्या घरी आले!

माझी व तात्यासाहेबाची पूर्वीची ओळख नव्हती. परतु वरील साध्या गोष्टीवरून त्याचा स्वभाव किती प्रेमळ, परोपकारी व सामान्य व गरजू माणसास कस-

त्याहि गोष्टीत मदत करण्यास तत्पर असे हे दिसून येते. माझ्या मनावर तर त्याचा चिरतन परिणाम झाला



## ज्ञानेश्वर उद्धव मांढरे

( श्रीगुलाबरावमहाराजकृत समग्र ग्रंथाचे प्रकाशक, नामदेव शिंपी समाजाचे एक पुढारी, पुणें )

( १ ) इ स १९११ साली श्रीमत्सद्‌गुरु गुलाबरावमहाराज श्रीक्षेत्र आळदी-करिता पुण्यास आले असता मला बरोबर घेऊन तात्यासाहेब याच्या भेटीस गेले त्या वेळी अनेक महत्त्वाच्या विषयावर त्याचा सुमारे दोन तास मार्मिक प्रश्नोत्तरे झाली स्वार्थसाधु बोलघेवडे समाजसेवक व देशभक्त, तसेच स्वैराचारी लोकाची महाराजाच्या भावर्नी गर्दी सारखी वाढू लागली; तेव्हा तो उपसर्ग टाळावा म्हणून 'गुरु व शिष्य' हा लेख लिहून महाराजानी केळकराना पाठविताच तो त्यानी केसरी ता ८–१०–१९१२ च्या अकात प्रसिद्ध केला महाराजाच्या पश्चात् त्याच्या ग्रथाच्या प्रथम आवृत्तीचे अठरा भाग अल्पावधींत सपून अगदी दुर्मिळ झाल्यामुळें तात्यासाहेबानी स्वतः पुढाकार घेऊन "श्रीगुलाबराव महाराज याचे ग्रथ" ह्या मथळ्याखालीं स्वतःच्या सहीने प्रकट विनती केसरीत ता १४–१–१९३६ रोजी केली स्वतः साहित्यसम्राट्, बुद्धिप्रामाण्यवाद्याचे कट्टर पुरस्कर्ते, प्रत्येक महत्त्वाची गोष्ट स्वानुभवाच्या कसोटीस लावून पाहणारे असे तात्यासाहेब वरच्यावर लोकाना सागत की, "विसाव्या [illegible] जगाचे डोळे [illegible] जन्माध सतविभूति म्हणजे वऱ्हाडचे एक श्रीगुलाबराव महाराज होते व त्यांचे ग्रथ म्हणजे एक ज्ञानकोशच झालेला आहे" महाराजाच्या द्वितीय आवृत्तीच्या अनेक ग्रथास प्रस्तावना लिहून त्याशिवाय केसरी व सह्याद्रीत स्वतत्र लेख लिहून तात्या-[illegible] आम्हास जी ग्रथप्रकाशन-कार्यात सक्रिय सहानुभूति दाखविली त्या-मुळेच महाराजाच्या एकूण पासष्ट ग्रथापैकी आम्हास द्वितीय व तृतीय आवृत्तीचे काम हाती घेण्याम सुलभ झाले देव, धर्म व सत ह्यांबद्दल त्याची श्रद्धा अशी डोळस व दाडगी होती.

( २ ) "श्रीज्ञानेश्वराचे विभूतिमत्त्व" हा तात्यासाहेबांचा हृदयस्पर्शी व सस्मरणीय लेख 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' ग्रथात प्रसिद्ध झाल्यापासून ग्रथसम्राट् ज्ञानेश्वरीवर साहित्यसम्राटानी स्वतत्र ग्रथ लिहावा असा मी त्याच्याजवळ हट्टच घेऊन बसलों तेव्हा त्यानी ज्ञानेश्वरीचे वाचन व लेखन सुरू केले ज्ञानेश्वरीवर आमचे वाचन व लेखन चालू असता त्यानी एक मार्मिक प्रश्न काढला कीं, ज्ञानेश्वरीच्या अनेकाच्या अनेक प्रतींत अध्यायवार ओव्याची सख्या

निश्चित नाही, कोणती ओवी अस्सल व कोणती प्रक्षिप्त ओळखावी ? नंतर त्यांना सांगितले की, " भगवान् श्रीज्ञानेशाची ओवी अगदी अर्थपूर्ण, सूत्रबद्ध, प्रासादिक, ठाशीव व मुख्यतः पूर्वीच्या तीन चरणापेक्षा चवथा चरण कमी अक्षरांचा असतो." त्याना वरील माझे म्हणणे पटताच तसे मला पत्राने कळवून लागलीच जुलै १९४५ च्या 'सह्याद्रि' अंकात " एक शंकानिरसन " हा स्वतःचा लेख त्यांनी प्रसिद्ध केला पुढे लवकरच त्याचा " ज्ञानेश्वरी सर्वस्व " ग्रंथ छापण्यास सुरवात झाली त्यांतील गद्य साराशाची मुद्रिते त्यानी मला पाहाण्यास दिली ज्ञानेश्वरीचा तो गद्य साराश अगदीच त्रोटक व अपुरा झाल्यामुळे त्यात थोडी अधिक भर घातली तर बरे होईल, असे सुचविताच त्यानी पुढील सर्व काम प्रेमाच्या नात्याने मजवरच टाकले. त्याचा हा विनय अगदी अभूतपूर्वच होता. ते एवढे मोठे साहित्यसम्राट् एम्. ए, पीएच्. डी. परीक्षाचे परीक्षक व मी तर अगदी सामान्य शेवटच्या दर्जाचा मनुष्य ! पण तात्यासाहेब अत्यत गुण-ग्राहक, निरभिमान बुद्धीचे, प्रेमळ व उदार मनाचे होते म्हणूनच त्यानी मी लिहिलेली पुरवणी जशीच्या तशीच आपल्या ज्ञानेश्वरी-सर्वस्व ग्रथात छापली, शिवाय माझे गुरुबधु नागपूरचे सुप्रसिद्ध भगवद्भक्त वकील श्री. द. ग खापर्डे, एम्. ए, एल्‌एल्. बी. याना लिहिलेली ज्ञानेश्वरीची विषयवार व वर्णानुक्रमवार सक्षिप्त सूचि छापून आपल्या ज्ञानेश्वरी-सर्वस्व ग्रथात येवढी मोठी जागा देऊन व त्याऐवजी स्वतःचा तेवढा मजकूर कमी करून आम्हास निरतर उपकृत व धन्य केले: येवढेच नव्हे, तर त्याच ग्रथात उलट आमचा गौरव करून त्यानी आभार प्रदर्शित केले आहेत ! ! भगवद्गीतेत . . ' . ' . ती सात्त्विक निरहकारादि दैवी सपत्ति पाहून मन आश्चर्यचकित होते !

( ३ ) तात्यासाहेब याचा व माझा परिचय आज ४-५ वर्षांचा आहे. कामानिमित्त मी वरचेवर त्याच्या घरी जात असल्यामुळे आमचा घरोबा उत्तरोत्तर वाढतच राहिला ता ५-९-१९४३ रोजी मी सकाळी त्याच्या घरी गेलो असता " प्रो. पिपळखरे यानी काढलेल्या श्रीसद्गुरु गुलाबराव महाराज याच्या भव्य तैलचित्राचे दर्शन घेण्यास मी आज तुमच्या घरी येणार आहे ", असे ते म्हणताच मला मोठा आनद झाला त्या प्रसगी काही सुप्रतिष्ठित पुढाऱ्यास आमत्रण मी दिल्यावरून ती सर्व मडळी हजर राहून दुधात साखर पडल्यासारखे झाले माझे दिवगत मित्र प ना. पाटसकर याच्या आठवणी "नाथस्मृति" ग्रथात लिहून देण्याबद्दल विनती करताच तात्यासाहेबानी त्या तावडतोब लिहून पाठविल्या माझ्या ज्येष्ठ पुत्राची मृत्युवार्ता कळताच ( ता २०-३-४६ ) तात्काळ अगोदर ठरलेल्या महत्त्वाच्या सर्व कार्यक्रमास फाटा देऊन माझ्या घरी येऊन मुद्दाम प्रमाणे आम्हा उभयतांचे त्यांनी सात्वन केले व स्मशानयात्रेसहि काही वेळ हजर राहिले ! त्या वेळी

मनमोकळेपणाने बोलण्याची साधि न मिळाल्यामुळे दुसऱ्या दिवशीं मुद्दाम माझ्या घरी पुन्हा आले प्रत्यक्ष मायबापापेक्षांहि अधिक त्याचा तो अलोट, निरतिशय व निष्काम अतःकरणाचा जिव्हाळा पाहून त्या सर्वांबद्दल आमचे अतःकरण वरचेवर कृतज्ञतेने भरून येते !



## एस्. एम्. जोशी

( बी ए., एलूएलू. बी., कॉग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचे पुढारी, पुणें )

( १ ) ' · ' ।· आणि माझी अगदी शेवटची भेट घडली तोच प्रसग मला प्रथम आठवतो. पुण्याचे रावसाहेब किराड याच्याकडे श्री. अच्युतराव पटवर्धन याच्याबरोबर तात्यासाहेब केळकराना श्री. किराड यानीं भोजनासाठी बोलाविले होते. मी, नारायणराव गोरे, ह. मो. जोशी इत्यादि मंडळीहि होतीच. भोजन चालू असताना आमच्या गप्पा चालू होत्या. सर्वोदयवाद, गाधीवाद, उदारमतवाद, समाजसत्तावाद इत्यादि तत्त्वप्रणाली-सबधी काहीशी विनोदाने तर थोडीफार गभीरपणाने बोलणी सुरू होती. बोलता बोलतां, हा वाद खरा की तो वाद खरा असा प्रश्न निघाला. तेव्हा तात्या-साहेब हसत हसत म्हणाले, “ हे पाहा, यात ‘सत्तावाद’ हा खरा, मग त्याच्यामागें शेपूट कोणतेंहि लावा समाजसत्तावाद म्हणा की मोठे नाव देऊन आत्मसत्तावाद म्हणा सर्वांचें मर्म एकच ! ” त्याचे हे वाक्य ऐकून आम्ही सर्वच मोठ्याने हसलो आणि तो वाद सपला तात्यासाहेबाच्या त्या विधानात किती गभीर अर्थ भरलेला आहे याची प्रचीति मला वेळोवेळीं येते आणि त्या वेळीं तात्यासाहेबांच्या त्या वचनाची आठवण झाल्यावाचून राहत नाही.

( २ ) असाच एकदा सध्याकाळच्या वेळीं तात्यासाहेबांच्या भेटीसाठी मी त्याच्या बगल्यावर गेलो होतो थोडा वेळच त्याच्याबरोबर इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या. परतु त्या प्रसगीं तात्यासाहेबानी महात्मा गाधीच्यासबधीं जे उद्-गार काढले त्याचे विस्मरण मला कधीहि होणे शक्य नाही. गांधीजी त्या वेळीं नौखालीची यात्रा करीत होते. देशातील परिस्थितीबद्दल सहाजिकच प्रश्न निघाला. तात्यासाहेब अगदी मोकळ्या मनाने बोलत होते. टिळकाच्या पुण्यतिथीला सर्व पक्षांची एकत्र सभा व्हावी म्हणून जो प्रयत्न झाला आणि मागाहून तो बेत रद्द करण्यांत आला त्यासबधीं ते बोलत होते. बोलतां बोलतां ते म्हणाले, “ लोकाना वाटते की, मी गाधींचे मोठेपण ओळखीत नाहीं. परतु तें खरे नाही. गांधींनीं फार मोठी कर्तबगारी केली आहे. आजच पाहाना. एवढ्या उतार वयात तो म्हातारा नौखालीस जाऊन कांहीं तरी प्रयत्न

करतो आहे त्याच्यापेक्षा जीं माणसे वयाने कितीतरी लहान आहेत अशाना देखील ही धकाधक्की सहन होऊ शकत नाही अरे, मोठा तो केव्हाहि मोठाच. मतभेद असले म्हणून काय झाले? जे चागले ते केव्हाहि चांगलेच म्हटलें पाहिजे." तात्यासाहेब आणि महात्मा गाधी यांच्यामध्ये काही तरी मानसिक अढी बसलेली आहे अशी माझी कल्पना असल्यामुळें गाधीजीच्याबद्दल त्याच्या मुखातून ही भाषा येईल अशी मीं कधीच अपेक्षा केली नव्हती. परतु त्याचे बोलणे ऐकून मला आनदाश्चर्य वाटले कारण गाधीजाचे मोठेपण मान्य करून त्यानी आपले स्वतःचे मोठपण सिद्ध केले होते तात्यासाहेबाच्याबद्दल माझ्या मनातील आदर त्या प्रसगाने कितीतरी पटीनी वाढला

( ३ ) हिंदुस्थानच्या फाळणीला काग्रेसने मान्यता दिली याबद्दल एकदा बोलणे निघाले. मी अर्थातच तीव्र नापसती दाखवून देशात निर्माण झालेल्या जातीय दगलीबद्दल खेद व्यक्त केला तात्यासाहेबहि आपल्याचप्रमाणे बोलतील असे मला वाटले होते; परतु ते म्हणाले, "अरे, आपल्या मनात आहे कीं, सर्व जगात एकच राज्य निर्माण व्हावे. परतु आजच्या परिस्थितीत ते घडून येणे शक्य आहे का? तसेच याबाबतहि समजले पाहिजे कालचक्र हे विचित्र आहे. आम्हींच पूर्वी बंगालच्या फाळणीविरुद्ध चळवळ केली, पण तेच आम्ही आज बगालची फाळणी झाली पाहिजे असे म्हणत आहो! आपण वास्तववादी बनले पाहिजे. जेवढ्या विभागाचे राज्य तुम्हाला मिळणार आहे तो काय लहान आहे? ते तरी तुम्ही चागलें चालवून दाखवा. तूर्त तेवढे केलेत तरी जगात तुमचा फार मोठा प्रभाव निर्माण होईल" तात्यासाहेबांचा दृष्टिकोन किती वस्तुनिष्ठ असे याची यावरून सहज कल्पना येण्यासारखी आहे

( ४ ) "साधनानामनेकता" हे वचन पुष्कळाच्या तोडून मी ऐकले आहे, तसे ते तात्यासाहेबाच्याकडूनहि ऐकले आहे. परतु त्याचा त्या तत्त्वावर खरोखर विश्वास होता आणि म्हणूनच त्याच्यापेक्षा निराळ्या मार्गाचा अवलब करणाऱ्या-बद्दल त्याना खरीखुरी सहानुभूति वाटत असे. यासबधीची एक आठवण देण्या-सारखी आहे. ती गोष्ट तात्याचे त्या वेळचे खासगी चिटणीस श्री. शकरराव आगाशे यानी मला सागितल्याचे स्मरते मीरत कटाचा खटला चालू होता. तात्यासाहेबानीं कम्यूनिझमला अगर समाजवादाला मान्यता दिली नाही. तरी पण ते स्वतः मीरतला गेले आणि कॉ. डागे प्रभृतींची त्यानी भेट घेतली आणि विचारपूस केली नुसती शाब्दिक सहानुभूति व्यक्त करून ते थांबले नाहीत. त्यानी खटल्याच्या खर्चासाठी एक मोठ्या रकमेचा चेकहि डागे याच्या स्वाधीन केला! ही हकीकत मला माझ्या राजकीय जीवनाच्या सुरुवातीसच समजली त्यांच्या उदारमतवादित्वाबद्दल माझी खात्री पटली आणि थोड्याच दिवसांत मलाहि त्याचा चागला अनुभव आला!

(५) मी दुसऱ्या एलएल्. बी. च्या टर्म्स भरीत होतों. पहिल्यापासूनच मी अकिंचन असल्यामुळे खर्चाची नड होतीच. माझे मित्र शकरराव आगाशे मला तात्यांच्याकडे घेऊन गेले. त्यांनीं माझी विचारपूस केली आणि म्हणाले, "हें बघ, मी तुला दरमहा तीस रुपये देवविण्याची व्यवस्था करतों. आमच्या 'मराठा' पत्रांत आठवड्याला एखाद दुसरा कॉलम मजकूर लिही म्हणजे झाले." इतक्या सहजासहजी एका तरुण माणसाला साहाय्य करणारी मंडळी त्या वेळीं तरी फारच विरळा होती पुढे ही व्यवस्था फार दिवस चालली नाहीं कारण १९३२ ची चळवळ सुरू झाली. प्रथम आम्हाला दोन महिने येरवड्यास स्थानबद्ध करून ठेवले आणि मागाहून सोडण्यात आले, तरी आम्हीं पुणें लष्कर हद्दीतच रहावें असा हुकूम आमच्यावर बजावण्यांत आला. कांहीं दिवस अशाप्रकारे लष्करमध्ये राहिल्यावर हुकूम मोडून सत्याग्रह करण्याचे मी ठरवलें. तात्यासाहेबांच्या कानावर गोष्ट घालून ठेवावी म्हणून त्याची भेट घेतली. ते माझ्या निर्णयाला मान्यता देतील अशी आशा मला नव्हतीच परतु चमत्कार असा की, सर्व परिस्थिति त्यांना सांगितल्यावर ते म्हणाले, "माझे मत कांही असले तरी तुझ्या अतःकरण-प्रवृत्तीला मानवेल तेच कर." त्याचे हे शब्द ऐकून मला समाधान वाटलें ज्याला स्वतःच्या उभारीवर पुढे जावयाचें आहे त्याचे पाय ओढण्याची वृत्ति त्यांनीं कधीच ठेवली नाही. शक्य असल्यास प्रोत्साहनच दिले.



## वासुदेव कृष्ण भावे

### (बी. ए., माजी संपादक केसरी, पुणें)

(१) रा. तात्यासाहेब करंदीकर तुरुंगात असता मी सन १९३२ व १९३३ या वर्षी केसरीचा मुख्य संपादक होतो. त्या काळात केळकराच्या मनांत केसरीत ज्या सुधारणा करून घ्यावयाच्या होत्या त्या त्यांनीं घडवून आणल्या केसरी आठवड्यातून एकदा निघत होता, तेव्हां केसरीचा अग्रलेख तीन साडेतीन रकाने होता ते ठीक होतें; परंतु तो आठड्यातून दोनदा झाल्यावर एवढ्या मोठ्या लेखाची जरूरी नाहीं असें त्यांचें मत होते. त्याप्रमाणे मुख्य अग्रलेखाची मर्यादा त्यांनीं दोन रकान्याची घातली व ती पाळण्याबद्दल मला निक्षून सांगितले मुख्य अग्रलेख दोन रकाने, दुय्यम लेख एक रकाना नि स्फुट सूचना दोन रकाने असा दडक त्यांनीं घालून दिला व तो मी व माझे सहकारी यानी शक्य तितका कसून पाळला इतका रेखीवपणा दिसण्यांत अगदीं यांत्रिक स्वरूपाचा झाल्यानंतर कांहीं वर्तमानपत्रांनीं त्यावर टीकाहि केली. अर्थात् तिच्याकडे लक्ष देण्याचें कारण नव्हतें. या बदलाचा

परिणाम असा झाला कीं, पत्रात विषय-वैचित्र्य अधिक आलें व मधल्या पानांत 'ओझरती नजर' हे नवीन सदर घालण्यास जागा मिळाली.

(२) तात्यासाहेब केळकरांनी केसरीचें संपादकत्व सोडल्यावरहि विश्वस्त या नात्याने केसरीशीं त्यांचा निकट संबंध पुढे कांहीं वर्षे होता. त्या काळात आपल्या मताप्रमाणे पत्र चालावे असा त्यांचा विचार मधूनमधून प्रबळ होई व त्याबरोबर ते कांहीं प्रयत्नहि करीत. एकदा थोडे दिवस पत्रांतील मजकुराची सारी व्यवस्था त्यांनी आपल्याकडे घेतली होती. पाश्चिमात्य देशांत मुख्य संपादक पत्रांत स्वतः कांहीं न लिहिता हाताखालच्या संपादकांना कामे वाटून ती त्यांजकडून करवून घेत असतो. या वेळी केळकरांनी तोच प्रयत्न करून पाहिला. ते आपल्या टेबलावर ताजीं वर्तमानपत्रे व मासिकें रोजच्या रोज मागवीत व ती पाहून प्रत्येक संपादकाकडे त्यांच्या आधारें मजकूर लिहिण्यास ती पाठवून देत. मासिकाच्या आधारें लेख लिहिण्याचे काम मजकडे आले. वर्तमानपत्राच्या राज्यांत केव्हां केव्हां असे होते की, अग्रलेखाकरिता महत्त्वाचा विषयच नसतो. तेव्हां एखादा विषय उकरून काढून कशी तरी वेळ मारून न्यावी लागते. ही पद्धत केळकरांना पसंत नसे. अशा अडचणीच्या वेळीं उपयोगी पडण्यासारखे दोन-तीन लेख शिल्लक असावे म्हणजे ते ताबडतोब देता येतात असे त्यांचें नेहमीं म्हणणें असे. शिवाय अग्रलेख ऐनवेळीं लिहावयास न बसता शक्य तर लेखकास एकदोन दिवसांची जास्ती फुरसत दिल्यास त्याजवर नीट विचार करावयास व माहिती मिळविण्यास सांपडून तो चांगला लिहिता येतो, असे ते सांगत व तें खरेंहि असे.



## हरी गणेश फाटक

### ( कॉंग्रेस-कार्यकर्ते, पुणें )

रूसो-जपानी युद्धाचा प्रसंग. त्या युद्धांतील धारातीर्थी देह ठेवलेल्या जपानी सैनिकांच्या विधवांस व मुलाबाळांस मदत करण्याकरिता 'केसरी'नें फंड सुरू केला होता. या फंडामुळे जपानसंबंधी महाराष्ट्रांतील जनतेंत आपुलकीची भावना उत्पन्न झाली होती. या लहानग्या जपानी राष्ट्राने मोठा पराक्रम करून मांचूरियांत रशियन सेनानींना मागे रेटले. तेव्हां रशियाने आपले आरमार दर्यासारंग रोझ्डेस्त्वेन्स्की याच्या नेतृत्वाखालीं जपानवर हल्ला करण्यास पाठविलें. जपानने रशियन आरमाराचा धुव्वा उडविला. आशियातील राष्ट्रानें युरोपियन राष्ट्रांवर आरमारी युद्धांत मिळविलेला हा पहिलाच जय असल्यामुळें, सर्व हिंदुस्थानभर लोकांना मनांतून फार मोठा आनंद झाला. हा आनंद व्यक्त करण्यासाठीं जाहीर सभा भरवावी व जपानचे अभिनंदन करावें या विचाराने मी लो. टिळक यांस

विंचूरकराच्या वाड्यांत भेटावयास गेलों. लो. टिळकाना आमची कल्पना पसत पडली. पण ते म्हणाले, "सभा एका पक्षाची होईल; नेमस्त पक्षाचे पुढारी सभेस येऊ शकतील असे मला वाटत नाहीं" आम्ही लोकमान्यांस म्हणालो की, "आपणाप्रमाणे नेमस्त पुढाऱ्यानाहि आम्ही भेटतो व दोन्ही पक्षाची मिळून सभा होईल असा प्रयत्न करतों" लोकमान्य म्हणाले, "जरूर करा!" तेव्हां ना. गोखले याच्याकडे जाण्याचे आम्ही ठरविले ना गोखले हे मला विद्यार्थी-दशेपासून ओळखत होते तरी पण याबाबत आपण प्रथम तात्यासाहेब यांचे साहाय्य घ्यावे असे मनात योजून मी तात्यासाहेब याच्याकडे गेलो. तात्यासाहेब व ना. गोखले याचा सलोख्याचा सबध होता. 'केसरी'तून ना. गोखले याच्यावर हल्ला होई. पण 'मराठा' पत्रातून – ज्या पत्राचे सपादक त्या वेळी तात्यासाहेब होते – ना. गोखले याच्यावर स्तुतिसुमने उधळली जात! यामुळे ना गोखले याच्या मनात तात्यासाहेबाच्यासबधाने स्नेहपूर्ण [illegible] होता

तात्यासाहेब याना आम्ही आपली कल्पना सागितली लोकमान्याची मान्यता मिळविली आहे. ना. गोखले याची मान्यता मिळविण्यासाठी मी प्रयत्न करीत आहें. आपण ना. गोखले यास पत्र दिल्यास काम होईल, असे म्हणालों. त्यावर तात्यासाहेब म्हणाले, "तुम्ही जसे लो. टिळकाकडे गेला, तसे ना. गोखल्यांकडेहि जा पत्र नको. ते आपली मान्यता देतील असे मला वाटते"

तेव्हा मी ना. गोखले याच्याकडे जाण्यास निघालो. वाटेत ॲक्चुअरी मराठे भेटले त्याना घेऊन आम्ही ना. गोखले यास भेटलों पण लो. टिळकानी भाकित केल्याप्रमाणे ना गोखल्यानी मान्यता दिली नाही! तेव्हा थोडे खिन्न होऊन आम्ही पुनः तात्यासाहेबाकडे गेलो. तेव्हा ते म्हणाले, "तुमची कल्पना मला सर्वस्वी मान्य आहे. आपण जरूर जाहीर सभा भरवू. कोणी जरी आले नाहीं तरी मी अध्यक्ष होतो व अभिनदनाचा ठराव पास करून आपण तो जपानी कॉन्सलकडे पाठवून देऊ." आम्हांस अतिशय आनद झाला आम्हीं जाहीर सभेची खटपट केली सार्वजनिक सभेंत म अण्णासाहेब पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखालीं जपानचें अभिनदन करण्याचा ठराव पास झाला. सभेला खूप गर्दी जमली होती. लो टिळक व तात्यासाहेब याचीं स्फूर्तिदायक भाषणे झाली. या सभेमुळे तात्यासाहेब याना भेटण्याचा मला प्रथम योग आला. तेव्हांपासून त्यांच्या शेवटच्या दिवसापर्यंत तात्यासाहेब यांचा व माझा निकटचा सबंध होता व राजकारणातील माझी मते हीं जरी त्यांना मान्य नव्हतीं, तरी शेवटच्या दिवसापर्यंत त्यांनी मजबरोबर सहानुभूतीचा सबध कायम ठेवला होता तात्यासाहेब यांच्या स्वभावांतील हे वैशिष्ट्य होतें असें मला वाटते



## नारायण रामलिंग बामणगांवकर

( संपादक उदय, अमरावती )

( १ ) यवतमाळला विदर्भसाहित्य समेलन तात्यासाहेबाच्या अध्यक्षतेखालीं झाले. बापूजी अणे स्वागताध्यक्ष होते. श्री. अभ्यकर वकिलाकडे तात्यासाहेब उतरले. स्वागताध्यक्ष व अध्यक्ष याचीं भाषणें झाली. जेवण आटपून मडळी पानसुपारीस बसली नाटकाचा विषय निघाला. तात्याना आपल्या सर्वच नाटकाचीं नांवे आठवत नव्हती. बापूजी अणे ( माधव श्रीहरी ) आठवल्यासारखे करून म्हणाले, " ते एक तुमचे ' व्रात्य माधव ' नाटक ! " तात्यासाहेब लागलीच गभीरपणे उत्तरतात की, " बापूजी, मला माझ्या नाटकाचे नाव पाहिजे होतें. तुमचें नको होते ! " सर्वत्र हशाच हशा "अमात्यमाधव" हे तात्याचे नाटक आहे.

( २ ) "प्रतिभा" पाक्षिकात तात्यासाहेबानी कै. शिवरामपत पराजपे व स्वातन्त्र्यवीर सावरकर याचे वाङ्मयीन परीक्षण केलेला एक लेख लिहिला होता तो मी वाचला त्यानतर मुबईस सरदारगृहात त्याची व माझी भेट झाली त्याच दिवशी ब्राह्मणसभेत तात्याचे व्याख्यान होते. त्याच्याच मोटारींत बसून मीहि निघालो. सदर लेखाचा मी विषय काढला व म्हटले की, आपल्या लेखाचे एक वैशिष्टय मला पटले कोणते ? तर सत्य कथन हे कटु असते असे म्हणतात, पण ते अगदी खडीसाखरेसारखे गोड असते, असे हा लेख वाचून म्हणावे लागते त्यावर तात्या म्हणाले की, " कडवट वृत्तीच्या टीकाकाराने सत्यकथन हे कटु असते, असे म्हटले आहे सत्य हे मुळातच गोड तेव्हा त्याचे कथन तरी कडू कसे होणार ? सत्य ते सत्य व कडू ते कडू हेच खरे ! " ह्यावरून सत्यावर श्रद्धा ठेवून टीका करणारे टीकाकार तात्यासाहेबाना आवडत, असे मला वाटते.

( ३ ) १९३० मधील गोष्ट आहे मी पुण्यातच होतो. सोलापूरला लष्करी सोटेशाही सुरू झाली होती. तत्पूर्वीच बाबूराव गोखले वगैरे केसरी कार्यालयांतील सपादक तुरुगात गेले होते सोलापूर-प्रकरणात केसरीनें झणझणीत टीका केली होती केसरीवर खटला होणार अशा भुमकाहि उठल्या होत्या तत्पूर्वी तात्यांनीहि सत्याग्रह केला होता नाशिकचे एक सद्गृहस्थ माझ्याकडे आले व ते मला तात्याकडे घेऊन गेले हेतु हा की, नाशीकच्या झेंडावंदनार्थ तात्यांनीं यावे. प्रथम या गृहस्थास तात्यानी नाही म्हटले होते हे मला अवगत नव्हते. सदाशिव पेठेतील राहत्या घरीं मी त्या गृहस्थासह सकाळीं तात्यांकडे गेलों. इकडच्या तिकडच्या गोष्टींवरून मी मूळ विषयावर आलो. तात्या लागलीच म्हणाले कीं, " मीं याना कालच नाहीं म्हटलें, आज तुमची मात्रा लागू होईल म्हणून तुम्हांला आणलेलें दिसतें. कालच्या नाहीच्या रोगावर तुमची

होयची मात्रा कशी लागू होईल ? " मी थक्कच पडलो. पण " लोकसंग्रहार्थ जाऊन यावयास हरकत नाही, " असे मी हळूच म्हटले. " मी येथेच राहून केसरी संभाळावयाचें ठरविले आहे. " पुढे मी म्हटले की, " आपणहि तुरुगात गेल्यावर कसे ? " तेव्हा तात्या म्हणाले, " त्याचा विचार आजच करून कसें चालेल ? " " आपण एकदा तुरुंगात जाऊन आल्याशिवाय आपल्या टिळक पक्षाला निवडणुकीच्या दृष्टीनें किंमत नाहीं, " असेहि मी बोललो यावर " टिळक तुरुगात गेल्यानेच टिळक झाले याशिवाय त्याच्यात काही वैशिष्ट्य नव्हतेच, असे समजणारा वर्ग नाहीं असें नाहीं; पण तुरुंगात काय वा तुरुगाबाहेर काय टिळक आपले कार्य करीतच राहिले हें त्यांचें वैशिष्ट्य आपण का अशा लोकाकरिता विसरावे ? " असें तात्या उद्गारले शेवटीं टिळकांच्या स्मरणार्थ एक ट्रस्ट करावयाचा आहे, त्यासाठीं त्यानी वऱ्हाडातील नांवे मला विचारली तीच नांवे पुढे प्रसिद्ध झाली

( ४ ) १९३७ सालच्या निवडणुकीची वेळ होती. मध्यप्रांत-वऱ्हाडमध्ये आम्ही कॉंग्रेस पक्षाशी सहकार्य विशिष्ट अटींवर केलें. लोकनायक अणे यांच्यामार्फत शंकरराव देवातर्फे तसेंच महाराष्ट्रांत व्हावे म्हणून प्रयत्न होता सरदारगृहात सभा भरली तात्यासाहेब आम्हा वऱ्हाडकराप्रमाणेच समेट करावा याच मताचे. मतदान झाले, त्या वेळी आमच्याचसारखें त्यांनीं मत दिलें पण आमचेच म्हणविणारे काहीं मित्र चहापानांत गुतले आणि मतें घेतली तेव्हा दोन मतांनी आमचा समेटवृत्तीचा ठराव नापास झाला. आम्हांस वाईट वाटलें म्हणून एकीकडे तात्यांस म्हटलें, आम्ही वऱ्हाडकरांनी काहीं झाले तरी बापूजी अणे यांच्याच मार्गे जावयाचें ठरविलें आहे. तसें आपल्या पक्षात महाराष्ट्रात असते तर समेटावर वाद उत्पन्न झाला नसता. यावर तात्या म्हणाले कीं, " तुम्हा सर्वांनाच मी स्वातंत्र्य दिले आहे. तुम्ही बहुमतानें जें ठरवाल तिकडे मी साथ द्यावयाचें ठरविलें आहे. अनुयायावर वा मित्रांवर आपली मते लादावयाची नाहीत असा मी निश्चय केला आहें. यशापयशाचा वाली हरी आहे " त्यानतर असेंच अखेरपर्यंत तात्यासाहेब वागत गेले

( ५ ) १ ऑगष्ट १९४७ ला टिळक मंदिरात टिळकानुयायी जमले बॅ. रामराव अध्यक्ष होते १५ ऑगष्टच्या स्वातंत्र्यदिनास गौरवावे याच मताचे आम्ही वऱ्हाडकर होतो. तात्यासाहेबांचे भाषणहि तसेच झाले, म्हणून आम्हांला आनंद झाला. बॅ रामराव व तात्यासाहेब यांच्या भाषणात तत्त्वतः काहींच फरक पडला नाही. पहिला दिवस सपताच तात्यासाहेब, बॅ रामराव व मी एकाच मोटारमधून जेवावयास परतलो. हें असे कसें घडले म्हणून विषय होता. " ईश्वरी सूत्र सर्वत्र एक असते, असे म्हणतात याचा हा प्रत्यय नव्हे काय ? " असा तात्यांनी प्रश्न टाकला व गंभीर मुद्रा केली. अखेर तेथून काही दिवसांनी हें ईशसूत्र हृद-

लोकचे तरी एकाएकी तुटले, हे अनुभवण्याचे आमच्या नशीबी आले. टिळक गेल्यानतर वऱ्हाडने त्याना विशेष साथ दिली असे त्याच्या रेडियोवरील अखेरच्या भाषणात होते वऱ्हाडलाहि तात्यानीं अखेरपर्यंत साथ दिली हेहि तितकेंच खरे. लोकनायक अणे यांच्या काहीं उद्‌गाराबद्दल 'केसरी' मध्ये व 'उदय' मध्यें वाद उभा झाला होता तो चिघळलाहि गेला असता; पण हे "कृष्णार्जुनयुद्ध" लागलीच सपविले गेले! आणि आम्ही मूठभर टिळकानुयायी कोठेहि असलो व कसेहि असलो तरी एकमुखी राहू शकतो हे सिद्ध केले गेले



## मल्लिकार्जुन आप्पाराव पाटील

( वय ८०, कै. वारद यांचे मुनीम, सोलापूर )

( १ ) सातारा येथे इ. स. १९१० मध्ये महाराष्ट्र वीरशैव धर्म परिषद कै. आप्पासाहेब वारद याच्या अध्यक्षतेखाली भरली होती त्या वेळीं मी आप्पासाहेबाच्याबरोबर साताऱ्यास होतोच. कै. दादासाहेब करदीकर, वारद व मी याचा फार परिचय तात्यासाहेब केळकराचा परिचय झाला होता. पण तो फार थोडा होता. पण त्याच वर्षी व त्याच वेळी साताऱ्यात त्याच्या मुलीचें लग्न होते आमचे मालक कै. आप्पासाहेब वारद याना व मला त्यांनी निमत्रण दिले. आम्ही लग्नास गेलों. कै. वारद यांची रीत अशी कीं, कोणत्याहि लग्नास गेले की, आहेर हा न्यावयाचाच. त्याप्रमाणे आम्हीं अखेर आहेर देण्याचा प्रयत्न करूं लागलो. कै. आप्पासाहेबाचा आग्रह हा की, घेतलाच पाहिजे व तात्यासाहेबाचा आग्रह हा कीं आहेर घ्यावयाचा नाही व द्यावयाचा नाही अशी माझी प्रतिज्ञा आहे. तेव्हा यात कै. दादासाहेबानी समेटाचा मार्ग काढला. तो असा की, तात्यासाहेबांच्या मुलास खाऊ म्हणून रुपये शभर द्यावेत अशा प्रकारें त्या उभयतातील वाद मिटविला. हे जेव्हा तात्यासाहेबाना समजलें तेव्हा ते अप्पासाहेबाना म्हणाले की, तुमची प्रतिज्ञा तुम्ही सिद्धीला नेली; पण माझी प्रतिज्ञा मोडली याचे काय? यावर वारद म्हणाले की, आम्ही तुम्हास आहेर केला नाही मुलगा तुमचा असला, तरी मुलगा म्हणजे तुम्ही नव्हे, हे खरे ना? यावर हसत हसत तात्यासाहेब म्हणाले की, "मालाचें नांव बदलले; पण सौदा मात्र तुम्ही केलाच" आम्ही सर्वच हसलो

( २ ) त्या १९१० मध्येच पुढे वीरशैव जगद्‌गुरूचे "व्यासतोल" प्रकरण झडकले. जगद्‌गुरूच्या बिरुदावळीत सोन्याचा व्यासहस्त असतो व त्यावर मिरवणुकीत लिंगायत थुकत, असा लेख केसरीत प्रसिद्ध झाला. ही एकतर्फी खोटी बाजू आहे, असे मी तात्यासाहेबाना लिहिले. तेव्हा त्यानी खरें काय आहे ते लिहून पाठवा असे मला कळविले व त्याप्रमाणे मीं

पाठविलेली माहितीपूर्ण लेख त्यानी केसरीत प्रसिद्ध केला. दुसऱ्या जातीचा, दुसऱ्या धर्माचा व दुसऱ्या पक्षाचाहि ते समतोल भावनेने विचार करीत असें मला त्या वेळी अनुभवास आले पुढे हेच जगद्‌गुरु सोलापूर, बार्शी, पुणें येथें व्यासतोलसह सर्व महाराष्ट्रांत मिरविले. पण मिरवणुकीस कोठेहि कोणत्याहि सबबीवर बंदी झाली नाही आणि त्या व्यासहस्तास लिगायत पूज्य मानतात असेच सर्वांच्या प्रत्ययास आले.

( ३ ) १९१५ मधील केसरीत सोलापूरहून युरोपियनाच्या चहाच्या मळ्यात जाऊन आलेल्या एका गृहस्थाने तेथील हिंदी मजूरावरील जुलुमाचा वृत्तात 'केसरी'त लिहिला होता. तेव्हा तात्यासाहेबाना मळेवाल्याची नोटीस आली की, विधाने परत घ्या, नाही तर फिर्याद करतो तेव्हा तात्यासाहेब मुद्दाम सोलापुरात आले त्याचे बधु माधवराव केळकर तेथेंच त्या वेळी मोठ्या हुद्द्यावर होते. पण ते सरकारी नोकर असल्यामुळे तात्या ग. ब. साठे याच्याकडे उतरले व मला त्यानी बोलावणे पाठवून लेख पाठविणाऱ्यास मला भेटावयाचे आहे, त्यासाठी मी आलो आहे, असे सागितले शेवटी तो गृहस्थ भेटविला. प्रसिद्ध मजकुरास आधार विचारले ते दाखविले गेले तात्यासाहेबाचे समाधान झाले आता ह्या मळेवाल्यानें फिर्यादच करावी असे ते मोठ्या निश्चयाने बोलले पण मी म्हटलें, एवढ्याने फिर्याद चुकली व निर्दोषी सुटाल हे कसे ? यावर ते म्हणतात की, " तो प्रश्न न्यायाचा आहे. पण आपण भक्कम पुराव्यावाचून कोणास दोष दिला नाही ह्यात आपले समाधान आहे ना ? कारण केसरीचा बाणा व लौकिक लक्षात घ्या "

( ४ ) कै वारदाच्या पुण्यतिथीसमारभाला अध्यक्ष करण्याकरिता मी त्यांना समक्षच पाचारण केले होते त्याप्रमाणे त्यांनी येऊन अध्यक्षस्थान स्वीकारलें व आप्पासाहेबाच्या गुणगौरवाचें सर्वोत्कृष्ट असें भाषण केले पदवीधर हाच विद्वान् असतो असें नाहीं, तर विचारग्रहण करून जो आचार करतो तोच पडितापेक्षांहि श्रेष्ठ ठरतो नुसतें पांडित्य व्यर्थ आहे असे ते ह्या वेळी बोलले



## बाळकृष्ण गणेश खापर्डे

( बी. ए., एल्‌एल्. बी., हायकोर्ट वकील, अमरावती )

( १ ) डेक्कन कॉलेजमध्ये विद्यार्थी असतांना मी कांही दिवस खडकीस स्वतंत्र बगला घेऊन राहिलों होतों सन १९०१ सालची गोष्ट असावी. एके दिवशीं रात्रीं कै श्रीमंत सरदार बाबा महाराज यांच्या सदाशिव पेठेंतील वाड्यांतून माझ्या बगल्यावर घोड्याची गाडी आली. गाडीसमागमे एक कारकून होता. गाडी इतक्या रात्रीं आल्यानें मला आश्चर्य वाटलेच. पण कारकुनानें आप-

लेला निरोप ऐकून आश्चर्याची परमावधीच झाली. तो म्हणाला, "आपल्याला तात्यासाहेब केळकरांनी वाड्यांत तावडतोब बोलाविलें आहे ते तेथें येऊन बसले आहेत." अर्थात् मला याचा अर्थच समजेना. तात्यासाहेब केळकर कोण? आणि मला बोलावयाचें कारण काय? आणि इतक्या रात्रीं? व वाड्यांत? मीं त्या गृहस्थाग अनेक प्रश्न विचारले पण ठराविक निरोपापलीकडे तो अधिक काही बोलेना. याला पुष्कळ अधिक माहीत आहे; पण ते तो सागत नाही अशी माझी समजूत झाली व तेच शेवटी खरे ठरलें. मी गेलो वाड्याचा देखावा बराच अपरिचित होता इतक्या रात्री म्हणजे १२–१ वाजता वाडाभर दिवे होते आणि दारावर जाणाऱ्या-येणाऱ्यावर कडक पाहाऱ्याची नजर होती अगणातील जिना चढून पहिल्या दालनात गेलों तेथे एका गादीवर तक्क्याशी टेकून एक तेजस्वी व गौरवर्ण, भरदार चेहेऱ्याचा तरुण पुरुष बसला होता आणि भोवतीं दोन-तीन माणसें सचिंत बसली होती माझ्याबरोबरचा कारकून म्हणाला, "तात्यासाहेब, हे बाबासाहेब आले आहेत" त्याबरोबर हे गृहस्थ अर्धवट उठले व त्याना मला जवळ बसवून घेतले अर्थात् हेच तात्यासाहेब केळकर असा मी सहजच तर्क बाधला बरेच बोलणे झाले. तात्यासाहेबाना पाहण्याचा व त्याच्याशी बोलण्याचा हा माझा अगदीं पहिलाच प्रसग. त्या रात्री कै श्रीमती ताईमहाराज (माझ्या सावत्र सासूबाई) कै बाळामहाराजास दत्तक घेणार होत्या. तत्पूर्वी हल्ली गादीवर असलेले श्री. जगन्नाथमहाराज यास विधिपूर्वक दत्तक घेतलेले असल्यामुळे त्या रात्रीं ताईमहाराजानी दुसऱ्याने बाळामहाराजास दत्तक घेणे अनुचित व बेकायदा आहे ही गोष्ट ताईमहाराजास मीं समजावून सागावी व पुनः दुसरा दत्तक घेण्यापासून त्यास परावृत्त करावे म्हणून मला बोलावण्यात आलें होते, असे तात्यासाहेबानीं मला सागितले टिळक स्वतः पुण्यात नसल्यामुळे इतक्या अपरात्री तात्यासाहेब यास वाड्यातील मडळींनी या महत्त्वाच्या कामाकरिता बोलावून आणिलें होतें असे मला कळले; तेव्हा टिळकाच्या अनुपस्थितीत त्याच्याऐवजीं तात्यासाहेबाची योजना असते हेहि अनुमान मला सहज झाले त्या वेळच्या तात्यासाहेबांच्या बोलण्याचा तपशील देऊन जागा अडवीत नाहीं पण पोटात शिरून त्यांच्या त्या बोलण्याचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. लोकमान्यांकरिता खस्ता खाणाऱ्या त्या पुरुषाबद्दल काही एक विशिष्ट भावना माझ्या मनात उत्पन्न झाली. त्या दिवशी माझ्या मनांत तात्यासाहेबाविषयीं जो आदर उत्पन्न झाला तो उत्तरोत्तर वाढतच गेला माझ्या आयुष्यांत मला जे काहीं महत्त्वाचे व चिरस्मरणीय प्रसग वाटतात त्यापैकी एक, ही तात्यासाहेबाची अशा रीतीने झालेली आकस्मिक भेट होय.

(२) लोकमान्य दिवगत झाल्यानतर एके वर्षी तात्यासाहेबांनी मला लोकमान्यांच्या पुण्यतिथीस उत्सवाचा मुख्य वक्ता म्हणून पाचारण केलें. अर्थात् ही

कामगिरी मी मोठ्या आनदाने स्वीकारली व ठरल्या दिवशी पुण्यास आलो. तात्यासाहेबानी मला स्वत.च्या घरीच उतरून घेतले. त्या वेळी त्याच्या निकट सहवासाचा तीनचार दिवस सुयोग आला व त्यांच्या मनमोकळेपणाचाहि गोड अनुभव आला. त्यानी स्वतः आपले सर्व घर दाखविले व त कसे मिळाले वगैरेची हकीकत सागितली. एका भागांत गवडी व मजूर काम करीतच होते. पुढें कालातराने मला अस कळले कीं, नवीन घर बाधणें अगर जुन्यात फेरबदल करीत असणे हा त्यांच्या करमणुकीचा एक व्यवसायच होता. असो. सध्याकाळी अगणात बैठक टाकून आम्ही अनेक गाष्टीची चर्चा करीत असू; पण जिन्यावर एक लहानशी जागा त्याच्या फार आवडीची होती. तेथे वारा एक सारखा येत असे व तो त्याना फार सुखकर वाटे. एकदोन दिवस आम्ही अगणात बसलो पण त्यानतर तात्यासाहेबानी आपले हृद्गत मला सांगितलें. ते म्हणाले, "तुम्हाला जागेचा सकोच वाटू नये म्हणून मी येथे बसलो. पण माझी नित्याची व आवडीची जागा ही नाही चला आपण जिन्यावर थोडी मोकळी जागा आहे तेथे बसू. मला जागेचा सकोच वाटला नाही; पण सकोचापायी तात्यासाहेबानी माझ्यासाठीं दोन दिवस अडचण सोसली याबद्दल मला सकोच वाटून विषाद वाटला व त्याना तसें म्हणालो देखील पण ते नुसतेच किंचित हसले व वाऱ्यावर हातपाय लाब करून असे सुखानें बसले की, त्याचा मलाहि मनापासून आनद झाला. बोलतां बोलतां राजकारणाच्या गप्पा निघाल्या; आणि तात्यासाहेब मनमोकळे करून आडपडदा न ठेवता बोलत होते. ते म्हणाले, "एकाच गोष्टीचा अभिमान धरून दुसऱ्या पक्षास कःपदार्थ लेखणे मला आवडत नाही. माझ्या मनाची ठेवण तशी नाही. टिळकांची होती. कसें ते सागतो. यांतहि काही गुण आहेत, त्यांतहि काही गुण आहेत; यांतहि दुर्गुण आहेत तसे त्यातहि आहेत; पण सारासार विचार करता एकदरीत सद्यःस्थितीस एवढे ग्राह्य आहे. अशा विचारसरणीस आमच्या येथे काही लोक थट्टेने 'केळकरी' वृत्ति म्हणू लागले आहेत. पण खरोखरी हेच बरोबर आहे. दोन्ही पक्ष स्तुति करू लागले म्हणजे आपले कुठेतरी चुकलें असे गृहीत धरावें व दोन्ही पक्ष नावे ठेवू लागले म्हणजे आपली मध्यस्थाची भूमिका तोलून बरोबर आहे असे समजावे असे मी म्हणत असतो." हें तात्यासाहेब त्या वेळी सहज बोलून गेले; पण मीं स्वतः त्याचा पुष्कळ विचार केला. बरेच दिवस मला हे पटेना. पण अलीकडे मला त्यांत बरेच सत्य आहे, हेंहि एक तत्त्वज्ञान आहे, असे खास वाटू लागले आहे.

❀

# श्रीमंत नारायणराव गंगाधरराव ऊर्फ तात्यासाहेब पटवर्धन

( राजे, मिरज-संस्थानाधिपति, मिरज )

( १ ) तात्यासाहेबांना मी प्रथम पाहिले, ते १९१९ च्या पार्लमेंटरी कमिटी-पुढे साक्ष देण्यासाठी लो. टिळकांच्याबरोबर विलायतेस जाण्यापूर्वी मिरजेस आमच्या वडिलांना व मिरजेंतील त्यांच्या इतर मित्रमंडळींना भेटण्यासाठी ते आले होते त्या वेळी. किल्ल्यांत जामदारखान्याच्या चौकांत आमच्या वडिलांना ते भेटून गेले. मी केवळ दुरूनच, हे एक केसरीसारख्या पत्राचे संपादक व टिळकांचे अनुयायी म्हणून त्यांच्याकडे कौतुकानें पाहत होतो. पुढे बहुतेक १९२४ मध्ये, मी प्रथम पुण्यास त्यांना भेटलो, त्या वेळीं सदाशिव पेठेंतील आपल्या घरीं ते राहत असत. त्या वेळच्या व हल्लींच्या राजकीय परिस्थितींत अपूर्व फरक झालेला आहे. त्या काळांत माझ्यासारख्या इसमानें त्यांना भेटणें हें थोडें धाडसाचेंच असे. पुढें पुण्यास मी गेलों म्हणजे एखादे वेळीं त्यांना भेटत असें. पण १९३३ ते १९३९ पर्यंत मी पुण्यास मुलाच्या शिक्षणा-करितां होतों, त्या वेळेपासून आमच्या विशेष गांठीभेटी होऊं लागल्या. तात्या-साहेबांचें वय, विद्वत्ता व त्यांचा व्यवसाय हें लक्षांत घेतां, वास्तविक त्यांच्याशीं माझें मित्रत्वाचें नातें असण्याचा संभव फारच कमी. परंतु त्यांच्या स्वभावांत अशी एक मौज असे कीं, लहानथोर, विद्वान्, अक्षरशत्रु कोणी का असेना, त्यांच्याशीं ते समरस होऊन वागत. पुढें मी मिरजेस आल्यावर बहुतेक वर्षांतून एकदोन वेळां तरी माझ्याकडे ते चारदोन दिवस मुक्कामास असत. त्या वेळीं अनेक विषयांवर आपले विचार ते प्रदर्शित करीत त्यांच्या वागण्यांत अत्यंत साधेपणा असे आढ्यता त्यांना माहीतच नव्हती. माझ्या घरीं त्यांचा मुक्काम बहुधा तळ-मजल्यावरील खोलींत असे. जिना चढण्या-उतरण्याचा त्रास त्यांना होऊं नये म्हणून व मीहि खालींच राहत असल्यामुळें उभयतांना तें सोयीचें होई.

( २ ) एकदां असेच माझ्याकडे ते मुक्कामास होते. दुसऱ्या दिवशीं सकाळच्या गाडीनें ते जावयास निघाले. मी खोलींत त्यांना भेटण्यास गेलों तों ते सामानाची बांधाबांध करीत होते मी म्हणालों, " बाहेर नोकर आहे तो बांधील ना सामान." त्यावर ते म्हणाले, " अहो, सामान काय, मला फारसें लागत नाहीं. जन्मभर मी असाच गबाळ्यासारखा वागलों इतके दौरे केले, परंतु प्रवासाची व्यवस्था मीं स्वतः कधींच केली नाहीं बरोबर बहुधा अतुकाका असत त्यांनी आमची सेवा किती केली म्हणून सांगूं. ते नसते तर आमचें सामानच काय पण ऐनजिनसी आम्हीहि सांडलों असतों ! "

( ३ ) नक्की स्मरत नाहीं, पण पुण्यास केव्हां तरी संस्थानिकांनीं आपल्या

प्रजेस अधिकार द्यावेत अगर देऊ नयेत अशी चर्चा चालली होती तेव्हां ते म्हणाले, "संस्थान लहान म्हणून प्रजेस अधिकारच देऊ नयेत हे म्हणणे मला पटत नाही सस्थान लहान असो वा मोठे असो, फाशीचीहि शिक्षा देण्याचा अधिकार सस्थानिकाना आहेच. अशा लहान सस्थानिकापैकी कोणी तरी, फाशीचा हुकूम लिहिताना, मी लहान सस्थानिक आहें, सबब आरोपीच्या पचप्राणापैकीं एकच प्राण घ्यावा असा हुकूम कोणी कधी दिला आहे काय ?"

(४) एकदा पुणे येथील अनाथ विद्यार्थिगृह व महाराष्ट्र व्यायाम मडळ या दोन्ही सस्थाना मीं भेट द्यावी अशी इच्छा तात्यासाहेब यानी प्रदर्शित केली पुढे पुण्यास गेल्यावर भेटीस जाण्याचा दिवसहि नक्की ठरला. त्या वेळी मी या सस्थाना काय देणगी द्यावी म्हणून त्याना विचारले. त्यानी थोडा वेळ थाबून कांही एक आकडा मला सुचविला त्यावर मी म्हणालो, "अहो, हा आकडा थोडा कमी दिसत नाही काय ?" तेव्हां ते म्हणाले, "तुमच्याकडून अशा पुष्कळ देणग्या घ्यावयाच्या आहेत. एकदाच घेऊन मोकळे व्हायचे नाही. सोन्याचे अडे घालणाऱ्या कोंबडीची गोष्ट माहीत आहे ना ?"



## शंकर नारायण जोशी

(इतिहास-संशोधक, पुणें)

श्री. भालाकर भोपटकर ह्याच्या मनात तात्यासाहेब केळकराच्या-सबधाने कांही कारणाने (गायकवाडवाड्यात श्रीगणेशोत्सवप्रसगी भालाकारांनीं 'गाधाळ' इत्यादि शब्दयोजना केली व हे तात्यासाहेबाना आवडले नसल्यामुळें त्यानी केसरीत तसे प्रसिद्ध केलें.) बरे नव्हते. पण हे वितुष्ट नसावे असे वाटून श्री. अण्णासाहेब ढमढेरे याच्या घरी उभयता तात्या-भाऊनी यावें व एकदिल आणि निर्मल होऊन जावें असा प्रसग मित्रमडळीनीं योजला दोघेहि आले. तात्या-साहेबांनी प्रथमच व आपणहून बोलण्यास प्रारभ केला व म्हणाले कीं, "भाऊ-साहेब, आपल्या दोघांच्याहि गोवऱ्या आता ओंकारेश्वरी नेण्याची वेळ आली आहे. तेव्हा सगळींच भाडणे मी मिटवीत चाललो आहें आणि त्यासाठी माझे म्हणणें हे की, मींच पदर पसरला आहे. चुका माझ्याच. त्या तुम्ही विसरून जा व आपण दोघेहि यापुढें अकिल्मिष वागू. मी कधी तुमच्याविषयी अभद्र वा विनोदी-सुद्धा बोललोच नाही. करिता एवढेच म्हणतो की, मनातील अढी विसरून जा व मला पदरांत घ्या!!" हे तात्याचे भाषण ऐकून त्याच्या थोर, उदार, प्राजळ व लोकसग्राहक गुणाचें सर्वांनी कौतुक केले व न्या. रानडे यांची ही सुधारून वाढ-विलेली आवृत्ति आहे असे तेथील एका प्रमुखानें उद्गार काढले!



## द. वि. ताम्हनकर

( बी. ए., केसरीचे प्रतिनिधि, लंडन )

( १ ) गु. तात्यासाहेब केळकरांचा अगदी घरच्यासारखा संबंध ते १९३२ साली लंडनला तिसऱ्या गोलमेज परिषदेसाठी आले त्या वेळी आला. पुण्याचा त्यांचा माझा परिचय होताच; पण लंडनला परिचयाची परिणति घरोब्यात झाली. १९३२ ते १९४७ या कालावधीत मी चार वेळा हिंदुस्थानात येऊन गेलो. प्रत्येक खेपेस तात्यासाहेबांची गाठ पुण्यास पडे आणि मनमोकळी चर्चा करण्यास मिळे. त्यांच्याबरोबर तास दोन तास नव्या-जुन्या परिचितांच्या गोष्टी करण्यात आणि त्यांनी वाचलेल्या पुस्तकांविषयी त्यांच्या तोंडून मार्मिक विवेचन ऐकण्यात कसे जात ते कळत नसे.

तात्यासाहेबांची विद्वत्ता त्यांच्या विनयशील स्वभावाने अधिकच शोभून दिसत असे. लंडनमध्येसुद्धा त्यांच्या विद्वत्तेने आणि बहुश्रुततेने चांगलीच छाप बसविली होती असे म्हणावयास हरकत नाही.

( २ ) इंग्लिश राजकारणी लोकांस पहिली भेट तात्यासाहेबांनी दिली ती वेजवुड बेन या माजी भारतमंत्र्याला. १९३१ च्या सर्वसाधारण निवडणुकीत बेनसाहेब पडले होते आणि मजूरपक्ष अधिकारच्युत झाला होता. अर्थातच अशा विगत विधिविशारदाला भेटण्यात काय अर्थ आहे, असें मी त्यांना सहज बोललों. त्यावर तात्यासाहेब म्हणाले, "देव्हाऱ्यात बसलेल्या देवाची पूजा कोणीहि करतो; पण माळावर पडलेल्या देवाला नमस्कार करण्यातच अधिक पुण्य असतें. मि. बेनला भेटावयाचे ते अशासाठी की, त्यांनाहि कळले पाहिजे की, ते अधिकारच्युत झाले म्हणून त्यांची किंमत आम्ही हिंदी लोक कमी समजत नाही."

रात्री ९ वाजता आम्ही बेनच्या घरी गेलो. तेथे बेनने नेमका हाच प्रश्न केला की, "आता मला राजकारणात काही स्थान राहिलेले नसतानाहि मि. केळकर, तुम्ही इतक्या अगत्याने मजकडे आलात यातले रहस्य काय?" श्री. केळकरांनी त्यांना आपली भूमिका समजावून सांगताच बेनलाहि मोठे समाधान वाटले आणि त्याने केळकरांचा हात आपल्या हातात धरून मोठ्या आदरानें त्यांच्याशी हस्तांदोलन केले.

( ३ ) १९३२ साली केळकरांचा सर्व मुक्काम हॅम्प्स्टेड हॉटेलात झाला. सकाळी लौकर उठून चहा घ्यावयाचा आणि लंडनमधली सारीं वर्तमानपत्रें ( त्या वेळी मॅंचेस्टर गार्डियन धरून १० पत्रें आम्हीं घेत असू ) भराभर चाळीत आणि निळ्यातांबड्या पेन्सिलीने खुणा करीत बसावयाचे असा तात्यांचा क्रम. ८ वाजेपर्यंत ते सारीं पत्रें वाचून फस्त करीत व मला लिहावयाचा मजकूर सांगत. आमची

न्याहारी बहुधा श्रेडेड व्हीट (बारीक शेवईची बादिस्त वडी) व दूध, पॉरिज, टोस्ट, लोणी, फळें आणि च्हा अशी असे. दुपारचे व रात्रीचे जेवणहि पुष्कळ वेळां आम्ही हॉटेलातच घेत असू चीज, मलई,-पालेभाज्या व भात त्या दिवसात भरपूर मिळे भाज्या मसालेदार नसत; पण तात्यासाहेब आपले जेवण आवडीनें जेवीत. त्यांना तिखट फारसे आवडत नसावे असा माझा समज आहे

(४) तात्यासाहेबानी अनेक प्रश्नावर गोलमेज परिषदेत भाषणे केली ती ते प्रथम लिहून काढीत आणि काळजीपूर्वक वाचीत काही वाक्पटु सभासद त्याबद्दल त्याची थट्टा करीत. पण तात्यासाहेबाचे त्याना उत्तर चोख असे की, अशा सभातून करावयाची भाषणे 'इम्प्रेशन मारण्यासाठी' नसून आपला मुद्दा साधार सिद्ध करण्यासाठी असतात अर्थातच ती काळजीपूर्वक आपले आधार तपासून आणि प्रतिपक्षाचे मुद्दे अदाज करून लिहून काढून वाचली तर त्यात वावगे काहीच नाही.

आपल्या इकडे भाषणे तयार करून देण्याची प्रथा एकंदरीत कमीच. राष्ट्रीय सभेचे आणि वाङ्मयसमेलनाचे अध्यक्षच काय ते आपली भाषणे लिहून काढून वाचतात. बाकी लोकाचा भर 'एक्स्टेंपोर' बोलण्याकडेच विशेष. इकडे महत्त्वाची भाषणे तयार करण्याची पद्धत सरास रूढ आहे पार्लमेंटातील सारी सरकारी भाषणे आगाऊ तयार करून वाचली जातात. एवढेच काय, पण विख्यात वक्ता म्हणून प्रसिद्ध असलेला विन्स्टन चर्चिलसुद्धां आपली भाषणे लिहूनच काढून वाचतो! श्री केळकराची इग्रजी भाषणे अत्यत मुद्देसूद आणि साधार असल्यामुळे ती फार परिणामकारक होत.

(५) केळकराच्या येथील वास्तव्यात त्यानी ऑक्सफर्डला दिलेली भेट नमूद केली पाहिजे. ख्रिस्तवासी प्रो. एडवर्ड टॉम्सन याच्या खास निमन्त्रणावरून तात्यासाहेब तेथे गेले. मीहि त्याच्याबरोबर होतो. दिवस फारच छान होता. हिवाळ्यात इकडे सूर्यदर्शन होण्याची मारामार; पण त्या दिवशी चागले उन्हच पडले होते असे म्हणावयास हरकत नाही. अशा प्रसन्न वातावरणांत श्री. तात्यासाहेबाची आणि प्रो टॉम्सन व डॉ. गिलबर्ट मरे याची "बोर्सहिल"वर भेट झाली. मरे हा प्राचीन ग्रीक वाङ्मयाचा विख्यात व्यासंगी म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्याशीं तात्यासाहेबानी "ग्रीक ट्रॅजेडी" सबधी महत्त्वाची चर्चा केली. "ग्रीक ट्रॅजेडी" हा विषय तज्ज्ञ विद्वानात अत्यत वादाचा म्हणून समजतात; पण त्यावरहि तात्यासाहेब अधिकारवाणीने बोलू शकतात हे पाहून टॉम्सन व मरे यांनासुद्धा त्यांच्या अष्टपैलू आणि सर्वंकष बुद्धिसामर्थ्याचे कौतुक वाटले असले तर नवल काय!

प्रो. टॉम्सनची इच्छा तात्यासाहेबांनी निदान एक वर्षभर तरी ऑक्सफर्डला

"मराठी" या विषयावर व्याख्याने द्यावीत अशी होती. तो स्वतः बगालीचा प्रोफे-सर होता. पण दुर्दैवाने तो योग आला नाही.

( ६ ) तात्यासाहेब फार मोठे पुरुष होते, पण त्याची वृत्ति लहान मुला-सारखी होती असे म्हटलें तर त्यात अतिशयोक्ति मुळीच होणार नाही. कोठेहि काहीं नवे दिसले तर लहान मुलाच्या कुतूहल-बुद्धीला साजेशा वृत्तीने ते त्या गोष्टीची माहिती करून घेत व कौतुक करीत. आम्ही एके दिवशी लडनमधील एका प्रसिद्ध दुकानात "सेल फ्रि.जेम स्टोअर्स"मध्ये बूट विकत घेण्यासाठी गेलों. "हे दुकान म्हणजे एक रोजचे अजस्र प्रदर्शनच होय" असे तात्यानी तेथे जाताच उद्गार काढले "From a pin to an elephant we sell in this store", असे त्याच्या मॅनेजरने तात्यासाहेबाना सागितले व आपल्याबरोबर त्याने आम्हाला स्टोअर दाखविला. आम्ही स्टोअरमध्ये गेलो तो फक्त एक बुटाचा जोड घेण्या-साठी; पण बाहेर पडलो त्या वेळी आमचे बिल जवळजवळ ५०० रु झाले होते. आम्ही तेथे एक टाइपरायटर घेतला, छत्री घेतली, एक घब्याळ घेतल, काहीं उबदार पायमोजाचे जोड घेतले व एक चिलीमहि खरेदी केली! परत हॉटेलात आलो त्या वेळी तात्यासाहेब मला म्हणाले, "पुनः अशा स्टोअर्समध्ये जाण्याच्या आधी एक यादी तयार करून व पाहिजे तेवढेच – यादीबरहुकूम – खरेदी करून बाहेर पडावयाचे असे ठरवा; नाहीं तर जिन्नस खरेदी करण्याचा मोह पडून दिवाळें वाजविण्याची पाळी यावयाची!" बाकी या अनुभवामुळे येथील जीवनाचा मला एक चागला धडा मिळाला मी तात्यासाहेबास म्हणालो, "येथें घटस्फोटाचे खटले फार होतात. त्याचे एक कारण हे स्टोअर्स असावेत असे माझे मत झाले आहे कारण बहुतेक गिऱ्हाईक स्त्रियाचेच दिसले. मालखपव्या लोकाच्या गोड बोलण्याला फसून त्या बाया हवी तशी खरेदी करीत होत्या घरी बिल गेलें आणि नवऱ्याने तें पाहिले म्हणजे त्याचे डाळे उघडतील." यावर तात्यासाहेब म्हणाले, "अहो, तुम्ही आम्हीसुद्धा जर भलतीच खरेदी करून आलो – ही चिलीमच घ्या, आता ती मी केव्हा ओढणार? पण मोह पडला यात शका नाहीं," असे म्हणत म्हणतच तात्यानी त्यात तबाखू घातला व एक झुरका मारला पण कधीच सवय नसल्यामुळे त्याना ठसका लागला. चिलमीला त्यानीं त्या दिवशी जी रजा दिली ती कायमची. ती अद्यापीहि मजकडे "स्मरण-चिन्ह" म्हणून मीं जतन करून ठेविली आहे!



# मरहूम लॉर्ड सँकी

( मजूर प्रधानमडळाचे लॉर्ड चॅन्सेलर, ३ऱ्या गोलमेज परिषदेचे अध्यक्ष, लंडन )

लेखक – द. वि. ताम्हनकर

( १ ) गेल्या आठवड्यात मरहूम झालेले लॉर्ड सकी यानी श्री. तात्यासाहेबाच्या-विषयी काढलेले उद्गार नमूद करणे जरूर आहे. माझे स्नेही श्री. सदाशिवराव बापटाचे पत्र येताच मी सॅकीना पत्र पाठवून तात्यासाहेबाच्या विषयीच्या आठवणी पाठविण्याची विनती केली पण ते आजारी असल्याचे त्याच्या सेक्रेटरींनी कळविले. म्हणून इकडील रिवाजाप्रमाणे फुलाचा एक मोठा गुच्छ घेऊन मी त्याच्या समाचाराला गेलो त्या वेळी लॉर्ड सॅकी यानी आपल्या क्षीण आवाजात खालील मजकूर सागितला :–

लॉर्ड सँकी म्हणाले, "केळकराचे नाव एक प्रखर बुद्धिवान् आणि म गांधीचे विरोधक म्हणून मी ऐकिले होते अर्थातच अशा विद्वान् माणसाशी मनमोकळेपणाने बोलण्याची सधि मिळावी म्हणून मी त्याना "ऑक्स्फर्ड अँड केंब्रिज" क्लबमध्ये दुपारच्या जेवणासाठी बोलावले ते शाकाहारी असल्याचे मला माहीत होतें; म्हणून मीहि त्या दिवशी शाकाहारच घेण्याचें ठरविले. पण आमच्या वाढप्याला हिंदी शाकाहाराची कल्पना नसल्यामुळे त्याने आमच्यापुढें मासा ठेवला

"श्री. केळकरानी सहज हा काय पदार्थ आहे म्हणून विचारले व मी त्याना हा प्लेस नावाचा मासा आहे म्हणून सागताच ते पोट धरधरून हसू लागले. "मी बहुतेक सर्व तऱ्हेची फळे खातो पण हें 'वॉटर फ्रूट' मला खाता येईल असें मला वाटत नाही," असें त्यानी सागितले. तेव्हा मासा हा जिन्नस शाकाहारात बसत नाहीं असे माझ्या आणि माझ्या वाढप्याच्या लक्षात आले आणि केळकराना दुसरा जिन्नस वाढण्यात आला.

"माशाच्या या लघुविनोदाचा मला फार उपयोग झाला कारण त्यानतर आम्ही Formal सबोधक मिस्टर आणि लॉर्ड याना रजा देऊं शकलो व मनमोकळेपणानें बोलू लागलो. इतक्या वर्षानतर आमच्या चर्चेचा मुख्य विषय काय होता ते आता मला स्मरत नाहीं. पण केळकराचे इग्रजी ग्रथांचे वाचनहि विपुल असावें असे माझें त्या वेळी मत झाले हे मला सागितलें पाहिजे

"विशेषतः वर्ड्स्वर्थ, टेनिसन आणि कीट्स या कवीची कविता आणि चार्लस डिकिन्सच्या कादबऱ्या श्री. केळकरांनीं चागल्याच अभ्यासित केल्या असाव्यात असें त्यांच्या संभाषणावरून मला दिसून आलें गरीब लोकाच्या

जीवनावर पहिल्याने प्रकाश पाडला डिकिन्सने. अर्थातच आम्हा समाजसत्तावादी लोकाचा तो ग्रथकार फार आवडता त्याचे ग्रथ म्हणजे आमचे बायबल. श्री. केळकराना "पिक्‌विक्‌ पेपर्स" मधील ०;ा॑न्‌ान; फारच आवडत हे त्यानीच मला सागितले आणि त्याच्या भाषेत पिक्‌विकिअन्‌ विनोद मला पुष्कळच अनुभवण्यास मिळाला श्री केळकरानी मला आपले एक पुस्तक – "Pleasures And Privileges of Pen" नजर केले. ते मी अद्यापीहि आस्थापूर्वक जतन करून ठेविले आहे त्याच्या मृत्यूने तुमच्या देशाची मोठीच हानि झाली आहे, पण आमचीहि हानि कमी महत्त्वाची नाही कारण या देशाशी हिंदुस्थानचे सबध अत्यत मैत्रीचे असावेत असे प्रतिपादन करणाऱ्यात केळकर प्रमुखस्थानी होते"

(२) सँकी आणि केळकर याची एका बाबतीत परस्परविरोधी टोकावर बसणारे म्हणून दुसरी एक गोष्ट सागण्यासारखी आहे.

लॉर्ड सँकी पायाने चालण्याचा मोठा शोक रोज कमीत कमी ५ मैल चालावयाचेच असा त्याचा निश्चय आणि त्यासाठी ते खिशात Speedometer ठेवीत ठरीव अतर चालून झाले तरच मग टॅक्सीत वा मोटारीत बसावयाचे असा त्याचा नित्यक्रम

याच्या उलट श्री तात्यासाहेबाचे. त्याना चालण्याचा भयकर आळस. एके दिवशी गोलमेज परिषदेचें काम सपल्यावर सर तेज त्याना म्हणाले, "मिस्टर केळकर, चला जरा सेन्ट जेम्स पार्कमधून फिरत फिरत आपण ॲथीनियम्‌ क्लब-मध्ये जाऊ" तेथे दोघानाहि कोणाला तरी भेटावयास जावयाचे होते. सेंट जेम्सेस पॅलेस (गोलमेज परिषदेचे ठिकाण) आणि ॲथीनियम्‌ क्लब यातील अतर ५०० यार्ड सुद्धा असेल नसेल पण तात्यासाहेबानी आपण टॅक्सीतूनच तेथें येतो, असे सप्रूंना सागितलें व चालण्याचे नाकारले कदाचित्‌ त्या दोन ठिकाणातील अतर तात्यान्या लक्षात आले नसेल. पण एकदरीत पायी चालण्याचा त्याना कटाळाच होता असा माझा अनुभव होता



## वा. सा. बुधकर

**(मसूर, जि. सातारा)**

आमच्या जिल्ह्यात पगारवाढीसाठी शिक्षकानी सपावर जाण्याचा ठराव केला होता व शाळाखात्यास काही दिवसाची मुदत विचार करण्यास दिली होती. परतु सप करण्याच्या विरुद्धहि काही शिक्षक होते. अशा वेळी योग्य सल्ला मिळण्यासाठीं आम्हीं काही शिक्षकानी तात्यासाहेबाची भेट घेतली. तात्यासाहेब

म्हणाले, “ तुमच्या जिल्ह्यांत झालेल्या तलाठ्यांच्या सपाचा परिणाम ध्यानी घ्या व तुम्ही सप करू नका. सप करता करतो म्हणून आव आणा, बोभाटा करा, सभा भरवा, पण काम बद करू नका व शाळा बद ठेवू नका जगातील सपाचा इतिहासच असा आहे की, बहुधा सप करणारासच शेवटीं माघार घ्यावी लागते. ” तात्यासाहेबानी दिलेल्या समयोचित सल्लयाप्रमाणे आम्ही वागलो व पुढील आपत्ति टळली. तात्यासाहेबांचे हे केवढे उपकार !



## दा. न. शिखरे

( एम्. ए., माजी सहसंपादक केसरी, पुणें )

( १ ) विद्यार्थिदशेपासूनची माझी महत्त्वाकाक्षा की, आपण सपादक व्हावें आणि ‘केसरी’ सस्थेत प्रवेश मिळाला तर काय? महद्‌भाग्यच ! नऊ-दहा वर्षे त्या सस्थेंत काम करीत असताना दोन गोष्टी माझ्या मनावर अधिकाधिक बिबल्या. एक म्हणजे, लो. टिळकाविषयी जो जो जास्त जास्त माहिती खोदखोदून मिळवावी, तो तो त्याच्या थोरवीविषयीची कल्पना अधिकाधिक विस्तृतच होते, आणि दुसरी गोष्ट मनावर बिबली ती अशी की, श्री तात्यासाहेब केळकर हे लो. टिळक व त्याची ‘ केसरी सस्था ’ याच्याशी पूर्णपणे तन्मय झाले आहेत, एकजीव झाले आहेत या गुणाची वाचक अशी उदाहरणे पदोपदी घडत.

( २ ) तात्यासाहेबाच्या लेखनाचा आत्मा जसा औचित्य हा होता, तसा सौजन्य हा त्याच्या जीवनाचा आत्मा होता वाचणे आणि लिहिणे हे त्याचे जणु श्वासोच्छ्‌वास होते एकदा ते आजारी होते. सकाळी मी त्याच्याकडे गेलो होतो. त्याच वेळीं ‘ज्ञानप्रकाश’ चे श्री वामनराव पटवर्धन त्याना भेटण्यासाठीं आले. ‘ हं तात्या, काय होतय् ? ’ अशी पृच्छा त्यानी केली. लगेच हसतहसत तात्यासाहेब उत्तरले, ‘ हे होतय्; ’ आणि गादीवरुन उठून टेबलाच्या र ण ‘’ न पाचसात कागद त्याच्या हाती देत तात्यासाहेब म्हणतात, “रात्री डोक्यात सारखे विचार येऊ लागले; तेव्हा उठलो आणि हा लेख लिहून काढला, तेव्हा आराम वाटला. माझे दुखणें हेच ” असे म्हणून तात्यासाहेब मोकळेपणाने हसले

( ३ ) स्वतत्र लेखन असेल तें बहुधा स्वहस्ताने तात्यासाहेब लिहीत. त्याचे शेंकडा नव्वद टक्के लेखन दुसऱ्याला निवेदून लिहून घेतलेलेंच आहे तरीसुद्धा योग्य तोच शब्द यावा म्हणून ते फार दक्ष असत शिवाजी मदिरांतील एक सभा मला आठवते. कुस्तींतील उपमा ते देत होते त्या वेळीं त्याना एक समर्पक शब्द कांहीं केल्या लवकर आठवेना. टेबलावर बोटाने ते टक् टक् करूं लागले. श्रोत्यांनीं शब्द सुचविले, पण ते त्यांच्या मनास येईनात. टेबलावरील टक् टक् चालूंच

होतें – जणूं काहीं ते आपल्या स्मृतीलाच तारायंत्राने निरोप पाठवीत होते. शेवटी त्यांचीच स्मृति धांवून आली आणि 'मल्लानें स्वारी भरली तर' असा उचित शब्द-प्रयोग त्यानीं केला.

(४) तात्यासाहेबाच्या वर्तनातील सौजन्य तर रोजच्या व्यवहारात पावलो-पावलीं अनुभवास येई अलीअलीकडे वार्धक्यामुळे "कधीं कधी ज्योत भडकते" असे तेहि म्हणत; पण हे प्रसग म्हणजे अपवादच. एरवीं आपल्या हाताखालच्या माणसाशीहि गोडीगुलाबीने व खेळीमेळीनें ते वागत; त्याचे कौतुक, त्याचा गौरव मुक्तकंठानें करीत; एवढेच काय, एखादा नवशिका तरुण त्याच्याकडे गेला तरी ते त्याला प्रेमानेच वागवीत. इतराचे कशाला? माझेच उदाहरण देतो म्हणजे झाले. निवडणुकीची ऐन धामधूम होती. तात्यासाहेबाचा दौरा चालला होता मध्यवर्ती विधिमंडळासाठीं ते उभे होते दौऱ्यात कराडला मुक्काम झाला. त्या वेळी मी एम् ए. झालो असेन-नसेन. कॉलेजमध्ये असताना 'दापत्यधर्म' नावाचे एक चोपडे मीं लिहिले होतें तें प्रकाशित व्हावे हा हेतु त्यासाठी तात्यासाहेबांची प्रस्तावना मिळावी अशी लालसा. म्हणून ते हस्तलिखित घेऊन मी कराडला गेलो. श्री. पांडु-अण्णा शिराळकर यानी माझी व माझ्या पुस्तकाची त्यास थोडक्यात ओळख करून दिली. 'नोव्हेंबरमध्यें मी पुण्यास जाईन, तेव्हा मला भेटा' एवढेच तात्यासाहेबांनी घाईत उत्तर दिले आधी व नतर किती तरी लोक त्यांना भेटत होते, राजकारणा-वर चर्चा करीत होते, त्या गर्दीत त्यानीं दिलेलें तें उत्तर! ते उत्तर नेमके लक्षात ठेवून पुण्यास नोव्हेंबरांत त्यास मी भेटताच तात्यासाहेब मला म्हणाले, "तुमचें ते दापत्य-धर्मांचें हस्तलिखित आणलेंत?" त्यांची ही स्मरण-शक्ति पाहून मी थक्कच झालो. या अलौकिक स्मरणशक्तीमुळे व सूक्ष्म तर्कशक्तीमुळे ते येणाऱ्या माणसाचे प्रयोजन इतकें अचूक हेरीत कीं, तात्यासाहेब हे मनकवडे आहेत, अतर्ज्ञानी आहेत असाच भास व्हावा! त्या दिवशी रात्रीं बाहेर अंगणात तात्या-साहेब जेवण करून बसले होते. मी लेखनाच्या उबरठ्यावर उभा होतो. कल्पना अशी की, केसरींतील प्रत्येक ओळ त्याच्या सपादकाला माहीत असेल. पण "केस-रींत आलेले कैक अभिप्राय मीं वाचलेले नाहींत" असे तात्यासाहेबानी सागितलें, तेव्हा माझ्या मनाला विस्मयाचा धक्का बसला त्या भरात मी काहीबाही बरेच बोललो. पण त्या साहित्यसम्राटाने शातपण ते सर्व ऐकून घेतले व टीकेची सारी वाफ बाहेर पडू दिली तो त्यांचा शातपणा व सुजनपणा मी कधीच विसरणार नाहीं.

(५) तात्यासाहेब काहीं ईश्वरनिष्ठ नव्हते किंवा विरक्तहि नव्हते. पण त्याच्या जीवनाशीं सावलीप्रमाणे सदैव सलग्न असलेलें सौजन्य हें त्याच्या उदात्त सस्कृतीचें बाह्य चिन्ह होतें. या त्याच्या उदात्तपणाची दोन उदाहरणे महाराष्ट्रात केवळ अपूर्व आहेत. एक म्हणजे ते आपण होऊन काहींहि

सक्ति नसताना, पन्नास-साठ सार्वजनिक सस्थातून निवृत्त झाले. सत्तेचा हा स्वयंस्फूर्त सन्यास किती जणानी स्वीकारला आहे ? दुसरे उदाहरण तर चिरस्मरणीय आहे. ते म्हणजे आपले गुरु लो टिळक याना महाराष्ट्रीय जनतेने कृतज्ञभावानें तीन लाख रुपयाची थैली दिली "आज तुम्ही मला विकत घेतले" असे भावनाई उद्गार त्या वज्रकठोर विभूतीच्या मुखातून बाहेर पडले ते तीन लाखांचे 'ऋण' मानून तात्यासाहेबानी जनतेला, कोणाचीहि मागणी नसताना, केवळ आपल्या इच्छेने अर्पण केले. या गुरुभक्तीला व या आनृण्याला तोड क्वचितच सापडेल

( ६ ) लो. टिळकाविषयी तात्यासाहेबानी पर्वतप्राय वाङ्मय रचले आणि शेकडो व्याख्याने दिली. त्यामध्ये गौरवाची विशेषणे किंवा भावनेचे उमाळे प्रकट होत नसत पण त्याच्या बुद्धिप्रधान मनातहि लोकमान्याविषयी आदर, किंबहुना [illegible] वसत होता एकदा प [illegible] केसरी सस्थेत आले होते ग्रंथ-शाळेत त्याचा सत्कार करण्यात आला 'सध्या केसरीचा खप किती ?' असे मालवीयजीना विचारले खपाचा आकडा सागितला, तेव्हा पडितजीनी समाधानाने मान डोलविला व सतोष प्रकट केला त्या वेळी तात्यासाहेब म्हणाले, "ही लोकमान्याची पुण्याई !"

( ७ ) आपल्या सस्थेला किवा [illegible] माणसाला उणेपणा दुरून किवा चुकूनसुद्धा येऊ नये, म्हणून [illegible] फार जपत १९३९ साली मी केसरी सस्था सोडण्याचें ठरविले सर्वात [illegible] आपलेपणाने सागितले तात्यासाहेबानाच ते त्या वेळी सेवानिवृत्त होते प्रभात-रस्त्यावरील 'पु[illegible]' निवासात त्याचे वास्तव्य होते. त्याना मी भेटलों व म्हणालों, "ज्याच्या हस्ते आवाहन झाले त्यांच्या-कडूनच विसर्जन व्हावें म्हणून आलो आहे" कॉंग्रेस राज्यारूढ झाल्याने व तिने सार्वजनिक जीवनाच्या सर्व अगोपागात प्रवेश [illegible] मतभेदाचीं स्थळे वाढत आहेत, वगैरे मी बोललो. तें सारे ऐकून घेऊन ते म्हणाले, "हा प्रसग याच्या-आधीच येईल असे मला वाटत होते आता तुम्ही राजीनामा देणार तर द्या, पण त्यांत मतभेद हे कारण दाखवू नका, कारण तसे केल्याने सपादकावर दुरून तरी Reflection येते."



## महादेवबुवा वैद्य

### ( व्यवस्थापक, धर्मसेवाश्रम, वनगुळें, जि. रत्नागिरी )

एका सार्वजनिक संस्थेंत मी व ब्र. वासुदेवमहाराज कुवळेकर यानी पधरा-वीस वर्षे काम केलें; परंतु पुढे ती सस्था ध्येयपराङ्मुख झाल्यानें त्यातच राहून समाजकार्य करणे अशक्य झाले, म्हणून आम्हीं उभयतानी "धर्मसेवाश्रम –

वनगुळे, जि. रत्नागिरी" या नांवाची संस्था सुरू केली; परंतु पहिल्या संस्था-चालकानी या नूतन संस्थेस खूपच विरोध केला. तेव्हां आम्ही दोघेहि तात्यासाहेब यांच्याकडे गेलो व त्याना सर्व हकीकत निवेदन करून, "या बाबतींत काय करावे" म्हणून त्याना मत विचारलें; तेव्हा लगेच त्यानी आपले स्पष्ट मत क्षणाचाहि विलंब न लावतां लिहून दिले ते लिहितात – "या दिवसात ज्याला जें कार्य करतां येईल तें स्वतंत्रपणे केल्यास बरे जुने संबंध अडचणीचे झाल्यास ते ठेवून उपयोगी नाहीं. व्यक्तीनें निःस्वार्थ राखून केलेले सर्व कार्य ईश्वराघरी रुजू होतें"

न. चिं. केळकर, ५–१०–४४



## कलिमुद्दिन अब्दुल हुसेन

### (व्यापारी, पुणें)

(१) श्रीमन पेशवे सरकारच्या खास परवानगीने पुणे शहरातील बोहरी समाजाच्या मशिदी व मोहल्लाकरिता कात्रज तलावाचे पाणी श्रीमत सरकाराच्या खास पाणीबधाऱ्यातून जोडून दिले होते कात्रज तलावाचे पाणी अशुद्ध आहे असें कारण दाखवून व इतर बाबी पुढे करून पुण्यातील निरनिराळ्या हौदाचे पाणी बद करण्याचे पुणे शहर म्युनिसिपालिटीने ठरविलें; तेव्हा तात्यासाहेब यांसी समाजाने खालील दोन कारणाकरिता पाणी बद न करण्याबद्दल विनवणी केली. १ कात्रजचे पाणी श्रीमत सवाई माधवराव पेशवे याच्या खास परवानगीनें समाजास यावच्चद्रदिवाकरौ दिले [illegible] म्युनिसिपालिटी कमिटीनें ते बद करणे योग्य होणार नाही २ खडकवासल्याच्या [illegible] कात्रजचें पाणी विशेष लाभदायक आहे तात्यासाहेब नगराध्यक्ष होते त्यानी कागदोपत्री पुरावा पाहून पाणी बंद करता येणार नाही असा निर्णय दिला; परतु शुद्धाशुद्धाचा निकाल लागेना. तेव्हा दोन निरानिराळ्या बाटल्यात खडकवासल्याचे व कात्रजचें पाणी भरून सरकारी पृथक्करण खात्याकडे [illegible] पाठविण्याचे ठरले बोहरी समाज या बाबतीत साशक होता, परतु तात्यासाहेबास विश्वास होता की, कात्रजचें पाणी शुद्ध आहे. आरोग्याधिकाऱ्यास न कळविताच त्यानी बाटल्यांवरील लेबलें बदलून त्या मुंबईस पाठविल्या. तेथून असा रिपोर्ट आला कीं, कात्रजचे पाणी (अर्थात् खडकवासल्याचें) संपूर्ण अशुद्ध असून त्यात जीवनतत्त्वे फार अल्प प्रमाणांत आहेत, व खडकवासल्याचे पाणी (अर्थात् कात्रजचे पाणी) अर्धे अशुद्ध असून त्यांत जीवनतत्त्वें फार मोठ्या प्रमाणात आहेत! याच्या उलट आरोग्याधिकाऱ्यानींसुद्धा तात्यासाहेबाच्या हुकमानुसार बाटल्या पाठविल्या होत्या, त्याचा रिपोर्ट अगदीं उलट आला! तेव्हा हा काय सावळागोंधळ आहे याचा कोणास उमज पडेना. तेव्हां तात्यासाहेबांनीं रहस्यस्फोट करून दाखवून दिलें की, कात्रजचें पाणी अशुद्ध

असले तरी फारच श्रेयस्कर आहे. शेवटी हौदावर अशी पाटी लावण्यात आली कीं, पाणी पिण्याच्या उपयोगात न आणता फक्त वापरावे.

(२) सोन्यामारुती चौकात झालेल्या सांप्रदायिक दंगलीनंतर रा. रा. अण्णासाहेब भोपटकर यांनी हिंदु समाजातर्फे कोर्टात फारच उत्तम प्रकारची वकिली केली होती या बाबतीत पुणे सार्वजनिक सभेच्या का वार्षिक समेलनांत त्यांचें अभिनंदन करण्याचा ठराव एका सभासदाने मांडण्याचे ठरविले तात्यासाहेबांनीं आपल्या स्वभावानुसार ठराव वाचून भोपटकरांना हळूच विचारलें, "काय हो, तुमच्या कार्याचे माप या ठरावानं होणार आहे काय?" भोपटकर म्हणाले, "खचित नाही." नंतर सभेकडे पाहून तात्यासाहेब गंभीरपणे म्हणाले, "पुणे सार्वजनिक सभा हे नावच ही संस्था सर्व धर्मांच्या व संप्रदायाच्या हितास जपणारी आहे असे दर्शवीत असून या सभेत एक का असेना, परंतु मुसलमान सभासद आहे, तेव्हा अशा प्रकारच्या ठरावाची काहीं जरूरी नाही." या अपूर्व सहिष्णुतेच्या त्याच्या बोलानें माझ्या डोळयास आसवें आली व कित्येक दिवसपर्यंत मला त्यांचा विसर पडत नव्हता

(३) एकसष्टाव्या जन्मतिथीच्या वेळी पुण्यास तात्यासाहेबांच्या आदरसत्काराची जणू काय पर्वणी आली होती. गायकवाडवाड्यांत त्यांना कोणी विचारलें, "तात्या, पुण्यात आता आपलं सत्कार करणारे कोण बाकी राहिले आहे?" तात्यासाहेब भविष्यवाद्यास साजेल अशा रीतीने बोलले, "बोहरी समाजाच्या आमंत्रणाची मी वाट पाहत आहें" काय आश्चर्य की, त्याच दिवशी सायंकाळीं त्यांना तें आमंत्रण मिळालें व तात्यासाहेबांचें भविष्यवचन खरे ठरलें! यापूर्वी असें आमंत्रण आपणास येईल अशी वार्तासुद्धा त्यांना नव्हती. परंतु समाजाच्या निरनिराळ्या लोकांच्या मनोवृत्तीचा त्यांनीं इतका दांडगा अभ्यास केला होता की, अमुकअमुक असें करणार असे ते छातीस हात लावून सांगत असत. तात्यासाहेबांच्या एकसष्टाव्या जन्मतिथीच्या वेळी कै. देवधर (पुणें सेवासदनाचे संस्थापक) यांना बोहरी समाजानें या समारंभास हजर राहण्याची विनंती केली. आमंत्रण स्वीकारताना देवधर म्हणाले, "तात्यासाहेबांकरिता अशा समारंभास मी जरूर हजर राहीन." तात्यासाहेबांना जेव्हा माहिती दिली की, देवधर येणार आहेत, त्या वेळीं तात्यासाहेब त्यांच्याजवळ असलेल्या ना. बापूजी अणे यांना म्हणाले, "अहो अणे, देवधरांना अनुकूल होईल अशी तुमची वेळ ठरवा व या समारंभास हजर राहा" नंतर मला म्हणाले, "अणे, देवधर व मी (केळकर) यांचा फोटो घेण्याची व्यवस्था असू दे." आज्ञेनुसार फोटो झाला, तेव्हा तात्या म्हणाले, "पाहा, फोटोत निरनिराळ्या विचाराचे लोक कसे सावरून नटून बसतात

ते! अशाच रीतीने जर आपण सर्व बाबतीत सावरून नटून राहूं तर खात्रीनें देशांत लवकर सुदिन उगवेल."



## रा. अ. कानिटकर

(बी.ए., एल्एल्. बी., वकील, बुलढाणा–वऱ्हाड)

(१) सन १९३२ मध्ये तात्यासाहेब इंग्लंडात तिसऱ्या वर्तुळ परिषदेकरिता गेले. त्या वेळी वऱ्हाडच्या प्रश्नासंबंधी त्यावेळच्या सर्वपक्षीय कमिटीचे काम आम्हीं त्यांच्यावरच सोपविले होतें त्यानी ते चोखपणे पार पाडले. यासबंधी वर्णन करण्याची आवश्यकताच नाही या वेळी निजामातर्फे अकबर हैदरी प्रतिनिधि होते त्याच्याशी बोलण्यात निजामानें वऱ्हाड त्याला आपल्या अधिराज्यात ठेवण्याची उत्कठा असल्यास वऱ्हाडास सर्व राज्याधिकार देण्याची सूचना तात्यासाहेबानी केली होती

(२) मॅक्डोनाल्ड, ब्रिटिश मुख्य प्रधान, यानी जातीय निर्णय प्रसिद्ध केल्यानंतर त्यावर मी मध्यप्रात विधिमडळांत त्याविरुद्ध मतप्रदर्शनाची संधि साधली होती. या गोष्टीचे स्मरण ठेवून तात्यासाहेबानीं १९३४ सप्टेंबरमध्ये पुण्यास भरलेल्या महाराष्ट्र प्रांतीय जातीय निवाडा निषेध-परिषदेस मला अध्यक्ष म्हणून बोलाविले होतें, व आपल्या अनुयायातील लहानसहान माणसांच्या कर्तव्यनिष्ठेबद्दल गुणग्राहकता व्यक्त केली होती.



## गोविंद गोपाळ देसाई

(संस्थापक, श्रीगोपाळ गायन समाज, पुणे)

(१) सन १९२७ च्या एप्रिल महिन्यांत गोपाळ गायन समाजाची नवी इमारत झाल्यामुळे गायनवर्गाचें काम त्या इमारतींत सुरू झाले. सायकाळीं साडेसहा वाजता मी गाण्याच्या मेहनतीस बसत असे तात्यासाहेब त्याच वेळी गायन-समाजात येत, ते रात्री आठ वाजेपर्यंत बसत. परशुरामभाऊ कॉलेजच्या वसतिगृहातील विद्यार्थी व इतर सभ्य स्त्री-पुरुष गाणे ऐकण्यास येत असत. एक दिवस दोघातिघानी आपली पादत्राणे गोपाल-कृष्णाच्या मदिरालगतच्या खोलीत आणून तेथेच ठेविली बाहेरच्या चौकात अदमासें पचवीस पादत्राणे ठेविलेली दिसत होती; पण ते या विद्यार्थ्यांच्या ध्यानी आले नाही. त्याच्या मागोमाग तात्यासाहेब आले. त्यानी त्यापैकी पादत्राणाचा एक जोड पायात घालून बाहेर ठेविला, इतक्यात एक विद्यार्थी आला. त्याला बाकीची दोन पादत्राणे पायात घालून

बाहेर ठेवण्यास त्यानी सांगितले व ती पादत्राणे बाहेर ठेवल्यानतर आपण आत आले. तात्यासाहेब आत आल्यावर यासबधाने काही बोलतील असे मला वाटले; पण नेहमीप्रमाणे येऊन बसले व रागाचे नाव, तालाच्या मात्रा, तालाचे नांव, रागाचे स्वर इत्यादि माहिती विचारून ती लिहून घेतली थोडा वेळ गाणे झाल्यावर "आपण आलात ते बाहेर दहा मिनिटे उभे राहून काय करीत होता ?" असे मी त्याना विचारिलें त्यावर ते म्हणाले, "चुकून आत आलेली पादत्राणे बाहेर ठेविली शेजारीच पीर आहे त्या ठिकाणी स्वच्छता व पावित्र्य राखण्यासाठी मुसलमान लोक किती काळजी घेतात हे आपण रोज पाहतो मग श्रीगोपालकृष्णाच्या मदिरात येणारानी हे शिकावयास नको काय ?" असे जमलेल्या मडळीना उद्देशून ते बोलले तात्यासाहेबाचे हे शब्द ऐकून सर्व मडळी एकदम चपापली आठ वाजता तात्यासाहेब गेल्यावर या गोष्टीची वाटाघाट सुरू झाली तात्यासाहेबाची शिस्त, नियमितपणा, विद्याव्यासग, गुणग्राहकता व रसिकता अन्य ठिकाणी क्वचित् पाहावयास मिळेल देशातील राजकारण, समाजकारण, धर्मकारण इत्यादि गोष्टी करीत असता एक क्षणभर देखील फुरसत मिळणें कठीण, पण हे सर्व करून पुन्हा सगीतकलेची माहिती गेली चार वर्षें ते आमच्याकडून घेत होते

(२) सन १९२४ साली काग्रेसचे अधिवेशन बेळगावास भरले म गाधी अध्यक्ष होते माननीय गगाधरराव देशपाडे याची मला तार आली बेळगावी ठळकवाडीच्या मैदानावर हजर झालो, पण तेथे कानडी-मराठी वाद उत्पन्न होऊन राष्ट्रगीताचा कार्यक्रम झालाच नाही कानडी लोकानी गाइलेल्या राष्ट्रगानासबधाने प्रतिकूल चर्चा ऐकून तात्यासाहेब म्हणाले, "कॉंग्रेसमध्ये राष्ट्रगीत उत्कृष्ट प्रकारे गाण्याचा प्रघात महाराष्ट्रियांनीच पाडला व तो आजपर्यंत महाराष्ट्रियानीच चालू ठेविला आहे. राष्ट्रगीत कसें गावे हे आमच्या कानडी बधूनीं आम्हा महाराष्ट्रियाजवळ शिकावें अशी माझी त्याना विनती आहे"



## दत्तो अप्पाजी तुळजापूरकर

### (बी. ए., एलूएलू. बी., ॲडव्होकेट, मुंबई)

(१) सुमारे पस्तीस वर्षांपूर्वीची गोष्ट. महर्षि अण्णासाहेब पटवर्धन ह्याच्या माडींतला प्रसंग :– अण्णासाहेबानी नरसोपताना (त्या वेळी त्यांचे तात्यासाहेब हे नांव विशेष रूढ झाले नव्हते) मुद्दाम बोलावून घेतलें होते मी अगदी अनपेक्षितपणें त्याच दिवशीं मुंबईहून आलो होतो पुणे म्युनिसिपालिटींतील कांहीं भानगडीबद्दल बोलणें होणार होतें त्या वेळींहि हल्लींप्रमाणेंच पुणे म्युनिसिपालिटीच्या

व्यवहारात पुष्कळच बजबजपुरी माजली होती काहीं स्वार्थी व लब्धप्रतिष्ठित सभासदानीं व त्यांच्या बगलबच्च्यांनीं म्युनिसिपालिटीच्या व्यवहारांत बऱ्याचशा भानगडी उपस्थित केल्या असल्यामुळे वादाचे रणकंदन माजलें होते

"ढोले, मोघे, चोबे, काजी। इतने मेंबर निकले –" अशा तऱ्हेचा म्युनिसिपालिटीवरचा कटाव पुण्यास सर्रास म्हणण्यात येत असे त्या वेळीं पुणे म्युनिसिपालिटीत चार जागा सुशिक्षित मतदाराकरिता राखून ठेवलेल्या असत. त्या जागेवर पूर्वी लोकमान्य टिळक, बाबासाहेब पेंडसे, अण्णासाहेब पटवर्धन हे हमखास निवडून येत मी आता वर्णन करतो आहे त्या वेळीं नरसोपंत व रा ब. गणेश व्यंकटेश जोशी हे उभयता म्युनिसिपालिटीचे सभासद होते. रा ब. जोशी हे फार मोठे विद्वान्, व्यासंगी, आकडेशास्त्रज्ञ गृहस्थ होते ते शाळाखात्यात नोकरीवर असतानाहि त्याच्या आंकडेशास्त्राच्या व्यासंगाचा न्यायमूर्ति रानडे भरपूर उपयोग करून घेत प्रथम जी व्ही जे व नतर नुसते जे. या टोपण नावाखाली त्याचे [illegible] लेख 'टाइम्स ऑफ इंडिया'त प्रसिद्ध होत असत त्याना "[illegible] माणिक" अशीच संज्ञा होती. पण त्याचा स्वभाव अत्यंत सरळ – व्यवहारातले साधे डावपेचहि न कळण्याइतका सरळ होता! त्यामुळे कुटिल राजनीतीचे आगर असलेल्या पुणे [illegible] जोशीबुवाच्या सरळपणाचा किंवा [illegible] दुरुपयोगच होत असे. [illegible] काटेखोर समतोल बुद्धीच्या मध्यस्थीच्या भाषणाचा नरसोपतांना राग आला, व ते [illegible] थोडे टाकून बोलले त्याची प्रतिक्रिया जोशीबुवाच्या मनावर होऊन ते आपल्या स्वभावानुरूप फुरगुटून बसले ते गाऱ्हाणें [illegible] पोचले जोशीबुवाच्याबद्दल अण्णासाहेबाच्या मनात अत्यंत आदर व तेवढ्याकरिताच त्यानी नरसोपताना त्या [illegible] बोलावून घेतले होते. थोडेसे [illegible] बोलणे [illegible], "त्या ब्राह्मणाला तुम्ही उगीच का छळाव?" असे कांहीसे निराशाजनक त्रासिकपणाचे उद्गार अण्णासाहेबाच्या तोंडून बाहेर पडले. नरसोपंतांचा चेहराहि जरासा क्रुद्ध झाला [illegible] सडेतोडपणानें [illegible] की, "खरोखर छळणूक कोणाची होते आहे हे तुम्ही लक्षांत घेत नाही जोशीबुवांच्या विद्वत्तेबद्दल किंवा मोठेपणाबद्दल काय आम्हांला आदर नाही? पण तुम्ही किंवा टिळक म्युनिसिपालिटीत असताना म्युनिसिपालिटीचा कारभार जितका सरळपणानें चालत होता तसा आता चालत नाही. चांडाळचौकड्याची व पाजीपंचकांची कारस्थानें [illegible] धुडगूस घालीत आहेत. अशा वेळी जोशीबुवांची फाजील सरळ वृत्ति आम्हांला पदोपदी नडते! तेव्हा त्याला एकच उपाय आहे. एक जोशी[illegible] तरी राजीनामा द्यावा किंवा आम्ही तरी. माझा राजीनामा हा मी आता तुम्हाला लिहून देतो" असे म्हणून त्यांनीं खरोखरच कागद व टाक हातांत घेतला अण्णासाहेब थोडे नरमलेच त्यांच्या नेहमीच्या शांतवृत्तीने ते एवढेच

म्हणाले, " अरे तसे नव्हे ! असा त्रागा करू नको. जोशीबुवासारखी माणसें आपल्याला लाभत नाहीत ती सुदैवानें लाभली आहेत आपणच त्याना सभाळून घेतले पाहिजे. बळवतरावाच्या ( टिळकाच्या ) गैरहजेरीत हे सर्व गाडें तुम्हांलाच सभाळून न्यावे लागेल " शेवटी हा वाद येथेच मिटला केळकराच्या सौम्य वृत्तीला प्रसगीं सडेतोडपणाची जोड कशी मिळत असे हे या प्रसगावरून सहज लक्षात येण्यासारखें आहे.

( २ ) मुबईचे एक ज्योतिषी गजाननस्वामी बोरकर यानी 'विविधवृत्ता'वर बेअब्रूची फिर्याद केली होती. त्या खटल्यातील बोरकराच्या उलटतपासणीचा साग्र वृत्तान्त प्रश्नोत्तररूपाने वर्तमानपत्रात प्रसिद्ध होत होता. त्या सुमारास तात्यासाहेब एकदा माझ्याकडे आले असताना ते म्हणाले, " तुमच्या उलटतपासणीचें तन्त्र विलक्षणच आहे ! अशा रीतीने तुम्ही कोणत्याहि शहाण्या माणसाला मूर्ख ठरवू शकाल ! " मीं म्हटले 'उलट' तपासणी त्या शब्दाचा अर्थच असा आहे की, ती कधी 'सरळ' असूच शकत नाही ! वकिलाना आपल्या धद्यात जी ज्ञात-अज्ञात पातकें करावी लागतात तशापैकींच हा प्रकार असतो. तात्यासाहेब हसून म्हणाले, " पण हे पाप तुम्हाला तोट्यात कधींच पडत नाही ! "

( ३ ) तात्यासाहेबाचा हजरजबाबी कोटीबाजपणा विलक्षण होता. वरील प्रसंगीं ते प्रथमच आमच्या गिरगावातील नवीन बिऱ्हाडी आले होते तेथें आमच्याकडे येण्यास पाच मजल्याच्या शभर पायऱ्या चढाव्या लागतात. वर आल्यावर तात्यासाहेब म्हणाले, " मुबईचा हा गड तुमच्या मळवलीच्या डोंगरी निवासस्थानापेक्षाहि उच्च आहे ! " मी म्हणालों, " तितकें आम्ही स्वर्गाला जवळ नाही का ? वर जातांना तेवढा आमचा प्रवास कमी होईल ! " त्यावर ते उद्गारलें, " अहो, पण त्यामुळें मागें राहाणाराचा त्रास तितका जास्त नाहीं का वाढणार ? "

( ४ ) वकिलीच्या धद्याकरिता म्हणून १९०६ साली मी हैद्राबादेस गेलों, तो टिळक-केळकराचा आशीर्वाद घेऊनच गेलो होतो तेथें गेल्यावर प्रथमच एका महाराष्ट्रीय हिंदु कुटुबातला एक भाऊबदकीचा खटला माझ्याकडे आला होता. त्यात मी तडजोड घडवून आणली. तेव्हा माझ्या फीबद्दल म्हणून पैसाफडाकरिता त्याना काही देणगी देण्यास मी सागितले त्याकरिता त्यानी फक्त दोन रुपये मजजवळ दिले ! आपल्या महाराष्ट्रीय मडळीच्या भाडखोर स्वभावाचें थोडेसे वर्णन देऊन ती देणगी मी केळकराच्याकडे पाठवून दिली त्या दोन रुपयाच्या क्षुद्र देणगीच्या पार्श्वभूमीचे सुदर वर्णन केलेले असें तात्यासाहेबाचे मला उत्तर आले ते मीं जपून ठेवलें होतें. परतु तेथून झालेल्या माझ्या हद्दपारीच्या वेळी जे कागदपत्र अग्नयेस्वाहा करण्यात आले, त्यात त्या पत्राचीहि आहुति पडली !

❋

## श्री. व. पाटणकर

(डॉक्टर, सोलापूर)

सुमारे एक वर्षापूर्वी मला महाराष्ट्र युनिव्हर्सिटीस काही रक्कम देणगीदाखल देण्याची प्रेरणा झाली त्याबाबत मूळ कल्पनेला सक्रिय मदत व द्रव्यसाहाय्य देणारे तात्यासाहेब केळकर याची मला आठवण झाली, व मी त्याना पत्र पाठवून सल्ला विचारला पत्रात मी स्वत्व राखून काही अटीवर रक्कम देऊ केली होती व कोणाकडे आाण कशी रक्कम पाठवावी वगैरेबाबत खुलासा विचारला होता. त्यानी मला स्वदस्तुरचे पत्र सत्वर पाठवून कळावले होते की, मी जी देणगी देणार आहे ती 'स्वत्वनिरपेक्ष करून बधनाशिवाय द्यावी' व तसे मी करण्याचे ठरविल्यास पुढील तजवीज करण्याचें त्यानी कबूल केले होते. वरील सल्ल्यावरून असे अनुमान निघते की, त्याना 'गुप्तदान व स्वत्वनिरपेक्ष देणगी' आवडत असे तसेच महाराष्ट्र युनिव्हर्सिटीबद्दल त्याची आत्यतिक तळमळ व त्या कामी कार्यतत्परता दिसून आली.



## वासुदेव सीताराम धोंगडे

(उपाध्यक्ष, न्या. रानडे शतसांवत्सरिक उत्सव मंडळ, करकंब)

(१) दोन तपापूर्वींचा तो काळ. सस्थानी प्रजापरिषदाची मुहूर्तमेढ हिंदी राजकारणात नुकतीच कुठे रोवली जात होती. फेर-नाफेर वादाची रस्सीखेच वृत्तपत्रातून वाचून झिंगून जाण्याचें तेव्हां माझे वय नव्हते. सरकारी अध्यापनविद्यालयात शिकण्यासाठी मी तेव्हा सोलापुरास होतो अक्कलकोट सस्थान प्रजापरिषदेच्या पहिल्याच अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून तात्यासाहेब सोलापुरास आले होते. ती १९२३ सालच्या आठव्या महिन्यातील सतरा तारखेची सकाळ होती. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचे भलेबुरे पडसाद महाराष्ट्रात उमटत होते. सत्यशोधकी चळवळीच्या लाटाहि आदळत होत्या. तरी पण ब्राह्मणसघटनेच्या गगेचा अजून उगम व्हावयाचा होता, मग पोटजातीच्या एकीकरणाचे भव्य पात्र तिला तेव्हा कुठले? त्या सकाळीं मी त्याच्याकडे गेलो व माझ्या ब्राह्मण पोटजातीवर होणाऱ्या सामाजिक अन्यायाची त्याना साधार माहिती दिली. चागलाच चिडलों होतो मी. माझा देशस्थ ब्राह्मणाविषयीचा त्वेष व भावनेचा उद्रेक पाहून तेहि मोठ्या कौतुकानें माझ्याशीं समरस झाले व तात्काळ त्यांनी माझ्याजवळ ब्राह्मण समाजास उद्देशून एक विनती-पत्र लिहून दिलें. त्या पत्राच्या जाहीर प्रचाराने पोटजातींच्या एकीकरणाच्या कार्यास व ब्राह्मणसघटनेस मोठी मदत झाली, हें मी

स्वानुभवाने कृतज्ञतापूर्वक ऐतिहासिक सत्य म्हणूनच सांगतो. त्याच्या थोर व्यक्तिमत्त्वाचा ठसा माझ्या मनावर तेव्हा चागला स्वच्छ उमटला.

( २ ) दुसऱ्या महायुद्धाची रणधुमाळी युरोपात त्या वेळी चालू होती काँग्रेसचे सर्व लहानथोर पुढारी सरकारी पाहुणे झाले होते बेचाळीसच्या आदोलनानतर दोन वर्षांनी पुढे पुण्यास १५ सप्टेबर १९४४ ला एक मोठे युद्धप्रदर्शन सरकारने उघडले होते. त्यात पहिल्याच दिवशी राष्ट्रीय युद्ध-आघाडीतर्फे तात्यासाहेबाचे 'प्राचीन व अर्वाचीन महाराष्ट्र' या विषयावर व्याख्यान ऐकण्याची सुसधि मला लाभली. त्याचे भाषण सारग्राह्य पद्धतीने लिहून घ्यावे, या हेतूनेच मी तेथे गेलो होतो मडपाच्या प्रवेशद्वारावर चर्चिल, रूझवेल्ट, स्टॅलिन, चँग कै शेक वगैरे विद्यमान पाश्चात्य पुरुषश्रेष्ठाचे फोटो लावलेले होते. पण शिवाजी महाराजाचा फोटो नव्हता, हे तात्यासाहेबाच्या नजरेस आले, पण त्यानी ते सहन केले नाही. भर व्याख्यानात या बुद्धिपुरस्सर झालेल्या चुकीचा त्यानी तीव्र निषेध केला. त्या वेळी मी तर अगदी चाटच झालो त्याचा तो अन्याय सहन न करण्याचा मराठा बाणा त्या वेळी स्पष्ट दिसून आला. रिक्रूट-वीर म्हणून निंदा करण्याची तेव्हा एक फॅशन झाली होती कारण ते साप्रदायिक दे भ नव्हते एवढेच ! त्याच्या भाषणाचा रिपोर्ट सकाळी मी त्याना वाचून दाखविला त्याच्या वृत्तपत्रीय शास्त्राप्रमाणेच तो बरोबर वठल्याने खुष होऊन मला त्यानी प्रशसापत्र देऊन प्रोत्साहन दिले. तरुणाकडे कौतुकास्पद दृष्टीने बघण्याचा त्याच्या स्वभावाचा हा पैलू मला तेव्हा दिसला ही गोड स्मृति मला आयुष्यभर नवजीवनच देत राहील

( ३ ) केव्हाहि मी पुण्यास गेलो तरी तात्यासाहेबाच्या भेटीकरिता मुद्दाम त्याच्या पुष्करणी बगल्यावर जाऊन त्याची भेट घ्यावयाचीच, असा माझा परिपाठच ठरून गेला होता त्यानी मला तसे कायमचेच आमत्रण देऊन ठेवले होते प्रा माटे याच्या षष्ठ्यब्द-उत्सवानिमित्त झालेल्या सत्कार-समारभाकरिता मी मुद्दाम गेलो होतो. समारभाच्या दिवशी सकाळी मी तात्यासाहेबाच्याकडे भेटीस गेलो प्रारभीची अनौपचारिक चौकशी केल्यावर मी त्याना एक खाजगी कामाचे पत्र मागितले, व ते त्यानी मला दुसऱ्याच दिवशी अगत्यपूर्वक दिलेहि. अलीकडे काही चागले पुस्तक वाचलेत का, अशी त्यानी पृच्छा केली. मी शिवरामपत करंदीकराच्या सावरकरचरित्राच्याबद्दल विशेषतः त्यानी लिहिलेल्या प्रस्तावनेबद्दल आनद व्यक्त केला व आपल्या प्रस्तावनेवर माट्यानी झकारमधून केलेली टीका फारच तीव्र व पराकोटीची होती, आपणावर त्यानी असा अकारण केलेला हल्ला पाहून फार हळहळ वाटते, सीझरवर ब्रूटसने केलेल्या हल्ल्याची आठवण होते, असा मानसिक त्रास व वाङ्मयीन हल्ला निदान बापूसाहेबाकडून तरी

व्हावयाला नको होता, असे मी म्हणालो. यावर त्यानी हसतच म्हटले की, "छे! छे! तुम्ही वाचक ग्रथकाराचे खरेखुरे न्यायाधीश आहात. टीकाकार नव्हत" सायकाळीं पाच वाजतां पाहतो तो, तात्यासाहेब परशुराम-भाऊ कॉलेजच्या रमाबाई हॉलमधील व्यासपीठावर उत्सवमूर्ति बापूसाहेब माझ्याबरोबर हितगुज करीत आहेत! मित्रप्रेमाची कोण ही थोरवी! खरोखर या साहित्यसम्राटाचे सागराप्रमाणे विशाल अतःकरण व हिमालयाप्रमाणे थोर व्यक्तिमत्त्व पाहून त्या सभेत मी तात्यासाहेबाच्या गौरवपर भाषण केले त्या वेळीं त्या उभयताना कृष्णार्जुनाच्या जोडीची उपमा देण्याचा मोह मला आवरला नाहीं! साहित्याच्या क्रीडागणावर वावरणाऱ्या खेळाडूनीं हा केळकराचा आदर्श अवश्य डोळयापुढे ठेवावा



## ग. ग. भावे

( माजी सहसंपादक, 'लोकमान्य' व 'निजामविजय', हैद्राबाद )

( १ ) मुबईचे 'लोकमान्य' बद झाल्यानतर मी हैद्राबादला 'निजामविजया'त गेलो तो तात्यासाहेबाच्याच प्रेरणेने. त्यानी मला परिचयपत्र दिले होते. त्यात लिहिले होते की, "श्री. भावे हे माझ्या परिचयाचे आहेत त्यानी सहसपादकाचे काम केलेले आहे. ते आपल्यास चालतील असे वाटते" हैद्राबादचे 'निजाम-विजय' पत्र त्या वेळी तेथील त्या काळातील प्रसिद्ध पुढारी कै. वामनरावजी नाईक याच्या आश्रयाखालीं चालले होते व त्याच्या समतीशिवाय मजसारख्या भटजीला तेथे जागा मिळालीहि नसती पण तात्यासाहेबाच्या पत्राचा प्रभाव असा की, त्यानी तें पत्र पाहताच अधिक काहींहि न बोलता मला कामावर येण्यास सांगितले!

( २ ) खाजगी व्यवहारातहि तात्यासाहेब याच्या कारभाराचे प्रत्यतर मला एका खाजगी पत्रव्यवहारात दिसून आले. सन १९३६ साली त्यास मीं एक पत्र लिहून काहीं विचारणा केली होती पण त्याचे उत्तर येईल अशी मात्र मला मुळीच अपेक्षा नव्हती पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, केवळ अठ्ठेचाळीस तासांत मला माझ्या पत्राचें समर्पक उत्तर व ते त्याच्या स्वतःच्या हस्ताक्षरात मिळाले!



## रा. स. जोशी

( बी. ए., माजी प्रिन्सिपॉल, ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, पुणें )

( १ ) सुमारें १०–१२ वर्षांपूर्वी ट्रेनिंग कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी तात्यासाहेब याची 'बलिदान' ही कादंबरी अभ्यासास घेतली, आणि तिजवरील सर्वांगीण चर्चा

करण्याच्या प्रसगाने तात्यासाहेबास बोलाविले तात्यासाहेबांनी विद्यार्थ्यांच्या सुदर – साधक-बाधक – अशा चर्चेचे कौतुक केले. पुढे त्या प्रसगाच्या निमित्ताने त्यानी खुलासा केला की, "सध्या महात्मा गाधीच्या अहिसा वादाविषयी टीका होत आहे. म्हणून तो विषय घेऊन मी ही कादबरी लिहिली आहे, अशी सर्वांची समजूत झाली आहेसे दिसते; परतु वस्तुस्थिति अशी आहे की, मी तीस वर्षांपूर्वी ह्याच नावाने ह्याच विषयावर एक नाटक लिहिले होते, ते तसेच पडून राहिले होते. त्याचे ते रूप बदलून मी त्याची आता ही कादबरी बनविली आहे सध्याच्या विचार-प्रवाहास अनुसरून ही लिहिला असे मुळीच नाही"

(२) ट्रेनिंग [illegible] येण्याचे आमत्रण [illegible] तात्यासाहेबाच्या घरी मी गेलो असता, दुसरी काही मडळी त्या[illegible]डे आली [illegible] तात्यासाहेबाच्या एका नवीनच प्रसिद्ध झालेल्या लहानशा पुस्तकाची प्रशसा केली ती ऐकून घेऊन तात्यासाहेबानी विचारले, "ते असो, पण आज काय काम घेऊन आला आहा?" ती मंडळी म्हणाली, "आम्हाला वाटत की, त्या पुस्तकाचे हिंदीत भाषांतर करावे." "चागली कल्पना आहे" तात्यासाहेब म्हणाले म[illegible] विचारले, "मग त्याच्या अटी वगैरे?" तात्यासाहेब एकदम उत्तरले, "कसल्या अटी? तुम्ही भाषातर करा, छापा, विका, सर्व काही करा मला त्यातले काही नको. मला त्यासाठी आणखी काही मागू नका म्हणजे झाले! पुस्तक आहे तुमच्याजवळ? नसले तर हे घेऊन जा" असे म्हणून वर त्याना एक प्रत तात्यासाहेबानी काढून दिली! इतका उदारपणाचा सौदा आणि इतक्या झटकन् झालेला ह्या चालू काळात क्वचितच कुणी पाहिला असेल!

(३) पुस्तकप्रसिद्धीविषयी ते एकदा मला म्हणाले, "आपण पुस्तक लिहावे आणि मोकळे व्हावे त्याची छपाई, विक्री ह्या भानगडीत पडू नये. ह्याची दगदग आणि ह्याचा वेळ, एवढ्यात दुसरे एक पुस्तक लिहून होते." मी म्हटले, "ज्यानी दुसरी अनेक पुस्तके लिहिण्याची योजना आखली असेल, त्याना हा उपदेश योग्य आहे, पण . ".

(४) तात्यासाहेबाच्या पुस्तकातील एक पुस्तक अगदी लहान असून त्याची भाषा अगदी सोपी होती. त्याचा विषय मात्र राजकारणाचा होता ह्या पुस्तकासाठी त्याच्याकडे जाऊन त्याच्याशी मी बोलत बसलो असता ते म्हणाले, "हे पुस्तक मॅट्रिकच्या मुलाना शाळेत वाचण्यासाठी उपयोगी पडावे अशी इच्छा आहे. अशी एक मालाच लिहिण्याचा माझा विचार आहे."

(५) तात्यासाहेब त्याच्या एका लहानपणच्या स्नेह्याकडे भोजनास आले होते. लोकनायक बापूजी अणे त्यांच्या पक्तीला होते. जेवण झाल्यावर पान-सुपारी

घेऊन तात्यासाहेब उठले, आणि खुंटीवरचा कोट त्यांनी अंगात घातला. बापूजींस वाटले की, सदरा घालण्याचे हे विसरले असावे, म्हणून त्यानी त्यास तशी आठवण दिली तेव्हा तात्यासाहेब म्हणाले, "मी सदरा घालून आलोच नव्हतो. मी दोन दोन कपडे अलीकडे घालीत नाही. ही खादी भारी जाड असते; तेव्हा मी एका वेळी एकच कपडा घालतो. घरी सदरा घालतो, आणि बाहेर जाताना तो काढून ठेवून कोटच नुसता घालतो" एवढा थोर पुरुष. पण राहणी ही किती साधी!



## सी. ग. बांदिवडेकर

### ( पेन्शनर हेडमास्तर, खेड, रत्नागिरी )

"गांधीच फाळणीला जबाबदार!" हा तात्यासाहेब यांचा लेख त्यांनी आपल्या नावावर केसरीत प्रसिद्ध केला. तो मला फार आवडला, म्हणून मी त्याना तसे पत्र लिहिले खेरीज त्या पत्रात 'हिंदुस्थानच्या राजकारणावर गांधीतत्त्वाचे झालेले अनिष्ट परिणाम' या विषयावर पुस्तक होणे अत्यंत जरूर आहे व सदर काम आपल्यावाचून होणे शक्य नाही. तरी आपण लिहावे अशी विनंती केली होती. माझ्या या पत्राचे उत्तर ताबडतोब त्यांनी स्वहस्ते दिले ते हे :- "माझा लेख तुम्हाला चांगला वाटला असे तुम्ही स्वयंस्फूर्तीने लिहून कळविले याकरिता आभारी आहे तुम्ही सुचविता तशा प्रकारचे समर्पक पुस्तक अवश्य व्हावयास पाहिजे. मी तसे लिहिणार असते; पण दुर्दैवाने आता ते काम करण्यास मला शक्ति नाही. वार्धक्यामुळे लेखन सुटत चालले आहे" ता ७।७।४७ — न चिं. केळकर.

यावरून त्यांची शारीरिक शक्ति क्षीण होत चालली होती हे उघड आहे.



## भालचंद्र द. खांडेकर

### ( मालक, लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें )

( १ ) १९४२ या साली आमच्या 'लॉ प्रिंटिंग प्रेस' या सत्तर वर्षांच्या जुन्या छापखान्याचा वाढदिवस समारंभ साजरा करावा असे माझ्या मनात होते; व तो समारंभ तात्यासाहेबांच्या अध्यक्षतेखालीच करावा अशी तीव्र मनीषा होती म्हणून त्याबाबत मी त्याना विचारले होते.

तात्यासाहेबानाच अध्यक्ष करण्यामध्ये एक महत्त्वाचे कारण होतें व याचकरिता त्यांनी मोठ्या आस्थेने ते कबूल केले होते. तें म्हणजे तात्यासाहेबांचा व आमच्या छापखान्याचा फार जुना संबंध आलेला आहे. इतकेंच

नव्हे तर लो. टिळकांचा व माझ्या वडिलांचाहि ऋणानुबंध होता, हे त्या समारंभाच्या दिवशी खुद्द तात्यासाहेबांनी आपल्या भाषणांत विशद करून सांगितले. कसत्याशा रिपोर्टाचे काम छापायचे होते. ते इंग्रजीत होते व इंग्रजी काम त्या वेळी फारच थोड्या छापखान्यात होत होते टिळकानी ते छपाईचे काम आमच्याकडे पाठविले "घाईचे काम आहे, काळजीपूर्वक करा, टिळकांशी संबंध आहे," असे तात्यासाहेबानी माझ्या वडिलाना सुचवले होते. तितक्याच तातडीने व काळजीने ते रिपोर्टाचे छपाईचे काम माझ्या वडिलानी पूर्ण करून टिळकाकडे पोचते केले व शाबासकी मिळविली. ही हकीकत तात्यासाहेबानी समारंभाच्या दिवशी बोलून दाखविली व सुमारे चाळीस वर्षांपूर्वीचा इतिहास त्याना तेथे सांगितला यानंतर ताईमहाराजाच्या सुप्रसिद्ध खटल्याच्या अपिलाचे काम .टळकाना स्मरण ठेवून तात्यासाहेबाबरोबर आमच्याकडे पाठविले. तात्यासाहेबानी आमच्या उपरिनिर्दिष्ट समारंभाच्या दिवशी जे उद्गार काढले ते मननीय । । ते म्हणाले, "या समारंभाचे अध्यक्षपद मला देण्यात, या छापखान्याचे मालक खाडेकर यांचे चिरंजीव भालचंद्रपंत यानी फार औचित्य दाखविले आहे. हे अध्यक्षपद घेण्यामुळे मलाहि ३०–४० वर्षांच्या जुन्या आठवणी नव्याने लक्षात आल्या टिळकावर उपकार केलेल्या ज्या व्यक्ति आज आहेत, त्यात या छापखान्याचे मालक दत्तोपंत खाडेकर यांचा नंबर बराच वर लागेल. केसरी-मराठा या पत्राच्या सुरुवातीचे दिवस अत्यंत बिकट होते. त्या बिकट काळात या पत्राचे काही अंक छापून दत्तोपंत यानी आमची अब्रू बचावली आहे आणि म्हणूनच हे अध्यक्षपद कृतज्ञता बुद्धीने मी स्वीकारले आहे"

माझ्या वडिलांनी लिहिलेल्या 'म्युनिसिपल ॲक्टा'ला त्यांच्या प्रस्तावना तात्यासाहेब यानीच दिली होती, हेहि त्यानी त्या दिवशी सांगितले.

( २ ) तात्यासाहेब आमच्याकडे एकदा रात्रौ कीर्तनाकरिता आले होते. परत जाताना पाहतात तो त्याचा जोडा कोणी चोरून नेला असे दिसून आले ते पाहून मला फार वाईट वाटले. मी त्याना सांगितले की, आपल्या पायाचे माप घेऊन आतां पंधरा मिनिटात नवा जोडा आणून देतो. तसेच अनवाणी जाऊ नका; परंतु ते तसेच निघाले मात्र जाताना मजजवळ एवढेच म्हणाले, "माझे जोडे हरवले म्हणून तुम्हाला वाईट वाटले, पण मला आनंद झाला अहो, हल्ली पुणेरी जोडे वापरणारे आहेत कुठे ? बरे झाले, आणखी एक मनुष्य जोडे वापरणारा पुण्यात वाढला ! शिवाय तुम्ही देणार होता ते जोडे तुमच्याकडून घेणे मनाला प्रशस्त वाटेना !" तात्याच्या या विनोदाबद्दल मला अजूनहि आठवण झाली की हसू येते



## नारायण भास्कर नाईक
( संपादक 'भारतमित्र', रिवण, गोवा )

गोमतक व गोमतकीय याच्याबद्दल साहित्यसम्राट् याना फार कौतुक व प्रेम होते. समारंभाचे अध्यक्ष, वक्ते अगर अन्य नात्याने गोमनकाशी त्याचा सबंध आला होता त्याचे वक्तृत्व लाघवी असून त्यात आपुलकी ओतप्रोत असल्याने अत्यत पूज्य भावान गोमनकी त्याचे अमूल्य व्याख्यान ऐकत असत. केळकर, मुंजे प्रभृति गृहस्थाचे हिंदुसभेतर्फे शिष्टमडळ गोव्यात आले, त्या वेळी मी आमच्या 'भारतमित्र' सस्थेतर्फे त्याना हार घालण्यासाठी 'कॉलेम' स्टेशनवर गेलो. गाडी स्टेशनात उभी राहताच आपल्या मोवत्याना उद्देशून तात्यासाहेब म्हणाले — " अहाहा! गोमतकीय वाराच किती आल्हाददायक पाहा! अहो! 'गोवा' हे आमच्या महाराष्ट्राचे प्रत्यक्ष नदनवन आहे!" मराठीला अत्यत प्रतिकूल अशा गोमतकात महाराष्ट्र साहित्याची एकनिष्ठपणे सेवा बजावणारे मासिक म्हणून 'भारतमित्रा'वर तात्यासाहेबाचे आपुलकीचे प्रेम असे. जबाबदारीच्या मुख्य सपादकीय कामाची गर्दी असताहि मी दिसलो की हातचे काम बाजूला ठेवून " यावे, भारतमित्र " असे म्हणून ते प्रेमान स्वागत करीत मला 'नाईक' असे सबोधण्यापेक्षा 'भारतमित्र' म्हणणे त्याना विशेष आवड!



## पुरुषोत्तम पांडुरंग गोखले
( बी. ए., आमदार, कऱ्हाड )

( १ ) सातारा जिल्हा परिषदेचे अधिवेशन १९१२ साली कऱ्हाडास झाले. ते माझ्या घराशेजारी बेलापुरे नाट्य-मंदिरातच झाले. तात्यासाहेब हे त्या परिषदेचे अध्यक्ष होते माझ्या घराशेजारीच असलेल्या त्या नाट्यमंदिरात चाललेले तात्यासाहेबाचे भाषण मी बारा-तेरा वर्षांचा त्या वेळचा मुलगा साथपणे कितपत समजणार? पण " साधेपणी चारुता " असणाऱ्या तात्यासाहेबाच्या . . . मला मोहनी घातली इतकी की, दर बुधवारी डाकेने येणाऱ्या केसरीतील लिखाण विशेषत. केळकरी लिखाण वाचण्याचे मला व्यसनच लागले म्हटले तरी चालेल!

( २ ) तात्यासाहेब थोरात थोर तर असतच, पण पोरात पोर होऊन समरसतेने सल्ला देत, असा अनुभव मला असहकाराच्या पहिल्या लाटेत आला शाळा-कोर्टावरील बहिष्काराची उबळ त्या वेळी रोज रोज नव्या नव्या मडळींना येत होती. अर्थात् मीहि त्यातलाच तेव्हा आपला विचार व्यावहारिक किती, व्यक्तीच्या उपयोगाचा किती अन् खऱ्या राष्ट्रसेवेचा किती, याबाबत सल्ला घेण्यासाठी धीर करून आम्ही काहीं सातारकर कॉलेजविद्यार्थी तात्यासाहेबांच्याकडे

गेलो. तेव्हा तात्यासाहेबानीं आम्हांपैकी प्रत्येकाची परिस्थिति वडील भावाच्या आस्थेने समजावून घेतली अन् शेवटी म्हणाले की, "उच उडी मारणारा आणि लांब उडी मारणारा असे दोघेहि तरुण लोकाच्या कौतुकाचे विषय होतात, दोघेहि समाजाला उपयोगीच असतात पण उसळी घ्यावयाची का टप्पू घ्यावयाचा, याचा विवेक ज्याच्या त्याच्या उमेदीवर अवलंबून असतो शाळावरला बहिष्कार म्हणजे शिक्षणावरील बहिष्कार नव्हे परकीय सत्तेच्या तंत्रानें चालणाऱ्या संस्थावरील बहिष्कार आहे हा बहिष्कार घालून लोकशाही स्वराज्याचे सेवक होतील असे तरुण तयार करणाऱ्या राष्ट्रीय शाळा निघाल्या अन् त्या लोकानी टणकपणाने चालवल्या तरच गर्वार्थाने प्रस्तुतचा शाळा-बहिष्कार यशस्वी झाला, असे म्हणता येईल उलट, लोकशाही बहुमतावर चालते; आपल्या हिंदुस्थानात इंग्रजाने बहुजनसमाज अडाणी राखला म्हणून त्या अडाणी समाजाशी समरस होण्यासाठी आपण शाळा सोडल्या तर जग आपल्याला समजणार नाही, बहुजनसमाजाला समजावून सागता येणार नाही, आणि अशा तऱ्हेने नेमके इंग्रजाला व हिंदुस्थानच्या शत्रूला हवे त्या गोष्टीलाच आपण शाळावरील बहिष्काराने मदत केल्यासारखे होईल. म्हणून अद्यापि ना लोकशाही हे आपले ध्येय न विसरता जे झेपेल तेच करावे, देखाव्याने दिपून जाऊ नये व मुख्यतः पश्चात्तापास कारण न होईल असेच धोरण ठरविणे योग्य होईल," अशा तऱ्हेचा पोक्त, सावधगिरीचा पण तरुणानी नाउमेद न होण्याचा सल्ला त्यानी दिला

(३) १९३२ सालीं श्री. अण्णासाहेब शिंदे याचें व्याख्यान बेलापुर नाट्य-मंदिरात तात्यासाहेबाच्या अध्यक्षतेखालीं होणार असल्याचे कळले तेव्हा श्री. शिराळकराच्याकडे तात्यासाहेबाच्या दर्शनाला गेलो तेथे बोलता बोलता, महाराष्ट्र तरुण बुद्धिवादी राजकारणात पडावयाचें सोडून महात्मा गाधीच्या भावनात्मक राजकारणांत अकारण भाग घेतात, असा प्रवाद निघाला अर्थातच मी या गोष्टीचा इनकार केला. "राष्ट्राचे पाऊल पुढे पडत आहे, ते आजकाल म. गाधीच्या राजकारणाने पडत आहे, हे तेल्यातांबोळ्यांचे पुढारी म्हणविण्यात अगर म्हटले जाण्यात भूषण मानणाऱ्या लोकमान्य टिळकाच्या महाराष्ट्रातील तरुणाना पटते कारण गाधींनीं 'परत खेड्यात' असा जो संदेश दिला आहे, त्यातील रहस्य महाराष्ट्राचे बुद्धिवादी तरुण चागले ओळखतात!" माझ्या अशा तऱ्हेच्या काही बोलण्यावर तात्यासाहेबानीं आम्हा सर्वच बोलकाची समजूत फर्मास घातली ते म्हणाले – "भावनाप्रधान असला तर तो तरुण कसला! 'परत खेड्यात' चालण्याचा संदेश गाधीनीं दिला, तो एकपरी लोकमान्यांच्या लोकसेवक राजकारणाचा विकासच आहे. पण म्हणून लोकरंजनाच्या मोहानें लोकांची एक तऱ्हेची खुषमस्करी करण्याची संवय भावना-प्रधान तरुणांना लागते आणि ती लोकशाहीला शेवटीं घातकच आहे. उदाहरणार्थ,

आजचा अस्पृश्यता-निवारणाचाच प्रश्न घेऊ केवळ महात्मा गांधी म्हणतात म्हणून हुल्लडबाजीने जर कोणी सहस्रभोजने उठवू लागला, तर अस्पृश्यतानिवारणाचा तो देखावा होईल व मूठभर लोकापुरता नि गाजावाजापुरताच त्याचा उपयोग होईल पण खरे अस्पृश्यता-निवारण म्हणजे आपल्याकडे आपले आप्तेष्ट आले असताना घरच्या सव मडळींत जसा सकोच म्हणून कसा तो वाटत नाही, तसाच महारमाग वगैरे म ‘ळी आल्यावर समाजात कोठेच वाटेनासा झाला, म्हणजेच खरे अस्पृश्यता-निवारण झाले, असें स्वच्छ म्हणता येईल. या कामी एका बाजूनें स्पृश्य मडळींत अस्पृश्यतानिवारणाचें राष्ट्रीय व सामाजिक महत्त्व आणि मानवतेचा धर्म व्यावहारिक बुद्धिवादानें बिंबवला पाहिजे, तर दुसऱ्या बाजूने स्पृश्य समाजाबद्दलहि अस्पृश्याना सहकारसगति-साहाय्य-सघटन यांचें महत्त्वहि त्याच्याच बोलीने बोलून पटवून दिलें पाहिजे. वर्गविग्रहाच्या भावना न फुलवता वर्गसमन्वयाच्या भावनाना कोणी तरुण कार्यकर्ता आपल्या अस्पृश्यतानिवारणाच्या कळकळीनें भरतीच्या भरती आणीत गेला तर त्याला नाव ठेवण्यासारखे काय आहे? उलट, बुद्धीनें निश्चित केलेलें कर्तव्य कळकळीच्या भावनानीं मोहरून दाखविले, तर त्या तरुणाची पाठ थोपटणेंच इष्ट आहे.”

( ४ ) “ गुणाः पूजास्थान गुणिषु न च लिंग न च वयः ” एवढेच नव्हे तर “ तथा ना भेदो वा समरसमयो भिन्नमतयो. ” असेंच तात्यासाहेबाचें वागण्याचें धोरण असे. सातारा जिल्ह्याला त्याचा प्रत्यय १९३४ साली तात्यासाहेबानीं खास दिला. Parliamentary Mentality has come to stay असे महात्मा गांधींनीं जाहीर केल्यास काही दिवस लोटले नाहींत, तोच मुबई कौन्सिलसाठी दे. भाऊसाहेब सोमणानी कॉंग्रेसचा उमेदवार म्हणून निवडणूक लढवावी असे ठरलें. अखिल अखड हिंदुस्थानात परकीय सत्तेविरुद्ध कॉंग्रेसने मिळविलेल्या लोकाच्या पाठिंब्याचा तो पहिला निकष लावण्याचा प्रसग होता. १९३० च्या चळवळीनंतर कॉंग्रेसमधून तात्यासाहेबानी बहुधा सर्वप्रकारें अग काढून घेतलें होतें. तरी सुद्धा कायदे-मडळावरील बहिष्कार कॉंग्रेसने काढून घेतला आणि ऐन सरकारी दरबारात लढत देण्याचें तत्त्व मान्य केले, या एकाच आनंदानें तात्यासाहेबानीं सोमणाच्या निवडणूक प्रचाराची मोहीम सुरू केली, ती प्रथम कऱ्हाडपासूनच. त्या वेळीं आणि १९३६ साली मे महिन्यात व नोव्हेंबर महिन्यात दे. शिराळकर-सोमणाचे षष्ठ्यब्दिसमारभ झाले त्या प्रसगी, तात्यासाहेब अध्यक्ष असतांना, मी स्वयसेवक म्हणून काम करीत होतों त्या कामातील वेळापत्रक मीं बिनचूक पाळून दाखवले याबद्दल तात्यासाहेबानीं शाबासकी दिली होती. शिराळकर साठीच्या प्रसगीं कै. महादेव हरी दुबेदी व मी असे प्रत्येक बारीकसारीक गोष्ट पाहत होतो. ते पाहून तात्यासाहेब समारभाहून परत फिरतांना म्हणाले —

" तुमच्या इकडील सदर्न मराठा रेल्वे काही आपलीं स्टेशनें नेमक्या मिनिटाला गांठत नाही. पण तुम्ही सगळे कार्यक्रम कसे ठराविक मिनिटाला संपवलेत. नियमितपणा, नेमकेपणा आणि उरक यांची अत्यंत मोठी उणीव आपल्या सार्वजनिक जीवनात आहे. ती उणीव आता नाहीशी होईल, असे तुमच्यासारखी कामसू माणसे पाहिल्यावर खास वाटू लागतें "

( ५ ) डॉ दादासाहेब भडकमकर यांचा 'साठी' समारंभ पुण्यास झाला. त्या वेळी भडकमकर-गौरव-ग्रंथ प्रसिद्ध झाला तो तयार होत असताना, आर्यभूषण छापखान्यात संपादकीय कामानिमित्त मी सकाळ-दुपार काही काळ बसे आणि मुख्य संपादक प्रा माटे यांच्या संमतीने ग्रथांत समाविष्ट करावयाच्या मजकुराची जुळणी करी. या क्रमात मी दोन दिवस अंगात ताप असूनहि काम केले. ही वार्ता कोठून तरी तात्यासाहेबांच्या कानी गेली तेव्हा पुढे दोन दिवस सकाळ-संध्याकाळ एकदा नियमाने छापखान्यात येऊन माझ्या प्रकृतीची चौकशी करून व काम नीट चालले आहे असें पाहून तात्यासाहेब जात. भडकमकर 'साठी' समारंभाचे प्रमुख म्हणून काम पाहत असतांना, काम आणि ते करणारा माणसे नीट मार्गी असल्याचें दक्षतेनें पाहणाऱ्या तात्यासाहेबांच्यापासून कर्त्या व पुढारी माणसाची जबाबदारी कशी बारकाव्याची असावी याचा बोध माझ्या मनावर ठसला.



## के. भा. लेले

### ( डॉक्टर एम्. सी. पी. एस्., पुणें )

( १ ) स. १९४६ साली 'जादूच्या खेळाचे प्रकार' हे पुस्तक मी प्रसिद्ध केलें व त्यावर तात्यांचा अभिप्राय मागितला. आणि मौज म्हणून त्यांना ४।५ खेळहि करून दाखविले हे खेळ त्यांच्या घरीं, दिवसा व त्यांच्या नजरेसमोर एक फुटाच्या अंतरावर दाखवूनसुद्धा त्यांना त्यामधील गुप्त प्रकार समजला नाही, हे पाहून त्यांना फार अचंबा वाटला तेव्हा ते म्हणाले, ' मला या विषयाची मुळीच माहिती नाही, याकरिता माझ्या अभिप्रायाऐवजी तुम्हीच लेख लिहून द्या म्हणजे 'सह्याद्रि'मध्ये छापू'. त्याप्रमाणे मी लेख लिहून दिला व तो ताबडतोब म्हणजे मार्च १९४६ च्या सह्याद्रीच्या अंकात त्यांनी छापला

( २ ) 'हिप्नॉटिझम' या विषयावर मराठी भाषेत योग्य असं एकहि पुस्तक नाहीं या विषयात 'हिप्नॉटिस्ट' किंवा 'ऑपरेटर' आणि 'सबजेक्ट' या इंग्रजी शब्दांना मराठींत कोणते शब्द योजावेत याविषयी बोलत असता ते एकदम उठले व माडीवर जाऊन त्यांनीं भगवद्गीता उघडून दाखविली 'प्रयोगकार' किंवा 'प्रयोगी' आणि 'युक्त' असें शब्द योजण्याला हरकत नाहीं, असे त्यांनी सांगितले.

( ३ ) १९४६ च्या डिसेंबरात अखिल भारतीय जादूगारांची पहिली परिषद मी पुण्यास भरविली. त्या वेळी जादूविषयक वाङ्मय व वस्तूंचे प्रदर्शन मांडले होते. ते प्रदर्शन पाहून " एका माणसाची ही कृति व जादूचा शिक्षणात उपयोग करून घेता येतो, हा शोध विचारात घेण्यासारखा आहे, " असे त्यांनी उद्गार काढले. ' पाश्चात्य जादू-विद्या ' या माझ्या ग्रंथातला वरील प्रदर्शनासंबंधाचा त्यांचा अभिप्राय वाचनीय आहे.



## माणिकचंद वीरचंद शहा

( धनाढ्य व्यापारी, सोलापूर-पुणें )

( १ ) श्री. तात्यासाहेब यांचा माझा परिचय, [illegible] पुढारी व अनुयायी या नात्याने पुष्कळ असला, तरी १९४२ साली जिमखान्यावर आम्ही राहण्यास आल्यापासून तो अधिक घनिष्ट होत गेला व त्यात आपुलकीचा जिव्हाळा उत्पन्न झाला. यामुळे त्यांच्या माझ्या वयात २५ वर्षांचे अंतर असले तरी त्यांनी स्नेही म्हणून बरोबरीने वागविण्यास सुरवात केल्याने तो पुढे पुढे घरच्या माणसाइतका वाढला. ते त्यांच्या मनुष्य-संग्रहाच्या दृष्टीने जरी बरोबरीच्या नात्याने वागवीत असले तरी त्यांच्या व माझ्या योग्यतेमधील अंतर ओळखून त्यांच्याबद्दल योग्य आदर ठेवूनच आम्ही वागत असू. जानेवारी १९४५ साली माझ्याकडे वळसंगला हुरडा खाण्यासाठी मी त्यास आमंत्रण देण्यास गेलो, त्या वेळी ते म्हणाले, " पूर्णतया विश्रांति मिळत असेल तरच मी येईन, " व त्याप्रमाणें त्यांना पूर्ण विश्रांति [illegible] असे मनाशी ठरवून त्यांना नेले.

( २ ) याच हुरडा पार्टीच्या वेळी तेथे जमलेली इतर मंडळी फुरसतीच्या वेळी करमणूक म्हणून 'रमी' खेळत होती. अर्थात् [illegible] एकीकडे त्यांना उपाधी न होईल अशा बेताने खेळत होती पण [illegible] नजरेतून ही गोष्ट सुटली नाही ते [illegible]जारी येऊन बसले, थोडा वेळ खेळ पाहून खेळाची [illegible] विचारली, खेळ जोडीदाराची जरूर नसलेला, ज्याचा तो जबाबदार व केव्हाहि पुरा करता येणारा असा आहे व इतर [illegible]माणे समोरील गड्याची चूक होताच उणे अधिक बोलण्याचे कारण नाही असे पाहून तेहि खेळतो म्हणाले ! त्या वेळी व त्यानंतर तेथें असेपर्यंत इतर कार्यक्रमातून वेळ मिळताच ते म्हणत, " ह चला काढा रमी " हा खेळ त्यांनी इतका पसंत केला कीं, पुण्यास [illegible]नंतर देखील महिन्यातून बरेच वेळा ते विचारीत की आहे का फुरसत ? व सर्वांना बोलावण्याबद्दल सुचवीत असत. त्यांना या खेळापासून अवश्य ती विश्रांति व करमणूक मिळते, म्हणून आम्ही असे प्रसंग मुद्दाम जमवून आणीत असू. त्या वेळी सर्व प्रका-

रच्या विषयांवर चर्चा व त्यावर त्यांचे मत ऐकण्याचा व त्यांच्या संगतीचा लाभ मिळत असे

( ३ ) गेली ३–४ वर्षे आम्ही काही मित्र-मंडळी मधूनमधून सहलींचे कार्यक्रम ठेवीत असू त्यात नाऱ्यागाईवादि असत त्यासाठी आम्ही बनेश्वर, आळंदी, लोणी ... इत्यादि ठिकाणी गेलो होतो एका बनेश्वराच्या सहलीच्या वेळी तात्यासाहेब तेथे आल्याचे मामलेदार याना समजले; त्यानी आमची व्यवस्था ठेवलीच, पण तिसऱ्या प्रहरी त्यानी सर्वांना चहास निमंत्रण दिले तात्यासाहेब हे त्या वेळी भोर संस्थानचे ए कौन्सिलचे अध्यक्ष होते आम्ही मामलेदार याच्या घरी जमलो असताना एक संस्थानी शेतकरी तेथे आला व तात्यासाहेबांच्या पायावर डोके ठेवून, त्याच्यापुढे नारळपानसुपारी ठेवून " माझ्या नातवाच्या लग्नाचे तुम्हास आवतन देण्यास आलो " असे म्हणाला त्या वेळी त्यांचे डोळे कृतज्ञतेच्या आसवानी भरून आलेले होते. आम्ही प्रश्नार्थक मुद्रेने एकमेकाकडे पाहू लागलो तेव्हां तात्यासाहेब म्हणाले, " या शेतकऱ्याने वॉरबॉंडसाठी पैसे भरलेले होते. वॉर बॉंड घेतले गेले नसल्याने त्याला बॉंड किंवा पैसे परत मिळालेले नव्हते त्या वेळी भोर स्टेटचे काही चौकशीचे काम मजकडे आले होते. त्या इसमाचा अर्ज पाहून त्याला पैसे देण्याचा हुकूम देण्यात आला." त्याच्यासमोर नेहमी पडलेल्या मोठमोठ्या कामाच्या व्यापातहि गरिबाचे छोटेसे कामहि लक्षात ठेवून ते ते करीत असत त्यांच्याकडे गरीब, श्रीमंत भेद नसे. तात्यासाहेबाऐवजी एरवी नेहमीच्या अधिकारी वृत्तीचा कोणी गृहस्थ त्या जागी असता तर पैसे देण्याचा हुकूम व पैसे प्रत्यक्ष पदरी पडण्यास त्या वृद्ध शेतकऱ्याच्या नातवाच्या नातवाचे लग्नाचे दिवस उजाडले असते !

( ४ ) ता. ५ मे १९४५ रोजी जयंतराव टिळकांचे लग्न होते लग्नाच्या दिवशी आम्ही पानसुपारीस गेलो त्या वेळी तात्यासाहेब तेथे स्वागतास उभे होते आम्हास वाटले की, तेहि आमच्याप्रमाणे पण थोडे आधी आले असावेत. त्यानी आम्हास खुर्च्यांवर बसण्यास सांगितले, त्या वेळी मी त्यानाहि बसण्यास विनंती केली; तेव्हा ते म्हणाले, " आज मी यजमान आहे ! " तितक्यात दुसरी मंडळी आली. ते त्याच्या स्वागतास गेले मागाहून समजले की, ते गमाळीन तेथे आले असून पानसुपारी गायकवाड वाड्यांतच व्हावयास पाहिजे म्हणून त्यानीं शक्य ती तजवीज तातडीनें करविली जयंतरावानीं त्याना फक्त लग्नाचें आमंत्रण दिले. तरी वडीलपणाच्या मोठ्या आदरामुळे त्यानीं त्याना याबद्दल काही सांगितलें नव्हतें लोकमान्य टिळकाचे ऋण, त्याची परंपरा चालवून व इतर पुष्कळ तऱ्हांनीं त्यांनीं फेडले होतें; तरीहि त्याच्या नातवाच्या लग्नात वयाच्या ७४ व्या वर्षी दिवसभर काम करून टिळकांची राहिली-साहिली बाकी फेडता फेडता, त्याच्या नातवास

त्यांच्या आजोबाची शिकवण व पुढील व्यवहाराचे धडे देण्यासाठीच जणुं ते उभे होते, असे प्रत्येकास वाटले असल्यास नवल नाही

( ५ ) तात्यासाहेबाच्या एका स्नेह्याच्या मनात ××× सस्थान हद्दीत एक नवीन कारखाना काढण्याची कल्पना आली; त्यासाठी सस्थानकडून काही सवलती व परवानगी हवी होती त्या सस्थानिकाचे व तात्यासाहेबाचे निकट सबध असल्याचे माहीत - ।ा ।।ा त्यानी तात्यासाहेबाकडे विचारणा करताच ओळखपत्र तर दिलेच, व सध्या विशेष वाटाघाटी चालू आहेत, घाई करा, अशी सूचनाहि दिली शिवाय समक्ष भेटीत त्याना सागेन असे म्हणाले त्या पत्रासह अर्ज करताच राजेसाहेबाकडून मान्यतेचे उत्तर तात्यासाहेबाच्याकडे लागलीच आले ते घेऊन तात्यासाहेब स्वत. त्या स्नेह्याकडे गेले, व असे उत्तर आले आहे, दिवाणाना भेटा, जरूर तर दिवाणानाहि पत्र देतो असे १२-१०-४७ ला म्हणाले. पुढे त्याचे काम आठ दिवसात त्या पत्रामुळे झाले. पण तात्यासाहेब मात्र ते पाहण्यास राहिले नाहींत!

( ६ ) ऑगस्ट १९४७ ची गोष्ट तात्यासाहेब हे भोर स्टेटच्या कामासाठीं स्टेटच्या गाडीतून सकाळी भोरला जाण्यासाठी निघाले होते पुण्यापासून ६-७ मैलावर त्याची गाडी नादुरुस्त झाली ड्रायव्हरने चालू करण्याचा शक्य तो प्रयत्न केला, पण गाडी चालू होण्याचा रग दिसेना तात्यासाहेब व त्यांच्या बरोबरचे गृहस्थ उतरून इकडे तिकडे हिंडत होते त्या वेळी तात्यासाहेब सोबतच्या गृहस्थास म्हणाले, "आता कोणाबरोबर जर माणिकचद किंवा वालचंदकडे निरोप पाठविला तर ते आपली गाडी नक्की पाठवितील" योगायोग असा की, या बोलण्यानतर पांचच मिनिटांनीं शेठ वालचद आपल्या एका स्नेह्यास घेऊन बनेश्वराला निघाले होते, ते तेथे पोहोचले! पुढे त्यानी त्यांना भोर येथे पोहोचविले हे सागणें नकोच. पण आठवण करतांच किंवा इच्छा करताच ती गोष्ट समोर उभी राहावी याला योगायोग, दैवी इच्छा किवा आत्मिक बळ, काहींहि म्हणा, त्याच्यामध्यें होते हे खरे ही हकीकत त्यानी मला स्वतः सागितली व अनुभवाचा बोल म्हणून म्हणाले की, "ा ा।ा।ा।ा। विशेषत. मोटारने निघावयाचे असल्यास दिवस अंगावर घेऊन निघावे"



## सुंदरराव भास्कर वैद्य

### ( मुंबई )

( १ ) विनोद हा तात्याच्या अगी मुरलेला होता. त्याच्या वयास साठ वर्षे पुरीं झाली म्हणून त्याचे अभिनदन करण्याकरितां मुबई मराठी ग्रथसग्रहालयाच्या-मार्फत मुबईंत ब्राह्मण सभेत एक समारभ झाला त्या सस्थेचा या वेळी मी कार्यवाह

होतों. माझ्याकडे आभार मानण्याचे काम होते म्हणून मी व्यासपीठावर अध्यक्ष बाबासाहेब जयकर यांच्याजवळ बसलो होतो मी तात्यासाहेबाना अर्पण करण्या-करिता त्यांचे छायाचित्र ( सिलुएट = माणसाचे बाजूने बघून काळया कागदावर चित्र काढावयाचे व ते कापून पाढऱ्या कागदावर चिकटवावयाचे म्हणजे माणसाची सुदर ओळख पटते. ) काढले होते व ते मी तात्यासाहेबास अध्यक्षाच्या हस्ते देवविले. त्या वेळी तात्यासाहेबाच्या विरुद्ध मुबईतील एका साप्ताहिकाने एक लेख लिहिला होता त्याची आठवण ठेवून चित्र हातात घेऊन ते म्हणाले – " हे पाहा, वैद्यांनी माझे काळे छायाचित्र काढून मला बक्षिस दिले आहे, पण त्या सपा-दकार्नी जर हे पाहिले तर ते म्हणतील, माझ्या तोडाला वैद्यानी काळे फासले आहे ! " याच वेळी मी तात्यासाहेबाचे रगीत चित्र तादळाच्या एका दाण्यावर काढलें ते तात्यासाहेबाचा षष्ठयब्दपूर्तीचा समारभ पुण्यात होता, त्या वेळी ते मी पुण्यास पाठविले ते समारभाच्या वेळी तात्यासाहेबाना अर्पण केल्यावर ते विनो दानें म्हणाले, " मी आज ह्या समारभाकरिता मुबईहून अक्षता घेऊन आलो आहे! तादळाच्या एका दाण्यावर छायाचित्राप्रमाणे माझें हे हुबेहूब रगीत चित्र काढलेलें आहे ! "



## कृ. ग. जोशी

**( बी. ए., रावबहादूर, निवृत्त शिक्षणाधिकारी, पुणे )**

( १ ) माझा व तात्यासाहेब ह्याचा परिचय त्याचे वडील बधु नाना ह्याच्या-मार्फत झाला. नाना हे शाळाखात्यात शिक्षक म्हणून काम करीत होते व त्याच्या-बद्दल तात्यासाहेब ह्याना विशेष प्रेम व आदर असे. नाना अल्पायुषी वारले व त्याचे कुटुबहि त्याच्या मागे लवकरच निवर्तले; तेव्हा त्याच्या दोन मुलाची जबाबदारी तात्यासाहेब व त्याचे बधु माधवराव याच्यावर येऊन पडली. वडील मुलाची सर्व व्यवस्था म्हणजे सगोपन, शिक्षण, लग्न व तदनतरची सर्व तरतूद तात्यासाहेबानी सर्वप्रकारे स्वत.च्या मुलाप्रमाणे समसमान केली माझी व तात्यासाहेब ह्याची जेव्हा खाजगी रीतीने गाठ पडे तेव्हा त्याबद्दल उल्लेख केल्याशिवाय मला राहवत नसे अशा प्रसगी तात्यासाहेब उत्तर देत की, " मी फक्त माझे पवित्र कर्तव्य करण्याची खटपट करीत आहे नानानीं आम्हाबद्दल जे केले आहे त्या मानान हे काहींच नाहीं " बधुप्रेम व कर्तव्यनिष्ठा ह्याचे अधिक ठळक द्योतक ते काय असावे ?

( २ ) तात्यासाहेबाच्या मातुश्रीच्या इच्छेवरून त्याची एक मामेबहीण त्याच्याजवळ राहण्यास आली. सदर बाई त्याच्याजवळ निदान ३०–४० वर्षे राहत होत्या. पण वृद्धपणामुळे व विशेषत त्याच्या चमत्कारिक स्वभावामुळे त्याचे तेथे

राहणें कठीण झाले आहे हे तात्यासाहेबांनी ओळखून त्यास त्याच्या हयातीपर्यंत मदत करण्याचे ठरवून दुसरीकडे राहण्याची तजवीज केली. अशारीतीनें त्याची स्वतंत्र व्यवस्था योजून त्यासाठी दरमहा त योग्य ती रक्कम न चुकता पाठवीत असत. पाठविण्यात येणारी रक्कम कमी होते असे नजरेस येताच त्यांनी ती रक्कम दीडपट केली. असला प्रेमळपणा व न्यायबुद्धि हे गुण स्वातंत्र्याच्या नवीन युगात अत्यावश्यक नाहींत काय ?

( ३ ) पुणें शहरांत मुलींसाठीं स्वतंत्र कॉलेज स्थापण्याच्या योजनेस तात्यासाहेबांचा पूर्णपणें पाठिंबा होता. महाराष्ट्र गर्ल्स एज्युकेशन सोसायटीनें असे कॉलेज सुरू केल्यावर तात्यासाहेबांनी मुद्दाम हुजुरपागेंत येऊन माझी गाठ घेतली व हुजुरपागेतील शिक्षणसंस्थेच्या व्यावहारिक चोख व्यवस्थेबद्दल प्रशंसोद्गार काढून मुद्दाम सोसायटीच्या उपयोगासाठी मी कायम ठेवेची रक्कम घेऊन आलो आहे असे मला त्यांनीं सांगितलें. सार्वजनिक संस्थेबद्दल अशी तळमळ बाळगणारे नेते किती सापडतील ?



## मुरलीधर रामचंद्र चंद्रात्रेय

### ( बी. ए., मामलेदार, माढें )

( १ ) सन १९२६ सालची गोष्ट. मी ज्युनिअर बी. ए. च्या वर्गांत होतो. त्या वेळीं केळकर यांचें एकहि व्याख्यान न चुकविण्याचा संकल्प मीं केला होता. त्यांच्या कांहीं कांहीं व्याख्यानांचा ठसा आजहि माझ्या मनावर कायमचा कोरला गेला आहे. ।ग।।जा नांदरा। 'कानपूर कॉंग्रेस' या विषयावर त्यांचें व्याख्यान झालें. व्याख्यानात त्यांचा आत्मविश्वास नि आपल्या मतांची कसोटी यांचा चांगलाच प्रत्यय आला. त्या कॉंग्रेसमध्यें कौन्सिल-प्रवेशावर कॉंग्रेसचा शिक्कामोर्तब कसा बसला व महाराष्ट्राचें मतच अखेर कसे मान्य झाले हे त्यांनी फार उत्तम रीतीनें सांगितलें. प्रतियोगी सहकारितेबद्दलहि ते म्हणाले कीं, " Pandit will have to learn another lesson from Maharashtra."

( २ ) सन १९३९ साली केळकर नाशिक सार्वजनिक वाचनालयाच्या उत्सवप्रसंगी व्याख्यानास आले होते, त्या वेळी मी हजर होतो. 'समग्र केळकर वाङ्मय' यावर नुकतीच एका लेखकाकडून टीका करण्यात आली होती. त्यावर सह्याद्रीमध्ये एक लेख प्रसिद्ध झाला होता. त्या लेखाची धाटणी अगदीं केळकरी वळणावर होती; परंतु लेख टोपण नांवाखाली प्रसिद्ध झाला होता. तेव्हा मी केळकर यांना म्हणालो कीं, सदरहु लेख आपणच लिहिलेला आहे, मग तो टोपण नावानें कां लिहिला ? तेव्हा ते हसत म्हणाले कीं, " लेखकास योग्य उत्तर दिले गेले कीं नाहीं ?

लेख कोणीं लिहिला हा मुख्य प्रश्न नसून लेखाचें कार्य साध्य झाले की नाही हा महत्त्वाचा प्रश्न आहे त्याचे उत्तर तुम्ही द्या म्हणजे झाले ।"



## महादेवशास्त्री दिवेकर

( हिंदुत्वदीपक, मिरज )

तात्यांचा व माझा घनिष्ठ संबंध प्राज्ञपाठशाळेचा प्रचारक, लेखक व हिंदु-समाजसंघटक अशा तीन नात्यांनीं आला विविध प्रसंगी त्यांचें व्यक्तिमत्व मला आढळले.

( १ ) उमरावतीस मी प्रा पा शाळेच्या प्रचारार्थ गेलो होतो त्याच वेळी तेथे डॉ गौरांच्या अध्यक्षतेखाली वऱ्हाड-मध्यप्रांत राजकीय परिषद भरली होती लो मा टिळक नुकतेच सुटून आले होते, त्यामुळें त्या परिषदेला महत्त्व होते सर मोरोपंत स्वागताध्यक्ष होते तात्यासाहेब केळकर, डॉ मुंजे वगैरे त्या वेळी आले होते सभा एका विशिष्ट धोरणानेच व्हावी व त्याकरिता काय युक्ति करावी, याची चर्चा चालू होती; कारण नेमस्तपक्ष तेथे जोरात होता तात्यासाहेब म्हणाले, "हे पाहा डॉ. मुंजे, तुम्हाला जर गोंधळ व बखेडा नको असेल, तर असे करा, स्वागत भाषण व अध्यक्षीय भाषणें कशीहि होवोत पुढील काम आपल्या तंत्राने व्हावे. त्याकरितां अध्यक्षाच्या शेजारी एका बाजूस तुम्ही बसा व दुसऱ्या बाजूस मी बसतो. प्रत्येक महत्त्वाच्या वेळी अध्यक्षाला जवळच्या जबाबदार माणसांना विचारवेसे वाटते. तुम्ही आम्ही जवळ असलो की सभा आपण जिंकू " पुढे तीच व्यवस्था केली त्यामुळे परिषद उत्तम तऱ्हेने पार पडली

( २ ) गोमांतकात भट्ट प्रभु परिषद ग्रामण्याकरिता भरली श्रीशंकराचार्यांनी तात्यांना आपले प्रतिनिधि म्हणून पाठविलें परिषदेचे अध्यक्ष तात्यासाहेबच होते. परिषदेपुढें भट्ट प्रभु समाजाची बाजू मी उत्तम मांडली, त्यामुळे विरुद्ध बाजू अगदी लंगडी पडली भट्ट प्रभु पुढाऱ्यानी तात्यासाहेब यांचा व माझा परिषदेनंतर अनुक्रमे सुवर्णपदक व उपरणे देऊन गौरव केला. त्या वेळी उत्तरार्थ भाषणात तात्या अगदी गहिंवरून म्हणाले, "या परिषदेमुळे मी पुष्कळ शिकलों धर्माच्या नावाखाली समाजात किती अन्याय होतो याची कल्पना आली. तुमचें दुःख मी जाणतो मी श्रीशंकराचार्यांकडे योग्य तेच कळवीन " भाषणानंतर भट्ट प्रभु मंडळी ईश्वराचा तू अवतार आहेस असें म्हणून तात्यांच्या पाया पडली पुढे तात्यांच्या मताप्रमाणें शंकराचार्यांनीं भट्टप्रभूंच्या बाजूने निर्णय दिला व तें ग्रामण्य संपलें. भट्ट प्रभु अवघे ३०० होत त्यांना अन्य ब्राह्मणांनीं वाळींत टाकल्याचें हे ग्रामण्य होतें.

( ३ ) सातान्यास बॅ रामराव देशमुख याच्या अध्यक्षतेखाली गाधी मत-विरोधी पक्षाची राजकीय परिषद भरली होती त्या सभेत अनेक भाषणे व ठराव झाले सुताच्या अटीचा विषय निघाला तात्या इतके लाल झाले व म्हणाले, " हा काय पोरखेळ आहे ? चार आणे वर्गणी द्यावी हे ठीक आहे पण तुमची सुताची अट असेल तर मा चार आण्याची भाजी द्यावी अशी पुस्ती सुचवितो : कारण सुतापेक्षा भाजी त्वरित उपयोगास येते ! ! तेव्हा या सभेत ती अट नको. "

( ४ ) सागली इजिनिअरिंग कॉलेजच्या वाढ दिवसास तात्यासाहेब आले होते त्यानतर ते मिरजेस आले अवध्या दोन महिन्यापूर्वीचीच गोष्ट ! अलीकडे श्रीमताच्याकडेच तात्या उतरत असत परतु आम्ही गावच्या मडळींनी केव्हाहि बोलाविले तरी ते येत व भाषण करीत लो शा पक्ष, हिंदु सभा, गीताश्रम मडळ हेच त्याचे अलीकडे निमत्रक असत शाकरतत्त्वमदिरात तात्याचे भाषण झाले. प्रश्नोत्तर झाली रेफरेंडमहि देशाच्या नावावर व एक दोन प्रश्नावर त्यानी घेतला शेवटी ते म्हणाले, " आम्ही बुद्धिद्रोह केला नाही, देशद्रोह तर नाहीच नाही देशहितार्थच आम्ही आमची मते माडली आम्ही बाजूला पडलो तरी देश स्वतत्र झाला यात आम्हाला आनद आहे हे राज्य आपल्या अगावर आले आहे खेळात राज्य येते, तसेच हे झाले आहे. ते चालविताना स्वार्थत्यागाचा फारच मानसिक त्रास होणार आहे हे विसरू नका कॉंग्रेस हा मोठा पक्ष आहे मोठ्यानेच लहानाची दखल घ्यावयाची असते त्या पक्षाने सर्व पक्षातील लायक व कर्तृत्ववान् माणसे घेऊन राज्य करावे आम्हाला बोलाविले तर आम्हीहि कसलीहि अट न मानता साह्य करू कारण देश आपला आहे " हे चटका लावणारे विचार ऐकताच मला वाटले की, टिळकपक्षाचा मान तात्यांना गव्हर्नर नेमून करणे योग्य होते कुठे तो पक्कासा, ती सरोजिनी व कुठे हा नरसिंह ! ! !



# न. गो. अभ्यंकर

## ( वकील, रा. स्व से. संघ-प्रमुख, पुणे )

राष्ट्रीय स्वयसेवक सघाचे आद्य सरसघचालक पू डॉ हेडगेवार हे सामान्यत. सन १९२८ सालापासून दरसाल महाराष्ट्रात सघप्रचारार्थ येऊ लागले. सन १९३४ सालापासून त्याच्याबरोबर असण्याचे सद्भाग्य मला प्राप्त झाले होते. पुण्यात आल्याबरोबर पहिली गोष्ट ते करीत, ती म्हणजे 'देवदर्शन' घेत. हें देवदर्शन म्हणजे केसरी कचेरी, तात्याराव केळकर, अण्णाराव भोपटकर या थोर पुढाऱ्याची भेट ! या दरप्रसगी मी त्याच्याबरोबर असे. पू डॉक्टर यांच्याबरोबर

असाच चौथ्या अगर पाचव्या वेळीं तात्याराव यांच्याकडे गेलो होतो त्या वेळीं वाहन कसलेंहि आमच्याजवळ नसे तात्याराव यांची गाठभेट होऊन आम्ही परत निघालो वेळ दुपारची होती तात्याराव म्हणाले, "डॉक्टर, इतक्या उन्हात पायी इतक्या लाब येण्याची तसदी कशाला घेतली?" पू डॉक्टर लगेच म्हणाले की, "वडिलांच्या दर्शनास व आशीर्वाद घेण्यास निघताना कष्टाचा कधी विचारच मनात येत नाही." तात्याराव हे ऐकून सद्गदीत झाले व उद्गारले, "डॉक्टर, आपल्यासारख्या थोर कार्यकर्त्यांचा हा विनय व हे शुद्ध अत -करण वैऱ्यालासुद्धा जिंकून घेईल. तुम्ही आज ना उद्या आपल्या हिंदुसमाजास खासच जिंकाल आता या वयात आपणास साहाय्य करण्याचा उत्साह मला राहिला नसला, तरी आपल्या कार्यास यश मिळावे ही परमेश्वराजवळ नेहमी प्रार्थना करीन" पू. डॉक्टर खूपच उन्हसित वृत्तीने बाहेर पडले व मला म्हणाले, "भाऊराव, तपश्चर्येनें प्रसन्न न होणारा देव या विश्वात नाही"



## पांडुरंग केशव शिराळकर

### (जमीनदार व सावकार, कराड)

(१) तात्यासाहेबांचा व माझा परिचय फार जुना एकदा त्यांच्या घरी गेलो असता केसरीकरिता अग्रलेख लिहिण्यात ते गढले होते तथापि मी गेल्यावर थोडा वेळ लिहिण्याचे काम त्यानी थाबविले व काही वेळ आम्ही बोलत बसलो त्या वेळी टेबलावर ॲडिसन व मेकॉले याच्या निबधाची पुस्तके इतर काही पुस्तकाबरोबर पडली होती, ती मी पाहिली. त्या वेळी लेखनासबधी सहज बोलणे निघाले. त्या वेळी ते म्हणाले, "लेखनाचे काम ज्याला करावयाचे आहे, त्याने आपल्या वाचनाचा व्यासग लेखन करता करताच करावा. असे केल्याने ज्ञान वाढते व दृढ होते. पण त्याबरोबरच लेखनकलाहि चागली साध्य होते" टेबलावर पडलेल्या पुस्तकाकडे बोट दाखवून ते पुन्हा म्हणाले, "लेखन करीत असता मीं या पुस्तकातील कित्येक कल्पनाचा, विचाराचा व शब्दाचाहि आधार घेतो. त्याचा उपयोग करून माझे लिखाण सजवितो त्यामुळे माझे लेखन माझ्या मनाप्रमाणे करता येत केसरीत लेख प्रसिद्ध झाल्यावर त्यातील गुणदोष वाचकाना सहजी कळणे शक्य नाही पण मलाच माझा लेख अधिक चागला व्हावा असे वाटते, म्हणून मी उपयुक्त अशा ग्रथाचा आधार घेऊन लेख सुधारण्याचा प्रयत्न करतो. यामुळे माझे लेख निदान माझ्या समजुतीप्रमाणे बरे वठतील असे करण्यात श्रम व वेळ पुष्कळ खर्च करावा लागतो हे खरे; पण माझ्या मनाचे समाधान होतें. लेखन व त्यासाठीं करावयाचे वाचन हे परस्परापासून अलिप्त न ठेवता एकाच वेळीं करीत गेल्यास लेखन चागलें होते व ज्ञान दृढ होते असा दुहेरी लाभ होतो"

( २ ) सन १९१०-११ साली केसरी ऑफिसमध्ये मी गेलो असता केसरीवर ५००० रु ची जामिनकी सरकारने लादल्याचा उल्लेख श्री. तात्यासाहेब यानी केला. सरकारच्या या निर्घृण हुकुमाबद्दल सताप व्यक्त करून जामीन भरण्याकरितां आपण फड उभारला तर माझ्या शक्तीप्रमाणे मी स्वतः मदत करण्यास तयार आहे, असे मी बोललो. फड उभारून लोकाच्यावर ओझे न टाकता केसरी सस्थेतूनच सर्व रक्कम भरण्याचा विचार आहे असे ते बालले. यात त्याचा स्वाभिमान व भिडस्तपणा व्यक्त होत आहे.

( ३ ) १९३० सालची गोष्ट. कायदेभगाचे ते दिवस ! शिवाजी मदिरात बेकायदा मीठ विक्रीचा कार्यक्रम ठेवला होता त्या वेळी प्रथम तात्यासाहेबानी मिठाच्या पुडी विकली व ती मी शभर रुपयास विकत घेतली नतर पेणला सत्याग्रह-कायदेभग करण्याकरिता जाण्याचा विचार ठरला तेथे गेल्यावर समुद्राचे पाणी आणवून श्री रामभाऊ मडलीक यानी अगाऊ सर्व सिद्धता केली होती चुलीवर पातेले ठेवून त्यात समुद्राचे पाणी मीठ बनविण्यासाठी [illegible] यानी ओतले. त्या वेळी त्यानी थोडेसच पण फार आवेशयुक्त असे भाषण केले अशा [illegible] सत्याग्रह करून रात्री आम्ही पुण्यास परत आलो.



# मुरलीधर गणेश उपासनी

## ( कीर्तनसम्राट् निजामपूरकर, नागपूर )

तात्यासाहेब ह्याचे बधु खानदेशमध्ये असल्यामुळे ते पुष्कळ वेळा खानदेशमध्ये येत असत. आमच्या गावीहि ( निजामपूर येथे ) आमच्या सस्थानाला भेट देण्यास ते आले होते. त्यानतर मी पुण्यास १९३५ साली कीर्तने करण्याकरिता गेलो असताना ह्या पूर्वसबध लक्षात ठेवून ते माझ्या कीर्तनास वरचेवर येत असत. मला पुण्यास जे मानपत्र मिळाले, त्यावर तात्यासाहेबाची स्वाक्षरीहि आहे माझ्या कीर्तनामध्ये मी नेहमी शाहिरी-काव्याचा उपयोग करीत असे हे तात्यासाहेबाच्या लक्षात येऊन त्यानी मला तसा उपयोग न करण्याबद्दल प्रेमाने सूचना केली, त्यामुळे कीर्तनाचे गाभीर्य बिघडते असे ते म्हणाले तेव्हापासून तसा उपयोग करण्याचे मी सोडून दिले. अर्थात् ह्यानतर माझे कीर्तन फारच सरस वठू लागलें. आज मला "कीर्तनसम्राट्", "कीर्तनकेसरी" वगैरे अनेक पदव्या मिळाल्या असून माझे कीर्तन ऐकण्यास सहस्रावधि लोक जमतात. हे मी महाराष्ट्र साहित्यसम्राट् तात्यासाहेबाच्या आशीर्वादाचेच फल आहे असे समजतो.



# गणेश नरहर श्रींगोंदेकर

## ( सार्वजनिक कार्यकर्ते, पुणें )

( १ ) १९१८ पासून तात्यासाहेबाचा व माझा परिचय होता. नगरवाचन-मदिराचा व तात्यासाहेबाचा सबध घनिष्ठ होता वाचनमदिरात तात्यासाहेब जितक्या प्रसगी आले त्या बहुतेक प्रसगी तात्यासाहेबाना विनती करून सस्थेत आणण्याचे काम मजकडे सोपविले जाई.

( २ ) श्रीशुक्ल यजुर्वेदीय मा. नदिन मह्‌ा . ा ब्राह्मण सभा, पुण ( याज्ञ-वल्क्याश्रम ) या सस्थेचा मी ।न्न । असताना श्रीज्ञानेश्वर महाराजाच्या उत्सव-प्रसगी तात्यासाहेबानी आमच्या सस्थेत येऊन व्याख्यान द्यावे अशी मी त्याना विनती केली ती त्यानी मान्य केली कार्तिक वद्य १२ शके १८६४ रोजी त्यानी आश्रमात येऊन ज्ञानेश्वरीवर, व्यासपीठावर बसून, दोन तास प्रवचन केल ते प्रवचन साधार, सुश्राव्य व विद्वत्ताप्रचुर असे झाले काणत्याहि विषयावर भाषण अगर प्रवचन करताना ते त्या ।ग । ा गागोपाग पूर्ण तयारी करीत असत, हे वरील प्रसगी दृष्टोत्पत्तीस आले. त्या दिवशी तात्यासाहेब सहकुटुब आश्रमात उपस्थित झाले म्हणून चालकाना फार आनद झाला त्याच्यासारख्या श्रेष्ठ पुढाऱ्यानी आपल्या सस्थेत येऊन आम्ही अगिकारलेल्या कार्याविषयी चार कळकळीचे व प्रशसेचे उद्गार काढले यामुळे तो दिवस आश्रमाच्या इतिहासात ठळकपणे नमूद केला गेला आहे.

( ३ ) पुणे-नगरवाचनमदिराचे तात्यासाहेब १९३७-३८ मध्ये एकच वर्ष अध्यक्ष होते साहित्यसम्राट् व सस्थेचे अध्यक्ष या दुहेरी नात्याने सस्थेत त्याचे तैलचित्र असणे अवश्य होते त्याप्रमाण चालकानी प्रो पिपळखरे याच्याकडून मोठे तैलचित्र तयार करवले त्याचे अनावरण मुबइचे म म काणे याच्या हस्ते १९४१ च्या मेमध्ये झाले त्या प्रसगी तात्यासाहेबानी उपस्थित राहावे म्हणून मी त्याना विनती करण्याकरिता त्याच्याकडे गलो व त्याना तशी आग्रहपूर्वक विनती केली ते म्हणाले, “ माझ्या तैलचित्राच्या अनावरणप्रसगी मी हजर राहणे हे जरा चमत्कारिक दिसते. बरे, तुमच्या इच्छेप्रमाणे मी जर हजर राहिलो तर तुम्ही मला चार शब्द बोलावयास लावणार, स्वस्थ बसू देणार नाहीं. हे काही बरे नाही. ” त्यावर मी म्हटले, “ आपण बोलावे हा तर मुख्य हेतु आहे. तसा हेतु नसता तर आपलें तैलचित्र तेथे आहेच ’ त्यानी तत्काल येण्याचें कबूल केलें. समारभाच्या वेळी आपल्या भाषणात ते म्हणाले, “ या माझ्या तैलचित्रा-समोरील कपाटांत माझे समग्र लिखाण ठेवले आहे फ्रेंच कादबरींतील एक दृष्टांत द्यावयाचा तर मी असे सागतो की, माझ्या मृत्यूनतर त्या तैलचित्रातून मी मध्य-

रात्री बाहेर येईन व कोणत्याहि कपाटांतून मला लागेल तें पुस्तक काढून वाचीन व पुन. जागच्या जागी ठेवून देईन, असे चिटणिसाना आश्वासन देतो. कारण मी शिस्तीचा भोक्ता आहे!"

(४) एका भाषणात तात्यासाहेबानी एकदा असे म्हटले होते कीं, "जर देव मला प्रसन्न झाला तर मी त्याला दोन गोष्टी मागेन. एक ही कीं, माझें लिहिण्याचे काम चालू असताना त्यात व्यत्यय येऊ नये म्हणून मी एक अशी कुपी त्याला मागेन कीं, त्यातील दोन डोस खुर्चीवर बसल्या बसल्या घेतले कीं, पोटभर जेवण झाल्याचे समाधान झाले पाहिजे व दुसरी मागणी अशी की, 'देवा, मला जे तू आयुष्य दिले असशील त्यातील पाच वर्षे कमी कर, पण मला अवचित व सुखाने मरण येऊ दे!" वरील दोन मागण्यापैकी पहिली मागणी सफल होण्याचा संभवच नव्हता पण त्याची दुसरी मागणी मात्र मान्य झाली हे आतां सर्वांना माहीत झालेलेच आहे



## ज. गं. करंदीकर

(बी. ए., बी. टी., मुख्याध्यापक, सुलाखे हायस्कूल, बार्शी)

(१) श्री विठ्ठलभाई पटेल याचे चरित्र लिहिण्याचें माझ्या मनांत आलें, तेव्हा पटेलाच्या सबधी काही माहिती मिळवावी म्हणून प्रथम तात्यासाहेबाच्या घरीं त्याच्या भेटीस मी गेलो व माझा मनोदय मी त्यांना सागितला. लगेच त्यानी मला पटेलाच्या चरित्रास लागणारा अवश्य ती साहित्यसामुग्री कोठे मिळेल ते नेमके सागितले एक चिठ्ठी लिहून दिली व मला म्हणाले की, "ही चिठ्ठी घ्या — त्याना दाखवा म्हणजे तुमचे सव काम होईल" त्याप्रमाणे पुढ माझे काम झालें. ही आठवण लि हि ण्या चा हेतु असा की, नवीन होतकरू तरुणाना प्रोत्साहन देण्यात व मार्गदर्शन करण्यात त्याना नेहमीच आनद वाटे आपल्या अनुभवाचा व माहितीचा फायदा त्यानी सहस्रावधि लोकाना करून दिला.

(२) पत्राना उत्तरे देण्याच्या बाबतीत ते अतिशय दक्ष असत पत्रांचे उत्तर ताबडतोब गेले पाहिजे असा त्याचा कटाक्ष असे. "सह्याद्री"चे सचालक या नात्याने त्याच्याशी झालेल्या पत्रव्यवहाराच्या बाबतीत मला हा अनुभव आला. अतिशय कार्य-व्यापृत असूनहि नेहमीचा पत्रव्यवहार दक्षतेने साभाळणें ही गोष्ट तितकीशी सोपी नाही साध्या गोष्टीकडेहि बारकाईने लक्ष्य पुरविणे कठीण असतें. परंतु ते तात्यासाहेबाना साध्य झाले होते



## वि. वि. भागवत

( एम्. ए., एलूएल्. बी., बी. टी., उपप्राचार्य, प्रा. अ. विद्यालय, चाळिसगांव )

( १ ) १९२५ सालची गोष्ट. मी फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिकत होतो. खानदेश विद्यार्थी संघाच्या वादविवाद-मंडळाचा चिटणीस म्हणून तात्यासाहेब यांचे व्याख्यान ठरविण्यासाठी मी व माझे मित्र येवल्याचे श्री. दामुअण्णा थत्ते वकील त्यांच्याकडे गेलो. त्यांनी मोठ्या आनंदाने व्याख्यान देण्यास अनुमति दिली. पुढे प्रो. के. रा. कानिटकर यांनी त्यांच्या व्याख्यानाची परवानगी रहित करून ते व्याख्यान रद्द करावे असे आम्हाला सुचविले! आम्ही अगदी चकित झालों व मनातून रागावलो. 'वक्त्याला एकदा आमंत्रण करून पुनः त्याला येऊ नका असे सांगणे हे अगदी गैर दिसेल' असे आम्ही त्यांना सांगितल्यावर ते म्हणाले, 'ती जबाबदारी मी घेतो. मी त्यांना स्वतःच पत्राने कळवीन.' पण प्रो. कानिटकरांचे पत्र गेले, तरी स्वतः तात्यासाहेब यांच्याकडे जाऊन त्यांची क्षमायाचना करणे मला जरूर होते. कानिटकर यांचे पत्र त्यांच्याकडे पोंचले होतेच मी व थत्ते त्यांच्याकडे जाऊन अधोवदन करून उभे राहिलो व त्यांना वस्तुस्थिति सांगितली. त्या वेळी त्यांनी मोकळ्या मनाने "सार्वजनिक कार्यात मानापमानाची खंत ठेवून चालत नाही. तुम्ही मुळीच वाईट वाटून घेऊ नका. पुन्हा केव्हा तरी तुमच्याकडे व्याख्यानास येता येईल," असे सांगून आमची समजूत केली. प्रो. कानिटकरांविषयी काहीच अनुदार उद्गार न काढता त्यांनी त्यांच्या बदललेल्या 'दुसऱ्या विचारा' ( Second thought ) बद्दल आश्चर्य मात्र व्यक्त केले!

( २ ) एकादे काम उत्तेजनार्ह आहे अशी खात्री पटल्यावर तात्यासाहेब ताबडतोब त्या कार्याला शक्य ते साहाय्य देऊन मोकळे होत 'भारतचित्रदर्शन' या लोकरंजनाबरोबर लोकशिक्षण देणाऱ्या ध्येयनिष्ठ चित्रपट संस्थेची स्थापना करताना श्री. ना. ह. आपटे यांना तोच अनुभव आला आहे तात्यासाहेबांना अशा संस्थेची कल्पना पटल्याबरोबर त्यांनी आपला ठेवीचा चेक त्याच बैठकीत दिला व कार्याची मुहूर्तमेढ उभारली! लगेच योग्य शब्दांत भारतचित्रदर्शन या संस्थेला अभिप्रायहि लिहून दिला पण अवास्तव जबाबदारी टाळण्याची दक्षताहि ते घेत. खानदेशमधील एका व्यक्तीने भारत-चित्रदर्शन संस्थेसंबंधी त्यांच्याकडे पत्रद्वारे चौकशी केली. पण त्या व्यक्तीला तात्यासाहेबांचे काहीच उत्तर आले नाही, म्हणून त्या चित्रपट संस्थेचा खानदेशातील प्रतिनिधि म्हणून मी तात्यासाहेबांना एक पत्र लिहिले. त्यांचे उत्तर आले ते असे :-

पुणे, १५।२।४७.

"मी स्वतः भारतचित्रदर्शनकडे एक ठेव ठेवली आहे. त्याशिवाय मीं त्या कार्यार्थ एक प्रशस्तिपत्र दिले असून तें छापून वाटले जात असते याशिवाय या कार्यास ठेवी घ्याव्या असे मी व्यक्तिश. कोणास सागू इच्छित नाही. ज्याने त्याने स्वतःची खात्री करून घ्यावी हे बरे." – न चि केळकर.

तात्यासाहेबाच्या हस्ताक्षरातील बाळबोध पत्र मला या निमित्ताने मिळाले. साहित्यसम्राटाचें हे पत्र मी मोठ्या अभिमानपूर्वक जपून ठेविले आहे.

( ३ ) १९४१ मधील गोष्ट ·ग·ंदे·ान·ा सचालकत्वाखाली चालणाऱ्या कार्यासबधी तक्रार करण्याचा प्रसग मजवर आला त्यातील एका कार्यकर्त्याच्या यांत्रिक वागण्याने अपमान झाल्यासारखे मला वाटले. त्यासबधी मी तात्यासाहेबांची 'पुष्करिणी'त गाठ घेतली व माझी तक्रार माडली माझी व्यथा तात्यासाहेबानी नेमकी ओळखली व ते मनापासून तळमळून म्हणाले, "भागवत, मी या लोकाना शिष्टाचार का आता शिकवीत बसू ? झाल्या गोष्टीबद्दल मी दिलगीर आहे. तुम्ही काही मनात आणू नका" तात्यासाहेबानी असे म्हणताच माझ्या डोळ्याला पाणी आले, माझा आवेश व सताप पार उतरला व मी चटकन् म्हणालो, "छे, छे, तात्यासाहेब, तुम्हीं असे म्हणण्याची गरज नाही." त्यानतर दि. २२।९।४१ ला त्याच्या हातचे मोडी पत्र मला आले. त्यात "गैरसमज करून घेऊ नका आमच्याहि काहीं अडचणी असतात, त्याच्याकडे सहानुभूतीने पाहा" असे म्हटले आहे कोणालाहि नाखूष करणे त्याच्या जिवावर येई !



## गोविंद माधव किनखेडे

( नागपूर )

राजाराम वाचनालयाच्या महोत्सवाच्या निमित्ताने तात्यासाहेबाचे आमच्या नागपुरात आगमन झाले होते त्या सधीचा फायदा घेऊन नागपुरातील अनेक सस्थानी त्याच्या आगमनाचा फायदा घेतला आमच्या प्रिन्सिपालच्या विनतीस मान देऊन तात्यासाहेबानी आमच्या सुप्रसिद्ध शाळेस भेट दिली तासभर व्याख्यान देऊन त्यानीं विद्यार्थ्यास उपयुक्त अशा अनेक गोष्टींचा खुलासा व बोध केला. हारतुरे होऊन समारभ सपल्यानतर ते जेव्हा जावयास निघाले तेव्हां धावतच मी त्याच्या मोटारीजवळ गेलो व माझी स्वाक्षरीवही त्यांच्यासमोर धरली. हातात वही घेऊन त्यानी मागील पाने चाळावयास सुरवात केली. चाळता चाळता ते डॉ. बी. शि मुजे याच्या स्वाक्षरीच्या पानाकडे टक लावून

पाहूं लागले. मजजवळचें पेन घेऊन थोड्याच वेळांत त्यानीं डॉक्टरसाहेबांच्या सहीखालींच मोडीमध्ये सही केली.

"आपला काही सदेश ?" मीं विचारलें "आमच वाङ्मय काढा. एखादं सुंदर वाक्य असल्यास शोधा, आणि लिहा याखालीच !" "परतु आपल वाङ्मयच इतकं विस्तृत आहे की, त्यातील कोणते वाक्य घ्यावे, हेच कळत नाही." उत्तरादाखल तात्यासाहेबानी माझ्याकडे पाहून केलेले स्मित अजून माझ्या डोळ्यांसमोर आहे. परत पान चाळता चाळता प्रथम पृष्ठावरील माझे नाव वाचून ते म्हणाले, "माधवरावाचा मुलगा का तू ?" 'हो!' मी उत्तर दिले

तात्यासाहेबांनी वहीवर तर कांही मला सदेश दिला नाहीच; परतु माझ्या हृत्पटावर कोरण्यासाठी एक अनमोल असा सदेश दिला ते म्हणाले, "आपल्या वडिलांचें चरित्र लिही !!"



## विठ्ठलराव जोशी

### ( सांगलीचे जुन्यांपैकीं एक सार्वजनिक कार्यकर्ते )

( १ ) सन १९०६ सालीं, तात्यासाहेब केळकर व यशवतराव कुलकर्णी हें श्रीमत कै. बाबामहाराज यांच्या कुन्नूर येथील जमीनीसबधाने काही माहिती मिळवण्याकरिता चिकोडी गांवीं आले, त्या वेळी माझा त्याचा प्रथम परिचय झाला त्या वेळीं 'स्वदेशी बहिष्कार' व 'बगालची फाळणी' या विषयावर त्याची दोन व्याख्यानें, माझ्या सहकारी मडळींनी करविली. त्याच्या सत्कारार्थ, नागरिकातर्फे चिकोडीस निघणाऱ्या सुप्रसिद्ध कापडापैकी धोतरजोडा, उपर्णे जोडी व इतर कांहीं अशाच वस्तु, भेट म्हणून – त्यास तेथील पुढारी कै सखारामपत कुलकर्णी याच्या हस्ते – अर्पण करण्यात आल्या दुसरे दिवशींच्या व्याख्यानापूर्वी वरील सर्व कापड वगैरे वस्तूची अदाजी किम्मत त्यानी मला विचारून घेतली व समारभाच्या अखेरीस वरील रकमेत पदरची थोडी भर घालून, तेथील एका नवोदित सस्थेस आपली देणगी म्हणून त्यानी परत केली! अनृणी राहण्याची त्याची प्रवृत्ति पहिल्यापासून दिसून येत होती.

( २ ) सन १९२९ च्या डिसेबरमध्ये, लाहोरास 'पजाब प्रातिक हिंदु-सभेची परिषद व कॉंग्रेसचे अधिवेशनहि होते; तात्यासाहेबाची प्रातिक हिंदु-सभेच्या अध्यक्षस्थानी निवड झाली असल्यामुळे स्वागताध्यक्ष राजा नरेंद्रनाथ यांच्याकडे त्यांचे पाहुणे म्हणून उतरण्याची व्यवस्था करण्यात आली होती; तात्यासाहेबांच्या इच्छेवरून त्यांच्याबरोबर गजाननराव केतकर,

अतुकाका फडणीस, न. वि. गाडगीळ, बापुराव जोग व मी असे पांचजण तेथेंच होतो. त्या वेळी तात्यासाहेबानीं प्रकृतिस्वास्थ्याकरिता, सुमारे तीन आठवडे, नुसत्या भाज्यावर राहण्याचे ठरविले होते. राजा नरेंद्रनाथांनीं आम्हा महाराष्ट्रीय पाहुण्याकरिता, भोजनात – पुलावा वगैरे अनेक तऱ्हेचीं पजाबी पक्वान्ने, त्या दहा दिवसाच्या मुक्कामात, करविली होतीं; परतु तात्यासाहेबानीं, आपल्या ठरलेल्या भाज्याखेरीज त्या मुक्कामात दुसरे काहीं घेतलें नाहीं, यावरून त्याचा निग्रही स्वभाव, सयम व अनासक्तीची वृत्ति दिसून येईल.

(३) याच मुक्कामात, नॅशनल कॉंग्रेसच्या सुप्रसिद्ध अधिवेशनासहि, आम्ही सर्वजण जात असू. विषय नियामक कमीटीच्या पहिल्या दिवशीं, पडित जवाहरलाल नेहरू यानी, कॉंग्रेसचे गतसालचे चिटणीस या नात्यानें सर्व अहवाल वाचून दाखविला, तो वाचीत असताना त्यात पूज्य पडित मालवीयजी याजवर, दहा हजार रुपये तसलमातीचा हिशेब देण्यास दिरगाई केल्याबद्दल, बरेचसे अनुदारपणाचे उद्गार काढून त्यानीं पर्यायानें मालवीयजीचा अपमान केला त्याचे भाषण झाल्यावर, पडित मालवीयजींनीं, आपल्या खुलाशाचे उत्तर दिले परतु सभेत झालेल्या अपमानाबद्दल त्यास वाईट वाटून, त्याचा चेहरा उतरल्याचे दिसलें. त्यानतर तात्यासाहेबानी मालवीयजीच्या समर्थनपर माहितीपूर्ण, उत्कृष्ट असे स्पष्टोक्तीचे भाषण केल्यामुळे त्याची बाजू उत्तम रीतीने सावरली गेली. त्यामुळे श्रोतेमडळीना तात्यासाहेबाच्या समयज्ञतेबद्दल व इग्रजी भाषेतून समर्पक रीतीने, मालवीयजींची पडती बाजू चागल्या रीतीनें सावरून धरल्याबद्दल धन्यता वाटली.

(४) याच लाहोरच्या मुक्कामात, दिवगत पुढारी लाला लजपतराय याच्या घरी मुद्दाम जाऊन, त्याच्या कुटुबास व मुलांस भेटून, त्यांचें सांत्वन करून व त्याचा समाचार घेऊन येण्यास, तात्यासाहेब विसरले नाहींत; कारण त्याचा व लालाजींचा जिव्हाळ्याचा ऋणानुबध होता. यावरून सार्वजनिक कामे साभाळूनहि, इतर लौकिकी व्यवहार दक्षतेने पाळण्यात तात्यासाहेब किती जागृत असत, हे दिसून येईल.

(५) सन १९३६ साली मी जपानच्या दीर्घ प्रवासातून परत आल्यावर, दे. भ. तात्यासाहेबाच्या अध्यक्षतेखालीं, तिकडील बहुविध माहितीबद्दलचें एक व्याख्यान, टिळक स्मारक मदिरात दिले. ती माहिती वगैरे आपणास फार पसत पडल्याचें, त्याच्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी उद्गार काढून, ते पुढे म्हणाले की, "अव्वल दर्जाच्या पुढाऱ्याचींच चरित्रे नेहमीं लिहिलीं जातात; परतु दुय्यम, तिय्यम दर्जाच्या कार्यकर्त्यांचीहि माहिती, प्रसिद्ध करण्याने नवीन पिढीस त्याचा उपयोग फार होतो; कारण त्यांस घेण्याजोगे त्यांत

बरेंच असतें; म्हणून तशा प्रकारचा प्रयत्न अवश्य झाला पाहिजे." बुद्धीनें किंवा कर्तृत्वानें लहान असलेल्या माणसाचाहि गौरव करून, त्यास उत्तेजन देण्याचा गुण तात्यासाहेबांत उत्कटत्वाने दिसून येत असे

(६) जपानांतील कागदाचे कारखाने व कागद फॅक्टऱ्यांची मशिनरी तयार करण्याचे कारखाने पाहून, त्या कारखानदाराकडून एक तपशिलवार योजना मीं येतांना आणलेली होती; व तसला एखादा कारखाना महाराष्ट्रात जुळल्यास काढावा असा हेतु असल्याने, वडीलकीच्या नात्याने व महाराष्ट्रांतील अनुभविक पुढारी या नात्याने, त्या बाबतीत तात्यासाहेबाचा सल्ला घ्यावा म्हणून त्यांजकडे जाऊन त्यास ती योजना दाखविली व त्या कार्यास दहा लाख रुपये लागणार असल्याने शेअरच्या रूपाने भाडवल जमवणे शक्य होईल काय असे त्यास विचारले. त्याच वेळी मी दुसऱ्या एका लहानशा धंद्याची मशिनरीहि आणली होती त्यानंतर तात्यासाहेबानी दोन्ही योजनाचा साधकबाधक विचार करून, मला असा सल्ला दिला की, पहिल्या परावलबी पेपर मिलच्या शेअर्स गोळा करण्याच्या फदांत न पडतां, स्वावलबनाचा दुसरा लहान धदाच चिकाटीने करावा त्याच्या सल्ल्याप्रमाणेंच वागण्याचें मी ठरविले व परिणामी, त्याचे मार्गदर्शनच आमच्या हिताचे ठरले. यावरून समोरच्या माणसाची कुवत, देश–काल–परिस्थिति या सर्व गोष्टी ध्यानात घेऊनच तात्यासाहेब कोणासहि दूरदर्शिपणाचा हितप्रद सल्ला देत असत असें दिसून येईल.

(७) गेल्या वर्षी मुबईस ब्राह्मणसभेत, डॉ. धायगुडे, डीन, गोवर्धन मेडिकल कॉलेज मुबई व इतर तीन गृहस्थ, याच्या सत्कार-समारभास मी हजर होतों; त्या वेळी कै. तात्यासाहेब केळकर अध्यक्ष होते डॉ धायगुडे यानी सत्कारानंतरच्या आपल्या भाषणात आपल्या विद्यार्थिदशेतील हकीकत सागताना, असहकारितेच्या चळवळीच्या वेळी आपणहि कॉलेज सोडण्याचें पक्के ठरविले होते इतक्यांत एके दिवशी तात्यासाहेब केळकराच्या, याच विषयावर झालेल्या व्याख्यानात स्वतः नीट विचार केल्याशिवाय विद्यार्थ्यांनी कॉलेज सोडून आपले नुकसान करून घेऊ नये, अशाबद्दलचे सयुक्तिक व्याख्यान ऐकून आपण कॉलेज सोडण्याचा बेत रहित केला व त्यापुढे आपला हिंदुस्थानातील व विलायतेतील अभ्यासक्रम पूर्ण झाला व त्यामुळेच आज एका स्वतत्र मोठ्या कॉलेजचा डीन होण्याची संधि आपणास मिळाली आहे; व याचें सर्वस्वी श्रेय श्रीयुत तात्यासाहेब यासच आहे, असे कृतज्ञतेचे उद्गार, डॉक्टरानी काढले त्या वेळी तात्यासाहेबासहि गहिवर आला; व आपल्या अध्यक्षीय भाषणात ते म्हणाले की, "असहकारितेच्या वेळच्या, माझ्या मताबद्दल कित्येकानी जरी माझा उपहास केला, तथापि एका विद्यार्थ्यास तरी, माझ्या मार्गदर्शनाचा उपयोग झाल्याचे आताच

ऐकून मनाला समाधान वाटलें; असहकार चळवळींतील कै. तात्यासाहेबांचे धोरण व विचार कसे दूरदर्शित्वाचे होते, हे आतां अनेक लोकांस पटूं लागलें आहे.



## गो. रा. चोळकर

### ( बी. ए., बी. टी., हेडमास्तर, इचलकरंजी )

( १ ) प्रा. द. के केळकर हे तात्यासाहेबाचे चुलत बधु त्याचे वडील त्याच्या लहानपणीच दिवगत झाले तात्यासाहेबानीच त्याचे हायस्कूलचे व कॉलेजचे शिक्षण केले. प्रा. केळकर व मी बी. ए च्या वर्गात सहाध्यायी होतो. तेव्हा परिचय होऊन मैत्रीत वाढ झाली त्याच्या पत्नी कै वामनराव जोशी याच्या कन्या होत. वामनराव व मी महिला विद्यापीठात अध्यापक होतो. हा विवाह जमविण्यांत मी मध्यस्थ होतो. तात्यासाहेबाचा थोरपणा त्या वेळीं मला पदोपदी प्रतीत होई. वधूपसतीनतर विवाह लवकर व्हावा म्हणून वामनराव उत्सुक होते. तात्यासाहेब मुबईस व्याख्यानाकरिता गेले होते. त्याचा मुक्काम सरदारगृहांत होता. आम्ही दोघानीं त्याना तेथे गाठले पधरा मिनिटात सर्व ठरवून तात्यासाहेबानी आमचा मार्ग मोकळा केला ! " तात्यासाहेब, देण्याघेण्याचे काय ? " असें मी विचारले मात्र; त्यानी लगेच उत्तर दिले, " आम्हाला काही घ्यावयाचे नाही. आम्ही तुम्हास काही द्यावयाचे आहे का ? तेवढे मात्र सागा " हे ऐकून आम्ही हसू लागलो !

विवाह झाल्यावर वरपक्षाकडील मडळीना भोजन द्यावयाचे. त्याकरिता तात्यासाहेबाना निमत्रण द्यावयास गेलो. निमत्रण स्वीकारून तात्यासाहेबानी विचारले, " केव्हा होईल ? " आम्ही उत्तर दिले, " साडे अकराच्या सुमारास पण नक्की वेळ मात्र सागता येणार नाही थोडे पुढेहि जाईल. " त्यांनी उत्तर दिले, " काहीं हरकत नाहीं. पुन्हा बोलावयास मात्र येऊ नका आम्ही सर्वजण साडे आकराला येतो. थोडा कमजास्त वेळ लागला तरी हरकत नाही. घाई करण्याचे कारण नाहीं, मगळवार असल्यामुळे ( केसरीस सुट्टी ) कामाचा लकडा नाही. " असेच सर्व बाबतींत असे विवाह होतील तर मला वाटते ' विवाह करून पाहावा ' ही म्हण निरर्थक ठरेल.

( २ ) तात्यासाहेबाना कोकणची मोकळेपणाची राहणी व हवा फार आवडे. एकदा त्यांची व माझी पाचगणी येथें प्रा. केळकर याच्या घरीं गाठ पडली. मीं सहज विचारले, " आपणास कोठले हवापाणी जास्त आवडते ? आपण पुष्कळ ठिकाणे पाहिली आहेत." तात्यासाहेबांनीं ताबडतोब उत्तर दिलें, " मला तुमचें कोंकणचे हवापाणी, सृष्टिसौंदर्य, मोकळी राहणी सर्वांत पसत पडते. कोकणांत लोक उघडे

हिंडतात ते तर मला फार आवडतें." गायआळीतील त्यांचे जे घर होतें, त्या ठिकाणीं अंगणात त्यानी नारळी-पोफळींचीं झाडें लावून छोटेसे कोकणचें दृश्य निर्माण केले होते. त्याचा उल्लेख त्यानीं आपल्या 'गुजगोष्टी'त केलेला आहेच.



## सिताराम विश्वनाथ टिळक

### ( बी. एजी., माजी अध्यक्ष, कुलाबा जिल्हा लोकल बोर्ड, नागोठणें )

( १ ) सन १९२६ सालच्या रायगडावरील मोठ्या उत्सवाच्या वेळी श्री. तात्यासाहेब व मुरुडकरबुवा वगैरे मडळी कर्जत मार्गानें महाडास जाण्याकरिता झाली व रात्रीच्या प्रवासात सुकेळी खिंडीच्या पायथ्याशीच गाडीचे चाक मोडल्यामुळे आमचा मुक्काम झाला. मुरुडकरबुवा व तात्यासाहेब असल्यामुळे किती प्रकारच्या विषयावर चर्चा झाली असेल, त्यामध्ये विनोद व विद्वत्ता ही किती उच्च दर्जाची असतील, याचे वर्णन कोठवर करावे ! रात्र सपली; परन्तु विषय व त्यांतील नावीन्य कमी झाले नाही चर्चेच्या ओघात नागोठणे मुक्कामी त्याच रात्रीं शिवरात्रीनिमित्त होत असलेल्या नाटकाची मला आठवण झाली व आमचा खालील-प्रमाणें सवाद झाला.

मी :– तात्यासाहेब, आज रात्री आमच्या गांवी उत्सवाचे नाटक आहे

ते :– अहो, हे तुम्ही आगोदरच का नाही बोललात, आपण त्या नाटकाला जरूर गेलो असतो

मी :– तात्यासाहेब, आपण नागोठण्याहून ५ मैलाच्या अतरावर आहोत इतके लांब आपण कसे गेलो असता व गेला असता तर आपणास त्रासहि झाला असता.

ते –अहो त्यात त्रास कसला ? अशी सधि नेहमी येत नाही. माझ्या मते ग्रामीण जीवनात उत्सव व नाट्य सस्था यास एक निश्चित स्थान आहे गावचा उत्सव हे गावीं राहणाऱ्या व शहरातून नोकरीनिमित्त जाणाऱ्या लोकाचे समेलन होय पुढे ते असेहि म्हणाले की, उत्तम नट हा तिकिट लावून नाटक करणाऱ्या मडळीतच असतो असे का तुम्हाला वाटते ! खेडेंगांवच्या नाट-कांतूनहि उत्तम अभिनय उत्तम नट असू शकतात, व ही नाटके पाहण्यात मला तर एक प्रकारचा विशेष आनदच होतो. नतर त्यानी दशावतारी नाटकापासून तो आधुनिक सगीत नाटकापर्यंतच्या अनेक स्थित्यतराचे मोठें रसभरित वर्णन केले.

( २ ) रायगड किल्ल्यावरील मुक्कामात माझ्याबरोबर जिल्हाबोर्डाचा सर्व परिवार व बरीच मित्रमडळी असल्यामुळे आमचा मुक्काम स्वतत्र होता व तात्या-साहेबाचा मुक्काम उत्सवमडळाकडे होता. लोकमान्याच्या पश्चात् हा पहिलाच

मोठा उत्सव असल्यामुळे त्याना त्याबद्दलची मोठी जबाबदारी वाटे. व बारीक-सारीक गोष्टीबद्दलहि ते अत्यत दक्षता घेत व त्याप्रमाणे त्यानीं मला बोलूनहि दाखविले होतें गडावरील मुक्कामांत रोज सकाळी अभावितपणे आमच्या मुक्कामावर ते चहा पिण्यास यत व प्रसादाच्या दिवशी सायकाळी तीन वाजेपर्यंतहि ते जेवले नव्हते असे मला दिसून आल्यामुळे, आमच्या मुक्कामावर येऊन दोन घांस जेऊन जाण्याची विनती मी त्यास केली. ती त्यानी निश्चयपूर्वक नाकारली व म्हणाले, "अहो, तुमच्या मुक्कामावर यायला मला तुमचे बोलावणे नको. परतु आजचा दिवसच असा आहे की, आज येथील मडळीबरोबरच राहून त्याच्याच बरोबर जेवणे हे माझे कर्तव्यच आहे आणि त्याचप्रमाणे मी तेथेच जेवणार, तुमच्याकडे येणार नाही." त्याच्या चर्येवरील जबाबदारीची व कर्तव्याची जाणीव पाहून मी त्यास आग्रह केला नाही

(३) बोर्डाच्या धर्मशाळेच्या पायाचा दगड बसविणारे अध्यक्ष राजे भोसले आम्हास तात्यासाहेबामुळेच लाभले राजे भोसले गडावर आले त्या वेळी श्री. तात्यासाहेब त्याना सामोरे गेले व नमस्कारपूर्वक स्वागत करून म्हणाले, "यावे राजेसाहेब! आपण स्वगृहीच आला आहांत!" या दोन वाक्यातील स्वागतांतील मार्मिकपणा उलगडून सागण्याची जरूरीच नाही. धर्मशाळेच्या समारभास प्रथमपासून शेवटपर्यंत त्याचे स्वतःचेच कार्य समजून त्यानी पुढाकार घेतला; इतकेच नव्हे तर शेवटचे आभाराचे भाषणहि त्यानी स्वतःच केले. अशा प्रकाराचे अनेक प्रोत्साहनाचे प्रसग आले, त्याबद्दल कुलाबा जिल्हा लोकलबोर्ड व मी स्वतः त्यांचे कसे उतराई होणार!

(४) १९२६ सालच्या कुलाबा जिल्हा लोकलबोर्डाच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीच्या वेळी कॉंग्रेस पक्षात फितुरी होऊन मी पराभूत झालो मागाहून मला असे समजून आले की, रायगडावरील कार्य मी आरभिले असून ते माझ्याच हातून पुरे व्हावे अशी तात्यासाहेबाची इच्छा होती व त्याप्रमाणे त्यानीं परभारे बोर्डाच्या सभासदांना पत्रेहि लिहिली होती परतु त्याचा उपयोग न होता मी निवडणुकीत पडलो या पराभवानतर मी त्याना सविस्तर हकीकतीचे पत्र लिहिलें व सार्वजनिक कार्यातून परावृत्त होण्याची माझी मनीषा त्याना कळविली लौकरच ते मुबईस आले असताना त्यानीं मला सरदारगृहात बोलावून घेतले व अनेक तऱ्हेचे दृष्टान्त व दाखले देऊन मी निवृत्त न होता, असेच सार्वजनिक कार्य करीत राहावे असें आग्रहाने सागितले. यानतर मी कोणत्याहि निवडणुकीस उभा राहिलो नाहीं हे खरे; पण जिल्ह्यांतील विविध प्रकारच्या सार्वजनिक कामाशी मी सबध मात्र ठेवीत आलो आहे. हा त्याच्याच उपदेशाचा परिणाम असे म्हणणे योग्य होय.

❋

## गंगाधर विष्णु पुराणिक

**( वैद्य व गव्हर्निंग डिरेक्टर, श्रीधूतपापेश्वर, पनवेल )**

सुमारे पधरा वर्षांपूर्वीची गोष्ट तात्यासाहेब पनवेल येथे आले होते. ते आमच्याकडेच उतरले होते रात्री टेनिस क्लबच्या इमारतीत एक बैठक चर्चेसाठी घेण्यांत आली होती सार्वजनिक कार्यात लक्ष घालणारी पचवीस-तीस मडळी जमली होती वै काळेशास्त्री यानी " मिशनरी लोक आपल्या धर्माचा मोठ्या जोराने प्रचार करतात, वाटेल त्या ठिकाणा त्यासाठी जातात, म्हणून ख्रिश्चन धर्माचा मोठा प्रसार झाला, तसे हिंदुमहासभा का करीत नाही ? " असा मुद्दा उपस्थित केला त्यावर तात्यासाहेब यानीं उत्तर दिले, " हिंदुमहासभा काही करीत नाही म्हणजे कोण करीत नाही ? मी करीत नाही आणि तुम्ही करीत नाही असेच ना ? आता मी तुम्हास असे सागतो की, तुम्ही मिशनरी लोकासारखे हिंदुधर्माबद्दल लोकास आदर वाटेल व कार्यकर्त्यांबद्दल प्रेम व आपलेपणा वाटेल असे काही कार्य येथे सुरू करा त्याकरिता लागणाऱ्या मदतीचा ठराविक भरपूर हिस्सा हिंदुमहासभेकडून मी देववितो हे आश्वासन देताना इतर जिल्ह्यात असे कार्य सुरू होईल तेथेहि अशीच मदत देण्याची जबाबदारी घेतल्यासारखे होणार आहे. तरी पण हरकत नाही. मी ती स्वीकारतो तुमच्यापुरती येथील कार्याची जबाबदारी हिंदु म्हणून आणि त्या कार्याचे महत्त्व तुम्ही चागल्या तऱ्हेने ओळखीत आहा व हें कार्य येथील लोकानीच अगावर घेणे इष्ट म्हणून तुम्ही स्वीकारावे. " पुढे ते म्हणाले, " कोणत्याहि सस्थेच्या कार्याची जबाबदारी सस्थेच्या अधिकारी मडळावर असते आपले काम फक्त सल्ला देण्याचे व टीका करण्याचे अशी कल्पना अनेकाची असते हे मी जाणतो, तथापि सस्थेचे ध्येय मान्य करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने आपल्या शक्तीप्रमाणे व बुद्धीप्रमाणे कार्य करावयास लागणे हे प्रत्येकाचे सामाजिक कर्तव्य आहे, ही जाणीव सर्वांनी ठेविली पाहिजे "



## गणपत महादेव नलावडे

**( माजी नगराध्यक्ष, पुणे )**

( १ ) १९२८ या वर्षी मुसलमानानी मुबईत दगल उडवून दिली. पायी चालण्याच्या ओट्यावर झोपणाऱ्या गोरगरिबाच्या पोटात भरदिवसा नि भरपथावर सुऱ्या खुपसल्या गेल्या नि त्यांचे मुडदे पाडले या सर्व प्रकारांवरून " मुबईच महाराष्ट्राचें मगल करील " या शीर्षकाखाली 'सग्राम' पत्रांत लिहिलेल्या अग्रलेखामुळे हिंदु-मुसलमानांत वैमनस्य माजविण्याचा प्रयत्न केल्याच्या अपराधाखाली माझ्यावर

खटला भरला गेला. अशा प्रसंगीं दे. भ. तात्याराव केळकर हेच आमचे आधार. मी त्याच्याकडे गेलो; त्याना हकीकत सांगितली; त्याबरोबर ते म्हणाले की, "या सरकारी खटल्यांत जावई फिर्यादी नि सासरा न्यायाधीश अशी अवस्था असते आणि तुमच्या-वरील हा १५३ अ कलमाखालचा खटला तर पूर्वमान्यतेने भरावा लागतो. तेंव्हा हा खटला होणें म्हणजे शिक्षा ठेवलेलीच आहे असे मानूनच चालावे, म्हणजे आपण जे निर्दोषी ठरण्याचे आटोकाट प्रयत्न करतो ते व्यर्थ गेल्याचा विषाद वाटणार नाही. या खटल्यात तुम्हाला कमीत कमी १॥ ते २ वर्षे तरी तुरुगात जावे लागेल नि तशी आपली मनाची सिद्धता असू द्या. तुम्हाला दडच झाला तर तो कितीहि असो, वैयक्तिक तुम्हांला सोसावा लागणार नाही त्याची भरपाई कोणीहि करील; तथापि शिक्षा होईल ती मात्र तुम्हालाच भोगावी लागेल तुमच्यासाठी दुसरा कोणी शिक्षा भोगतो म्हणाला तरी तसे होऊ शकत नाही!"

यानतर खटल्याचे काम प्रत्यक्ष सुरू झाले त्याकडे त्याचे बारकाईने लक्ष होते खटल्याच्या निर्णयाच्या दिवशीं पुन. मी सकाळी त्याच्याकडे गेलो. त्याचे दर्शन घेतले व आज निकाल आहे असे सागितले. लगेच तात्या म्हणाले, "आहेना तयारी? मी निकाल ऐकावयाला नि तुरुगात जाताना निरोप द्यावयाला येणार आहें कोर्टात!" त्या दिवशी कोर्टात मुसलमानाची त्याचप्रमाणे हिंदूचीहि बरीच गर्दी झाली होती वकील मडळी बसतात त्याच्या मागच्याच ओळीतील खुर्चीवर तात्या येऊन बसले होते मी जाण्यापूर्वीच ते कोर्टात आले होते. त्याच्याच खुर्ची जवळ उभा राहून मी काही तरी त्याच्याशी बोललो. भोपटकरहि त्याच्यापुढेच बसले होते मॅजिस्ट्रेटसाहेब चेबरमध्ये आले त्याच्या शिपायाने कायद्याची पुस्तके, खटल्याचे कागद व घरूनच लिहून आणलेली निकालाची प्रत अशा कागदपत्राचे गोठोडे आणले व ते टेबलावर ठेवले पण त्याची अचानक गाठ सुटून ते सर्व धडधड खाली पडले त्याबरोबर तात्या भान न राहिलेल्यासारखे मोठ्याने ओरडून म्हणाले की, "अहो नलावडे, दप्तराची गाठ सुटली हा तुम्हाला शुभ सकून आहे. तेंव्हा तुम्ही तुरुगात जात नाही. तुम्ही आतां खात्रीने सुटणार!" हे तात्याचे शब्द ऐकून कोर्टात ध्वनि उमटला नि त्यानतर पाच मिनिटानी कोर्टाने मला ऐन शिक्षा वा दड न करता एक वर्षाकरिता जामीन घेऊन सोडून दिले!

(२) हिंदुसभेच्या महाराष्ट्रातील कार्याविषयी विचार विनिमय करण्याच्या दृष्टीने कांहीं निवडक मडळींची सभा घेतली होती. या प्रयत्नाचे प्रमुख महाडचे श्री. बापूराव जोशी हे होते. अनेक तरुण नि उत्साही कार्यकर्त्यांनी आपल्या अडचणी मांडल्या एकदर सूर असा की, आम्ही मोठ्या तळमळीने कार्य करतो; तथापि आम्हांस पुढाऱ्याचा पाठिंबा नाही! यात पुढारी कोण आणि मागारी कोण हेंहि ठर-विण्याचा मोठा प्रश्न होता. ही सभा ओळीने तीन दिवस चालली होती अनेकानी

चर्चेत भाग घेतला होता. तीनहि दिवस तात्याराव वेळेवर उपस्थित राहून प्रारभापासून शेवटपर्यंत बसत असत. सर्वांचे विचार त्यांनी ऐकून घेतले नतर त्यांनीं भाषण केलें; तें इतक्या थोर विचारांचें होतें की, या वेळी तात्याराव हे संतमालिकेपैकीच एक आहेत असे वाटलें. सर्व आक्षेपाना उत्तरासाठीं उत्तर न देता समर्पक रीतीने काहीं आक्षेपाचें खडन, काहीचें विवेचन त्यांनी केले आणि शेवटीं असे सागितले की, " हिंदुमहासभेची प्रतिष्ठा महाराष्ट्रात वाढविण्याचे कार्य कोणी करीत असेल तर त्याने हा पैजेचा विडा उचलावा. मी त्याला पैसा पुरवितो. पत्र देतो. केसरीसारख्या पत्राला पाठपुरावा करावयाला लावतो, प्रतिष्ठा देतो, म प्रा हिंदुसभेचा अध्यक्ष करतो, आशीर्वाद देतो नि कार्य केल्यानतर पायाला हात लावून पायाहि पडतो हा पैजेचा विडा उचलणारास काही कमी पडू देत नाही. " महाराष्ट्र-केसरीची ही तळमळीची गर्जना ऐकून कोणीच पैजेचा विडा मी उचलतो असे म्हणेना. तेव्हा ते पुन. म्हणाले, " ही गोष्ट सोपी नाही हे मी जाणतो. चार दिवस विचार करा मला आठ दिवसानी सागा. आताच मला निर्णय द्या असे मी म्हणत नाही कोणी तरी हा पैजेचा विडा उचलून महाराष्ट्राच राजकारण चालवील, तर मला खरा आनद वाटेल. टिळकांच्या पश्चात् मला टिळक होता आले नाहीं, हे अगदी खरे आहे ती सोपी गोष्ट नाहीं त्याची योग्यता माझ्या ठिकाणीं नाही, हें मी अनेक ठिकाणी अनेक वेळा भरसभेत प्रकट केले आहे. कोणी तरी आपल्यापैकी धडाडीनें पुढे होत असेल, तर मी माझ्या सर्वस्वासह त्याच्यामागें उभा राहण्यास सिद्ध आहें. "



## गजानन रामचंद्र करमळकरशास्त्री

**( काव्यतीर्थ, प्रिन्सिपॉल, संस्कृत महाविद्यालय, इंदूर )**

( १ ) सन १९३१ मध्यें उज्जयिनी नगरीत 'मध्यभारत कविसमेलन' साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर याच्या अध्यक्षतेखाली भरले होते इदूरच्या प्रतिनिधीबरोबर मीहि [illegible] म्हणून तेथे गेलो होतो मी 'लोकमान्यालंकार' नावाचे पुस्तक सस्कृतमध्ये लिहून सन १९४१ मध्ये छापून प्रसिद्ध केले ते त्या वेळीं अपूर्ण स्थितीत होते त्यातील काही श्लोक तात्यासाहेब केळकर यास वाचून दाखवून त्याचा त्यावर सल्ला घ्यावा या हेतूनें ते माधव कॉलेजच्या समेलनाच्या हॉलमधून निवासस्थानी दुपारी ११ वाजता येत असता रस्त्यातच त्यास गांठून चार शब्दात माझा हेतु त्यास कळविला त्यांनींहि लगेच मला मोठ्या उदार अतःकरणाने असें सागितले कीं, " मला वेळ फार कमी आहे, तथापि भोजनोत्तर मी विश्राति घेत असता तुमचें काव्य अवश्य ऐकेन,

तुम्ही त्या वेळी निवासस्थानी या " असा त्याचा रुकार मला मिळाल्यावर मला जो आनद व उत्साह वाटला त्याचे वर्णन अवर्णनीय आहे. ठरलेल्या वेळीं मी हॉलच्या दरवाज्यापाशी आपल्या काव्याचे लेखी पुस्तक बगलेत घेऊन गेलों असता, दारावरील इसमाने मला आंत जाण्यास रोखले. मी म्हटलें, 'मला तात्यासाहेबांनी हीच वेळ भेटण्यास दिली आहे' तो म्हणाला, "ही त्याची भोजनोत्तर विश्रातीची वेळ आहे या वेळी कोणासहि आत सोडू नकोस अशी त्याची मला आज्ञा आहे तुम्ही मग थोड्या वेळाने भेटा" असा, त्याचा व माझा दाराजवळच जरा उच्च स्वरात चाललेला सवाद आत त्यांच्या कानावर गेला व ते लगेच आपल्या त्या मनुष्यास म्हणाले, "अरे कोण आहे! शास्त्रीबुवा आहेत काय? येऊ दे त्यास आत, मी त्यास हीच वेळ दिली आहे" ह्या त्याच्या दोन वाक्यातच मला त्याच्याविषयी असलेल्या आदरांत भर पडली. पुस्तक पाहिल्यावर ते म्हणाले, "तुमची कल्पना फार चांगली आहे. श्लोकात प्रसादगुण आहे, तरी पुस्तक पूर्ण करून माझ्याकडे पाठवा, मग मी जे काय त्यांवर मत द्यावयाचे ते देईन." इतकें बोलून ते स्वस्थ पडले. मीहि माझा कार्यभाग झाला असे समजून समाधान वृत्ताने बाहेर पडलो.



## त्र्यंबक भिकाजी हर्डीकर

(एम्. ए., माजी प्राध्यापक, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें)

(१) 'न्यू पूना कॉलेज'च्या इटरच्या गणिताच्या विद्यार्थ्यांच्या पहिल्या खास सम्मेलनास तात्यासाहेब अध्यक्ष होते. गणितासारखा रुक्ष विषय, तात्यासाहेब त्यातील अनभिज्ञ व गणित विषयाच्या विद्यार्थ्यांच्या समोर बोलण्याचा प्रसंग! परतु, तात्यासाहेबाचे त्या प्रसगाचे भाषण माहितीने भरलेलें, तर्कशुद्ध, मर्मग्राही, दृष्टांत, उपमा, विनोद इत्यादींनीं सजलेले इतकें सुदर व आल्हाद-दायक झालें कीं, आज तीस वर्षानतरहि ही आठवण तितकीच ताजी व आनदाची अनुभूति निर्माण करणारी आहे, असें परवां स्मशान-यात्रेंत असलेल्या त्या वेळच्या एका विद्यार्थ्यानें मला मोठ्या भक्तिभावानें सांगितलें.

(२) लोकमान्य टिळकानी श्रीमत जगन्नाथ महाराजाच्याकडून मडळीला कॉलेजासाठी हल्लीचा जागा देवविली ह्या कामाचे सर्व श्रेय एकट्या तात्यासाहेबाचें आहे लोकमान्य विलायतेला जाण्यास निघाले होते; अनेक माणसें आपआपलीं निकडीचीं महत्त्वाची कामें घेऊन त्यांच्या भेटीस आलीं होती, लोकमान्याना क्षणाचाहि उसत मिळत नव्हता; तात्यासाहेबाच्या सांगीप्रमाणें कॉलेजाची मंडळी मुबईतील सरदारगृहांमधील लोकमान्यांच्या खोलीच्या दाराबाहेर

अहोरात्र अक्षरशः धरणे धरून बसलेली होती तो प्रसग आजहि माझ्या डोळ्यापुढे अगदी तसाच उभा आहे तात्यासाहेबाची समयज्ञता, चिकाटी, अतः-करणातील प्रेम, व्यवहाराचा उरक ह्या गुणसमुच्चयामुळेच मडळीच्या पदरात ही जागा पडू शकली. तात्यासाहेबाचे सस्थेवर हे केवढे मोठे उपकार झाले ह्याची जाणीव – जागेला हल्ली मूल्य व महत्त्व शतपटीने आले – ह्यामुळें आजच्या परिस्थितीत अधिक उत्कटत्वाने व्हावी हे अगदी साहजिक आहे.

( ३ ) प्रि शहा यानी आकस्मिकपणे मडळीच्या तद्दाह्यात सभा-सदत्वाचा राजिनामा दिला, त्या प्रसगाचा उल्लेख कटु असला तरी अप-रिहार्य आहे. ही आठवण न केली तर तात्यासाहेबाशी कृतघ्नपणा केल्यासारखें होईल; शिवाय दीर्घकालावधि मध्यतरी गेल्यामुळे उभयपक्षी सलणारे शल्य आता बोचेनासे झाले आहे व प्रसग इतिहासजमा झाला आहे. त्या वेळी मडळी व कॉलेज बाल्यावस्थेत होती एकाएकी अशनिपात व्हावा असा आणीबाणीचा गभीर प्रसग ! त्या वेळी तात्यासाहेब मॅनेजिंग कौन्सिलचे सदस्य होते. तेथील त्याची भूमिका निःपक्षपाती न्यायाधिशाची होती सर्व सवलती व अवधि त्यानी प्रि शहा याना स्वसमर्थनार्थ दिला. 'केसरीं'त स्वत. लेख लिहून त्यानी मडळीची बाजू अभिनिवेशाने माडली एखाद्या कसलेल्या वकिलाला साजेल, प्रतिपक्षाला सर्वथैव निरुत्तर करील व तिऱ्हाइताच्या न्यायबुद्धीला सहज पटेल इतके तर्क-कर्कश, मर्मभेदक, समर्पक व सुदर असे हे समर्थन आहे वादळ शात करण्याचे सामर्थ्य त्यात होते तात्यासाहेबानी कौन्सिलच्या अनेक सभातून चागला नेट धरला, म्हणूनच प्रि शहाच्या दीर्घ मुदतीच्या विलायत-शिक्षणासाठी मडळीने खर्च केलेली फार मोठी रक्कम पुढे तडजोडीत मडळीला परत मिळू शकली.

( ४ ) जमखडीचे राजेसाहेब कै. श्रीमत अप्पासाहेब पटवर्धन व त्याचे त्या वेळचे सल्लागार सस्थानचे मुख्य न्यायाधीश श्रीयुत महाबळ ह्या उभय-ताना तात्यासाहेबाच्याबद्दल नितान्त आदर असे; व त्यामुळेच तात्यासाहेबाची मध्यस्थी यशस्वी झाली श्रीमत राजेसाहेबानी मडळीच्या योजनेस मान्यता दिली; मडळीस दोन लक्ष रुपयाची देणगी दिली व 'न्यू पूना कॉलेज'चे रूपातर 'सर परशुराम भाऊ कॉलेज' मध्ये झाले ह्या कामी तात्यासाहेबानीं दाखविलेली व्यव हारबुद्धि व समयज्ञता, व घेतलेले परिश्रम ह्या सर्व गोष्टी अविस्मरणीय आहेत

( ५ ) डेक्कन जिमखाना ह्या सस्थेत माझ्या अल्प सामर्थ्यानुसार काही दिवस मी थोडे फार काम केले तात्यासाहेब पूर्ववयात ह्या संस्थेचे सेक्रेटरी होते व अलीकडे अध्यक्ष होते. आम्हा सर्व कार्यकर्त्यांना अनेक प्रसंगीं त्याचे विविध प्रकारचे साहाय्य मिळाले आहे. मरणापूर्वी दहाच दिवस अगोदर

जिमखान्याचा स्थापना-दिन-समारभ होता; त्या वेळी तात्यासाहेब अध्यक्ष होते. जिमखान्याच्या हातून पूर्वीइतक्या उत्साहाने कार्य होत नाही, परिस्थिति निराशाजनक आहे, अशी बाजू प्रास्ताविक मुख्य भाषणात मीं माडली त्या वेळी तात्यासाहेबानी सस्थेचा जुना इतिहास सागून हल्लीचे सभासदत्वाचे आकडे तपशीलवार वाचून दाखवून ह्याहि बाबतीत एखाद्या नवीन तरुण कार्यकर्त्यालाहि लाजवील असा उत्साह व आ-ा।।: प्रकट केला। वर्तमान काळ व भविष्य काळ, बुद्धि व भावना, व्यवहारातील उरक व ध्येयवाद याची गोड सागड घालून साधता येईल तितके समाजहित साधावयाचे अशी त्याची वागणूक होती. त्यामुळे त्याची वृत्ति नेहमीं समाधानाची व चित्त प्रशात असे.



## भा. वि. घारपुरे

### ( क्युरेटर, रे-म्युझियम, पुणें )

( १ ) " मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास। कठिण वज्रास भेदू ऐसे॥ " असा अनुभव तात्यासाहेबाच्या सान्निध्यात केव्हा केव्हा येई ज्या वेळी मदत करावयाची तेव्हां दुसऱ्या कोणाच्याने होणार नाही अशी ते करीत व नाही तेथे अगदी तुटकपणे तोडून टाकीत व तसे क्षणमात्रात करीत १९२२–२३ साली मला टाइप रायटर नव्हता मी केसरी कचेरीकडून माझे काम टाइप करून मागत असे. एकदा असे काम व मदत मिळण्याची तात्यासाहेबाच्या समक्ष विनती केली. त्यानी 'केसरी'चा व तुमच्या टाइपरायटिंगचा सबध काय? असे म्हणून तो प्रश्न सोडवून टाकला!

( २ ) सन १९४७ साली माझ्या परदेशपर्यटनाच्या कामी केसरीकडून मदत मिळण्याबद्दल बोलणे झाले मी रु २००० ची अपेक्षा केली ते म्हणाले, केसरीला मदत करावयास काय हरकत आहे? केसरी-मराठा मदत करील व पुढे हेच खरं झाले, केसरी-मराठा सस्थेने २००० रुपये मदत केली!

( ३ ) सन १९२८ साली विश्रामबाग राजवाडा म्युझियमसाठी मिळावा म्हणून मी चळवळ केली. मला तात्यासाहेबाची भरपूर मदत होती त्या वेळी आम्ही त्या वेळचे मुबई सरकारचे अर्थमत्री नामदार सर गोविंदराव प्रधान याच्याकडे डेप्युटेशन नेलें. त्याचा पुरस्कार तात्यासाहेबानी केला डेप्युटेशनमध्ये डॉ. नायडू, सरदार जगन्नाथ महाराज हेहि होते पुणें प्रदर्शन कमिटीचा मी दुय्यम चिटणीस म्हणून होतो गोविंदराव प्रधानानी तात्यासाहेबादि सर्वांना चहापार्टी दिली. तात्यासाहेब सर गोविंदरावाना म्हणाले, " आम्हाला चहा नको; वाडा द्या! " सर्व मुद्दे माडून झाल्यावर तात्यासाहेबानी सर गोविंदरावाना बजावले कीं, " विश्राम-

बाग राजवाड्याचा दर्शनी चौक सार्वजनिक फंड उभारून बांधलेला आहे व त्याचा आम्ही म्हणतो असा सदुपयोग सरकारने करू दिला नाही, तर आम्ही सरकारवर दावा लावू व हायकोर्टाचा मार्ग स्वीकारू ! ' आम्हाला हे मोठे धाडस आहे असे वाटले पण स्पष्टपणे असा इशारा द्यावयास तात्यासाहेब मुळीच कचरले नाहीत!

( ४ ) कोणच्याहि उपयुक्त सार्वजनिक कार्याला त्यांची सक्रिय सहानुभूति असे. 'पेटट' या विषयावर माझ्याकडून पुस्तके व फायली घेऊन त्यांनी एक लेख लिहिला व 'पेटट' याचा वाचक "अनन्य सामान्य" असा शब्द कालिदासातून स्वतंत्रपणे बसविला लेख त्यांनी लिहिला; परंतु मला त्यांनी असे सांगितले की, माझी इच्छा आहे की, हा लेख तुमच्या नावाने प्रसिद्ध व्हावा व प्रुफे आली म्हणजे लेखावर मी तुमचे नाव घालणार आहे!

( ५ ) लॉर्ड रे महाराष्ट्र औद्योगिक संग्रहालय पुणे या संस्थेचा स्वतंत्र कायदा झाला व तो ५ जूनला जाहीर झाला, त्याबद्दल त्यांना फार धन्यता व समाधान वाटले. यानंतर कामाकाजानिमित्त मी जेव्हा त्यांना प्रथम भेटलो तेव्हा मोठ्या उल्हसित मनाने ते मला म्हणाले, " घारपुरे, कायदा झाल्याबद्दल तुम्ही पेढे वाटले पाहिजेत. फार छान झाले " दुसऱ्या दिवशी मी त्यांना पेढ्यांचा पुडा नेऊन दिला. तेव्हा ते म्हणाले, " अहो, प्रत्यक्ष पेढे [illegible] – [illegible] – ते द्या असे नुसते म्हणण्यातच खरी मौज आहे उगाच हा खर्च केलात. अगदी चुकले. "



## वि. रा. भूसरथ

**( एम्. बी. बी. एस्., अध्यक्ष, तेलगू परिषद, हैद्राबाद दक्षिण )**

सन १९२८ साली पुणे येथे हैद्राबाद प्रजा परिषदेचे दुसरे अधिवेशन श्री. राघवेंद्रराव शर्मा यांच्या खटपटीमुळे [illegible] चिंतामण विनायक वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वी रितीने पार पडले त्या [illegible] साहित्यसम्राट् केळकर यांना खास आमंत्रण दिले होते मुळापासून निजामीतील हिंदु प्रजेकडे त्यांचा विलक्षण ओढा असल्यामुळे वेळात वेळ काढून त्यांनी आमच्या हैदराबाद प्रजापरिषदेस हजर राहण्याचा मोका वाया जाऊ दिला नाही. तात्यासाहेबांची योग्यता मोठी असतानासुद्धा ते आमच्या बरोबर बरोबरीच्या नात्याने वागताना पाहून आम्हा सर्व कार्यकर्त्यांस आश्चर्य वाटे यामुळे त्यांच्याविषयी अंतःकरणामध्ये असलेला आदर दुणावला त्या वेळी तीन-चार तास ते आमच्या सहवासात होते. तेवढ्या अवधीत ते किती थोर, विचारवंत, धोरणी व समतोल बुद्धीचे होते, याची कल्पना आम्हां सर्वांस आली त्यांच्या विचाराचा व सल्ल्याचा परिषदेतील कार्यकर्त्यांना अत्यंत उपयोग झाला. तपशील देऊन जागा अडवीत नाही.



## वैद्य खडीवाले

( पुणें )

( १ ) १९२५ सालची हकीकत. रत्नागिरीचे प्रसिद्ध पुढारी कै. व्यंकटराव मुर्वे याच्या अध्यक्षतेखाली टिळक-स्मारक मंदिरात ' महाराष्ट्र हिंदु तरुण परिषद ' भरावयाची होती, तिला तात्यासाहेब यांचा आशीर्वाद मागण्याचे काम माझ्यावर सोपविण्यांत आले; मी रविवारी सकाळी त्यांच्याकडे गेलो त्या वेळेला त्यांच्या शेजारी गोरेपान पोक्त सन्यासी बसले होते ते बहुतेक वाईचे नारायणशास्त्री मराठे असावेत मला उद्देशून सन्यासी उद्गारले, " कसली परिषद भरविता? पुण्यात ब्राह्मणाच्या प्रेताला चार मंडळीहि पुरती जमू नयेत ह्याची तरुणास लाज वाटली पाहिजे " तात्यासाहेब माझ्याकडे वळून म्हणाले, ' यांना उत्तर द्या ' मी उत्तर दिले की, " मी व माझे लोकमान्यपंथीय ( भगवी टोपी धारण करणारे ) सहाध्यायी नेहमी तयार आहोत; फक्त पैशाचा प्रश्न पडतो " तात्यासाहेब म्हणाले, " त्याची काळजी नको पैसा खर्च करा नंतर घराचा पत्ता, मृताची नावनिशीवार नोंद देऊन केसरी व्यवस्थापकापासून लागलेले पैसे घेऊन जा काम करणारीं माणसे हवीत, पैशाची काळजी नको " पुढे ८।१५ दिवसातच नारायण पेठेत दामले वाड्यात देशपांडे नावाचे गरीब गृहस्थ वारले व आपल्या शब्दाप्रमाणे तात्यासाहेबानीच पैशाची व्यवस्था केली

( २ ) करपात्री महाराजानी सुरू केलेल्या गोवध – सत्याग्रहात मी जाऊन आल्यावर मला तात्यासाहेबांनी मुद्दाम बोलावून घेऊन व सर्व हकीकत विचारून घेतली त्या वेळी झालेल्या संभाषणात त्यांच्या मुखातून त्वेषपूर्ण व उत्साही वाक्ये बाहेर पडली ते म्हणाले, " निवडणुकीच्या वेळेला समाज जागरूक राहून मते देता तर ही पाळी खास आली नसती ! असो, आता साधुसत गुहेतून राष्ट्र व धर्मकार्याकरिता बाहेर येत आहे ा हे सुचिन्ह आहे, व त्याचा अनन्वित छळ होत आहे याचा परिणाम . . होईल यात शंका नाही "



## ना. अ. गोरे

( एम्. ए., प्राध्यापक, मुंबई )

( १ ) तात्यासाहेब अनेक लोकाना हस्ते-परहस्ते अनेकपरींनी मदत करीत असत. स्वसंपादित धनापैकी आठ हजार रुपये देणगी म्हणून महाराष्ट्र-विद्यापीठाला देण्यासाठी बाजूला काढून, ते निधेपर्यंत आपल्या आईवडिलांच्या स्मरणार्थ त्यांच्या व्याजातून ' यशोदा चिंतामणी ' पारितोषिक दरसाल देण्याची प्रथा सुरू

करून अनेक महत्त्वपूर्ण ग्रंथाच्या प्रकाशनाचा मार्ग त्यानी सुकर करून ठेवला. रा. कृष्णराव मुळे याच्या 'भारतीय संगीत' या मौलिक ग्रंथाला त्यानी ते पारितोषिक दिल्यामुळेच त्याचा प्रथम भाग प्रकाशित होण्याची सोय होऊ शकली. ते प्रसिद्ध झाल्यावर श्री. मुळे तात्यासाहेबाना भेटण्यासाठी मुद्दाम पुण्याला आले होते. तेव्हा मी त्याच्याबरोबर होतो तात्यासाहेबाच्या बैठकीच्या खोलीत जाऊन त्यांचे दर्शन होताच कृष्णरावानी त्याना साष्टांग प्रणिपात केला! तात्यासाहेबांनी त्यांना घाईघाईने 'अहो कृष्णराव, हे काय, हे काय, म्हणत उठवून प्रेमाने जवळच्याच एका खुर्चीवर बसवले व आस्थेवाईकपणे त्याच्या संगीत व्यासगाची चौकशी केली व उरलेले दोन भाग लौकर पुरे करण्यास सुचविले.

श्री. कृष्णराव हेहि त्या वेळी चागले वयोवृद्ध होते त्यानी व्यक्त केलेली कृतज्ञता व तात्यासाहेबानी दाखविलेली गुणग्राहकता याचा खोल ठसा कोणाहि सहृदयाच्या मनावर टिकून राहणे हे साहजिकच आहे

( २ ) तात्यासाहेब सार्वजनिक सभामध्ये गडबड, बेशिस्तपणा किंवा विरोध दिसल्यास फार सतापत असत पाच वर्षापूर्वीची गोष्ट आहे लोकमान्याच्या पुण्यतिथीला टिळक स्मारक मदिरात लोकनायक अणे याचे तात्यासाहेबान्चा अध्यक्षतेखाली व्याख्यान होते अणे त्या वेळी व्हाइसरॉयच्या कार्यकारिणीचे एक सदस्य होते त्याचे व्याख्यान सपत येण्याच्या सुमारास स्वातंत्र्यवीर सावरकर हे उपस्थित झाले अण्याच्या भाषणानतर स्वातंत्र्यवीरानी बोलावे असा लोकानी एकच आग्रही निनाद केला. सावरकर बोलण्याला प्रथम नाखूष होते म्हणून म्हणा, अथवा त्याचे भाषण कार्यक्रमात नव्हते म्हणून म्हणा; अध्यक्ष केळकर यानी निग्रहपूर्वक नकार देऊन आपले समारोपाचे भाषण सुरू केले, पण लोक तर ऐकेनात तेव्हा तात्यासाहेब फारच रागावले गेले व 'मी या सभेचा अध्यक्ष सागतो आहे की, आता सावरकराचे भाषण होणार नाही' त्याबरोबर लोकांचा आरडाओरडा व स्वातंत्र्यवीरानी बोलावे याविषयीचा आग्रह फारच वाढला. तेव्हा आपली काठी उचलून उपरणे सावरीत सतप्त होऊन, 'मी या सभेचा अध्यक्ष जाहीर करतो की, ही सभा बरखास्त झाली' असे म्हणत व्यासपीठावरून खाली उतरण्यासाठी ते चार पावले पुढे निघाले देखील! शेवटी खुद्द सावरकरानीच पुढे होऊन तात्यासाहेबाना मागे आणले व स्वतः लोकाना सागितले की, सभापति गु. तात्यासाहेबाची आज्ञा पाळलीच पाहिजे. माझी प्रकृति बरी नाही. ती बरी झाल्यास मी उद्या स्वतत्र व्याख्यानच देणार आहे. विशेष आश्चर्याची गोष्ट ही की, या भाषणानतर तात्यासाहेबानी जे भाषण केलें ते फारच सुदर व विनोदप्रचुर होते पूर्वीच्या रागाचा त्या वेळी मागमूसहि कोठे दिसून आला नाहीं. श्रोते अगदीं खूष होऊन गेले.



## जिज्ञासु

(बी. ए., बी. टी., फलटण)

ऑगस्ट १९४५ च्या 'सह्याद्री'त 'कवि-कालिदास-प्रशस्ति' या मथळ्याखाली तात्यासाहेबाच्या काही सस्कृत कविता प्रसिद्ध झाल्या त्यांत एके ठिकाणी आलेलें 'शार्मण्यकविसम्राज्ञा' हे पद मला चिन्त्य वाटले कारण 'सम्राज्' शब्द 'राज्' प्रमाणे चालावयाचा, 'राजन्' प्रमाणे नव्हे तेव्हा 'सम्राजा' असें पाहिजे होते मुद्रणदोष असावा याच मुख्य समजुतीने सपादकाकडे मीं एक पत्र पाठवून जिज्ञासा व्यक्त केली त्यानी ते पत्र तात्यासाहेबास दाखवले असावे. कारण माझे पत्र व त्याचा खुलासा ही दोन्ही एकदमच प्रसिद्ध झाली! मासिकात झालेली एका अक्षराची चूक म्हणजे खरोखरच किरकोळच बाब. तथापि मी पत्र पाठविल होते ते सपूर्णपणे प्रसिद्ध केले, याचे तर मला नवल वाटलेच, पण त्याखाली " मला सस्कृत व्याकरणाचे ज्ञान नसल्याने चूक झाली आहे. ती छपाईची चूक नाही अज्ञानाची आहे " हा स्वतःच्या सहीने तात्यासाहेबानी केलेला अनपेक्षित खुलासा पाहून मी सादर चकित झालो. 'सह्याद्रि' व तात्यासाहेब याचे सबध व 'जा' आणि 'ज्ञा' यातील मुद्रणदृष्ट्या असलेले साधर्म्य लक्षात घेता, 'मुद्राराक्षसा'च्या (प्रिंटर्स डेव्हिल) नावाखाली चूक सहज झाकता आली असती. पण तसे न करता, सस्कृत भाषेवर सुदर प्रभुत्व असूनहि तात्यासाहेबानी स्पष्टपणे व मोकळ्या मनाने चूक कबूल केली यात त्याच्या मनाचे मोठेपण फार खुलून दिसले! हा असामान्य प्राजळपणा त्याच्या मानाने सामान्य असणाऱ्या लोकातहि पुष्कळ वेळा नसतो, असा अनुभव मला दुसऱ्या एका मोठ्या गृहस्थाच्या कवितेच्या बाबतीत काही दिवसानी आला. त्या वेळी तात्यासाहेबाची आठवण चटदिशी होऊन त्याच्याविषयी वाटलेला आदर द्विगुणित झाला.



## सी. के. बोले

(रावबहादूर, जे. पी., मुंबई)

(१) तसे पाहिले तर, तात्यासाहेब याचा व माझा प्रत्यक्ष परिचय १९४० पर्यंत घडून आला नाही, टिळककालीन राजकारणामध्ये आम्ही 'ब्राह्मणेतर' पक्षाचे! आमची सहानुभूति ना. गोखले याच्या धोरणाकडे असे मी सार्वजनिक कार्यात हौसेने भाग घेणारा १९२० पूर्वी, गोखले असताना किंवा नतर, आमच्या सार्वजनिक चळवळीसबधी 'केसरी'चे धोरण जरा कडकच असे सामाजिक सुधारणेचा प्रश्न, 'वेदोक्ताचा अधिकार,' अस्पृश्यता–निवारण, इत्यादि गोष्टीत थोडा कानाडोळा करून व 'राजकारण आधी आणि नतर समाजसुधारणा' अशी टाका करून,

पुष्कळ टिळकपक्षीय लोक वागत; पण समतोलपणाविषयीं केळकर याचा लौकिक आम्हांला विदित असल्याने आणि 'आधी केले मग सांगितले' या उक्तीप्रमाणे केळकरांनींच स्वतःच्या वैयक्तिक वा कौटुंबिक गोष्टीत वर्तन केले आहे. उदाहरणार्थ, त्यांच्या मुलीचें लग्न. सामाजिक सुधारणेचा पुरस्कार केला असल्याने, आमच्यावर वा गोखले पक्षावर होणारा टीकाचा अग्निवर्षाव केळकराना रुचत नसावा, निदान त्यांत त्यांचा हात वा शब्द नसावा अशी आम्ही ही अनुमानें बाधता येत.

( २ ) पुढे १९२० नतर 'गाधीयुग' उजाडले! सर्वच राजकारणाची तोंडे बदलली नि कधींहि एका दिशेला नसलेली तोडे एका दिशेला आली! बुद्धिवादाचे, महाराष्ट्राच्या परपरेचे अभिमानी व अध्वर्यू म्हणून केळकराच्या आणि आमच्या धोरणांत जवळ जवळ एकरूपता येऊं लागली आम्ही देवगडला गेलो असता तेथे 'ब्राह्मणी' पक्तिप्रपच न मानता अॅ. सुर्वे याच्याजवळ आमचे पान पाहिजे असा व्यवहार केळकरानी कृतीत आणून, उदारपणा आणि पुढारीपणा दाखविला!

( ३ ) १९४० मध्ये केळकराची माझी प्रत्यक्ष भेट माझ्या ७२ व्या वाढदिवसाच्या समारभप्रसगी झाली त्या वेळी त्यानी उदारमनाने पुढीलप्रमाणे भाषण केल्याचें पूर्ण स्मरते:-ते म्हणाले, "रा ब बोले याच्या सत्कार-समारभाचे अध्यक्षस्थान माझ्यासारख्या विरोधी गटातील व्यक्तीने स्वीकारल्याबद्दल आश्चर्य व्यक्त करण्यांत आले आहे आम्ही पूर्वी 'केसरी'तून रावबहादुरावर व ब्राह्मणेतर पक्षावर टीका केली आहे ही गोष्ट खरी, पण त्या वेळी रावबहादुराचा व आमचा प्रत्यक्ष सबध आला नव्हता सरकार पक्षाचे पुढारी असाच त्याच्याविषयी गैरसमज करण्यात येत असे पुष्कळ वेळा अशी परिस्थिति उत्पन्न होते की, सरकारशीं सहकार केल्याशिवाय लोकोपयोगी कायदे पास होणे कठीण असते; परतु त्यांनी प्रसगी सरकारशीं विरोध करण्यासहि कमी केले नाही."

"त्यांच्या सार्वजनिक कार्याचे क्षेत्र स्वजाति, अखिल ब्राह्मणेतर समाज आणि आता अखिल हिंदु समाज असे वाढतच गेले रा जेधे कॉंग्रेसला मिळाले तर रा ब बोले हिंदुसभेशी निगडित झाले म्हणून बोले व मी विरोधी पक्षातील व्यक्ति एकत्र येण्याचा व त्याच्याशी प्रत्यक्ष परिचयाचा प्रसग आल्याबद्दल मला आनद होत आहे.

( ४ ) या समारभाच्या दुसऱ्या दिवशी केळकर माझ्या घरी आले असता पुष्कळ 'चहा-चवा' ( Tea-talk ) झाली बोलणी लांबली; पण केळकर नि मी यांच्यामधील अतर मात्र उणावले! आयुष्याच्या ताटावर दोन हात मारून ८० ची कड गाठलेल्या आम्हाला 'वैराग्ययुक्तविषाद' वाटतो केळकर गेले, पण त्याचे 'तत्त्व' अमर झाले खास!

❁

## व्ही. आर. जोशी

(डॉक्टर, कराड)

१९२६ साली तात्यासाहेब विलिंग्डन कॉलेज सांगली या ठिकाणीं आल्या-वेळी त्या वेळचा प्रचलित महत्त्वाचा विषय जो हुंडणावळीचा दर १६–१८ पेन्स व त्याचा हिंदुस्थानच्या तिजोरीवर (गंगाजळीवर) होणारा वाईट परिणाम व इंग्लंडचा होणारा फायदा, यावर अतिशय स्पष्ट, सुबोध, व सुंदर दीड तास त्यांचे व्याख्यान झाले. व्याख्यानाच्या सुरवातीसच तात्यासाहेब यांनी सांगितलें कीं, "हा विषय मी इतका सोपा करून सांगणार आहे की, त्याचे एक गमक मी मनाशी ठरविले आहे तुम्हा मुलांना हा विषय स्पष्ट, पूर्ण कळला तरच तो मला स्वतःला बरोबर कळला व पटला आणि जर तुम्हाला तो समजला नाही तर मलाहि खास तो समजला नाही असे मी समजेन." खरोखरी इतक्या क्लिष्ट विषयाची फोड त्यांनी इतकी सुंदर व मुद्देसूद केली की, प्रत्येकाला तो विषय उत्तम समजलाच; पण तात्यासाहेबांच्या अगाध ज्ञानाबद्दल, स्वतःच्या आत्मविश्वासाबद्दल व मुलांची मने आकृष्ट केल्याबद्दल माझ्या मनात कायमचे कुतूहल राहून गेलें व नितान्त आदर वाटला.



## त्र्यंबक बाळकृष्ण केळकर

(जळगांव, पूर्व-खानदेश)

(१) दि. ८ नोव्हेंबर १९३५ रोजी जळगांवी वल्लभदास वालजी वाचनालयाच्या आवारात तात्यासाहेब यांचे सद्यःस्थितीवर अतिशय सुंदर व्याख्यान झाले ते म्हणाले, "नवीन सुधारणा कुचकामाच्या, टाकाऊ आहेत हे जरी खरे असले तरी त्यांचा शक्य तो उपयोग करून घेणेच शहाणपणाचें ठरणार नाही काय? आज येथे जे लोक जमले आहेत त्यातला एक तरी मनुष्य पुढे येऊन परमेश्वरास स्मरून सांगेल काय की, त्याचा संसार सुखाचा आहे म्हणून? असे जरी आहे तरी संसार करणे कुणी सोडून दिले आहे काय? तर त्याचें 'नाहीं' हेंच उत्तर येणार जबाबदारी आहे तेथे अधिकार आहेच व अधिकार आहेत तेथे जबाबदारी आलीच. दैववाद खरा कीं प्रयत्नवाद खरा? तर मी म्हणेन कीं दोन्हीहि खरें. आधी प्रयत्न करा, काम करा, मग यश न आले तर दैव म्हणा वाटले तर दैववादी लोकांना काही काम करावयाचे नसते म्हणून ते दैववाद, दैववाद म्हणत बसतात. दैवाचा नंबर पाचवा लागतो गीतेत म्हटलेंच आहेना की, "दैवं चैवात्र पंचमम्," पुरुषार्थ, प्रयत्न हे केलेच पाहिजेत!"

(२) सन १९३६ साली माझे वडील बंधु नारायणराव यांच्यामार्फत मी तात्यासाहेबांना मला चार उपदेशाच्या गोष्टी त्यांच्या हस्ताक्षरात लिहून पाठविण्यास विनती केली होती त्याच्या पाठीमागे अक्षरश: शेकडो तऱ्हेचे व्याप असतांहि वेळांत वेळ काढून त्यांनीं मला जें उपदेशपर पत्र पाठविले आहे, त्याबद्दल मी त्यांचे कितीहि आभार मानले, तरी ते अपुरेच होतील. कारण त्या पत्रातील प्रत्येक शब्द मोलाचा आहे. मी त्या उपदेशाची पारायणे केलीं व प्रत्येक वेळीं माझ्या चित्तास त्या उपदेशामृतानें नवचैतन्य मिळाले आहे. मला या उपदेशापासून चित्ताच्या शांतीस व मनाच्या समाधानास फारच मदत झाली आहे. सदरहू पत्र खालीलप्रमाणे आहे :—

श्रीराम

पुणे ता २०।१२।१९३६

रा. रा. त्र्यंबकराव केळकर, मु. जळगाव यास,

कृतानेक साष्टांग नमस्कार विशेष

आपले बंधु, आमचे मित्र, रा. नारायणराव केळकर यानी आपला निरोप कळविला जगात मनुष्यानं कसे वागावे या प्रश्नाचे उत्तर सर्वांना पटेल असे देणे कठीण आहे; तथापि त्यांच्या व तुमच्या आग्रहास्तव माझे मत लिहितो —

१ पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे मनुष्याने आपला जो खरा स्वभाव आहे त्याप्रमाणेच वागावे दुसऱ्याचा स्वभाव, लोक मानतात म्हणून, तसा बहाणा किंवा ढोंग करू नये.

२ स्वतः आपण व आपणावर अवलंबून असणाऱ्या माणसाचा योगक्षेम स्वाभिमान सांभाळून चालविणे हे मनुष्याचें आद्य कर्तव्य आहे. ते पुरं पाडून उरेल तो वेळ व शक्ति समाजसेवेला अवश्य खर्च करावी.

३ अशा उरलेल्या वेळेचा आणि शक्तीचा उपयोग सर्वांनीच केला तर सार्वजनिक कार्यांचे डोंगर उभारले जातील

४ सार्वजनिक कार्ये अनंत आहेत, तथापि आपला स्वभाव आणि साधनांची अनुकूलता पाहूनच आपण आपले आवडीचे कार्य, कर्तव्य म्हणून आखून घ्यावे आणि जन्मभर निष्ठेनें करावे.

५ अशा रीतीने एकच कार्य जन्मभर अव्यभिचारी भक्तीने केल्यास यश हटकून लाभेल.

६ दुसऱ्याचे मोजमाप आपल्या यशाला लावून पाहू नये. आपलेच माप

लावून पाहावे, म्हणजे निराशेचा प्रसग येणार नाहीं व आलाच तरी दुःख होणार नाहीं.

७ आईवर प्रेम करण्याचा हक्क तिच्या सर्व मुलाना सारखाच असतो, प्रेमाच्या दृष्टीने श्रेष्ठ-कनिष्ठ भाव राहत नाही. तीच गोष्ट देशभक्तीची आहे

— न. चिं. केळकर

वरील त्याच्या पत्रातील उपदेशाच्या चिंतनाने व मननाने माझ्या मनाचे पूर्ण समाधान झाले व त्यानतर कसल्याहि प्रसगाने माझ्या मनाची शांति ढळली नाही.

( ३ ) तात्यासाहेब जळगावी आले असता मी त्याना भेटायला गेलो होतो. त्याची भेट झाली मीं त्याना माझ्या घरी फराळास येण्याबद्दल विनती केली तात्यासाहेब मला म्हणाले, "मी तुमच्या घरी उद्या सकाळी अवश्य येईन, पण केवळ गप्पा मारण्यास, खाणार मात्र नाही. कारण असे प्रत्येक ठिकाणी थोडे थोडे खाल्ले तरी पोटावर तो अत्याचारच होतो, नाही का?" मला त्याचे म्हणणे पटले. ठरल्याप्रमाणे ते माझ्या घरी आले मनमोकळेपणाने खूप बोलले. मी त्याना एक शका विचारली 'मौजेचे चार प्रहर' या तुमच्या पुस्तकात 'अलिगड किल्ल्यातील एक रहस्य' या गोष्टीत पन्चेचाळीसाव्या पृष्ठावर खालील वाक्य आहे "अयोध्याप्रसाद म्हणाला – हीच तर या जगात मौज! पुरात वाहून आलेल्या काटक्या कुठल्याच्या कुठे येऊन भेटतात. गीतेत म्हटलेच आहे ना, यथा काष्ठ च काष्ठ च समेयाता महोदधौ" हे त्याना दाखवून मी त्याना विचारले, गीतेत तर हा श्लोक नाही, मग आपण असे कसे लिहिलेंत? यावर ते खूप हसले व म्हणाले, 'यथा काष्ठ च काष्ठ च', हा श्लोक गीतेत नाही हे काय मला माहीत नाही? परतु सर्वसाधारण जनता आपल्या म्हणण्यास काही आधार घ्यायचा असला तर धर्मसिंधु, महाभारत, गीता, अशासारख्या ग्रथाचा मुळांत नसलेले आधार देते. या प्रश्नास अनुसरून अयोध्याप्रसादाने विद्वत्तेचा आव आणून दडपून गीतेचा उल्लेख केला, असे मी विनोदाने लिहिले आहे पण तो विनोद तुम्हास कळला नसला तर मला तो साधला नाही असेच म्हटले पाहिजे!

( ४ ) मी कपाशी खरेदी करणाऱ्या व्यापारी कपनींत नोकरीवर असल्याने साहाजिकच कपाशीवर बोलणे निघाले. मी म्हणालो, कापसाच्या व्यापारात आम्हा लोकाना अमेरिकेवर अवलबून राहावे लागते मुबईचे भावसुद्धा अमेरिकेच्या लहरीवर हेलकावे खात असतात हे अतिशय अनिष्ट आहे यावर तात्यासाहेब म्हणाले, "तुम्ही म्हणता ते खरे आहे. सरकारने कायदा करून कापसाची लागवड मर्यादित केली पाहिजे हिंदुस्थानांतील शेतकरी कापूस पेरण्याच्या मागें लागला असून इतर धान्यें पिकविण्याकडे त्याचे दुर्लक्ष होत आहे हे कांही सुचिन्ह नव्हे कापूस

अन्न म्हणून काही खाता येत नाही. तोच शेतकरी जर इतर धान्यें पेरील, भाजीपाला, फळफळावळ करील तर त्यास पौष्टिक व शुद्ध अन्न पोटभर खावयाला मिळेल त्याच्या गुरानासुद्धा पोटभर चाराहि होईल. आपल्या शेतकऱ्यास आज हें सुचत नाही, पण पुढे त्याना पश्चात्ताप करण्याची वेळ आल्याशिवाय राहणार नाही." तात्यासाहेबाच्या वरील म्हणण्यात किती तथ्य होते हे आज आपणा सर्वांच्या अनुभवास येत आहेच

(५) तारीख २९ सप्टेंबर १९४१ रोजी रात्री जळगाव येथे वाचनालयाच्या आवारात तात्यासाहेब याच्या अध्यक्षतेखाली कु वेणूबाई पाटणकर याचे विभावरी शिरूरकरकृत 'विरलेले स्वप्न' या कादबरीवर व्याख्यान झाले वेणूबाई पाटणकर या अर्थशास्त्र व राजकारण हे विषय घेऊन एम् ए झाल्या आहेत व्याख्यानाच्या सुरुवातीस, वाङ्मयक्षेत्रात [illegible] पाऊल घातले नसल्याने स्वतास झेडूच्या फुलाची उपमा लावून घेतली त्या म्हणाल्या, "स्त्रियाची दु:खे स्त्रिया जितक्या चागल्या तऱ्हेने [illegible] तितक्या ती पुरुषाना माडता येणार नाहीत विरलेले स्वप्न या कादबरीत मगळागौरीच्या दिवशी घागरी फुकण्याचा उल्लेख आहे. घागरी मगळागौरीस फुकत नसून अश्विन शुद्ध अष्टमीस फुंकतात. कोणचीहि स्त्री असे चुकीचे विधान करणार नाही." अशीच आणखी काहीं कारणे देऊन त्या म्हणाल्या, "यावरून सदरहू पुस्तक [illegible] पुरुषानेंच लिहिले असावे खास." अध्यक्ष तात्यासाहेब यानी समारोप फारच सुदर केला. ते म्हणाले, "व्याख्यात्या वेणूबाई या अर्थशास्त्र व [illegible] हे विषय घेऊन एम् ए.च्या परिक्षेत उत्तीर्ण झाल्या आहेत. यावरूनच त्याची बुद्धि किती प्रखर असली पाहिजे हे काही निराळे सागायाला नको त्यानी स्वतःकडे कमीपणा घेण्यासाठी स्वतःस झेडूच्या फुलाची उपमा लावून घेतली परतु त्यामुळे त्याच्याकडे कमीपणा तर येत नाहीच, उलट ती उपमा योग्यच आहे कारण नवरात्रात, दसऱ्याच्या दिवशी आपणास देवीस झेडूचीच फुले लागतात दुसरी कोणचीहि फुले चालत नाहीत (हशा) 'स्त्रियाची दुःखे स्त्रियाच्याकडूनच चागल्या तऱ्हेने चव्हाट्यावर येतील' असे त्या म्हणाल्या तसेच काही केवळ म्हणता येणार नाही ह ना आपटे याची 'पण लक्षात कोण घेतो' ही कादबरी नाहीं तर फुकट गेली असती परकाया प्रवेश करून त्या त्या . समरस होता येते. स्त्रियाचे नाव घेतले म्हणजे लेखन प्रसिद्ध होते, खपते या समजावरून असेच प्रकार मागेहि झाले आहेत. उदाहरणार्थ, अ. ब. कोल्हटकर याची 'वत्सला वहिनीची पत्रे.' मी एकदा अच्युतरावास स्वतःच याबद्दल विचारले असता उत्तरादाखल ते नुसते सात मजली हसले! या हसण्याचाच अर्थ 'तात्यासाहेब, तुम्ही किती हो भोळे! असा आहे असो या उत्सवास 'शारदीय' महोत्सव हे

नाव का दिले ? शरदृऋतूत होतो म्हणून का त्यात स्त्रियाची व्याख्याने ठेविली जातात म्हणून ? " ( हशा )

शारदीय उत्सवाचे चिटणीस श्री. पळशीकर वकील आभार मानताना म्हणाले, " शारदीय महोत्सव या नावाबद्दल तात्यासाहेबानी जी शका प्रदर्शित केली; त्यात त्यानी एक चलाखी केली आहे. " पळशीकर बोलत असतानाच तात्यासाहेब त्याना चटकन् म्हणाले, " अहो, मला व्याकरणाने मदत केली ! " ( खूपच हशा )



## धोंडो श्रीधर आगाशे

( शिक्षक, हायस्कूल रहिमतपूर )

स्वराज्य पक्षाच्या स्थापनेसाठी जोरात प्रचार सुरू असता मुबईस गाधर्व महाविद्यालयाच्या पटागणावर एक मोठी प्रकट सभा घेण्यात आली होती अध्यक्ष-स्थानी तात्यासाहेब होते बगाल, मद्रास व मध्यप्रान्ताकडील बरेच पुढारी उप-स्थित होते. सभापति या नात्याने मद्रासकडील श्री ए. रगास्वामी अयगार याची श्रोत्याना ओळख करून देत असता तात्यासाहेब म्हणाले की, 'या गृहस्थांचे तामीळ भाषेवर दाडगे प्रभुत्व आहे ' लागलीच एका श्रोत्याने प्रश्न केला की " तात्यासाहेब, तुम्हा स्वतःला ती भाषा येते का ? " तात्यासाहेब म्हणाले, "नाहीं " श्रोत्याने विचारलें, " तर मग तुम्ही असे कसे सागू शकता ? " तात्यासाहेब जरा गोंधळल्यासारखे झाले खरे. पण लागलीच ते म्हणाले, " ज्या अर्थी ह्या गृहस्थानी त्या भाषेत [illegible] पुस्तके व ग्रथ, त्याचप्रमाणे चालविलेली अनेक वर्तमानपत्रें या सर्वांचा इतराच्या मानाने फार मोठा खप असतो, त्या अर्थी मला असे बिन-दिक्कत म्हणता येतें." या उत्तरानें विचारणारा तर गप्प झालाच; पण इतर सर्व श्रोत्याना मोठे कौतुक वाटल्याचे स्पष्ट दिसले.



## शांता आपटे

( सुप्रसिद्ध सिने-तारका, अधेरी )

( १ ) मी लहानपणी गणपति-उत्सवाच्या वेळी मेळ्यात गाणे म्हणण्यास सुरुवात केली हाच माझा सगितात प्रवेश त्या वेळी तात्यासाहेब केळकर यानी, माझी गाणी ऐकून मला सगिताचा शास्त्रोक्त अभ्यास करण्यास सांगतलें

( २ ) माझा सगीत शिक्षणक्रम सर्वतोपरी हालअपेष्टा, कुचेष्टा सहन करून पुरा झाला. आता जनतेपुढें आपली परीक्षा देण्यास हरकत नाही अशी गुरुजींनी आज्ञा

केली. पण ते करण्याअगोदर, आपल्याबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या सद्गृहस्थाच्या चरणी आपली सेवा सादर करावी व त्याना पसंत पडल्यास मग जनतेपुढे निर्भयपणे यावे, असा विचार मनात आला. तात्यासाहेब याच्याबद्दल मला परम आदर. त्यांना शास्त्रोक्त व शुद्ध सगीत फार आवडे, म्हणून त्यानाच बोलवावे व आपली तयारी त्यानाच दाखवावी असे ठरले त्याच्याबरोबर सरदार आबासाहेब मुजुमदार यानाहि आमत्रण दिले मी विनती करताच इतर सर्व उद्योग स्थगित करून येण्यास तात्यासाहेब तयार झाले व सरदार मुजुमदार याच्यासह खडकीस माझ्या बगल्यावर त्यांनीं येण्याचा अनुग्रह केला. वृद्धपणामुळे मला रात्री फार वेळ बसता येणार नाही असे त्याचे म्हणणे असल्यामुळे बैठक सायकाळी सहा वाजता सुरू करावयाची, तीन तास गायन करावयाचे एवढेच ठरले होतें तो १८ जुलै १९४० चा माझ्या रोजनिशींतील नादलेला दिवस आहे. मी दोन अडीच तास तब्बल रागदारी गायले तात्यासाहेब अगदी लक्षपूर्वक रागातील प्रत्येक उपज-निपज बारकाईने ऐकत होते मी पण अत्यत सावधगिरीने मला येते ते गायले. गुरुजीहि होते. सगीत चालले असता चीज सपतांच तात्यासाहेब एकदम उठले, डोक्याची टोपी व उपरणे काढून कोचावर ठेवून म्हणाले, "वा, हे बघा शाताबाई, मी आतापर्यंत तुमचे ऐकले, आता तुम्ही माझे ऐका" आम्हास आश्चर्य वाटलें हा काय प्रकार आहे ! हे गाऊ लागतात की काय ? असे वाटून मी झटदिशी तबोरा खाली ठेवला व बाजस झाले, हे पाहून तात्यासाहेब व आबासाहेब मनसोक्त हासले

फराळ झाल्यावर रात्री ११ वाजता तात्यासाहेबाची स्वारी पुन्हा दिवाणखान्यात आली शालजोडी पाघरून पुन्हा पद्दीने ऐकण्यास बसले व म्हणाले, "आता मी मागतो त होऊ द्या. बरेच दिवसानी मस्त सगीत शातपणाने जवळून ऐकण्यास मिळत आहे." त्यानी धमार, टप्पा, [illegible] व खंबावतीची फमास केली तबोरे लागले चार तबोरे एकस्वरात बोलू लागले त्या आनंदात तात्यासाहेबाना पुन्हा बोलावेसे वाटून ते मला म्हणाले, "मला ऐकू कमी येतें व आपण गाताना ज्या हरतऱ्हेच्या गोडगोड मुरक्या, उपजा, खटके घेता, ते छोटे स्वर लाबून ऐकून त्याचा आनद घेता येत नाही व त्यातच खरे माधुर्य, सगीत, रागाचा आविष्कार व सपूर्ण छाया असते. अलीकडे गडबडींत व धादलींत यत्रद्वारा लोक काय ऐकतात व रसिक काय ऐकून घेतात समजत नाही" मग बैठकीस सुरवात झाली तात्यासाहेब मुरब्बी व खरे रसिक यात शका नाहीं. रागावर राग होऊन बैठक पहाटे ३ पर्यंत चालू होती !

तात्यासाहेब इतकें जाग्रण अलीकडे करीत नसत. घरच्या मडळीना तात्यासाहेब घरी आले नाहींत म्हणून काळजी वाटू लागली व वारवार फोन येऊ

लागले; पण ते जे बैठक मारून बसले ते हालेनात. त्यानी मला पुष्कळ सूचना केल्या चीजेचा अर्थ श्रोत्यांच्या लक्षांत येऊन भगीनाना सपूर्ण आनद मिळावा, म्हणून गायकानें शब्दोच्चार स्पष्ट करावा, भावनेने स्वरात घुसून एकजीव होऊन गावे, विरामाच्या जागा हेतुपूर्ण व अर्थपर्ण असाव्या वगैरे अनेक मार्मिक सूचना त्यानीं केल्या त्यानी ऐकिलेल्या फार थोर व अधिकारी गायकाचीं बरीच नांवे त्यानी सागितली व मुख्यत: त्या सर्वांच्या गाण्यातील खुब्या व लकबी त्यानी मार्मिकपणे मला सागितल्या त्याचा मला पुढें फार उपयोग झाला

( ३ ) तात्यासाहेब नेहमी माझ्या शिक्षणाबद्दल चौकशी करीत असत. पुनः एकदां बैठक करण्याचे माझ्या मनात होतें; पण योग आला नाही शेवटी गेल्या सप्टेंबर १९४७ मध्ये इंडियन क्रिकेट टीम, ऑस्ट्रेलियात जाण्याच्या वेळी प्रो॰ देवधर-सत्कार–समारभाच्या वेळी नूतन मराठी विद्यालयाच्या पटागणात सभा भरली. त्या समारभाचे तात्यासाहेब अध्यक्ष होते, त्या वेळी शेवटी वदेमातरम् पद मी गाइलें त्या वेळी ते उत्सुकतेने लक्षपूर्वक ऐकत होते शेवटी त्याच्याशी बोलण्याची माझी इच्छा असताहि अवसर मिळाला नाही मजकडे पाहून नुसते ठीक आहे ना ? म्हणून म्हणाले, वात्सल्याच्या भावनेने हसले मला वाटले नाही हेच त्याचे शेवटचे दर्शन ठरेल पण माझेच नशीब खोटे !



## वि. स. वाकसकर

( बडोदें )

( १ ) एकदा भारत इतिहास सशोधक मडळाच्या समेलनास मी पुण्यास गेलो होतो. सकाळी समेलनाचा कार्यक्रम सपल्यावर सर्व मडळी मागाल ओसरी-वर भोजनासाठीं पानावर बसली तेथे पानांच्या तीन ओळी होत्या. दुसऱ्या काटकोनाजवळील तिसऱ्या ओळींतील पहिल्याच पानावर मी बसलो. माझ्या खाली कोणीहि नसल्याने मीच शेवटी होतो. मडळातील सभासदाची वागणूक इतकी प्रेमळ असते की, तेथें परकेपणा असा मला कधीच वाटत नाही व त्यामुळें मी एकटाच आणि सर्वांच्या शेवटी पण स्वतत्र पक्तीत बसलो हे माझ्या ध्यानातहि नव्हते. पहिल्या ओळीतील पहिल्याच मानाच्या पानावर साहित्यसम्राट् बसले होते. सर्वांच्या मागाहून मी येऊन पानावर बसतांच भोजनास प्रारभ व्हावयाचा म्हणून मी पेल्यांतील पाणी हातांत घेऊन ते पत्रावळीभोवती फिरविण्याच्या सिद्धतेत असून इतर मडळीहि तेंच करीत होती. इतक्यात साहित्य-सम्राट् आपल्या जागेवरून उठून माझ्याजवळील माझ्या खालच्या पात्रावर येऊन विराजमान झाले ! त्यास पाहून मीं विचारिलें,

'का ? जागा का बदलली ? ' तात्यासाहेब — तुम्हांला मजजवळ बसविण्यास जागा नव्हती म्हणून मीच तुमच्याजवळ आलो मी — डोंगर महमदाजवळ न गेला तर महमदानेच त्याच्याजवळ जावे असेच ना ? तात्यासाहेब — मी काही महमद नाही तुमचे तुम्ही ठरवा ! मजजवळ येऊन बसण्यात तात्यासाहेबाची व्यवहार कुशलता व्यक्त होते. समेलनास जमलेली बहुतेक मडळी ब्राह्मण असून भोजनसमयी मीच एकटा चांद्रसेनीय कायस्थ प्रभु होतो मला अथवा प्रेक्षकाला वैषम्य वाटेल, ते न वाटावे म्हणूनच तात्यासाहेब आपल्या मुख्य जागेवरून उठून मजजवळ येऊन बसले।

( २ ) सन १९३० च्या डिसबरच्या २५ तारखेस खार स्टेशनवर आग गाडीतून अपघाताने मी प्लॅटफॉर्मवर पडलो तो अपघात भयकर असून मी तत्काळ परलोकीच जावयाचा पण त्यातून वाचून परत घरी आलो त्यानतर तात्यासाहेबाची व माझी गाठ पडल्यावर । वृत्तान्त त्यास सागून पूर्वजाच्या पुण्याईने मी जगलो, असे मी म्हटले ते ऐकून तात्यासाहेब म्हणाले, " तुम्ही पडला ती डिसबरची २५ वी तारीख होती ख्रिस्ती लोकांची ती पवित्र तारीख होय कारण, येशू ख्रिस्ताचा जन्म त्या दिवशी झाल्याने तो दिवस ख्रिस्तजयतीचा होता. त्या दिवशी स्वर्गाचा द्वारे ख्रिस्ती लोकानाच उघडी असतात तुम्ही ख्रिस्ती नसल्याने तुम्हाला तेथे मज्जाव होता, म्हणून तुम्ही परत मृत्युलोकात आला ! "



## बाबासाहेब परांजपे

### ( तपस्वी, स्वार्थत्यागी व राजकीय तत्त्वज्ञानी )

( १ ) लोकमान्याना एक लाखाची थैली अर्पण करण्याची पुण्यातील त्याच्या प्रेमी मडळींत चळवळ चालू होती. त्याच वेळी मुबईस 'मेसेज' नावाचे इग्रजी साप्ताहिक सुरू करण्याबाबत व त्यासाठी निधि जमविण्याबाबत श्री अच्युतराव कोल्हटकर याचे प्रयत्न चालू होते दोन निरनिराळे निधि एकाच वेळी चालू ठेवणें इष्ट नसल्यामुळे लोकमान्यास देण्यात येणारी थैली ते स्वतःकरिता न वापरता सार्वजनिक कार्याकरिताच खर्च करणार असल्याचे ठरल्यासारखेच असल्याने मेसेजचा फड निराळा न जमविता लोकमान्याच्या फडाकरिताच निधि जमवून त्यातूनच मेसेजकडे रक्कम पुढे जरूरीप्रमाणे घेण्याची योजना चालक-मडळीनी ठरविलेली होती. परतु गैरसमजुतीने त्या बाबतच्या तक्रारी अखेर लोकमान्याच्या कानापर्यंत गेल्या. श्री. अच्युतराव याच्याशी माझा सबध या वृत्तपत्री व्यवहारात असल्याने माझ्याबद्दलची तक्रार त्या वेळी बरीच होती. अखेर आपल्या थैलीतील रक्कम त्या कामी खर्ची घालून तो व्यवहार लोकमान्यानी मिटवून घेतला सदेशपत्र

व मेसेज पत्र ही लोकमान्याच्या धोरणास पोषकच होती, म्हणून तात्यासाहेबाच्या सल्ल्याने व मदतीने हा वाद मिटू शकला. तात्यासाहेबानीहि त्या वेळच्या प्रसगानतर पुनः पुन. त्याची चर्चा करीत न बसता व मागील प्रसगाची तीव्रता विसरून पुढील कामात मला कधीच अडथळा केलेला दिसला नाही ध्येयाची दृष्टि ठेवूनच सतत कार्य करण्याचे त्याचे धोरण असल्यानेच तात्यासाहेब अशा प्रकारचे व्यवहार करू शकले हेच त्याचे वैशिष्टय आहे

( २ ) लोकमान्य टिळकाचा सहा वर्षांचा कारागृहवास चालू असताना तात्यासाहेब केसरी पत्राचे सपादक होते केसरीच्या दरएक अकात सामाजिक विषयाला बरेच मोठे स्थान प्रामुख्याने देण्यात येत असल्याची तक्रार वाईचे भाऊ-शास्त्री लेले यानी फार जोराने केली असल्याचे स्वत. तात्यासाहेबानीच मला सागितले. माझी स्वतःची त्याच्याकडे तीच तक्रार होता केसरी पत्र हे सामाजिक विषयाकरिता नव्हे, अशी माझी तक्रार होती तात्यासाहेबाचा ओढा समाजसुधारणेकडे मनापासून असल्याने लोकमान्याच्या गैरहजेरीत केसरीचा कल सामाजिक विषयाकडे झुकत चाललेला आहे, हे मी तात्यासाहेबास स्पष्ट व तीव्र शब्दांत सागितले व नापसती दर्शविली तात्यासाहेबानीं त्या वेळी मार्मिक व प्रासगिक उत्तर दिलें हे खरे, पण पुढे लोकमत जमेस धरून आवश्यक ते फेरफार हळूहळू त्यानी केले. नमूद करण्याची गोष्ट एवढीच कीं, स्पष्ट शब्दात त्यास निवेदन केलेल्या बाबीमुळे पुढे त्याबाबतचा राग त्यानीं मनात कधीच ठेवला नाही व माझ्याशी वागण्यांत त्यानी कधीच उणेपणा ठेविला नाही ही त्यांच्या वागणुकीची पद्धत व मनाची थोरवी व गर्भश्रीमती निर्विवादपणे प्रशसनीय आहे, यात शका नाहीं.



## दत्तात्रय दिवाकर चितळे

( मॅनेजिंग डायरेक्टर, पुणें सेन्ट्रल को-ऑपरेटिव्ह बँक )

तात्यासाहेब याचा व माझा निकट असा सबध प्रथम सन १९१८ साली आला त्या वेळीं मी कॉसमॉस को ऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटीचा निर्वेतन चिटणीस होतो तात्यासाहेब हे त्या सस्थेच्या सल्लागार मडळाचे अध्यक्ष होते. सन १९२०–२१ च्या सुमारास सहकारी खात्याच्या रजिस्ट्रारच्या जागीं मि. ऑटो-रॉथफील्ड, आय् सी एस् , हे होते त्याना मराठी चागलेच समजत असे. रेव्हिन्यू खात्यातील एक करडा अमलदार म्हणून त्यांची ख्याति होती. स्वभावानें ते एककल्ली व काहीस हट्टी होते. त्याचे असे मत होते कीं, सहकारी सस्थांनी आपला कारभार विशेष रुबाबाने चालवावा व त्यासाठीं सभासदाना कर्जावर थोडें जास्त व्याज द्यावें लागले तरीहि तें द्यावे व्याजाचा दर वाढविण्याच्या दृष्टीने कॉस-

मॉस सोसायटीने आपले पोटनियम दुरुस्त करावेत असा त्याचा फार आग्रह होता. कार्यकारी मंडळाच्या सभासदांचे मत याच्या अगदी उलट होते तथापि रजिस्ट्रारसाहेब याच्या आग्रहावरून त्याचे म्हणणे साधारण-सभेपुढें दोन वेळा मांडून सभासदाच्या मताचा अदाज पाहिला कार्यकारी मंडळाप्रमाणेच याबाबत सर्वांचे मत पडल्यावरून सहकारी खात्यास त्याप्रमाणे कळविले. परंतु मि रॉथफील्ड याचे समाधान न झाल्याने त्यानीं आपले म्हणणे सभेपुढे समक्ष मांडण्याचा आग्रह धरला कॉसमॉस सोसायटीची अशी प्रथा होती की, सल्लागार मंडळाचे अध्यक्ष हेच साधारण सभेचे अध्यक्ष असत सहरह प्रथेस अनुसरून तात्यासाहेब यानीं त्या साधारण सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल रीतसर सूचना सभेपुढे येऊन ती मजूर झाली तथापि मि. रॉथफील्ड याचा असा रडक होता की, ज्या ज्या सभास ते हजर असत त्या त्या सभाचे अध्यक्ष तेच होत असत ! यामुळे याहि सभेचे अध्यक्ष आपणच आहो अशा समजाने ते स्टेजवरील अध्यक्षाच्या खुर्चीवर जाऊन प्रथमपासूनच बसले होते ! तात्यासाहेब याची अध्यक्ष म्हणून निवड झाली त्या वेळी ते खालीच इतर सभासदामध्ये बसले होते सभा सुरू होण्याची ठराविक वेळ होताच मि रॉथफिल्ड यानी सभेच्या कामाला सुरवात करण्याबद्दल अध्यक्ष या नात्याने मला फर्माविले त्यावर रजिस्ट्रारसाहेब याचा गैरसमज झाला असून सभेच्या शिस्तीस सोडून त्याची ही वागणूक होत आहे, हे मराठे ( ॲक्च्युअरी ) यानी त्याच्या नजरेस आणताच साहेबबहादुर फार खजिल झाले. त्यातच भर म्हणून तात्यासाहेब विनोदाने म्हणाले, "साहेब, आपण आहात तेथेच छान शोभून दिसत आहा. मी सभेचा अध्यक्ष म्हणून येथेच बसून काम चालवितो." तात्यासाहेबाचे हे शब्द ऐकताच मि रॉथफील्ड याची मनस्थिति फारच अनुकपनीय झाली व त्यामुळे त्याचे धैर्य थोडे खचल्यासारखे झाले नतर सभेच्या कामास तात्यासाहेब यानी ताबडतोब सुरवात केली. मि. रॉथफील्ड हे जो विषय सभेपुढे मांडणार होते त्याचा क्रम, पत्रिकेमधील अनुक्रमात बराच खाली होता. तरी तात्यासाहेब यानी मुद्दाम त्याच्या विषयास प्राधान्य दिले व तो विषय सभेपुढे प्रथम मांडला ! अध्यक्षाच्या हुकुमानुसार रॉथफिल्ड यानी आपल्या विषयाच्या ठरीव मुद्याचे प्रतिपादन केले. त्यानी सभेपुढे अशी सूचना केली की, कपनीनें व्याजाच्या दर शेकडा २५ टक्क्याने वाढवावा आणि हे जादा उत्पन्न सस्थेस रुबाबदार जागा, भरपूर नोकर, पगार, विजेचे दिवे, पखे वगैरे थाटमाट, या कामी खर्च करावे परंतु ही विचारसरणी सभेस मुळीच मान्य होईना. सभेपुढे त्याच्या अगदीं उलट अशी उपसूचना आली व ही उपसूचना सर्वच सभासदाना सम्मत असल्याचे दिसून येत होतें ही उपसूचना मजूर होणार व आपला ठराव हाणून पाडण्यात येणार, अशी रॉथफील्ड

यांची खात्री झाल्यावरून त्यानी आपला ठराव परत घेण्याची इच्छा प्रदर्शित केली परंतु सभासद त्याना तसे करू देईनात. अखेर आपला ठराव परत घेण्यास सभासदांचें मन वळविण्याबद्दल मि रॉथफील्ड यानी तात्यासाहेबास परोपरीनें व आग्रहपूर्वक विनंती केल्यावर तात्यासाहेब याच्या सल्ल्यानुसार सभासदानी ठराव परत घेण्याबद्दल एकमतानं मान्यता दिली त्याच वेळी मि. रॉथफील्ड याना तात्यासाहेब यानी स्पष्टपणे बजाविले की, आलेला अनुभव लक्षात घेऊन यापुढे कार्यक्षम संस्थाच्या बाबतीत नसती उठाठेव करून त्याच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा अव्यापारेषु व्यापार त्यानी बद करावा. हा सल्ला मि रॉथफिल्ड याना पूर्णपणे पटला व ते त्यानी तात्यासाहेब याना ·।।-·। पत्र पाठवून स्पष्टपणे कबूलहि केले ! या प्रसगानंतर पुढे जितकी वर्षें मि. रॉथफील्ड हे सहकारी खात्याचे प्रमुख म्हणून काम करीत होते तोपर्यंत, महत्त्वाच्या सर्व विषयावर व बाबीवर निर्णय घेण्यापूर्वी, ते तात्यासाहेब याचा सल्ला घेत असत, हे मला माहीत आहे



## माधव श्रीहरी अणे

(बी. ए., बी. एल्., बिहारचे गव्हर्नर, पाटणा)

(१) हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या लढ्यात १८९७ साल हे अत्यंत महत्त्वाचे समजले जाईल यात शका नाही. प्लेगच्या बदोबस्तानिमित्त ब्रिटिश सोजिरानी पुण्यात जो धुमाकूळ केला होता, त्याने चिडून जाऊन दामोदर चाफेकर या ब्राह्मण क्रातिकारकाने गणेशखिंडींत रँड व आयर्स्ट या दोन युरोपियन अधिकाऱ्यावर गोळ्या झाडून त्याचा खून केला. देशात पुढे १९०४-५ सालानतर जी क्रातिकारकाची व्यापक चळवळ झाली तिचा उगम पुण्यातील क्रातिकारकाच्या या प्रारंभीच्या धाडशी धडपडीत आहे. याच वर्षी लो टिळकावर राजद्रोहाचा खटला भरण्यात येऊन त्याना दीड वर्षे सक्तमजुरीची शिक्षा देण्यात आली होती त्या आणीबाणीच्या वेळी टिळकाच्या केसरी-मराठा या पत्राचे सपादकत्व जाहीरपणें पत्करण्यास केळकर व खाडीलकर या दोन तरुण व्यक्ति पुढे आल्या व महाराष्ट्रात लोकमान्य टिळकानी सुरू केलेल्या चळवळी ह्या सरकारी रोष, दहशत व दडपशाही यानी बंद होऊ शकत नाहीत ही गोष्ट, त्यानी त्याच्या कार्याची धुरा आपल्या खांद्यावर घेऊन, सर्व जगास जाहीरपणे कळविली. देशकार्याकरिता तुरुगवास पत्करणारे लोकमान्य टिळक हे हिंदुस्थानचे पहिले सर्वश्रेष्ठ देशभक्त होत. लोकमान्याच्या या खटल्याच्या निकालानतर केसरी-मराठा पत्रांचे सपादकत्व पत्करणे हे ग्रीष्मऋतूत पचाग्नि साधन करण्याइतकेच त्या

काळात कठीण होते, पण तात्यासाहेब यानी ते काम किती निर्भयतेने, दक्षतेनें व उत्तम तऱ्हेने केले हें तुरुगवास सपल्यावर सपादकत्व हाती घेऊन "पुनश्च हरिः ॐ" या टिळकानीं लिहिलेल्या अग्रलेखात केळकर व खाडीलकर याच्या कामगिरीचा जो अभिमानपूर्वक गौरवानें निर्देश केला होता त्यावरून कोणा-सहि कळून येण्यासारखे आहे साधा बेमालूम जुळविला अशा अर्थाच्या शब्दानें त्यानी त्याच्या कामगिरीविषयी ' आहे

( २ ) तात्यासाहेबानी मराठ्यातील लेखाच्या आपल्या इग्रजी लेखनशैलीनें देशातील नामाकित पुढाऱ्यावर थोड्याच अवधीत कशी छाप पाडली होती याचा प्रत्यय देणार एक उदाहरण मी वाचकाच्या नजरस आणू इच्छितो १८९७ साली राष्ट्रीय सभेचे अधिवेशन वऱ्हाडात उमरावती येथे झाल होते ... प्रादुर्भाव, रँड आयर्स्टचा खून, ... अटक, लोकमान्य टिळकावरील खटला व त्याना देण्यात आलेली कडक शिक्षा सरकारची दडपशाही, वरबी कमिशन, युरोपियन सोजिराचे उन्मत्त वर्तन, प्रो गोपाळराव व गोखले याची माफी, इत्यादि गो ... या अधिवेशनास विशेष महत्त्व आले होते पुणेकर प्रतिनिधीत नरसिह चितामण केळकर हेहि एक प्रतिनिधि म्हणून आले होते पुणे व नागपूर भागातून आलेल्या प्रतिनि ... टिळकावरील खटला व त्याना देण्यात आलेली शिक्षा याबद्दल तीव्र नापसती व्यक्त करणारा ठराव राष्ट्रीय सभेत आणून मजूर करून घ्यावा म्हणून खटपट सुरू केली त्यांत तात्यासाहेब केळकर व कै अच्युत सिताराम साठे या दोन टिळका-च्या अनुयायानी स्वाभाविकरीत्याच पुढाकार घेतला होता पण तत्कालीन राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्याना असा ठराव आणणे हे युक्त वाटत नव्हते न्यायासनासमोर कायदेशीर चौकशी होऊन ... शिक्षा झाली असल्यामुळे, हे कृत्य अन्या-याचे आहे, जुलमाचे आहे, असा ठराव काग्रेससारख्या जबाबदार व सनदशीर मार्गाने काम करणाऱ्या सस्थेने करणे इष्ट नाही हे त्या पुढाऱ्याचे म्हणणे. यामुळे हा ठराव पुढे ... निरनिराळ्या प्राताातून आलेल्या पुढाऱ्याच्या खाजगी रीतीने भेटी घेऊन त्याची समति मिळविण्याचा प्रयत्न केळकर याना करावा लागला. बगालचे सुप्रसिद्ध वक्ते व राष्ट्रीय सभेचे एक आधारस्तभ सुरेंद्रनाथ बॅनर्जी याना भेटण्यास कॉग्रेस कॅपमधील त्याच्या तबूपाशी केळकर गेले माझे एक मित्र कै. विश्वनाथ हरी वैद्य ( वणी ) हे स्वयसेवक म्हणून सुरेंद्रनाथ बॅनर्जींच्या तैनातीस तेथे होते. पूर्वी ठरल्याशिवाय सुरेंद्रनाथ हे सहसा कोणाचाहि भेट घेत नसत. केळकर हे टिळकाच्या तालमीत वाढलेले. लोकमान्याचा दरबार सदा खुला. कोणी केव्हाहि पूर्वसकेताशिवाय येऊन त्याना भेटून जावे, हा त्याचा खाक्या त्यामुळे केळकर सरळ तबूच्या दाराशी आले व पडदा बाजूस सारून आत शिरले. माझे स्नेही वैद्य हे त्याना, थाबा, नाव-गाव व काम सागा, असे विचारण्याकरिता

त्याच्याजवळ येण्यापूर्वीच केळकर तबूत आत गेले, हें पाहून ते स्वतः फार रागावले अनोळखी माणसाला आत का सोडले म्हणून बाबूमहाशय रागावतील अशी त्याना मोठी भीति वाटू लागली केळकर हे एकटेच आत शिरले; सुरेंद्रबाबू हे आत असलेले त्याच्या दृष्टीस पडले व त्यानी काही एक औपचारिक शब्दाचा उपक्रम न करतां एकदम बाबूमहाशयाकडे पाहून म्हणाले, "Yes, I take the liberty of introducing myself to you I am N C Kelkar, editor of Kesari and Maratha, Poona" हे शब्द ऐकताच सुरेंद्रबाबू उठले व त्यानी मोठ्या प्रेमाने केळकराशी हस्तांदोलन करून त्यास आरामखुर्चीवर बसविलें "A brave Mahratta warrior that you are You have made a surprise attack very successfully" असे म्हणून ते हसले व टिळकाच्या पाठीमागे त्यांच्या पत्राचे सपादकत्व पत्करून ते मोठ्या योग्यतेने चालवित्याबद्दल त्यानी त्याची फार प्रशसा केली "टिळकाच्या खटल्यासबधाने प्रत्यक्ष सरकारच्या निंदेचा ठराव आणता आला नाही तरी, मी नातूबधूच्या अटकेवरील ठरावात टिळकावर झालेला खटला व त्याना देण्यात आलेली अमानुष शिक्षा याचा उल्लेख करून त्यासबधाची नापसती व्यक्त करण्याची सधि प्रतिनिधि व प्रेक्षक याना देईन" अशा आशयाचे आश्वासन बाबूजीनी केळकर यास दिल्यावर "Half a loaf is better than nothing" असा विचार करून तात्यासाहेब तेथून परतले केळकराना माझे मित्र वैद्य यानी प्रथम ओळखले नव्हते पण आत गेल्यावर त्यानी नाव सागितल्यावरून ते केळकर असल्याचे त्यास कळले हे दोन पुढारी प्रेमाने बोलत आहेत हे पाहिल्यावर स्वयसेवक वैद्याची मनातील भीति नाहीशी झाली त्यानीच वरील मुलाखतीची हकीकत मला अधिवेशनाहून परत आल्यावर नागपूर मुक्कामी सागितली पुण्याबाहेरील हिंदुस्थानच्या नामांकित पुढाऱ्याशी तात्यासाहेबाची ही कदाचित् पहिलीच मुलाखत असण्याचा सभव आहे सुरेंद्रनाथ बॅनर्जींना तात्यासाहेबाची ओळख 'मराठ्या'तील त्याच्या इग्रजी लेखामुळे पूर्वीच झाली होती व त्याच्या मनावर [illegible] अनुकूल वृत्ति उत्पन्न झाली होती म्हणूनच पूर्वसकेतावाचून अचानक त्याच्या भेटीस ते गेले असताहि मोठ्या प्रेमाने व अगत्याने त्यास ते भेटले असे मला वाटते कारण कलकत्त्यात मोठमोठे राजेरजवाडे, जमीनदार, अधिकारी व प्रतिष्ठित श्रीमत लोक यानाहि सदर बाबूजीची भेट घेण्यासाठी पूर्वसूचना देऊन ठेवावी लागत होती



## पां. श्री. आपटे

( बी. ए., गुरुजी, विनय मंदिर, येवलें )

( १ ) बऱ्याच वर्षामागे केळकराची " रचसी केश-भूषा अथवा कुसुमचाप-पाशा " ही कविता मी वाचली होती. त्यावरून माझा समज असा झाला होता की, त्याच्या नखरेबाज ·· ा .ाप्रम ां त्यांची नित्याची वेषभूषाहि ठाकठिकीची असेल १९२३ च्या आगेमागे ते येवल्यास व्याख्यानाकरिता आले होते. आम्ही राष्ट्रीय शाळेतील मडळी त्यास आणण्यास स्टेशनवर गेलो होतो. रात्री ते गाडी-तून उतरले ते अगदीच साध्या वेषात; परीटघडीचे कपडेहि त्यानी बरोबर आणले नव्हते, हे पाहून मला आश्चर्य वाटले. बौद्धिक आनद लुटण्यात अतर्मुख झालेले मन बाह्य वेषाकडे कोठून पाहणार ? " भाच्यानें आयत्या वेळीं पुढें केलें तरच टिळकांच्या अगावर जरीचें उपरणें दिसावयाचें " ह टिळकासबधींचे केळकराचे उद्गार त्याना ततोतत लागू होते.

( २ ) १९२८ साली मुलाच्या व्रतबधाच्या वेळी बटूस आशीर्वाद द्यावा म्हणून मी त्याच्याकडे गेलो होतो पान सुपारीबरोबर भोजनाचेहि निमंत्रण त्यास दिले त्यानी ते तात्काळ स्वीकारून आम्हाला मोकळे करताना ते म्हणाले, " भोजनाला पुन्हा निमत्रण देण्याला कोणाला पाठवू नका मी वेळेवर येतोच ", असें म्हणून या सकेताची त्यानी लगेच डायरीत नोद केली पचवीस वर्षांपूर्वी तरी आमचे पुष्कळसे पुढारी संकेतदक्ष नसत टिपण न केल्यामुळे पुष्कळ वेळा कबूल करून समारभास ते हजर राहू शकत नसत. या बाबतीत केळकराची दक्षता युरोपिअन लोकाच्या पद्धतीची पाहून मला विशेष आनद वाटला असो. ठरल्याप्रमाणे ते मुजी-च्या वेळीं आले, पान सुपारी घेऊन त्यानी बटूस आशीर्वाद दिला व मला म्हणाले, " मी साडेदहा वाजता जेवण्यास येतो म्हणून सागितले होते खरे; पण मला अर्धा तास उशीर होईल, काही महत्त्वाचे काम आहे " त्याप्रमाणे ते ११ वाजता आले केळकराची ही दक्षता पाहून आम्हाला त्याच्याबद्दल आदर वाटला व प्रसग लक्षात राहिला.

( ३ ) वरिष्ठ विधिमडळाच्या निवडणुकीच्या वेळी ते येवल्यास पुन्हा आले होते. रात्रीं व्याख्यान झाल्यावर ते म्हणाले, " गाडी पहाटे चार वाजता आहे, घरीं झोपलो तर गाडी चुकावयाची व मला तर त्या गाडीनें गेलेच पाहिजे, म्हणून मी स्टेशनवर जाऊन झोपतो " गावांतील बऱ्याच लोकानी आम्ही तुमची गाडी चुकवू देणार नाहीं म्हणून सागितले, परतु आमच्या लोकांच्या दक्षतेचा त्यास अनुभव होता म्हणून त्यानी जाण्याचा आग्रह धरला व बऱ्यानी त्यास समति दिली ! इतक्यात एक तरुण पुढे झाला व म्हणाला, " आपण स्टेशनवर जातान

आमची अब्रूहि घेऊन जाल! तुम्हांला तीन वाजता उठवून चाराची गाडी साधून देणारा एकहि मनुष्य येवल्यात नाही काय? इतके नादान आम्ही असलों तर मग आम्ही स्वराज्य कसलें मिळविणार? आम्हाला एकदा संधि देऊन तर पहा." त्या तरुणाचे ते भावनाप्रधान उद्‌गार ऐकून तात्यासाहेब म्हणाले, "अनुभवाने मी शहाणा झालो आहे, पण आता झोपतो बुवा येथे. पण गाडी चुकू देऊं नका हं"

त्या तरुणाने खात्रीच्या टांगेवाल्याला सांगून ठेवले की, डॉ. भटाच्या घरासमोर पहाटे तीन वाजता टांगा उभा कर टांगेवाल्याने शपथपूर्वक येतो म्हणून सांगितले त्या तरुणास नीट झोप आलीच नाही व तो टांगेवाल्याला दोन वाजता उठवावयास गेला, तो . . दारू पिऊन धुंद होऊन पडला होता. मग तेवढ्या रात्री दुसरा टांगा गाठून त्याच्या घरासमोर त्या दक्ष तरुणाने उभा केला. तो घड्याळांत तीनचे ठोके पडले. केळकर जागे होतेच वाटच पहात होते. नंतर काही मंडळी त्यांना पोहचविण्यासाठी स्टेशनवर गेली केळकर गाडीत बसताना त्या दक्ष स्वयंसेवकाकडे पाहून म्हणाले, "यांच्यामुळे मला स्वस्थ झोप मिळाली व गाडीहि साधली. पण यांना त्यांच्या प्रतिज्ञेमुळे फार श्रम पडले म्हणून मला दुःख होत आहे" असे पुन्हा पुन्हा बोलून त्यांनीं आभार मानून कृतज्ञताहि दर्शविली. स्वयंसेवकाच्या सेवेचे असे चीज करणारे फारच थोडे पुढारी असतात. हे गुण दिसावयाला लहान खरे; पण याच गुणाने पुढारीपण मिळते व टिकतें.



## कृष्णाजी महादेव ऊर्फ पैसाफंड रानडे

(देशदास, पुणें)

(१) सर्व सार्वजनिक कामात मी स्वयंसेवकाचे कार्य करणारा या नात्याने एकदा तात्यासाहेब यांच्या बरोबर मी कोकणात गेलो होतो. पुण्याहून निघून परत पुण्यास येईपर्यंत सर्व मुक्कामात सर्व वेळी खाणे, जेवणे, निजणे वगैरे सर्व बाबतीत तात्यासाहेब माझी काळजीपूर्वक इतकी विचारपूस करीत की, तो सर्व प्रकार पाहून माझी मलाच लाज वाटे. कारण स्वयंसेवक म्हटला म्हणजे त्याचे कोणी कसेहि पोतेरें करावे, असा माझा अनुभव असल्यामुळे, तात्यासाहेब यांच्या या आत्मौपम्य दृष्टीने वागण्याचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला रामदास दासां सांभाळितो कैसा। जीव प्राणा जैसा तैसा पाहे॥ असे श्रीसमर्थांचे वर्णन केले आहे ते येथें ततोतत लागू पडते!

(२) नाशिक येथे काही सार्वजनिक कामास मी गेलो असतां तेथे अपघाताने माझा हात मोडला म्हणून मी मुंबईस डॉ. भाजेकर यांच्या दवाखान्यांत

गेलों. त्याचवेळीं मुंबईस सरदारगृहात लोकमान्य शेवटच्या आजारानें अत्यवस्थ होते. तात्यासाहेब लोकमान्याच्या जवळून एक क्षणभरहि दूर जात नसत. पण मी दवाखान्यात येऊन पडलेला आहे हें त्यास कसे कळलें न कळे. ते तशा परिस्थितींत वेळ काढून विलक्षण व्यग्र मनःस्थितीत लगबगीनें वरचेवर मजकडे दवाखान्यात येऊन माझी चौकशी करीत, धीर देत व मला सर्व प्रकारची मदत करण्याबद्दल डॉ. भाजेकर यास विनंती करीत. उरक, आपलेपणा व परोपकार यांचे ते प्रतीक होत

( ३ ) थोर पुरुषाची वाणी विलक्षण प्रभावी असते. रा. नारायणराव राजहस यांस लोकमान्यानी 'बालगधर्व' पदवी दिल्याने याच नावानें ते ओळखले जाऊन त्याचे मूळ नाव लोक विसरले! तसेंच काहींसें माझेहि झाले. पैसाफडाचे काम अत्यत तन्मयतेने दीर्घकाल मी केल्यामुळें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात एतद्विषयक भरलेल्या एका जाहीर सभेंत, अध्यक्ष तात्यासाहेब यानीच स्वय स्फूर्तीने मला "देशदास" ही पदवी दिली व त्याच नावाने मी ओळखला जातो!

( ४ ) निर्लोभपणाने पैसाफडाचे काम मी करीत असता ××× या गृहस्थाने, मी पैसाफडातून पैसे खातो, असे मेळयातील एका पदात ध्वनित केले व हे "देशदास" नसून 'देशडास' आहेत असे म्हटले! मला अति दुःख झाले मी हे सर्व तात्यासाहेब यास श्रुत केले. त्यास वाईट वाटले. त्यांनी या कामाकरितांच शिवाजी मदिरांत बोलाविलेल्या जाहीर सभेत हा विषय काढून मजवरील हा आरोप एक तर जाहीरपणाने पुढे येऊन सिद्ध करावा किंवा व्यर्थ आळ घेतल्याबद्दल प्रामाणिकपणाने माफी मागावी असें अत्यत त्वेषपूर्वक भाषण करून जाहीर आव्हान दिलें शेवटी त्या गृहस्थाने माफी मागून हे प्रकरण सपाविले



## वि. स. खांडेकर

### ( साहित्यिक, कोल्हापूर )

( १ ) १९२६ सालच्या मे महिन्यात मी मोकळेपणाने तात्यासाहेब कोल्हटकराच्या सहवासात सारी सुट्टी घालविण्याकरिता मुबईला आलों कोल्हटकरांनी आपल्या प्रवासाच्या कार्यक्रमात तात्यासाहेब केळकराकडे पुण्याला आठ पधरा दिवस रहावयाचें निश्चित केले होते मीहि त्याच्याबरोबर पुण्याला जावें असे ठरलें. केळकराच्या घरी उतरल्यावर त्याच्याविषयी मला जी अकारण भीति वाटत होती ती एका पळात लोप पावली! अगदीं खेळीमेळीनें आम्ही बोलू लागलों. तात्यासाहेब कोल्हटकरानी 'हे खाडेकर' म्हणून माझ्याकडे बोट दाखवून माझा

औपचारिक परिचय करून देतांच 'गाढवाची गीता' लिहिणारे खांडेकर तुम्हीच ना? असा केळकरांनीं मला हसत हंसत प्रश्न केला. या वेळीं सावंतवाडीला माझे स्नेही श्री. शिरोडकर यांनी सुरू केलेल्या 'वैनतेय' साप्ताहिकात 'गाढवाची गीता' या नांवाची माझी एक नाट्यछटात्मक विनोदी लेखमाला येऊन गेली होती तिला उद्देशून तात्यासाहेबांचा हा प्रश्न होता. त्यांच्याकडे 'वैनतेय' जात असला तरी त्यांच्याएवढा मोठा व कार्यव्यापृत मनुष्य माझ्यासारख्या कोकणच्या कोपऱ्यांत पडलेल्या लेखकाचे लिखाण वाचीत असेल अशी मला कल्पनासुद्धा नव्हती! मी चकित होऊन त्यांच्याकडे पाहू लागलो. विनोदी लेखमालेचा प्रश्न त्यांनी विनोदानेच विचारला होता; याचा प्रत्यय मला पुढे लवकरच आला. 'वैनतेय' वर्तमानपत्रात पहिल्या-पहिल्यादा मी अग्रलेख, स्फुटे वगैरे मजकूरसुद्धा लिहीत असे. त्या अग्रलेखांतील कोकणावरल्या माझ्या एका लेखाचे कात्रण तात्यासाहेबांच्या संग्रही पाहून मी विस्मित झालो. साहित्यसम्राट म्हणून गौरवल्या जाणाऱ्या त्यांच्यासारख्या मोठ्या माणसाच्या अंगीं इतके जागरूक वात्सल्य, इतकी सर्वस्पर्शी रसिकता आणि आपलेपणा पाहून मला विस्मय वाटला.

( २ ) पुढे जवळ जवळ पंधरा दिवस केळकरांच्या घरी रात्रीं काव्यशास्त्रविनोदाला जो पूर येई, त्याचे वर्णन कितीहि केले तरी ते अपुरेच होईल. त्या बैठकीत दोघांहि तात्यासाहेबांचा कोटिबाजपणा प्रगट व्हायचा, कॉलेजांतल्या जुन्या आठवणी निघायच्या, वाङ्मयविषयक मते प्रगट व्हायचीं, गाणें-बजावणेंहि चालायचे! केळकरांच्या मानसमंदिरात टिळकांच्या जोडीने रानड्यांच्या मूर्तीलाहि स्थान आहे हे मला त्या वेळच्या त्यांच्या बोलण्यातूनच प्रथम कळले.

( ३ ) शिरोड्याला एकदा माझ्याकडे ते ऐन उन्हाळ्यात आले होते. कोकणात अशा वेळी अंगातून घामाच्या धारा वाहत असतात. गाव व गावाजवळची मिठागरे पहायला आम्ही निघालो. तेव्हा तात्यासाहेब अंगात सदरा घालायला सुद्धा तयार होईनात. मीं त्यांना म्हटले, 'असे उघडेच जाणार तुम्ही? लोक काय म्हणतील?' ते उत्तरले, 'लोक म्हणतील हा आपल्यापासून कांहीं न लपविणारा मनुष्य आहे. याचा कारभार सारा उघडा आहे.' त्याच वेळी त्यांना एक रसाळ फणस विशेष आवडल्यामुळे त्याच झाडाचा दुसरा फणस त्यांच्याकरिता पाठवून देण्याविषयी मी माझ्या एका स्नेह्यांना कळविले. फणस आला. तात्यासाहेबांनीं तर त्या दिवशी फलाहारावरच राहावयाचे ठरविले होते! पण त्या दुसऱ्या फणसाचा पहिला गरा तोंडात टाकताच ते म्हणाले, 'हा फणससुद्धा चांगला आहे. पण मघाच्या फणसाची सर याला नाही.' लगेच हसत हंसत ते पुढे म्हणाले, 'जीभ ही साऱ्या रसिकांची राणी आहे. तुम्ही टीकाकार कोल्हटकर आणि खाडिलकर ह्यांच्या नाट्यगुणांतले अंतर अचूक सांगतांना? जीभ ही सुद्धां तितकीच चोखंदळ आहे. ती कुठल्याहि

रसाचे सूक्ष्म गुणावगुण क्षणार्धात सांगू शकते ' त्याची ' नवलपूरचा संस्थानिक ' ही कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर प्रजेची दुःखें जाणून घेण्याकरिता वेषांतर करून फिर-णारा त्यांतला संस्थानिक नायक अगदीं आधुनिक हरून् अल् रशीद दिसतो अशी मी टीका केली होती. त्यानंतर त्यांची माझी भेट झाली तेव्हा ते म्हणाले, ' संस्थानिक गुप्त वेषाने प्रजेची दुःखे जाणून घेण्याकरिता फिरेल हे तुम्हाला अस्वाभाविक वाटतं; पण तुमच्या ' दोन ध्रुवा 'तली नायिका — ती पांढरपेशा समाजांतील असून काजूच्या कारखान्यात काम करायला जाते हे कितीसे स्वाभाविक आहे ! '

( ४ ) दुर्दम्य उत्साह, अनुपम वाङ्मयप्रेम आणि अखंड ज्ञानलालसा यांच्या संगमातून उद्भवणारे त्यांचे अनेक संकल्प अपुरे राहिले, हे मला माहीत आहे. मानवी जीवनाचा व मानवाच्या शक्तीचा मर्यादितपणा लक्षात घेता असे होणें स्वाभाविकच आहे. पण एका गोष्टीबद्दल मात्र राहून राहून वाईट वाटते; ती म्हणजे तात्यासाहेबांचे सुवर्णमध्याचे जे आवडते तत्त्वज्ञान होतें त्याची विस्तृत मीमांसा त्यांच्याच लेखणीतून झाली नाही हे होय अव्यवहार्य आदर्श व ध्येयहीन व्यवहार यांच्यामध्ये सापडून सामान्य मनुष्य सध्या संभ्रमात पडल्यासारखा झाला आहे. तात्यासाहेबांच्या असल्या प्रबंधानें या संदेहावस्थेतून बाहेर पडण्याला त्याला मोलाचे साहाय्य झाले असतें, असे माझ्याप्रमाणे अनेकांना वाटत असल्याचे मला माहीत आहे.



## कोंडो महादेव कुमठेकर

### ( रिटायर्ड डिस्ट्रिक्ट सेशन्स जज्ज, पुणें )

( १ ) तात्यासाहेब यांचा परिचय माझे वडील कै. रा. ब तात्यासाहेब कुम-ठेकर यांच्यामुळें झाला. माझे वडील पंचवीस वर्षें पुणे शहर म्युनिसिपालटीचे चीफ ऑफिसर होते. तात्यासाहेब हेहि बरीच वर्षें म्युनिसिपल कौन्सिलर होते शिवाय प्लेगमुळे तात्यासाहेब हे आम्ही जेथे राहत होतो त्याच्या अगदी शेजारीच काही वर्षें रहात होते. यामुळे आमचे व त्यांच्या कुटुंबाचे दाट परिचयाचे संबंध आले. त्यांचे वडील बंधू कै. नारायणराव हे मी पुणे हायस्कूलमध्ये असताना आम्हाला शिक्षक होते. त्या वेळचे माझे सहाध्यायी व स्नेही श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव ( त्या वेळचे युवराज ) यांचे नारायणराव केळकर हे टयुटोरियल गार्डीयनसारखे काहीं दिवस होते. त्यामुळें तात्यासाहेबांचा व श्रीमंत बाबासाहेब यांचाहि बराच परिचय झाला व त्यामुळें माझाहि उभयतां केळकर बंधूंशी विशेष स्नेह झाला आमच्या घराण्याचा सातारचे डॉ. देशपांडे यांच्या घराण्याशी घरोबा होता सातारचे डॉ. देशपांडे यांचे

चतुर्थ चिरंजीव बाबूराव यांचा विवाह तात्यासाहेब यांची कन्या ( डॉ. कमला-बाई ) यांच्याशी झाला; यामुळेहि आम्हां उभय घराण्याना निकट संबंध आला.

( २ ) तात्यासाहेबाना श्रीमंत भोरकराबद्दल फार आदर होता. सर्वच संस्थानाबद्दल, विशेषतः भोर संस्थानाबद्दल, त्याना आपुलकी वाटत होती. संस्थान-विषयक गोष्टीत ते प्रथमपासूनच लक्ष घालीत असत संस्थानांचे ते कैवारी होते. संस्थानविषयक घडामोडी व चर्चा यामुळें माझा व त्यांचा दाट परिचय झाला व एकमेकाचे गुणावगुण एकमेकाना कळले मी जेव्हा भोर संस्थानचे दिवाणपद १९४० मध्ये सोडले, त्या वेळेस केसरीशी तात्यासाहेबांचा अधिकृत संबंध नसतानाहि त्यानी केसरीत एक मार्मिक संपादकीय स्फुट लिहिले. यावरून श्रीमंत भोरकर, मी व संस्थान याच्याविषयी त्याना किती कळकळ वाटत होती हे दिसून येते.

( ३ ) एक चमत्कार असा की, भोर संस्थानमध्ये प्रथम सत्याग्रह तात्या-साहेब केळकर व वामनराव पटवर्धन यानी पूर्वीचे श्रीमंत राजेसाहेब पंतसचिव याच्या कारकीर्दीत केला व तेच तात्यासाहेब पुढे भोर संस्थानचे व राजेसाहेबांचे सल्लागार व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे प्रेसिडेंट झाले! त्याच्या त्या कारकीर्दीत ते मजकडे वरचेवर सल्ला घेण्यास येत व मलाहि आपल्याकडे बोलावीत त्यांची राजेसाहेबाविषयी व प्रजेविषयी कशी कळकळ होती हे त्या वेळेस मला अनेक रीतीने दिसून आले

( ४ ) मी भोरची दिवाणगिरी सोडून दिल्यावर गेली पाच-सहा वर्षे मिरज सीनियर व ज्यूनियर संस्थानचे हायकोर्ट जज्जाचे काम करीत असे तात्यासाहेबांचे काही शिक्षण मिरजेत झाले मिरज संस्थानाबद्दल व तेथील अधि-पति श्रीमंत नारायणराव तात्यासाहेब याच्याबद्दल केळकराना कशी आपुलकी वाटत होती याचे प्रत्यंतर अनेक रीतीने मला दिसून आले. पण त्याचा तपशील देत नाही.

( ५ ) संस्थाने राहावीत अशा मताचे तात्यासाहेब होते. पण संस्थानिकानी राज्यकारभारात स्वतः लक्ष घालून प्रजेचें कल्याण करावे, अशी त्याची फार इच्छा असे. ते नेहमी मला म्हणत असत की, "हे पहा दादा, हे संस्थानीक जर दिव-सांतून ठराविक वेळेस ऑफिसात येऊन तास दोन तास बसून काळजीने काम पाहतील व प्रजेची गाऱ्हाणी प्रत्यक्ष ऐकतील तर, प्रजेचे कितीतरी कल्याण होईल व त्यांचा ते दुवा घेतील; व राजे लोक जो बेसुमार तनखा घेतात तो डोळ्यावर येणार नाही व त्याचे चीज केल्यासारखे होईल." काही संस्थानीक तर संस्थानी कामात मुळींच लक्ष घालीत नाहीत याबद्दल तात्यासाहेबांना अतिशय राग येत असे व फार हळहळ वाटत असे.

❋

## ह. वि. पाटसकर

**( बी. ए., एलूएलू. बी., आमदार, घटना-समितीचे सभासद, चाळीसगांव )**

( १ ) तात्यासाहेब याच्या घराण्याचा व माझा फार जुना ऋणानुबंध होता. शिवाय ते माझ्या वडिलाचे कॉलेजमधील सहाध्यायी होते. अर्थात् तात्यासाहेब याच्याविषयी मला लहानपणापासून आदर वाटे. या पूर्व ऋणानुबधामुळे आमचे सबध पक्षभेद होऊनहि अखड राहिले. महाराष्ट्रात पक्षभेद विकोपास गेल्यानतरहि ते खानदेशात चाळीसगावी आले की, मजकडेच उतरत. त्यांना या बाबतीत कित्येकानी छेडले पण त्याचे उत्तर एक। 'मी चाळीसगावी आलो की हरिभाऊं-कडेच उतरणार!' यावरून राजकीय मतभेद असले तरी ते वैयक्तिक सबधा-पासून अलग ठेवण्याइतका त्याच्या मनाचा मोठेपणा होता.

( २ ) मी कॉन्स्टिटयूअट असेब्लीकरिता उभा राहिला त्याच्यापूर्वी मी पुण्यास गेलो होतो. मी कॉ असेब्लीला उभा राहत आहे असे मी त्याना सागितले. त्यानीहि 'जरूर उभे राहा' असे सागून मला उत्तेजन दिले. अशा रीतीने आमच्यामधील सलोख्याचे वातावरण, मतभेद होऊनहि, कधी दूषित झाले नाही.

( ३ ) १९४०।४१ साली आक्टोबरमध्ये 'सद्यःस्थिति' या राजकीय विषयावर माझे धुळे येथील [illegible] व्याख्यान ठरले होते त्या वेळी तात्यासाहेब अनायासे काही कारणाने धुळयास आले होते. व्याख्यानाच्या चालकानी केळकर यास तुमच्या व्याख्यानाचे अध्यक्ष केले तर चालेल का? असे मला विचारले. 'तात्यासाहेबाची तयारी असेल तर माझी काहीच हरकत नाही' असे मी म्हणालो. त्यानी कबूल केले. दोन भिन्न मताचे आम्ही एकाच व्यासपीठावरून बोललो पण कोणत्याहि तऱ्हेने सभेचे उदात्त वातावरण बिघडले नाही. हेच तात्यासाहेबाच्या थोर मनाचे, सौजन्याचे व समतोल बुद्धीचे द्योतक!

( ४ ) १९२३ साली मी स्वराज्य पक्षातर्फे जुन्या मुबई कौन्सिलकरिता उभा होतो तात्यासाहेब दिल्लीच्या मध्यवर्ती असेब्लीकरिता उभे होते. खानदेशा-तील प्रचार आम्ही एकत्रच केला त्याच वेळी नुकतेच सेवानिवृत्त झालेले त्याचे बधु श्री. अप्पासाहेब केळकर हेहि त्याच निवडणुकीकरिता उभे होते ते स्वतत्र म्हणून उभे होते; व एका दृष्टीने माझ्या उमेदवारीचा प्रचार हा अप्पासाहेब केळकर याच्या निवडणूक प्रचाराविरुद्ध होता; तथापि नुसती पक्षाची शिस्त म्हणून दिखाऊ नव्हे तर पक्षाच्या [illegible] तात्यासाहेबानी मनःपूर्वक माझ्या उमेदवारीकरिता पाठिंबा देणारा प्रचार केला। आमच्या सयुक्त दौऱ्यात तर एका सभेत काही श्रोत्यानी त्याना या बाबतीत सवाल केला पण त्यानी त्या सवालाला योग्य, सरळ व समर्पक उत्तर दिले

( ५ ) आम्ही बराच काळ एका पक्षात होतो व ते त्या काळांत त्या पक्षाचे पुढारी होते. त्यांच्याइतका निगर्वी, सरळस व समतोल बुद्धीचा दुसरा पुढारी माझ्या तरी पाहण्यात नाही. आम्ही एका पक्षात होतो त्या वेळी तो पक्ष काँग्रेस अंतर्गत होता. कांही कालाने त्या पक्षाचा सभासद काँग्रेसचा सभासद असलाच पाहिजे ही अट काढून टाकण्यांत आली व त्या वेळेपासून त्या पक्षाचा व माझा सबध सुटला तथापि त्यानतर ज्या ज्या वेळी आमच्या दरम्यान चर्चा झाली त्या त्या वेळीं नुसती परमतसहिष्णुताच नव्हे तर परमताचा आदरहि मला त्याच्या ठिकाणीं दिसून आला एकदा तर वादविवाद करताना मी त्याना म्हणालो, ‘ तात्यासाहेब, मला असे वाटते की, मीच माझ्या मताला चिटकून राहिलो आहे व बाकीचे सर्व आपल्या पक्षातील लोक बदलले आहेत ’ मी राजकारणात त्याच्या मानाने फार नवीन असलो तरी त्यानी माझे हे म्हणणे शातपणे व विचारपूर्वक ऐकून घेतले इतकेच नव्हे तर, त्यानी माझ्या म्हणण्याबद्दल जो आदर दाखविला तो मी केव्हाहि विसरणार नाही. कारण, आता परमताचा आदर ही गोष्ट जवळ जवळ लुप्तच होत चाललेली दिसते!



## वि. पां. करमरकर

### ( शिल्पकार, मुंबई )

( १ ) तें १९१९ साल असेल; त्या वेळी मी कलकत्ता येथे राहत असून धद्यात सुरुवातीचे पाऊल टाकीत होतो त्या वेळचे कलकत्त्याचे महाराष्ट्रियन श्री नानासाहेब ढवळे वगैरे मडळीचा माझ्यावर अत्यत लोभ होता त्यामुळे तात्यासाहेब याची व माझी भेट झाली. तात्यासाहेबानी प्रथम भेटीतच माझ्या स्टुडिओत येण्याचे कबूल केले व आले. चित्र व शिल्पकलेसबधी अनेक तऱ्हेचे प्रश्न त्यानी विचारले व ते अगदी आ[illegible]णान विचारल्यामुळे मला त्याची उत्तरे देता आली व कलेसबधीहि बरेच बोलता आले त्यावर तात्यासाहेब म्हणाले, “ हे तुम्ही आता जे बोलला ते सारे लिहून का नाही काढीत ? लिहून काढा, मी ते केसरीत देतो. ” मी म्हटले, “ मला लिहिण्याचा सराव नाही, त्यामुळे ते होणार नाही ” ते म्हणाले, “ ही तुमची गैरसमजूत आहे ज्याच्याजवळ काही विचार आहेत त्याला ते लिहिता येतात तुम्ही प्रयत्न करून पाहा ज्याला शिकायची इच्छा असेल त्याने शिकायला लागावे, म्हणजे त्याचे स्वत.चे शिकून होते ” मला ते खरे वाटले नाही, इतकेच नव्हे तर हे असे कसे सागतात याचे आश्चर्य वाटले जाताना पुन्हा म्हणाले, “आळस करू नका लवकर लिहून धाडा.” त्याच्या उपदेशाप्रमाणे मी धीर करून लिहिलें व त्यांच्याकडे धाडून दिलें ते तात्यासाहेबानी केसरीत प्रसिद्ध केले ! मला

त्यामुळे धीर आला व तात्यासाहेबासबधी आदर वाढला तेव्हापासून मी लिहायला लागलो त्याला कारण तात्यासाहेब आहेत. त्याच्याकडून उत्तेजन मिळालें नसते तर माझी धास्ती दूर झाली नसती व लेखणी मीं कधीच हातात घेतली नसती.

( २ ) ते १९३५ साल होते तात्यासाहेबाना माझ्या घरी सासवण्याला येऊन मला सिटिंग द्याल काय अशी पत्र लिहून विनती केली त्यानी ताबडतोब लिहून कळविलें की, जरूर येईन त्याप्रमाणे ते आले, सिटिंग दिले, बस्ट पुरा केला त्या निमित्त ते माझ्या घरी तीन दिवस होते तिन्ही दिवस काम करताना व इतर वेळी मोकळेपणाने बोलण्याची मुभा मिळाली व ती त्यानी दिली मी म्हटले ' तात्यासाहेब, लोकमान्याच्या पाठीमागे महाराष्ट्र म्हणजे आपण व कृष्णाजीपत खाडीलकर हाच महाराष्ट्र आम्ही समजत होतो; परतु राजकारणात महाराष्ट्राला अर्थात् आपणा दोघाना असावे ते स्थान राहिले नाही किंवा टिकले नाही याचे कारण काय? आम्हांला वाटते आपल्या व कृष्णाजीपताच्या मतभेदामुळे ही स्थिति आली त्यावर तात्यासाहेब म्हणाले, " मतभेद हे खरे कारण नव्हें. खरे कारण असे-लोकमान्याच्या कालात राजकारण सुशिक्षित वर्गातच होते. आता ते अशिक्षित वर्गात पोहोचले आहे महाराष्ट्राने आम्ही पुढारी असून, आम्हाला निवडणुकी जिकणें अशक्य झाले, हे खरे, याचे कारण निवडणुकी हे पैशाचे काम होऊन बसले आहे ते आम्हा महाराष्ट्रियाना अवघड झाले कॉग्रेस ज्याच्या हातात गेली त्याना पैशाचे पाठबळ भरपूर होते व आहे आम्हाला विरोधी प्रचार करावयाचा तरी पुण्याहून सोलापूरला जावयाचे म्हटल्यास पैशाची व्यवस्था नाही उलट कॉग्रेस-वाले वाटेल तेव्हा विमानानें धावले तरी त्याना पैशाची भरपूर मदत मिळावयाची अशिक्षिताची मते विकत घेता येतात व ते फक्त त्यानाच शक्य आहे. यामुळे महाराष्ट्र पुढे राहू शकला नाही कृष्णाजीपत कॉग्रेसला धरून राहिले तरी ते पुढारी होऊ शकले नाहींत, याचे खरे कारण हेच आहे."

( ३ ) आम्ही सासवनेकरानी गु रामजी लक्ष्मण घरत याचा ८१ वा वाढ-दिवस साजरा करण्याचे ठरविलें. ते १९३४ किंवा १९३५ साल असेल. तात्यासाहे-बाच्या अध्यक्षतेखाली जाहीर समारभ करावा, असें सर्वाच्या इच्छेनुरूप ठरले त्याप्रमाणे तात्यासाहेबाना आमत्रण दिले त्यानी आनदान स्वीकार केला. ठरलेल्या दिवशी मी तात्यासाहेबाना बोटीने घेऊन जात होतो बोटीत अनेक मडळी त्याच्याभोवती जमली तात्यासाहेबानी आम्हाला विचारले, घरतांची घरची व चरितार्थाची स्थिति कशी आहे? मीं सागितले, स्थिति चागली नाहीं. त्यांना महिना १५-२० रुपयाची जरूरी आहे व ती मदत आम्ही सासवन्यातली तीनचार मडळी करू शकूं त्यावर तात्यासाहेब म्हणाले, " हे पाहा, असे करू नका. प्रत्येकाची इच्छा असली तरी काल बदलत असतो, परिस्थिति बदलत असते,

सर्वांच्याच हातून वचनें दिलेली पुरी होऊ शकत नाही. म्हणून जी काय घरतांच्या चरितार्थाची सोय करावयाची असेल ती याच समारभाच्या वेळी करा व रकम उभी करून ती बँकेत ठेवा व जरूर तेवढे दर महिना त्याना देत जा. जर आजच्या समारभात तशी योजना जाहीर करीत असाल तर माझे २५० रु. जाहीर करा ते मी धाडून देईन " या स्फूर्तिदायक भाषणामुळे त्याच वेळी बोटीत " घरत-पर्स-फड " जमविण्याचे ठरले काही मडळींनी तेथेंच आकडे घातले. सासवन्याला गेल्यावर " घरत-पर्स-फड " समिति तात्यासाहेबाच्या सल्ल्या-प्रमाणे नेमली व समारभांत ती योजना जाहीर झाली. समारभ पुरा झाला फड १५०० रु. जमला; व दर महिन्याला जरूर ते रुपये घरताना मिळाले व त्याना चागली मदत झाली योजकस्तत्र दुर्लभः



## गंगाधर रघुनाथ भडभडे

### ( बी. ए , एलूएलू. बी., माजी सबजज्ज, सागली )

( १ ) तात्यासाहेब याची मनःप्रकृति तर्कप्रधान असल्यामुळे त्याचा अतीद्रिय ज्ञानावर आधारलेल्या गूढ शास्त्रावर फारसा विश्वास नव्हता. या अतीद्रिय दृष्टीवर आश्वासून डॉ बेझट यानी बाल कृष्णमूर्ति याच्या जागतिक गुरुत्वाच्या भूमिके-बद्दल घोषणा केली त्या बाबतीत १९१२ साला तात्यासाहेबानी ' अवतार-कृत्याचा पोरखेळ ' या ३।७।१९१२ च्या केसरीत एक झणझणीत टीकालेख लिहिला पुढे १९३८ साली कृष्णमूर्ति पुण्यास आल्यावेळी त्याच्याशी तात्यासाहेबाचा वाद झाला होता. त्यात मतभेद झाला असला तरी कृष्णमूर्तीचा स्वतत्र बाणा व मौलिक विचार पाहून डॉ. बेझट याचा त्याच्याबद्दलचा कयास अगदीच चुकलेला नव्हता असे तात्यासाहेबानी प्रांजलपणाचे उद्गार काढले.

( २ ) बेझट जन्मशताब्द-उत्सवानिमित्त त्याच्या स्मृतीस वाहिलेला एक विशेष अक काढण्याबद्दलची विनती एका प्रमुख स्त्री-मासिकाने ऐनवेळी नाकार-ल्यामुळे आता दुसऱ्या कोणच्या मासिकाच्या संपादकाकडे धाव घ्यावी, अशी विवचना सुरू झाली. या वेळी ऑगस्ट १९४७ चा महिना सपत आला होता व तारीख १।१०।४७ ला बेझट विशेष अक निघण्याची आशा दुरावत चालली. अशा बिकट स्थितीत सह्याद्रि मासिकाचा आक्टोबर ४७ चा अंक बेझट विशेष अक म्हणून काढण्यास होकार देतील की नाही हे पाहावे, अशी आमच्या मडळीस कल्पना सुचली व त्या सबधाने तात्यासाहेबास विचार-ण्याचें नाजुक काम मजकडे सोपविण्यांत आलें. या वेळी ऑगस्ट महिना सपला होता. तेव्हा इतक्या उशिरा तात्यासाहेबास विचारण्याचे धाष्टर्य कसें करावे अशा

भीतीनेच मी त्याच्या घरीं गेलो व सदर गोष्टीबद्दल धिटाई करून पण कचरतच बोललो. पण अत्यत आश्चर्याची व आनदाची गोष्ट ही की, 'आता वेळ थोडा राहिला आहे, वगैरे कोणत्याहि तऱ्हेचें कारण, तें योग्य असतांहि, न सांगता व कसलेही आढेवेढे न घेता अक काढण्याचे त्यानी मान्य केले व मी जमविलेला सर्व मजकूर मागून घेतला व कम्पोझ करण्यासाठी सह्याद्रीकडे ताबडतोब पाठविला! बाकीचे लेख जमविण्यास जरूर तो कालावधीहि त्यानीं दिला; फार काय, पण आता जास्त मजकूर देण्याजोगा मजकडे शिल्लक नाही असे मी म्हणेपर्यंत मला त्यानी सवलत दिली त्या अकात बेझटबाईची चार चित्रे व ४२ पाने मजकूर आला शिवाय खुद्द तात्यासाहेबानीच आपण होऊनच एक गुणग्रहणपर असा अति सुदर मजकूर लिहिला असल्याने। हात देण्याची ही केवढी थोर वृत्ति!

(३) १ आक्टोबर १९४७ रोजीं डॉ बेझट याची जन्म-शताब्दीची जाहीर सभा योग्य तऱ्हेने कशी पार पडेल अशी चिंता मी त्याच्याजवळ व्यक्त केली तेव्हा ते म्हणाले, "तुम्हास असली कामे करण्याचा फारसा अनुभव नाही म्हणून भिणाऱ्यासारखे दिसता, पण तुम्ही काही काळजी करू नका, सर्व मजवर सोपवा सभा चागल्या तऱ्हेने पार पडेल" टिळक मदिरात ही सभा खुद्द त्याच्याच अध्यक्षतेखाली यशस्वीपणे पार पडली त्याच्या मनाच्या व अत:करणाच्या मोठेपणाचे विस्मरण आम्हा सर्व थिऑसफिस्ट मडळीना कधीहि होणे शक्य नाही व त्याच्या उदार साहाय्याबद्दल आम्ही सदैव कृतज्ञच राहू!



## चिंतामण जनार्दन गोखले

(निवृत्त शिक्षक, पुणें)

(१) लहानपणची माझी गरिबी विद्येकरिता मी पुण्यास आलो प्रथम मधुकरी मागे मधुकरीकरिता तात्यासाहेबाच्या घरी जात असे यात वेळ फार मोडे, म्हणून 'वारा'ची कास धरली या कामी तात्याची चिठ्ठी मागितली. ती त्यांनी दिली ती पाहून कोणी नाही म्हटले नाही. सर्व वार लागले.

(२) माझा मुलगा पाय मोडल्यामुळे ससून हॉस्पिटलमध्ये ठेविला होता. त्यास पाहण्यास तात्या तेथे गेले ते गेल्यामुळे आपोआप तेथील सर्व व्यवस्था चागली झाली!

(३) माझे एक स्नेही नागपुराहून आजारी म्हणून मजकडे आले. फार दिवसाचा आजार. बरे वाटेना. माझ्या घरी जागा लहान, आतां काय करावे? म्हणून तात्याकडे गेलो होऊस मर्जनला तात्यानी चिठ्ठी दिली. चिठ्ठी दाखविताच

त्यांनी त्यास आदराने ठेवून घेतले. दोन महिने राहून तो रोगी बरा होऊन आला. हे काम पैशानें होणारे नव्हते ते, केवळ त्यांच्या चिठ्ठीने झाले.

( ४ ) माझ्या मुलीची परीक्षा पास झाली. तिला नोकरी मिळावी म्हणून तात्यांच्याकडे गेलो त्यास सर्व सागितले लगेच, मुख्य अधिकाऱ्याकडे मी येतो, आताच चल असे ते म्हणाले. त्यांच्या घरी गेलो, पण ते भेटले नाहीत; म्हणून त्याना तात्यानी घरी बोलाविले व अपेक्षेपेक्षाहि जास्त माझे काम झाले असे एक ना दोन, शेकडो प्रसगी ते माझ्या उपयोगी पडले आहेत त्याच्या कृपेमुळे पुण्यात माझें जीवित सुखावह झाले आहे.



## द. वा. बरवे

( बी. ए., 'स्वदेशी'चे कार्यकर्ते, पुणे )

( १ ) लोकमान्यांच्या बहुमोल सल्ल्यावरून वकिलीचा अभ्यास सोडून मी मुबईस पदूमल ब्रदर्स नावाच्या सिंधी व्यापाऱ्याकडे कामास लागलो या कपनीचा धंदा हिंदुस्थानातील स्वदेशी कारागिरांचा माल परदेशात पाठविण्याचा होता. माझ्या मनातून लोकमान्य टिळकानी एकदा या फर्ममध्ये येऊन त्याचे काम पाहावे असे होते म्हणून मी तात्यासाहेबाना भेटन वरील इच्छा प्रदर्शित केली तावडतोब तात्यासाहेबानी मला आश्वासन दिले की, लवकरच कोलबो मार्गाने विलायतला जाण्याकरिता आम्ही मुबईस येऊ, तेव्हा टिळकाना तुमचे दुकान पाहण्यास आणतो. त्याप्रमाणे केळकरानी टिळकाना माझ्या दुकानात आणले मी आनदातिशयाने गहिवरून गेलो त्या वेळी सर्व दुकान पाहिल्यावर तात्यासाहेबाना मला आग्रहाने सागितले कीं, येथे टिकून राहा – ईस्ट इंडिया कपनीने जे काम आपल्या देशाकरिता हिंदुस्थानात केले तशा प्रकारचे काम ही फर्म आपल्या देशांकरिता परदेशी करीत आहे. कपनीच्या मालकाना [illegible] धन्यवाद दिले व म्हणाले की, तुमचे काम 'आक्रमक स्वदेशी'चे आहे म्हणून फार भूषणावह आहे. मलाहि अर्थात तेथे राहण्यास उत्साह व विश्वास वाटला यावज्जन्म तात्यासाहेबाचे उपकार मी विसरणार नाही माझे अतःकरण त्यानी काबीज कले.

( २ ) सन १९२२ साली मुबईच्या डेक्कन मर्चंटस् असोसिएशनमार्फत आम्ही मुबईस महाराष्ट्र व्यापारी परिषद भरविली व ती फारच यशस्वीपणे पार पडली परतु पुढे असोसिएशनमध्ये मतभेद होऊन दोन तट पडले व काम होईना तेव्हा कोणाला लवाद नेमून भाडणे मिटविण्याचे [illegible] ठरले व सर्वांना तात्यासाहेबावर हे काम सोपवावें असे वाटले. त्यानी ते काम कर्तव्यबुद्धीने अगिकारले व अखेर सर्वांच्या मनाला पटेल अशा रीतीने त्यानी ते फार कौशल्याने पार पाडले. पण

त्याकरितां तात्यासाहेबाना नाहक त्रास होत होता कारण उभयपक्षाचीं माणसे त्याना भेटून सतावीत व आपले म्हणणे त्याच्यापुढे माडीत पण त्यानी हा त्रास आनदाने सहन केला

( ३ ) सन १९२७ साली पुण्यास दुसरी महाराष्ट्र व्यापारी परिषद भरविण्याच्या मी खटपटीस लागलो त्या वेळी अध्यक्षस्थान कोणास द्यावे यासबधी आमच्या मडळीत वादविवाद सुरू झाला. रणे माजली एक पक्ष म्हणे तो महाराष्ट्रीयच पाहिजे दुसऱ्या पक्षाचे म्हणणे येथे लिहिण बरे नाही. अखेर तात्यासाहेबाचा सल्ला घेण्याचे ठरले आम्ही त्याच्याकडे गेलो तेव्हा तात्यासाहेब म्हणाले, "अहो, त्या विषयातील अनुभवी व तज्ज्ञ अध्यक्ष नेमा. मी सागतो की, पुण्यातील हणमतराम रामनाथ याना स्वागताध्यक्ष नेमा व वालचद हिराचद याना अध्यक्ष करा " त्याप्रमाणे आम्ही केले परिषद यशस्वी झाली.

( ४ ) याच सुमारास सेनापति बापटाच्याबरोबर एकदा मी तात्यासाहेबाच्या-कडे गेलो असना बापटाना ते म्हणाले, "आम्ही पन्नास वर्षे स्वदेशीचा प्रचार केला; पण स्वदेशी माल परदेशात विकून बरवे यानी आमच्या स्वदेशीला चढाईच्या स्वदेशीचा कोब निर्माण केला व परकीयाना भारतीय माल विकून मोठ्या पैलवानाला निदान चिमटा घेण्याचे पुण्य सपादन केले।"

( ५ ) तात्यासाहेब याच्याशी बोलताना त्याच्या तोंडून । वाङ्मयदृष्ट्या ज्या उत्तम गोष्टी येत त्यापैकी काही सुभाषिते म्हणून खाली देत आहे ते म्हणालेः—

"( १ ) अहो, पराक्रम पराक्रम म्हणजे काय? क्रमाने काम नियमितपणे करीत गेल्यास आक्रम होऊन त्यातूनच पुढे पराक्रम निर्माण होतो, म्हणून प्रत्येकाने उद्योग नियमाने करावा ( २ ) माणमान स्वार्थच करीत राहावा व तोच मत्स्यावताराच्या वृद्धीप्रमाणे वाढवीत वाढवीत विश्वव्यापी केल्यावर त्यांतूनच हेन्री फोर्डनें केला त्याप्रमाणें स्वार्थ आपोआप परार्थात व परमार्थातसुद्धा विलीन होऊ शकतो. म्हणून कित्येकवेळा स्वार्थत्यागापेक्षा स्वार्थाच्या क्षेत्राचे परीघ माणसाने उत्तरोत्तर वाढवीत न्यावे. राजा जनक व भीष्माचार्य आपापल्या क्षेत्रात इतके थोर ठरले कीं, दोघानाहि जग आतापर्यंत मानीत आले राजा जनकाने लग्न केले नसते तर ते भीष्माचार्याप्रमाणे व भीष्माचार्यानी लग्न केले असते तर ते राजा जनकाप्रमाणें चमकले असते यात शका नाहीं.



# गोविंद रामकृष्ण अत्रे

( वकील, नाशिक )

( १ ) १९१५ सालची गोष्ट इंदूर येथे महाराष्ट्र साहित्य संमेलन भरले होते व त्याच वेळी हिंदी साहित्य संमेलन म. गांधी यांच्या अध्यक्षतेखाली भरणार होते. लोकमान्य नुकतेच सुटून आले होते व १९०८ सालापासून तेथे केसरीस बंदी होती. यामुळे वरील संमेलनाच्या निमित्ताने लोकमान्यास तेथे आणावे म्हणून लोकांनी व मुख्यतः विद्यार्थ्यांनीं प्रचंड चळवळ केली. अखेर तेथील पुढाऱ्यांनी आम्हा विद्यार्थ्यांस चांगलेच चकविले. त्यांनी सांगितले की, अमुक गाडीने टिळक येणार आहेत. त्या गाडीस आम्ही लोकमान्यांचे स्वागतार्थ हजारो स्वयंसेवक स्टेशनवर हजर होतो. आम्हा विद्यार्थ्यांपैकी कोणीहि यापूर्वी लोकमान्य अथवा केळकर यांस पाहिलेले नसल्याने पुणेरी पगडी दिसताच त्या डब्याभोवती गोळा झालो. पुढारी मंडळींनी त्यांचे स्वागत केले. पण त्यांच्या बोलण्यावरून ते केळकर आहेत, लोकमान्य नव्हेत हे कळताच आम्ही सर्व विद्यार्थी वर्ग स्वागतकमिटीच्या सभासदांवर स्टेशनवरच उलटलो व बरीच धक्काबुक्की केली. हे पाहून तात्यासाहेबांना आश्चर्य वाटले व तो कठीण प्रसंग पाहून ते पुढे आले व आम्हांस शांत करून म्हणाले की, " तुम्ही लोकमान्यास पाहिलें नाही. त्यांना तुम्ही फक्त केसरीतील लेखावरून व पगडीच्या फोटोवरूनच ओळखता ना ? " आम्ही हो म्हणालो. तेव्हा त्यांनी उत्तर दिले की, " तुमची श्रद्धा त्यांच्या डोक्यावरच आहे. तेव्हा ते डोके मीं बरोबर आणलेले आहे ! कारण केसरीचा व लोकमान्यांचा प्रतिनिधि म्हणून व तुमची आवडती पुणेरी पगडी धारण करून मी आलेलो आहे. व माझा अपमान म्हणजे प्रत्यक्ष लोकमान्यांचा व पुणेरी पगडीचा अपमान होणार आहे ! तेव्हा तुमचा भक्तिभाव मी लोकमान्यांना सादर करीन. " हे भाषण इतक्या शांततेने व आपुलकीने त्यांनी केले की, आमचा सर्व राग शांत होऊन आम्ही त्यांच्या पायां पडलो. नंतर त्यांनी तेथील मुक्कामात महाराजांना भेटून केसरीवरील बंदी उठवून घेतली; त्यामुळें तर तात्यांची पुणेरी पगडी म्हणजे 'केसरी व टिळक' असे आम्ही समजत असू !

( २ ) मी मॅट्रिकच्या परिक्षेनंतर मिळालेल्या सुट्टीत एक प्रोज नाटक लिहिले व ते इंदूर येथील काही मंडळींना दाखवून सुधारणा करून घेतल्यानंतर मुद्दाम पुण्यास जाऊन तात्यांना दाखविण्यासाठीं गायकवाडवाड्यात गेलों. त्यांनी सर्व विचारपूस आपुलकीने केल्यानंतर ते प्रथम हसले. त्याचा परिणाम माझ्या मुखावर दिसताच त्यांना थोडेसे वाईट वाटले असावे असे वाटते, व मग लगेंच थोडक्यात नाटकाचा प्लॉट विचारला व त्यांतील विचाराबद्दल कौतुक केले व लगेंच म्हणाले की, " मी हे वाचून पाहीन. परंतु चार वर्षांनंतर

तुमचा बी ए चा रिझल्ट कळवाल त्या वेळीं परत करीन!" मी गोंधळलों. तेव्हा ते म्हणाले कीं, "तुमच्यासारख्या स्वतंत्र विचाराचीं माणसे आम्हांस नाटककार नकोत तर कार्यकर्ती हवी व त्यासाठीं प्रथम हे शिक्षण लवकर पुरें करून कार्यास लागा व मग फुरसती अती नाटकें लिहा." मला तें बरोबर पटलें. त्यांच्या आज्ञेप्रमाणे मी सार्वजनिक कार्यातच पडलों. ते नाटक तसेच पडून राहिलें. मीं त्यास पुढे हात लाविला नाही.

( ३ ) गेल्या साली नगर येथे तेथील नाट्यसंस्थेतर्फे एक व्याख्यानमाला सुरू केली गेली त्याचे प्रारंभीचें व्याख्यान तात्यासाहेब यांचें ठरलेले होते. त्या वेळी ते तेथे आले असताना मी त्यांना सहज म्हणालो की, आपणास कानानी बरेचसे कमी ऐकू येऊ लागलें; तेव्हा ते म्हणाले की, "ही इष्टापत्ति आहे. नाही तरी मला शिव्या दिलेल्या केव्हाच ऐकू येत नव्हत्या व चहाड्या ऐकण्याचीहि सवय नव्हतीच, पण ऐकू येते हे जाणून लोक सांगण्याचा प्रयत्न तरी करू इच्छीत होते, परंतु आता ती मुळीच भीति राहिलेली नाही व त्यामुळें अशा लोकांची तोंडे आपोआपच बंद झाली व मलाहि सहजगत्या चांगूलपणा मिळाला! प्रत्येक माणसाने ही सवय करावयास पाहिजे पण मला हे सहजगत्या प्राप्त झालें आहे. त्यात वाईट असे काहीच नाही!" वाईटातूनहि चांगले कसें काढावें व समाधानवृत्ति कशी ठेवावी ही शिकवण यातून मिळण्यासारखी आहे.



## सौ. शांताबाई ओक

( तात्यासाहेब यांची पुतणी, अमळनेर )

( १ ) तात्याच्या मागे 'आमचे तात्या' म्हणण्यात ज्या कित्येकांना अभिमान वाटतो त्यापैकीं मी एक आहे, या गोष्टीचा मला फार आनंद होतो. ते माझे सख्खे व एकुलते एक चुलते असल्यामुळे माझा त्यांच्याशी पुष्कळच सहवास होता, व ते चिकटवलेली नाती सुद्धा लक्षात ठेवून वागणारे असल्याने आमच्यासारखी घरचीच नाती ते अगदी जिव्हाळ्याने व प्रेमाने सभाळीत याचे नवल कसले! त्यांचा जीव मुलाबाळावर फार. आमची मुलीची लग्ने झाली तेव्हा वरातीच्या दिवशी तात्याच्या डोळ्याला पाणी यावयाचें! दर उन्हाळ्याला आमची पुण्याची खेप व्हावयाचीच वर्षातून एकदा तरी तात्याकडे गेल्याशिवाय आमच्या अप्पासाहेबाना कधी चैन पडले नाही. अगदी यंदाच्या मे महिन्यातसुद्धा अप्पासाहेब पुण्यास जाऊन आले माझा तर जन्मसुद्धा तात्याच्याच घरीं झालेला. पुढे जेव्हा जेव्हा तात्या आप्पासाहेबांकडे येत तेव्हा तात्याच्या स्वागताकरिता अप्पासाहेबांची जी धादल उडे त्याची मला आठवण आहे पुढे मॅट्रिकच्या परीक्षेसाठी आम्ही

पुण्याला गेलो त्या वेळी मी चागली १०।१२ दिवस तेथे होतें ते दिवस केव्हांच भरकन् गेले. तात्यंच्या घरात नेहमी राजकारणाला भर असायचा. केसरी, व्याख्याने, अध्यक्ष यांची तात्याच्या राजकारणाशी असलेल्या दाट सबंधामुळ एकसारखी चर्चा चालावयाची ता्यान्या घरी केव्हाहि गेले तरी त्यात कांही तरी नावीन्य दिसावयाचे नेहमी घराची पाडापाड व बांधाबांध चालू असावयाची ! विहिरीसमोरच्या बागेत नारळ व सुपाऱ्या याच्या झाडामधून शतपावलीसाठी सध्याकाळी तात्याच्या फेऱ्या चालू असायच्या कोणी ना कोणी टागा, मोटार घेऊन दाराशी सारखे उभे असायचे माझ्या लग्नात उखाणे वगैरे ऐकायला तात्या सर्वात पुढे ! थट्टा विनोद करणे त्याना फार आवडे पण त्यात कोणाला न बोचता थोडीशी मजा करावी एवढाच त्याचा उद्देश असायचा।

( २ ) १९२१ साली आम्ही अमळनेरला [illegible] तात्यांचे काही सार्वजनिक कार्यक्रम अमळनेरला होते म्हणून ते आले. अर्थातच ते आमच्याकडेच उतरणार होते येणार त्या [illegible] मी अगदी पाच [illegible] चहाचे आधण ठेवून त्याची वाट पहात बसले होते पण तात्या सहा [illegible] आले व लगेच दुसरीकडे जायचे होते आले ते थकलेले मी चहाचे ताट घेऊन वर जाताच ते मला म्हणाले, " हे बघ [illegible], तू घरची आहेस ना ? शिष्टाचाराचा प्रश्न नाही, पण आता मला चहा वगैरे [illegible] नको मी आता स्वस्थ विश्रांति [illegible] रात्री आल्या नतर काय देशील ते घेइन ह " मी अगदी जड [illegible] पण त्याच्या चर्येकडे पाहून खरोखरच ते थकलेले दिसले म्हणून परत गेले रात्री आल्यावर मात्र गच्चीवर गार हवेत त्यानी फराळ केला, गप्पा मारल्या त्याची आवडती दाण्याची उसळ त्यानीं [illegible] मग मला बरे वाटले तरी तेवढ्यात त्याच्या [illegible] ओळखीचे लोक आलेच गप्पा मारायला, व [illegible] व्याख्यानाचे बोलावणे येऊन पुन्हा गेलेच ते. त्याचे व्याख्यान [illegible] योग मला आला व [illegible] शेवटचाच !



## शि. वि. दामले

### ( कॅप्टन, सस्थापक, महाराष्ट्र व्यायाममडळ, पुणें )

( १ ) सन १९२४ सालची गोष्ट तात्यासाहेब हे असेंब्लीचे सभासद म्हणून सिमल्यास होते. मला व माझ्या मित्रमडळींना एक नमुनेदार व्यायामशाळा काढावयाची होती पुण्यात पुष्कळ प्रयत्न केले; परतु [illegible] मदत करीना जागा ठरविली की, प्रथम वर्षाचे भाडे मागत आमच्याजवळ एक पैसाहि नव्हता तेव्हां मी तात्यासाहेबना एक पत्र पाठविले त्यानी तबडतोब टिळकरोडवरील हल्लीच्या जागेत खेळत जा, म्हणून लिहिले जागेला काटेरी कुपण नव्हते विहिरीचे पाणी

खराब झालेले होते. पण त्यानी जें काहीं आम्हास पाहिजे होते ते सर्व आपल्या खर्चाने करून दिले त्याच्या ओळखीमुळे एका गृहस्थाने पेट्रोलपप फुकट लावून दिला. पुण्यास एक व्यायामशाळा निघत आहे, तर त्याला सर्व तऱ्हेची मदत मीं करण्यास तयार आहें असे ते म्हणत व त्याप्रमाणे त्यानी अक्षरशः तसें केले व्यायामशाळेबद्दल सरकारात कोणीतरी खोटी माहिती देऊन सरकारचें मत कलुषित केले व्यायामशाळा बद करण्यात येणार अशी विश्वसनीय माहिती एका बड्या सरकारी नोकराने तात्यासाहेबास सागितली. ते व्यायामशाळेत आले व उपाययोजनेबद्दल श्री अण्णासाहेब भोपटकर याच्याबरोबर विचारविनिमय केला शेवटी मुख्य अधिकाऱ्यास प्रत्यक्ष सस्था दाखवावी व अण्णासाहेब आणि केळकर यानी गैरहजर रहावे असे ठरले मोठे अधिकारी आले व त्यानी त्या वेळी सस्थेस उत्तम अभिप्राय दिला. दुसऱ्या दिवशी सस्था बेकायदेशीर ठरविण्याचे कागद त्याच्यापुढे आले केळकराना त्यानी बोलावले व दोघाचे बोलणे होऊन सस्थेवरील गडातर टळले !

( २ ) आम्हाला दिलेली जागा अकरा महिन्याच्या भाडेपट्टयाने दिली होती. ते म्हणत, मला भाडे देऊ नकोस, पण तूर्त मी भाडेपट्टा वाढवून देणार नाही ज्या हेतूसाठी त्यानी हे केले तो साध्य झाल्यावर येथील एक धनिक व्यापारी त्याच्याकडे ही जागा वार्षिक चार हजार रुपये भाड्याने मागण्यासाठी गेले मीहि त्याना विनती केली. तेव्हा त्यानी मला ही जागा केवळ ५०० रुपये भाड्याने ३३ वर्षाच्या कराराने दिली त्याचे व माझे हे बोलणे रात्रौ ११च्या नतर झाले व दुसऱ्या दिवशी अकरा वाजता आम्ही भाडेपट्टा सरकारात नोदविला. एकदा ठरल्यावर मग त्या गोष्टीचा निकाल केल्याशिवाय त्याना चैन पडत नसे.

( ३ ) तात्यासाहेबाना पोहण्याचा नाद फार मंडळात ते येत तेव्हा पुष्कळ वेळा विहीरीत आमच्याबरोबर पोहत असत. मडळातील पाऊणशे मुले-मुली पुरामध्ये पोहण्यासाठी मी व माझ्या सहकाऱ्यानी नेण्याचे ठरविले त्या वेळी ते मुद्दाम लकडीपुलावर आले व त्यानी प्रत्येकास सूचना देऊन प्रोत्साहन दिले मीहि तुमच्याबरोबर येण्यास तयार आहे असे ते म्हणाले; परतु आम्हीच नको म्हटले

( ४ ) १९४२ सालची गोष्ट मडळाचा पसारा वाढत चालला तेव्हा हल्लीची जागा आपणास खरेदी मिळावी अशी आम्हा सर्वांची इच्छा म्हणून मी त्यास म्हणालो, 'आपण पुण्यातील कित्येक सस्थाना जन्म दिला व त्याचे पालन पोषण केलें. त्यामध्यें आमचे मडळ हे एक आहे. तरी आम्हास ती खरेदी द्यावी.' त्याप्रमाणे ती जागा त्यानीं आम्हास खरेदीहि दिली.

( ५ ) मी लढाईवर गेलो तेथून मीं त्यास पत्र लिहिले की, येथे आमची चैन आहे खाण्यापिण्याला सर्व गोष्टी मुबलक असून मी फार आनदांत व चैनींत

आहे. त्याचें उत्तर आले की, "रणभूमीवर आहा; तेव्हां सदैव जागरूक व सावधान असावें."

( ६ ) एक दिवस ते टाऊन प्लॅनिंग कचेरीत गेले एका कारकुनाच्या टेबला-पाशी आले व म्हणाले, भाण्डारकर संस्थेजवळ अमुक प्लॉट आहे त्याची माहिती पाहिजे तो कारकून मद्रासी होता व नोकरीवर रुजू होऊन त्यास ७।८ दिवस झाले होते. त्याने विचारले, त्या जागेत तुमचा काय संबंध आहे? तात्यासाहेब म्हणाले, 'काही नाही' त्यावर तो म्हणाला, 'मग मी काही माहिती देत नाही.' त्याचा त्याना राग आला. इतक्यात पुण्यातील त्याना ओळखणारा कारकून आला व त्याने विचारले की, तुम्ही इकडे कुठे व तुम्हाला काय पाहिजे? ते म्हणाले, "सहज एका प्लॉटची माहिती विचारीत होता" त्याने आपल्या वरिष्ठ [illegible] कळ-विले की, तात्यासाहेब आले आहेत गोऱ्या साहेबाने त्याना बोलावून सन्मानपूर्वक बसविले व माहिती पाहिजे [illegible] ती देण्यासाठी त्या मद्रासी कारकुनास सांगितले हे गृहस्थ N. C. Kelkar असे समजल्याबरोबर साहेबाच्या देखतच त्या कारकुनानें त्यांच्या पाया पडून हात जोडून [illegible] तात्यासाहेबानी सरकारच्या हुकुमाची अमलबजावणी नीट केल्याबद्दल त्याला उलट शाबासकी दिली!



## महादेव अनंत भावे

( दिवाणबहादूर, निवृत्त सेशन्स जज्ज, मुंबई )

सन १९४१ मध्ये माझी कन्या चि सौ नर्मदा ऊर्फ निर्मला हिचा विवाह श्री. अप्पासाहेब केळकर यांचे चिरंजीव श्री बाळासाहेब [illegible] झाल्यानंतर पूर्वी असलेला [illegible] व माझा परिचय दृढतर होऊन त्यांच्याविषयीचा आदर द्विगुणित झाला माझी कन्या सौ नर्मदा ऊर्फ निर्मला हिने आपल्या पती-बरोबर उच्च शिक्षणासाठी अमेरिकेला जाण्याचा निश्चय केला त्या वेळी केवळ अपत्यप्रेमाने तिने परदेशी जाऊ नये असे मला वाटत होते. का तर तिला परदेशात दुखणेबाणे आल्यास कसे होईल, तिचे हाल होतील व इतक्या लांबीचा प्रवास तिला झेपणार नाही असे मला वाटे. म्हणून या कामी तात्यासाहेबाचा सल्ला घ्यावा असे ठरविले. ते आमच्या घरी आले. त्या वेळीं या विषयावर बोलणी निघाली तेव्हा ते म्हणाले, "वा! जाऊ द्या कीं, तिला काय हरकत आहे जायला! दोघेहि बुद्धीने अनुरूप आहेत पुढील [illegible]" मुला-मुलींच्या महत्त्वाकांक्षा व धडाडी यांस केवळ आपल्या अपत्यप्रेमासाठीं पायबंद घालणे योग्य नाही आपण पुढील पिढीच्या दृष्टिकोनांतूनच पाहिलें पाहिजे व अशीं मुले परदेशात गेल्याने त्याचे पुढील आयुष्य उज्ज्वल होईल यांत बिलकूल शंका

नाहीं." त्याच्या या उद्गारांमुळें माझें विरोधी मन मागे फिरलें व माझी कन्या त्यांच्या प्रोत्साहनाने अमेरिकेतील उच्चतम शिक्षण पुरे करून मिशिगन युनिव्ह-र्सिटीची डिग्री मिळवून सुखरूप परत आली या कामीं तिचे पति व श्वशुर अप्पा-साहेब याचाहि तात्यासाहेबांच्या म्हणण्यास दुजोरा होता, त्यामुळे तिच्या आयुष्याला उच्चतर वळण लागलें तात्यासाहेबाची ही आठवण मी कधींहि विसरणे शक्य नाहीं.



## बाळशास्त्री हरिदास

(साहित्याचार्य, प्रधानमंत्री, भारतीय सांस्कृतिक विद्यापीठ, नागपूर)

(१) चारपाच वर्षांपूर्वीची गोष्ट. मी काही कामानिमित्त पुण्यास आलों होतो व त्या दिवशा सध्याकाळी टिळक मदिरात श्री ज स करदीकर याच्या अध्यक्षतेखालीं "श्रीज्ञानेश्वराचा योगमार्ग" या विषयावर माझे व्याख्यान व्हावयाचें होते सकाळी काळकर्ते मामाराव दाते याच्याजवळ तात्यासाहेब याना एकवार जवळून पाहण्याची मीं इच्छा दर्शविली मामान्च्या तोंडून मीं अनेक-वार तात्यासाहेबांच्या थोरवीसबधीं ऐकले होतें व त्यामुळेंच मुख्यतः माझ्या मनांत त्याच्याविषयीं कुतूहल जागृत झाले होतें. माझी विनती मामाराव यांनी मान्य केली व आम्ही दोघे तात्यासाहेबाच्या "पुष्करिणीत" त्याना भटावयास गेलों. तात्यासाहेब खालच्याच खोलीत बसले होते औपचारिक प्रश्नोत्तरांनतर मामानी माझी तात्यासाहेबाना ओळख करून दिली व व्याख्यानाची बातमी सागितली. तात्यासाहेबांनीं क्षण दोन क्षण स्तब्ध राहून मला एकदम प्रश्न विचारला, "काय हो! टिळक, ज्ञानेश्वर व शकराचार्य यान्च्यापैकीं गीतातात्पर्य-निर्णयाच्या बाबतींत, तुमच्या मतें, कोण बरोबर आहे व कोण चुकीचे आहे?" मीं त्यावर त्यांना म्हटले, "तात्यासाहेब, माझ्या वयाच्या पचविशीची सुकती कोठे सुरवात आहे. आपण उच्चारलेली तीनहि नांवे इतकीं श्रेष्ठ आहेत कीं, यापैकी अमुक एक बरोबर व दुसरा चुकीचा असे म्हणण्याचें धाष्ट्‍र्य मी करू शकणार नाही. या महापुरुषांपैकीं कोणाचे मत व माडणी काय आहे आणि कोणाला काय म्हणावयाचें आहे असे मला विचारलें तर मात्र मला निश्चित सांगतां येईल." माझें हे उत्तर तात्यासाहेबांना इतके आवडेलेले दिसलें कीं, प्रसन्न हास्याचें चादणें आमच्यावर उधळीत तात्यासाहेब म्हणाले, "शाबास! तुमचें म्हणण मला अगदीं अंतःकरणापासून आवडलें" त्यानतर सध्याकाळच्या व्याख्यानाला तात्यासाहेब मुद्दाम उपस्थित राहिले व या प्रसगानतर जेव्हा जेव्हां त्यांच्या भेटीचे प्रसंग आले त्या त्या वेळीं त्यांनी माझ्याविषयीं फारच आस्था दाखविलेली आहे

(२) नागपूरला तात्यासाहेबानीं राजाराम लायब्ररीच्या सुवर्ण महोत्सव-प्रसंगीं जी अगदीं अलीकडे शेवटची भेट दिली त्या वेळी भारतीय सांस्कृतिक विद्या-पीठाच्या वार्षिकोत्सवाचे अध्यक्षपद त्यानी स्वीकारावे म्हणून त्याना मीं संस्थेचा कार्यवाह या नात्याने विनंती केली. तात्यासाहेबानीं आमचें निमंत्रण कार्यक्रमाची धांदल असतानाहि स्वीकारले त्याचे अध्यक्षीय भाषण सुरू होण्यापूर्वी मीं केलेल्या परिचयात्मक भाषणात संस्थेच्या शिक्षणपद्धतीविषयी माहिती सांगितली. ती लक्षपूर्वक ऐकून आपल्या भाषणाच्या प्रारंभीच तात्यासाहेब म्हणाले, " मी येथे आलो तो ही एक जुन्या एकांगी पद्धतीने आपल्या संस्कृतीचे शिक्षण देणारी संस्था असेल या समजुतीने तौलनिक शिक्षणपद्धतीचे महत्त्व सांगावयास मुख्यतः आलो; पण हरदासानीं जी माहिती सांगितली त्यावरून आता माझ्याकडे यानीं स्वीकारलेली शिक्षणपद्धति किती चांगली व उपयुक्त आहे येवढेच सांगण्याचे काम काय ते उरलेलें आहे." मला वाटते, वेगळें तात्पर्य शब्दानी न उल्लेखिता देखील माझ्या प्रत्ययास आलेली तात्यासाहेबाच्या व्यक्तित्वाची वैशिष्ट्ये या आठवणीच्या नुसत्या उल्लेखाने चाणाक्ष वाचकाच्या ध्यानात येतील



## मो. वि. रबडे

### ( आसिस्टंट मॅनेजर, पुणें सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक )

(१) तात्यासाहेब याचा आमच्या बँकेशी फार निकटचा संबध असल्यामुळे ते बँकेत वेळोवेळीं येत असत । दिवस उन्हाळ्याचे होते. उकाडा फार होता. अशा एके दिवशीं तात्यासाहेब भर उन्हाचे बँकेत आले होते त्याचा त्या वेळचा पोषाक म्हणजे पगडी, गळ्यापर्यंत गुंड्याचा कोट व साधे आखूड धोतर. आल्या-बरोबर त्यानीं माझ्यासमोरील टेबलावर आपली छत्री व पगडी ठेवली व कोटाच्या गुंड्या काढण्यास सुरवात केली सर्व गुंड्या काढून झाल्यावर मी पाहतो तों त्याच्या अंगात सदरा नव्हताच तेव्हा त्याबद्दल विचारता त्यानी त्याच्या ह्या पोषाखाची उप-युक्तता सांगितली. आमच्या बँकेच्या इमारतीचा कोनशिलासमारंभ त्यांच्याच हस्ते २३-९-१९२३ रोजी झाला त्या वेळचाहि त्याचा हाच पोषाख होता अशी त्याची साधी राहणी असे

(२) आमच्या बँकेने सेफ डिपॉझिट व्हॉल्ट तात्यासाहेब याच्याच हस्ते सुरू केला त्या वेळी त्यानी केलेल्या भाषणात ते म्हणाले होते की, " पुणें शहरात ह्या प्रयत्न कितपत यशस्वी होतो याबद्दल शंकाच आहे. कारण जनतेजवळ आता मौल्यवान् असे काहीं फारसें राहूच नये अशा पद्धतीची आपली हल्लीची राजवट आहे " नन्तर काही दिवसानी ते काहीं कामानिमित्त बँकेत आले असताना त्यानीं

प्रथम लॉकरबद्दल विचारलें तेव्हां त्यांना नवीन ३।४ लॉकर्स आणून ते सर्व खपून गेले आहेत व लॉकर्सला दररोज बरीच मागणी आहे हे सांगितले. ते ऐकून त्याना फार समाधान झालें. त्यानी कित्येक संस्थांना लॉकर्स घेण्याबद्दल शिफारस केली. त्याचप्रमाणे आपल्या कुटुंबीय मंडळीनाहि त्याचा फायदा घेण्यास लावलें.



## डॉ. कृ. न. जेजुरीकर

( चिटणीस, महाराष्ट्रीय व्यायाम-मंडळ, पुणें )

( १ ) कांही कामाकरितां तात्यासाहेबाच्याबरोबर मी सोलापूरला गेलो होतो. त्या मुक्कामात स्नानाच्या वेळी तात्यासाहेब याच्या धोतराच्या निऱ्या करून ते धोतर त्यांना द्यावे म्हणून मी माझ्या हाती त्याचे नेसावयाचे धुतलेले धोतर घेतले व निऱ्या करू लागलो त्याबरोबर तें धोतर माझ्या हातातून हिसकावून घेऊन, तात्यासाहेब मला म्हणाले कीं, धोतराच्या निऱ्या करणे हे काम डॉक्टरचे नव्हे ! शेवटी त्यांनी स्वतःच आपल्या धोतराच्या निऱ्या केल्या व ते स्नानाला गेले.

( २ ) त्याच मुक्कामात माझे स्नेही श्री पाबळकर ह्यानी आम्हा पुणेकर मडळींना मुद्दाम चहाला बोलाविले ते पुण्याचेच व तेथे इंपीरिअल बँकेत ते एक अधिकारी होते त्या वेळी हुडणावळीबद्दल सहज बोलणे निघाले असता, त्या विषबद्दल तात्यासाहेबानी एवढी त्याच्याशी चर्चा केली की, त्या विषयाची त्याची माहिती पाहून आम्ही मडळी अगदी थक्क झालो

( ३ ) १९३९ सालची गोष्ट हैद्राबाद सत्याग्रहात शिक्षा झाल्यामुळ अण्णासाहेब भोपटकर हे औरगाबादच्या तुरुगात होते. त्या वेळी त्याना भेटावयास तात्यासाहेब, डॉ सोमण, मी व रामभाऊ राजवाडे असे औरगाबादला गेलो होता तात्यासाहेबाना प्रवास सुखाचा व्हावा म्हणून आम्ही त्याचे वरच्या वर्गाचे तिकीट काढलें होतें परतु आम्ही बाकीची सर्व मडळी तिसऱ्या वर्गातून प्रवास करीत असतां, त्यानीं वरच्या वर्गातून प्रवास करणे त्याना आवडले नाही व तेहि तिसऱ्या वर्गातच आम्हाबरोबर आले तिसऱ्या वर्गातून प्रवास करणाऱ्याची वेळी-अवेळी जाहिरात करणारानी तात्यासाहेबाची ही हकीकत जरूर लक्षात ठेवावी

( ४ ) एका पानसुपारीच्या समारभात त्याची व माझी गाठ पडली मला पाहतांच 'अहो लेखक' म्हणून त्यानीं मला मुद्दाम हाक मारली व मराठ्यामध्यें माझ्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या लेखनाबद्दल मला शाबासकी दिली उदयोन्मुख लेखकाना उत्तेजन देण्याच्या कामात, तात्यासाहेब किती दक्ष असत, हे प्रसिद्धच आहे; परतु आपल्या माणसाचे कौतुक करण्याची ते किती दक्षता वाहत असत हे यावरून लक्षांत येते

( ५ ) गेल्या सप्टेंबरमध्यें प्रा. देवधर हे क्रिकेटमधून निवृत्त झाले. त्यांच्या निवृत्तीनिमित्त त्यांचा सन्मान करून त्याना निरोप देण्याचा समारभ हिंदी क्रिकेट कंट्रोल बोर्डाचे अध्यक्ष मि. डिमेलो ह्यांच्या अध्यक्षतेखालीं महाराष्ट्र क्रिकेट असोसिएशनने ठरविला होता. समारभ दुसऱ्या दिवशी सकाळी होता. आदल्या दिवशींच्या सायकाळपर्यंत मि डिमेलो हे पुण्याला आलेच नाहींत व येतात की नाहीं हे नक्की समजेना. तेव्हां अध्यक्षांची तरतूद करून ठेवणे आम्हाला जरूर होतें प्रि. दुलिपसिंह, मर्चंट वगैरे क्रिकेट-क्षेत्रातील अनेक मडळी पुण्याला आलेली होती. परतु आयत्या वेळी कोणी अध्यक्षपद स्वीकारण्यास तयार होईल किंवा नाही याची कोणास खात्री पटेना. शेवटी तात्यासाहेबाना विचारून ठेवावे असे ठरले, व हे काम मजवर सोपाविण्यात आले मी लगेच त्याच्याकडे गेलो व त्यांना सर्व हकीकत सागून आमची अडचण निवेदन केली त्यानी आमची अडचण ओळखून अध्यक्ष होण्याचे एकदम कबूल केले; एवढेंच नव्हे तर, मला आपणहून असे म्हणाले की, " जर तुमचे अध्यक्ष आयत्या वेळीं आले तर मी बाजूला बसेन " केवढी ही उदारता

( ६ ) भोरच्या राजकुमाराच्या मुजीकरिता म्हणून मी व तात्यासाहेब सरकारी खास गाडीमधून भोरला चाललो होतो गाडीमध्ये आम्हा उभयताच्या निरनिराळ्या विषयावर खूपच गप्पा झाल्या त्यामध्ये मी, महाराष्ट्रीय लोक राजकीय चळवळीत मागे पडत चालले आहेत असे त्याना म्हणालो. तेव्हा ते म्हणाले की, " महाराष्ट्र हा इतर कोणाच्याहि बरोबरीचा आहे; पण एकेका राष्ट्राचा एकेक काळ असतो ! त्याप्रमाणे आता महाराष्ट्रेतराचा काळ आहे द्रव्यबळावरच काहीची देशभक्ति शोभून दिसत आहे आणि सामान्य माणमाप्रमाणे रागलोभादि विकारानी पछाडलेल्या व हिंसेला लागणारा दुष्टपणा अगी असता तोंडच्या अहिंसावादावर जगाला भुलवू पाहणाऱ्या लोकाचें परदेशात कौतुक होत आहे ! ढोगाचा जय आहे, प्रांजलपणाचा पराभव आहे ! "



## शंकर केशव कानेटकर ( गिरीश )

( एम्. ए., प्राध्यापक, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली )

( १ ) माझे श्वशुर कै. गोविंद विनायक श्रीखंडे हे तात्यासाहेबाचे मिरज हायस्कुलांत शिक्षक व मिरजेतील एकाच वाड्यातील शेजारी १९१४ सालीं पुण्यास आल्यावर त्यानींच माझी व तात्यासाहेबाची प्रथम ओळख करून दिली त्यामुळें तात्यासाहेब मला ' मास्तरांचे जावई ' या घरगुती नात्यानेच शेवटपर्यंत ओळखीत असत ! या विशेष नात्यामुळे त्यांच्याशीं माझा घरोबा वाढत गेला.

( २ ) पुढे १९१८ सालीं आम्ही पुण्यांत एक 'भारती विहार मंडळ' नांवाची वक्तृत्वाची सस्था स्थापन केली होती या मडळात दा. वि. गोखले, वि. म भट प्रभृति व्यक्ति व्याख्यानें देऊन गेल्या होत्या. तेव्हां तात्यासाहेबाचे एकादे व्याख्यान करवावे म्हणून मी व माझे स्नेही श्री. शकरराव कुलकर्णी त्याच्याकडे निमत्रणासाठी गेलो सकाळचे टपाल नुकतेच आले होत; व तें फोडून वाचण्यात ते गर्क झाले होते शिवाय त्या वेळी इतर राजकीय कामातहि ते फार गुतलेले होते आम्ही भीत भीत माडीवर गेलो व शकररावानीं त्याना मडळाचे निमत्रण दिले त्याबरोबर अत्यत स्पष्ट व खणखणीत शब्दात त्यानी नकार दिला खरे म्हणजे त्याच्या कामाच्या मानाने आमचे काम क्षुल्लक होतें शिवाय त्याच्या जबाबदारीची जाणीवहि आम्हास यावयास हवी होती, पण तीं आली नाही म्हणून शकररावानी पुन्हा आग्रह करण्यास सुरवात केली तेव्हा तात्यासाहेब एकदम खणखणीत आवाजात, पत्रातील डोके काढून म्हणाले, " नाही ! आणि नाही म्हणजे पुन्हा नाही म्हणण्यासहि वेळ नाही ! " आम्हाला त्या वेळी वाईट वाटले, तरी त्यानी त्या वेळी केले तेंच बरोबर होतें असेच नतर वाटले !

( ३ ) त्यानतर १९२७ सालच्या पुण्याच्या साहित्य समेलनाचे ते स्वागताध्यक्ष व मी चिटणिसापैकी एक म्हणून त्याच्याबरोबर काम करण्याचा मला योग आला समेलनाध्यक्ष कै. तात्यासाहेब कोल्हटकर होते त्यामुळे दोघाचे सवाद व कोट्या-प्रतिकोट्या कशा चालत ते मला अगदी जवळून पहावयास मिळाले. या सर्व संमेलनानतर माझ्या मनावर त्याच्या व्यक्तिमत्वाची जी एक छाप कायमची बसली आहे ती ही की, एकादे काम हाती घेतल्यानतर ते शिस्तवार कसें पार पाडावे हे तात्यासाहेबापाशीच शिकावे

( ४ ) एकदा मुबईस दादरच्या 'ब्राह्मण-सेवा-सघात' तात्यासाहेबाचा सत्कार होता. त्याच वेळी माझें काव्यगायनहि ठेवलेले होते. सभेला सुरवात माझ्या काव्यगायनाने झाली थोड्या कविता म्हटल्यानतर मी थाबलो; इतक्यात तात्यासाहेब आले व्यासपीठावर त्याच्या शेजारी बसून कविता म्हणण्यास मला जरा सकोच वाटू लागला पण थोडा धीर धरून मी माझी 'तेढ' कविता म्हणण्याचे ठरविले. प्रस्तावनेत " पतिपत्नीचे भाडण होऊन अबोला सुरू झाला म्हणजे निरपराधी स्त्रीला काय वाटते " हे सागून मी कविता म्हटली कविता अत्यत परिणामकारक झाली पण ती सपते न सपते तोच तात्यासाहेब एकदम मोठ्याने उद्गारले — " मग त्यांत पतीने काय उत्तर दिले ? " त्याबरोबर जो हशा पिकला तो अवर्णनीय होता माझ्या कवितेपेक्षाहि तात्यासाहेबाच्या त्या समयस्फूर्त सहजोद्गाराची श्रोतृसमाजास फारच मौज वाटली.

( ५ ) एकदा तात्यासाहेब आमच्याकडे फराळास आले होते. पुण्यातील काही

प्रतिष्ठित मंडळी व फर्ग्युसनमधील काही प्राध्यापकहि आले होते. थोडी करमणूक म्हणून माझा मुलगा चि. मधु यास मी एक-दोन गाणीं म्हणावयास सांगितलीं. तीं तात्यासाहेबास इतकी आवडली की, त्यानीं मला ताबडतोब सांगितले, "याला गायन शिकवा व याच धंद्यात त्याला पुढे जाऊं द्या " ते त्यांचे शब्द मला व चि. मधूला फार प्रेरक वाटले व त्याने पुढे तोच पेशा पत्करला. पण तेव्हापासून शेवटपर्यंत भेट झाली की, प्रत्येक वेळी मधूची प्रगति कोठवर झाली आहे याची ते न चुकता चौकशी करीत.

( ६ ) अगदी परवा म्हणजे गेल्या जूनमध्ये माझ्या एका पुतण्याच्या लग्नाचे निमंत्रण देण्यास मी त्यांच्या घरी माझ्या बंधूसह सपत्नीक गेलो होतो. मी व माझे बंधु माडीवर गेलो व त्यांना निमंत्रण दिले त्यांनी निमंत्रण स्वीकारलें व त्यांना काय वाटले कुणास ठाऊक, मला एकदम म्हणाले, "हे पाहा, आता पुन्हा याल त्या वेळी तुमची पत्नी व मुले यांना घेऊन या मी त्यांना पाहिले त्याला फार दिवस झाले !" तेव्हा मी म्हटले, "माझी पत्नी खाली आली आहे !" त्याबरोबर तात्यासाहेब एकदम उठले व लगबगीने जिना उतरून खाली आले माझ्या पत्नीने नमस्कार करतांच त्यांना मिरजेच्या घरातील आठवणी होऊन त्यांचे डोळे एकदम पाणावले ! नंतर कुशल प्रश्न विचारून आमचे सर्व दृष्टींनीं स्वास्थ्य आहे हे ऐकून त्यांना आनंद झाला. तात्यासाहेबांची ती लगबग, ती आतुरता, तें औत्सुक्य पितृतुल्य होते त्यामुळे तात्यासाहेब गेले हे ऐकताच 'आपल्या घरचे एक पितृतुल्य छत्र गेले !' असे आम्हास वाटल्यास नवल काय ?



## मारुती सादू सरपाटील

( केसरी-मराठा ग्रंथशाळेंतील शिपाई, पुणे )

( १ ) तात्यासाहेब हे ज्याप्रमाणे आकाशातील तारकागणात चंद्रमा शोभतो त्याप्रमाणे ते आपल्या शीतल प्रभेने सर्वांना शोभवीत आणि आनंदवीत होते त्या सत्पुरुषाची आठवण केव्हाहि माझ्या हृदयातून जावयाची नाही त्यांना गरीब-श्रीमंत यांच्यामध्ये भेदभाव नव्हता मालक व नोकर यात ते मनाने व वर्तनाने अंतर मानीत नसत मी केसरी ऑफिसमध्ये कामाला १९४४ मध्ये लागलो १९४५ साली त्यांच्याकडे जावयास सुरवात झाली पण मला आतापर्यंत चुकूनसुद्धा त्यांनी कधीं एक शब्दहि वाईट वापरला नाही माझें काम चुको अथवा न चुको, मला एका शब्दाने ते बोलले नाहीत. त्यांच्या गुणाचे स्मरण होऊन माझं हृदय भरून येत आहे

( २ ) १९४६ सालात माझ्या भावाचे लग्न निघालें असता, माझ्या भावाला पैशाची जरूर लागली. तेव्हा माझ्या तोंडातून शब्द बाहेर पडताच तावडतोब तात्यांनीं सांगितले, " बरें; बाळ, तू काही काळजी करू नको; उद्या ये, मी तुझी इच्छा पूर्ण करीन. " ' लगेच दुसऱ्या दिवशी मी व माझे बंधु त्यांच्याकडे गेलो असता " काय बाळानो, आलात ? " असें प्रेमळपणाने बोलले व ' या आत, बसा ' असे सांगितलें व तावडतोब चेक देऊन मला व माझे बंधु याना काळजींतून मोकळे केले

माझ्या चुलत बंधूच्याकडून माझे तीनशे रुपये येणे असतांनाहि ते माझे मला तावडतोब मिळाले नाहीत. पण तात्यासाहेबांच्या दीडशे रुपयाची मला किंमत करता येणार नाही असा उपयोग झाला कारण ती वेळ तशीच आणीबाणीची होती. चेक देताना ते म्हणाले, " बाळानो, चांगल्या रीतीने चाला व चांगल्या रीतीने वागा म्हणजे ईश्वर तुमचे कल्याण करील " पुढे काही दिवसांनी त्यानी सांगितले, " बाळानो, तुम्ही गरीब आहात तरी मला दरमहा पधरा रुपयाचा हप्ता दिला तरी चालेल, म्हणजे दहा महिन्यात रकम फिटेल " त्याप्रमाणे आम्ही त्याना दिले व शेवटच्या महिन्यास हार, गोटा, नारळ व पानसुपारी नेली असता ते म्हणाले, " बाळानो, तुम्ही येवढा खर्च कशाला केलात ? तुम्ही गरीब आहात. " तेव्हा आम्ही म्हणालो, ' तुम्ही बिन-व्याजी पैसे दिले असता आम्हाला फार आनंद झाला व आमच्यावर फार उपकार झाले. कारण तुम्ही आमच्यावर वेळ आलेली दूर केली. म्हणून अंतःकरणातून ही इच्छा झाली " मग त्यानी ते मान्य केले आम्ही निघताना त्यानी आम्हाला पाच रुपये खाऊ म्हणून बक्षिस दिले!

( ३ ) ता १४-१०-४७ रोजी हा अष्टपैलू हिरा हरपला असे माझ्या बंधूच्या तोंडातून शब्द बाहेर पडताच माझे हृदय भरून आले मी माझ्या बंधूना म्हणालो, " तुला अंत्यदर्शन झाले किंवा नाही ? " कारण मी त्या वेळी गावाला गेलो होतो मला दर्शन घडले नाही याचे मला वाईट वाटून अंत:करण भरून येतें तात्यासाहेबां सारखे मालक मिळणार नाहीत. ते दृष्टिआड गेले, पण सृष्टिआड आहेत. त्यांची मूर्ति गेली, कीर्ति उरली ! मरावे परी कीर्तिरूपे उरावे !



## भास्कर बहिरो महाबळ

( बी. ए., एलूएलू. बी., माजी न्यायमंत्री, जमखंडी )

( १ ) सन १९२३ सालीं तात्यासाहेब येथे आले असता त्यांचे जाहीर व्याख्यान झाले. प्रारंभीं येथील प्रमुख पुढाऱ्यानें तात्यासाहेबांचे गुणवर्णन कर-

त्यांना असें सांगितले की, तात्यासाहेबांच्या सारख्या मोठ्या योग्यतेच्या गृहस्थाने आमच्या खेडेगावीं येऊन आमचा गौरव केला, हे आमच्यावर त्यांचे उपकार आहेत यावर आपल्या भाषणाच्या प्रारभी तात्यासाहेबानी सांगितले की, "मी मोठा व तुम्ही लहान असा प्रकार खरा नाही आम्ही पुण्यामुबईचे लोक वस्तुतः थोर नाहीं तुमच्या आमच्यात फरक नाही टिळकानी आम्हाला आपल्या प्रभावळीत बसविले म्हणून आम्ही चमकलो, चढलो इतकेच! पुण्यामुंबईच्या बाजारात भाजीपाला व फळफळावळ खेड्यापाड्यातूनच येते तेथें आल्यानतर त्यांची व्यवस्थित माडणी करून व त्यावर सुदर आकर्षक रगीबेरगी वेष्टने घालून तो माल विक्रीसाठी ठेवला जातो मूळचा माल खेड्यापाड्यातलाच, पण स्थानमाहात्म्यामुळे तो उठून दिसतो इतकेच अगदी तीच गोष्ट आमची. मला टिळकानी आपल्याजवळ केले म्हणून मी मोठा माझ्याऐवजी तुमच्यांपैकी कोणास त्यानी निवडलें असते तर तुम्ही माझ्याइतके किंवा अधिकच थोर ठरला असता" आहे की नाही, सौजन्य आणि मार्मिकपणा याचा सुदर सगम!

(२) मिरज येथील सरस्वती-मदिराचा उद्घाटनसमारभ होता हा समारभ तात्यासाहेबाच्या हस्ते झाला साहित्यसम्राटाच्या हस्ते हा समारभ व्हावा ही गोष्ट अत्यत उचित होय, असे आरभी स्वागताध्यक्ष म्हणाले समारभास तीनचार सस्थानिकहि उपस्थित आहेत, हे पाहून तात्यासाहेबानी सधि साधली आग या भाषणात त्यानी प्रथम उपक्रमच असा केला – "साहित्यसम्राट् हे शब्द उच्चारून तुम्ही माझी स्तुति केली हे खरे; पण ही पदवी मला नको हे दिवस सम्राटाचे नाहीत राजे–जहागीरदाराचे तर नाहीतच नाहीत. सम्राटाला आपला मुकुट लोकसत्तेच्या पायावर ठेवलाच पाहिजे असे हे दिवस आहेत. राजेलोकानी ही गोष्ट लक्षात बाळगावी; म्हणून या पदवीचा मला स्वीकार करता येत नाही, किंबहुना मला तिटकाराच वाटतो!" असा उपक्रम केल्यानतर ते पुढे म्हणाले, "आता या पदवीने माझा गौरव करण्यात तुमचे चातुर्य आहे; कारण याचा अर्थच असा की, माझी ही पदवी काढून घेणारा माझ्याहून श्रेष्ठ साहित्यिक खात्रीने निर्माण होईल असेच तुम्ही सुचवीत आहां, याबद्दल मात्र मला आनद वाटतो. ही पदवी अयथार्थ करणारे सवाई केळकर निर्माण झालेच पाहिजेत असे मीहि म्हणतो"

(३) सन १९४५–४६ साली दक्षिणेतील सस्थानिकानी समाईक हायकोर्ट स्थापन करण्याचा विचार करून त्या दिशेने प्रयत्न सुरू केले कोल्हापूरसह सर्व संस्थानिकांचे एकच हायकोर्ट असावे असा काहींचा अभिप्राय होता, तर कोल्हापूर तूर्त वगळून बाकीच्यांचेंच हायकोर्ट असावे, असे इतरांचे म्हणणे होते. या बाबतींत तात्यासाहेबांचा अभिप्राय घेण्यासाठीं पटवर्धन सस्थानांतील कांही अधि-

कारी मुद्दाम त्याच्याकडे गेले होते सर्व गोष्टी लक्षांत घेऊन कोल्हापूरचे छत्रपति समान दर्जा स्वीकारून या योजनेत सामील होणार नाहींत; सबब तूर्त त्याना वगळूनच इतरानी हायकोर्ट स्थापावे, असा अभिप्राय तात्यासाहेबानी व्यक्त केला पण त्याच वेळी त्यानी आणखी एक सूचना केली. ते म्हणाले, " गैरसमज किंवा अविश्वास उत्पन्न होऊ नये म्हणून प्रथम पटवर्धन सस्थानिकानीच एकीकरण करावे व आपले हायकोर्ट स्थापावे व नतर सोईप्रमाणे इतराना त्यात आणावे हाच प्रारभ अगदी स्वाभाविक व नैसर्गिक आहे; कारण हिंदु-कुटुब प्रथम एकत्र असते व नतर विभक्त होतें; पण विभक्त झाल्यानतरहि पुन्हा एकत्र होण्याचा मार्ग हिंदुधर्मशास्त्राने मोकळा ठेवलाच आहे तोच न्याय येथेहि लागू मूळ पटवर्धनी कुटुब व जहागीर एकच नतर विभक्तपणा आला व निरनिराळी सस्थाने झाली. आता पुन्हा एकत्र व्हा म्हणजे झालें ! हा क्रम अगदी स्वाभाविक असून इतराना मार्गदर्शकहि होईल " पटवर्धन सस्थानिकाबद्दल हा केवढा कळवळा !

( ४ ) टाइम्स वगैरे इग्रजी पत्रात मौजेचे लहान चुटके प्रसिद्ध होतात. त्यातील काहींचे रूपातर मराठीत करून पाठविल्यास 'सह्याद्री'त प्रसिद्धि मिळेल का अशी पृच्छा एका लेखकाने तात्यासाहेबाच्याजवळ केली. वस्तुतः ती कल्पना काहीं वाईट नव्हती; पण कारण काय असेल ते असो, तात्यासाहेबाना ती रुचली नाहीं. त्यानी थोडासा विचार करून हलक्या आवाजात उत्तर दिले, " छे ! असला उद्योग मी तुम्हाला करू देणार नाही कोणाकडून कोणते काम घ्यावे हे आम्हाला समजते. असले काम तुमच्याकडून करवून घेऊन तुमचे श्रम व वेळ व्यर्थ खर्ची पडावा हे मला पसत नाही. तुम्ही सह्याद्रीसाठीं स्वतत्र लेखच लिहिला पाहिजे केव्हा लिहून पाठविता बोला ? " ते गृहस्थ मोठे लेखक होते असे नाहीं; तथापि लेखाच्या बाबतींत सह्याद्रीने कोणाची उसनवारी करू नये अशा विचारानेंच तात्यासाहेबानीं हे उत्तर दिले असावें, पण स्पष्टपणे त्याना नकार न देता सहसा कोणास दुखवावयाचें नाही ही त्याची अभिजात सत्प्रवृत्ति यामुळेच असे आडवळणी उत्तर त्यानीं दिले व आपला हेतु साधला !



## अनंतदास रामदासी
### ( गोसेवक, मु. हिंगणघाट )

दिल्लीच्या मध्यवर्ती विधिमडळात ना रघुवीरसिंग यानी गोहत्याप्रतिबधक बिल आणण्याचे ठरविले होते त्यास असलेले अनुकूल लोकमत प्रकट करण्यासाठीं पुण्याच्या नागरिकाची सभा सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात भरविण्याचें

ठरलें. अध्यक्षस्थानी तात्यासाहेबांनी योजना करावी अशा विचाराने त्याना विनंती करण्यासाठीं मी गेलो. तेव्हा त्यानी म्हटले कीं, " मागच्या एका असल्या सभेस मीच अध्यक्ष होतो डॉक्टर लोहोकरेहि असेंब्लीत या वेळी आहेत, त्यांना विचारा मीच दर वेळी अध्यक्ष होण्यापेक्षा नवीन एखादा कार्यकर्ता तुम्हांस मिळाल्यास ते तुमच्या कार्यास अधिक फायद्याचे होईल त्यानी नकार दिल्यास मला कळवा मीच त्याना आग्रह करीन सध्या मी तुमच नाव सुचविले आहे एवढे त्याना कळवा. म्हणजे तुमचा कार्यभाग होइल " ... झालेहि त्याप्रमाणेच 'आपण या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारावे ' असे श्री तात्यासाहेब केळकरांचे म्हणणें आहे, एवढे शब्द ऐकताच डॉक्टरसाहेबाची संमति मिळाली!



## सीताराम विष्णु केळकर

( जमीनदार, पुणें भारत गायनसमाजाचे प्रमुख कार्यकर्ते, पुणें )

( १ ) लो. टिळक व तात्यासाहेब सन १९१९ साली विलायतेहून परत आल्यानतरची गोष्ट पुणें शहरात ठिकठिकाणी प्रत्यही सभा होत होत्या त्यापैकीं एक सभा नव्या पेठेतील चिमणबागेत कै. बाबूराव फुले यानीं भरविली होती प्रारभीं काही भाषणे झाल्यानतर टिळक बोलण्यास उभे राहिले त्याचे भाषण चालू असतानाच सभाचालकापैकी एकाने सभेत फिरून हस्तपत्रके वाटण्यास सुरुवात केली. त्यामुळे सभास्थानी बसलेली मुले व बालसदृश मनाच्या व्यक्ति याच्याकडून " अहो, इकडे द्या " अशी थोडी गडबड सुरू झाली टिळक बोलता बोलता एक-दोन वेळां क्षणभर थाबले व त्यानी हस्तपत्रके वाटणाऱ्या गृहस्थाकडे रोखूनहि पाहिले. परतु याचा अथ समजण्याइतकी बुद्धि त्या गृहस्थात अगर गडबड करणाऱ्यामध्ये नव्हती टिळकांनीं नाइलाजाने पुन्हा आपले भाषण करण्यास सुरुवातहि केली. परतु मागे बसलेल्या तात्यासाहेबाना हा प्रकार सहन झाला नाही. ते लगेच उठून त्या गृहस्थावर जवळजवळ खेकसून म्हणाले, " अहो, ती हस्तपत्रके वाटणे बद करा. भाषण चालू असताना तुमच्यामुळे गडबड होत आहे, हें तुमच्या कसे लक्षात येत नाही ? " नतर ते श्रोत्याकडे वळून म्हणाले, " विलायतेत असा प्रकार होत नाहीं. बहुतेक सभातून हस्तपत्रके वाटली जातात; परतु तीं दारावर प्रत्येकास व्यवस्थितपणें दिली जातात. त्यामुळे सर्वांस हस्तपत्रकें मिळतात व गोंगाट होत नाही. आम्ही इग्रजाजवळ स्वराज्य मागावयास जातो आणि इकडे आम्हास या साध्या गोष्टी समजत नाहीत याचा अर्थ काय ? " याहू-नहि ते दहापांच वाक्ये अधिक बोलले, किंबहुना त्यानी एक उपव्याख्यानच दिले म्हणाना. तोंपर्यंत टिळक उभेच होते. येवढा ताशेरा झाडून तात्यासाहेब खाली

बसले आणि नंतर टिळकांनीं भाषण पुढे चालू केले आता या दोन्ही थोर व्यक्ति काळाच्या पडद्याआड गेल्या आहेत. परंतु त्या सभेस जी मंडळी उपस्थित असतील त्यांच्या डोळ्यापुढे टिळक उभे आहेत आणि त्यांना जवळजवळ थांबवून केळकर लोकांची हजेरी घेत आहेत हा प्रसंग आजहि निःसंशय उभा राहील.

( २ ) तात्यासाहेब यांचे धाकटे चिरंजीव श्री. यशवंतराव हे माझे शाळेपासूनचे स्नेही. आमचे एकमेकाकडे जाणेयेणे त्या वेळीं विशेष होतें, आणि पुस्तकाबद्दल ... प्रेम दोघानाहि होते ... याच्या लक्षात ही गोष्ट आली असावी. एक दिवस मी यशवंतराव याच्याकडे गेलो असता, ज्या खोलींत आम्ही बोलत बसलो होतो तेथे तात्यासाहेब ... आले मला पाहून ते एकदम म्हणाले, " तुम्हाला पुस्तकाचा संग्रह करण्याचा नाद आहे असे अण्णा म्हणत होता तो संग्रह पाहण्यास मी एकदा येणार आहे " हे ऐकून मला आश्चर्याचा धक्का बसला माझ्याजवळ पुस्तकाचा संग्रह तो काय असणार आणि तो मी या साहित्यसम्राटाना दाखविणार काय ! माझ्या मनातील ही भीति मी लगेच बोलूनहि दाखविली. त्यानी लगेच " परवाच्या दिवशी सकाळी मला वेळ आहे " असे म्हटले त्यामुळे अत्यंत संकोचलेल्या वृत्तीनेच मीं त्याना त्या दिवशी येण्याबद्दल निमंत्रण दिले तात्यासाहेब ठरल्या वेळी आमच्या घरी आले आणि सुमारे दीड तास पुस्तकाबद्दल बोलण्यात त्यानी घालविला ! वर म्हटल्याप्रमाणे माझ्या मनास जरी अत्यंत संकोच उत्पन्न झालेला होता तरी तो दिवस माझ्या आयुष्यात अत्यंत संस्मरणीय आणि अभिमानाचा असा मी समजतो. तात्यासाहेब याच्या आणि माझ्यामध्ये वयाने, ज्ञानाने इ सर्वच बाबतीत जमीनअस्मानाचा फरक होता. परंतु आरामखुर्चीत स्वस्थपणे बसून बोलणाऱ्या तात्यासाहेबाना याची जाणीव बिलकुल नव्हती माझ्याजवळ " All quiet on the Western front " हे पुस्तक होते. ते पाहताच ते म्हणाले, " या पुस्तकाची फार प्रसिद्धि झालेली आहे. हे मी वाचावयास घेऊन जातो " काही दिवसानंतर ते पुस्तक परत पाठवून त्याच्याबरोबर त्यानी अफगाणिस्थानातील जीवनाचें चित्र रेखाटणारी दोन पुस्तके मला वाचण्याकरिता पाठविली ! ! ती पुस्तके वाचून त्याना परत देण्याकरिता मी गेलो तेव्हा ते म्हणाले, " All quiet on the Western front ' हे पुस्तक मी वाचले, परंतु मला ते मुळीच आवडले नाही. एखाद्या वेळी एखाद्या थर्ड क्लास पुस्तकालाहि भलतीच प्रसिद्धि मिळते. युरोप-अमेरिकेत हा धंदेवाईक लोकाचा उद्योगच आहे. " अफगाण-जीवनावरील त्याची पुस्तके मी वाचली किंवा नाही याचीहि चौकशी त्यानी केली, व ती पुस्तके मला कशी वाटली म्हणूनहि त्यांनी विचारले ती पुस्तकें मला आवडल्याचें सांगतांच, " तुम्हांला त्यात काय विशेष दिसलें ? " म्हणून

प्रश्न आलाच. त्याच्याबरोबर पुस्तकाच्या गुणदोषाची चिकित्सा करण्याचे धैर्य मला नसल्याने "ते काही सागता येत नाही" असे मोघम उत्तर देऊन मोकळा होण्याचा मी प्रयत्न केला परतु या उत्तराने निराळाच परिणाम झाला ! त्यांची वृत्ति लगेच नाराज दिसू लागली आणि "पुस्तके डोळसपणाने वाचली पाहिजेत, चिकित्सा केल्याशिवाय ग्रथ नुसते 'गिळून' टाकण्याची खोड नवीन पिढीत जास्त दिसते," असा शेरा मिळाला ! यानतर मात्र सत्याचा आश्रय केल्याशिवाय गत्यतर नाही असे वाटून, "त्या पुस्तकात विशेष काय आढळले ते थोडे फार सागता येईल पण ते दुसरीकडे सागता येईल, आपल्यासमोर मात्र नाही," अशी मी कबुली दिली हे प्राजळ उत्तर ऐकून मात्र तात्यासाहेब मनमोकळेपणाने हसले, आणि त्याच्या चेहऱ्यावर दिसणारी नाराजी दूर झाली

( ३ ) एका मोठ्या औद्योगिक कपनीत तात्यासाहेब डायरेक्टर होते त्या कपनीचे एक विविष्ट काम पुरे करण्याकरता कपनीने मजकडे सोपविलें होते त्याबाबत काहीं सूचना मी डायरेक्टरास दिल्या. परतु त्याचा निर्णय त्याच्याकडून लवकर येईना सबब तात्यासाहेब याच्याकडे जाऊन त्याना मी ही हकीकत सांगितली मुद्द्याचे एकदोन प्रश्न विचारून त्यानी आपली खात्री करून घेतली, आणि त्याच दिवशी दुपारी कपनीच्या डायरेक्टर-बोर्डाची सभा होती त्या वेळी कपनीत येण्यास मला सागितले. त्याप्रमाणे मी कपनीच्या ऑफिसात गेलो आणि नावाची चिठ्ठी आत त्याच्याकडे पाठविली लगेच त्यानी मला आत बोलावून घेतले आणि माझ्या सूचना बोर्डास सागण्यास सागितले माझे बोलणे सपताच तात्यासाहेब एकदम म्हणाले, "या सूचना अगदी योग्य वाटतात, आणि त्याप्रमाणे ठरविण्यास मला काहीच हरकत वाटत नाही" तात्यासाहेब याचे हे शब्द ऐकून चेअरमनसुद्धा सर्व डायरेक्टराचा एकदम निर्णय झाला, आणि ठराव सर्वानुमते नाव [illegible] मान्य झाला ! ! तात्यासाहेबाची निर्णायक शक्ति केवढी जबरदस्त होती हे त्या वेळी दिसून आलेच; परतु कोणतीहि गोष्ट अर्धवट न सोडण्याचा त्याचा कटाक्षहि प्रत्ययास आला. कारण ठराव लिहून होताच मी सुचविण्यापूर्वीच ते बोर्डास म्हणाले, "ठराव झाला, परतु येवढ्याने काम सपले नाही कपनीतर्फे मुखत्यारपत्र कोणास द्यावयाचे ते ठरवा, कामाचा नक्की दिवस नमूद करा आणि खर्चाची तरतूद करा म्हणजे काम पुरे झाले." पुष्कळ दिवस ज्या कामाच्या नुसत्या वाटाघाटी सुरू होत्या त्याचा निकाल तात्यासाहेब यानी अशा तऱ्हेने दहा मिनिटात लावला ! !

( ४ ) केळकर घराण्याचा इतिहास लिहिला जावा अशी तात्यासाहेबांची फार दिवसांची इच्छा होती त्यांना स्वतःला हे कार्य अगावर घेण्यास सवड मिळणे अर्थातच अशक्य होते. परतु त्यानीं ही इच्छा अनेक वेळा व्यक्त केली

होती सन १९४६ सालीं मी व यशवतराव केळकर यानी हे कार्य अगावर घेण्याचे ठरविले व त्याप्रमाणे मी तात्यासाहेब याना सागण्यास गेलो त्याना हे ऐकून अर्थातच फार आनद झाला यानतर केव्हाहि भेट झाली असता "कुलप्रथाचे काम कोठपर्यंत आले?" अशी चोकशी करण्यास ते केव्हाहि विसरले नाहींत. त्याच्या मृत्यूपूर्वी थोडेच दिवस अगोदर त्याची रस्त्यात गाठ पडली असता त्यानी असाच प्रश्न विचारला तेव्हा कामाचा रिपोर्ट देऊन मी त्याना म्हटले, "आपणास मुद्दाम घरी बोलावून सर्व काम एकदा प्रत्यक्ष दाखविणार आहे" तात्यासाहेब तितक्याच उत्साहाने म्हणाले, "अवश्य, कधी येऊ ते सागा. उद्या येऊ?" जमलेली माहिती निदान एकत्रित करून त्यात व्यवस्थितपणा आणल्याशिवाय त्याच्यासारख्याना मुद्दाम बोलावणे बरे नाही असा विचार मनात येऊन मी म्हणालो, "उद्याच नको. थोड्या दिवसाना मी बोलावण्यास येईन" परतु त्यानी हे काय पाहण्याचा योग नव्हता असेच म्हटले पाहिजे. त्याच्याकडून शाबासकी घ्यावी या हेतूने मी त्याना बोलावणे – विशेषतः ते "उद्या येऊ?" असे म्हणत असता – लाबणीवर टाकले, ही गोष्ट त्याच्या आकस्मिक निधनामुळ माझ्या मनास फारच लागली आहे.



## शं. वा. ऊर्फ सोनोपंत दांडेकर

### ( एम्. ए., प्रिन्सिपॉल, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें )

( १ ) तात्यासाहेब यानी अनेक सस्थाशी असलेला आपला सबध आपण सोडणार म्हणून जाहीर केले होते व त्या मागे वेगवेगळया संस्थाना त्याची पत्रेंहि गेलीं होती. वर्तमानपत्रात तात्यासाहेब आपल्या सस्थेचा सबध सोडणार हे वाचल्याबरोबर आमच्यापुढे मोठा प्रश्न उत्पन्न झाला की, आता त्याची जागा घेणारा असा लायख अध्यक्ष कोण शोधावा? तेव्हा एकदा तात्यासाहेब राहिले तर पाहावे म्हणून प्रयत्न करून बघण्याकरता माझे स्नेही कै प्राचार्य भागवत व मी त्याच्या घरी गेलो व थोडे भीतभीतच त्याना म्हणू लागलो की, आपण इतर सस्थेचे सबध जरी सोडले तरी आमच्या सस्थेचे सबध आपण सोडता कामा नये. आणि मला सागावयास आनद वाटतो की, त्यानी आम्हाला चटकन सागितले की, "अहो, डेक्कन एज्युकेशन सोसायटी व शिक्षणप्रसारक मडळ ह्या माझ्या आवडत्या सस्था आहेत. व त्याचा सबध मी सोडणार नाही." व खरोखरच देहावसान होईपर्यंत ते आमच्या मडळीच्या हरएक कामात लक्ष घालून काम करीत होते या गोष्टीवरून त्याचा अतरात्मा कोणत्या स्वरूपाचा होता हे सहज कळून येईल

( २ ) भाडारकर इन्स्टिटयूटमध्ये एका मद्रासी पडिताचे कौटिल्याच्या

अर्थशास्त्रावर व्याख्यान व्हावयाचे होते व प्रसग असा की, नियोजित तज्ज्ञ अध्यक्ष ऐनवेळीं येत नाही म्हणून तार! अशा गभीर विषयावर व्याख्यान होणार अशा प्रसंगीं ऐनवेळी अध्यक्ष कोण उभा करणार म्हणुन योजकाना काळजी वाटू लागली. ते तात्यासाहेबाच्याकडे गेले वास्तविक तात्यासाहेबाची प्रकृति आदल्या दिवशी अतिसाराच्या विकाराने फारच नादुरुस्त होती; ते घरीच पडून होते पण मडळी जेव्हां त्याच्याकडे गेली तेव्हा प्रकृति किंचित् बरी होती; व आश्चर्य हें की, मंडळींच्या आग्रहास्तव तात्यासाहेबानी अध्यक्ष होण्यास मान्यता दिली! व त्याहूनहि आश्चर्याची गाष्ट अशी की, त्यानी कौटिल्याच्या अर्थशास्त्रावर उत्कृष्ट असा जवळजवळ एक निबधच वाचला!! उपस्थित असलेला प्रत्येकजण तात्यासाहेबाच्या विद्वत्तेची तारीफ करताना दिसत होता तात्यासाहेबाची थट्टा, 'कायमचे अध्यक्ष' म्हणून केलेली आपण ऐकतो. पण सामान्य लोकाच्या लक्षांत हे येत नाही की, विविधप्रसगी अध्यक्ष म्हणून काम करण्यास [illegible] तयारी त्या थोर पुरुषाजवळ पूर्ण होती, म्हणूनच ते अध्यक्षपद [illegible] जागा विभूषित करू शकत होते. त्याच्यासारखे अनेक विषयाचा खोल अभ्यास केलेले उभ्या महाराष्ट्रांत किती सांपडतील?



## श्रीधर गणपत आचरेकर

### ( रावबहादूर, सुपरिंटेन्डेंट ऑफ पोलीस, मुंबई )

( १ ) १९३४–३५ मधील गोष्ट. तात्यासाहेब काही कामानिमित्त मुबईस आले होते ते आमच्या "देवगड एज्युकेशन बोर्ड" या शिक्षणसस्थेचे अध्यक्ष आणि [illegible]निनदार असल्यामुळे त्या सस्थेसाटी फड गोळा करण्याचा प्रश्न मी त्याच्या भेटीस गेल्या वेळी निघाला. तात्यासाहेब मला म्हणाले, "आचरेकर, तुम्ही आम्ही फड गोळा करण्याकरिता देवगड [illegible] दौरा काढू या" त्यावर मी म्हटले, "तात्यासाहेब, ठीक आहे. पण मी आहे सी आय् डी इन्स्पेक्टर नि आपण आहात प्रसिद्ध राजकीय पुढारी त्यामुळे आपण उभयता जेथे जेथे फडासाठी जाऊ तेथे तेथें लोक म्हणतील की, मी आपल्या हालचालीवर देखरेख करण्यासाठीच फिरत आहे!" तेव्हा तात्यासाहेब हसून म्हणाले, "अहो आचरेकर, हा सी. आय. डी. चा ससेमिरा माझ्यामागचा फार जुना आहे तेव्हा तुम्ही माझ्याबरोबर असल्यानें लोकाना नवा धक्का बसणार नाहीं. शिवाय तुम्ही सी. आय. डी.मधील गुन्हाशाखेत आहात व तुमचा राजकीय-शाखेशी काहीच सबध नाही हे आता सर्वांना माहीत आहे. हे शिक्षणाचे कार्य असल्यामुळे सरकारलाहि तुमच्याबद्दल सशय येण्याचे कारण नाही" हें उत्तर ऐकल्याबरोबर मी

आश्चर्यानें सर्दच झालो. कारण मी गुन्हा-शाखेत होतों ही माहिती तात्यासाहेबांना कशी व केव्हा झाली हे मला अजूनहि गूढच आहे. पुढे सन १९४६ साली सेक्रेटरी, गोगटे कालेज, रत्नागिरी, याच्याबरोबर वरील कॉलेजकरिता फंड जमविण्यासाठी देवगड तालुक्यात दौरा काढण्याचा योगायोग आला होता.

(२) सन १९४० मध्ये देवगड एज्युकेशन बोर्डाच्या कामासाठीच मी पुण्यास तात्यासाहेबाना भेटावयाला त्याच्या घरी गेलो होतों. आमचे काम आटोपल्यावर मीं त्याना प्रश्न केला, " ·।`· अस का व्हाव? कांहीं असामान्य बुद्धिमत्तेची व गाढ विद्वान् अशी माणसे काही असामान्य दुर्गुणाना पछाडलेली का आढळतात? पाहिल्या प्रतीच्या पदव्या, समाजात उच्च दर्जा असे असूनहि त्याच्यामध्ये सद्गुणाची वाढ त्या प्रमाणात का होऊ नये?" याचें उत्तर देतांना तात्यासाहेब म्हणाले, "मनुष्य जन्माला आला की तो काही सद्गुण नि कांही दुर्गुण घेऊन वाढतो सद्गुणाचे अगर दुर्गुणांचे स्फुलिंग त्याच्यात असतातच; ते त्याच्या शिक्षणाबरोबर वाढीला लागतात. म्हणून बुद्धीची वाढ झाली तरी दुर्गुणाना ती ताब्यात ठेवू शकतेच असे नाही"



## सौ. उषा सुलाखे

(बी. ए., कोविद, बार्शी)

ऐकां हो एक नवल। कोण्या दिवशी जाहल।
स्फूर्तिदेवीने उजळल। मन्मन प्रगट होवोनी॥ १॥

रम्य कल्पनाबीजांस। मनोअंगणी दिधला वास।
सिंचोनि भाव-जलास। अतर्धान पावली॥ २॥

भूमि उन्मळोन आला। अकुर नव तेजाळला।
जोपासावा कैसा भला। माझे मन नेणेची॥ ३॥

तथापि, आत्मानद-न्वारा। घालोनि प्रेमाचा उबारा।
वाढाविले कोमलाकुरा। कल्पना-वेली उभाविली॥ ४॥

एक दिन कल्पना-वेली। कन्या-रत्ना प्रसवली।
कलिका, 'कविता' नामे शोभली। तिजला पाहोनी धन्य मी॥ ५॥

हरपलें माझे भान। मनोअंगणीची खाण।
अर्पावी कोणा लागून। पूज्य चरणी कोणाच्या?॥ ६॥

ढळढळीत रश्मी गगनी। नयना दिसत असोनी।
आठवावे कांच-मणी। तेंवी गती जाहली॥ ७॥

'सह्याद्रि'-गिरि-कुहरी । करिती गर्जना 'केसरी' ।
तेथें एका 'पुण्य-मंदिरी' । 'नरसिंह' वास करी ॥ ८ ॥
'अध्यक्षा'च्या सिंहासनीं । 'विश्वस्ता'च्या बहुमानीं ।
'साहित्य'-भुजा उभवोनी । दैवत उभे जागतें ॥ ९ ॥
एका हाती काव्य-स्फूर्ति । दुज्या हाती नाट्य-युक्ति ।
तिसऱ्यांत विनोदमति । निबंधचातुरी चवथ्यात ॥ १० ॥
कोणाचेंही दुःख हरी । दोन्ही पक्षाना तुष्ट करी ।
सुवर्ण मध्याच्या स्वभावरी । मानवदेही देव हा ॥ ११ ॥
देशभक्ति प्रभा मुखावरी । विद्वत्तेचा किरीट शिरीं ।
माधुर्य वसे वैखरीं । काय तेज वर्णावे ! ॥ १२ ॥
जो कोणी भक्त आला । कधि न तया परतविला ।
करून कृपा तोषविला । कोणालाही पावतो ॥ १३ ॥
जया अंगी दिव्य-गुण । त्यास येई मोठेपण ।
मोठेपणाचा अभिमान । लवभरहि नसेल ॥ १४ ॥
ऐशा गुणाचे माहेरघर । होईल जो जो नर ।
तोच देवत्वाचा मानवर । पूजा-स्थानी शोभेल ॥ १५ ॥
ऐशा दैवताच्या पायी । कर जुळवोनि एके ठायी ।
सहजीच नमते डोई । कोणाचीही ॥ १६ ॥
म्हणून आला विचार । ऐशा देवाचे सत्वर ।
यथाशक्ति साचार । चरणकमल पूजावे ॥ १७ ॥
म्हणोन काय केले ऐका । खुडोनि कविता-कलिका ।
घालोनि कागदी-करंडका । पाठवोनी दिधली ॥ १८ ॥
राहिले नाही मज भान । कोवळी कलिका अजुन ।
होईल जैं प्रफुल्ल सुमन । ते वेळीच खुडावी ॥ १९ ॥
परि देव मनाचा दयाळू । भावभक्तीचा वेल्हाळू ।
नव-भक्ताला कृपाळू । कधिं न अंतर देईल ॥ २० ॥
मुग्ध कलिका हुंगिली । परि खिन्न मुद्रा केली ।
"कोवळिक नाही निमाली । तोच व्यर्थ खुडली का ?" ॥ २१ ॥
मजसी नेले बोलावून । भक्तिभाव निरखुन ।
टाकिली दृष्टी स्नेहपूर्ण । माता जेंवी बालका ॥ २२ ॥
असीम दिव्य-शक्तीचा । साहित्य-युक्त रसाचा ।
फिरविला कर अमृताचा । कलिकेवरून ते वेळीं ॥ २३ ॥

कलिकेचे ओठ हसले । पूर्ण पुष्प उमलले ।
सुगंधें राऊळ भरलें । दाही दिशा डोलल्या ॥ २४ ॥

नरसिंह बोलले माझ्याशीं । ऐका हो, काय त्या दिवशी ।
" पोचाल काव्याच्या मोक्षी । चिंतन जरी कराल ॥ २५ ॥

कधि न खुडाव्या ऐशा कळ्या । उमलू द्याव्या पूर्ण मोकळ्या ।
खुडतां गळाल्या पाकळ्या । खत न मनी आणावी ॥ २६ ॥

रंग उषेचे मिळवावे । नव-रसात घोळावे ।
ऐसे जल घालावे । पुष्प दिव्य लाभेल तैं ॥ २७ ॥

धुंडून साहित्यसागर । आणावा शब्द-रत्न-सभार ।
खत घालावे मुळावर । पुष्प दिव्य लाभेल तै ॥ २८ ॥

कल्पनेत कल्पना गुंफोन । करावे सुंदरसे व्यंजन ।
ऐशा व्यंजने वारा घालुन । पुष्प दिव्य लाभेल तै " ॥ २९ ॥

अमृतबोलाचे केलें प्राशन । हळूच उघडून माझे नयन ।
पाहिलें पुष्प डोळे भरून । काय प्रभा वर्णावी ॥ ३० ॥

कोणाचे जरी शंकित मन । तरी बघावें जाऊन ।
प्रचीती घ्यावी करून । लवलाही एकदा ॥ ३१ ॥

सह्याद्रीच्या राउळीं जावे । एका कोनी बघावे ।
नयन तृप्त करून घ्यावे । पुष्पप्रभा देखोनी ॥ ३२ ॥

त्याचा सुगंध ना सरला । रंग लव ना विटला ।
पाकळ्या झाल्या ना विकला । आज जणू उमललें ! ॥ ३३ ॥

मजसारख्या पामरासी । थोर मने दिधले दर्शनासी ।
कृपाहस्त ठेवोनि डोईसी । तोषविली मज बहुतची ॥ ३४ ॥

परंतु माझाचि हा पडप नव्हे । कोणीहि पुढे व्हावे ।
दर्शना त्याच्या आसवावे । तोषवीतही त्यास हो ॥ ३५ ॥

मानवदेही देव कृपाळू । महाराष्ट्राचा ममताळू ।
स्मृति-दीप त्यास ओवाळू । भक्तिभावे आजला ॥ ३६ ॥

बहुरंगी, बहुविध । कारागीर नानाविध ।
बुधजनांचा बुध । प्रणाम माझे शतशः ॥ ३७ ॥

*

## प्रभाकर नीळकंठ नवरे

(बी. एस्सी., पुणें)

(१) सकाळची ६–६॥ ची वेळ असेल तात्याकडे प्रथमच जावयास मी निघालो होतो त्या साहित्यसम्राटाकडे साहित्यप्रेमी असा मी सेवकाप्रमाणे मुजरा करण्याकरता निघालो होतो. त्या महापुरुषाशी बोलावयास मन कचरेल, मनाला सकोच वाटेल म्हणून मीच लिहिलेलें पत्र त्याना देण्यासाठी त्यांच्याकडे जात होतों. 'पुष्करिणी'तील माडीवर अगावर शाल लपेटून ही स्वारी – सरस्वतीची उपासना करीत असतानाच मी त्याच्या खोलीत – नव्हे सरस्वतीच्या मदिराच्या गाभाऱ्यात – प्रवेश केला भीतभीतच मी ते पत्र त्याच्या हातात दिले. तात्यानी ते पत्र वाचले व कुतुहलाने ते माझ्याकडे पाहू लागले

"आज माझ्या वाढदिवसाच्या दिवशी प्रथम अभिनदन करणारा तूच आहेस व ते अभिनदन करताना काही शका व प्रश्न विचारणाराहि तूच पहिला आहेस." डोळ्यावरील चष्मा काढीत सस्मित मुद्रेने ते म्हणाले. पत्र वाचून त्याना गमत वाटल्यावाचून राहिली नाही. तोंपर्यंत माझी सारी भीति व भीड केव्हाच दबली होती.

मागाहून जवळजवळ अर्धा-पाऊण तास त्यानी माझ्याशी गप्पा मारल्या. स्वतःच्या आरोग्याविषयी त्यानी चार-पाच गोष्टी सागितल्या, त्या मात्र फार मार्मिक होत्या. पण त्या गोष्टी कोणीहि शरीरशास्त्रज्ञ सांगेल. तात्याचें विशेषत्व त्यात नाही. त्यानीं आणखी एक गोष्ट आरोग्याला आवश्यक म्हणून सांगितली. आणि ती म्हणजे "लहान मुलात रमावे व त्यांच्यात खेळावें" ही होय. "लहान मुलांसमवेत वेळ घालविल्याने मन शुद्ध व आनदी होते, दुःखाचा विसर पडतो व आरोग्याला हे पोषक होते" असे ते म्हणाले.

(२) लेखनासबधी बोलताना त्यानी दोनतीन मार्गदर्शक सूचना दिल्या. ते म्हणाले, "खूप व मनसोक्त हिंडावे. पण हिडताना डोळे उघडे ठेवून हिडावे. एक वही करून त्यात जे विशेष वाटेल ते टिपून ठेवावे. निरनिराळ्या कल्पना, कोट्या टिपून ठेवाव्या विविध स्वभाव टिपावेत याचा उपयोग पुढे लेखनात फार होतो नाटके वगैरे लिहिताना मला माझ्या टिपणीचा उपयोग फार झाला."

'इतके विपुल लेखन आपण कसे केलेत?' असें विचारल्यावर ते म्हणाले, "माझ्या आयुष्यातील दिवसाची सख्या व माझ्या ग्रथाच्या पानाची सख्या पाहिली तर दिवसाला सरासरी एकादेच पान पडेल म्हणजे रोज एक एक पान लिहावयाचे असें जर ठरविले, तर प्रत्येकाला विपुल लेखन करता येईल. मात्र हौस, चिकाटी, परिश्रम करण्याची तयारी पाहिजे"

संदेश मागताच “ वरीलप्रमाणें वही करून त्यांत लिहून दाखव म्हणजे मग संदेश देईन ” असें तात्या म्हणाले !

वरील प्रसंग घडल्यानंतर दोनतीन दिवसानीच तात्यानी मला स्वतः लिहिलेली तीन पुस्तकें बक्षीस म्हणून दिलीं सम्राटाकडून आलेला नजराणा होता तो ! पुढे दोनतीन महिन्यांनीं तशी वही तयार करून त्यात कांहीं भाग टिपून त्यांना दाखविण्यासाठीं मी त्याच्याकडे पुन्हां गेलो. त्याच्या खोलीची रचना बदलली होती तेव्हां त्याबद्दल विचारताच, ‘ आपल्या जीवनात आपणच नावीन्य आणले पाहिजे ’ असें म्हणत त्यानीं माझी वही चाळिली व समाधान व्यक्त केले आता संदेश न द्यावयास कोणतीच सबब उरली नव्हती त्याच वहीत त्यानी सदेश दिला. दोन्ही बाजू मांडावयाच्या व समतोल दृष्टीने विचार करावयाचा ही जी तात्याची वृत्ति ती या लहानशा सदेशानहि लपू शकली नाही. तो सदेश असा, “ आमच्या वेळच्या विद्यार्थ्यांपेक्षा हल्लीच्या विद्यार्थ्यांची बुद्धिमत्ता अधिक खोल किंवा तीव्र आहे असे मला वाटत नाही. तथापि त्याचे जगाचे ज्ञान, त्याच्या स्वतःच्या निकट परिस्थितीचे ज्ञान, सामाजिक व्यवहार, भौतिक सुखसाधनाचा परिचय आणि उद्योगाच्या आवडी, या सर्व गोष्टी त्याना आमच्या वेळेपेक्षा अधिक लाभल्या आहेत यात शका नाही. पण त्याबरोबर त्याची जबाबदारीहि वाढली आहे. ती ते कशी पार पाडतात याकडे समाजाचे लक्ष राहणारच ”

दि १६–१०–४१ — न. चि. केळकर

( ३ ) संक्रांतीच्या निमित्ताने तिळगूळ देण्याकरता आम्ही दोघेतिघे मित्र त्याच्याकडे गेलो होतो. सध्याकाळच्या वेळी घरातील मधल्या खोलीत कोचावर तात्या बसले होते व आसपास त्याचे नात-पणतू बागडत होते, ते त्याच्याशी गप्पा मारण्यात रमून गेले होते, अशा वेळी आम्ही त्याच्याकडे गेलो व तिळगुळ देण्याघेण्याचा कार्यक्रम पार पडला पुढे १०-१५ मिनिटे हास्यविनोदात वेळ घालवून आम्हीं त्याचा निरोप घेतला ‘ लहानाशी रमावें व खेळावें ’ ही त्याच्या स्वतःच्या उक्तीची प्रचीति तर आलीच ! पण ‘ विश्वाभिरामगुणगौरवगुंफिताना । क्रोधोऽपि निर्मलधिया रमणीय एव । ( मोठ्या लोकाचा रागसुद्धा रमणीय असतो. मग त्यांचा आनद किती रमणीय असेल ) या सस्कृत उक्तीचीहि प्रचीति आल्याविना राहिली नाहीं

( ४ ) एकदा तात्यानी मला त्याचे लघुनिबधाचे पुस्तक ‘पालापाचोळा’ हे वाचावयास दिले व अभिप्राय अवश्य कळव असें सागितलें. आपल्याजवळ अभिप्राय मागितला म्हणून माझ्या अगावर मूठभर मास चढल्यासारखे मला वाटलें. काहीं दिवसानीं मी लेखी अभिप्राय त्यांना दाखविला. आवडलेल्या व न आवडलेल्या गोष्टी मी त्यात नमूद केल्या होत्या. ‘पालापाचोळा’ हें नांव कां

दिले असें विचाल्यावर ते म्हणाले, " माझे लघुनिबध पालापाचोळ्यासारखे असतात असा अभिप्राय खाडेकरानी व्यक्त केला होता. म्हणून तेंच नाव देऊन खांडेकरानाच तें अर्पण केल आहे ! जुन्या वठलेल्या वृक्षावर पालापाचोळा असणारच. पण त्यावर एकादें कोवळें, पालवीचें पान असेलच की नाही ! "

माझा अभिप्राय पाहत ते म्हणाले, " मी दुसऱ्यावर खूप अभिप्राय लिहितों. पण माझ्यावर दोष दाखविणारा अभिप्रायहि मला आवडतो. कारण त्याकरतां टीकाकाराला आपले पुस्तक वाचावे लागते. आपले पुस्तक वाचले जाणे हाहि एक आनदच आहे. लेखन करणे हा जसा एक आनद आहे तसाच ते लेखन दुसऱ्यानी वाचणें हाहि आनद नव्हे काय ? "

लघुनिबधाविषयी बोलताना ते म्हणाले, " पुष्कळाना वाटते की, लघुनिबधात माहिती वगैरे असू नये, पण मला तें मान्य नाही. लघुनिबध म्हणजे कांही बरळणे नव्हे ते माहितीने भरलेले असावे असे मला वाटते

तात्याचा हा प्राजलपणा पाहून मला आश्चर्य वाटलें " मोठा मनुष्य तोच की, जो आत्मटीका करूं शकतो व दुसऱ्यानी केलेली टीका स्वमुखाने सागण्यास कचरत नाही, " हे म्हणणेहि मला त्या वेळी पटले.

( ५ ) आमच्या आळीतील गणपति-उत्सवाच्या वेळेस एकदा तात्यानी प्रवचन केले होते. ' मोक्षाची कल्पना ' हा त्यानी विषय घेतला होता. " ज्ञान मिळवणे म्हणजेच मोक्ष मिळविणे होय ज्ञानी हे मोक्षाप्रत गेलेले असतात या मानवी आयुष्यात आपल्याला मोक्ष मिळविता येतो. मोक्ष हे काही स्थल नसून मोक्ष ही स्थिति आहे. मेल्यानतर मोक्ष मिळतो, विशिष्ट स्थान मिळते, ही कल्पना माझ्या मतें [illegible] चुकीची आहे. इहलोकीहि ही स्थिति प्रयत्नसाध्य आहे " अशाप्रकारे त्यांचें उद्बोधक व विचारप्रवर्तक प्रवचन झाले ! वरील दृष्टीने विचार करता तात्यानी ही स्थिति मिळविली होती असें विधान करावेसे वाटते.

( ६ ) तात्याच्या समयसूचकतेची व विनोदी वृत्तीची एक गोष्ट आठवते. एका सभेस माधवरावजी अणे होते अध्यक्ष व वक्ते होते तात्या. ' माझी नाटके ' हा विषय स्पष्ट करीत असतानाच तात्याना आपल्या एका नाटकाचे 'अमात्यमाधव' हे नाव काही केल्या आठवेना ! ' माधव, माधव ' म्हणत ते अडखळू लागले. ' अमात्यमाधव असेल ' असे अणे मध्येच थट्टेच्या स्वरूपाने म्हणाले ! सभेत हशा पिकला. ' मी तुमचें नाव विचारीत नाही. ' तात्या शातपणे व गभीर चेहरा करून म्हणाले ! सभेत सात मजली हशा पिकला !!



## सौ. सरोजिनी देशपांडे

( दिल्ली )

१९३७ साल अखेर मी यूगोस्लाव्हियाच्या आतरराष्ट्रीय स्त्री-संघाच्या परिषदेस जाऊन हिंदुस्थानात परत आले. युरोपमध्ये असताना वरचेवर मी केसरीमध्ये तिकडील वर्णने पत्ररूपाने लिहीत असे हिंदुस्थानात परत याल तेव्हा जरूर पुण्यास या व भेटून जा, म्हणून केसरीकाराचे मला अगत्याचे पत्र आले होतें. त्याप्रमाणे पुण्यास गेल्यानतर मी केसरी कचेरींत जाऊन, श्री. करंदीकर ह्याना भेटले आणि नतर तात्यासाहेबाना भेटावयास गेले माझ्या लेखांसबधी उत्तेजनपर किती वेळ तरी ते बोलले शेवटी ते म्हणाले, " तुमचे सारे लेख तुम्ही अवश्य पुस्तकरूपाने प्रसिद्ध करा, म्हणजे त्याला कायमचे मूर्तस्वरूप येईल," झाले. साहित्यसम्राटाकडून एका परप्रातात राहणाऱ्या व मातृभाषेची एकटीशी सेवा करणाऱ्या मला असा उपदेश व उत्तेजन मिळाल्याने किती तरी आनद झाला. आणि पडत्या फळाची आज्ञा मी मान्य केली व भीतभीतच त्यास विचारले, माझें पुस्तक झालेंच तर त्याची प्रस्तावना आपण लिहाल ना ? 'अवश्य लिहीन' असें ते लगेच म्हणाले. तात्यासाहेब गेले; पण आज ते प्रस्तावनेच्या मौक्तिकरूपाने माझ्या पुस्तकांत चिरकालीन वास्तव्य करून राहिले आहेत !



## चिंतामण विश्वनाथ पुरोहित

( तात्यासाहेबांचे उपाध्ये, आयुर्वेदभिषक्, पुणें )

( १ ) तात्यासाहेबांच्या घरातील सर्व धर्मकृत्ये वेळच्यावेळी होण्यासाठीं त्यांच्या पत्नी ( ताईसाहेब ) या नेहमी दक्ष असत. विशिष्ट तिथीच्या अगोदर तात्यासाहेबाच्या कानावर तो दिवस त्या घालीत व तात्यासाहेबहि लगेंच तो दिवस आपल्या रोजनिशीत टिपून ठेवून, त्या दिवशीं ठरलेल्या वेळी ते अगोदर दहा मिनिटें हजर असत धार्मिक कृत्य एकदा सुरू झाले म्हणजे त्या याज्ञिक वगैरे प्रयोगाकडे त्यांचे पूर्ण लक्ष असे व शेवटपर्यंत ते मधून बिलकुल हलत नसत प्रयोग चालविण्यावरून ते ताबडतोब भिक्षुकाची परीक्षा करीत असत. त्यास सस्कृत ज्ञान कमी असलेला भिक्षुक कधीच पसत पडत नसे.

वार्षिक त्या त्या महिन्यात होणारी सर्व धर्मकृत्ये ते आमच्या व त्याच्या विचाराने करीत असत. साधारण वार्षिक धर्मकृत्ये पुढीलप्रमाणे असत – रामनवमी, मत्रजागर, रामायणसप्ताह, मातापितराचे श्राद्ध, पक्ष, श्रावणी, गणेशचतुर्थी, दौहित्र श्राद्ध वगैरे असत . मनापासून ते आपली धर्मकृत्ये वेळच्या वेळी न चुकता व इतर

अनेक कामांची पाठीमागे गर्दी असतांहि व्यवस्थित करीत असत. अशा वेळीं कोणी त्यांस कांहीं कामासाठी भेटण्यास आल्यास ते त्यास दुसऱ्या वेळी बोलावीत असत त्यांच्या घरात बाराहि महिने रोज देवांची पूजा, नैवेद्य व वैश्वदेव आजतागायत अखड होत आहे. तात्यासाहेब स्नान करून श्रीरामाला फुले-तुळशी वाहून, गंध लावून व तीर्थ घेऊन नतर भोजन करीत असत. हा त्याचा नित्यनियम होता. या बाबतीत त्याच्या पत्नीची कडक शिस्त असे व ती ते आनदान पाळीत असत. गोलमेज परिषदेसाठी ते विलायतेस गेले त्या वेळी त्यांच्या सूचनेवरून त्यांना आम्ही जानवीं मत्रून दिलीं होतीं व तीं त्यांनी मुद्दाम आपल्या ट्रकेतून नेली होती! कोणतीहि धार्मिक गोष्ट करण्याचे ठरविल्यानतर ती पूर्ण श्रद्धेनें, यथासांग व कोणाचेहि मन न मोडतां ते करीत असत गेल्या पचवीस वर्षांच्या अवधींत त्याच्या घरी विवाह, मुजी, त्याच्या पत्नीचीं व्रतोद्यापने वगैरे धार्मिक कृत्ये यथासाग व उत्तम तऱ्हेने आपल्या सनातन वैदिक पद्धतीप्रमाणें झालेलीं आहेत व त्या त्या वेळी त्यांना आपल्या पत्नीच्या सहमताने, त्यास कधीहि न दुखवितां योग्य तो धार्मिक खर्च केलेला आहे. तात्यासाहेबाना वेदान्त विषयाची फार आवड होती. ते ह. भ. प. मुरूडकरबोवा याच्या कथेला मधूनमधून आपल्या पत्नीसह जात असत. तात्यासाहेबाच्या घराण्यांत श्रीरामाची उपासना त्याच्या वडिलापासून आहे. रामनवमीत रामायणसप्ताह, मत्रजागर व विशेषतः ब्राह्मणभोजन ह्या गोष्टी फार मोठ्या प्रमाणांत त्यानी आजपर्यंत केल्या. रामनवमीच्या पारण्याच्या निमित्ताने त्यांची पत्नी अनेक माणसाना महाप्रसादाला (भोजनाला) बोलावीत असत व सर्व मडळी मोठ्या प्रेमाने, निःसकोचपणाने त्यांच्याकडे नेहमी भोजनाकरिता येत असत. अशा तऱ्हेनें या घरात मोठ्या मोकळेपणाने व आनदाने आजपर्यंत हजारों माणसे येऊन जेवून गेलेली आहेत त्याचा व त्याच्या पत्नीचा (ताईचा) स्वभाव अतिशय प्रेमळ, त्यामुळे कोणालाहि ते सहज आपलेपणाने वागवीत

(२) आम्ही सस्थान भोरचे प्रजाजन आमच्यावर काही दिवसापूर्वी पाली या गांवाहून सदर सस्थानच्या हद्दीतून परमिटप्रमाणे तादूळ आणीत असता, सशयावरून पोलिसाकडून खटला भरण्यात आला. त्या वेळी तात्यासाहेब भोरच्या कार्यकारी मडळाचे अध्यक्ष होते. त्याच्या कानावर मी ही गोष्ट घातली व त्यास पटलें की, निष्कारण हा खटला भरला आहे कारण माझ्याजवळ परमिट होते. नतर सदर खटल्याची चौकशी झाली व सरकारी सर्व पुरावा झाला परन्तु त्यात एक मुद्दा मोठा मार्मिक होता, तो असा, युद्ध चालू असेपर्यंत धान्य ने-आण करण्याचे कायदे चालू राहतील व भोरच्या सरकारी गॅझेटमध्ये खुद्द दिवाणाच्या सहीने युद्ध सपल्याचे जाहीर होऊन दोन महिने झाले होते व त्यानंतर सदर खटला आमच्यावर भरला होता. हे तात्यासाहेबाच्या सूक्ष्म नजरेस येताच त्यानी

आपल्या अधिकारांत सदर खटला काढून टाकण्याबाबतचा हुकूम मॅजिस्ट्रेट यास पाठविला व आम्हांस मोठ्या काळजींतून मुक्त केलें.



## शंकर रामचंद्र वेडेकर

(बी. ए., एलूएल्. बी., वकील, कोरेगांव, जि सातारा)

१९३५ सालचा ' इंडिया ॲक्ट ' पास होऊन कौन्सिल निवडणुकीचा धमामा कमीजास्त प्रमाणात सुरू होता. लोकमान्याच्या शिष्यसप्रदायापैकी सातारचे दे. भ. भाऊसाहेब सोमण हे लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या निवडणुकीस उभे होते; त्यांचे प्रतिस्पर्धी म्हणून श्री. चोरेकर ब्राह्मणेतर पक्षातर्फे उभे होते. हिंदुसभा त्या वेळी निवडणुकीच्या आखाड्यात उतरली नव्हती. भाऊसाहेबाच्या स्नेहामुळे तात्यासाहेब, बाबुराव गोखले वगैरे मंडळी खटपटीसाठी सातारा जिल्ह्यात दौऱ्यावर आली होती. सदर पाहुणे-मंडळीचा कोरेगाव येथे निवडणुकप्रचारात्मक व्याख्यानाचा कार्यक्रम होता. पुण्यात शिस्तबद्ध व नियमबद्ध होणाऱ्या व्याख्यानाची सवय असलेल्या आमच्या पुणेरी पाहुण्यास सातारा जिल्ह्यातील दांडगट, बेशिस्त व बेताल अशा सभांचा कडवट चव त्या वेळी चाखण्याचा प्रसंग आला. सदभिरुचीचा मानभंग झालेला पाहावा लागला, हिडिस, किसळवाणी व अप्रयोजक भाषणपद्धति ऐकावी लागली. सभेतील गैरशिस्त वागणुकीमुळे व अयोग्य आणि अश्लील शब्दप्रयोगामुळे तात्यासाहेब इतके बेभान झाले कीं, ते थरथर कापू लागले, क्रोधाने लाल झाले व ब्राह्मणेतर असभ्य वक्त्यावर तुटून पडले क्षणभर वीज कडाडल्याचा भास झाला. शब्दांचा झटापट व प्रश्नोत्तरांची खडाजंगी ऐकून प्रतिस्पर्धी वक्ते अगदीं गांगरून गेले. सभेचे वातावरण एकदम भयंकर गरम व अत्यंत प्रक्षुब्ध झाले. आमच्यासारख्या तात्याच्या चहात्याना क्षणभर, तात्याचा तोल सुटला, शांतिब्रह्म असणारे तात्या आज असे कसे 'प्राकृतजन' झाले असे वाटले; परंतु प्रतिस्पर्धी प्रचारकांकडून जेव्हा अश्लील शब्दांचा पुरस्कार झालेला तात्यांनी ऐकला, नोकरशाहीची साथ करणारानी कॉंग्रेसनिंदेचा जेव्हा वर्षाव केला, त्या वेळीं तात्याची विशुद्ध-भूमिकेवर आरूढ झालेल्या कॉंग्रेसबद्दलची भक्ति उफाळली, तत्त्वनिष्ठा प्रदीप्त झाली व मान्यवरांची क्षुद्र अवहेलना ऐकून त्याची सुसंस्कृत वाणी तडित्तुल्य वेगाने आणि गुणानें कडाडली व शब्दसमर करण्यास सरसावली तात्याच्या तोंडाच्या तोफेचा तो भडिमार विलक्षण होता तात्याचे खरे महानुभावित्व यांतच होतें हे न सांगताहि वरील हकिकतीवरून कळण्यासारखे आहे.



## केशवराव गोखले

### ( बी. ए., एलूएलू. बी., माजी आमदार, बेळगांव )

तात्यासाहेब यांच्यावर तत्त्वदृष्टया मी अत्यत कठोर हल्ले केले आहेत. पण त्याचा मजवर पुत्रवत् लोभ होता मी पुण्यास आलो म्हणजे नेहमीं त्यांना भेटे. माझ्या छोट्या महाभारतरूपी जीवनांत ज्योतिष व हस्तसामुद्रिक हे एक छोटे पर्व होऊन गेलें आहे. एकाद्या विषयाचा छद लागला की, कोणाला भेटावे व कोणाचा किती वेळ घ्यावा याचें मला भान राहत नसे मी तात्यासाहेबाच्या घरी दुपारी गेलो. ते झोपले होते. मी उठवू नका म्हणून तेथील एकास सागितले. पण हे शब्द ऐकूनच ते जागे झाले ! मी त्याना काम काही नाही, तुमचा हात पाहावयाची इच्छा आहे व हस्तसामुद्रिक व तुमची कुडली पाहून तुलनात्मक अभ्यास करावयाचा आहे असे सागितले. माझा या शास्त्रावर फारसा विश्वास नाही हे तुम्हाला माहीत आहे ना, असे ते म्हणाले. ते मला माहीत आहे; पण इतर अभ्यासूच्या आड आपण येत नाहीं, ही आपली उदात्त प्रवृत्तीहि मला माहीत आहे म्हणून मी सागितले. लगेच त्यानी मला आनदाने हात दाखविला. मीहि अर्धा तास हात पाहत होतो. त्याचे ग्रह ताडून पाहत होतो याप्रमाणे एक तास तात्याचा मी घेतला चतुरस्र कार्यकर्ता, तैलबुद्धि पण समतोल प्रवृत्ति व प्रतिपक्षाच्या बाजू समजून घेण्याचा अभिजात मनोवृत्ति यांचे कारक रवि, बुध व गुरु हे तीन ग्रह प्रबळ असावेत असा माझा तर्क होता कुडलीपेक्षा “हातच्या काकणाला आरसा नको ” या म्हणीप्रमाणे हस्तसामुद्रिक हे जास्त हमखास शास्त्र आहे तात्यासाहेब याचे रवि, बुध, गुरु यांचे पर्वत उच्च, सुस्पष्ट व विशाल होते. गुरूवर चौक होता रविवर स्पष्ट रविरेषा होती. आयुष्यरेषा मोठी होती. त्याचा हात पाहून माझी शास्त्रीय जिज्ञासा तृप्त झाली. तैलबुद्धि रवीच्या रेखेवरून, लोकप्रियता गुरूच्या चौकावरून, समतोल वृत्ति व प्रतिपक्षीयाची बाजू समजून घेण्याची उच्च प्रवृत्ति बुधाच्या पर्वतावरून मला स्पष्टपणे दिसून आली. या गोष्टीला आज १५ वर्षें होऊन गेली, पण तो प्रसग काल घडल्याप्रमाणे आज माझ्या मनःचक्षूपुढे उभा आहे. नतर कर्नाटकचें राजकारण, कानडीमराठीवाद, म. गाधींचें तत्त्वज्ञान याबाबत आपले स्वत:चें स्पष्ट मत सागून त्यावर वादविवाद झाला. दोन तास मला त्यानीं दिले; व मी गाधीगटांतला व केळकरांच्यावर तोडसुख घेणारा, तरी माझ्याशी ते अपत्यप्रेमानें वागत याचीच ही आठवण साक्ष देईल. मतभेद असले तरी प्रेम असू शकतें व समतोल मन राखून माणसें जिंकता येतात हेंच मी या व इतर अनेक प्रसगावरून तात्यासाहेबांच्याकडून शिकलों.

❀

## सौ. कमळाबाई चितळे

### ( एम्. बी. बी. एस्., डॉक्टर, पुणें )

( १ ) एकदा तात्या आमच्याकडे जेवावयास आले. त्याना जेवण फार लवकर हवे असे म्हणून मीं दहालाच दोघाचीं पानें वाढली. तितक्यात इन्स्पेक्टर रेगे याच्या पत्नीची प्रकृति तपासण्याकरिता मला बोलावणे आले. झाले ! तात्याच्या हातातील घास हातातच राहिला व ते मला म्हणाले, "सर्व स्वयपाकाची भाडी आमच्यापुढे आणून ठेव व तू आधीं जा पाहू त्याच्याबरोबर" मी म्हटले, जेवणानतर त्याच्याकडे गेले तरी चालेल; पण ते रागावले व म्हणाले, 'ते तुझे पहिले कर्तव्य आहे. तू जा कशी ! तू जात नसलीस तर मात्र मी पानावरून उठून जाईन !' मुकाट्याने त्याची आज्ञा पालन करणें मला भाग पडले.

( २ ) एकदा तात्या एका व्याख्यानाकरितां सातारला जाण्याकरिता मोटार लॉरीनें शिरवळपर्यंत गेले. तेथे पाचगणीहून त्याच्याकरिता टूरिंगकार येणार होती, पण ती काही आली नाही. आम्ही शिरवळ ओलाडलें व मध्येंच आमच्या गाडीला बद पडण्याची लहर लागली दुसऱ्या गाडीकरिता निरोप पाठविणेंहि शक्य नव्हतें; व सर्व्हिसच्या सर्व गाड्या निघून गेल्या होत्या. काही तरुण मडळी खुशाल गाडींत बसून राहिली पण तात्या सर्वांच्या आधी ताडकन् उठले व त्यांच्या बरोबरच्या एका गृहस्थाना घेऊन चालू लागले ! दोन मैल चालल्यावर सुदैवाने दुसरी गाडी आम्हाला मिळाली.

( ३ ) एकदा एका व्याख्यानात कोणी त्यास म्हणाले, 'तुम्ही सर्व पोषाख स्वदेशीच घालता का ?' तेथल्या तेथेच त्यांनी आपल्या अगातला कोट मडळीना दाखवून म्हटले की, 'हा पाहा, शुद्ध स्वदेशी आहे व याच्या आत सदरा पण नाही. तेव्हा माझी काटकसर व स्वदेशीचा अभिमान तुमच्यापेक्षा जास्त साभाळला जातो.' बोलणारे गृहस्थ अगदी गप्प बसले !

( ४ ) कॉंग्रेसने पुन्हा कौन्सिलमध्ये शिरावे असे ठरविले, त्या दिवशी सध्याकाळी आम्ही तात्याच्याकडे गेलो असता मी म्हटले, 'शेवटी या लोकानी तुमचेच अनुकरण केले' त्यावर ते शातपणे म्हणाले, "चुका प्रत्येकाच्या हातून होत असतात. त्यात कोणाला नावे ठेवण्याचे कारण नाही मी कोणाच्याहि बरोबर जाण्यास, देशाचे हित होत असेल तर, केव्हाहि तयार आहे, पण मी आपली मते मात्र विकणार नाही."



## दाजी नागेश आपटे

( बी. ए., एलएल्. बी., ॲडव्होकेट, बडोदें )

( १ ) सन १९१७ साली फेब्रुवारी महिन्यात इदुरास महाराष्ट्र साहित्य-समेलनाची बैठक कै रावबहादूर आगाशे याच्या अध्यक्षतेखाली झाली. समेलनाच्या आदल्या दिवशी श्रीमत सरदार माधवराव किबे याच्या कोठीवर एक प्राथमिक सभा बोलाविण्यात आली होती त्या वेळी तेथे एकदम बातमी आली की, तात्यासाहब केळकर समेलनासाठीं इदुरास स्टेशनावर उतरल्यावर त्याना सरकारी पोलिसानी अटक केली ! हे वृत्त ऐकताच सर्वत्र खळबळ झाली. कोणी म्हणाले, त्याना अटक करून चौकीवर नेलें, कोणी म्हणाले, त्याना गावात येण्याची बदी केली ! शेवटी सरदार किबे व त्या समेलनांतील प्रमुख कार्यकर्ते व इतर पुष्कळ गृहस्थ तात्यासाहेबाच्याकडे गेले व सुमारे दोन तासानीं तात्यासाहेबासह सर्व मडळी सभास्थानी परत आली. आल्यावर तात्यासाहेबानी हसतहसतच सागितले कीं, जोपर्यंत आपली देशी सस्थानें बेजबाबदार आहेत, तोंपर्यंत असे प्रसग घडावयाचेच व राजकीय आखाड्यात उतरलेल्या दरेक व्यक्तीला हे प्रसग नित्याचेच असावयाचे ! अशा प्रकारे समेलनाला आरभी जरी विक्षेप आला, तरी पुढे मात्र त्याचे काम फार सुरळित चालले. त्या समेलनात साहित्यपरिषदेची घटना मजूर करण्यात आली. ते काम करण्यासाठीं नेमलेल्या समितींत तात्यासाहेबाबरोबर काम करण्याची मला संधि मिळाली. त्यावेळीं त्याच्या विधायक घटनाचातुर्याची, समन्वयाच्या धोरणाची व मनमिळाऊ स्वभावाची ओळख सर्वांनाच उत्तम तऱ्हेनें पटली. संमेलनाचे सर्व प्रतिनिधि एकत्र जेवावयास बसले असताना श्लोक म्हणण्याचा आग्रह सर्वांना करण्यात आला. तेव्हा तात्यासाहेबानीं तेथेच एक प्रसगोचित कविता रचून म्हणून दाखविली होती

( २ ) १९२१ सालीं बडोद्यास भरलेल्या महाराष्ट्र साहित्य-समेलनाचे अध्यक्ष तात्यासाहेब होते बडोद्याच्या सहविचारिणी सभेनें हे समेलन भरविण्याचे ठरवून त्यासाठी कार्यकारी मडळाची निवडणूक केली स्वागताध्यक्षपदी कै श्रीमत संपतराव गायकवाड यांची योजना केली व मुख्य चिटणिसाच्या जागी माझी नेमणूक झाली होती या आमच्या कार्यकारी मडळाच्या सभेत समेलनाचे अध्यक्ष कोणास निवडावे या प्रश्नाचा विचार निघाला असता असें ठरले कीं, साधारणतः महाराष्ट्रातील लोकमताचा कौल अनौपचारिक रीतीने घेऊन मग या सबधाचा निर्णय करावा. त्या सालीं पुण्याच्या भारत इतिहास सशोधक मडळाच्या वार्षिक संमलनाचे अध्यक्षस्थान कै. श्री. सपतराव गायकवाड यांना देण्यात आले होते व त्यासाठीं ते पुण्यासच गेले होते. त्या वेळेस तेथें सर्व पक्षांच्या सुमारे पन्नास विद्वा-

नाची एक सभा आम्ही बोलाविली व तींत अनौपचारिक रीतीने चर्चा करता तात्यासाहेब केळकराचीच निवड व्हावी, असें सर्वानुमतें ठरले. त्याप्रमाणे त्यानतर बडोद्यास भरलेल्या एका सभेत समेलनाच्या स्वागतमडळाने तात्यासाहेबाची निवड करून त्याप्रमाणें त्यांना कळविण्यास व त्यांना अध्यक्षीय भाषण तयार करण्याची विनती करण्याबद्दलहि कळविण्यास मला या स्वागत-मंडळाने सांगितले. त्यानंतर महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यकारी मडळाचे अध्यक्ष कै. दामोदर गणेश पाध्ये यानी मला चिटणीस या नात्याने मुबईस तातडीने बोलाविले. त्याप्रमाणे मी तेथे गेलो. त्यानीं मला सागितले की, बडोद्याच्या स्वागत-मडळानें केलेली अध्यक्षाची निवड साहित्य-परिषद मजूर करूं शकणार नाही व त्या स्थानासाठी परिषदेन एका सस्थानिकाची निवड करण्याचे ठरविले आहे ! यावरून त्या वेळी रा. पाध्याची व माझी खूप खडाजगी होऊन मी त्याना स्पष्ट सांगितलें कीं, ब्रह्मदेव खाली उतरला तरी आम्ही आपला ठराव बदलणार नाही व साहित्य परिषदेला या कामी लुडबूड करण्याचा अधिकार नाही ! या आमच्या निश्चयाप्रमाणे स्वागतसभेचे काम चालू असताच ऑगस्ट महिन्यात 'केसरी' पत्रात कै शाहूछत्रपतीच्या देशविद्रोही खटपटीचा स्फोट करण्यात आला. त्यामुळे बडोद्याच्या छत्रपतिपक्षपाती गोटातील स्वागत-समितीच्या कांही सभासदांनी मोठे काहूर उठविले व जर केळकरांची निवड अध्यक्षपदी झाली, तर श्री. सयाजीराव महाराज ( हे कै. शाहूछत्रपतीचे व्याही असल्याने ) रुष्ट होतील व ते समेलनाला हजरहि राहणार नाहींत, अशी या सभासदानी धमकीहि दिली ! श्री. सयाजीराव महाराज हे त्या वेळीं विलायतेस होते व ते समेलनाच्या अगोदर १।२ दिवसच हिंदुस्थानात येणार होते. या धमकीमुळें स्वागतमडळाचे इतरहि काही सभासद गडबडले. पण स्वागताध्यक्ष श्रीमत सपतराव भक्कम राहिल्यान हे काहूर थडावले. पुढे ठरल्याप्रमाणे सयाजीराव महाराज बडोद्यास आले व १।२ दिवसांनीच समेलनाला सुरुवात झाली. सभास्थानी सयाजीराव महाराज येऊन प्रास्ताविक विधि झाला; स्वागताध्यक्षाचे भाषण झाले व तात्यासाहेबाना सयाजीराव महाराजांनी हार घालताच टाळ्याचा एवढा प्रचड कडकडाट झाला की, त्याच्या निवडणुकीला आक्षेप घेणाऱ्या स्वागतमडळाच्या उपस्थित सभासदाची तोडेच बद झाली ! या संमेलनांतील तात्यासाहेबाचे भाषण म्हणजे सर्व अध्यक्षीय भाषणाचा कौस्तुभमणिच होय. प्रत्यक्ष समेलनाच्या खेळीमेळींत तात्यासाहेबाच्या सौजन्यानें व समन्वयी वृत्तीने त्याचे आक्षेपकहि खूष झाले !

( ३ ) सन १९२५ सालच्या पुण्याच्या वसत-व्याख्यानमालेत मी 'साहित्यानदाची उपपत्ति' या विषयावर व्याख्यान दिले. त्या प्रसगीं तात्यासाहेब अध्यक्ष होते. त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत 'सविकल्प समाधी'च्या आपल्या

उपपत्तीची अधिक फोड करून "आत्मौपम्याच्या साहाय्याने या समाधीचा अनुभव घेतां येतो" असे तिचे उपबृहण केले त्यामुळे त्या उपपत्तीला तार्किकपूर्णत्व आलें व आता ती उपपत्ति प्राचीन सस्कृत साहित्यकाराच्या रस, रीति, ध्वनि वगैरे सुप्रसिद्ध उपपत्तींच्या तोडीची मानिली जाते, हे यथार्थच होय.

( ४ ) सन १९३३ साली पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजात तेथील वाङ्मयमडळा-समोर वाडिया सभागृहांत "राष्ट्रीय उन्नतीत धर्माचे स्थान" या विषयावर झालेल्या माझ्या व्याख्यानाच्या प्रसगी तात्यासाहेबच अध्यक्ष होते त्या वेळी हिंदुधर्म म्हणजे 'वेडगळ समजुतीची एक बाधलेली मोळी' अशी जी त्याची व्याख्या त्या कॉलेजचे माजी प्रिन्सिपॉल रॅंग्लर पराजपे यांनी केली होती, ती खरी नसून धार्मिक तत्त्वाच्या अधिष्ठानाशिवाय राष्ट्राची स्थापना व त्याचे योगक्षम होणे शक्यच नाही असे प्रतिपादन तात्यासाहेबानी केले; त्या वेळचे ते विद्वत्तापूर्ण व चमकदार भाषण फार सुदर झाले होते.

( ५ ) कोण जाणे, काय योग असेल तो, पण १९२१ चे बडोद्याचे साहित्य-समेलन व त्यासाठी अध्यक्ष म्हणून तात्यासाहेब याची योजना या प्रसगाने विरो-धाचे तुफान उठावे असा सकेत ठरल्यासारखा दिसला. कारण, असाच प्रसग सन १९३४ साली दुसऱ्यादा पुन्हा आला! या प्रसगी तात्यासाहेबाना अध्यक्षस्थान देऊन योग्य व अधिकारी व्यक्तीला तेरा वर्षानतर पुन्हा एखादी मौलिक वाङ्मयिक उपपत्ति प्रतिपादण्याला अवसर द्यावा व एकाच व्यक्तीला दोन वेळा अध्यक्षपद न मिळू देण्याची अनिर्णीत प्रथा मोडावी या उद्देशानें त्याचे नाव स्वागत मडळात मीं सुचविले. परतु तत्पूर्वी येथील स्वागतमडळाच्या किल्ल्याला पुण्याच्या काही स्वार्थसाधु व्यक्तीनी बडोद्याच्या घरभेद्याच्या साहाय्याने सुरुग लावला! पुण्याच्या एका मोठ्या गृहस्थाने तात्यासाहेबाना स्वतः भेटून त्याना सागितले की, आपण एक वेळ समेलनाचे अध्यक्ष झाला आहात व तेहि बडोद्यासच. तेव्हा आता पुनः आपले नाव इरेस घालून आपण वाद का उपस्थित करता? हे त्याचे बोलणे ऐकून तात्यासाहेब चकितच झाले! ते म्हणाले, "मला या प्रकरणाची काहीहि माहिती नाही व माझा यात बिलकूल हात नाही." आलेले गृहस्थ यावर म्हणाले, "तर मग आपणच बडोद्याला पत्र पाठवून आपले नाव सुचविण्याला आपली समति नाही असे कळवाना?" सौजन्यमूर्ति तात्यासाहेबांनी हे म्हणणे ताबडतोब मान्य केले व त्या अर्थाचे पत्र बडोद्यास स्वागतमडळाकडे पाठविले अर्थात् त्यामुळें त्याच्या निवडणुकीचा प्रश्नच निकालात निघाला, व खटपट्या गृहस्थाचे फावले! त्यानी लगेंच लटपट करून आपला हेतु साध्य करून घेतला. पण या प्रकरणीं तात्यासाहेबांच्या मनाचा निःस्वार्थीपणा व प्रांजलपणा मात्र उत्तम तऱ्हेने दिसून आला!

(६) तात्यासाहेब केसरीचे संपादकत्व सोडण्याचा विचार करीत होते. त्यावरून सहज प्रश्न निघाला असता त्या पत्राच्या संपादकाच्या जागेसाठी अवश्य असलेल्या आदर्श गुणाचें त्यांनी फार मार्मिक विवेचन केले ते म्हणाले, "केसरीच्या आदर्श संपादकाच्या अंगी माझ्या मते चार गुण अवश्य आहेत. एक तर, त्याला राजकारणाचे नुसते व्यावहारिकच नव्हे, तर सोपपतिक ज्ञान हवे. मोर्लेमिंटो सुधारणाच्या वेळी त्या सुधारणा फायदेशीर आहेत किंवा ते एक फसवेगिरीचे जाळे आहे, असा पुष्कळांना प्रश्न पडला त्या वेळी टिळकांनी 'उजाडले, पण सूर्य कोठे आहे' अशा प्रकारचे लेख लिहून राजकारणाची सोपपत्तिक चर्चा केली त्याचप्रमाणें सुरत कॉंग्रेसच्या गोंधळानंतर नेमस्त पक्षाने त्याच्याविरुद्ध उडविलेला गैरसमजुतीचा धुरळा बसविण्यासाठी त्यांनी केसरींत 'सनदशीर आणि कायदेशीर', 'कायदेशीर आणि बेकायदेशीर' वगैरे लेख लिहून जे राजकारणाच्या मूलतत्त्वाचे दिग्दर्शन केले, ते भो भो'ा कायदेपंडितानांहि लाजविण्यासारखे होते, व त्यामुळेच राजकीय मंडळांत त्यांना अग्रपूजेचा मान मिळाला. यामुळे अशा विद्वत्तेची जरूरी सिद्ध होते. केसरीच्या संपादकाला दुसरी अवश्य गोष्ट म्हणजे मराठी-भाषाप्रभुत्व ही होय केसरीच्या पूर्वकालात मराठींत जवळ जवळ राजकीय परिभाषा नव्हतीच असे म्हटले तरी चालेल. एकदा नवीन नवीन शब्दांची नाणी केसरीच्या टांकसाळेतूनच बाहेर पडलीं की, तीं कलदार होऊन बसतात, असा अनुभव आहे, म्हणून हा गुण अवश्य आहे तिसरा गुण म्हणजे उत्तम वक्तृत्व हा होय केसरीच्या संपादकाबद्दल दरेकाला इतका आदर व आपलेपणा वाटतो की, बहुतेक सार्वजनिक सभांना केसरीचा संपादकच अध्यक्ष हवासा वाटतो व त्याप्रमाणे त्याला आमंत्रणे येतात अशा प्रसंगी चांगले वक्तृत्व अंगीं असल्याशिवाय त्याचा प्रभाव पडू शकणार नाही, व आपल्या विचारप्रणालीचा योग्य परिपोष त्याला करता येणार नाही. म्हणून वक्तृत्वशक्ति ही त्याला आवश्यक आहे. तसेच, केसरी ही एक कुटुंबासारखी संस्था असल्यामुळें तिला एक प्रकारची परंपरा आहे इष्टमित्रांचे लागेबांधे आहेत, शत्रुमित्रतटस्थादि संबंध आहेत, त्या सर्वांचें ज्ञान संपादकाला अवश्य असले पाहिजे त्याशिवाय त्याचा वृत्तपत्रीय व्यवहार सुरळीत चालणार नाहीं. नाही तर त्यात अनेक घोटाळे होतील. केसरीच्या संपादकाचा हा माझा आदर्श आहे." वस्तुत. याच्याइतके मार्मिक विश्लेषण क्वचितच ऐकावयास मिळते पण ते तात्यासाहेबांच्याचकडून अपेक्षित होतें. इतरांकडून नाहीं

(७) सन १९४२ साली पुण्यास माझ्या अध्यक्षतेखाली पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन त्यांच्या ज्योतिषशिक्षणसंस्थेचा रौप्यमहोत्सव व ज्योतिषसंमेलन भरविण्यात आलें. त्या प्रसंगी तात्यासाहेब मुद्दाम उपस्थित झाले होते. माझें

अध्यक्षीय भाषण पुरे झाल्यावर [illegible] बोलण्याची मी विनती केली. त्या वेळी भाषण करताना त्यांनी स्पष्ट जाहीर केले की, माझा ज्योतिषावर विश्वास नाही ही गोष्ट खोटी आहे अर्थात् या परिषदेत फलज्योतिषावर विशेष भिस्त ठेवलेली नसून महाराष्ट्रात प्रचलित भिन्न भिन्न पचागाच्या पुरस्कर्त्यांमधील मतभेदाचे मुद्दे कितपत निकालात काढता येतील व सर्व भागात एकमुखी पचाग रूढ करणे कितपत शक्य आहे हे पाहणे, हाच या परिषदेचा मुख्य हेतु होता. अर्थात् हा विषय पारिभाषिक व तज्ज्ञानी चर्चा करण्यासारखाच असल्याने त्यांत तात्यासाहेबाना विशेष कुतूहल [illegible] सभव नसूनहि दरेक विषयांतील मूल सिद्धान्ताचे ग्रहण करण्याची त्याची तीव्र जिज्ञासाच या परिषदेला त्याना आणण्याला कारणीभूत झाली या परिषदेतच त्याच्या हातून मला 'ज्योतिषाचार्य' ही पदवी समर्पण करण्यात आली हा माझ्या आयुष्यातील आनदाचा व अभिमानाचा क्षण मी समजतो

( ८ ) तात्यासाहेबाची व माझी अखेर भेट १९४५ साली झाली. त्या सालच्या मे महिन्यात पुण्याला सर परशुराम भाऊ कॉलेजातील रमाबाई सभागृहात हिंदु कायद्याचे एकीकरण करावे किंवा नाही या विषयाची चर्चा करण्यासाठी एक परिषद भरली होती उभयपक्षाचे म्हणणे ऐकून निर्णय देण्याचे काम त्या प्रसगी मुबई हायकोर्टाचे न्यायाधीश न्या लोकूर याना देण्यात आले होते परतु सनातन [illegible] मूळ मुद्दा सोडून भलत्याच दिशेने श्रोतृजनाना न समजणाऱ्या सस्कृत भाषेत आपऱ्या वक्तृत्वाचा प्रवाह जेव्हा सुरू केला, तेव्हा तात्यासाहेब थोड्या वेळाने बोलावयास उठून त्यानी या सर्व वक्त्याचा असा झणझणीत समाचार घेतला की, काही विचारूच नये ! वेळप्रसगी ते कसे निःस्पृह असत हे त्या वेळी दिसून आले ते म्हणाले, "दिवस आणि दिवस व कलाकच्या कलाक तुमच्या [illegible] एक अक्षरहि श्रोत्याना समजत नसताना तुम्ही त्याच्यावर आपली भाषणे अशी लादता तेव्हा तुमच्या मनाला त्याच्याबद्दल [illegible] दया येत नाही काय ? हा जुलूम असह्य आहे तुम्हाला जे काही सागावयाचे ते मुद्देसूद रीतीने व लोकाच्या [illegible] सागितले पाहिजे " या त्याच्या [illegible] गैरलागू वक्तृत्वाचा जोर अजिबात थडावला !



## प्रा. वि. घ. देशपांडे

( कार्यवाह, हिंदुमहासभा, दिल्ली )

( १ ) डॉ मुकर्जी पुण्यास १९४४ साली १ ऑगस्टला व्याख्यान देण्यास आले त्या वेळी त्या सभेचे केळकर अध्यक्ष होते. इतक्या नीटसपणे अध्यक्षाचे

काम दुसऱ्या कोणी केलेले मीं पाहिले नाहीं. त्यानीं केलेला समर्पक परिचय व संक्षिप्त पण मार्मिक समारोप यामुळें मी विशेष प्रभावित झालो.

( २ ) बिलासपूर अधिवेशनाच्या नतर पुण्यास वर्किंग कमिटी ( हिंदुमहासभा ) ची बैठक झाली व नतर प्रचण्ड जनसमुदायासमोर डॉ. मुकर्जीचे अत्यत प्रभावी व्याख्यान झाले तात्यासाहेबाच्या मोटारीतून ते, श्री. खापर्डे व मी परत चाललो होतो. एस् पी. कॉलेजच्या पटागणांतून गर्दीतून वाट काढताना कॉलेजचीं अवखळ पोरे मोटारला बुद्धया वाट देईनात पण ड्रायव्हरने मोटार जोराने सोडताच मुले घाबरून ड्रायव्हरला शिव्या देत बाजूला झाली. तात्यासाहेब चिडून म्हणाले, " मला राग येतो तो असल्या मस्तवालपणाचा. नवीन तरुणांना गैरशिस्तपणाचा विशेष अभिमान वाटतो "

( ३ ) दिल्लीच्या हिंदुमहासभाभवनाच्या वादाचे पच म्हणून तात्यासाहेबाचें काम मी पाहिले आहे. तासन् तास ते पुरावा ऐकत असत. त्या वेळी त्यानी दाखविलेली कमालीची सहनशीलता वाखाणण्यासारखी आहे.



## दिगंबर वासुदेव नेने

### ( आहिताग्नि, वैदिक संशोधन-मंडळ, पुणें )

( १ ) उज्जयिनीस वाङ्मय परिषदेचे अध्यक्ष म्हणून तात्यासाहेब आले होते. त्या वेळीं त्याना बिलकूल सवड नव्हती. पण इदूरकरांच्या आग्रहामुळे त्याना एक दिवस इदुरास यावे लागले. सबध दिवस निरनिराळ्या सस्थाना भेट देण्यात, लोकाच्या गाठीभेटी घेण्यात गेला. सध्याकाळी जाहीर सन्मानसमारभ झाला रात्रीं आठ वाजता ते मुक्कामावर आले. त्या ठिकाणी इदुरातील काही निवडक कवि आले होते. तात्यासाहेबाना दिवसभराचा जरी शीण आला होता व दुसऱ्या दिवशीं सकाळीच त्यास तेथून निघावयाचे होते, तरी मोठ्या प्रेमाने आलेल्या कवींचे काव्यगायन दीडदोन तासपावेतो त्यानी ऐकले इतकेच नव्हे तर आपण स्वतःहि एकदोन स्वकृत कविता म्हटल्या.

( २ ) मी येथे वैदिक सशोधन मडळात श्रौतकोशाच्या कामासाठी आलो. तेव्हापासून मला चारपाच वेळा तात्यासाहेबाच्या घरी श्रौताचार्य बापटशास्त्री याच्या 'स्वाध्यायमदिर' सस्थेच्या कामानिमित्त जाण्याचा प्रसग आला. कारण तात्यासाहेब स्वाध्यायमदिर सस्थेचे कोषाध्यक्ष होते प्रत्येक वेळीं मी गेल्याबरोबर आपले हातचें काम बाजूला ठेवून आमचे काम अगोदर ताबडतोब करून देत. एकदा मी गेलों असता, महामहोपाध्याय प. श्रीधरशास्त्री पाठक याचे शुक्लयजुःसंहितेचे भाषा-

तर ते वाचीत होते मला पाहिल्याबरोबर त्यांना बापटशास्त्री यांनीं केलेल्या शुक्ल-यजुःसंहितेच्या भाषांतराची आठवण झाली व तुलनात्मक वाचनासाठीं त्यांनी ते माझ्याकडून मागून घेतले. पुनः मी गेलो तेव्हा त्याचे वाचन झाले होते. त्यानी बापटशास्त्री याच्या भाषातराबद्दल आपला अनुकूल अभिप्राय झाऱ्याचे मला मागितले व आभारपूर्वक पुस्तक माझ्याजवळ परत दिले.



## देवदत्त भालचन्द्र क्षीरसागर

( बी. ए., एलूएलू. बी., रेशनिंग ऑफिसर, लोणावळा )

( १ ) आम्ही सन १९२५ साली तात्यासाहेबाच्या गायआळीतील राहत्या घरीं भाड्याने राहावयास गेलो. राहावयास गेल्याबरोबर खुद्द तात्यासाहेबानीच मला बोलावून घेतले व सागितले की, तुम्ही येथे नवीन राहावयास आला, तुम्हांला ज्या काही गैरसोयी वाटत असतील त्या काहीएक सकोच न धरता मला सागा. त्या ताबडतोब दूर करू. तात्यासाहेब याचा स्वभाव इतका गोडवा व निगर्वी होता की, त्याचे कितीहि वर्णन केले तरी ते अपुरेच पडेल.

( २ ) मी एल्एल् बी. झाल्यावर एक कायद्याचे पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यावर त्यानी स्वतः उत्तम अभिप्राय दिला व केसरीतहि छापला. शिवाय श्री. बाळासाहेब खेर, मुबईचे पतप्रधान, त्या वेळी बॉबे-लॉ जर्नलचे सपादक होते, त्यासहि मला ओळखीचें पत्र दिले. मी शब्द काढण्याचा आवकाश कीं, त्यानी ताबडतोब पत्र लिहून आपल्या चिरजिवाबरोबर माझ्याकडे पाठवूनहि दिले ! अगी इतके मोठेपण असून सौजन्य तर इतके होते की, कोणालाहि तात्यासाहेबांबद्दल नुसता आपलेपणाच वाटत नव्हता, तर आपण त्याच्या घरच्यापैकीच एक आहोत असे वाटे. आम्हावर तर त्याचे छत्रच होते.



## शंकर नारायण बर्वे

( केसरी-मराठा ग्रंथशाळेचे व्यवस्थापक, पुणें )

( १ ) नगरपालिकेच्या निवडणुकीचा तो दिवस होता. वेळ सकाळची असावी. मतदानकेंद्राजवळ एक मोटार येऊन उभी राहिली. आतील स्वयंसेवक लगबगीने खाली उतरून उद्गारला, "बर्वे, तात्यासाहेबानी तुम्हाला आताच केसरी कचेरीत बोलावल आहे." मी विचारले "काय हो, कांही विशेष ?" "त्यांच्याबरोबर कोणी पाहुणे आहेत बुवा. चला लौकर याच गाडीतून." मी

ताबडतोब केसरी कार्यालयांत गेलो, तो तात्यासाहेब म्हणाले, "बर्वे, आपली ग्रथशाला पाहण्यास हे पाहुणे (श्रीमत युवराज मिरजकर तात्यासाहेब पटवर्धन, त्याच्या भगिनी श्रीमत सौ. लक्ष्मीबाई मुजुमदार, बडोदें व इतर काही खाशी मडळी) आले आहेत. म्हणून मुद्दामच तुम्हाला बोलावल." तात्याच्या नेतृत्वाखाली ग्रथशाला दाखविण्याचे काम चालू असता मध्येच श्रीमंत युवराजानी विचारलें, "काय हो, नेपोलियनवर काही पुस्तके आहेत काय?" "हो, बरीच आहेत" उत्तर देतादेताच मी ती काढवून घेण्याच्या व्यवस्थेला लागलो. तो युवराज म्हणाले, "काढावयाला नकोत; मला आताच नकोत, सहज चौकशी केली." यावर तात्यासाहेब मोठ्या अभिमानाने बोलले, "काढूद्याहो, तुम्ही बसा इथे जरासे, त्याच्या व्यवस्थेची कसोटी तरी घेता येईल; एरवी ती आम्हाला कशी दिसणार? हीच परीक्षेची वेळ बर्वे, आणवा पाहू नेपोलियन-विषयक जेवढ वाङ्मय असेल तेवढ सर्व" एक रॅक आणवून त्यात २०–२५ पुस्तकें काढवून त्याच्यापुढें ठेवली. युवराज पुस्तकें चाळू लागले व तात्याना ती पाहूनच आनद व अभिमान वाटला. तो त्यानीं केवळ "हा ऽऽऽ" या दीर्घोच्चारी एकाक्षरानेच एकसारखा व्यक्त केला. त्यावेळचा त्याचा तो हसरा व प्रसन्न चेहरा आणि त्याच्या नजरेतील ती सतोषमय साभिप्राय चमक माझ्या डोळ्यापुढे जशीच्या तशी आहे. त्यातील आशय शब्दाने का प्रकट होणारा आहे?

(२) तात्या जितके न्यायनिष्ठुर व कर्तव्यकठोर तितकेच ते सहृदय आणि भावनाप्रधान होते. याची साक्ष त्याच्याशी १९३२ साली प्रथमच परिचय होतांना मला पटली. पुण्यास आल्यापासून तात्यासाहेब याच्या प्रत्यक्ष नेतृत्वाखाली लोकमान्याच्या थोर सस्थेची व पर्यायाने राष्ट्राचीच अल्पस्वल्प सेवा करण्याची सुसधि मिळावी, अशी माझ्या मनाची विलक्षण ओढ होती! तिची पूर्तता करण्यासाठी एक दिवस हिय्या करून तात्यासाहेबाना मी प्रत्यक्ष भेटण्याचे धाडस केले मनातील प्रामाणिक हेतु त्याना कळवून टाकला यावर ते हसत हसत म्हणाले, "तुम्हाला नोकरीची जरूरी असली तरी आम्हाला या वेळी नोकराची कुठ गरज आहे? तुम्ही अर्ज करून ठवा. वेळ येईल तेव्हा मी तुम्हाला अवश्य बोलावीन." मी मोठ्या कष्टानेच त्याचा निरोप घेऊन निघालो व लगेच अर्ज केला म्हणण्यापेक्षा त्यावेळच्या माझ्या कल्पनेनुसार उपमालकारयुक्त असे एक वाङ्मयप्रधान निबधवजा पत्रच त्याच्याकडे धाडलें! ते त्याच्या हातीं पडताच त्यानी मला भेटण्यास बोलाविलें. भेटीत त्यानी प्रश्न केला, "तुम्ही आतापर्यंत वाङ्मय असें काय लिहिलेंत?" "श्रीगणेशा शिकण्यासाठी आपल्या चरणांजवळ यावे अशा उत्कट इच्छेने जे पत्र लिहिले तेच माझे वाङ्मय!" मी निर्भयतेने व प्रांजलपणें उत्तर दिले. तात्या हसले व म्हणाले, "ठीक आहे. तुमची योजना

नौकरच होणाऱ्या आमच्या ग्रंथशालेंत करण्याचे मी ठरविले आहे." नोकराची तूर्त आवश्यकता नसताना २–३ दिवसाच्या अवधींतच माझी नेमणूक कां व कशी झाली हे गूढ उकलणारे उत्तर माझ्या अल्पमतीला एकच देतां येईल कीं, "तात्यासाहेब अतःकरण ओळखणारे होते !" त्याचे भावनाप्रधान मन द्रवलें, म्हणून तर माझा अर्ज वाचण्यापूर्वीच सस्थेत कायम नोकर म्हणून त्यानी माझी नेमणूक केली या त्याच्या विलोभनीय गुणसपदेची मला प्रचीति पटून मी त्याच्याकडे अधिकच आकर्षिला गेलो !



## श्रीपाद बाजी जोग

### ( माजी असिस्टंट चीफ ऑफिसर, पुणें म्युनिसिपालिटी )

( १ ) मी पुणे शहर म्युनिसिपालिटीत १९१९ ते १९३६ पर्यंत असिस्टंट चीफ आफिसर होतो व तात्यासाहेब १८९९ ते १९१५ व १९१८ ते १९२५ म्युनिसिपल सभासद होते आक्टोबर १९१८ ते मे १९१९ व एप्रिल १९२२ ते मार्च १९२५ पर्यंत ते अध्यक्ष होते ते अध्यक्ष असताना कामासबंधीं माझा त्यांच्याशीं नेहमी सबध येत असे अध्यक्षीय कामाकरिता त्याच्या घरीच स्वतत्र ऑफिस असे. आपल्या अनेकविध कार्याच्या व्यापामध्ये सुद्धा ते म्युनिसिपालिटीच्या कामाला पुष्कळ वेळ खर्च करीत असत महत्त्वाच्या कामात सरकारी अधिकाऱ्यांकडे जो पत्रव्यवहार होतो तो बहुधा चीफ ऑफिसर व त्याचे मदतनीस हेच तयार करतात. गुतागुतीची कामे समजून घेऊन त्यावर साधक-बाधक आधार देऊन पत्रांचे मसुदे तयार करण्याची कुवत अध्यक्षात बहुवा असत नाहीं. पण याला अपवाद म्हणजे गोपाळराव गोखले, हरिभाऊ आपटे व तात्यासाहेब केळकर हे होत. तात्यासाहेब याच्या हातचे पुष्कळ महत्त्वाच्या पत्राचे व रिपोर्टांचे मसुदे म्युनिसिपल फायलीत मिळतील म्युनिसिपल ड्रेनेज व पाणीपुरवठा ही कामे सरकारी अधिकाऱ्यानी करून त्यात अनत चुका व गैरवाजवी खर्च केला. त्यासंबधात पुढे सरकारी अधिकाऱ्याशी ज्या वाटाघाटी होत त्यात म्युनिसिपालिटीची बाजू तात्यासाहेबानी अभ्यासपूर्वक कुशलतेने व जोरदारपणें माडली आहे. मे १९१९ मध्ये तात्यासाहेब लो टिळकाबरोबर इग्लडास गेल्यामुळे त्याची अध्यक्षाची पहिली कारकीर्द सहा महिन्यात सपली पण एप्रिल १९२२ मध्यें ते पुनः अध्यक्षपदी बसले व वर्षभर मनोभावे त्यानी त्या जागेवर काम केलें. म्युनिसिपालिटीने लो. टिळकाचा पुतळा उभारावा, अशी सूचना कोणीं तरी आणली. त्याला विरोध करणारा पक्षहि प्रबळ होता १५–२० हजार रुपये या कामास खर्च करण्यास सरकार मजुरी देणार नाहीं व तो खर्च सभासदास करावा लागेल अशी

भीति घालण्यांत आली. हा प्रश्न साधारणसभेपुढे खूप चर्चिला गेला. त्या वेळी तात्यासाहेबानी सांगितले की, " मी केसरी ऑफिसातून लागतील ते पैसे उसने म्हणून देतो. पुतळा तर तयार करून तो उभारू. यास सरकारी मजुरी मिळाली तर केसरीचे पैसे परत द्या. नाही तर नका देऊ." पुढे येथील डिस्ट्रिक्ट कोर्टात दावा होऊन पुतळ्याचा खर्च करणे हे म्युनिसिपालिटीच्या अधिकारात आहे, असा निकाल झाला व केसरीचे पैसे परत मिळाले. १९२३ ते १९२५ पर्यंत तात्यासाहेब मध्यवर्ती कायदेमंडळात गेल्याने त्याना आपले काम उपाध्यक्षावर बराच काळपर्यंत सोपवावे लागले. लो. टिळकांच्या पुतळ्याची स्थापना मोतीलाल नेहरूंच्या हस्ते तात्यासाहेबानी करविली. तो समारंभ फारच वैभवशाली झाला.

(२) हरिभाऊ आपटे याचा मी शिष्य व एल्. जे. आपटे यांचा मित्र. तात्यासाहेब अध्यक्षपदाच्या अधिकारावर आल्यावर त्याच्या पक्षातील काही म्युनिसिपल अधिकाऱ्यांनी वरील विरोधी गटातील मी मनुष्य म्हणून मला कामावरून काढण्याचे पुष्कळ प्रयत्न केले; परंतु स्वतः तात्यासाहेबाचे माझ्याशी वागणे अत्यंत सरळ, निःपक्षपातीपणाचे व उदारपणाचे शेवटपर्यंत राहिले; मरणापूर्वी दोन वर्षे आकस्मिकपणे ते एक दिवस आपण होऊन मजकडे येऊन त्यानी म्युनिसिपालिटीतल्या कामाविषयी चर्चा केली व माझ्या म्युनिसिपालिटीतल्या कामासंबंधी गुणग्राहकता व्यक्त केली. केवढा हा थोरपणा !



## धुंडीराज गणेशशास्त्री बापट

### ( सोमयाजी, पांचवड, सातारा )

(१) आमच्या 'पाचवड' गावी पुण्याच्या सोशलक्लबच्या धर्तीवर 'धि पाचवड सोशल क्लब' नावाची एक संस्था तीन वर्षे चालू होती. इतिहास मंडळातील रा. श. ना. जोशी, शब्दकोशाचे संपादक दातारशास्त्री हे त्या क्लबातील नटवर्गापैकीच होत. आमच्या क्लबचे नाट्यप्रयोग वाई, सातारा व औंध येथेहि झाले व क्लबचा लौकिकहि चांगला झाला. याच सुमारास माझे मावस बंधु कै. अच्युतराव कोल्हटकर यांची गाठ पडली व त्यानी मोठ्या आग्रहाने मला आपल्या 'नारिंगी निशाण' संस्थेत ओढले. संस्थेच्या प्रत्येक नाटकात नायकाची भूमिका मजकडेच दिली जाई. कै. अच्युतरावानी केलेल्या अनेक नाटकात 'ताई तेलीण' हें त्याचे ऐतिहासिक नाटक फारच लोकप्रिय झाले होते. नारिंगी निशाण संस्थेचा मुक्काम एकदा पुण्यास असता 'ताई तेलीण' या नाटकाचा प्रयोग किर्लोस्कर थिएटरमध्ये झाला. तो पाहण्यास कै. अच्युतराव याच्या निमंत्रणावरून तात्यासाहेब व शिवरामपंत परांजपे हे उपस्थित होते ! बापू गोखल्याची भूमिका मी केली होती. तात्या-

साहेब व शिवरामपत हे दोघेहि नाट्यकलेचे भोक्ते व दर्दी असल्यामुळे माझे अभिनय-कौशल्य पाहून त्या दोघांचा फार अनुकूल ग्रह झाला होता. माझ्या आवाजावरून व चेहऱ्यावरून हा नट आपल्या परिचयांपैकीं कोणीतरी असावा, असा दोघानाहि सशय आला. इतक्यांत अच्युतराव त्याच्याकडे आले. तेव्हा बापू गोखल्यांची भूमिका करणारा नट कोण आहे ? असे त्यानीं त्याना विचारलें. अच्युतराव यांनीं पाचवडचे बापटशास्त्री, असे सागताच दोघानाहि माझ्याबद्दल कौतुक वाटले, आणि अक सपल्यावर दोघेहि नेपथ्यात आले व अच्युतरावाना म्हणाले, बापटशास्त्र्याना इकडे बोलवा. त्याप्रमाणे रगपटांतून बाहेर येऊन उभयताना मीं विनयाने नमस्कार केला. तात्यासाहेब मला म्हणाले, " बापटशास्त्री, तुम्हाला नाट्यकलेची ईश्वरी देणगी आहे व तिचा अभ्यास करून तुम्ही अभिनयकौशल्य चागले सपादन केले आहे. तुम्ही आपली भूमिका समजून करिता, याबद्दल आम्ही दोघेहि तुम्हास शाबासकी देतो, तुमचे अभिनदन करतो. पण मी तुम्हाला अशी सूचना मुद्दाम करितों कीं, वर्ष सहा महिन्यांनी तुम्ही हा नाद सोडून द्या तुमची विद्या व तुमचा पेशा नाट्यकलेपेक्षा अत्यत श्रेष्ठ आहे तोच पुढे चालवा मला अशी भीति वाटते कीं, तुमच्या या अभिनय-कौशल्यामुळे एखादी नाटक कपनी तुम्हाला ओढील तुम्हाला पैसा मिळेल, उत्तम नट म्हणून प्रसिद्धीसहि याल; पण तुमच्या श्रेष्ठ पेशाला मात्र मुकाल तसे होऊ देऊ नका " शिवरामपतांनीहि ' तात्यासाहेब म्हणतात हे नीट ध्यानात ठेवा व लौकर मोकळे व्हा ' असा दुजोरा दिला. मी ' आपल्या आज्ञेप्रमाणेच वागेन ' अशी विनय-पूर्वक त्यांना कबुली दिली आणि लौकरच सस्था सोडली आज श्रौतकोशासारख्या जागतिक व प्रचड ग्रथाचा मुख्य सपादक होण्याचे मला लाभलेले भाग्य हे केवळ तात्यासाहेबाच्या हार्दिक उपदेशाचेच फल आहे, यात सशय नाही.

( २ ) पुणे येथे बुधवारातील आर्यभूषण थिएटरात राजे लक्ष्मणराव भोसले याच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र हिंदु धर्म परिषदेचे अधिवेशन भरले होते. वाईचे प्राज्ञपाठशाळेचे सस्थापक पडित नारायण शास्त्री मराठे यांनीं " साप्रत कलियुगातहि क्षत्रिय व वैश्य याचे अस्तित्व असून ब्राह्मणाप्रमाणेच त्याना उप-नयनादि संस्कार व वेदशास्त्राच्या अध्ययनाचा अधिकार आहे." हा ठराव परिषदे-पुढे मांडला. त्यास अनुमोदन देण्याचे काम मजकडे असल्यामुळे माझें भाषण चालू होते. जुन्या मताचे धर्मशास्त्री क्षत्रिय-वैश्याचा आज अभाव असल्याचे प्रतिपादन करीत असतात; पण ती वचने सिद्धातरूप नसून पूर्वपक्षाचीं निदर्शक आहेत, हें मी श्रोतृवर्गास पटवीत होतों. परतु मूळ वचनें माझीं चिरपरिचित असूनहि त्या वेळीं तीं माझ्या स्मृतिपथावर येत नव्हती. आणि बोलण्यात न आल्यामुळे विषयप्रति-पादनास यावा तितका उठाव येत नव्हता. .वचनें आठवण्याची मी मनात धडपड करीत होतो व त्या अर्थाचीं वाक्येंच बोलत राहिलों होतों. या वेळीं माझ्या

मनाची उडालेली धादल माझ्या ोजारा न मागच्या खुर्चीवर बसलेल्या तात्या-साहेबाच्या लक्षात आली आणि त्यानी खाली वाकल्यासारखे करून, माझ्या कोटाचे टोक ओढले व फक्त मला ऐकू येईल इतक्या हळू आवाजात ' कलावाद्यतयो स्थिति. ' व ' नदात क्षत्रियकुलम् ' असा उच्चार केला ! त्याबरोबर, मलाच वचन आठवल्यासारखा बहाणा करून मी त्या वचनाचा अनुवाद केला आणि माझ्या भाषणाचा नीट जम बसला ! तात्यासाहेबाची ही समयसचकता आजन्म माझ्या स्मरणात राहील



## सौ. सुधा वेलणकर

( बी. ए., खार, मुंबई )

( १ ) नव्या ि तात्यासाहेबाची ' दिवाण झिप्री ' ही कादबरी चालू होती. त्यातील एका प्रकरणात मला एका ि ठिकाणी एक बारीकशी चूक आढळली चूक दाखवून द्यावी असे तर वाटे, पण पुन्हा मनाला असा सकोच वाटे की, एवढ्या मोठ्या साहित्यसम्राटाची चूक आपण कशी दाखवावी ? पण त्या चुकाच काही स्पष्टीकरण तर हवे होते शेवटी पत्र लिहू की नको लिहू, अशा अनिश्चयातच पत्र लिहून तर टाकले ! पत्राला उत्तरहि तात्या-साहेबाच्या स्वत.च्या सहीनेच तावडतोब आले, ते असे:– " पत्र पोचले आभारी आहे 'शालू' हा शब्द 'शेल्या'ऐवजी चुकून पडला आहे, पुढील अकात ती दुरुस्ती करीन. इतके बारकाईने वाचकाने वाचले म्हणजे लेखकाला आनद होतो " ह्या पत्रावरून केळकराचा प्राजलपणा व ुणाचा थोडाहि गुण मोठा करून दाखविण्याची वृत्ति' दिसून येत नाही का ? याच गुणामुळे त्याना सर्व माणसे जोडली. ' राखावी बहुताची अतरे ' ही वृत्ति स्वतः निलोभ, निःस्पृह राहून ठेवणे कठीण पण ती कला तात्यासाहेबानी आत्मसात् केली होती

( २ ) ह्या पत्रानतर तात्यासाहेब हे नाशिकला नाट्यशताब्द-महोत्सवाचे अध्यक्ष म्हणून आले होते, त्या वेळी आमचे श्री वेलणकर हे नाशिक . पोलीस सुपरिटेंडेन्ट असल्यामुळे आम्ही नाशिकलाच राहत होतो. त्या वेळी तात्यासाहेबाना निमत्रण दिल्यावरून ते आमच्या घरी आले होते वेळ सकाळची होती तात्यासाहेब जिना चढून वर आले व आरामखुर्चीत स्थानापन्न झाले नतर माझी नी त्याची ओळख करून देण्यात आली इतक्या जवळून त्याना मो पाहिल्यादाच पाहिले पाहताक्षणाच त्याच्या भव्य मूर्तीचा माझ्यावर छाप पडली विशेषत. त्याचे आढे खूप रुद व छाती विस्तीर्ण होती माझ्या मनात एकदम आले की, देशकार्याची धुरा " या महापुरुषास योग्य अशीच निधडी छाती देवाने दिली आहे



## कृष्णाजी लक्ष्मण वेलणकर

### ( तात्यासाहेबांचे एक लेखक, पुणें )

( १ ) तात्यासाहेब याच्या टिळक-चरित्र-लेखकापैकी मी एक लेखक होतो. टिळक-चरित्राचा मजकूर त्यानी मला तोंडी सागावयाचा व मी तो लिहावयाचा असे काम चालत असे ।न ना उरक पडावा म्हणून वक्तशीरपणावर त्याचा कटाक्ष असे. मला क्वचित् उशीर झालाच तर तात्यासाहेबाचे चिरंजीव आण्णासाहेब अगर ग. वि. केतकर हे लिहावयास बसलेले असावयाचे. माझी वेळ सकाळीं ८ ते १० ची होती. माझे लक्ष लि ।ान असता १० वाजल्याचे लक्षात येणार नाही म्हणून ते घड्याळाचा गजरच लावून ठेवीत असत मजकूर चालू असता कोणी तरी यावयाचे व त्याच्याशी तात्यासाहेबाना बोलावेहि · '' ` पण आश्चर्य असे की, थाबलेल्याच्या पुढील मजकूर 'ह, कुठपर्यंत आले' असे न विचारता स्मरणान एकदम ते सागूच लागावयाचे !

एकदा सुरत कॉंग्रेस प्रकरण उपरोधिक व पल्लेदार ग्न्या। चालू असता कोणीतरी मध्ये आले.त्यास निरोप देऊन परत येताच 'ह, कुठपर्यंत आलो आपण ?' असे त्यानी विचारले. मी लगेच 'सुरतेपर्यंत आलो' असे सागितले. तेव्हा ते आनदून म्हणाले, 'माझ्या विनोदाचे असे अनुकरण होत गेल्यास मला फार आनद वाटतो '

( २ ) एकदा तात्यासाहेबाना गावाला जावयाचे होते. म्हणून काही मजकूर तत्पूर्वीच पुरा करणे जरूर होते व मला रविवारची सुट्टीहि होती. म्हणून त्या रविवारी नास्ीन जास्त मजकूर सतत लिहून पुरा करण्याचे ठरविले. आम्ही असे किती वेळ लिहीत बसलो असू ? सकाळी ७ ते रात्री ८ सतत १३ तास बसून लिहिल ! मी सतत बसून लिहिलेच; पण तोंडी गागाव ।।ना इतका मजकूर मनोमय योजून ठेवण्यास तात्यासाहेबानी आधी किती श्रम घेतले असतील याची कल्पना करा ! मजकूर पुरा होऊन मी घरी जाण्यास निघताच तात्यासाहेब म्हणाले, "छे छे वेलणकर ! आता दोन्ही वेळचे जेवूनच जा " अशा रीतीने त्या दिवशी मला त्यान्या प्रकाचा लाभहि झाला !

( ३ ) पुढे अनेक वर्षांनी काही कामाकरता माझ्या लेखनाचे प्रशस्ति पत्र मागितले असता त्यानी कुठे काहीहि न पाहता ते लगेच लिहून दिलेले पाहून मी आश्चर्याने म्हटलें, 'तात्यासाहेब, माझे सबध नाव आपण कधीहि विचारले नसताना ते यात कसे लिहिलेत !' ते म्हणाले, "म्हणजे मला इतका भोळा समजता की काय ? अहो, तुम्ही मजकडे लिहिण्यासाठी येण्यापूर्वीच आमच्या बापटाना तुमचे सबध नाव मी विचारून घेतले होते."

(४) असेब्लीच्या एका निवडणुकीत तात्यासाहेबानी नळाच्या तोटीवर कोटी केली होती. एक मतदार मत देऊन बाहेर पडल्यावर बाहेरच्याच नळावर ते लगेच हात धूत होते. त्यांचे स्नेही म्हणाले, 'काय खाल्लेत हो आंत?' तात्यासाहेब मध्येच म्हणाले, "छे, छे, मत देण्यात काही पाप केलें असेल म्हणून त्या पापाने भरलेले हात ते धूत असतील!"

(५) एकदा टिळक-चरित्रांतील एक प्रकरण केसरी कचेरींतील एका ग्रथांतील माहिती पाहून लिहिण्याकरिता आम्हा दोघे तिकडे निघालो असतां रस्त्यातील एक भांडण कुशलतेने तात्यासाहेबांनी मिटविले. चौकशीत समजलें कीं, सायकलीच्या धक्क्याने सांडलेल्या दुधाचे पैसे सायकलस्वार गवळ्यास देत असताहि तो नुकसानीदाखल मागत असलेले दुप्पट पैसे सायकलवाला देत नसल्याने मारामारीची वेळ येऊन तुफान गर्दी झाली आहे ती पाहून तात्यासाहेबानी सल्ला दिला की, "अहो, हे काय? तुम्ही एवढे लोक जमलात ना? तर मग त्या गवळ्याला सर्वांनी धरून ठेवा आणि सायकलवाल्याला जायला सांगा." झाले, लोकानी असे करताच सर्वच ग्रथ आटोपला! सायकलवाला क्षणार्धात निघून गेला आणि गवळ्याखेरीज सर्व मडळी हसत हसत तात्यासाहेबाची तारीफ करीत निघून गेली!

(६) मी विजय प्रेसमध्ये नोकर असतांना असेंच एक हातघाईवर आलेले प्रकरण तात्यासाहेबानी गोडीत मिटविले. एका गृहस्थाचे "विनोदी लेखसग्रह" या नावाचे पुस्तक छापून तयार झाले व त्याची पहिलीच प्रत लगेच होणार असलेल्या या पुस्तकाच्या प्रकाशनसमारभाकरिता प्रकाशकाच्या हाती वेळेवर दिली. पण ती पाहताच प्रत वेळेवर दिल्याचे कौतुक न करता उलट सतापून हमरीतुमरीवर ते आले. इतक्यात काही कामाकरिता तात्यासाहेब अचानकपणे छापखान्यात आले. काय झाले हे समजताच सुशिक्षितातील भाडण विकोपास जाऊ नये म्हणून ते म्हणाले, "अहो, हे हो काय? जसे पुस्तकाचे अतरग तुम्ही केवळ विनोदाने नटाविले आहे तसे छापखान्यानें बाह्याग नटाविले यात बिघडले ते काय? अहो, पुस्तकाचे कव्हर उलटें लागले आहे म्हणता; पण कव्हरकडून पुस्तक उघडून पाहून कव्हर उलटें झाले आहे हे पाहताच विनोदच नाही का सुरू होणार?" झालें; तात्यासाहेबाची हीच कल्पना घेऊन व छापखान्यावरील राग विसरून ते गृहस्थ प्रकाशनसमारभाला एकदम निघून गेले!!



## र. कृ. गोडबोले

### ( चिटणीस, महाराष्ट्र चित्रकारमंडळ, पुणें )

( १ ) दुसरे महाराष्ट्र चित्रकार समेलनाचे अधिवेशन पुण्यास १९३२ सालीं भरणार होते. त्यासाठी अनेकानी लहानमोठ्या देणग्यांची आश्वासनेहि दिलीं होती पण समेलन दोन दिवसांवर आले तरी एक पैसाहि रोख जमला नव्हता! आगाऊ खर्चाची मोठीच आपत्ति आली. तेव्हा रात्री दहा वाजता मीं तात्यासाहेबांकडे जाऊन ही स्थिति निवेदन केली. तात्यासाहेबांनीं लगेच दीडशे रुपयाचा चेक लिहून हसतमुखान माझ्या हवाली केला. वाचेला कृतीची खेळकर जोड देणारे तात्यासाहेब अवघ्या महाराष्ट्राला वदनीय का वाटू नयेत ?

( २ ) १९३४ साली मुबईचे प्रसिद्ध कलावत श्री. हळदणकर चित्रकार समेलनाचे अध्यक्ष होते. अध्यक्षाच्या भाषणाच्या शेवटीं ते म्हणाले, "चित्रकाराचा खरा ॲड्रेस ( भाषण ) चित्रलेखनच त्याला शाब्दिक भाषणाचे काय महत्त्व ? समेलन चिटणीस गोडबोले यानी मनावर घेतल्यास माझा खरा ॲड्रेस ( अध्यक्षीय भाषण ) मी रगकुचल्यानेच करून दाखवीन." बैठक आटोपताच श्री. हळदणकर मला म्हणाले, "गोडबोले, तात्यासाहेबाचे 'पोर्टेट' करण्याची फार दिवसाची माझी इच्छा आहे. पण सिटिंग देण्यासाठी त्याचे मन तुम्ही वळवू शकाल तर फार आनद होईल." तात्यासाहेब तेथेच होते. मी अध्यक्षाची ही इच्छा त्याना सागताच त्यानी लगेच होकार दिला आणि श्री. हळदणकरानीहि सर्व पाहुण्यासमक्ष त्याचे 'पोर्टेट' अगदी थोड्या वेळात करून दाखविले. हे एवढे मोठे महाराष्ट्राचे प्रमुख पुढारी, होय म्हणतील की नाहीं ही शका त्या परस्थ पाहुण्यांना येणे साहजिक होते. पण तात्यासाहेबाचा स्वभाव किती निगर्वी व खेळकर होता याचें यापेक्षा दुसरे कोणचे प्रत्यतर दाखविता येईल ?



## नरहर गणेश कमतनूरकर

### ( विनोदी लेखक, नाटककार, सांगली )

( १ ) कै. गडकऱ्यांच्या विशेष आमत्रणाने तात्यासाहेब 'पुण्यप्रभाव' चा प्रयोग पाहण्यास आले होते. चौथ्या अकात वृदावनाकडून नायिकेच्या समजल्या गेलेल्या पाळण्यातील मुलाचा खून झालेला; आणि पाचव्या अकाच्या सुरुवातीस नायिका वसुंधरा रिकामा पाळणा हलवीत "निज बाळा रे, गाणे गातें आई ..." हे कारुण्याने ओथबलेले गाणें गात बसलेली पाहताच, "अरेरे, पाळणा रिकामा ना !" असे तात्यासाहेबाच्या तोंडून एकदां उद्गार निघाले, आणि

उपरण्याच्या सोग्याचा शेवट अगदी सहजपणें डोळ्याकडे गेला! कवीचे काव्य कवीच्या भावनेने जाणावयास त्यासारखा कवीच असला म्हणजे कशी रसगंगा वाहू लागते, याचे प्रत्यक्ष दृश्य मला त्या रात्री अगदी जवळून पाहावयास मिळाले

(२) विनोदावरचे तात्यासाहेबाचे विस्तृत विवेचन ग्रथरूपाने नुकतेच प्रसिद्ध झाले होते त्या सुमारास काही सावजनिक समारभासाठी तात्यासाहेब सांगलीस आले होते अर्धा एक तास अगदी एकटेच असे माझ्या घरी त्यास भेटण्याचा सुयोग आला तेवढ्या धादलीतहि आमचे खालीलप्रमाणे बोलणे झाले विनोदमीमासेत विनोदाच्या नीतीबद्दल विवेचन असावयास पाहिजे होते, तेवढी त्या ग्रथात महत्त्वाची उणीव राहिली असून, पुढील आवृत्तीत ती भरून काढावी, असे त्या भेटीत मी सहज बोलून गेलो तात्यासाहेबानी ती उणीव एकदम कबूल केली, पण पुढे ते लगेच म्हणाले, "माझ्या पुस्तकाच्या पुढच्या आवृत्तीपर्यंत थाबा-यचे कशाला? तुम्हीच एक लहानसे पुस्तक विनोदाच्या नीतीबद्दल का लिहीत नाहीं?" "कोण, मी?" आश्चर्याच्या अचानक धक्याने लटपटून जाऊन मी म्हटले, "विनोदाच्या नीतीचे विवेचन मी करू? माझी योग्यता काय आणि विषय काय?"

माझे बोलणे ऐकून तात्यासाहेब एकदम गभीर झाले आणि म्हणाले, "विनोदी वाङ्मय तुम्हाला मनापासून आवडते, होय ना? विनोदालाहि त्याचे असे एक नीतिशास्त्र असू शकते, असे तुम्हाला वाटत आहे ना? तुमचे ते वाटणे अगदीं बरोबर आहे, असें माझेहि म्हणणें आहे; इतकी पाथमिक तयारी म्हणजेच मी म्हणतो योग्यता. लिहिण्यासाठी जी तयारी करावी लागेल, जे श्रम घ्यावे लागतील, ती सारी साधने आहेत." काय उत्तर देणार मी? मी गप्प बसलेला पाहून आपण होऊनच तात्यासाहेब पुढे म्हणाले, "मी सागू, अशा-सारखे विवेचनात्मक पुस्तक लिहिण्याला तुमचे मन का कचरते ते? आपण आपण लिहू ते उत्तमच ठरले पाहिजे, या गुप्त ईर्षेने तुम्ही [illegible] आहात. आपण लिहू ते कसे होईल, काय होईल याची जरा शका आली रे आली की, तुम्ही सुचलेला विषय मनातून काढून टाकता, आपल्या [illegible] स्वस्थ बसून दुसरा कोणी त्या विषयावर लिहील तेव्हा आपणाला वाचायला मिळेलच, अशा विचाराने वाट पाहत राहता? अरे, असं का? आपण लिहू ते साऱ्याना आवडलेच पाहिजे, असा तुमच्या मनाचा आग्रह का? एखाद्या विषयावरचे तुमचे लिहिणे नाही तितकेसे जमले, तर न जमेल; त्याबद्दल पुढे दुसरा कोणी पुष्कळ, [illegible] म्हणतो, अधिक चागले लिहीलहि. तुमचाच [illegible] word असावा, अशी तुमची महत्त्वाकाक्षा का असावी हो?" "छे, छे, माझी तशी मुळींच महत्त्वाकाक्षा नाही" लगेच मी अजीजीने म्हणालो. तेव्हा ते म्हणाले, "तुम-

च्या मनाच्या सपाटीवर ती महत्त्वाकांक्षा नाही, हे मला माहीत आहे पण मी मागतो, तुमच्या मनाच्या तळाशी तशी आकांक्षा आहे खास. प्रत्येक लेखकाला तिने पछाडलेलें असते. परंतु तिची आपण हकालपट्टी केली पाहिजे. जो विषय आपल्याला आवडेल आणि आपल्याला जे त्याच्याबद्दल म्हणायचे असेल, ते खुशाल म्हणून टाकावे, ते जगात सोडून द्यावे दुसरे त्याबद्दल विचार करतात, त्याना काही नवीन विचार सुचतात, ते ते जगापुढे मांडतात; अशाच मार्गाने एखाद्या विषयावरचे साहित्य एकसारखे तयार होत जाते आणि त्याच्यावरचे विचार पूर्णतेकडे जाऊ शकतात आणि दुसऱ्यानेच नेहमी आपल्याला विचाराचे भक्ष्य पुरवावे असें तुम्ही का म्हणावे हो? हा आयतेपणा चांगला नाही, हा सोडून तो. पुन. आपली भेट होईल तेव्हा विनोदाच्या नीतीवरचे पुस्तक लिहून झालें असे मला सांगा.''

पुढच्या एकदोन भेटीत तात्यासाहेबांनी ''काय, त्या विनोदाबद्दलच्या पुस्तकाचे तुमचे काम कुठपर्यंत आले आहे?'' असे विचारलेंच ''चाललय'' असे काही तरी पण चाचरत उत्तर मी दिलें नतरच्या भेटीगाठीच्या प्रसंगी तात्यासाहेबांचा तो गोळीबंद प्रश्न येऊन ठोका देणार अशी माझ्या मनानें भीतीच घेतली होती; परंतु एकदोन प्रसंगानंतर त्यांनीं तो प्रश्न माझ्यावर टाकला नाहीं. एक तर ती बाबत त्यांच्या लक्षातून निघून गेली असेल किंवा मला 'पक्का मक्ख' असे ठरवून त्यांनी तो विषय मो[?]हि दिला असेल!



## सौ. सरोजिनी कमतनूरकर

( सांगली )

( १ ) सन १९३२ ची गोष्ट. सांगली विलिंग्डन कॉलेजमध्ये तात्यासाहेब आलेले होते कॉलेजमधील विद्यार्थ्यांबरोबर त्यांची अनौपचारिक चर्चा चालू होती. मी त्या दिवशी तात्यासाहेबांना प्रथमच पाहिले त्यांचा ता पक्का महाराष्ट्रीय पोषाख, त्यांची ती समाधानी हसतमुख चर्या, आपले वयाचे, ज्ञानाचे, अनुभवाचे, विद्येचे सारे मोठेपण विसरून, विद्यार्थ्यांशी त्यांच्या पातळीत येऊन एकरूप, समरस होऊन त्यांनी केलेली चर्चा मी कदापि विसरणे शक्य नाही वाटेल ते, वाटेल तसले खोचक-बोचकहि प्रश्न विद्यार्थ्यांनी विचारले, तरी त्यांना राग तर यायचा बाजूलाच राहिला, पण विद्यार्थ्यांना पटेल अशी विनोदमय, मार्मिक उत्तरे देण्याची त्यांची कुशलता माझ्या विशेष लक्षात राहून गेली आहे.

( २ ) इंग्रजीमध्ये वाचलेली एक लघुकथा मला अतिशय आवडली होती अपघातात दोन्ही पाय गेलेल्या एका लहान मुलासंबंधी मनाला एक प्रकारचा

चटका लावणारी ती लघुकथा मी मराठीत लिहून काढली आणि स्त्रीवर्गाच्या लिखाणाला विशेषत्वाने प्राधान्य देणाऱ्या आमच्या 'स्त्री' मासिकाकडे प्रसिद्धी-साठी पाठवून दिली. ती लघुकथा प्रसिद्ध व्हावी, असे मला फार वाटत होते. कारण ती तितकी एकदम मनाचा ठाव घेणारी होतीच. परतु लघु-कथेची पोच येण्याऐवजी 'स्त्री' मासिकाच्या सपादकाकडून ती उलट टपाली साभार परत आली! सपादकानी ती वाचून तरी पाहिली होती की नाहीं देव जाणे!! मला तर ती लघुकथा मनापासून आवडली होती. 'स्त्री'-कडून परत आलेली ती कथा मी जशीच्या तशी, त्याच दिवशी तात्यासाहेबाकडे पाठवून दिली आणि सोबत एक पत्र लिहून, ती लघुकथा प्रसिद्ध करण्याच्या योग्यतेची नसेल, तर ती जरूर त्या सुधारणाच्या सूचनेसह मजकडे परत करण्याविषयी त्याना विनती केली. एक दिवस 'सह्याद्रि' कार्यालयाकडून एक मोठा लिफाफा टपालाने आला. आपली लघुकथा परत आलेली असणार, अशी कल्पना झाली; परतु लिफाफा 'सह्याद्रि' कडून आलेला होता, त्यामुळे, नीटशी काही आतील मजकुराबद्दल खात्रीपूर्ण कल्पना होईना. एका तऱ्हेच्या आतुरतेने मी तो लिफाफा फोडून पाहिला. आत माझ्या लघुकथेची 'सह्याद्रि' मासि-कासाठी छापलेली प्रुफे होतीं! तात्यासाहेबाकडून माझ्या पत्राच्या उत्तरादाखल 'सह्याद्रि' ची छापील प्रुफें आलेली पाहून मला काय वाटले, तें व्यक्त करायला माझ्याजवळचे शब्द-भाडार अपुरे आहे खास!

( ३ ) काही कामानिमित्त तात्यासाहेब मिरजेस आले होते. सागली-मिरजेस तात्यासाहेब आले कीं, ती सधि साधून त्याना एकदा विलिंग्डन कॉलेजमध्ये आणाविण्याची एक प्रथाच पडली होती. त्याप्रमाणे, विलिंग्डन कॉलेजमध्ये तात्या-साहेबाचे व्याख्यान असल्याची वार्ता समजताच, आमच्या सागली येथील सरस्वती सेविका-समाज या भगिनीवर्गाच्या सस्थेस त्याच्या आशीर्वादाच्या चार शब्दाचा लाभ व्हावा, या उद्देशाने त्याना तशी विनती करण्यासाठीं मी विलिंग्डन कॉलेज-मध्ये गेले. त्याचे व्याख्यान आटोपताच मी त्याना भेटले. मला पाहताक्षणी तात्यासाहेब म्हणाले, " काय, मग करणार ना काम? अशी सधि वाया जाऊ देतां कामा नये बर का. " " कसल काम, तात्यासाहेब? मीच एका कामासाठीं आपल्याला आज मुद्दाम भेटायला आले आहे " मी जरा आश्चर्याने म्हटले. " तुमच काम मग बघू; पण त्या कामाच पुढे काय झाल? " " पण कसल काम? माझ्या नाही लक्षात आल? " " उगीच सोग पाघरू नका. आता सत्तादान झाल ना सांगलीला? तुमच्याकडे कांहीं अधिकार सोपवणार आहेत, अस आम्हाला पुण्याला कळल आहे. तुम्हीं स्त्रियानीं अशा वेळीं अवश्य पाऊल पुढे टाकलच पाहिजे. " सागली सस्थानांत नुकतीच लोकांच्या हाती सत्ता सुपूर्त करण्यात

आली होती. अजून अधिकाराच्या जागी विधिमंडळांतील कोणकोणत्या सद-स्यांची निवड व्हावयाची, ते ठरायचे होते का कोणास माहीत, पण काही अधिकार मजकडे सोपविले जाण्याचा संभव आहे, अशी सागलींत अकारण उठलेली दाट वदता, पुण्यास तात्यासाहेबापर्यंत जाऊन पोहोचली असेल, अशी मला तिळमात्र कल्पना नव्हती. "काही तरी उगीच बातमी उठली आहे, तात्या-साहेब ती; काही आधार नाही तिला अन् करायचे आहेत काय असले नाममात्र अधिकार? काम करताना नाही नाही त्या कायदेशीर आणि तांत्रिक अडचणी मात्र हव्या तेवढ्या. सत्तेबरोबर कामाच्या नियमात बदल होईल तेव्हाना –" मी पुढे काही बोलण्याच्या आत तात्यासाहेब एकदम जरा रुष्ट होऊन म्हणाले, "तुम्ही तक्रारीपासून सुरुवात करीत चला काम करणाऱ्याला अडचणी ह्या यायच्याच; म्हणून जबाबदारी पत्करायची नाही की काय? जबाबदारी पत्करली पाहिजे, काम करून दाखवल पाहिजे. अडचणीतून मार्ग काढण, त्या नाहीशा करण तुमच्याच हातीं आहे" काय ती निराधार उठलेली बातमी; पण त्याचे तात्यासाहेबाना केवढे महत्त्व वाटले! स्त्रियाच्या शिक्षणाबद्दल, स्त्रियाच्या प्रगतीविषयी त्याना किती तळमळ वाटत होती! शक्य त्या प्रकारे मला वेळोवेळी प्रोत्साहन देऊन या अफाट जगात वावरण्याविषयी एक दृष्टि देण्याचा त्यानी जो प्रयत्न केला त्याबद्दल मला त्याची स्मृति आमरण राहिल्यावाचून राहणार नाही.



## भास्करराव सदानंद तर्खडकर

### (जे. पी., मुंबई)

(१) १९३६ साली माझे आजोबा रा. ब दादोबा पाडुरग तर्खडकर, ज्याना मराठी भाषेचे पाणिनि म्हटले जाते, त्याच्या मराठी व्याकरणाचा शत-सावत्सरिक उत्सव मुबईत झाला. त्याचप्रमाणे पुणे व इतर ठिकाणींहि झाला. त्यासाठी पुण्याहून मला बोलावणे आले होते. तेथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विद्यमाने मराठी व्याकरण परिषद, व्याकरण प्रदर्शन व सभा झाली. रगाचार्य रड्डीशास्त्री अध्यक्ष होते. सभेपुढे "शुद्ध बोलण्याला व लिहिण्याला व्याकरणाची जरूरी आहे काय?" हा प्रश्न चर्चेस घेतला होता. मी तात्यासाहेबांच्याजवळ बसलो होतों. माझे भाषण झाल्यावर तात्यासाहेबाचे भाषण झाले. त्यांत ते म्हणाले कीं, "ही परिषद तज्ज्ञाची आहे खरी; पण मी तज्ज्ञ आहे असे म्हटले तर आपण हसाल, आणि मी अज्ञ आहे म्हटलें तर त्याहिपेक्षा अधिक हसाल; तेव्हां मी तज्ज्ञहि नाही व अज्ञहि नाही, तर मी आहे तरी कोण? त्यावर माझे उत्तर असे आहे की, मी 'अतज्ज्ञ' आहे. 'शुद्ध कसें बोलावे व शुद्ध कसे लिहावे

हे व्याकरण शिकल्याने समजते असे सांगण्यात येते. पण माझे मत तर असे आहे की, शुद्ध कसे बोलावे व शुद्ध कसे लिहावे हे व्याकरण न शिकल्याने समजते! 'येते व समजते' यातील फरक पाहिला म्हणजे मी काय म्हणतो ते लक्षात सहज येईल "

त्यानतर ह्या परिषदेस जी मडळी हजर होती त्या सर्वांना केसरी ऑफिस-मध्ये चहापार्टीस आमत्रण होते मीहि हजर होतो. तात्यासाहेब मजजवळ आले व त्यानी मला विचारलें कीं, 'भास्करराव, दुपारी झालेल्या माझ्या भाषणाचा तुम्हास राग तर नाही ना आला?' मी म्हटले, राग कशाचा येणार? प्रत्येक व्यक्तीला आपले विचार व्यक्त करण्यास मोकळीक आहे आपल्या मनात हा विचार तरी का यावा?

( २ ) प्रो वामन मल्हार जोशी, एम् ए, हे एक 'दादोबा पाडुरग मराठी-तील उत्तमात उत्तम ग्रथ' जो ठरेल त्या तीन परीक्षकापैकी एक परीक्षक होते ह्याच्या निधनाने दोनच परीक्षक हे पारितोषिक ठरविण्यास राहिले तिसऱ्या परीक्षकासाठी बरींच नावे सुचविली गेली होती माझ्यापुढे तात्यासाहेबाचे नाव प्रामुख्याने होतें, पण त्याना ह्यासबधाने विनती करणें कठीणच वाटले कारण त्याचा पुण्यात अनेक सस्थाशी सबध असल्यामुळे त्यास सवड होणार नाही म्हणून व त्याचे वयहि ध्यानात घेऊन मला त्याना लिहिणें जडच वाटले पण धीर करून त्याना मी पत्र पाठविलें मला त्या वेळेस असे वाटले की, त्याच्याकडून खात्रीने निराशेचेच उत्तर येईल पण त्याचे ताबडतोब उत्तर आले की, "मी मोठ्या खुषीने परीक्ष-काचें काम करीन व त्याप्रमाणे मुबई विश्वविद्यालयास कळवावे" मला आनद झाला व तो मी माझ्या पत्रात त्याना व्यक्त केला



## हरी भास्कर भिडे

( आयुर्वेदविशारद, उपसंपादक केसरी, पुणे )

( १ ) १९२४ साली मुबईला अखड भारत परिषदेचे अध्यक्ष म्हणून तात्या-साहेब गेले होते परिषदेचे सकाळचें काम सपले व मुक्कामावर जाण्यापूर्वी ते एका बड्या गृहस्थाकडे भेटण्यास जाणार होते. स्वयसेवक म्हणून मी त्याच्याबरोबर होतो. त्या गृहस्थाकडे जाण्यापूर्वी तात्या म्हणाले, "तेथे गेल्यावर खाण्यापिण्या-करिता मी बिलकूल तोड उघडणार नाही वयोमानामुळे मला आता सोसत नाही." तेथे गेल्यावर सन्मान करण्याच्या पद्धतीत उणीव भासेल म्हणून त्या सदगृहस्थाने मोठ्या अगत्याने उत्तम उत्तम फळे व मौल्यवान् मेवा वगैरे आणले तात्या बोलल्याप्रमाणे त्यांतील कांही न घेता, त्या गृहस्थाची क्षमा मागून फक्त अत्तर,

गुलाब वगैरे घेऊन उठून चालू लागले. जिन्यात खालीं येतांच मीं त्यांस विनोदानें म्हटले, ‘ तात्या, खाण्याकरिता तोंड न उघडण्याच्या तुमच्या प्रतिज्ञेमुळें माझ्या-सारख्याचे मात्र हाल झाले ! ’ तात्या एकदम हसून म्हणाले, ‘ गड्या, चुकलें खरे. पुन्हा ध्यानात ठेवीन. तुमचे असे हाल होऊ देणार नाहीं, अशी युक्ति करीन ! ’

( २ ) वेव्हेल योजनेला कॉंग्रेसने समति दिल्यानतर लाटसाहेबाच्या मन्त्रि-मडळांत कॉंग्रेस जाणार व हिंदुमहासभेचे अध्यक्ष डॉ मुकर्जी यांचें नाव एका मन्त्रि-पदाकरिता सुचविले जाणार अशी वार्ता प्रसिद्ध झाली लगेच तात्यानीं मुकर्जीनीं विचारल्यावरून त्यास तार करून ते पद स्वीकारण्यास समति दिली, ही वार्ताहि प्रसिद्ध झाली पण या प्रसगापूर्वीच पुणे येथे महासभेच्या कार्यकारिणीच्या बैठकींत वेव्हेल-योजनेचा धिक्कार करण्यात आला होता व आता त्याच तात्यानी मन्त्रिपदस्वीकाराचा सल्ला दिल्याचें वाचून मी सर्द झालो. त्या वेळीं मी वऱ्हाडात दौऱ्यावर होतो. आकोला येथून मीं त्याना रागाने त्याच्या या सल्ल्याचा निषेध करणारे कडकडून पत्र लिहिले. परत आल्यानतर पुढे दोन-तीन महिन्यानी काही कामाकरिता पुष्करिणीवर मी गेलो आता ती सर्व परि-स्थिति पार पालटली होती व काही कारणामुळे डॉ. मुकर्जी मन्त्रिमडळात गेलेहि नव्हते तात्याच्याकडील काम सपवून मी परतण्यास निघताच मला थाबवून एकदम त्यानी माझ्या त्या पत्राचे उत्तर सांगण्यास सुरवात केली अत्यत कळकळीनें व त्याच्या नेहमीच्या विवेचक पद्धतीने त्यानीं आपलें म्हणणे मला पटवून देण्याचा प्रयत्न केला; तथापि त्याने माझे पूर्ण समाधान झाले नाही पण माझे समाधान झाले ते येव-ढ्याचकरिता कीं, त्यानी इतके दिवस त्या पत्राची आठवण ठेवून माझ्यासारख्या एका लहान स्वयसेवकाच्या शकेचे निरसन करण्याचा निरहकारी प्रयत्न केला !



## दामोदर मोरेश्वर भट

### ( हिंदुमहासभेचे प्रमुख कार्यकर्ते, मिरज )

( १ ) दे. भ. रामभाऊ कानिटकर याच्या अध्यक्षतेखालीं पुण्यास टिळक मदिरात ॲंटी कम्यूनल ॲवॉर्ड् कॉन्फरन्स् भरली होती. महाराष्ट्रामधून सहस्रावधि स्वाक्षऱ्या कम्यूनल ॲवॉर्डच्या निषेधार्थ आलेल्या होत्या. मिरज येथील रहिवा-श्याच्या एक सहस्र स्वाक्षऱ्या घेऊन मी पुण्यास या सभेस उपस्थित राहिलो. अनेकाची भाषणे झाली. तात्यासाहेब बोलावयास उभे राहिले. भाषणाच्या ओघात डाव्या हाताच्या आगळ्याजवळच्या खाचेत उजव्या हाताचा उभा पजा करवती-प्रमाणे घाशीत ते म्हणालेः– “ गाधीनी असा हिंदूचा गळा कापलेला आहे ! मुसल-मानाकडून १६ ऑगस्ट १९४६ पासून आजवर हिंदूचे जे हत्याकांड चाललेले

आहे, आणि पुढे जे हिंदु-मुसलमानांचे अटळ युद्ध – ज्याचा प्रारभ मुसलमान करतील–दृष्टीपुढे उभे ठाकलेले दिसत आहे, त्याला इग्रज अशतः कारण असलें तरी गाधीशिकवण नि गाधीधोरण ह्या अनर्थाला तितकेच किंबहुना अधिकच जबाबदार आहेत."

( २ ) 'पुणे-करारा'च्या वेळी, म गाधीनीं येरवडा जेलमधून केळकराना त्याचे मत विचारले. "७४ च्या ऐवजी १४७ जागा अस्पृश्याना देण्यात चूक होत आहे व ह्या कारणाने बगालमधील स्पृश्य हिंदूना तर भयकर अन्याय पोंचणार आहे", असे त्यानीं आपलें मत सर्व बाजूचा विचार करून गाधीना स्पष्ट कळविले त्या वेळीं परिवारात बसलेल्या मडळीकडे तोड वळवून, त्याना केळकराचा अभिप्राय वाचून दाखवीत, गाधी उपहासपूर्वक उद्गारले, 'This is mathem … head!'

( ३ ) सुधारक मडळी, 'पुनर्विवाहाच्या कायद्या' चा वाढदिवस पाळीत असत! एके वर्षी कै सीतारामपत देवधर (सु न्यू इं. स्कूल, सातारा) हे पुण्यास व पुण्याचे केळकर हे साताऱ्यास या वाढदिवस प्रसगी मुख्य व्याख्याते होते. ज्ञानप्रकाशात दोघाच्या व्याख्यानाचे साद्यन्त वृत्तान्त प्रसिद्ध झालेले मी वाचले. मला चमत्कार वाटे, तो असा की, याचे वर्तन परस्पर भिन्न कसे? कारण गु देवधराच्या भाषणात शास्त्राधार देण्याची प्रवृत्ति आढळली वस्तुतः ते कडवे सुधारक, त्यानी शास्त्राची पर्वा का करावी? तसे तात्याचे नाहीं तात्यासाहेबाच्या भाषणात, "शास्त्राधार नाहीं, एवढ्यासाठी आपण अडून बसता कामा नये. देशकालपरिस्थित्यनुरूप नव्या अडचणी समाजात उद्भवल्या, तर त्या दूर करण्यासाठी नवे शास्त्र रचले पाहिजे – निर्माण केले पाहिजे" असा नव्या स्मृतीचा पुरस्कार होता. सनातनी समजल्या गेलेल्या लो. टिळकाच्या पक्षात हे बड-खोर कसे? असेहि माझ्या मनास मी विचारले. पुढे त्याच्याकडूनच खुलासा झाला ते म्हणाले, "समाज-धुरीणाचे हे कर्तव्य आहे कीं, काल-प्राप्त अडचणीचा परिहार करणारे शास्त्र निर्माण करणे हेच समाजाच्या जिवतपणाचे लक्षण त्यानी समजले पाहिजे व काल-देशवर्तमानानुरूप निर्वाहक शास्त्र प्रवृत्त करून, समाजास नवा आचार-धर्म शिकविला पाहिजे."

( ४ ) ५–६ वर्षापूर्वी तात्यासाहेब याना मी अथणी येथें व्याख्यानासाठी घेऊन गेलो. कानडी भाषेचा अभिमानी असा साहित्यिकांचा एक वर्ग अथणीस आहे. वदता आली की, तात्यासाहेबाच्या व्याख्यानात हे लोक विक्षेप करणार आहेत. तात्या समयसूचक पद्धतीने वागणारे, मोठे चतुर, समयज्ञ. शिवाय मनाची ठेवणहि त्यांची अशी कीं, देशातील भिन्नभाषी लोकानी एकमेकाच्या भाषेस शक्य तोंवर मान द्यावा. त्या दिवशींच्या व्याख्यानारभी कानडी भाषेविषयी आपली आदरबुद्धि याच सिद्धान्तावरून आहे, असे सांगून त्यांनी आपले कानडीचे प्रेम

लहानपणी पाठ केलेला एक कानडी श्लोक सर्वच्या सर्व पाठ म्हणून दाखवून व्यक्त केले! त्यायोगे कानडी भाषाभिमानी कन्नडिग-संघाचे समाधान होऊन त्यांनी तात्यांचे पुढील सर्व राजकीय विषयावरचे अप्रिय व्याख्यान शांतपणें ऐकून घेतले. व्याख्यानातील प्रतिपादन त्यांना मान्य होण्याजोगे नव्हते. कारण ते सर्व कॉंग्रेस-वाले होते. तात्यांनीं मात्र आपली प्रामाणिक मत त्या व्याख्यानात अति निर्भीडपणे मांडलेलीं होती

( ५ ) पुष्कळ वर्षांपूर्वी मिरजेस 'मिरज-विद्यार्थि-संघ' या संस्थेत एक चर्चा-प्रसंग आला तात्या हजर होते चर्चा चालू झाली; त्या वेळी एका गृहस्थाने तात्यांना विचारले, 'देशभक्ति कोणी करावी ?' तात्यांनी उत्तर दिले, 'सर्वांनीं देशभक्ति करावी ' या पृच्छकाने पुन. प्रश्न केला, 'सर्वांनीच देशभक्ति करून काय करावयाचे ?' तात्यांनी प्रतिप्रश्न केला, "सर्वांनीच जेवून काय करावयाचे ? काही लोक जेवतातच, तेव्हा बाकीचे उपाशी बसले तरी चालेल! असा तुमच्या प्रश्नाचा अर्थ होतो. तथापि सर्वांनी जगण्याकरिता जेवणे जसे सर्वांस अवश्य आहे त्याच-प्रमाणे काही ना काही देशसेवेचा, समाजसेवेचा उद्योग करणे प्रत्येक देशवासि-याचे अवश्य कर्तव्यच आहे." या युक्तिवादानें सदर गृहस्थाचे पूर्ण समाधान झाले व म्हणून त्याने विद्यार्थि-संघाचं काम करण्याचे व्रत पतकरले

( ६ ) तात्या मिरज येथील 'विद्यामंदिर' संस्थेस भेट देण्यास गेले अलीकडील त्यांच्या वहिवाटीप्रमाणे त्यांनी व्याख्यान न देता मंडळींनी चर्चा चालू करावी असा अभिप्राय प्रकट केला चर्चेस प्रारंभ एका तरतरीत मुलीच्या प्रश्नाने झाला. तिने विचारले, 'सहशिक्षण असावे की नसावे ?' तात्यांनी किंचित् हसून परत प्रश्न केला, "तुला काय वाटते ? तू आपले असे काही मत – उत्तर – या प्रश्नावर ठरवलेच असशील." मुलगी लाजून म्हणाली, "मला वाटते, सह-शिक्षण नसावे." तात्या अनुमतिदर्शक स्वरात म्हणाले, "बरोबर; तुला वाटते ते खरेच आहे. एक तर, मुलांमुलींचे काही विषय शिक्षणाचे समसमान असले, तरी मोठेपणी गृहिणीपद घ्यावे लागणाऱ्या स्त्री विद्यार्थ्यांस अभ्यासावयाचे काही काही विषय भिन्नच ठेवणें योग्य होईल मात्र, वरिष्ठ वैद्यकीय इत्यादि शिक्षण-संस्थांत, पुरेशा विद्यार्थि-संख्येच्या अभावी सध्या सहशिक्षण घेण्याचा प्रसंगच येतो! यास्तव निरुपाय म्हणून अशा संस्थांत सहशिक्षण समर्थनीय ठरेल. मात्र, हा नियम मानता येणार नाहीं. अपवादच समजला पाहिजे कारण, सोयहि पाहावी लागते." तात्यांचा हा अभिप्राय ऐकून त्या मुलीला व सर्वांना मोठा आनंद झाला

( ७ ) जेव्हां जेव्हा तात्या मिरजेस आले, तेव्हा तेव्हा मी त्यांना व्याख्यान देण्याचा आग्रह केलेला आहे. ते व्याख्यान देत सुद्धा, पण करार असा करीत, 'चर्चा ठेव; व्याख्यान नको ' मला 'होय' म्हणावे लागे पण, माझी नाराजी

पाहून म्हणत, " अरे, मी तीस वर्षे केसरीमधून आठवड्यांतून एकदा व आता तर दोनदांहि तुम्हा लोकाशीं इतके बोलत आलो आहें व इतरसुद्धा इतके लिहून ठेवलेले आहे की, त्यातलें तुम्ही घेतलें किती, तुम्हाला कळले किती नि काय, तें मला पाहावयाचे आहे एवढ्यासाठी मला चर्चा हवी. मला स्वतःला आता बोलण्याचा कंटाळा आला आहे. मला तुमचे विचार ऐकू द्या कीं." हे त्याचे म्हणणे अक्षरशः खरेच होते.



## दामोदर सीताराम कोंकजे

### ( जिल्हा प्रकाशनाधिकारी, पुणें )

( १ ) " पुण्यांतील प्रसिद्ध व्यक्तींना तुम्ही ओळखता काय ? " " होय ! कांही कांहीं व्यक्ति ओळखतो " " तुम्ही तात्यासाहेब केळकर याना ओळखता ? " " होय " " मग बातमीदार म्हणून तुमची नेमणूक करण्यास हरकत नाही. " १९२९.साली ऑक्टोबरमध्ये ज्ञानप्रकाशचे सपादक कै. काकासाहेब लिमये व उमेदवार या नात्याने त्यांच्यापुढे उभा राहिलेला मी याच्यात वरील प्रश्नोत्तरे झाली; आणि तात्यासाहेबाच्या शुभ नावाच्या आधारानेच माझें वृत्तपत्रीय जीवन सुरू झाले.

( २ ) १९३८ च्या जानेवारीत पुणे वार्ताहर-सघाचे पहिलेच स्नेह-समेलन पुणे नगरपालिकेच्या सभागृहात भरले होते. अध्यक्षस्थानी तात्यासाहेब हे होते. त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणात वृत्तपत्रव्यवसायाच्या अनेक अगाची व विशेषतः वार्ताहर-कौशल्याची विविध स्वरूपाची माहिती सागितली. या भाषणाच्या शेवटी त्यांनीं एक उत्तम वार्ताहर म्हणून माझ्याकडे अगुलीनिर्देश करून मोठ्या गौरवपर शब्दात माझा उल्लेख केला. त्यांच्या या अनपेक्षित शिफारशीमुळे मी एकदम प्रकाशात आलों ! या सभेला पुण्यातील अनेक थोर वकील, सरकारी अधिकारी व नागरिक हजर होते. त्याच्यापुढे तात्यासाहेबासारख्या थोर पत्रकाराकडून मला मिळलेल्या या शिफारशीमुळें सरकार-दरबारी माझा दर्जा वाढला. त्या वेळीं त्यानीं केलेल्या या उल्लेखाचा फायदा मला अद्यापिहि मिळत आहे. याच वेळीं त्यानीं वार्ताहर-सघाबद्दल बोलताना असे सागितलें कीं, " पुण्यातील वार्ताहरांनीं सघ केला ही गोष्ट या व्यवसायात काम करणाराच्या दृष्टीने फारच इष्ट अशी घटना झाली आहे. कारण संघ झाला कीं संप येतोच. असें सघ आणि सप याचें साहचर्य आहे. यापुढे वृत्तपत्राचा धदा करणाऱ्या मालक-मडळीनीं सावध होऊन या व्यवसायात काम करणाऱ्या लोकांची आर्थिक व्यवस्था नीट होईल अशी दक्षता घेतली पाहिजे; नाहीं तर त्याच्या व्यवसायाला धोका आल्याशिवाय राहणार नाहीं. " तात्यासाहेबांच्या इशाऱ्याप्रमाणें वार्ताहर व एकदर वृत्त-

पत्रव्यवसायी मंडळीच्या आर्थिक परिस्थितीकडे मालक-वर्गाचें लक्ष गेलें असून बऱ्याच सुधारणा झाल्या आहेत.

( ३ ) होतकरू लेखकाकडे तात्यासाहेबांचें विशेष बारकाईने लक्ष असे. १९३४ साली अप्पाबळवत चौकातील किबे वाड्याच्या भग्न अवशेषावर सध्याचें किबेलक्ष्मी थिएटर बाधण्यांत आलें त्या प्रसगी किबेवाड्याच्या मूळ उत्पत्तीपासून तों थेट प्रभात चित्रमदिरापर्यंतची त्या वास्तूवर घडलेल्या स्थित्यतराची माहिती देणारा असा एक लेख मी लिहून ज्ञानप्रकाशात माझ्या नांवावर प्रसिद्ध केला. त्या लेखाच्या प्रसिद्धीनतर सुमारें चार महिन्यानीं त्यांची भेट झाली त्यानीं आठवण-पूर्वक मला जवळ बोलावून माझा तो लेख त्याना विशेष आवडल्याचे मला सागितले व ऐतिहासिक माहिती अशीच गोळा करून लेख लिहावे असे प्रोत्साहन दिले.

( ४ ) १९४२ साली मी ज्ञानप्रकाशची नोकरी सोडली. त्या वेळी केसरीत नोकरी मिळाली तर करावी अशी माझी इच्छा होती, म्हणून तात्यासाहेबाच्या भेटीसाठी गेलो. नोकरी सोडण्याची कारणें त्यानीं सहानुभूतिपूर्वक ऐकून घेतलीं व नंतर ते म्हणाले की, " तुमच्यासारख्या वार्ताहरास मीं केव्हाच सोडले नसतें; परतु आज केसरीची सूत्रे माझ्या हातात नाहीत; शिवाय कागदाच्या टचाई-मुळे केसरीची पाने कमी झाली असून सध्या पटावर असलेल्या सपादकानाच भरपूर काम नाही. अशा परिस्थितींत त्या ठिकाणी अधिक वाढ करा असे त्या मडळींना सागणे योग्य होणार नाही. वास्तविक मी तुम्हास मागेंच बोलविणार होतो. तुमच्यासारखा वार्ताहर केसरीच्या पटावर असावा अशी माझी फार इच्छा होती. परतु त्या वेळी तुम्ही येथील एका चागल्या दैनिकात काम करीत असल्याने तुम्हास तेथून काढून घेणे योग्य झाले नसतें. एरवी मीं तुमच्यासारखा वार्ताहर हातचा घालविला नसता. तरी पण कोठेच जमले नाही तर पुन्हा अवश्य येऊन भेटा ", असे त्यानी विशेष आपुलकीने अभिवचन दिले होतें.



## सदाशिव रंगनाथ सुंठणकर

( बी. ए., एलूएल्. बी., वकील, बेळगांव )

( १ ) १९१६ च्या उन्हाळ्यात मुबई प्रांतिक परिषद भरली होती त्या वेळीं होमरूल या विषयावर लो. टिळकाचें व्याख्यान मी ऐकिले पुढे १९१७ साली बेळगांव येथे तात्यासाहेबाचें त्याच विषयावर व्याख्यान ऐकिले. दोघांच्या व्याख्या-नात मला जो महत्त्वाचा फरक दिसला तो असा :– लो. टिळकांचें भाषण ऐकून माझा जीव बेचैन झाला इग्रजास देशातून कसें हाकून देता येईल याविषयीं केवळ

माझ्याच नव्हे तर प्रत्येक श्रोत्याच्या डोक्यात विचार घोळू लागले. परतु तात्यासाहेबाचे भाषण ऐकल्यावर ब्रिटिश राज्य हे सपूर्ण अन्यायी आहे असे माझ्या बुद्धीस पटू लागलें. आपला मुद्दा पटवून देण्यासाठी तात्यासाहेब हे आपले बुद्धिसर्वस्व कसे खर्च करीत असत याचा प्रत्यय मला या वेळी प्रथम आला अर्थात् टिळकांची विचारसरणीसुद्धां बुद्धिप्रामाण्यावर अधिष्ठित असे यात शका नाही परतु बुद्धीबरोबरच भावनाहि चेतविण्याचे कार्य टिळक करीत असत. साराश, लोकमान्याचे भाषण मला सूर्याप्रमाणें तेजस्वी आणि प्रखर वाटले तर तात्यासाहेबाचें भाषण मला चद्राप्रमाणें प्रकाशमान नि प्रशान्त वाटले.

( २ ) १९२१ मध्ये मी फर्ग्युसन कॉलेजचा विद्यार्थी होतो. त्या वर्षी म. गाधीच्या असहकारितेच्या चळवळीनें उच्चाक गाठला होता. त्या सालच्या पावसाळ्यात शनिवार वाड्यासमोरील पटांगणात तात्यासाहेबाच्या अध्यक्षतेखाली अफाट जनसमुदायापुढे म [illegible] भाषण झाले मी त्याच्या खुर्चीच्या मागेच उभा होतो म. गाधीचे भाषण अर्थात् त्याच्या आवडत्या असहकारितेच्या कार्यक्रमावर झाले व तो कार्यक्रम जर आचरणात आला तर सहा महिन्यात स्वराज्य नक्की ठेवलेले असे म गाधीनी प्रतिपादिलें. शेवटी तात्यासाहेबानी सडेतोड नि स्पष्टोक्तिपूर्ण असा समारोप केला आपल्या समारोपात तात्यासाहेब आपले स्वत.चे अतःकरण पिळवटून महात्माजीना उद्देशून उद्गारले की, "महात्माजी ! तुमची बहिष्कारत्रयी अव्यवहार्य आहे, इतकेच नव्हे तर ती देशहितविघातक आहे असे माझ्या बुद्धीस प्रामाणिकपणे वाटते शाळा-कॉलेजावर बहिष्कार घालण्यास सांगून तुम्ही एका सबध पिढीच्या शिक्षणाचे नि सस्कृतीचे मातेर करता आहात ! त्याचप्रमाणे वकील बॅरिस्टरासारखा बौद्धिक दृष्ट्या समर्थ पक्ष राजकारणापासून दूर ठेवून हिंदी [illegible] अपरिमित नुकसान करता आहात तसेच कायदे-कौन्सिलावर बहिष्कार [illegible] लावून आपल्या पुढाऱ्यास मिळणारी राजकीय शिक्षणाची सधि वाया जाऊ देता लोकाचे प्रतिनिधि कौन्सिलात नसल्यामुळे सरकार दडपशाहीचे कायदे पास करून जनतेची हालअपेष्टा करीत आहे. स्वराज्य तर ५–६ महिन्यात मिळणेच शक्य नाही; मग लोकास अशा हालअपेष्टा सोसण्यास का भाग पाडता ? माझ्याविषयी म्हणाल तर, मी हवा तो त्याग करण्यास तयार आहे केवळ खादीच नव्हे, तर गोणपाट सुद्धा वापरण्यास माझी खुषी आहे " त्या वेळचा देशाच्या भवितव्याबद्दल हवालदील झालेला त्याचा चेहरा व त्यावर स्पष्टपणे व्यक्त होणारी देशहिताबद्दलची त्यांची तळमळ ही आजहि माझ्या नजरेसमोर स्पष्ट उभी राहतात. पुढे ७–८ महिन्यातच चौरीचौराचा दगा झाला. म. गांधींनी चळवळ मागें घेतली. तात्यासाहेबाची वाणी खरी ठरली व दास-नेहरू हेहि त्याच्या वळणावर आले !

( ३ ) १९३७ मध्ये मी धारवाड येथे वकिलीचा धंदा करीत होतो व धारवाड येथील महाराष्ट्र मंडळाचा प्रमुख कार्यकर्ता होतो त्या वर्षी तात्यासाहेबांनी म्हैसूरला दौरा काढला होता. दौऱ्याहून परतताना वाटेत आमच्या मंडळास भेट देण्याविषयी मंडळातर्फे आम्ही त्याना विनंती केली. आमच्या विनंतीस मान देऊन त्यानी धारवाड येथील महाराष्ट्र मंडळास भेट दिली. धारवाडच्या सदर्न मराठा बँकेच्या सभागृहांत त्यांचे सुमारे एक हजार नागरिकांपुढे 'परप्रांतांत महाराष्ट्र मंडळाची आवश्यकता' या विषयावर सुश्राव्य व्याख्यान झाले व्याख्यानास कन्नडिग बंधूचा बराच समुदाय उपस्थित होता परप्रांतात महाराष्ट्रीय संघटनेची जरूरी कशी आहे हे त्यानी मोठ्या खुबीने सूचित केले ते म्हणाले, "आपली कर्तृत्वशक्ति, मगदूर किती आहे याचा विचार करून महाराष्ट्रियांनी आपले धोरण निश्चित करावे समजा की, आपल्याजवळ एक चमचाभरच साखर आहे ती आपल्या एका चहाच्या कपात टाकून चहा गोड करून प्यावा का ती एखाद्या ओढ्यात टाकून देऊन ओढा गोड करण्यासाठी धडपड करणे बरे, याचा विचार करून महाराष्ट्रियांनी आपले वर्तन ठेवावे " हे त्यांचे भाषण कानडी मंडळीनांहि फार आवडले.

( ४ ) व्याख्यान आटोपल्यावर त्याच दिवशी श्री पटवर्धन वकील यांच्या घरी तात्यासाहेबाबरोबर तेथील महाराष्ट्रियांची खाजगी स्वरूपाची चर्चा झाली. त्या वेळी महाराष्ट्रीय मंडळींनी "आपण आपल्या काँग्रेसमध्ये का सामील होत नाही," म्हणून तात्यासाहेबाना विचारिले यावर तात्यासाहेब उद्गारले की, "माझी भूमिका मी अनेक वेळा 'केसरी'तून व अन्यत्र स्पष्ट केलेली आहे म गांधीच्या चळवळीला बुद्धिप्रामाण्याचे अधिष्ठान नाही, अर्थात् ते मला पटत नाही. माझ्या मनोवृत्तीला ढोंगाचे वावडे आहे. केवळ लोकप्रीतीसाठी मी गांधीचे अगर काँग्रेसचे राजकारण मान्य करणार नाही." या प्रसंगी नुकतेच रशियातून प्रकट होऊन बोलबाला होत असलेल्या कॉ. एम्. एन्. रॉय यांच्या राजकारणाविषयी केळकरांचा अभिप्राय मी विचारला. तेव्हा तात्यासाहेब म्हणाले की, "रॉय हे विद्वान् आहेत. बुद्धिप्रामाण्यवादी आहेत मध्यम वर्गाचे पुढारी आहेत परंतु त्यांचे राजकारण आपल्या समाजास मानवणार नाही. आपल्या परंपरेशी व भूतकालाशी आपला असलेला संबंध आपण अजिबात तोडला पाहिजे अशी त्यांची शिकवण असल्यामुळे, ते विद्वान् आणि बुद्धिमान् असूनहि अखेरपर्यंत एकाडे शिलेदारच राहतील."

( ५ ) १९४० मध्ये बेळगाव येथे श्रीमती क्षमाराव यांच्या अध्यक्षतेखाली गीर्वाणवाणी परिषदेचे पहिलें अधिवेशन झालें त्या अधिवेशनास तात्यासाहेब जातीने उपस्थित होते. इतकेच नव्हे तर स्वतः सत्तरीच्या दारांत असता त्यांनीं

संस्कृतसारख्या कठीण नि इतिहासजमा असलेल्या भाषेंत सुबोध भाषण केलें या त्यांच्या व्यासंगाबद्दल सर्वांनाच त्यांचे मोठे कौतुक वाटले.



## विनायक महादेव आपटे

### ( एम्. ए., पीएच्. डी., प्राध्यापक, मुंबई )

( १ ) १९३९ फेब्रुवारी-मार्चची अहमदाबादमधील गोष्ट. मी त्या वेळी अहमदाबादच्या 'महाराष्ट्र-समाजा'चा अध्यक्ष होतो गिरण्यासारख्या औद्योगिक व इतर विविधक्षेत्रात गुतलेल्या बुध्युपजीवि व श्रमजीवि अशा महाराष्ट्रियांची संख्या अहमदाबादेंत सुमारे ८ ते १० हजारापर्यंत आहे, व या सर्वांना उपयुक्त वाटणारी अशी 'महाराष्ट्र-समाज' ही एक सर्वसंग्राहक संस्था आहे. ह्या समाजाच्या अधिकृत उत्सवापैकी श्रीदासनवमीच्या उत्सवाकरिता तात्यासाहेब याना आणण्यांत आले होते त्या वेळी त्याची तीन व्याख्याने होऊन त्याना मानपत्र देण्याचा मोठा थाटाचा समारंभ झाला या निमित्ताने तात्यासाहेब मजकडे उतरले होते

बोलता बोलता मी त्यास विचारले, "मित्र, सहकारी व [illegible] या नात्यांनी लोकमान्य टिळकाकरिता आपण जे कार्य केले ते लोकमान्याना त्याच्या हयातींत पसत होते; इतकेच काय तर त्याच्या मृत्यूनतर त्याच्या आत्म्याला सतोष वाटेल असे ते झाले आहे ह्याबद्दल मतभेद महाराष्ट्रात नाही पण आपल्या भाषणात व विशेषतः लेखात लोकमान्याविषयीच्या वर्णनात वा उल्लेखात विभूति-पूजेची उत्कटता व भावनावशता न आढळल्यामुळे पुष्कळ टिळकभक्ताचा थोडासा विरस होतो हे आपणास माहीत आहे काय ?" यावर ते उत्तरले, "हे मी जाणतो; पण त्याला उपाय नाही, माझी 'प्रकृती'च तशी आहे शिवाय ( स्मित करून ) दोन प्रेमी माणसाची – [illegible], पितापुत्र, मातापुत्र, बन्धुभगिनी अशा सारख्याची – गोष्ट घ्याना ! या जोड्यापैकी एकजण जेव्हा दुसऱ्याची स्तुति लोकात प्रकट रीतीने, अगदी आवर्जून, आवेशाने करतो, त्यावेळी 'या दोघाची नुकतीच थोडीशी कुरबुर झाली असावी' असे काही श्रोते तरी कुजबुजतील की नाही ? बोला, यात काय ते सर्व समजा !"

( २ ) काही मडळी घरी [illegible] आली त्या वेळी चर्चा चालली असता एकानें पृच्छा केली, "तात्यासाहेब ! कॉंग्रेसच्या अध्यक्षाची खुर्ची व आपली खुर्ची यात काही इंचाचेच अतर उरलेले [illegible], गाधीयुग सुरू होऊन मतभेदामुळे आपण मागे सरलात, त्या वेळी अध्यक्षपदाचा म्हणजे राजकारणातील अत्युच्च मान व कीर्ति याचा मोह आपण कसा आवरू शकलात ?" यावर ते म्हणाले, "याची कारणे तीन; एक म्हणजे स्वमतनिष्ठा; याबद्दलचे श्रेय अर्थात् आपण सर्व मला

देतांच; दुसरे कारण म्हणजे स्वतःच्या महत्त्वाकांक्षेला मर्यादा घालण्याचें सामर्थ्य मजजवळ असल्यामुळें माझ्या मनाला एकप्रकारची शाति प्राप्त झाली आहे. तिसरें कारण, मी स्वतः वाङ्मयसेवेपासून प्राप्त होणाऱ्या कीर्तीला व आनदाला ज्यास्त चिरतन व श्रेष्ठ मानतो हे होय ”

( ३ ) ‘मोठा माणूस’ कोणाला म्हणावे ? तर त्याला की, ज्याच्याकडे लोक जातात, पण जो स्वतः खास बोलाविल्याशिवाय, त्याच्या घरीं जाऊन भेटीची परतफेड, स्वतःला सवड असली तरी, करीत नाहीं तो, अशी एक अनुभवसिद्ध व्याख्या अलीकडे दुर्दैवाने तयार झाली आहे!! परतु तात्यासाहेबांनीं तीन-चारदा माझ्यासारख्याच्या घरीं येऊन आपल्या निरभिमान वृत्तीने मला चकित करून सोडले आहे!



## मोरेश्वर रामचंद्र ढमढेरे

( एम्. ए., एल्एल्. बी., ॲडव्होकेट, सरदार, पुणें )

( १ ) दे. भ. तात्यासाहेब केळकर याचे माझे प्रत्यक्ष बोलणें-चालणे प्रथम १९१९ च्या सप्टेंबर किंवा ऑक्टोबरमध्ये झाले तोपर्यंत त्याना देशांतील एक फार मोठे देशभक्त, विद्वान् नि व्यासगी सपादक आणि लो. टिळकाचे उजवे हात म्हणून मी ओळखत असे एवढ्या मोठ्या माणसाकडे बोलावणे करण्यास जाण्याचा बहुमान मला मिळाला होता. मी त्या वेळी फर्ग्युसन कॉलेजमध्ये फेलो होतो; आणि आमच्या क्लबात एका ‘फीस्ट’साठीं त्याना निमत्रण करण्याचे ठरले होते; आणि ती कामगिरी करण्याचा मान मला मिळाला होता पोटात भीति अशी वाटे की, तात्यासाहेब जेवणास येत नाही असे म्हणाले तर काय करावयाचे ? अशा चिंतेत आदरयुक्त आणि किंचित् भीति-युक्त अत.करणाने मी त्याच्या घरी गेलो मला वाटले, एवढा मोठा गृहस्थ, तेव्हा दरवाजावर चिठीचपाटी लागत असेल, म्हणून माझे नाव टाइप करून आणि त्या-पुढे ‘बी. ए (ऑनर्स) दक्षिणा फेलो फर्ग्युसन कॉलेज’ असें लिहून तो कागद बरोबर घेऊन मी गेलों पाहतो तों दरवाजावर कोणी मनुष्य नाही की कोणी नाहीं; म्हणून तसाच आत घुसलो आणि पाहतो तो समोरच एका खुर्चीवर काहीतरी काम करीत तात्यासाहेब बसलेले! मीं माझ्या हातातील चिठ्ठी त्यास दिली. चिठ्ठी वाचून ते किंचित् हसले आणि म्हणाले, “बोला, काय काम ?” मी भीतभीतच जेवणास बोलावणे देण्यास आलो आहें असे सागितले त्यानी कोणत्या दिवशीं, किती वाजता वगैरे विचारले आणि ‘बरे आहे, येतो” असें ते म्हणाले. अर्थात् मला आनद झाला आणि कॉलेजमध्ये मी परत आलो

ठरल्या वेळी तात्यासाहेब आले आणि आमची जेवणे मोठ्या आनदात झाली. जेवताना अनेक विषयांवर गप्पा चालल्या होत्या त्याच्या वेळच्या डेक्कन कॉलेज वसतिगृहामधील पुष्कळ गोष्टी त्यानी सागितल्या, आणि आमच्या चित्तवृत्ति आनदवून सोडल्या. पानसुपारी खाता खाता त्यानी त्याच्या वेळच्या एका फेलोची गोष्ट सांगितली. त्यावेळी माझी चिठ्ठी वाचून त्यानी हास्य का केले ते मला कळले! डेक्कन कॉलेजमध्ये एका पहिल्या वर्गामध्ये पास झालेला व प्रिन्सिपॉलच्या मर्जीतील एक विद्यार्थी त्या वर्षी फेलो म्हणून घेण्यांत आला होता. त्याच्याबद्दल इतर विद्यार्थ्यांना फारसा आदर नसे; परतु तो मात्र आपण फार मोठे शिष्ट आणि विद्वान् अशा ऐटीत वागत असे. कॉलेजमधील मुले त्याच्याकडे उपहासात्मक दृष्टीने पाहून दुर्लक्ष करीत तो पदवीदानसमारभास जाऊन मुबईहून परत आला. तरी कोणी त्याला विचारीना की, ‘ तू कुठे गेला होतास ? ’ शेवटी त्याने आपल्या डाव्या हाताच्या करगळीला एक फडके बाधले आणि तो जेवणास येऊन बसला तेव्हा कुणी एकाने सहज ‘ काय हो ! बोटाला काय झाले ? ’ असे विचारले त्याबरोबर त्याने तो सेकडक्लासमधून कॉन्व्होकेशनकरिता कसा गेला आणि येताना त्याचे बोट सेकडक्लासच्या दरवाजात कसे सापडले, याचे वर्णन करण्यास सुरुवात केली त्याचा सागण्याचा उद्देश तो सेकडक्लासमधून फेलो म्हणून कॉन्व्होकेशनला मुबईस गेला होता हे श्रोत्याच्या मनावर बिंबवावे ? हे ऐकून मडळीत खूपच हशा पिकला. पण तेवढ्यात माझ्या एका स्नेह्याने ‘ हे फेलो तसे नाहीत. हे गुणाने फर्स्टक्लासमध्ये आल्याकारणाने फेलो झाले आहेत ’ असे सागितले त्याबरोबर तात्यासाहेबानी ‘ ते मला माहीत आहे; पण फेलो म्हणजे काय चीज असते, ते मला सागावयाचे होतें ’ असे उत्तर दिले तात्यासाहेब येऊन परत जाईपर्यंत २–३ तास ते आमच्याशी जसे काही आमच्यापैकीच एक, इतक्या तन्मयतेने वागत होते !

( २ ) लो. टिळक विलायतेहून परत आल्यानतर त्याना फर्ग्युसन कॉलेजमधील विद्यार्थ्यांनी पानसुपारी करण्याचे ठरविले. प्रिन्सिपॉल पराजप्यानीं कॉलेजमध्ये ही गोष्ट करण्यास परवानगी दिली नाही, तेव्हा आम्ही ‘ वैदिक आश्रमा ’मध्ये ती करण्याचे ठरविले रात्री आठच्या सुमारास लो टिळक, तात्यासाहेब इत्यादि मडळी आली. वैदिक आश्रम नुसता विद्यार्थ्यांनी फुलून निघाला होता. प्रथम स्वागतपर भाषण प्रो लिमये यानी केले; आणि सर्व थोर मडळीस हार घालून आम्हास उपदेशाचे चार शब्द सागण्यास विनती केली. टिळकाच्या सागण्यावरून तर तात्यासाहेब बोलावयास उभे राहिले. तात्यासाहेब किती शालीन आणि किती विनयशील होते ह्याची त्या वेळी आम्हाला कल्पना आली. ते म्हणाले, “ आज तुम्ही मला हार घालून माझा गौरव केला हे ठीक झाले, परतु ह्याचा खरा अर्थ मी जाणतो. गजिफा खेळणारांना

माहीत आहे की, सुरक्याबरोबरच्या कोणत्याहि एका फडतुस पानालाहि एक पान सुरक्याला मिळतें तसेंच मिळत असते. टिळकांबरोबर कोणीहि असला तरी त्याला हार हा मिळावयाचाच! टिळक त्या डावाचे सुरक्या आहेत आणि मी त्यांच्याबरोबरचें केवळ एक साधें पान!" असे भाषण करून त्यांनीं आपले भाषण संपविलें नंतर टिळक बोलावयास उभे राहिले. त्यानी प्रथमच तात्यासाहेबाच्या ह्या भाषणाचा उल्लेख केला आणि कोटीवर कोटी करून म्हणाले, "आतांच तात्यासाहेबांनीं मला सुरक्या आणि स्वतःला साधें पान म्हटले, परंतु गंजिफा खेळणारांना हेंहि माहीत असते कीं, रात्रीचा सुरक्या निराळा आणि दिवसाचा सुरक्या निराळा. एकाचे राज्य संपल्यानंतर दुसऱ्याचे राज्य सुरू होते; त्याप्रमाणे माझ्यानंतर आमच्या तात्याचे राज्य सुरू होईल." लो टिळक त्या दिवशी जवळजवळ एक तास बोलले, त्यांत तात्यासाहेबाच्याबद्दल त्याचे मत त्यानीं स्पष्टपणे सांगितले तात्यासाहेबाचा विनय मोठा कीं टिळकांची गुणग्राहकता मोठी?

( ३ ) आपण स्वतः मागे राहून दुसऱ्या माणसाला पुढे आणावयाचे, त्याला प्रत्येक बाबतीत संधि द्यावयाची, साधने द्यावयाचीं आणि आशीर्वाद द्यावयाचा, हाच तात्यासाहेबाचा मूळ स्वभाव सन १९४३ साली दिल्ली येथील मध्यवर्ती विधिमंडळाची निवडणूक झाली; आणि त्यात आमच्या पक्षातर्फे बॅ. जम्नादास मेहता निवडून आले. निवडणूक मंडळाच्या मुख्य कार्यालयाचा मी कार्यवाह होतो श्री अण्णासाहेब भोपटकर याच्या आज्ञेमुळे हे काम मला पतकरावे लागले. निवडणुकीच्या दिवसात मी कित्येक वेळा १५–१६ तास काम प्रत्यही करीत असे. तात्यासाहेब मधूनमधून येऊन काम कसे काय चालले आहे हे पाहून जात असत. जम्नादास निवडून आल्याचा आनंद साहजिकच आम्हा सर्वांस झाला माझ्या कामाबद्दल स्वतः जमनादास, अण्णासाहेब भोपटकर यानी माझे कौतुक केले, परंतु मला माझ्या समाधानात काहीतरी कमतरता आहे असं सारखे वाटत असे एक दिवस सकाळीच तात्यासाहेब माझ्या दरवाज्यात उभे! मला मोठे नवल वाटले. तात्यासाहेबाची व माझी इतक्या वर्षांत बरीच घसट वाढली होती. तरी देखील इतक्या सकाळच्या प्रहरी हे का आले असावेत ह्याचा बोध होईना तात्यासाहेब म्हणाले, 'वर चला .... काम आहे.' मी जरा बिचकत बिचकतच त्याच्या मागोमाग माडीत गेलो मला त्यानी जवळ बोलावले आणि अक्षरशः माझ्या पाठीवरून हात फिरवून मला शाबासकी दिली! त्या वेळीं मला कळले की, माझ्या समाधानातील कमतरता तात्यासाहेबाच्या शाबासकीमुळे भासत होती! आईबाप वारल्यानंतर इतक्या प्रेमळपणाने माझ्या पाठीवरून हात क्वचित्च कोणी फिरविला असेल! त्या वेळीं मला खरोखर

धन्यता वाटली. वास्तविक माझ्यापेक्षा कर्तृत्वाने आणि अनुभवाने ज्यास्त अशीं कितीतरी माणसे आमच्या पक्षांत होती; परतु मला उत्तेजन देऊन, कौतुक करून, कार्योद्युक्त करण्याकरितां तात्यासाहेबांची ही केवढी दक्षता व उदारमनस्कता !

( ४ ) १९४१ सालीं मुबईस अखड हिंदुस्थान परिषद मुबई प्रातापुरती भरली होती. तिचे अध्यक्षस्थान तात्यासाहेबानी मडित करावे अशी मुबईकर मडळीची फार इच्छा तात्यासाहेबांनी त्याच्या विनतीला मान दिला व जाण्याचें कबूल केले मी तात्यासाहेबाना सहज म्हटले, "तात्यासाहेब, तुमचे भाषण छापण्यापूर्वी आम्हास वाचावयास मिळेल काय ? ' त्यावर त्यानी ताबडतोब 'होय' म्हणून सागितले आतापर्यंत माझी तात्यासाहेबाच्या बाबतीतील भीड बरीचशी चेपली होती, म्हणजे कोल्हा सिहाजवळ जाऊन बसून क्वचित् प्र॰ ना आयाळाला हातहि लावू शकत होता ! भ.पणा॰। हस्तलिखित प्रत माझ्याकडे तात्यासाहेबानी पाठवून दिली मी ती वाचली, आणि परत तात्यासाहेबाच्याकडे जाऊन त्यात काही थोडाफार फरक करण्याचा किवा काही अधिक मजकूर घालण्याचा आम्हास अधिकार आहे काय असे विचारले त्यावर ॰या॰। 'अवश्य' असे उत्तर दिलें मला वाटला तेवढा भाग मी त्यातून गाळला आणि एक सबध परिच्छेद त्यात घालण्या करिता म्हणून लिहून नेला होता, तो त्याना वाचून दाखविला त्याना तो भाग फार पसत पडला, आणि तो त्यानी आप॰या भाषणात ।॰।ल। मला मोठी धन्यता वाटली

( ५ ) गेल्या सालच्या टिळकपुण्यतिथीच्या निमित्ताने आम्ही एक लहानशी-खासगी सभा माझ्या घरी बो॰ा॰ि॰। होती ह्या सभेस मह॰ाग्र॰ा॰ल ठळक ठळक सुमारे पन्नास माणसे सर्व पक्षातील मिळून बोलाविली होती. प्रतिवर्षाप्रमाणें हा कांहीं फक्त टिळकपक्षीयाचाच मेळावा नव्हता. ह्या सभेस देशातील काही फार मोठ मोठे पुढारी आले होते त्याचा नामनिर्देश मी मुद्दामच करीत नाही. त्या सभेस तात्यासाहेब स्वतः उपस्थित होते सकाळी आठ वाजता सभेस सुरवात झाली. पुष्कळच मोकळया मनाने चर्चा झाली ११॥ च्या सुमारास तात्यासाहेब उठून गेले, आमची सभा चालूच होती वृद्धपणामुळे अलीकडे दुपारचे जेवण त्याना ११ च्या सुमारास लागत असे आणि जेवण ।। ॰ानर एक तासभर त्याना स्वस्थ झोप पाहिजे असे मी घरात ह्या सर्व गोष्टींची सूचना देऊन ठेविलेली होतीच तात्या-साहेब उठले ते मुकाट्यानें खाली स्वयपाक घरात जाऊन माझ्या कुटुबास त्यानी त्याचे ताट वाढण्यास सागितले आमची सकाळची सभा सुमारे दुपारच्या एक वाजेपर्यंत चालली होती ! मी सभा सपल्यावर खालीं येऊन पाहतो तो तात्यासाहेब जेवण करून वामकुक्षी करण्याकरिता आमच्या मोठ्या दिवाणखान्यात झोपले आहेत ! मी चौकशी केली तेव्हा मला हे सर्व कळलें दुपारच्या सभेला पुन तात्यासाहेब हजरच ! रात्रीं आठच्या सुमारास ते घरी जाण्याकरिता निघाले. मी

त्याना ‘ सकाळच्या जेवणाच्या वेळी मला वेळेचे भान राहिले नाहीं, त्यामुळें आपणांस स्वतः खाली जाऊन व्यवस्था करून घ्यावी लागली ’ असे म्हटले. त्यावर ते म्हणाले, “ त्यात काय एवढे मोठ मनाला लावून घेण्यासारखे आहे ? शिवाय मी काही ह्या घरात परका थोडाच आहे ? तुमचे कुटुब म्हणजे नात्याने माझी मुलगीच लागते ! ” कारण माझ्या कुटुबाच्या माहेरचे आडनाव ‘ केळकर ’ आणि तात्यासाहेब तर त्या कुळाचे महत्तम भूषण! माझ्या सबध घराबद्दल त्याची एवढी आपलेपणाची भावना होती, म्हणून मी स्वतःला फार भाग्यवान् समजतो.

( ६ ) माझ्या घरी एक चागले सोनचाफ्याचे झाड आहे पावसाळ्याच्या सुरवातीला रोजच्या रोज हजार हजार तरी फुले निघत असत एके दिवशी मी त्यातील उत्कृष्ट अशी शेदोनशे फुलें घेऊन तात्यासाहेबाच्या घरी गेलो, आणि ती फुले त्याना दिली. तात्यासाहेबाना फुलाची भारी आवड. फुले पाहून त्याना फार आनद झाला. ह्या वेळेपर्यंत तात्यासाहेब मला स्वत च्या घरच्या मोठ्या वडील माणसाइतके जवळचे वाटत त्याना माझ्याविषयी किती आपलेपणा वाटत असे ह्याची अर्थातच मला कल्पना नव्हती पण पुढे काही दिवसानी मला त्याची पूर्ण कल्पना आली. डिसेबरची थडी म्हणजे मी म्हणत होती तात्यासाहेब सकाळी उठून, उबदार कपडे घालून आणि पायांत जाड लोकरीचे पायमोजे घालून, गळ्याभोवती उपरणे गुडाळून एके दिवशी सकाळी ते माझ्याकडे आले हातांत एक पिशवी होती ती दिसल्याबरोबर मी साहजिकच त्यांच्या हातातील सामान घेण्याकरितां हात पुढे केला, पिशवी खुंटीवर अडकविली आणि ओटीवरच्या झोपाळ्यावर ते बसले होते, त्यांच्यासमोर बोलण्याकरिता उभा राहिलो. ते म्हणाले, “ पिशवी खुटीवर अडकविण्याकरिता आणली नाही; पिशवींत काय आहे ते तर पाहा. ” मी पिशवी उघडली तो त्यात तावडीकाळीं गर्हिऱ्या रगाची वागीं ! मी ती खुटीला अडकवून ठेवू लागलों. ते म्हणाले, “ आमच्या बगल्याच्या मागील बागेत अण्णाने वागीं लावली होती. फार चागलीं आहेत. म्हटलें, आज तुम्हास थोडी द्यावीत ” मी मनात फार आनदित झालो. परतु स्वतः तात्यासाहेबानी आपल्या हातातून ती वागी आणली हे मला पटले नाही. मी म्हटले, “ कोणाबरोबर का पाठविली नाहीत ? स्वतः का आणलींत ? ” त्यावर ते हसून म्हणाले, “ घरचे काम करण्याची मला कोणीं काय मनाई केली आहे ? ” असे म्हणून त्यानीं माझ्या कुटुबास बाहेर बोलावून वागीं घेऊन जाण्यास सांगितलें. वास्तविक तात्यासाहेबांच्या मानाने मी किती लहान आणि ते केवढे मोठे ! पण आकाशस्थ सूर्य चिखलापाण्यातल्या कमलाना काय लांबचें समजतो ? ‘ व्यतिषजति पदार्थान् आतरः कोऽपि हेतुः ’ हेच खरे !

( ७ ) तात्यासाहेबाच्या ‘पुष्करणी’ बगल्यात मी मधून मधून जात असे, तेहि

पण गावात आले म्हणजे केव्हाहि माझ्याकडे येऊन तास दोन तास बसून गप्पा मारून जात असत गावांत सभा असली म्हणजे सभा सपल्यानतर माझ्या घरी येऊन तास-भर गप्पा मारल्याशिवाय जावयाचे नाही असा एक जवळजवळ अलिखित नियमच झाला होता ! सभा असो वा नसो, तात्यासाहेब एक दिवसा आड तरी माझ्याकडे सायकाळी येत असत. आणि राजकारण, समाजकारण, काव्यनाटकादि ललितवाङ्मय, आचारविचार, भावी गोष्टी, आशाआकाक्षा इत्यादि गोष्टीबाबत त्याचे विचार ते बोलून दाखवीत असत त्यामुळे तो तास दीड तास कसा जाई हे आम्हास कळतहि नसे. तात्यासाहेब माझ्या घरी पुढच्या माडीत बसावयाचे ही गोष्ट आमच्या अगदी आगवळणी पडली होती तात्यासाहेबाच्या निधनाची विराट सभा सर परशुराम-भाऊ कॉलेजच्या ग्राउडवर भरली होती. सभा सपल्यानतर मी आणि माझे मित्र श्री. मामाराव दाते, इतर मित्र-मडळीसह आमच्या पुढच्या माडीत येऊन बसलो होतो. मन दुःखाने अगदी भरून गेले होते. त्या माझ्या माडीत दरवाजासमोर खिडकीखाली बसण्याकरितां दोन गाद्या घातलेल्या असत. त्यात तात्यासाहेबाची एक जागा ठरलेली असे तीवर सहसा कोणी बसत नसत. आम्ही येऊन बसल्या-वर साहजिकच सभेबाबत बोलणे चालले होते. मामाराव दाते मात्र मधूनमधून दाराकडे पाहत होते मी त्याना काही वेळाने विचारले, 'मामा, तुम्ही दरवाजाकडे सारखे काय पाहता ? ' ते एकदम म्हणाले, ' मी सारखा वाट पाहत होतो, तात्या-साहेब आता इतक्यात येतील ! ' बोलता बोलताच त्याची चूक त्याच्या लक्षात आली आणि त्यानी जीभ चावली ! आमच्या सर्व मडळींचे डोळे अश्रूंनी भरून आले. आता तात्यासाहेब पुनः या जन्मी कसले दिसतात ! माझ्या माडीतील त्या गादीवरील त्याची जागा आता कायमचीच मोकळी पडली आहे ! !



## य. वि. पुरंदरे

### ( एम्. बी. बी. एस्., डॉक्टर, मुंबई )

( १ ) तात्यासाहेबाची व माझी पहिली भेट स. १९०४ साली झाली. सार्व-जनिक कार्य करणाराने कोणतें पथ्य सभाळले पाहिजे याची रूपरेषा त्या वेळी त्यानी मला सागितली. ते म्हणाले, "आपल्या सद्सद्विवेक बुद्धीला जागृत ठेवून निरपेक्षबुद्धीने व आत्मविश्वासाने कार्य करीत राहावे प्रामाणिकपणे असे कार्य करूं लागल्यावर वैयक्तिक मानापमानापेक्षा कार्याच्या उपयुक्ततेकडे लक्ष ठेवावे खोटा अभिनिवेश मनाशीं बाळगून केवळ लौकिकाकरिता कार्य करण्याचा आविर्भाव आणणे योग्य नव्हे. थोडक्यात, सार्वजनिक कार्य करणाराने 'समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः। शीतोष्णसुखदुःखेषु समः सग-

विवर्जित॰ ॥ ही तत्त्वे आत्मसात् करावी ' तात्यासाहेबानी केलेले हे मार्गदर्शन माझ्या सार्वजनिक आयुष्यात मला फार उपयोगी पडले.

( २ ) सार्वजनिक कार्यात प्रामुख्याने आस्थापूर्वक व विशेष कळकळीने मी शुद्धीकरणाच्या प्रश्नाकडे आपले लक्ष केंद्रित केले आहे. मी यथाशक्ति इतर मित्राच्या सहाय्याने सन १९३२ पासून शुद्धीकरणाचे कार्य करीत आहे. पण शुद्धीकृताना समान दर्जा व हक्क देण्यास समाजाची तयारी नसते, असा अनुभव मला आला शुद्धीकरणाचे कार्य यशस्वी होण्यास कोणत्या मार्गाचा व साधनाचा अवलब करावा, यासबधी तात्यासाहेबाबरोबर मी अनेक वेळा विचारविनिमय केला होता शुद्धीकरणाच्या कार्यात अनेक अडचणीचे व वादग्रस्त प्रश्न समाधानकारक रीतीने सोडविल्यावाचून परधर्मात गेलेले लोक पुन्हा स्वधर्मात येण्यास तयार होत नाहीत या बाबतीत तात्यासाहेब म्हणाले, " शुद्धीकरणाचे कार्य प्रभावी व यशस्वी व्हावयास समाजाचे मतपरिवर्तन करण्याचा प्रयत्न करणे जरूर आहे. असे मतपरिवर्तन झाल्यावर शुद्धीकृताना समाजात पूर्वीचा दर्जा प्राप्त होऊ लागेल व त्यामुळे धर्मांतर केलेले अनेक लोक स्वधर्मात स्वखुशीने येऊ लागतील व शुद्धीकार्य प्रभावी होईल. " तात्यासाहेबाच्या मार्गदर्शनानुरूप समाजाचें मतपरिवर्तन करून जे शुद्धीकार्य आम्ही केले ते यशस्वी झाले व पुढेंहि ते यशस्वी होईल असा आत्मविश्वास वाटतो.



## राजाराम जगन्नाथ बनारसवाले

### ( वक्ते, मालक, लोकमान्य सेन्ट फॅक्टरी, वाई )

( १ ) १९२१ सालची गोष्ट. पुण्यास जीवदया-परिषदेचे तात्यासाहेब अध्यक्ष होते. अनेक धर्मपथाचे प्रतिनिधि एकामागून एक बोलत होते. त्यांत एकाने ख्रिश्चन धर्मावर हल्ला चढवून येशू ख्रिस्त विधवापुत्र असल्याचे बोलू लागतांच तात्यासाहेबानी त्यास गैरलागू बोलण्यास प्रतिबधिले. तसेंच ते म्हणाले, " एक तर, हे बोलणे विषय सोडून आहे; व असे प्रत्येक धर्मात कांही तरी आहेच. उदाहरणार्थ, आपली कुतीची गोष्ट घ्या. इ० ". तात्यासाहेब न्यायप्रिय होते. त्याना कोणतीहि गैर गोष्ट खपत नसे.

( २ ) १९२१ साली पुण्यास शनिवारातील नातूच्या हौदासमोरच्या गोडबोल्यांच्या वाड्यात गणेशोत्सवातील व्याख्यानाचे तात्यासाहेब अध्यक्ष होते. विषय होता ' हिंदुधर्माचे रहस्य '. व्याख्याते श्री. भोपटकर यानी सागितले कीं, हिंदूनी आपली सस्कृति विस्तारण्यासाठी धर्मप्रसारार्थ तरवारहि चालविली, इत्यादि. अर्थात् तात्यासाहेबांना हे पटले नाही. आपल्या भाषणात हे सारे

खोडून काढून ते म्हणाले, "हिंदु धर्माचे दरवाजे बाहेरून कधींच उघडत नाहींत त्यामुळे बाहेरून कोणीहि आत येत नाहीत. उलट हे दरवाजे आतूनच बाहेर उघडतात व लोक परधर्मात जातात. येथेंहि आता जसे हें चालले आहे!" (तात्यासाहेबाच्या भाषणास नेहमीच गर्दी येथे तर कमाल भीड झाली होती. तरीहि लोक आत येण्याची धडपड करीत होते. पण दरवाजावरील स्वयसेवक त्याना आत येऊ देत नव्हते; मात्र आंतून बाहेर जाणाऱ्याना जाऊ देत होते. श्रोत्याना हेच पाहण्यास तात्यासाहेबानी सागून आपल्या भाषणाचे स्पष्टीकरण केले!) तात्यासाहेबाच्या मार्मिकपणावर श्रोते खूष झाले समर्पक उपमाची योजना, मला वाटते, कालिदासानतर इतक्या अप्रतिमपणे करणारे तात्यासाहेबच. ते कोणताहि विषय अशा रीतीने सोपा करून तेव्हाच पटवून देत.

(३) १९२२ साली गाधर्व महाविद्यालच्या सभेत तात्यासाहेबानी श्रोत्याना सागितले की, "गाधी तुरुगात असून राजकारण फरफटले जात आहे. अशा वेळी इमारत खचली असता शहाणा एन्जिनियर जसा पाया तपासून उपाययोजना करतो, त्याप्रमाणे आपण तपासणी केली पाहिजे. तेव्हा यासाठी १९१६ च्या अमृतसरच्या कॉंग्रेसपर्यंत आपणास मागे जाऊन धोरण ठरविले पाहिजे आणि कौंसिलें काबीज केली पाहिजेत." या त्याच्या सूचनेचा माझ्या जीवनावर परिणाम झाला. मीं त्या वेळी माझ्या जीवनाची तपासणी करून मार्ग बदलला व १९२४ साली लोकमान्य सेंट फॅक्टरीची स्थापना केली तात्यासाहेबानी फॅक्टरीच्या भाडवलासाठी शुभशकून म्हणून, माझ्या विनतीवरून, एक रुपया दिला आहे. पुढे ते फॅक्टरींत आल्या वेळी त्याना ह्या मागील गोष्टीच्या आठवणी सागितल्या होत्या. त्या ऐकून त्याना आनद झाला.

(४) वरीलप्रमाणे आणखीहि एक प्रसग माझ्या आयुष्यास वळण देण्यास कारणीभूत झाला पुण्यास शिवाजी मदिरातील एका सभेत देशासाठीं स्वार्थत्यागपूर्वक कार्य करणाऱ्या एका देशभक्ताचा उल्लेख करून तात्यासाहेब म्हणाले, "त्याग करण्यासारखें आधीं कमवून दाखवावे व मग त्यागाच्या गप्पा माराव्या. खरी व सक्रिय देशभक्ति तर पुढची गोष्ट आहे." त्या वेळीं आपल्या स्वार्थत्यागाची जाहिरात देणाऱ्या दे भ याची भली भाऊगर्दी झाली होती!

(५) स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमाचा मसुदा तयार करण्यासाठीं प्रमुख स्वराज्यपक्षीय लोकाग्रणी मुबईस सरदारगृहात जमले होते. रोज सभा होत. अशीच एक सभा दादरला होती. नतर तेथे जाहीर सभा झाली. खूप गर्दी लोटली होती. केळकर येण्यास थोडा अवकाश होता. इतक्यात एक गृहस्थ हाती 'लोकमान्य' पत्राचा अक घेऊन मजकडे आले व केळकरावर तोंडसुख घेत त्यानीं सदर पत्रातील मजकूर मला दाखविला. आदल्या दिवशीच्या सभेंत केळकरानीं वाटेल त्या

अटींवर तडजोड करण्याची तयारी ठेवून कोऱ्या कागदावर सही करून तो त्यांनीं देशभक्त गंगाधरराव देशपाण्ड्याकडे दिला होता; पण अशाहि सौजन्याचा उपयोग न झाल्याने स्वराज्यपक्ष निघत असल्याचें सागितले होते आणि त्या 'लोकमान्य' पत्राच्या अर्की दे. भ. देशपाण्ड्यानी या गोष्टीचा इन्कार केल्याचें छापले होते ! त्या गृहस्थास मी केळकराकडूनच योग्य उत्तर मिळवून देण्याचे आश्वासन दिलें. इतक्यात केळकर आले ते येताच मीं त्याना हे सर्व सागितले त्यानीं मला व्यासपीठावरच बसवून घेतले व सभेस सुरवात करताना कोऱ्या कागदाबद्दल मुद्देसूदपणें खुलासा केला; आणि पुढे लवकरच एका केसरींत "कोऱ्या कागदाची कहाणी" म्हणून अग्रलेख लिहिला. ती कहाणी इतकी सुदर वठली कीं, अजूनहि ती वाचनीय आहे !



## गोविंद नारायण बर्वे

( केसरी छापखान्यांतील यंत्र-विभागांतील कामगार, पुणें )

१९३२ साली जुलै-ऑगस्टमध्ये माझ्या थोरल्या बधूची नेमणूक तात्यानीं केसरी कचेरींत केल्यावर बहुधा ७–८ दिवसानींच माझ्या वडिलाची प्रकृति बरीच बिघडली. डॉक्टर-सर्जन आले व काही विशिष्ट गोष्टी भावाजवळ सागून गेले वडिलाना ताबडतोब मिरजेस नेण्याचे ठरले. माझे दोन्ही बधु त्याना घेऊन मिरजेस गेले व ५–६ दिवसांनी त्यांचे ऑपरेशन झाले. बधूचे मला पत्र आले कीं, " ती. तात्यांना मुद्दाम भेट व त्याना सर्व हकिकत कळव आणि सांग कीं, नोकरीवर रुजू होण्याबरोबरच हे सकट आमच्यावर कोसळले; त्यामुळे माझा नाइलाज झाला. यातून मोकळा होताच मी कामावर येतो वडिलाचा भरवसा नाही आमचें उभे शेत नाहीसे होण्यासारखे दिसते ! अशा वेळीं आपण लावलेलें रोपटे तरी जगवावे. त्याची वाढ होऊन आम्हाला सावली मिळेल कृपादृष्टीत अतर पडू देऊ नये. थोडा विलब होईल खरा, पण परिस्थिति ध्यानीं घेऊन क्षमा करावी." मी त्याच दिवशीं तात्याकडे गेलो, गहिवरलो, मला बोलवेना त्यानीं काळजीपूर्वक कारण विचारलें. त्याबरोबर मी भावाचे पत्रच त्याच्या ..। दिले तें त्यांनीं वाचले व क्षणभर ते देखील बेचैन झाले पण लागलीच म्हणाले की, " बर्वे, तुमच्या भावाला कळवा कीं, काही काळजी करू नका; घाबरून जाऊ नका; वडिलाना बरे वाटेल मग सावकाशीनें या कामावर, नोकरी कुठे जात नाही. मी अेकदा नोकरीवर घेतलेला मनुष्य कांही विशेष कारणाशिवाय सहसा काढीत नाही वडील आजारी पडले यात त्याचा काय दोष ? त्याना मीं कायम केले आहे म्हणून लिहा. तोडून टाकण्यासाठीं रोप लावलेले नाहीं म्हणावें ! " – केवढे हे बहुमोल उद्गार !



## नारायण विनायक भोंडे

### ( बी. ए., एल्एल्. बी., ॲडव्होकेट, पुणें )

( १ ) देशी चढाओढीच्या सामन्यात यशस्वी संघास पारितोषिके वाटण्याचा समारभ पी वाय्. सी. हिंदु जिमखान्याच्या पॅव्हिलियनमध्ये १९२२ साली हनुमान-जयतीच्या दिवशीं सकाळीं व्हावयाचा, तेव्हा चिटणीस म्हणून मी तात्यासाहेब यास बोलावण्यास गेलो. ते बरोबर सकाळी ७ ला हजर ! पारितोषिके जिंकणारे व सामना-कमिटीचे पदाधिकारीहि उपस्थित नव्हते ! ! तेव्हा उद्वेगानें केळकर म्हणाले, " आम्हांस स्वराज्य पाहिजे म्हणतो, पण राज्यकर्त्यांच्या साध्या गुणाचे अजून अनुकरण होत नाहीं. वेळ साभाळण्याची पाश्चात्याची पद्धति आपण अनुसरली पाहिजे अध्यक्ष खुर्चीवर येऊन बसला म्हणजे इतरेजन त्वरित जमून शक्य तितका टळणारा वेळ वाचतो "

( २ ) केळकरास कामाचा कटाळा नव्हता. १९३० च्या एप्रिल-मे महिन्यात मुबई इलाखा पोस्टल व रेल्वेमेल सघाचे अधिवेशन बडोदे येथे व्हावयाचे होते केळकर यांनीं अध्यक्षस्थान मडित करावें ही आमची इच्छा मध्यवर्ती कायदे-मडळाचे काम उरकून दिल्लीहून केळकर नुकतेच आले होते. तेव्हा त्यानीं उपस्थित होण्याबद्दल नकार दिला मी व येथील माजी सब-पोस्टमास्तर चोळकरप्रभृति मडळी त्याच्याकडे गेलो व त्यानी अखेर निमत्रण स्वीकारले व ते बडोद्यास आलेहि त्याना अत्यत दगदग झाली होती त्यांची प्रकृतिहि नीट नव्हती. तेव्हां आम्ही पदाधिकारी त्यांना म्हणालो, " विषय-नियामक कमिटीची बैठक पाचसहा तास चालून ती पहाटे २॥–३ वाजताहि सपणार नाहीं. तेव्हा तुम्ही बैठकीस उपस्थित राहिला नाहीं तरी आम्ही निभावून घेऊ " त्यावर केळकर म्हणाले, " भोंडे, हे पहा ! मला सर्व विषयाची व शक्य तेवढ्या तपशिलाची माहिना मिळाली पाहिजे एकदा मी आल्यावर तुमच्या परिषदेच्या सर्व कार्यक्रमास उपस्थित होणार " व त्याप्रमाणे पहाटे दोन वाजेपर्यंत ते हजर होते !

( ३ ) रा. ब. दादासाहेब काळे याच्या मुलाचा विवाह-समारभ झाला समाज मोठा होता व तात्यासाहेबांस प्रथमच विडा, पुष्पगुच्छ वगैरे दिले. त्याचा वेळ वाचावा म्हणून आम्ही मडळी म्हणालों ‘ आपण वाटल्यास निघावे. ’ त्यावर ते हंसत म्हणाले, ‘ मी मनुष्यातून उठलो नाहीं ! ’

( ४ ) पुणे येथील एका विमा कंपनीच्या खटल्यात केळकराची साक्ष झाली त्या वेळीं उलटतपासणीत वकिलानी त्यांना विचारलें की, " तुम्ही प्रोसिडिंग-बुक पाहिले तेव्हा अमुक एक ठराव झाला होता का नाही ? " साक्षीदार केळकर म्हणाले, " तो पुस्तकात असणार; मी काय सांगू ? " वकील पिच्छा पुरवून उत्तर या म्हणून

म्हणाले. तेव्हा केळकर म्हणाले, " ह्या माझें उत्तर टिपून ह्या पुस्तकात नमूद केले ते ठराव झाले आहेत. नमूद नाहीत ते ठराव झाले नाहीत ! " श्रोतृवृंदात हंशा पिकला !



## शं. वि. गोखले

( शिक्षक, महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे हायस्कूल, पुणें )

( १ ) १९१४ च्या युद्धाची गोष्ट सर्व तरुण आय्. टी. एफ्. मध्ये लष्करी शिक्षण घेण्यासाठी हौसेने प्रविष्ट झाले होते मुंबई विश्वविद्यालयाने सेकंड क्लास मार्क मिळणाऱ्याच्या विषयात सूट ( Exemption ) देऊन सैनिक विद्यार्थ्यांना प्रोत्साहन दिलें होते पण आय् टी एफ्.चे रूपांतर यू. टी सी मध्यें झाल्याबरोबर आम्ही न कळविताच विश्वविद्यालयाने तो क्रम एकदम थांबविला; म्हणून त्याविरुद्ध आम्ही मुंबईस व्हा चॅन्सेलर याना समक्ष भेटून खटपट केली मी पुण्यास आल्यावर मुद्दाम तात्यासाहेबांना ह्या प्रकरणात भेटलो. माझ्याजवळ आम्ही केलेल्या प्रचार-प्रकाशनाची कात्रणे वगैरे बरेच कागदपत्र होते; पण ते सर्व वाचण्यात वेळ न घालविता त्यानी जरूर त्या गोष्टीबद्दलची एक-दोन प्रश्नांत माझ्याकडून माहिती घेतली व मला उभाउभीच रजा दिली. दुसऱ्याच दिवशीच्या अंकात " मुंबई विश्वविद्यालय व यू टी सी. " असे एक स्फुट आलेले मला आढळले; मला आश्चर्य हे वाटले की, एका विद्यार्थ्याने केलेल्या सूचनेचा तात्यासाहेबानी इतक्या आपुलकीने परामर्श कसा घेतला ! या सर्वांचा परिणाम असा झाला की, विश्वविद्यालयाची हल्लीची 'एक्झेमशन पद्धत दुसऱ्या वर्षी सर्वांनाच लागू करण्यात आली !

( २ ) सासवडच्या गणेशोत्सवात तात्यासाहेबाना आम्ही निमंत्रण केले होते. त्या वेळी त्यानी सांगितले की, " मी आज भाषण करणार नाही लेख लिहून व भाषणे करून ३०-४० वर्षे तेच केल्याने मला कंटाळा आला आहे व माझ्या शिकवणीचे तुम्हीं काय चीज केले याची परीक्षा मी का घेऊ नये ? तेव्हा आज भाषण न करता तुम्ही वाटेल ते प्रश्न मला विचारावे व मी त्याची उत्तरे द्यावी असा कार्यक्रम करा " त्याप्रमाणे अनेकानी अनेक प्रश्न विचारले त्या प्रश्नाच्या लायकीवरून सासवडकराना तात्यासाहेबांना फक्त पासिंग मार्कच दिले ! एका प्रश्नाचे उत्तर त्यानी फार गमतीने दिले ! तो प्रश्न :- सहवासोत्तर की सहवासपूर्व कोणता विवाह योग्य ? तात्यासाहेब हसत म्हणाले, " माझ्या पत्नीचा स्वभाव मला अजून समजला नाही तेव्हा सहवासाची व्याख्या कशी करणार ते सांगा ! " सर्व मंडळी हसली. नतर एका प्रमुख कॉंग्रेसपदाधिकारी

गृहस्थाने त्याना विचारलें कीं, महाराष्ट्रातील या दोन पक्षाचें ऐक्य नाही का घडू शकणार ? केळकर म्हणाले, "या 'देवाना' जोपर्यंत आमच्या पक्षाशीं बोलणे म्हणजे स्वर्गातून दोन पायऱ्या खाली उतरणे असे वाटतें आहे तोपर्यंत हे कसे घडावे ?"

( ३ ) १९२०च्या गाधी-चळवळीच्या लाटेत कोणासहि त्यानीं भलताच त्याग करण्याचा भरमसाट उपदेश केला नाही आम्ही विद्यार्थी कॉलेज सोडावे काय, असें विचारण्यास गेलो; तेव्हा त्यानी स्पष्ट सागितले, "केलेल्या त्यागाबद्दल पश्चात्ताप होईल अशी भीति ज्याना वाटत असेल त्यानी तसे करू नये पण राष्ट्रासाठी एक वर्ष विधायक कार्य करण्यास म्हणून सोडावयाचे असल्यास असे कार्य जरूर करावे." सारासार विचार व विवेचकपणा हे त्याचें ब्रीद होते.

( ४ ) दे. शकरराव देव आदीनी शिवाजी-मदिरात केळकराच्या अध्यक्षतेखाली चार दिवस व्याख्याने देऊन उलट केळकरावरच टीका केली म्हणून पाचव्या दिवशी समारोपात त्याच्या सर्व मुद्दयाना त्यानीं जमीनदोस्त करणारें उत्तर दिले. त्या वेळी "कॉंग्रेसप्रेमी लोकानी कॉलेज-शिक्षणाला कलालखाने म्हणून स्वतः मात्र ताडीच्या गाडीवर मागे जशा पानाच्या झिरमिळ्या किंवा तुरे खोचून ठेवतात, तशा आपल्या पदव्या त्यानीं अजून जपून ठेवल्याच आहेत !" अशा एका सुदर दृष्टान्तानें त्यानी टोला दिला. त्याने सभेत आनद व विनोद निर्माण झाला.

( ५ ) ती. कै. बाबासाहेब गोखले वकील याचे निधन हे अगदी शातपणें झालें. वडिलांची शुद्ध शेवटपर्यंत कायम होती शेवटच्या वेळी डॉक्टरी उपाय थकल्यावर निर्याण निश्चित आहे असे ठरल्यावर त्यानी त्या वेळी आमच्या घरीं श्री. माटे मास्तर राहात असत; त्याना बोलावून सागितले की, केळकरांना माझा निरोप सागा कीं, "तुमच्या केसरींतील बहुमोल लेखामुळे मला आयुष्यात फार आनद प्राप्त झाला." यावरून अतकाळीं समाधान व शाति मिळण्यास केसरी कसा कारणीभूत होई व केळकराच्याबद्दलचा जनतेत आदर कसा वसत होता हेहि दिसून येते.



## मारुती गणेश अरगडे

(एल्‌एल्‌. बी., ॲडव्होकेट, पुणें)

( १ ) तात्यासाहेब याचे 'ऐलथडीचा मोक्ष' या विषयावर दि. २५-११-४४ ला व्याख्यान होतें. तात्यासाहेबाच्या व्याख्यानाचा योग वाया जाऊ द्यायचा नाहीं एवढ्याकरिता हे व्याख्यान ऐकण्यास मी गेलो. विषयाच्या या विचित्र उत्सुकतेनें मी व्याख्यानास बसलों. सुरवातीसच त्यानी ऐलथडी म्हणजे नदीला जे दोन

तट असतात, त्यांपैकी अलीकडील तट म्हणजे ऐलथडी होय व तेथेंच म्हणजे व्यवहारी जगात वावरत असतांना मोक्ष मिळविणे कसें शक्य आहे याचें साधार विवेचन केले. त्यानी सर्व व्याख्यान इग्रजीत लिहून आणले होते त्यामध्ये सत ज्ञानेश्वर, उपनिषदे, वेद यातील उतारे होते. यावरून त्याची गाढ विद्वत्ता व ज्ञानाची चौफेर दृष्टि दिसून आली व्याख्यानास पाच मिनिटेच बसावयाचे असे प्रथम मीं ठरविले होतें. पण, तात्यासाहेबानी हा किचकट व अवघड विषय आपल्या रसाळ वाणीने सुलभ करून सागितला यामुळे दोन तासपर्यंत सर्व श्रोतृसमुदाय मत्रमुग्ध होऊन गेला. मीहि व्याख्यानात रगलो व दोन तासाचे भान राहिले नाही शिवाय व्याख्यानातील महत्त्वाचे मुद्देहि मी टिपून घेतले.

( २ ) मुसलमान, ख्रिश्चन, पारशी वगैरे धर्मांच्या नवीन वर्षाच्या पहिल्या दिवसास सरकारी सुट्टी मिळते पण हिंदूच्या पाडव्याला सुट्टी तर नाहींच, उलट १९४२ सालीं मॅट्रिकच्या परीक्षेस पाडव्यासच सुरवात होणार होती. याविरुद्ध पुणे हिंदु [illegible] सघाने जोराची चळवळ केली व युनिव्हर्सिटी अधिकाऱ्यांकडे हजारो सह्याचे अर्ज पाठविले या बाबतीत विद्वान्, जबाबदार व्यक्तीचे मत कळावें म्हणून मी तात्यासाहेबाच्याकडे गेलो त्या वेळी ते लिहीत बसले होते. मीं आमचे गाऱ्हाणे त्याच्यापुढे माडले व आपला पाठिंबा देण्याविषयी विनती केली. [illegible] लागलीच कागद घेऊन त्यावर सरकारच्या या अन्यायाविरुद्ध युनिव्हर्सिटी-कडे पाठविण्याचें विनतीपत्रक तयार केले व त्यावर आपली स्वाक्षरी केली. नंतर ज्ञानप्रकाशचे सपादक वझे, र पराजपे वगैरेकडे जाऊन त्याच्या स्वाक्षऱ्या मिळविण्यास त्यानीं सागितले. त्याच्या या झटपट काम उरकण्याच्या पद्धतीकडे पाहून मला आश्चर्य वाटले तसेच मजसारख्या साध्या स्वयसेवकाने [illegible] या गोष्टीवर विश्वास ठेवून, सर्व विषयाची माहिती घेतली व त्यात काय करणे शक्य आहे हें स्वतःच्या हाताने लिहून मार्गदर्शन केलें मोठमोठ्या राजकीय पुढाऱ्याकडे आधी प्रवेश मिळणे मुष्कील त्यातून [illegible] भेट होऊन त्यास एखादी गोष्ट आपण [illegible] तर त्यावर विश्वास बसून, त्यात भाग घेऊन, मार्गदर्शन करणे अगदीच कठीण असा नेहमी अनुभव येतो, पण तात्यासाहेबाच्या बाबतींत मात्र निराळाच अनुभव मला आला खरा !

( ३ ) [illegible] रणसग्राम [illegible] सुरू केला होता. त्याला पाठिंबा देण्यासाठी शनवारवाड्यापुढे नागरिकाची प्रचड सभा अण्णाराव भोपटकर याच्या अध्यक्षतेखाली झाली तात्यासाहेब या सभेला आपणहून उपस्थित राहिलेले पाहून सर्व तरुणांना आश्चर्य वाटले व त्याचा उत्साह वाढला.

सभेची व्यवस्था उत्कृष्टपणे ठेवली होती मीहि सभेत भाषण केले. येवढ्या मोठ्या समुदायापुढे व शेजारीं वदनीय पुढारी बसले असता बोलावयास उभे

राहणें म्हणजे धाडसच होतें व यामुळें मला बोलतां येतें कीं नाहीं याची शंका होती. माझें भाषण झाल्यावर तात्यासाहेब पाठीवर थाप मारून मला म्हणाले, " शाबास, ठीक बोललात. प्रयत्न करा म्हणजे चांगले वक्ते होऊं शकाल." त्यांच्या बोलण्यामुळे मला किती आनंद झाला हें सांगतां येत नाहीं. सभेच्या एकंदर व्यवस्थेकडे पाहूनहि 'स्वयंसेवकांनीं सभेची व्यवस्था उत्कृष्टपणें ठेवली' असे उद्गार त्यांनीं काढले. खरोखर मोठ्या पुढाऱ्यांच्या एक-दोन शब्दामुळें तरुण कार्यकर्त्यांचा उत्साह वाढतो व तात्यासाहेबांच्या या गुणामुळें तरुणांना ते आपल्यांतीलच एक असे वाटत होते !



## शंकर गोपाळ तुळपुळे

(एम्. ए , पीएच्. डी., प्राध्यापक, सोलापूर)

(१) तात्यासाहेबाशी माझा जो काहीं थोडा सबध आला तो मुख्यतः गुरुशिष्य या नात्याने आला सन १९३६ मध्ये मी मराठी हा विषय घेऊन एम् ए झालो व मुबई विद्यापीठाने त्याच वर्षी सुरू केलेल्या डॉक्टोरेटच्या पदवीसाठी अभ्यासहि करू लागलो आज मराठी हा विषय घेऊन पीएच् डी.स बसू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्याना मार्गदर्शन करण्यास ज्याना विद्यापीठाची मान्यता मिळाली आहे असे पाचसात अध्यापक आहेत परतु तेव्हाची परिस्थिति निराळी असून ज्याना विद्यापीठाची मान्यता आहे, असे तात्यासाहेब हे एकटेच मार्गदर्शक होते साहजिकच त्याना भेटून मी 'यादवकालीन मराठीचा भाषाशास्त्रीय अभ्यास' हा विषय पीएच्. डी. साठी सशोधनार्थ म्हणून निवडल्याचें सागितले. तावडतोब तात्यासाहेबांनी केवळ मान्यताच नव्हे तर प्रोत्साहनहि दिले परतु, आपण स्वतः भाषाशास्त्रात अनभिज्ञ असल्यामुळे 'मार्गदर्शन' असे करू शकणार नाही, असे त्यानी स्पष्टपणे सागितले " आपल्या नावाचा उपयोग करून जर कोणास पुढे येण्यास वाव मिळत असेल तर आपण का मागे घ्यावे ? या विचाराने मला स्वतःला भाषाशास्त्राचे ज्ञान नसताहि मी तुमचा मार्गदर्शक होण्यास समति दिली. माझी अपेक्षा खरी ठरली यात मला आनद आहे ", असे म्हणाले

वरील आठवण विस्ताराने दिली आहे; ती अशाकरिता की, दुसऱ्यास शक्य तेवढा आधार तर द्यावा; पण स्वतःस अपरिचित अशा क्षेत्रात खोटा अधिकार मात्र गाजवू नये, हा तात्यासाहेबाचा मनोधर्म त्यावरून स्पष्ट होतो. त्याचें 'मार्गदर्शन' मला झाले नाही हे खरं; पण त्याबरोबरच निष्कारण विरोध न करता त्यानी मला आपुलकीनें साहाय्य केलें हेंहि तितकेंच खरे आहे. स्वत:च्या मर्यादा ओळखून दुसऱ्यास होईल तितकी मदत करणें हे मनाच्या मोठेपणाचें लक्षण आहे असें

मी समजतों. तात्यासाहेब हे मनाचे मोठे स्वतंत्र व निर्मळ होते. असो. पुढें मी सुट्टींत पुण्यास जाई तेव्हां त्यांची भेट होईच. दर खेपेस ते हसून म्हणत, "तुम्हा प्रोफेसर लोकांची मोठी चैन आहे. सहा महिने काम, सहा महिने सुटी ! भरपूर वाचावं, भरपूर लिहावं. मला नेहमी वाटत, जन्माला यावं आणि प्रोफेसर व्हावं !"



## अनंत वासुदेव फडणीस

### ( तात्यासाहेबांचे खाजगी चिटणीस, पुणें )

( १ ) दिल्लीस असेंब्लीची बैठक चालू असता एके दिवशी तात्यासाहेब यांचा कान दुखू लागून ठणका लागला. तेथील प्रसिद्ध डॉक्टरास कान दाखविला. त्याच्या व डॉ मुंजे यांच्या सांगण्यात हे मोठे दुखणे आहे, तेव्हा एकदम मुंबईस जाऊन डॉ गोपाळराव देशमुख यास दाखवून लवकर उपचार करावा असे ठरले. रात्री ठरल्याप्रमाणे मी व ते उजाडताच निघणाऱ्या पेशावर मेलने निघून मुंबईस आलों लागलीच डॉ. देशमुख यांची गाठ घेऊन त्यावर ऑपरेशन केले पाहिजे असे ठरले दुसऱ्या दिवशी ऑपरेशन केले त्या वेळी देशमुख, आठवले, कैकिणी, टिळक वगैरे सुप्रसिद्ध डॉक्टर हजर होते. ते कर्णमुळाचे ऑपरेशन होते डॉ कैकिणी यांच्या दवाखान्यात ते राहिले होते परंतु सांगावयाची गोष्ट ही की, पुण्यास त्यांनी घरच्या मंडळीस कळवू दिले नाही ते म्हणत, येथे उत्तम व्यवस्था आहे उपचारहि चांगले चालले आहेत. तेव्हा पुण्यास कशास कळविता ? परंतु ऑपरेशनची बातमी वर्तमान-पत्रद्वारे पुण्यास चार दिवसांनी कळून त्यांची मंडळी आली. त्यांच्या संकोची वृत्तीचे हे एक उदाहरण आहे

( २ ) वरील ऑपरेशन झाल्यावर आठदहा दिवसांनी कानास पट्टया बांधलेल्या स्थितीत, असेंब्लीमधील एका महत्त्वाच्या बिलावर आपलं मत देणें हे आपले कर्तव्य आहे हे जाणून, ते तसेच दिल्लीस त्या दिवशी जाऊन बिलावर मत देऊन दुसऱ्या दिवशी परत आले ! नंतर पुन्हा हॉस्पिटलमध्ये राहिल्यावर त्यांची प्रकृति दुरुस्त होऊन ते परत दिल्लीस गेले यावरून जे कार्य आपण पत्करले आहे, ते जिवास कष्ट झाले तरी करावयाचे, हा त्यांचा निश्चय व्यक्त होतो

( ३ ) असेंब्लीच्या बैठकी चालू असता गव्हर्मेंट हाऊसमध्ये खाने, चहा-पार्टी वगैरेंची आमंत्रणपत्रे सर्वांप्रमाणे यानाहि यावयाची. परंतु सहसा ते त्यांचा स्वीकार करून जात नसत. अशा पार्टीस जाऊन त्यात वेळ घालविण्यापेक्षा आपणास दुसरें काम पुष्कळ आहे तें करावें असे ते म्हणत.

( ४ ) तात्यासाहेबांस हिंदी येत नव्हतें. म्हणून हिंदी प्रांतात गेल्यावर ही

अडचण येते; सबब त्यावर व्यासग करून अभ्यास करून कानपुर हिंदु महासभेचे ते अध्यक्ष झाले. त्या वेळी त्यांनी आपले भाषण हिंदीमध्ये सर्व लिहून त्या सभेत वाचून दाखविले! सभेस पडित मालवीय, लाला लजपतराय वगैरे पुढारी हजर होते. त्यानीहि त्या भाषणाचा गौरव केला होता ते अधिवेशन फारच मोठे झाले. सभेस वीस-पचवीस हजाराच्यावर लोक हजर होते.

(५) श्री विठ्ठलभाई पटेल याच्या असेंब्लीच्या अध्यक्षाच्या निवडणुकीच्या दिवशी सकाळी पटेलसाहेब आमच्या बगल्यावर आले व निवडणुकीच्या गप्पा जाहल्यावर पटेल यानीं तात्यासाहेबास सागितले की, माझ्या निवडणुकीत यश येणे सर्वस्वी तुमच्या हातात आहे कारण एकच मत कमी पडत आहे व हे मत मिळणे आपल्याशिवाय होणे नाही त्या मनुष्यावर मत मिळण्यासाठी सरकारी बाजूने प्रयत्न फार चालू होते [illegible] ते खास त्याचे आहेत असा भरवसा वाटत होता. परतु ते तात्याच्या मुठीत होते तात्यासाहेबानी त्याना मत देण्याचे सागितल्यावर त्या गृहस्थानी पटेलसाहेबास मत दिले व पटेल यशस्वी झाले.

(६) असेब्लीमध्ये स्वराज्य-पार्टी फार जोरात होती त्या वेळीं पडित मोतीलाल नेहरू हे स्वराज्य-पार्टीचे लीडर होते व तात्यासाहेब डे. लीडर होते. त्या वेळी उभयताच्या विचारें सर्व काम उत्तम रीतीने चालत असे. श्री. पटेल याचे नांव अध्यक्षासाठी पुढे आणण्यापूर्वी, तुम्ही अध्यक्ष व्हावे अशी माझी इच्छा आहे; कारण इतर दुसऱ्यापेक्षा तुम्हाला सर्वाकडून पाठिंबा मिळेल तेव्हा तुम्ही उभे राहण्याचे कबूल करा, असे नेहरू त्यास म्हणाले. त्यावर तात्यासाहेबानी लागलीच त्यास नकारार्थी उत्तर दिले. या हकीकतीवरून प. मोतीलालजींच्या ठिकाणी त्याच्याविषयी किती आदर होता हे स्पष्ट होत आहे.

(७) उत्तरेकडे शिमग्याचा सण मोठ्या मजेत लहानमोठ्यानी घालविण्याची प्रथा आहे. असेब्लीत असताना तो सण यावयाचा पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवशी तिकडील म्हणजे दिल्ली, यू पी वगैरे प्रातातील मडळी, असेब्ली-मेबर व दिल्लीतील प्रतिष्ठित जमून ते प्रत्येक मेबराच्या बगल्यावर जाऊन गुलाल उधळून सर्वांस आपापल्या बगल्यातून काढून मिरवणुकीप्रमाणे एकत्र निघून प्रेसिडेट पटेलसाहेबाच्या बगल्यावर जाऊन तेथे त्यास त्यात घेऊन ती सकाळ रगवीत असत! इकडील महाराष्ट्रीय मेबर मडळीस हे करणे बरें वाटत नव्हते. दोन वर्षे याप्रमाणे झाले; परतु तिसऱ्या वर्षी कोणास समजू न देता तात्यासाहेब, श्री. बेळवी व श्री. पटेल वगैरेनी हा प्रसग टाळण्याची युक्ति योजून काढली ती अशी की, दिल्लीतील एका लक्षाधिशास सागून त्याच्या मोटारीतून मथुरेस ती सकाळ काढावयाची असें ठरविले व त्याप्रमाणे ही मडळी अगदी सूर्योदयाच्या आत रवाना झाली. त्यानी कोणासहि सागितले नाही. त्याप्रमाणे दिल्लीस होणारा रग व

गुलाल या मंडळींनीं दुपारपर्यंत तिकडे वेळ घालवून टाळला; परंतु मथुरेत रस्त्याने मोटार जात असतां एकाने 'केळकरसाहेब चालले' असे ओरडून एक रंगाची पिचकारी मोटारीत मारलीच व शिमग्याचा सर्वांना प्रसाद दिला !

( ८ ) तात्यासाहेब असेंब्ली-इलेक्शनच्या वेळी स्वतः फक्त दोन जिल्ह्यांत हिंडले. बाकी महाराष्ट्रातील मतदाराचा त्यास इतका पाठिंबा होता की, ते कोठेहि हिंडले नसते तरी पहिले आले असते. पहिल्या इलेक्शनमध्ये सातारा जिल्ह्यात दौरा काढला. बरोबर भाऊसाहेब सोमण होते व दुसऱ्या इलेक्शनच्या वेळी दोन्ही खानदेश मध्यें हिंडले; त्या वेळी बरोबर तात्यासाहेब जोशी, वकील, एरंडोल, हे होते सर्व ठिकाणी ............ त्यांच्याविषयी आपुलकीच्या भावनेने त्यांचा योग्य तो सन्मान केला व काही ठिकाणी मानपत्रेहि दिली. सातारा जिल्ह्यात त्यासाठी दोन उमेदवार म्हणजे प्रसिद्ध वकील दादासाहेब करंदीकर व अष्टे येथील इनामदार खर्डेकर हे उभे होते, पण यांच्यापुढे त्यास पाठिंबा मिळाला नाही व दोन्ही इलेक्शनमध्ये सर्वांत जास्त मते मिळवून ते निवडून आले त्या कामी खर्चहि बाकीच्या उमेदवारापेक्षा फारच कमी आला कित्येक ठिकाणी लोकांनी आपण होऊन खर्च केला त्यास खर्चाची बिले मागता त्यांनी ती देण्याचे नाकारलें याचे कारण तात्यांची सार्वत्रिक लोकप्रियता !

( ९ ) सर्वांत जास्त दगदगीचे व कष्टाचे काम व ज्याचा आरंभ लोकमान्यांनी केला होता ते अखेर शेवटास तात्यासाहेबांनी नेले ते काम म्हणजे रायगड येथील श्रीशिवाजी महाराजांच्या समाधीचा जीर्णोद्धार हे होय. सरकारी आर्केऑलॉजिकल डिपार्टमेंटच्या ताब्यात रायगड असल्यामुळे त्यांच्या परवानगीशिवाय ते काम होणे अगदी अशक्य वेळोवेळी त्या कामी ज्या ज्या सरकारी कामगाराकडून उपयोग करून घ्यावयाचा त्यांच्या वरचेवर गाठी घेऊन त्यांच्या पाठीमागे सतत लागून सरकारकडून समाधीचा जीर्णोद्धार करण्याची परवानगी घेतली व सरकारकडून सात हजार रुपयांची मदतहि मिळविली ते काम पूर्ण करून त्याचा अनावरण समारंभ श्रीमंत रघोजीराव भोसले नागपूरकर यांच्या हस्ते रायगडावर उत्तम रीतीने केला त्यासाठी फार प्रयत्न करून लोकमान्यांची इच्छा पूर्ण करून त्यांनी बरेच दिवस रायगड-फंड गोळा होऊनहि पडून राहिलेले हे काम पुरे केले.

( १० ) श्री. जम्नादास मेथा हे त्यांच्यावर फार प्रेम करीत व ते त्यांनी अखेरपर्यंत कायम ठेविलें. जम्नादास मुंबई सरकारच्या मंत्रि-मंडळात काही दिवस होते. त्या वेळी त्यांना पुण्यास भेट दिली त्यास ... भोपटकर यांच्या घरी चहापार्टी झाली. त्या प्रसंगी तात्यासाहेब व त्यांची प्रथम गाठ पडली. त्या वेळीं त्यांनीं साक्षात् त्यांच्या पायावर डोके ठेवून वडीलपणाचा आशीर्वाद मागितला !

( ११ ) तात्यासाहेबांनी मजला आठवण म्हणून एक उत्तम सोन्याची आंगठी बक्षीस दिली. तें त्यांचें बक्षीस मिळाल्यानें मजला फार धन्यता वाटते व त्याची आठवण म्हणून मी ती नित्य वापरीत आहे.



## विश्वनाथ केशव कुळकर्णी

### ( बी. ए., एलूएल्. बी , वकील, बेळगांव )

१९२५–२६ साल. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये मी शिकत होतो. कॉलेजमध्यें "कर्नाटक विद्यार्थी संघ" नावाचा एक संघ होता. त्या वर्षी या संघाचा मी सेक्रेटरी होतो. ज्या संघाचे वार्षिक सम्मेलन करण्याचे ठरले, त्याची प्रसिद्धि केसरीच्या इहवृत्तात व्हावी असे ठरलें. पण, "कर्नाटक संघाची" म्हणून ही बातमी केसरात येईल की नाही, अशी मला प्रामाणिक शंका आली. म्हणून तात्यासाहेब यानाच समक्ष भेटण्याचे ठरवून केसरी ऑफिसांत गेलो व संघाची माहिती केसरींत द्याल का म्हणून विचारले त्यावर ते म्हणाले, "द्याल का म्हणून तुम्ही का विचारता?" मी माझी शंका सांगण्याचे टाळीत आहे, असे पाहून पुन्हा ते म्हणाले, "तुम्हास शंका कसली आली? सांगण्यास काहीच हरकत नाही" तेव्हा धीर येऊन मी म्हणालो, 'केसरी महाराष्ट्रात निघतो, त्यात कर्नाटक-संघाची बातमी घेतली जाईल की नाही, अशी शंका आली म्हणून घेता का असे विचारले.' तेव्हा ते हसून म्हणाले, "अहो! केसरीवर फक्त महाराष्ट्रियाचाच हक्क आहे असे नाही. महाराष्ट्राइतकाच तुमच्या कर्नाटकाचाहि त्यावर हक्क आहे. फार काय, पण केसरीचा कर्नाटक लाडका आहे तसेच केसरी हा सर्वांचाच आहे, शंका बाळगण्याचे काहीहि कारण नाही संमेलनाची अवश्य माहिती द्या" असे म्हणून त्यांनी मला कोरा कागद दिला. मला आनंद झाला मीहि तत्काळ कार्यक्रमाची माहिती त्यावर लिहून दिली सदर मजकूर पुढील केसरीत प्रसिद्ध झाला, हे निराळे सांगण्याची अर्थात् जरूरी नाही.



## बाळा रामा पाटील

### ( पुणें सार्वजनिक सभा व लो. टिळक-मंदिर येथील शिपाई, पुणें )

पुणे सार्वजनिक सभा व टिळक-मंदिर या संस्थांचा शिपाई म्हणून ज्यांना मी 'थोरले रावसाहेब' म्हणून म्हणत असे त्या तात्यासाहेबांशीं माझा फार दिवसांचा संबंध आला मी त्यांचा शिपाई खरा, पण त्यांनीं मला मुलासारखे

वागविलें ते माझे मायबाप होत. त्यांचे गुण मी किती आठवू – सांगू. तासन् तास सांगत बसलो तरी ते संपणार नाहीं. म्हणून तसे न करिता फक्त एकच गोष्ट लिहितों.

एकदा माझी प्रकृति अतिशय बिघडली, मला प्लेगनें गाठले घरीं उपचार होणें कठीण झाले म्हणून मी ससून हॉस्पिटलमध्यें गेलो. दोन-तीन दिवस थोरल्या रावसाहेबांच्या नजरेस मी न पडल्यामुळें माझी त्यांनीं अण्णांच्या ( स. वि. बापट ) जवळ चौकशी केली अण्णांनीं त्यास सर्व हकीकत सांगितली. त्यांना काय वाटले कोणास ठाऊक, लगेच त्यांनी अलुकाका फडणीस यास टांगा आणावयास सांगून ते दोघे माझ्या चौकशीकरिता ससून हॉस्पिटलमध्ये आले व माझी चौकशी करू लागले; पण माझें संबध नाव त्यास आठवेना म्हणून जरा पंचाईत पडू लागली 'आमचा बाळू शिपाई' असे म्हणून तेथे विचारू लागले पण अशा नावानें तेथे काय पत्ता लागणार? इतक्यात दैवयोगानें सिव्हिल सर्जनच तेथे आले त्यांची व थोरल्या रावसाहेबांची फार मैत्री होती, म्हणून माझा लौकर शोध लागला मी प्लेगचा रोगी म्हणून तेथेच, पण दूर असलेल्या प्लेग-कॅंपमध्ये मला ठेवले आहे असे त्यास समजले. म्हणून ती सर्व मंडळी तेथे आली मी निपचित पडलो होतो; पण शुद्ध होती एकाएकीं त्यांना पाहून मी चकित झालो देव भेटल्यासारखे मला वाटले, माझे डोळे भरून आले. त्या मंडळींचे इंग्रजींत बोलणें चालले होते. थोरले रावसाहेब माझ्या कॉटजवळ आले, खुर्चीवर बसले, ताप पाहिला, माझ्या तोंडावरून हात फिरविला व म्हणाले, " बाळ! तुझी उत्तम व्यवस्था हे साहेब करणार आहेत औषध-पाणी चांगलं देऊन, तुला बरें करून लौकर घरी पाठविणार आहेत तोपर्यंत येथे तुझ्या खाण्या-पिण्याची आम्ही चांगली व्यवस्था केली आहे. काळजी करू नको, घाबरू नको " असा धीर देऊन ते गेले ते जात असता, त्याकडे मी सारखा टक लावून पाहत राहिलो अखेर ते दिसेनासे झाले, तेव्हा पुन्हा माझे डोळे भरून आले. ते येऊन गेल्यानंतर लगेच माझी तेथील सर्व व्यवस्था एखाद्या श्रीमंतासारखी ठेवण्यात आली, ते पाहून तेथील सर्व लोकांनाहि फार आश्चर्य वाटले पुढे मला असेहि कळले की, ते गावांत गेल्यावर प्रथम केसरी कचेरीत गेले व मॅनेजर बाबासाहेब विद्वांस यास त्यांनी सांगितले की, आपला बाळू बरा होऊन घरी येईपर्यंत एक दिवसाआड त्याजकडे मोसंबी, द्राक्षे वगैरे चांगलीं ताजी फळे पाठवीत जा त्याप्रमाणे मी घरी येईपर्यंत बाबांनी हा क्रम बिनचूक चालविला होता खरोखर मरून थोरल्या रावसाहेबांच्या पोटीं यावे असे मला का वाटू नये!!

❁

## सौ. सुंदराबाई बाळा पाटील

### ( लो. टिळक-मंदिराचे शिपाई यांची बायको, पुणें )

( १ ) मी अगदी लहान होतें त्या वेळीं तात्यासाहेब टिळकरोडवरच्या घरीं राहत असत माझ्या सासूबाई त्याच्याकडेच कामाला होत्या त्याच्या घरातील मागील बाजूस दोन खोल्या होत्या. तेथेंच त्यांनीं आम्हास राहावयास जागा दिली होती या खोल्यासमोरील मोकळ्या जागेत कांही फुलझाडें, तसेच नारळ व सुपारीचीहि झाडे होती दररोज सकाळ-सध्याकाळ तात्यासाहेबाची फेरी या छोट्या बागेकडे होत असे मी येथेच पडवीत अकलिपी वाचीत किंवा काहीतरी पाटीवर लिहीत बसलेली असे. त्याची सर्व मुले-मुली शाळेत जात असत, पण माझ्या सासूबाई मला शाळेत पाठविण्यास तयार नसत. मला शाळेत पाठवावे म्हणून तात्यासाहेबानीहि सासूबाईस सागितले; पण सासूबाई म्हणावयाच्या, आमच्या मराठ्याच्या मुलीना काय करावयाचे शिकून ? तात्यासाहेब मला म्हणावयाचे, घरातल्या घरात शिकत जा आणि आमच्या अक्कासारखी ( कमळाबाई देशपांडे ) मास्तरीण हो तात्यासाहेबाचे ते शब्द मला आज चागले आठवतात व त्यामुळें मी जिवत असेपर्यंत त्याचे स्मरण मला होणारच! कारण त्याचे प्रोत्साहन मिळाले म्हणून तर मी आज या स्थितीप्रत आले शाळेत न जाता मिळालेल्या शिक्षणावरच मी इंग्रजीहि तीन इयत्ता केल्या व आज हेल्थ व्हिजिटर्सच्या कोर्सला गेले आहे तात्यासाहेबाना गरिबाच्याविषयी फार कळवळा असे गरीब, मराठा वगैरे · ·· मुलामुलींनी शिक्षण घ्यावे असे आग्रहाने ते नेहमी म्हणत असत. मी थोडी चित्रकलाहि शिकले माझी चित्रें तात्यासाहेबानी पाहून मला शाबासकी दिली. मी काढलेल्या चित्राला प्रदर्शनात सर्टिफिकेट मिळाले, ते तात्यासाहेबाना दाखविले त्या वेळीं तर, त्याना किती तरी आनद झालेला दिसला त्याच्या ठिकाणी गरिबाच्या विषयी असलेली कळकळ मला स्पष्ट दिसून आली.

( २ ) माझ्या सासूबाई वारल्या, यामुळे माझ्या नवऱ्याच्या पगारात एक वेळहि पोटभर जेवता येणे अशक्य वाटू लागले तेव्हा आपण काहीं तरी पैसे मिळवावयास हवेत असे वाटू लागले व मी सेवासदनमार्फत मिड्वाइफरीचा कोर्स घेण्याचे ठरविले. या वेळी मी माझा मानस तात्यासाहेबाना सागताच त्यानी रास्तापेठेतील किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलचे व्यवस्थापक रावसाहेब मुदलियार याना चिठ्ठी दिली! त्या चिठ्ठींत त्यानीं माझ्यासबधीं अगदी आपलेपणाने लिहिले होते!! त्याची आठवण झाली की, डोळ्याला आसवेच येतात. मी मिड्वाइफरीची परीक्षा पास झाले त्या वेळीहि तात्यासाहेबाना भेटावयास गेले. मी पास झाले म्हणून त्याना मी खालीं वाकून नमस्कार केला व तुमच्या आशीर्वादाने पास झाले, इतकेच नव्हे

तर पहिली आले असें त्यांना सागून आलेलें पत्र दाखवले. त्यानी मला शाबासकी दिली व हसत हसत म्हणाले, "पास झाल्याचें सागताना नुसते सांगून भागत नाहीं; पेढे द्यावे लागतात." पण मी पेढे देण्यासच गेले होते व बरोबर नेलेहि होते, ते त्याना दिले. तेव्हा ते म्हणाले, "अरे वा! तू बरोबरच आणले होतेस वाटत." असें म्हणून त्यानी दोन पेढे आरण खाल्ले व माझ्यासमक्ष नातवडानाहि दिले. नतर माझी विचारपूस केली. "तुला काही मदत लागल्यास व कोणाला पत्र, चिठ्ठी लागल्यास, कोठे तुझ्या अर्जावर सही करावी लागली तरी मी देईन; पण तुला मानाने पोट भरता येईल इतके आणि तुला शिकता येईल तितके अधिक शीक" असा त्या माझ्या प्रेमळ, पुण्यशील धर्मपित्याने उपदेश केला नतर त्याचा निरोप मी किती आनदी मनाने घेतला म्हणून सागू!! मी वरील मजकुरात 'तात्यासाहेब' असे प्रत्येक ठिकाणी लिहिल खरे; पण त्याच्या मुलाबरोबर मीहि पण त्याना नुसते 'तात्याच' म्हणत असे! क्वचित् तात्यासाहेब असे कधी चुकून म्हटले तर ते म्हणत, "मी काही साहेब नाही; तू माझ्या लहान मुलीसारखी आहेस म्हणून तू मला नेहमी 'तात्याच' म्हणत जा." मी अनेक मोठी माणसे पाहिली; पण तात्याच्यासारखा निर्मळ मनाचा आणि थोर दिलाचा सत्पुरुष तो एकच आतापर्यंत मी पाहिला!



## नारायण रामचंद्र केळकर

### (एम्. ए., बी. टी., प्राध्यापक, अकोला)

(१) १९१७ साली एका मगळवारी केसरीच्या अकांत दादाभाई नौरोजी आदल्या रात्री म्हणजे सोमवारीं दिवगत झाले म्हणून त्याच्यावर अग्रलेख छापण्यात आला होता. दादाभाई वारल्याचें वृत्त सोमवारी अपरात्री येते काय व मगळवारीं पहाटे त्याच्यावर केसरीत अग्रलेख येतो काय, याचे सर्वांनाच आश्चर्य वाटले. अपरात्री बातमी मिळताच केसरी कचेरीत जाऊन दादाभाईंच्या कामगिरीचें सपूर्ण समालोचन करणारा अति सुदर लेख लिहिण्यांत केळकर हे कसे सव्यसाची सपादक होते हे दिसून येतें.

(२) लो. टिळकांच्या मृत्यूनतर फर्ग्युसन कॉलेजांत 'टिळकाच्याविषयी दोन शब्द' या विषयावर प्रा. वा. गो. काळे याच्या अध्यक्षतेखाली केळकरांचें एक व्याख्यान झाले. प्रा. काळ्यांना टिळकाच्याविषयी फारसा आपलेपणा वाटत नसे हे आम्हा विद्यार्थ्यांना सुद्धा माहीत होते व्याख्यानाच्या प्रारभीं प्रा. काळ्यांनीं 'टिळकांच्यासारखे कोणी उपरणे घेतले तरी तो काही टिळक होऊ शकत नाहीं व टिळक इतराना कितीहि मोठे वाटले तरी, त्यांच्या नेहमीं जवळ असणाऱ्याना ते मोठे वाटतीलच असे नाही. A hero is not a hero

to his vallet-de-chamber ' असे कुत्सितपणाचे उद्गार काळ्यानीं काढले. केळकरानी हे जणु काही आपल्या टिळकभक्तीला आव्हानच होय असे समजून, प्रा. काळ्यानीं शेक्सपिअरच्या ज्या ज्युलिअस सीझर या नाटकातील अवतरण उच्चारले होते ते सीझरच्या दाईचे होते व तिला सीझर, इतर लोकाना कितीहि मोठा वाटत असला, तरी तिला तो अगाखाद्यावर लहानपणी खेळवल्यामुळे मोठा वाटत नव्हता असे त्याचे मूळ साग्न, टिळक जसे इतराना मोठे वाटत होते तसेच त्याच्या नेहमी सान्निध्यात राहणाऱ्या लोकाना ते धैर्याचे महामेरूच वाटत असत असा निर्वाळा दिला केळकराचे हे समयोचित वक्तृत्व ऐकून मार्मिक विद्यार्थ्यानी टाळ्याचा गजर केला



## शंकर परशुराम भिडे

### ( चित्रकला-शिक्षक, पुणे )

( १ ) माझ्या घरी मुलीचे लग्न व माझ्या मुलाचे लग्न ही दोन्ही वेग-वेगळ्या साली झाली त्या प्रसगी घरात वडीलधारे मनुष्य कोणी नव्हते मी कार्यांत गुतलेला असणार व येणारेजाणारे अनेक पाहुणे याजकडे लक्ष द्यावयास सापडणार नाही याकरिता तुम्ही माझ्या घरी वडील मनुष्य या नात्याने हजर राहा अशी मी तात्यासाहेबास विनती केली माझा त्याचा ऋणानुबध त्याचे चिरजाव याचा मी स्नेही फोटोग्राफर इतकाच, पण हे लक्षात घेऊन दोन्ही प्रसगी त्यानी माझ्या घरी तीन तीन तास हजर राहून वडिलकीची सर्व मदत आनदाने केली !

( २ ) एक दिवस तात्यासाहेबाच्याकडे मीं काढलेले चार-पाचशे फोटो घेऊन गेलो व त्याना विनती केली की, या फोटाची वर्गवारी लावून द्या. त्यानी दोन तास मोडून वर्गवारी तर लावून दिली; येवढेच नव्हे तर, आपल्या हातांनी त्याचे मथळेहि लिहून दिले – परिवर्तनी, सनातनी, पडित, साहित्यिक, क्रांतिप्रिय, तत्त्वज्ञ वगैरे. सेनापती बापटांचे दोन फोटो त्यात होते एक त्यानी क्रातिप्रियात घाला-वयास सागितला व एक साहित्यिकात घालावयास सांगितला, व तिसरी प्रत आहे का याबद्दल चौकशी केली कशास तिसरी प्रत पाहिजे असे मी विचारले. त्यावर त्यांनी तत्त्वज्ञात त्याचा एक फोटो घालावयास पाहिजे असे सागितले; आणि तुम्हांला माहीत नाही की, ते एक मोठे तत्त्वज्ञानी आहेत असेंहि ते म्हणाले



## एन्. एन्. क्षीरसागर

( डायरेक्टर, भारत इंडस्ट्रिअल बँक, पुणें )

( १ ) "पुणे मर्चंट्स् को-ऑपरेटिव्ह बक लि."च्या सस्थापनेपासून असलेले कौन्सिलचे अध्यक्ष तात्यासाहेब याना सेवानिवृत्तीनतर सस्थेचे मानपत्र समर्पण करण्याचा समारभ ता. २७ ऑगस्ट १९३७ रोजी बॅरिस्टर जम्नादास मेहता यांच्या अ ध्यक्ष त खाली डेक्कन बोलपटगृहात करण्यात आला

उत्तरादाखल तात्यासाहेब यानी भाषण करताना मी त्याच्या नावाचा व सान्निध्याचा फायदा सस्थेस मिळाला हे जे माझ्या भाषणात सांगितल त्यास त्यानी समर्पक असा जो दाखला दिला तो सर्वांस उद्‌बोधक वाटेल म्हणून शक्यतो त्याच्याच शब्दात देत आहे. ते म्हणाले, " केमिस्ट्रीमध्ये एक कॅटेलिक एजट नावाचे द्रव्य आहे या द्रव्याचे वैशिष्ट्य असे आहे की, ते द्रव्य ज्या पदार्थाच्या किंवा द्रव्याच्या सान्निध्यात येते त्या द्रव्याना ते अधिक लवकर कार्यक्षम करण्यास लावते आणि असे असूनहि ते मूळ द्रव्य कमी न होता जसेच्या तसेच कायम राहाते माझ्या नुसत्या नावाचाहि बॅकेच्या भरभराटीकडे उपयोग झाला व ती अधिक कार्यक्षम झाली असे आताच सागण्यात आले व जनतेला माझ्या नावाचा कॅटेलिक एजटासारखा उपयोग झाला तर ते मला भूषणास्पद का वाटू नये ? "

( २ ) श्रीसोन्यामारुती-सत्याग्रह सुरू झाल्यानतर ता. १० मे १९३७ रोजी अनपेक्षितपणे येऊन तात्यासाहेब यानी सकाळी सुमारे ८ वाजता श्रीसोन्यामारुती-मंदिरातील घटा वाजवून सत्याग्रह केला. सब-इन्स्पेक्टर मीर ग्यासुद्दीन याना विचारून हुकूम अन्याय्य आहे व तो मी मोडणार आहे असे त्यास सागून त्यानी घंटा वाजविली व एक प्रदक्षिणा घातली. पोलिसानी त्याना अटक केली व फरासखान्यांत नेले. मी श्रीसोन्यामारुतीचा पच म्हणून देवालयासन्निध सत्याग्रह चालू असताना हजर असे. तात्यासाहेब यानीं सत्याग्रह केल्यानंतर मी त्याना हार घालू लागलो; परंतु तो त्यानी श्रीमारुतीस घालावयास सागितला तात्यासाहेब यानी त्या वेळी तेथे जे भाषण केले ते त्याचे मनोविचार दर्शविणारे आहे. ते म्हणाले, " मी शात वृत्तीचा मनुष्य आहे; परतु डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचा हा हुकूम मानणे म्हणजे मी मनुष्य नाही असे सिद्ध करण्यासारखे आहे. हा हुकूम मोडून माझ्याजवळ माणुसकी आहे एवढेच मी सिद्ध केले आहे. " या सत्याग्रहाची वार्ता तात्यासाहेब यांनीं आपल्या घरी कोणालाहि कळविली नव्हती. सत्याग्रहास जाण्यापूर्वी मात्र त्यानी श्री. अण्णासाहेब भोपटकर याना एक पत्र लिहून ती कळविली होती त्या पत्रातील महत्त्वाचा काही भाग पुढे देत आहे. " I consider that there can be no worse tyranny of official unreason and special animus against

Hindus than the special and scandalous order of the District Magi-..r. And scornful and contemptuous defiance of that order can be the only answer to it from a self-respecting Hindu citizan, however mild he may be in temperament " पुढे ते लिहितात, "मी घटा वाजवित जातो आणि तिला म्हणतो :– "Tinkle tinkle little bell and let the Order go to Hell."

वरील पत्रातील मजकुरावरून हिंदूच्या न्याय्य हक्काबद्दल तात्यासाहेब याना किती तळमळ असे हे दिसून येते



## रामकृष्ण नारायण फडणीस

### ( सपादक, काव्यरत्नावली, जळगांव, पूर्वखानदेश )

सन १९१६ सालची गोष्ट. त्या वर्षीची कॉंग्रेस लखनौला भरावयाची होती. त्या वेळीं जी काग्रेस-स्पेशल निघाली तिने लोकमान्य टिळक जाणार आहेत असे आम्हा विद्यार्थिवर्गास समजले लोकमान्यास समक्ष पाहण्याची आमची इच्छा अत्यत अनिवार झाली; परतु स्पेशल ट्रेन जळगावास न थाबता, भुसावळ येथे थांबणार होती, म्हणून आम्ही सर्वजण आधीच्या गाडीने भुसावळला जाऊन थाबलो एक तासाने कॉंग्रेस-स्पेशल तेथे आली. लोकमान्याना हार घालण्याकरिता, भेटण्याकरितां व दर्शनाकरिता प्लॅटफार्मवर व छपरावर देखील इतकी मनस्वी गर्दी झाली होती कीं, पुष्कळाना लोकमान्याचें नुसते दर्शनसुद्धा झाले नाही. अशा गर्दीत माझ्यासारख्या ठेंगू विद्यार्थ्याला दर्शन होणे म्हणजे आकाशाला गवसणी घालण्यासारखेच अशक्य होते. थोड्या वेळाने लोकमान्याचा जयघोष करीत गर्दीची जी एक जोरदार लाट उसळली तीबरोबर मी जो लाब ढकललों गेलों तो दोन डबे पुढे निघून गेलो व टोपीहि हरवली गेली! मी ज्या डब्याजवळ उभा होतो त्यात तात्यासाहेब केळकर वर्तमानपत्र वाचीत होते. मी त्याच्याकडेच मोठ्या कुतूहलाने पहात उभा राहिलो थोड्या वेळाने तात्यासाहेबाचे लक्ष खिडकीकडे गेले. मी तेथे आशाळभुतासारखा उभा होतोच. मला पाहून ते म्हणाले, "अरे बाळ! टिळक मागच्या डब्यात आहेत. इथे काय पाहतोस?" त्यानतर मी म्हणालो, "तेथे गर्दी फार आहे. मी उच नसल्यामुळें मला टिळकाचे दर्शनसुद्धा होऊ शकत नाही." असे मी म्हटल्यानतर त्याना काय वाटले कोणास ठाऊक, ते एकदम उठले आणि डब्याचे दार उघडून त्यानी मला आत घेतले व माझा हात धरून खाली उतरवून लोकमान्याच्या डब्याल मागील दाराने मला चढवून दिले. अर्थात् प्लॅटफार्मवरील लोकापेक्षा फारच जवळून, चागल्या तऱ्हेनें

व पुष्कळ वेळ गाडी सुटेपर्यंत मला लोकमान्याचे दर्शन घेता आले, व मनाची तृप्ति झाली गाडीची शिटी झाल्यानतर मी लागलीच उडी मारून उतरलो आपण डब्यात चढविलेला मुलगा उतरला किंवा नाही हे मात्र खिडकीतून डोकावून पाहण्यास तात्यासाहेब विसरले नाहीत गाडी चालू होताच त्या सुवर्णसधीचा लाभ करून देणाऱ्या माझ्या ~ ारकर्त्यांस मी नमस्कार केला व त्याचे आभार मानीत परतलो



## पुरुषोत्तम विश्वासराव डावरे

( वकील, चिटणीस, म. प्रां. वर्णाश्रम स्वराज्यसघ, पुणे )

( १ ) १९४० साल असावे पुण्यातील "वेदशास्त्रोत्तेजक सभा" या जुन्या व सधन स्स्थेम ये दोन पक्षात काही ानिक वाद सस्थेच्या भावी ेर ाबाब व घटनेबाबत निर्माण झाला होता दोन तीन सभा होऊन वाद मिटण्याऐवजी तो विकोपासच गेला अखेर निर्णयात्मक ठरावासाठी सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात तात्यासाहेब याच्या अध्यक्षतेखाली सभा भरली मुद्द्याचे प्रश्न निघताच शाब्दिक रणधुमाळी सुरू झाली व ती शब्दाशब्दी ाारामारी ने रूप धारण करणार असे वाटू लागले इतक्यात अध्यक्ष तात्यासाहेब यानी बोलणाऱ्या वक्त्यास बोलणे थाबविण्यास सुचविले व स्वत ्या ान भाषण सुरू केले जमलेली मडळी विद्वान, अभ्यासू, िप व कायदेतज्ज्ञ, तसेच वादविषयहि कठीण, तशातच मारामारीपर्यंत मजल आलेली अशा वेळी सभा जिकणे म्हणजे ... गोष्ट, पण तशाहि अवघड प्रसगी त' ेब यानी घटनेवर व वादविषयावर सुदर व िाासाग भाषण केले व दोन्हीहि पक्षांस मोठ्या धोरणीपणान आपल्या काबूत राखले भाषणाच्या शेवटी "आपण मला पच नेमल्यास मी निर्णय देऊ शकेन व सर्वांचे समा . करू शकेन" अशी ग्वाही त्यानी दिली, आणि आश्चर्याची गोष्ट अशी की, भाडणाऱ्या दोन्हीहि पक्षानी तात्यासाहेब याची सूचना ... ने मजूर केली, इतकेच नव्हे तर आणखी दोन पच निर्णय करण्यास मदत करण्यासाठी त्याच्या पसतीप्रमाणे घेण्याचा ाधिकारहि त्यानाच दिला! अशा ... मारामारी टाळून ... तात्यासाहेबानी सभा सपविली केवढी जबर समन्वयशक्ति, वि ा सूक्ष्म घटनापटुत्व व लोकाना आकर्षित करण्याची कोणत्या दर्जाची त्याची आ ...क उची, असा विचार माझ्या मनात उचबळून आला.

( २ ) महाराष्ट्रातील सस्कृत ... महामहोपाध्याय पडित वासुदेवशास्त्री अभ्यकर याच्या ... समारे १० वर्षांपूर्वी फर्ग्युसन कॉलेजच्या ाफी थिएटरमध्ये झाला सदर प्रसगी तात्यासाहेब व ... धान श्री बाळासाहेब खेर

प्रभृतींची भाषणे झाली तात्यासाहेब यांचे भाषण फारच मार्मिक व उठावदार झाले. त्यांनी संस्कृत व इंग्रजी भाषेस सुंदर व समर्पक उपमा उपयोगात आणिली व तीच विशद करून सांगितली संस्कृत भाषेला त्यांनी शालीन व जुन्या खानदानीच्या कुलस्त्रीची उपमा दिली, तर इंग्रजी भाषेस आधुनिक कॉलेज तरुणीची उपमा दिली, व मोठ्या आकर्षक व विनोदी भाषेत त्याच उपमेच्या अंगोपांगाचे खुलवून वर्णन करून संस्कृत भाषेचे श्रेष्ठत्व पटवून दिले. ही उपमा मला इतकी मनोरम वाटली की, तीवरूनच मजला ... समग्र वाङ्मय वाचावेसें वाटले व ते वाचीत असता असे समजून आले की, उपमा हा अलंकार तात्यासाहेब यांचा हुकुमाचा पत्ता असून, त्यांच्या ... उपमा या भाषालंकारास कोहिनूर हिऱ्याचे स्थान आहे



## यशवंत व्यंकटेश देशपांडे

### ( बी. ए., एलएल्. बी , वकील, कराड )

मी सन १९१७ ते २२ पर्यंत सातारा येथे वकीली करीत होतो. त्या वेळी लो. टिळकांची साताऱ्यास ज्युबिली झाली ते तेथे आले होते त्यांना पान-सुपारी करणाराच्या यादीत माझे नांव दिलेले होते पानसुपारीची वेळ सायंकाळी साडे पांच वाजण्याची होती पानसुपाऱ्या घेत घेत लोकमान्यांची स्वारी माझ्या दारावर साडे-सहा वाजता आली व साडे-सहा वाजता तर थिएटरमध्ये त्यांचा सार्वजनिक समारंभ होता. लोकमान्यांची मोटार पाहताच मी पुढे होऊन हात जोडून चला म्हणून विनंती केली लोकमान्य म्हणाले, फार उशीर झाला, आता पानसुपाऱ्या घेणे बंद ! एक मिनिट यावे असा मी आग्रह धरला, पण येईनात. ते व मी दोघेहि चिडलो. ते म्हणाले मी येणार नाही मी जाऊ देणार नाही म्हणून मोटारीपुढे आडवा उभा राहून, दहा मिनिटे मोटार मी आडवली ! लोकमान्यांच्या शेजारी मोटारीत तात्यासाहेब अगदी प्रसन्न चित्ताने हसत हसत त्यास म्हणाले " अहो, भांडणात तुम्ही दहा मिनिटे घालविलीत. एवढ्या वेळात तीनदा पानसुपारी तुम्ही घेऊन आलासुद्धा असतां ! "

या बोलण्याची छाप व पद्धति अशी काही सहजसुंदर व परिणामकारक होती कीं, चटकन लोकमान्य एका सेकंदात अगदी मुकाट्याने उठले, माडीवर आले व स्वस्थपणे पानसुपारी घेऊन गेले. तात्यासाहेबांचें वजन व पुण्याई जबर हेंच खरे !



# गो. रा. बाळ

## ('नवाकाळ'चे बातमीदार, पुणें)

हिंदुस्थानात सायमन कमिशन येणार होतें, त्या वेळीं त्या कमिशनच्या विरुद्ध हिंदुस्थानात "सायमन गो बॅक" या घोषणानी बहिष्काराची चळवळ सर्व पक्षानी सुरू केली होती. त्याचप्रमाणे महाराष्ट्रातहि सायमन कमिशनच्या बहिष्काराची चळवळ जोमाने करण्यासाठी एक सर्वपक्षीय दौरा मुक्रर करण्यात आला. त्या दौऱ्यात तात्यासाहेब, अण्णासाहेब परांजपे, वासुकाका जोशी, बाबुराव फुले, हरिभाऊ तुळपुळे, पाषाणकर ही सर्वपक्षीय मंडळी होती. त्या दौऱ्याबरोबर अतुकाका फडणीस आणि 'नवाकाळ'चा बातमीदार म्हणून मी गेलो होतो. या पुढाऱ्यांपैकी वासुकाका आणि अण्णासाहेब हे माझ्या पूर्ण परिचयाचे होते; पण केळकरांचा व माझा तसा परिचय नव्हता. मी त्यांच्या विरुद्ध पक्षातील वृत्तपत्राचा वार्ताहर होतो या दौऱ्यासाठी एक मोटार लारी ठरविण्यात आली होती. त्या लॉरीतून हा दौरा सर्व महाराष्ट्रभर जाऊन आला या पुढाऱ्यांच्याबरोबर लॉरींत बसण्याचा मला संकोच वाटू लागला, हे तात्यासाहेबांच्या निदर्शनास आले; त्या वेळी तात्यासाहेबानी अतुकाका याना बोलावून सांगितलें की, बाळ याना सांगा की, संकोच वाटू देऊ नका अतुकाकानी मला हे सांगितले, त्यामुळे मला थोडा धीर वाटू लागला तात्यासाहेब आणि अण्णासाहेब परांजपे महाराष्ट्रात त्या वेळी असलेल्या परस्पर विरुद्ध फेर नाफेर पक्षाचे अध्वर्यु होते हे दोघेहि एकमेकांच्या पक्षावर 'अहिरावण महिरावण" प्रमाणे तुटून पडत असलेले त्यांच्या जाहीर व्याख्यानांच्या वेळीं श्रोत्यांना स्पष्ट दिसून येत होते त्यांची होणारी व्याख्याने ऐकून आणि वाचून जरी हे "सुदोपसुद" असे वाटत असले तरी हे दोघेहि एकत्र बसले असताना त्यांच्या आपुलकीच्या भाषणाने ते जिवलग स्नेही आहेत, असेच मला त्यांच्या मोटारीतील गप्पागोष्टींवरून व हास्यविनोदावरून वाटलें या पुढाऱ्यांपुढे त्या वेळीं "सायमन कमिशन बहिष्कार" हा एकच विषय होता या दौऱ्यात फेर-नाफेर हे राजकारण ही मंडळी विसरून गेलेली मला दिसली या दौऱ्यामध्ये तात्यासाहेब आपल्या विनोदपूर्ण भाषणात इंग्रजांच्या राहणीचा तिटकारा व त्यांच्याविषयी द्वेषभावना उत्पन्न करीत या दौऱ्याच्या वेळी तात्यासाहेबांच्या स्वभावातील निरनिराळे कप्पे मला कळून आले त्यांचा स्वभाव अत्यंत हळुवार असल्याचे आणि त्यांच्याजवळ लहान-मोठा हा भेदाभेद नसल्याचे मला समजलें मी त्यांच्या विरुद्ध पक्षातील वृत्तपत्राचा वार्ताहर होतो, तरी त्यांनीं माझ्याबद्दल आपुलकीच्या भावनेने वागणूक ठेवली होती, हे मी कधींच विसरणार नाहीं आपल्यापेक्षा लहान दर्जाचा मनुष्य असला तरी त्याला आपल्याबरोबर बरोबरीच्या नात्याने वागविण्याचा त्यांचा गुण पुढाऱ्यांनीं घेण्यासारखा आहे. ते नेहमीं मला म्हणत की, वार्ताहराबद्दल मला अभिमान आहे.

मी हे काम केलेलें आहे व हल्लींहि वेळप्रसंगी करीत असतों. एवंच, तात्यासाहेबांनीं माझ्याबद्दल या दौऱ्यात विशेष काळजी व विचारपूस, परिचय नसतानाहि केली !



## दामोदर गोविंद साठ्ये

### ( हुंडीवाले साठ्ये, पुणें )

( १ ) आमचे वडील गोविंद काशिनाथ साठ्ये हे हयात असताना सन १९२३ सालीं आमच्या घराण्यावर काही प्रसंग गुदरला, म्हणून आमच्या खानदानी घराण्याकडे लक्ष देऊन आर्थिक मदतीकरिता तात्यासाहेब ह्यानी एका संस्थानिकास पत्र दिले नंतर सन १९२८ मध्ये आमचा वाडा व १९३० सालात आमचे वडील मातोश्री गेल्यामुळे आम्ही पोरके झालो, अशा अन्धःकारमय परिस्थितींत त्यांस विनंती करण्यांत आल्यावरून त्यानी दुसरे पत्र मुंबईतील एका बॅरोनेटास देऊन आम्हास बहुत उपकृत करून त्यानीं आमच्या घराण्यास एका महान् बिकट परिस्थितींतून पार पडण्यास मोठाच हात दिला, तो आम्ही जिवंत आहोत तोपर्यंत तरी विसरणार नाहीं; कारण इतके त्या पत्रान आमचेवर उपकार झालेले आहेत.

( २ ) लोकमान्य हयात असता आमच्या घराण्यावर काहीं आपत्ति आली. तिच्या निवारणाकरिता आमचे वडील व चुलते लोकमान्याकडे जाऊन त्यानीं त्यास मदत मागितली अर्थात् ही मदत द्रव्यरूपाची नसून काही विशिष्ट लोकाना शिफारशीचीं पत्रे मागण्याबाबत होती तेव्हा लोकमान्य त्यास म्हणाले, "मजकडून हटकून काम होण्यासारखे असते तर मीच पत्रे दिली असतीं. परंतु माझ्या पत्राचा उपयोग न होता दुरुपयोग मात्र होइल ! करिता आमच्या तात्यासाहेब याच्याकडून ती पत्रे घ्या. ते अवश्य देतील व त्याचा उपयोगहि होईल." त्याप्रमाणे तात्यासाहेबास विनंती करण्यात आली व त्यानी उदार मनाने पत्रे दिली, पण, आश्चर्याची गोष्ट अशी की, पत्रातील मुख्य मजकूर टाईपराईट करून ज्यास पत्रे द्यावयाची ती जागा त्यानी कोरी ठेवून पत्राखाली सह्या केल्या, व सांगितलें कीं, "तुम्हास वाटेल त्यास ही पत्रे पाठवा ही संपली तर पुन्हा अशींच देईन !" केवढा हा परोपकार व औदार्य !



## नारायण दामोदर देवधेकर

### ( बी. ए., एल्एल्. बी., वकील, उंबरगांव, ठाणें )

( १ ) दुसरी ठाणे जिल्हा परिषद डहाणू येथे भरली; त्या परिषदेसाठी लो. टिळकाना आग्रहाचे निमंत्रण गेले होते. त्याच्याकडून लिहून आले कीं, मला वेळ

नसल्यामुळें केळकराना मी पाठवून देतो, त्याप्रमाणें तात्यासाहेब आले. परिषदेचे अध्यक्ष साताऱ्चे के दादासाहेब करंदीकर होते त्याच्याबरोबरच तात्यासाहेबांची उतरण्याची व्यवस्था श्री जम्नादास मेहता यांच्या बगल्यावर केली होती जम्नादासांनी या थोर महाराष्ट्राच्या पाहुण्याना काही कमी पडू नये अशी व्यवस्था केली होती. तात्यासाहेबाना दुपारचे भोजन झाल्याबरोबर वामकुक्षीची सवय होती. त्यानीं स्वतःच आपली प्रवासाची वळकटी सोडली सतरजी काढून झटकली व व्हऱ्हाड्यातच ती अथरून तीवरच ते पडले हे पाहून घाईघाईने स्वयसेवक गादी वगैरे मोठा बिछाना घेऊन आले जम्नादासानी तर त्याना दिवाणखान्यात पलगावर निजण्याचा आग्रह केला; पण तात्यासाहेबानी "अहो, मला जरा वेळच पडावयाचे आहे, पलग-बिछाना वगैरे काही नको येथेच छान वारा येतो आहे", असे सागून डोळे मिटून डुलकी घेण्यास सुरुवात केली त्याची उच्च विचारसरणी व साधी राहणी याचा तेथे सर्वांवरच फार परिणाम झाला.

(२) अहमदाबादच्या काँग्रेसनतर (१९२१) वकिली सोडावी वगैरे गाधींच्या प्रचाराचा परिणाम होऊन एक वर्ष तरी वकिली सोडली नाहीं तर आपण आपल्या कर्तव्यात कसूर केली असे होईल, अशी तळमळ माझ्या मनास लागून मी बेचैन झालो सल्ला घेण्यास घरी कोणी वडील मडळी नव्हती. तेव्हा तात्यासाहेबाना मी मुद्दाम भेटलो माझ्या मनाची तळमळ सागितली; व सल्ला विचारला तेव्हा ते म्हणाले, "देववेकर! होय, तुमच्या मनाची तळमळ मी ओळखतो. देशासाठी स्वार्थत्यागाने कार्य करण्यास कोणी पुढे आल्यास त्याची मी वहावाच करीन; पण एक वर्षात स्वराज्य वगैरेत काही अर्थ नाही ज्या तळमळीनें तुम्ही हे काम करू इच्छिता त्यातून लवकर मुक्तता तर होणार नाहीच, पण तुम्ही अधिकाधिकच त्यात गुरफटाल, म्हणून म्हणतो, आणखी दोन महिने तुम्ही शांतपणें विचार करा व त्यानतरहि वकिली सोडण्याचाच निश्चय कायम राहिला तर मग वकिली सोडा व कामाला लागा मात्र एक सागतो, ते आज न पटलें तरी पक्कें लक्षात ठेवा: 'गांधीचे हे असेच चालू राहिलें तर आपल्याला म्हणजे टिळकानुयायांना केव्हातरी कॉंग्रेसमधून बाहेर पडावे लागेल; त्याला तयार राहा म्हणजे झालें.' नतर मीं वकिली सोडली; ती पुनः कधीच सुरू केली नाही तात्यासाहेबाची कळकळीची व अचूक सल्ल्याची योग्यता आजन्म कोणास सागावयास नको.



## ग. द. दातार

(बी. ए., मुबई)

(१) टिळक चरित्राचे लेखन निर्वेधपणे करण्यासाठी तात्यासाहेब काहीं

दिवस यवत येथें जाऊन राहिले होते या कामासाठीं अनेक संदर्भग्रंथ व वर्तमानपत्रांच्या जुन्या फाइली तेथें नेण्यात आल्या होत्या. त्यातील जरूर ते संदर्भ, तारखा व माहिती नजरेखालीं घालून मग हॉलमध्यें येरझारा घालता घालतां तोंडाने मजकूर सांगावयाचा असा त्याचा क्रम असे. त्याचा मजकूर सांगण्याचा ओघ अस्खलित चाललेला असे; फक्त लिहून घ्यावयालाच काय वेळ लागेल तेवढाच खंड पडावयाचा. दोन तास लिहिणे झाल्यावर त्यानी सांगितलेल्या मजकुरांतील संदर्भ वगैरे पडताळून पाहावयाचे असा क्रम होता व क्वचितच त्यात चूक आढळावयाची एक दिवस मी त्याना विचारलें कीं, येवढ्या गोष्टी तुमच्या बरोबर स्मरणांत कशा राहतात ? तेव्हा ते म्हणाले की, "इतर अनेक गोष्टींप्रमाणे स्मरणशक्ति हीसुद्धा कमवावी लागते व त्यासाठी निश्चयपूर्वक प्रयत्नाची जरुरी असते तथापि अभ्यासानें सर्व काहीं साध्य होतें "

( २ ) टिळक महाविद्यालयाचें कार्य सुरू होऊन जवळजवळ एक वर्ष होत आले होते. वर्ग भरण्याच्या जागेचीच अडचण असे शिकविणारेहि वेळ मिळेल तसे शिकवायला येत अशा स्थितीत विद्यार्थ्यांच्या मनाची स्थिति थोडीशी त्रस्त व्हावी हे सहाजिक होते एके दिवशी तात्यासाहेब वर्गामध्ये [illegible] या कार्याबाबत कोणाच्या काहीं सूचना अगर तक्रारी आहेत का असे विचारीत होते त्या वेळी विद्यार्थिसुलभ आवेशाने मी म्हणालो की, "येथील आम्हा विद्यार्थ्यांची स्थिति प्रयोगशाळेतील बेडकासारखी झालेली आहे! जो येतो तो आपला शस्त्र चालवतो त्यानच शास्त्रीय ज्ञानात कदाचित भर पडणारी असली तरी त्यात बेडकाचा काय फायदा हे काहीं कळत नाही." हे शब्द तात्यासाहेबाना लागल्यासारखे दिसले त्याचा कंठ सद्गदित झाला व ते म्हणाले की, "तुम्हा मुलाना मी बेडकासारखा कसा समजेन ? तुम्ही कोणत्या भावनेने येथे आला आहात याची मला जाणीव आहे, पण आम्हा कार्यकर्त्यांमध्ये जी शिस्त व जो एकसूत्रीपणा असावयास पाहिजे तो नसल्यामुळे परिस्थिति अशी आहे. पण ती शक्य तितक्या लवकर सुधारावी म्हणून माझे प्रयत्न चालू राहतील येवढे मात्र मी तुम्हाला आश्वासन देतो "

एकदा एका गोष्टींत तात्यासाहेबाशीं माझा मतभेद झाला त्याचे म्हणणे मला पटेना व माझें म्हणणें त्याना पटेना. यानतर काही दिवसानीं त्याची माझी गाठ पडल्यावर ते म्हणाले कीं, " विचारांतीं तुझें त्या दिवसाचे म्हणणे बरोबर होतें असें मला मागाहून वाटू लागलें." त्याच्या मनाचा हा प्राजलपणा व ही ऋजुता पाहून आपले म्हणणे बरोबर असल्याचा माझा अभिमान पार नाहीसा झाला



# रामचंद्र चिंतामण श्रीखंडे

### ( कॅप्टन, एम्. बी. बी. एस्., डॉक्टर, कोल्हापूर )

( १ ) तात्यासाहेब याच्याविषयी आदरभाव माझ्या मनात माझ्या विद्यार्थी-दशेपासूनच वसत आहे. माझे ' सुश्लोक गोविंद ' ( प्राकृत गीतगोविंद ) हस्तलिखितात होते तेव्हाच (१९२३ साली) मी ते तात्यासाहेबाच्या अवलोकनात आणवले व मला त्याच्याकडून एक त्रोटक पण उत्तेजनपर चागला अभिप्राय पत्रद्वारा आला. पण पुढे ११ वर्षांनीं तो ग्रथ मी प्रसिद्ध करू शकलो. तसेच १९४० मध्येंहि माझ्या ' सुश्लोक कुमार ' ( प्राकृत कुमारसभव ) काव्यास अभिप्रायदर्शक मोठेच गौरववर पत्र त्यानी पाठविले म्हणूनच मला त्याच्याविषयी अत्यादराने म्हणावेसे वाटते की—

भो वाङ्मयाभिधसरोवरचारुहस । हे ह्दिभूमिगगनाङ्गणपूर्णचद्र ।।
विद्यावतस नररत्न धिया समुद्र । वदे नृसिंह भवदीयपदाब्जयुग्मम् ।।

( २ ) १९४० च्या मे महिन्यात शारदोपासक समेलन-प्रसगी मी तात्या-साहेबांची गाठ घेतली व त्याच्या अनुज्ञेने 'पुष्करणी' बगल्यात त्याच्या भेटीस ३० मे रोजी दुपारी गेला त्याच वेळी विख्यात [illegible] खाडेकर व [illegible] समेलनाचे अध्यक्ष माडखोलकर ही मडळी तेथे तात्यासाहेबाच्या भेटीस आली. तात्या-साहेबानी सर्वाचे खालच्या खोलीतच स्वागत केले; व अगदी खेळीमेळीनें पुष्कळ विषयावर अनेक गप्पा झाल्या नतर खाडेकर-माडखोलकर मडळी गेल्यावर तात्या-साहेबाशी मी काही वेळ बोलत बसलो होतो 'सुश्लोक कुमार'च्या माझ्या प्रस्तावनेत कालिदासाच्या दोन महाकाव्याचे पौर्वापर्य ठरविण्याच्या बाबतीत 'रघुवश' हा 'कुमारसभवा'च्यापेक्षा आधीचा असावा असे मला का म्हणावेसे वाटते, याची मी जी चर्चा केली आहे तीविषयी तात्यासाहेब याचे मत मी अजमावण्याचा प्रयत्न केला. मी सागितलेली कारणेच विचारात घेऊन कुमारसभवच आधीचा असावा असेंहि अनुमान काढता येईल, असे तात्यासाहेबाचे मत दिसले. नतर तात्यासाहेबानीं आपली आठवण – प्रसाद – म्हणून मला आपले तीन ग्रथ ' डॉ. श्रीखडे यास मित्र-भेट ' असे लिहून सही करून दिले !

( ३ ) करवीर नगरवाचनमदिराचा एक मोठा समारभ येथे झाला. त्यास रा. ब. चिं वि वैद्य, ह. भ प पागारकर, श्री वा म जोशी व तात्यासाहेब ही महाराष्ट्रातील विद्वद्रत्ने आली होतीं सर्वांचीच व्याख्याने उत्कृष्ट व उद्‌बोधक अशी झालीं. मात्र तात्यासाहेब याच्या व्याख्यानप्रसगी राजाराम कॉलेज हॉलच्या गॅलरीतून एका विद्यार्थ्यानें व्यासपीठाकडे अर्जी फेकलीं ! व्याख्यान ऐन रगांत आलें होतें व एकदम असा प्रकार झाल्यामुळे श्रोतृवृद अगदीं क्षुब्ध झाला.

तथापि तात्यासाहेब अगदी शांत होते व त्यानी त्या विद्यार्थ्यांमहि काही शिक्षा होऊ नये असे मत दिल्याचे कळले ! या अनपेक्षित प्रकारामुळे तात्यासाहेबाचे व्याख्यान अविस्मरणीय असेच झाले तसेच त्याच रात्री 'विद्यापीठा'त वामनरावजींचे व्याख्यान तात्यासाहेब याच्या अध्यक्षतेखाली झाले तोहि प्रसग लक्षात राहण्यासारखाच झाला शेवटी आभार . . . व्यवस्थापकांनी काही बोचक उद्गार काढले त्या वेळी मात्र अध्यक्ष तात्यासाहेब अगदी खवळून गेले व त्यानी हार घालून घेण्याचें साफ नाकारले ! व्यवस्थापकास त्याची क्षमा मागून त्याना शात करताना अगदी पुरेवाट झाली



## कल्याणराव अंबेवाडीकर

(बाभूळखेडा, नागपूर)

१९३१ साल " . . . सुरू झाला होता चळवळीचा वन्हि सर्वत्र चेतवला जात होता याचवेळी शनवार वाड्यासमोर सभा घेतली गेली होती आणि अगाहि प्रसिद्ध झाले होतें की, तात्यासाहेब या सभेत बोलणार आहेत सभेस प्रारभ झाला कम्युनिस्ट फडके यानी सभा सुरू झाल्याची सूचना दिली अध्यक्षाचे नाव सुचवले गेले दुजोरा देण्यासाठी एक गृहस्थ उभे राहिले त्यानी तात्यासाहेबाना (कुत्सितपणे) गाधीटोपीचा आहेर दिला ! टाळ्यांचा एकच कडकडाट झाला तात्यासाहेब बोलावयास उभे राहिले ते आपल्या भाषणात म्हणाले, " ज्या गृहस्थानी मला हा आहेर दिला, तो मी त्याची आठवण म्हणून जपून ठेवीन ! त्याच्या विनतीप्रमाणे हा 'आहेर' असल्याकारणाने मला रोज वापरता येणार नाही ! पण हा मी जपून ठेवीन आहेर फक्त जपूनच ठेवावयाचा असतो ! " टाळ्याचा प्रचड कडकडाट ! !



## वि. त्र्यं. गर्दे

(एम्. ए , पुणें)

सन १९३६ साली तात्यासाहेब यानी माझ्या एका चित्रपटकथेवर स्वतःचा लेखी अभिप्राय मला दिला होता मध्यतरी दहा वर्षांच्या काळात त्याना प्रत्यक्ष भेटण्याचा मला योग आला नव्हता दहा वर्षांसारख्या प्रदीर्घ कालात त्याना इतर कित्येक लोक भेटले असतील नि कित्येक इतर पुस्तकावर त्यानी अभिप्राय पण दिले असतील तथापि पहिल्या भेटीनतर, कमीत कमी दहा वर्षांनी, म्हणजे १९४६ सालांत मी त्याच्याकडे एक प्रशस्तीपत्र मागावयास गेलो असता, त्यांनी दहा

वर्षापूर्वीच्या आपल्या अभिप्रायाची मला आठवण करून दिली ! पंचाहत्तर वर्षांच्या केळकरांची ही तीव्र स्मरणशक्ति पाहून मला आश्चर्याचा धक्काच बसला.



## शांताराम आ. सबनीस

( बी. ए., एलएल्. बी., ऑफिशियल, मुंबई )

( १ ) १९३० साली " महाराष्ट्र रत्नावलि " या नावाने श्रीहर्ष कवीच्या संस्कृत "रत्नावलि" या नाटकाचे मराठीत समश्लोकी भाषांतर मी प्रसिद्ध केले व त्याची एक प्रत केळकर यांच्याकडे अभिप्रायासाठी पाठविली. त्या पुस्तकाचा त्यांनी फार गौरव करून " आजवर जी संस्कृत काव्यांची मराठींत भाषांतरे झालीं त्यांच्या-इतके किंबहुना त्याहीपेक्षा सरस असे आपले भाषान्तर झाले आहे ", असा अभिप्राय दिला. त्यानंतर १९३८ साली माझे संस्कृत "मेघदूत" काव्याचे समवृत्त व समश्लोकी मराठी भाषांतर परीक्षणासाठी त्यांच्याकडे पाठविले. त्या पुस्तकास त्यांनी मार्मिक व विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना लिहिली आहे. या वेळपर्यंत त्यांची माझी प्रत्यक्ष भेटहि झाली नव्हती.

( २ ) माझ्या 'मेघदूताच्या' मराठी भाषांतराचा उल्लेख वर आलाच आहे. त्यासंबंधीच्या एका घटनेचा उल्लेख केल्याशिवाय राहवत नाही. या ग्रंथाला तात्यासाहेबांनी लिहिलेल्या प्रस्तावनेत ( हिला त्यांनी 'अभिनंदन' हा मथळा दिला आहे ) गुणविशेषांचा मोकळ्या मनाने गौरव केल्यानंतर काही दोषस्थळेंहि दाखविली आहेत. या दोषस्थळांबद्दल माझा त्यांच्याशी प्रामाणिक मतभेद झाला, तें मी त्यांस नम्रपणें कळविले. त्यांनी मतभेदाची कारणे लिहून कळविण्याची सूचना केल्यावरून मीं उत्तरी सविस्तर खुलासा केला. या माझ्या पत्राला जे त्यांचे उत्तर आले, त्यांतील मजकुराने त्यांच्या थोर, निगर्वी, परमतसहिष्णु स्वभावाची पूर्ण साक्ष पटते. त्या पत्रात त्यांनी लिहिले होते, " माझी मते म्हणजे काही वेदवाक्य नव्हे ! आपला खुलासा वाचून आपल्या म्हणण्यात बरेच तथ्य आहे असे मला वाटते. या अडचणी-तून दोन मार्ग मला सुचतात; एक तर माझा लेख दुरुस्त करून मी पुन्हा लिहावा. किंवा तो आहे तसाच ठेवून माझ्या आक्षेपाखाली टीपा देऊन आपल्या मतभेदाची कारणे नमूद करावी. यापैकी कोणता मार्ग आपणास पसंत आहे ते कळवावे." तात्यासाहेबांसारख्या सज्जनास पुन्हा तसदी देणे मला पसंत नसल्यामुळे, मी दुसरा मार्गच पसंत केला आणि दर आक्षेपाखाली टीपा देऊन पुस्तक छापले.

'बोद्धारो मत्सरग्रस्ताः' हा अनुभव साहित्यक्षेत्रात नवीन नाही; पण शहराच्या उजाड वाळवंटांत सुंदर हिरवळीप्रमाणें वरील नियमास अपवाद अशी तात्या-

साहेबासारखीं थोर मनाची माणसें क्वचितच दृष्टास पडतात. त्याच्या गाढ्या विद्वत्तेने व नितात सौजन्यानें ते अखिल महाराष्ट्रात अत्यत लोकप्रिय होऊन राहिले होते.



## नारायण श्रीपाद राजहंस ऊर्फ बालगंधर्व

( नटसम्राट्, पुणें )

( १ ) रसिकश्रेष्ठ व नाट्यप्रेमी तात्यासाहेब यानी अनेक उत्कृष्ट नाटकें लिहिली व तीं सर्व रगभूमीवरहि आली, पण त्यांचा माझा योग असा कीं, दोन कपन्यात ( किर्लोस्कर नाटक कपनी व गधर्व नाटक कपनी ) मी प्रमुख असूनहि व मजवर त्याचा हक्क व लोभ असूनहि कोठेहि त्याचे नाटक रगभूमीवर येऊ शकले नाहीं व मला त्यात भूमिका घेण्याचा प्रसग आला नाही हे आश्चर्य व दुदैव होय ! तात्यासाहेब याच्या सर्व नाटकात मला कृष्णार्जुनयुद्ध हे नाटक फार आवडे, व सगीत आणि नाट्यकृति या दृष्टीने ते 'स्टेज'ला अतिशय अनुकूल व अनुरूप असल्यामुळे, माझ्या गधर्व-नाटकमडळीने ते रगभूमीवर करावे अशी माझी फार इच्छा होती. त्याप्रमाणे त्याना मी विनती केली ती त्यानी आनदाने मान्य केली पण एक अट मात्र घातली ती अशी कीं, त्या नाटकातील नारदाची भूमिका मी स्वतः केली पाहिजे ! कारण, ते सबध नाटक त्या एका पात्राभोवती फिरणारे आहे, त्यावरच ते अवलबून आहे पुरुष भूमिका करण्याची ही जोखीम मी पत्करून त्यांची विनती मी मान्य केली. पुढ या कामाकरिता ते आमच्या मुक्कामी येऊ जाऊ लागले योजना मुक्रर झाली, पात्रे ठरली, नकला सुरू झाल्या व वर्तमानपत्रातहि याची वाच्यता झाली पण प्रभुरायाची इच्छा निराळीच होती असेच म्हटले पाहिजे ! कारण, त्या वेळीं अशी काही विचित्र घटना घडली की, हे काम पुढे चालविणे अशक्य झालें. मला फार वाईट वाटले, दु.ख झालें तथापि केव्हातरी तात्यासाहेब यास हे सागण्याचे धारिष्ट केले पाहिजे, असे ठरवून माझे मित्र व तात्यांचे विश्वासनिधि रा सदाशिराव बापट यास बरोबर घेऊन मी त्याच्या घरी गेलों त्यांना हे ऐकून अपमान झाल्याबद्दल राग येईल व तसे होणे अगदींच स्वाभाविकहि आहे, असे मी मनात म्हणतच होतो पण आश्चर्याची गोष्ट अशी की, त्या थोर व उदार पुरुषाने माझी अडचण शातपणाने व सहानुभूति-पूर्वक समजावून घेऊन, जणू याबाबतीत पूर्वी काहींच घडलें नाहीं असे समजून, त्यांनीं सर्व विसरण्याची मनाची तयारी दाखविली माझ्याविषयी गैर-समजूत होऊ दिली नाही, राग केला नाही, 'सहानुभति' नाहींशी केली नाहीं, पूर्वीचें नातें व सबध यांत यत्किंचितहि कडवटपणा किंवा कमीपणा येऊ दिला नाहीं ! लोक म्हणु लागले की, श्री. काकासाहेब खाडीलकर यानी मला सागितलें म्हणून

मीं असे केले. शिव शिव ! लोकाचा हा प्रवाद सर्वस्वी कल्पित व खोटा आहे असे मी तात्याना सागितलें. तेव्हां ती स्वारी निश्चयी मुद्रेने व लाघवी आवाजात म्हणाली, “ आमच्या कृष्णाजीपंताच्या हातून असली गोष्ट, आणि शिवाय ती माझ्या बाबतींत, कधींहि होणार नाहीं. त्याचा स्वभाव मी पूर्ण ओळखतो शिवाय, नारायणराव, तुम्ही सांगता यावर तर माझा पूर्ण विश्वास आहेच ! ”

( २ ) किर्लोस्कर नाटक मडळी म्हणजे महाराष्ट्रातील सर्व नाटक कपन्याचे मातृस्थान नावालौकिकाला चढून या व्यवसायात चमकणाऱ्या बहुतेक नटाचा नाट्यजन्म व त्याचे पहिलें शिक्षण या माहेरघरींच झाले नाट्यव्यवसायाची ती तपोभूमि होती. नाट्यकलामहर्षि गु अण्णासाहेब किर्लोस्कर हे तिचे जनक व तिची पाठराखणी लो टिळकानी केलेली. अशी ही किर्लोस्कर नाटक मडळी १९१३ मध्ये ऐश्वर्याच्या व लोकप्रियतेच्या शिखरावर होती परतु दुर्दैव असे की, चालक मडळीमध्य महत्त्वाच्या बाबतीत तीव्र मतभेद उत्पन्न झाले वादविवाद विकोपाला जाऊ लागला. नाटकगृहात होणारे ‘मानापमान’ कपनीच्या बिऱ्हाडात होऊ लागले ! दोन तट पडले एका बाजूला कै शकरराव मुजुमदार आणि दुसऱ्या बाजूला नटवर्य बोडस, गु. टबे आणि स्वतः मी असे होतो फाटाफूट होणार, त्याशिवाय गत्यतर नाही हे स्पष्ट दिसू लागले; पण किर्लोस्कर मडळीतून फुटून निघून दुसरी ‘कंपनी’ काढणे हा मार्ग आम्हा मडळीच्या मनाला रुचत नव्हता कारण, आमच्या मातृसस्था सोडण्याच्या नुसत्या कल्पनेनेहि आम्हास कसेसेच होत होते.

या दिव्यातून कसा मार्ग काढावयाचा हा पेच होता नाट्यकृतीत जसा पेचप्रसग असतो, तसा नाटक कपनीतला हा पेचप्रसग होता. नाटकातला पेच अप्रत्यक्ष आणि कृत्रिम, तर हा पेच प्रत्यक्षात आमच्या पुढे उभा होता आणि तो सोडवावयाचा होता. पण या दोन तटातील भाडणे मिटतील अशीं लक्षणे दिसेनात, फाटाफूट अपरिहार्य आहे, असे दिसू लागले त्या वेळी कपनी पुणे मुक्कामी होती. पण लोकमान्य त्या वेळी स्वदेशाकरिता ब्रह्मदेशात तुरुगात गेलेले होते; त्यामुळें अशा बिकट प्रसगीं त्याच्या उपदेशाचा उपयोग आम्हाला होण्याची आशा नव्हती, म्हणून स्वाभाविकच आम्ही गुरुवर्य तात्यासाहेब याच्याकडे गेलो आणि त्याना दोन्ही पक्षात समेट करून किर्लोस्कर नाट्यसस्था अभग ठेवण्याची खटपट करण्याबद्दल विनती केली

समेटप्रिय तात्यानी हे अवघड काम आनदाने आणि उत्साहाने अगावर घेतले दोन्ही तटातल्या मंडळींशीं चर्चा, विचारविनिमय करण्याला त्यांनीं सुरुवात केली करारमदार, अटी, मसुदे, ठराव, पुन्हा फेरविचार असें सर्व काही अनेकवार झाले. शेवटी एक अखेरचा मसुदाहि तयार झाला त्यासाठीं तात्यानीं

आपला अमूल्य वेळ खर्ची घातला व ... पणाने योजना तयार केली व तिच्या-करितां अतिशय परिश्रमहि घेतले, परतु खेदाची गोष्ट अशी की, दुर्दैवाने त्याच्या सारख्याच्या ह्या खटपटीला यश येऊ शकले नाही! प्रभुरायाची इच्छा तशी नव्हती!!

पुढे जेव्हा प्रभुरायाच्या कृपेने लोकमान्य सुटून परत आले, तेव्हा त्याच्या दर्शनाला आम्ही गेलो, व सर्व हकीगत त्याना सांगितला ती सर्व ... ने ऐकून घेऊन लोकमान्य म्हणाले, "मला आमच्या तात्यासाहेबाकडून तुमची सर्व हकी-कत समजली आहे ती ऐकून मला फार वाइट वाटले नाव्याना या कामी यश आले असते तर मला फार आनद झाला असता. अशा कामी तात्याचा हात यशस्वी होतो असा अनुभव आहे; पण या कामी तो अयशस्वी कसा झाला याचे मात्र मला नवल वाटते. त्या वेळेला जर मी मोकळा असता तर ही गोष्ट मीं केव्हांहि घडू दिली नसती. परतु आता बालून काय उपयोग?" तात्यासाहेब याना मध्यस्थी करण्यास विनंती करताना आमच्यावर केवढी जबाबदारी होती याची कल्पना आम्हास होती; पण या प्रकरणात लोकमान्य नसले तरी तात्यासाहेब मध्यस्थ होते, म्हणूनच आमचा माथा उजळ होता हेच मला नेहमी मोठे समाधान वाटत



## वामन मोरेश्वर पोतदार

(बी. ए., एल्एल्. बी., पुणे)

(१) तात्यासाहेब याचा सबध 'केसरी' कार्यालयाशी येण्यापूर्वी त्याची व माझी ओळख होती त्याचे सर्वात वडील बधु नारायण चिंतामण केळकर हे सन १८८६ च्या सुमारास डेक्कन कॉलेजमध्ये माझे सहाध्यायी होते त्याचा व माझा दृढ परिचय होता ते बी ए झाल्यावर शिक्षणखात्यात सेवक झाले व ठाण्यास हायस्कुलमध्ये शिक्षक असताना मुबईस असत तात्या तेव्हां एल्एल् बी च्या टर्मस् भरण्याकरिता मुबईस होते, त्यामुळे त्याचा परिचय चागला झाला. नाना हे फार विनोदी होते व त्यास आम्ही नाना फडणीस म्हणत असू त्या वेळीहि तात्या तरतरीत व हुषार दिसत असत; परतु ते पुढे सार्थ "नरसिंह" होतील असें त्या वेळी कोणास वाटले नव्हते

(२) लोकमान्य टिळक यास १८९७ मध्यें शिक्षा झाल्यावर त्याच्या लॉ क्लासमध्ये मी शिकविण्यास जात असे. एक दिवस क्लास सुटल्यावर तात्या व मी खिडकीशी राजकीय परिस्थितीसबधाने बोलत होतों. समोर एका ओटयावर एक बिनड्रेसी डिटेक्टिव्ह बसला होता. आपल्या सर्व अगाचें कान करून तो आमचे भाषण ऐकत होता. तात्यांनीं माझें लक्ष तिकडे वेधिले व हळूच विचारले, "तो

कोण आहे हे तुम्हास माहीत आहे काय ?" मीं म्हटले "नाहीं". "अहो ! तो डिटेक्टिव्ह आहे, जरा जपून बोला टिळकाच्या माणसानी फार दक्ष व सावध असले पाहिजे ", असे ते म्हणाले



## काशीनाथ विष्णु खानविलकर

( हिऱ्या-मोत्यांचे व्यापारी, मुंबई )

( १ ) मी मुबईच्या ब्राह्मणसभेचा चिटणीस होतो सभेच्या ... उत्सवात रोज ... नामवत वक्त्याचे व्याख्यान असावयाचेच असा जणू सकेतच ठरून गेला होता त्यामुळे ब्राह्मणसभेच्या व्याख्यानाच्या या मेजवानीत तात्यासाहेबाचे व्याख्यान ... त्यावेळच्या श्रोत्यानी आपल्या मनाशीं बाधलेली असे आणि ह्या अपेक्षापूर्तीचा आनद व्याख्यानाच्या आदल्या दिवसापासूनच श्रोते उपभोगीत असत पण गेल्या दहा पधरा वर्षापासूनच ... वृद्धपणामुळे हे सर्व व्याप साभाळणे थोडे जिकीरीचे आणि त्रासाचे होऊन बसले होते; म्हणून ते मला म्हणाले, " हे पाहा खानविलकर, मला या वर्षी तुम्ही व्याख्यानाची गळ घातली नाहीत तर चालणार नाही का ? मला हे सगळे व्याप उरकायचे म्हणजे मोठी जिकीर होते ... य दगदगीमुळे मला ते काही तितकेसें सुखाचे होत नाहीं तेव्हा या वर्षी तुम्ही मला सूट दिलीत तर बर होईल " तात्यासाहेबानी आणखी काही सागण्यापूर्वीच मी त्यांचे म्हणणे मान्य केले आणि त्या वर्षी स्वातत्र्यवीर सावरकराचे भाषण ठरवून आलो. परतु गमत ... झाली की, सावरकराचे व्याख्यान ज्या दिवशी ठरले होते त्याच्या आदल्या दिवशीच त्याचा निरोप आला की " प्रकृति बरी नसल्याने मी उद्याच्या व्याख्यानास येऊ शकत नाही ! "

आता आली का पचाइत ! व्याख्यान ... सावरकरासारख्या गाजलेल्या वक्त्याचे ठरलेले होते ब्राह्मणसभेची तिन्ही सभागृहे भरून लोक अगणात आणि पायरस्त्यावर सुद्धा उभे राहून त्याचे ... ऐकणार होते 'लाऊडस्पीकर' शिवाय भागण्यासारखे नव्हते आणि सावरकराच्या वक्तृत्वाच्या जबरदस्त ओघात श्रोते ...सारखे हलके हलके होऊन तरगत जाणार होते, हे सारे स्वप्न मला दिसत होते आणि तेच सावरकर येणार नसल्याची चिठ्ठी माझ्या हातात ...! हे स्वप्न सावरकर नसतानाहि साकार करणारा, लोकाना नवीन काही तरी सागणारा, वक्तृत्वाने नाही तरी विद्वत्तेने भारून टाकणारा आणि सावरकराची उणीव भरून काढून सावरकराचाच विषय लोकाना प्रतिपादून सागणारा, केळकराशिवाय दुसरा कोणीहि वक्ता मला दिसेना.

वेळ अगदी थोडा होता मी उठलो आणि एकदम बोरीबदरच गाठले व पुणें स्टेशनवर उतरलो, तो थेट तात्यासाहेबाच्याच घरी गेलो मी आल्याचा निरोप वर पोचताच तात्यासाहेबानी मला वरूनच हाक मारली व्याख्यानाचा विषय कसा काढावा या विवचनेत मी होतो, तोच चार दोन वाक्ये इकडची तिकडची झाल्यावर तात्यासाहेब हसत हसत विनोदाने म्हणाले, "सभेच्या व्याख्यानाला यायचे जमणार नाही असे मी म्हणालो तर तुम्ही खरो खरीच ब्राह्मणसभेतून आम्हाला अजिबात वगळून टाकलेत, अगदी हद्दपार केलेत !" विषयाला आयतेच तोड सापडले म्हणून मी लगेच म्हणालो, "छे, छे, आम्ही वगळल नाही आपल्याला आपल्याला वगळून आमच चालतच नाही आज संध्याकाळच्या व्याख्यानाच आमत्रणच करायला आला आहे मी, तात्यासाहेब !" त्याबरोबर ते चमकून म्हणाले, "म्हणजे काय ? बाका मला वाटलच होत की, तुम्ही सकाळच्या प्रहरी इथ आलात, तेव्हा एखाद असल पिल्लू तुमच्या खिशात असेलच !" मग आमची अडचण समजावून देताच तात्यासाहेबानी मोठ्या आनदाने मुबईस येण्याचे कबूल केले. मी एवढा मुबईहून पुण्यास आलो, आणि आमची खरोखरीची अडचण त्याना दिसली व या दोन्ही गोष्टीची त्याना जाणीव होऊन त्याच्या भिडस्त स्वभावाने आणि प्रसगी हात देण्याच्या वृत्तीमुळे त्यानी मुबईस येण्याची दगदग सोसली तात्यासाहेब त्या वर्षी येणार • • । • "ि आल्यामुळे, त्याच्या • • लाभ होणार, याचा अत्यत हर्ष वाटून श्रोत्यानी तात्यासाहेबाचे टाळ्याच्या गजरात उत्साहाने स्वागत केले. आणि आमच्या अपेक्षेप्रमाणेच त्याचे त्या वेळचे भाषण झाले. भाषणाच्या सुरुवातीस आपण व्याख्यानाच्या तडाक्यात कसे सापडलो याची विनोदपूर्ण हकीकत सागून श्रोत्याना त्यानी खूप हसवल्याची मला चागली आठवण आहे.

( २ ) वर दिलेल्या या भेटीनतर थोड्याच दिवसात हिंदु राष्ट्रीय निधि जमविण्याच्या कामानिमित्त त्याच्या नि माझ्या भेटीचा पुन्हा योग आला. कार्यकारी मडळाची सभा भरली होती आणि त्याच दहावीस लोकाच्या बैठकीत दहा हजाराचा आकडा पुरा करावयाचा आम्ही सकल्प केला होता; तात्यासाहेबानी पहिल्या तडाक्याला आपला पाचशे रुपयाचा आकडा सागितला ! त्यामुळे इतरानींहि आपापल्यापरी जास्तीत जास्त देणगीचे आकडे घातले; तरी सुमारे सात हजाराचीच भरती झाली. तेव्हा दुसऱ्या पाळीला तात्यासाहेबानी पाचशेचे सहाशे केले. तरी सुद्धा दहा हजार पूर्ण होईनात; मग पुन्हा तिसरी पाळी आली, तेव्हा मात्र तात्यासाहेब म्हणाले की, "हे पाहा, आतां मात्र माझ्याजवळ पैसे नाहीत. जे आहेत ते मला व माझ्या पत्नीला या पुढील दिवसात पुरतील एवढी मला काळजी घेण जरूर आहे. कुणास ठाऊक आमच आयुर्मान आणखी किती आहे ते. आमच आयुष्य सपण्या-

च्या वेळीं जर शिल्लक राहिली तर बुईलमध्यें या निधीच्या नावानें मी पैसे लिहून ठेवीन " त्यांनी, ह ना सगळी काटकसर न न नगा जीवनात चाले देशकार्यात मात्र सगळे आयुष्य आणि जवळचे . . जास्त वित्त त्यानी खर्ची घातलें. स्वतःची चैन प्रत्येकजण करीतच असतो, पण इतरासाठी स्वतःची झीज सोसून मुक्त हस्ताने देणगी देणारी तात्यासाहेबासारखी थोर मनाची माणसे फार दुर्मिळ असतात म्हणूनच ता नासाहेब गेले तेव्हा उभा महाराष्ट्र हळहळला, आणि प्रत्येक घराला आपल्याच घरातील कर्तासवरता व श्रेष्ठ माणूस गेल्याचे दु ख अनुभवाला आले।

( ३ ) विलेपारले येथील लोकमान्य टिळकाच्या न।ह। अनुयायानी व चहा-त्यानी लोकमान्याचे स्मारक म्हणून " लोकमान्य-सेवा सघा "चे सभागृह बाधले त्याचा उद्घाटनसमारभ तात्यासाहेबाच्या हस्ते व्हावा अशी तेथील लोकाची फार इच्छा होती तेव्हा तात्यासाहेबाना व आमचा लोभ म्हणून त्याना समारभाचे निमत्रण देण्याची कामगिरी पार्ल्याच्या मडळीनी मी व श्री. न वि भावे याच्यावर सोपविली ते उन्हाळ्याचे दिवस होते तात्याना या दिवसात कोकणात जाऊन राहण्याची मोठी हौस ! आम्ही गेलो तेव्हा ते कोकणात जाण्याच्याच तयारीत होते आमच्या येण्याचा आशय सागताच ते म्हणाले, " मीच अध्यक्ष असायला पाहिजे असा आग्रह तुम्ही का धरता ? मी आता महिनाभर तरी कोकणात जाऊन राहण्याचा विचार करतो आहे. तुम्ही कोणी दुसरा अध्यक्ष गाठलात तर खरच बर होईल " मी म्हणालो, " ते सार खर; पण लोकमान्याची परपरा निष्ठेने कायम राखणारे एक तुम्हीच आहांत. लोकमान्याचा केसरी, त्याचे राजकारण आणि त्याची परपरा म्हणून लोक तुमच्याकडे अधिक आपलेपणाने पाहतात. लोकमान्याचा गौरव तुमच्या हातून करण्यात लोक आपलाहि गौरव समजतात शिवाय लोकमान्याचें स्मारक करण्यासाठीं पारल्याच्या उत्साही मडळीनी रात्रीचा दिवस करून अक्षरशः आपल्या खाद्यावरून दगडविटाच्या पाट्या वाहून या स्मारकाचा पाया भरला आहे. तेव्हा . " पण मग तात्यासाहेबानीं मला अधिक बोलूच दिले नाहीं, आणि म्हणाले, " बर बर. केव्हा आहे तो समारभ ? " मी म्हणालो, " × × तारखेच्या सुमारास आहे. ती ठरली म्हणजे लोकमान्य सेवासघाची मडळी आपल्याला कळवतील ". तात्यासाहेबानीं सागितले, " तुम्ही कोणतीहि तारीख ठरवा. त्या तारखेच्या आधी मी नक्की पुण्यास येतो. तुमचे ठरलें म्हणजे कळवा. महिनाभर राहण्याऐवजी दहा-बारा दिवसातच मी कोंकणातून परत येईन. " या त्याच्या अनुग्रहाबद्दल आम्ही त्यांचे आभार मानले; आणि पारल्याच्या मडळींना " तात्यासाहेब येण्यास तयार आहेत; तुम्ही पत्राने त्याना तारीख कळवा, " असें सागितलें पण पुढे एके दिवशी मला लोकमान्य सेवासंघाकडून निमत्रण-पत्रिका आली; ती वाचून मी

अगदी थक्कच झालो पारल्याच्या लोकमान्य सेवासघाच्या सभागृहाचा उद्घाटन-समारभ लोकनायक बापूजी अणे याच्या हस्तें साजरा होणार हे वाचून मी मनाशी म्हणालो, "हे काय असे निराळेच झाल ? तात्यासाहेबांना निमत्रण केले त्याचे काय ? मग पारल्याला जाऊन चौकशी केली; तेव्हा समजल की, त्याच्या कार्यकारी मडळात लोकनायक बापूजी अण्या नाच बोलावण्याचे ठरलें मी म्हणालो, "पण हे तुम्ही तात्यासाहेबाना कळविलेत का ?" 'नाही' असे उत्तर आले !! आता आली का मान खाली घालण्याची पाळी ? तात्यासाहेब आपले ठरल्या तारखेला कोकणाचा मुक्काम सपवून पुण्याला येऊन पत्राची वाट पाहत बसले होते पण पारल्याच्या मडळींनी तर त्याची दखलच घेतली नाही अखेर श्री न वि भावे व मी उभयता पुण्यास गेलो झाल्या प्रकाराबद्दल ... समजूत कशी घालावयाची या विवचनेत पडलो त्याची क्षमा मागण्याखेरीज दुसरा कोणताहि मार्ग आम्हास दिसेना, म्हणून तोच माग आम्ही अवलबिला पण तात्यासाहेबासारख्या थोर माणसाची पारल्याच्या मडळीकडून अशी अवहेलना होऊनहि त्यानी या गोष्टीचा मुळीच विषाद मानला नाही उलट शातपणाने आमचीच समजूत घालीत ते म्हणाले, "होत अस कधी कधी ... अणे आले आणि मी आलो नाही, यात मुळीच काही बिघडल नाही. कोणी तरी अध्यक्ष होऊन समारभ व्हावयास हवा होता, तो झाला अध्यक्ष बापूजी की मी, हा महत्त्वाचा मुद्दाच नाही" केवढी उदारमनस्कता ही !

(४) ... अनेक तऱ्हेच्या देणग्या मिळविण्याकरिता कित्ये काच्या घरी मी गेलो आहे अनक अनुभव मला पाहावयास मिळाले आहेत देणगी हमखास मिळविण्यासाठी जेवढा वजनदार माणूस जाईल तेवढा देणगीचा आकडाहि भरघोस मिळू शकतो हा बहुतेकाचा अनुभव आहे. तेव्हा हिंदु राष्ट्रीय निधि जम विण्यासाठी आपण एकट्याने न जाता, तात्यासाहेबाना घेऊन काही विशेष श्रीमत गृहस्थाकडे गेलो, तर देणग्या सढळ ... , अशा विचाराने मी तात्यासाहे बाना माझ्याबरोबर येण्याची ... केली, त्यांना ती प्रथम मान्यच होईना ते म्हणाले, "आपल्या कार्याला पैसा मिळावा, अगदी पुष्कळ मिळावा, असं सारख वाटत असत हे खर; पण तो मा... जाण हे काही जमत नाही बुवा आपल्याला !" मग परोपरीने त्याना त्याच्या येण्याचे महत्त्व मी सागू लागलो तेव्हा ते माझ्या-बरोबर येण्यास तयार झाले मुबईतील कोट्याधीश गृहस्थ × × × याच्याकडे जाण्यास आम्ही निघालो. ... मी वाटेत म्हणालो, "हे गृहस्थ अतिशय श्रीमत आहेत; आणि आपल्याबद्दल त्याना मोठा आदर आहे तरी आपण आपला हेतु समजावून देता ; ते आपल्या म्हणण्यास मान देतील" "असं ?" तात्यासाहेबानी केवळ एकेरी उद्गार काढला मी पुन्हा म्हणालो, "आपण म्हणाल

तो आंकडा द्यायला ते गृहस्थ खरेच तयार होतील." "खर म्हणता की काय?" तात्यासाहेब आंतून चिंतेने पण वरून आश्चर्य दाखवीत म्हणाले. "पण तात्यासाहेब, आपण मागायला मात्र पाहिजे विचार न करिता तोंडाला येईल तो आंकडा आपण बेलाशक मागा" असे मी म्हणाल! "मागेन, मागेन." असे म्हणून तात्यासाहेबानी मला आश्वासन दिले "तुमच्या म्हणण्याचा आशय माझ्या ध्यानात आला आहे दाता मुक्तहस्ताने देणारा आहे, आता तुमच्या कौशल्यावरच रक्कम ठ्र पडणार आहे, असच ना तुमच म्हणण? मागेन, मागेन, मी सुद्धा मागेन आज बरं!" असे ते म्हणाले नतर आम्ही सदर गृहस्थांच्या बगल्यावर गेलो त्यानी आपल्या ''र्न ।न तात्यासाहेबाच्या विद्वत्तेचा मोठा आदर व मानसन्मान केला या गृहस्थाना त्याच्याकडे जाण्यापूर्वी, "तात्यासाहेब आपल्याशी अमुक अमुक विषयावर पुष्कळ बोलणार आहेत व आपल्याकडे या कार्यासाठी देणगी मागणार आहेत" असे मी सागून ठेवले होते प्रथम या बसा झाले हवापाण्याच्या गप्पा झाल्या चहाफराळाचे आदरातिथ्य झाले. तरा मूळ मुद्द्याचा विषय निघेना तात्यासाहेबानी खूपच गप्पागोष्टी केल्या नतर लाबलेले सभाषण सपवून घरमालकाना ते म्हणाले, "बर आहे; येतो आता आम्ही!" आणि नमस्कार करून तात्यासाहेब डोक्याला पगडी व्यवस्थित बसवीत उठले व रस्ता चालू लागले. मला मालकानी मुद्दामच थाबवून घेतले आणि म्हणाले, "काय हो खानविलकर, तात्यासाहेब तुमच्या निधीबद्दल अमुक बोलणार आहेत, तमुक सागणार आहेत, म्हणून तुम्ही म्हणत होता; आणि मुद्द्याची एक गोष्टसुद्धा ते बोलले नाहीत की" मी म्हणालो, "मोठा सकोची आणि भिडस्त स्वभाव आहे त्याचा सार्वजनिक कार्यासाठी सुद्धा–पैसे मागायला जीभ वळत नाही त्याची. आपल्याकडे ते आलेच होते, आणि येण्याचा हेतुहि मी सागितलाच आहे, तेव्हा ते आले म्हणजे देणगी मागण्यासाठीच आले हे ध्यानात घेऊन आपण . " मला असे झाले की, आपण देणगीचा आकडा सागावा तरी किती? तात्यासाहेबानी दहापधरा हजार रुपये मागायला हरकत नाही असे मी म्हणत होतो. पण येवढी देणगी मागायला माझीहि जीभ रेटेना तेव्हा जास्तीत जास्त म्हणून मी पाच हजार रुपये मागितले आणि त्यानीहि ते लगेच दिले!

(५) नतर मुबईतील दुसऱ्या एका श्रीमत गृहस्थाना मी जाऊन भेटलो आणि "आपल्याकडे अशा अशा कामासाठी तात्यासाहेब स्वत देणगी मागायला येणार आहेत" असे म्हणालो पण ते गृहस्थ म्हणाले, "अहो, तात्यासाहेबासारख्या विद्वान् आणि सार्वजनिक कामात सदोदित गुतलेल्या माणसाने माझ्यासारख्याकडे येण्यात वेळ कशाला खर्च करावयाला पाहिजे? तात्यासाहेब या कार्याशी सहमत आहेत हेच त्या कार्याच्या महत्त्वाचे खरे द्योतक आहे. त्याच्या विचारसरणीवर

माझा विश्वास आहे. मीच त्याच्याकडे येतो आणि ते म्हणतील ती देणगी देता " या गृहस्थाचा हा उत्साह आणि तात्यासाहेबाविषयीचा नितान्त आदर मी तात्यासाहेबाना अगोदरच बोलून दाखविला आणि त्याना एक प्रकारे नम्रपणाने .। पद्धतीनेच मी नम्रपणे म्हणालो, " तात्यासाहेब, हे गृहस्थसुद्धा आपण म्हणाल तो आकडा देतील आपण मात्र त्यावेळी । भिडस्तपणा न करता मोकळया मनाने देणगी मागावी " तात्यासाहेब हसून म्हणाले, " या वेळी अगदी घसघशीत आकडा मी सागणार आहे तुम्ही मुळीच काळजी करू नका त्यावेळी संकोच वगैरे मी करणार नाही येऊ देत ते, मग ते आहेत आणि मी आहे. " मी सदरहू गृहस्थाना बरोबर घेऊन आलो त्या वेळी तात्यासाहेब सरदारगृहात उतरले होते देणगी देणारे गृहस्थ मोठे गोष्टीवेल्हाळ होते तासभर गप्पा झाल्या आलेल्या गृहस्थाना सकल्पित विषयाचे विस्मरणच झाले आणि तात्यासाहेबाना आठवण होती तरी देणगी मागण्यास त्याचा जीव धजावेना ! त्यामुळे एकेक मिनिटाचा हिशेब ठेवणारे आणि मिनिट फुकट गेल्यास जिवाचा आटापिटा करणारे तात्यासाहेब, मुख्य मुद्दा अडगळीच्या खोलीतील सामानासारखा बाजूला सारून, अवातर विषयावर चागले तासभर बोलत बसले अखेर सरदारगृहाचे व्यवस्थापक त्याना जेवणाची वर्दी देण्यास आले. मग मात्र आलेल्या गृहस्थाना एकदम आठवण होऊन " खरच की ! मी अगदी विसरूनच गेलो. आपल्या त्या राष्ट्रीय निधीसाठी देणगी द्यायला मी आलो होतो किती देऊ मी आपल्याला " असे म्हणाले मी माझ्या कानात सगळी शक्ति एकवटून तात्यासाहेबाच्या शब्दाची वाट पाहात होतो तोच तात्यासाहेब म्हणाले, " अमुकच द्या असा काही आग्रह करीत नाही मी आपल्याला. आपण आपल्या इच्छेप्रमाणे वाटेल ते द्यावे ! " गृहस्थ म्हणाले, " पंधराशे देतो मी आपल्याला. " तात्यासाहेब हसून म्हणाले, " पुष्कळ झाले की ! " मग मीच मध्ये म्हणालो, " आमची अपेक्षा निदान दोन हजाराची होती " त्यानी तो आकडा लगेच मान्य करून चेक दिला !

त्यानंतर तात्यासाहेब मला म्हणाले, " आपल्याला काही हे मागण्याचे काम जमणार नाहीं बुवा ! माझ्या स्वभावाला काही हे जमेलस दिसत नाही. मी पुण्यास जाऊ काय ? " असे त्यानी विचारताच मी "होय" म्हणालो व त्याना बोरीबंदरवर पोचविण्यास गेलो !



## भास्कर वामन भट

(वकील, धुळें)

(१) कै० राजवाडे ता. ३१ डिसेंबर १९२६ साली गत झाल्यावर तात्यासाहेब दिल्लीच्या मध्यवर्ती विधिमंडळाच्या सभेला हजर राहण्याकरिता जानेवारी-

अखेर धुळयास आले होते त्या वेळी त्याचे वडील बधु येथे असल्याने त्याच्याकडेच ते उतरले होते. तव्हा नानासाहेब देव, मी व धुळें येथील काही गृहस्थ त्याच्या भेटीला गेलो भेटींत राजवाड्याचे बहुमोल हस्तलिखित ग्रथ व ऐतिहासिक कागदपत्र याची विल्हेवाट काय करावयाची हा प्रश्न उपस्थित झाला. तात्यासाहेब म्हणाले की, भारत इतिहास सशोधन मडळ ही सस्था राजवाडे व तात्यासाहेब महेदळे यानी स्थापन केली आहे तरी त्याच्याकडे हा सग्रह पाठवून द्यावा असें मला वाटते तात्यासाहेब हे भारत इतिहास सशोधक मडळाचे एक प्रमुख चालक होत व ही सूचना त्यानो करण यात काहीच गैर नव्हते. त्यावर तात्यासाहेब याग आम्ही असे म्हणालो की, धुळयास एखादी सशोधन सस्था स्थापन व्हावी अशी . . . . फार इच्छा होती. त्या इच्छेस अनुसरून राजवाड्याचे स्मारक म्हणून "राजवाडे सशोधन मदिर" या नावाची एक अदाह्य इमारत बाधून तींत हा त्याचा सग्रह सुरक्षित ठेवावा व इतिहाससशोधन करणारे एक मडळ स्थापावे अशी आमची सर्वांची इच्छा आहे त्यावर यत्किंचितहि आढेवेढे न घेता तात्यासाहेबानी या आग्रहास मान्यता दिली व यापुढे राजवाड्याचे वडील बधु नानासाहेब याच्याशी या सग्रहाबाबत धुळयाच्या मडळींनी जें बोलणे केले त्यास पूर्णपणे पाठिंबा दिला व साहाय्य केले. यात तात्यासाहेबानी आपल्या मनाचा उदारपणाच व्यक्त केला. या प्रकारचा थोरपणा क्वचितच आढळतो

( २ ) कै. राजवाड्याने मराठी धातुकोश व नामादि व्युत्पत्तिकोश असे दोन ग्रथ त्याच्या निधनापूर्वी त्यानी लिहून ठेविले होते धुळयास स्थापन झालेल्या राजवाडे सशोधन मदिराला ना . . . भेट देऊन मडळाला भेट देणाऱ्या गृहस्थाच्या अभिप्रायाच्या पुस्तकात त्यांनी आपला लेखी अभिप्राय नमूद करून ठेविला त्यात या ग्रथाच्या प्रसिद्धीचे काम तत्काळ मडळाने हाती घ्यावे असे त्यानी सुचविले ग्रथछपाईस लागणारी रक्कम उभारण्याविषयी एक विशिष्ट स्वरूपाची सूचना त्यानी केली होती. परतु मडळाने या ग्रथाच्या छपाईकरिता देणग्या मिळवून हे ग्रथ छापून प्रसिद्ध केले

( ३ ) राजवाडे मडळाने राजवाड्याचे चरित्र नुकतेच छापून प्रसिद्ध केले. त्या चरित्राविषयीं तात्यासाहेब यानी केसरीच्या दोन अकात विस्तृत व मार्मिक अभिप्राय दिला. हा सर्व अभिप्राय वाचला असता तात्यासाहेबांविषयी राजवाड्याचे मत चागले नसताहि उलट त्यानी मात्र थोर मनाने व उदार अतःकरणानें राजवाड्यानी केलेल्या कार्याची महती मुक्तकठाने वर्णन केली आहे. गुणी गुण वेत्ति

❀

## हरीभाऊ कुलकर्णी

### ( बी. ए., सहसंपादक 'मराठा', पुणें )

तात्यासाहेब वयाने वृद्ध झाले तरी मनाने तरुणच राहिले होते. ताज्या ताज्या देशीपरदेशी मासिकें आणि पुस्तकें वाचावी, नवी नवी माहिती मिळवावी, काळाबरोबर धावावे ही त्यांची हौस आणि तडफ शेवटपर्यंत कायम होती. 'मराठ्या'तील अभिप्रायाचें सदर माझ्याकडे होते. त्यामुळे चागली इंग्लिश पुस्तके नेहमी येत ती तात्याकडे पाठविण्याचा शिरस्ता असे. तथापि केव्हांहि भेटले कीं, त्यांनीं हटकून विचारावे, " काय रे, नवीं पुस्तके कोणती आली आहेत ? "

व्यासगाचा कटाळा त्यानी कधी केला नाही. पुणे पत्रकार सघाच्या स्वाध्याय-मडळानें त्याचा एक वर्ग काढला. त्या व्याख्यानासाठी मुबई-पुण्याची प्रमुख इग्रजी-मराठी पत्रें निवडून एका आठवड्याच्या अकातून सपादकीय लिखाण किती कॉलम येते, विविध विषयावर मजकूर किती, जाहिराती किती, बातम्या किती, त्यांत पुन्हा परदेशच्या आणि स्थानिक किती याचें एक कोष्टकच तात्यासाहेबानीं बनविले. वस्तुतः आपली उभी हयात त्यांनीं याच व्यवसायांत घालविली. पण व्यवस्थित टिपणे काढल्याशिवाय सहसा लिहावयाचें बोलावयाचे नाही, असा तात्याचा रिवाजच असे. सदर कोष्टक त्याच्या हस्ताक्षरातील असल्याने तें मीं जपून ठेवले आहे.

लो. टिळकाच्या हयातीत आणि नतर त्याच्याविषयी तात्यानीं जितके लिहिले तितकें इतर कोणी लिहिलें नाहीं. पण कॉंग्रेसच्या डायमड ज्युबिलीच्या ग्रथात ' टिळक व कॉंग्रेस ' या विषयावर लिहिण्यासबधी जेव्हा त्याना अतिशय आग्रह झाला आणि त्यांनाहि भीड मोडवेना, तेव्हा 'केसरीच्या ग्रथशाळेंतलीं अमकीं पुस्तकें तूच घे, वाच आणि नीट सदर्भ काढून पानात खुणा घालून घेऊन ये म्हणजे मी मजकूर सांगेन ' असें त्यानीं मला सांगितले. कारण लेखातली माहिती बिनचूक गेली पाहिजे असा त्याचा कटाक्ष असे. मी पुस्तकें घेऊन गेलों. तीं चाळता चाळता माझ्या वाचनातून सुटलेले टिळकविषयक उल्लेख त्यानीं किती तरी काढून दाखविले. इकडे तोंडानें मजकूर सागण्याचें काम चाललेंच होतें !

तात्या म्हणत, सपादक हा सोनाराच्या ताजव्यासारखा असावा. वजनांतला सूक्ष्म फरकसुद्धा तोलून दाखविण्याइतका तो ताजवा नाजुक असतो तसा नव्या नव्या बारीकसारीक घटनांचीसुद्धा ताबडतोब दखल घेण्याइतका सपादक तत्पर ( Sensitive ) असला पाहिजे. पण वजन काढून घेतलें की लगेच ताजवा समतोल होतो, त्याप्रमाणे सपादकाची बैठक स्थिर ( Stable ) पाहिजे. त्याच्या बुद्धीचा तोल कदापि जातां कामा नये. तात्यांच्या या व्याख्येचें खुद्द त्यांच्यापेक्षा

चांगले उदाहरण मुद्दाम शोधलें तरी सांपडणार नाहीं. प्रसंगीं खुद्द टिळकांचाहि विरोध तात्यांनीं पत्करला, पण आपल्या सारासारबुद्धीशीं प्रतारणा त्यांनीं केली नाहीं हे त्यांचें वैशिष्ट्य होय



## पंडित विनायकबोवा पटवर्धन

(प्रिन्सिपॉल, गांधर्व-महाविद्यालय, पुणें)

(१) माझे गुरु कै. विष्णु दिगंबरजी व तात्यासाहेब यांचा फार लहानपणापासून परिचय होता. कै. गुरु विष्णु दिगंबर यांच्याकडे लाहोरलाहि तात्यासाहेब येऊन गेले होते. मुंबईला तर विद्यालयांत वरचेवर ते येत असत व पंडितजींच्याबद्दल जागजागीं आपल्या लेखांतून व पुस्तकांतून त्यांनीं उल्लेख केलेला आढळतो. संगीताची आवड तात्यासाहेबांना फार होती. केसरी व इतर राजकारणांतून वेळ मिळाला म्हणजे संगीताबद्दल ते फार आस्थेनें विचार करीत असत. १९२५ सालीं कानपूरला कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठीं ते आले होते. कॉंग्रेसबरोबर संगीत-संमेलनहि माझे गुरुजी भरवीत असत. त्या संमेलनाचें अध्यक्षपद तात्यासाहेबांनीं स्वीकारून संगीताबद्दलचें आपलें उत्कट प्रेम व्यक्त केलें होतें. त्यानंतर १९२८ सालीं पुण्यास पंडितजींनीं महाराष्ट्र प्रांतिक संगीत-परिषद तात्यासाहेबांच्याच अध्यक्षतेखालीं प्रथम भरविली व याच परिषदेंत 'संगीताचें मराठीकरण' करणें किती अवश्य आहे हे अध्यक्षीय भाषणांत त्यांनी पटवून दिलें. १९२८ ते १९३८ पर्यंत हा वाद महाराष्ट्रांत फारच जोरांत सुरू होता व त्यास कारण तात्यासाहेब होत. संगीतांत अर्थप्रचुर काव्य म्हटलें जावें, अर्थबोधाप्रमाणें गाणें व्हावें असा त्यांचा आग्रह होता. प्रस्तुत लेखकाहि वरील दहा वर्षांत मराठीकरण व्हावें म्हणून प्रचार करीत होता. त्या वेळीं तात्यासाहेबांनीं केसरींतून त्याच्या लेखांना जागा देऊन संगीतावरील आपलें प्रेम व्यक्त केलें होतें.

(२) पुण्यास १९३२ सालीं गांधर्वमहाविद्यालयाचें उद्घाटन तात्यासाहेबांच्याच हस्तें झालें. संगीताबद्दल बऱ्याच गोष्टींची त्यांनीं आपल्या व्याख्यानांत चर्चा केल्यावर एक सूचना म्हणून जी केली ती अत्यंत विचारणीय होती. ती म्हणजे 'गाणें शिकवितांना तंबोऱ्यावर शिकवा, हार्मोनियमवर नको' ही होय. ही सूचना या घटकेपर्यंत विद्यालयांत अमलांत आलेली आहे. त्या सूचनेप्रमाणें वागण्यानें पुण्याच्या विद्यालयाचें एक वैशिष्ट्य म्हणून 'तंबोऱ्यावर शिकविणें' ही गोष्ट समजली जाते. विद्यालयाचे वर्ग कसे चालतात हें पाहण्यासाठीं म्हणून तात्यासाहेब मुद्दाम आले होते व २-३ तास निरीक्षण करीत होते. अखेरपर्यंत मी भेटलों म्हणजे विद्यालयाबद्दल चौकशी आपुलकीनें ते करीत असत.

(३) गायनाचार्य वझेबुवांचा व तात्यासाहेबांचाहि बराच परिचय होता. बुवांची माहिती पुण्यात अगोदरपासून बरीच होती; पण बेळगावहून बुवा पुण्यात कायमचे राहण्यास आल्यानंतर प्रथम त्यांचे गाणे महाराष्ट्रीय मंडळात तात्यासाहेब यांनी करविले. पुण्यातील निवडक व रसिक लोक तात्यासाहेबांच्याच आमंत्रणावरून आले होते. पुढे बुवांच्या ७१ व्या वाढदिवसाची सभा तात्यासाहेबांच्याच अध्यक्षतेखाली झाली होती. त्याचप्रमाणे कै. गु. विष्णु दिगंबरांच्या मृत्यूबद्दलच्या शोकसभेला तात्यासाहेबच अध्यक्ष होते, व त्या वेळी पंडितजींच्याबद्दल जे धन्योद्गार त्यांनी काढले ते कुणीहि विसरणे शक्य नाही.

(४) १९२८ साली पुण्यास भरलेल्या संगीत-परिषदेत अध्यक्षीय भाषणात त्यांनी संगीताच्या मराठीकरण करण्याबद्दल आपले मत इतक्या मुद्द्यांसहित मांडले की, संगीताचे मराठीच्या रूपाने एकप्रकारे शुद्धीकरणच तात्यासाहेबांनी केले. अलौकिक बुद्धिमत्तेमुळे संगीतात एक बुद्धिवाद उत्पन्न करून अंधपरंपरेच्या लोकांना त्यांनी खडबडून जागे केले. १९३८ साली श्री. टेंबे यांच्या ... आपली बाजू सप्रमाण मांडून मराठीकरणाच्या विरोधकांना त्यांनी सर्वस्वी नामोहरम करून टाकले. तात्यासाहेबांनी मराठी ख्याल करण्याचा विचार ... मांडून ख्याल मराठीत होऊ ... हे आपल्या काव्यांनी सिद्ध केले. त्यांनी गाण्यासाठी म्हणून मराठी पद्ये बरीच रचली व प्रत्यक्षपणे सिद्धता दाखवून नवीनपणाने विचार करण्याची जरूरी गायक लोकांना पटवून दिली. मराठी पदे व ख्याल कै. पं. विष्णु दिगंबर १९१५ पासून करवून घेत असत; पण त्याला चालना मात्र १९२८ सालापासून केवळ तात्यासाहेबांच्यामुळे मिळाली हे खास. अशा प्रकारे संगीताची सेवा त्यांनी फार निष्ठेने व अव्यभिचारी भक्तीने केली आहे.

(५) १९३२ साली पुण्याच्या विद्यालयाच्या स्थापनेनंतर माझा यांचा फारच परिचय झाला. एका जाहीर सभेला मी प्रथम ईशस्तवन करणार होतो. सभा सहा वाजता होती; आणि पावणेसहा झाले तरी मी आलो नाही तरी सभेच्या चालकांना त्यांनी विश्वासाने सांगितले की, 'बुवा वेळ कधी चुकणार नाहीत, वेळेवर खास येतील,' ते असे बोलत आहेत तोंच मी सभेत पोचलो. लगेच 'बघा, बुवा आले' असें म्हणून माझ्यावरील प्रेम व्यक्त केले. पुण्याचे गांधर्व महाविद्यालय मीं स्वतः सुरू केले. सुमारे दहा वर्षानंतर विद्यालय सार्वजनिक करावे व रजिस्टर्ड संस्थेच्या ताब्यात द्यावे असा विचार मनात येताच प्रथम मी तात्यासाहेबांच्याकडे गेलो, तेव्हा त्यांनीं सार्वजनिक संस्था केल्याने काय काय घोटाळे होतात याचें पूर्ण स्वरूप माझ्यापुढे उभें केलें व खरा संस्थापकच बाजूला राहून दुसरेच मालक अथवा शिरजोर होण्याचा कसा संभव असतो, हेंहि त्यांनी समजावून सांगितलें व पुढे त्याप्रमाणे याची प्रचीति प्रत्यक्ष प्रस्तुत लेखकाने घेतली त्या वेळी तात्यासाहेबांच्या खऱ्या

सल्ल्याची किंमत कळली ! ! अशा पुष्कळ गोष्टीत तात्यासाहेबांच्या सल्ल्याचा अनुभव मी घेतला असल्याने त्यांच्या बुद्धिमत्तेची प्रशंसा करावी तेवढी थोडीच.



## के. वा. गजेंद्रगडकर

( वकील, सातारा )

( १ ) १९३५ सालची गोष्ट. हिंदुमहासभेचे अधिवेशन पुण्यास होते. त्याच वेळी धर्मनिर्णय मंडळाचे वार्षिक अधिवेशनहि जगद्गुरु डॉ कुर्तकोटी यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यास होते हिंदुमहासभेच्या अधिवेशनाचे तात्यासाहेब स्वागताध्यक्ष होते व त्यामुळे ते अगदी कामात व्यग्र होते तरीसुद्धा वेळ काढून धर्मनिर्णय मंडळाच्या अधिवेशनास ते मुद्दाम आले होते व तेथे अतिशय सुंदर भाषण करून तेथील कार्यास त्यांनी प्रोत्साहन दिले

( २ ) १९४२ साली मी प्रथम 'हिंदु कायद्याची सुधारणा' या विषयावर लेख लिहिला व पुढे सह्याद्रींतहि लेख लिहिले पुष्कळ वेळा त्यांनी पत्रे पाठवून माझ्या लेखाबद्दल आपले मत कळविले व मला उत्तेजन दिले कोणत्याहि कार्यात काम करीत असलेल्या व्यक्तीस प्रोत्साहन द्यावयाचा त्यांचा स्वभावच होता



## सदाशिव हणमंत बल्लाळ

( संपादक 'लोकमत', यवतमाळ )

तात्यासाहेब यांची काम करण्याची पद्धत, प्रत्येक क्षणाचा सदुपयोग करण्याचे व्रत, चांगल्या गुणाचा कणहि आढळल्यास त्या गुणवानास उत्तेजन देण्याची त्यांची हौस याचा माझ्या मनावर कायमचा ठसा उमटविणारी एक आठवण देतो १९१६ साल असावे मी अच्युतराव कोल्हटकरांच्या 'संदेश' दैनिकाचा संदेशवाहक म्हणून नगर येथे भरलेल्या महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस परिषदेस गेलो होतो परिषदेचे अध्यक्षपद तात्यासाहेबांकडे असून स्वतः लोकमान्य टिळक अधिवेशनास हजर होते. यामुळे त्या अधिवेशनास अपूर्व महत्त्व आले होते तात्यासाहेब यांनी आपले अध्यक्षीय भाषण लिहून काढलेले नव्हते काही मुद्द्यांचे टाचण करून त्यावरून ते विस्तृत बोलले त्याच रात्री तात्यासाहेबांचे समग्र भाषण मी लिहून काढले मला रात्रीचे दोन वाजले ! पहाटे मी प्रथम तात्यासाहेब उतरले होते त्या माडीवर गेलो. खोलीत तात्यासाहेब व दि. वा. दिवेकर हे दोघेच होते. परिषदेच्या कामाला प्रारंभ करण्यापूर्वी आपल्या कालच्या भाषणाचा त्रोटक सारांश तात्या

साहेबाना "मराठा" वर्तमानपत्रात पाठवावयाचा होता दिवेकर हे स्वतः "मराठा"चे वृत्तहारकच; पण तात्यासाहेबानी हे भाषण स्वतःच दिवेकराना लिहून घेण्यास सागितले. तात्यासाहेब सागत व दिवेकर ते टिपून घेत हे काम झाल्यावर माझ्या कडे वळून ।·। ॆ ॥ मला म्हणाले, " काय बल्लाळ, काय काम आहे? आपणाला आता परिषदेला जायचे आहे, बोलायचे असेल ते चटकन बोला " मी चटकन खिशातले कागद काढले आणि ते त्याच्या स्वाधीन केले तात्यासाहेबाच्या भाषणाचा "सदेश"कडे पाठवावयाचा तो साराश होता महत्त्वाचे मुद्दे मी जाड टकात घेण्याकरिता शीर्षकें म्हणून लिहिली होती, तात्यासाहेब माझे कागद घेऊन वाचू लागले त्याच्या मनातील समाधानाच्या व सतोषाच्या रेषा त्याच्या तोंडावर उठत होत्या. सगळे कागद वाचल्यानतर त्यानी पुन प्रथमपासून सगळ्या वृत्तान्तावर दृष्टि टाकली व दिवेकराना ते म्हणाले, " दिवेकर, याचे नाव रिपोर्टिंग ! वक्ता बोलत असता पुढे जातो, मागच्या मुद्दयाचे स्मरण झाले म्हणजे त्याचाहि विस्तार करतो मागचे–पुढचे हे सर्व जुळवून वक्त्याचे म्हणणं पद्धतशीर रीतीनं पुढे न माडता तो बोलला तेच शब्द त्याच क्रमाने लिहून काढणे याला रिपोर्टिंग म्हणत नाहीत चागले रिपोर्टिंग करायला वक्त्याच्या मनोभूमिकेवर आरूढ व्हावे लागते एकापरी बोलणे सोपे, पण ते लिहिणे कठिण असते ते यामुळेच बल्लाळाचे हे 'रिपोर्टिंग' म्हणजे मी एक अनुकरणीय नमुना समजतो " असे दिवेकराशी बोलून तात्यासाहेबानी माझे कागद माझ्या स्वाधीन केले तात्यासाहेब केळकर व 'सदेश' पत्र याच्यामध्ये हार्दिक प्रेमसबधाचा जिव्हाळा नसून उलटभावना होती, हे सर्वश्रुतच आहे. असे असताहि त्यानीं मला आपलेसे समजून जो मनाचा उदारपणा व सौजन्य दाखविले व माझ्या अगच्या गुणाची "परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य" शिफारस केली तिचे विस्मरण मला केव्हाहि होणें शक्य नाही



## का. मो. सहस्रबुद्धे

(जमीनदार व व्यापारी, भाजे)

भोर-दरबार आणि पवनमावळ तालुका व्यापारी सघ याजमधील एका महत्त्वाच्या गोष्टींत अडचणी उत्पन्न होऊन प्रकरण एक वर्षभर भिजत पडलें. मी मॅनेजिंग डायरेक्टर होतो. वरील अडचणीत कपनी असताना एके दिवशी भोर दरबारकडून तात्यासाहेब यास कार्याध्यक्ष नेमले आहे असे सरकारी पत्रक प्रसिद्ध झालें. त्यामुळें आम्हास उमेद येऊन आशेचा अंकुर उत्पन्न झाला. तात्यासाहेब यानीं प्रथम-भेटीतच आमची बाजू ऐकून घेऊन प्रकरण इतके दिवस राहिल्या-

बद्दल आश्चर्य व्यक्त केले व सर्व दृष्टींनी विचार करून निर्भीडपणे आमच्यासारखा निकाल देऊन आजपर्यंतच्या काम करण्याच्या मस्थानी पद्धतीला खो दिला व आम्हास कायमचे उपकृत करून ठेविले !



## यशवंत दत्तात्रय खोले

(रावसाहेब, चेअरमन, पुणें सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक)

सन १९३२ माली 'स्थानिक स्वराज्य' त्रैमासिक दे. भ. भालचंद्र महेश्वर गुप्ते, एम्. एल्. ए. यांच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध होण्याचे ठरले. श्री. गुप्ते यांचा मदतनीस म्हणून लेख जमविण्याचे काम मजकडे आले मी प्रथम तात्यासाहेब यांची गाठ घेऊन त्रैमासिकास लेख देण्याबद्दल विनती केली व ती त्यांनी तत्काळ मान्य केली व मला लेख लिहून घेण्यास बोलाविले लेखाचा मथळा 'स्थानिक स्वराज्य शिक्षण' असा दिला व त्यामध्यें शिक्षणद्वारा स्थानिक स्वराज्य संस्था, आरोग्य, शिक्षण वगैरे प्रश्न कसे सुद्द शकतील याचे सुंदर विवेचन केले या लेखात अशिक्षितासंबंधी पुढीलप्रमाणे मार्मिक उल्लेख आहे. "ज्यांना आपण अशिक्षित म्हणतो ते आपला स्वतःचा संसार किंवा व्यवहार आस्थेने तर चालवितातच, पण पुष्कळसा बिनचूक चालवितात असें आढळून येते." दुसऱ्याबद्दल गुणग्राहकता दाखविणे हा त्यांचा फार मोठा अनुकरणीय असा गुण होता.



## भा. मा. ऊर्फ बाळासाहेब साठे

(इनामदार, वांई)

(१) वाई टिळक-स्मारक व वाई ग्रंथसंग्रहालय ह्या संस्थांचा वाद विकोपास जाऊन ग्रंथ-संग्रहालयाची पुस्तके वगैरे सर्व मालमत्ता टि स्मा. संस्थेच्या ताब्यांत व ग्रंथसंग्रहालयाचा कायमनिधि मात्र माझ्या ताब्यात अशी एक अडचणीची परिस्थिति उत्पन्न झाली ! अर्थात् अशा वेळी मी तात्यांच्याकडे धाव घेतली व केसरीच्या तिजोरीत पस्तीसशे रुपयांची कॅश सर्टिफिकिटे ठेवून तात्यांनी टिळक-स्मारक संस्थेच्या कार्यकर्त्यांस तसे कळवून तडजोडीच्या चर्चेकरिता तयार आहात काय असा लेखी सवाल टाकला दुर्दैवाने तात्यासाहेबांना समाधानकारक उत्तर न मिळाल्यामुळे तो तंटा निकालात न निघता तसाच लोंबकळत पडला ! पुढे माझी प्रकृति बरीच बिघडली व मी मुंबईच्या मार्गावर असताना पुण्यास

उतरल्यावर तात्याना निरोप पाठविल्यामुळे ते माझ्याकडे आले " हे भांडण असेच राहू देणें इष्ट नाही. पुढे काय करावे ? " असा प्रश्न मी केल्यावर ते म्हणाले, " तुम्हास आयुष्याचा भरवसा वाटत नसला तर जर तुमचे ग्रंथसंग्रहालयातील सहकारी टिळक-स्मारक संस्थेच्या ताब्यात बिनशर्त रक्कम देण्यास तयार नाहीत तर तुम्ही रक्कम देण्याचा आग्रह का धरता ? " त्यावर मी म्हटले, " माझ्या तोंडास त्या रकमेमुळे नि:कारण काळोखी लागेल व मेल्यावर मुद्धा भांडण कायम ठेवले इतका मी भांडखोर आहे असे लोक म्हणतील " त्यावर ते लागलीच उत्तरले, " लोकशाहीत वैयक्तिक विचार बाजूस ठेवला पाहिजे फार तर दोन तरुण ट्रस्टी नेमून त्याच्या ताब्यात रक्कम द्या व उभय संस्था-चालकांचे ऐकमत्य झाल्याशिवाय ही रक्कम कोणाच्याच हवाली करू नये असा निर्बंध घाला तुमचे काम येथेच संपले तुम्ही मोकळे झालात पुढचे पुढे काही होवो " मला हा सल्ला पटला नाही व मी रक्कम टिळक स्मारक संस्थेच्या ताब्यात देऊन टाकली हा भाग वेगळा, पण त्याचाच सल्ला लोकशाही तत्त्वास पूरक व योग्य होता असेच अद्यापिहि ग्रंथसंग्रहालयाचे माजी पुरस्कर्ते म्हणतात !

( २ ) माझ्या कीर्तनसेवेची चौदा वर्षे होऊन प्रकृतिदौर्बल्यामुळे विराम पावण्याचे मी ठरविल्यामुळे वाईतील माझे स्नेही, चाहते व प्रमुख पुढारी यानी माझा सत्कार केला त्या प्रसंगाची हकीकत दोन तीन [illegible] छायाचित्रासह विस्तृत आली सत्कार मंडळाच्या चालकानी थोडासा वृत्तान्त व माझे छायाचित्र केसरीकडेहि [illegible] पाठविले होते, पण त्याला प्रसिद्धि मिळाली नाही पुढे ही कारवाई मधल्यामध्यच केली गेल्याची कुणकुण माझ्या कानावर आली [illegible] ग्रंथसंग्रहालयाच्या [illegible] मी गेलो असताना हा विषय निघाला मी त्याना सर्व हकीकत सांगितल्यावर ते बरेच रागावले व म्हणाले, " आलेला मजकूर प्रसिद्ध करणं न करणे हा अधिकार संपादकाचा आहे. त्यात इतरांची लुडबूट चालू देता कामा नये उद्या स्मरणासाठी मनुष्य पाठवा योग्य ती व्यवस्था मी करीन " दुसऱ्या दिवशी मी मनुष्य पाठविला, पण तो जाण्याच्या पूर्वीच तात्यासाहेब हाच मजकूर लेखकास सांगत होते व तो लिहून झाल्यावर त्यानी माझे छायाचित्र कचेरीतून मागवून त्याचा ब्लॉक करून व तो मजकूर कंपोज करून प्रसिद्धीस द्या असें सांगितले व तसे मला कळविले ! अर्थातच ते सर्व केसरीत प्रसिद्ध झालें व मधली लुडबूड मध्येच जिरली हे लिहावयास नकोच !



## गणेश त्र्यंबक बापट

### ( एम्. ए., एस. टी. सी., पुणें )

इ स १९२३ मध्यें मी पुणे येथील नेटिव्ह जनरल लायब्ररीचा ( पुणे नगर-वाचन-मंदिराचा ) मुख्य ऑनररी सेक्रेटरी होतो लायब्ररीचा पचाहत्तरावा वाढदिवस माझ्या सूचनेवरून करण्याचे ठरले त्या दिवशी अध्यक्षस्थानी तात्यासाहेब होते। वाढदिवशीं पुण्याच्या ज्ञानप्रकाशात केळकराच्या राजकारणावर टीकात्मक लेख माझ्या सहीवर प्रसिद्ध आला होता ! लायब्ररीच्या वाढदिवशी सायकाळी माझे भाषण झाल्यावर केळकराचे भाषण झालें नतर आम्ही खाली . . . काढण्यासाठी गेलो. फोटो काढण्यास जात असताना केळकरानी मला जरा बाजूला बोलावून सागितले, " बापट, मी तुमचा ज्ञानप्रकाशमधील आजचा लेख वाचला तुम्ही होतकरू लेखक आहात; परतु माझ्यावरील टीकेत तुम्ही कोठे चुकत आहात हे मी तुम्हास सागतो " अस म्हणून थोडक्यात त्यानी तत्कालीन राजकारणाचा आढावा घेऊन माझी चूक माझ्या नजरेस आणून दिली त्यानतर मुबईस गिरगावात ब्राह्मणसभेत त्याची व माझी गाठ काही सार्वजनिक प्रसगी पडली त्या वेळी माझी विचारपूस त्यानी केली. माझी आठवण त्याना राहिली कशी, याचे मला आश्चर्य वाटले ! त्याचे मन मोठ व स्मरणशक्ति दाडगी हे नि सशय होय



## शिवाजीराव पटवर्धन

### ( डॉक्टर, अमरावती )

( १ ) बर्लिन येथील ऑलिम्पिक खेळाकरिता श्रीहनुमान व्यायाम-प्रसारक मडळातर्फे खेळाडू पाठविण्याचे ठरलें होते त्याच्या तयारीकरिता मी मुंबईस गेलो होतो. तात्यासाहेबहि तेथे आले होते पुढील राजकारणाच्या दृष्टीने ऑलिम्पिक खेळांमध्ये हिन्दुस्थानी खेळ दाखविणे किती आवश्यक आहे ह त्याना पटवून देण्याचा माझा मानस होता; पण त्यापूर्वीच ते होऊन म्हणाले, " हिंदुस्थानाचे नाव वैभवाने सर्वच गोष्टीत जगापुढे यावे याबद्दल मी शक्य तावर प्रयत्न करीत असतों. त्याची जबाबदारी खास महाराष्ट्रावर आहे; पण दुर्दैवाने महाराष्ट्रात एकी नाहीं व फितुरी आहे उलटपक्षी बुद्धिमत्ता आहे, साहस आहे, पराक्रम आहे, त्याग आहे, सर्व काही आहे; पण मत्सराने व सशयी दृष्टीनें आपण एकमेकाकडे पाहतो. हा राष्ट्रीय दोष काढून टाकण्यास व खेळाडू वृत्ति निर्माण करण्यास व्यायामाचा प्रसार करणें हा एक उपाय आहे. व्यायामाच्या बाबतींत महाराष्ट्र आदर्शभूत कार्य करीत आहे, त्या-बद्दल प्रत्येकास अभिमान वाटला पाहिजे." यानंतर मी त्यास टिळक-स्मारक

फंडातून पाच हजार रुपये या कामास देण्याबद्दल विनंती केली. त्यांनीं ताबडतोब ती मान्य केली; पण म्हणाले, "अरे हो, त्या फंडाचा मी एकटाच मालक नाही. तुम्ही बाकीच्या विश्वस्तांची संमति मिळवा रक्कम मिळेल" त्यांनीं दिलेल्या या उत्तेजनामुळेच ऑलिंपिक खेळास आम्ही जाऊ शकलों हे मला कृतज्ञतापूर्वक कबूल केले पाहिजे!

(२) मी एकदा पुण्यास त्यांना भेटण्याकरिता मुद्दाम गेलो होतो. कॉंग्रेसचा संबंध त्यांना त्या वेळी जवळजवळ सोडला होता मी त्यांना म्हणालो, सध्याचे राजकारण चुकीचें आहे असे वाटते टिळक-पक्षातील सर्व लोकांना एकचित्त करून नवीन दिशेने व सर्वांना पटेल अशा प्रकारे कार्यप्रवृत्त करण्यास पुनः एकवार आपण प्रयत्न करून पहावा टिळकानंतर सर्व लोक आपल्याकडून मार्गदर्शनाची व कर्तृत्वाची अपेक्षा करीत आहेत यावर ते म्हणाले, "लोकमान्य टिळकांच्या दृष्टीने लोक मजकडे पाहतात ही त्यांची चूक आहे. अहो, कोठे टिळक, कोठे मी! सूर्य आणि काजवा इतकं अंतर आम्हा दोघांत आहे. तुम्ही लक्षात ठेवा कीं, सर्वच दृष्टीने अद्वितीय असल्याशिवाय पुढारी म्हणून महाराष्ट्र कोणा-सहि मानण्यास व तो मागेल तसे श्रद्धेने वागण्यास तयार होत नाही हा त्याचा दोष म्हणा, गुण म्हणा, आहे ही गोष्ट खरी, म्हणून असा पुढारी मिळेपर्यंत प्रत्येकानें आपआपल्या पुरते पाहून काही काळ तरी वागणे भाग आहे आपल्या लोकांत व्यक्तिनिष्ठा जास्त आहे, तत्त्वनिष्ठा व खरी राजकीय दृष्टि आपल्यात अजून निर्माण व्हावयाची आहे महात्मा गांधींच्या कारकीर्दीत ती निर्माण होणे शक्य नाही यात सर्व काही समजा."



## शंकर कृष्ण कुळकर्णी

(चिकोडी, बेळगांव)

माझे काका ती सखारामपंत कुळकर्णी सदलगेकर वकील हे १९२१ मध्ये दिवंगत झाल्यानंतर आमच्या एका जमिनीच्या कज्जाचे अपील मुंबई हायकोर्टात चालले होते सदरहू खटल्याचे काम माझे वडील ती कृ पा. कुळकर्णी यांनी अनुक्रमे चिकोडी आणि बेळगाव या कोर्टात लढविलें होते; पण प्रकरण हायकोर्टात गेल्यावर त्यांचा धीर सुटला तात्यासाहेब आणि कै सखारामपंत यांच्यातील स्नेहसंबंध—ऋणानुबंध—ध्यानी घेऊन त्यांनी तात्यासाहेबांच्याकडे धाव घेतली! कार्यबाहुल्यामुळे त्या वेळी तात्यासाहेब मुंबईस जाऊ शकले नाहींत, पण 'केस'चा साद्यंत अभ्यास करून बॅरिस्टराला देण्याकरिता त्यांनी काहीं मुद्दे काढून दिले, आणि हायकोर्टाचा निकाल काय होईल याचा अंदाज चिकोडीस त्यांनी आम्हाला

लिहून कळविला. आश्चर्याची गोष्ट अशी की, नतर लौकरच हायकोर्टाचा जो निकाल आला, त्यांत आणि तात्यासाहेबांच्या अदाज- अर्थाच्या दृष्टीनें तिळमात्र फरक नव्हता !!



## गोविंद गणेश वैद्य

### ( संपादक, 'वृत्तसार', वांई )

( १ ) तात्यासाहेबाना कामाकरिता कोणीहि चिठ्ठी मागावी व त्यानी नाहीं म्हणू नये असे जवळजवळ ठरून गेलें होते बनारस विश्वविद्यालय व पडित मालवीय याचें नाव सर्वश्रुतच आहे वाईच्या एका वाडसी मुलाला प मालवीयाच्या मार्फत आपली कोठेतरी शिक्षणाची सोय व्हावी अशी इच्छा झाली. पण पंडितजींना परिचयपत्र कोण देणार ? अशा विचारात त्याला वाटले की, आपण तात्यासाहेबाकडे जाऊन परिचय-पत्रिका मागावी व त्याप्रमाणे तो त्याच्याकडे गेला. त्या मुलाजवळ त्यानीं फारशी चौकशी केली नाही. मुलगा चुणचुणीत आहे असें दिसलें व आपल्या चिठ्ठीनें काम होत आहे असे वाटून त्यानी तशी चिठ्ठी दिली. सदरहू मुलानें चिठ्ठी घेऊन बरोबर दोन सोबत्याना घेऊन काशीला प्रयाण केलें केळकराच्या चिठ्ठीला एवढा मान कीं, त्या मुलाची दुसरीकडे कोठे सोय करावयाच्या ऐवजीं पडितजीनीं त्याला आपल्या घरीच ठेवून घेतले व सर्व खर्च चालविला !

( २ ) कांग्रेसचे व तात्यासाहेबाच पहिल्यापासून म्हणजे, म गाधी प्रभावी झाल्यापासून, कधी जमले नाहीं यामुळे महाराष्ट्रातील तरुण टिळकानुयायी मडळी फार नाखूष झाली होती. तात्यासाहेब भावनेच्या आहारी कधीच गेले नाहींत व पुष्कळ वेळा त्याना लोकाचा रोष सहन करावा लागला एकदा त्याच्या मनांत आले की, लोकाच्या गाठी घेऊन त्याना आपली भूमिका सागावी. त्याप्रमाणें ते वांईस आले व बरीच खाजगी चर्चा झाली. चर्चेने वातावरण फार गरम झाले होते. शेवटीं ते म्हणाले, "मी जसा आहे, तसा तुम्हाला पत्करावयाचा असेल तर पत्करा. मी नको असेन तर दुसरा पुढारी निवडा. केसरीचे धोरण तुम्हाला पसत नाही तर दुसरा सपादक तुम्ही सागाल तो मी नेमण्यास तयार आहें !" या उत्तराने चर्चेला निराळेच वळण लागले. भावना व व्यवहार कशी भिन्न आहेत याचें त्यांनी मार्मिक परीक्षण केलें. मडळी गप्प झाली तरी टिळकाच्या मागोमाग तात्यासाहेबानींच महाराष्ट्राचें पुढारीपण टिकविले पाहिजे ही कल्पना दूर होईना.

( ३ ) कॉंग्रेसच्या प्राथमिक सभासदत्वाची अट प्रत्यही सूत कातणे व खादीचा पोषाख वापरणें, ही त्यांना कधींच मान्य नव्हती या अटीला त्यांनीं

प्रथमपासूनच विरोध केला होता पण शिस्त म्हणून काँग्रेसमध्ये असेतोपर्यंत त्यानी ती पाळली होती फेरनाफेरवादाच्या नौबती झडत होत्या व कौन्सिल प्रवेश काँग्रेसने मान्य केला होता काँग्रेसच्या तरुण अनुयायात यामुळे उच्छृंखलपणा फार वाढला होता ।। ।। दे।।।।ि याची झळ लागली होती अशाच एका प्रसगी ते वाईच्या पटागणावर व्याख्यानाला उभे राहिले. त्यांच्या पायाजवळच बसलेल्या एका श्रोत्याने त्याच्या धोतराला हात लावून पाहिला व तो एकदम उभा राहून म्हणाला की, "या प्लॅटफॉर्मवर तात्यासाहेबाना बोलता येणार नाही त्याचा पोशाख खादीचा नाही" तात्यासाहेब खवळून म्हणाले, 'माझा पाशाख ।।।।ा आहे. या माझ्या सागण्यावर तुम्ही विश्वास ठेवला पाहिजे या अटीने ।।।।।।।।। भादूगिरी शिरली आहे व वाटेल त्या सोम्यागोम्याने उठावे व कोणाचाहि उपमर्द करावा ही काँग्रेसची शिकवण नाही' या उत्तराने सभा शात झाली व केळकरांचे सुदर, समर्पक व फार बहारीचे भाषण झाले



## गंगाधर शिवराम दामले

### ( बी. ए., एलएल बी., वकील, पुणें )

( १ ) दिनाक २५।१।४७ रोजी आम्ही तात्यासाहेब याच्या भेटीस गेलो असता, त्या ठिकाणी काही मडळी जमून सध्याच्या काँग्रेस-सरकारच्या अव्यवस्थित राज्यकाराभाराबद्दल चर्चा करीत होती त्या वेळेस एक गृहस्थ, "काँग्रेस-सरकारपेक्षा ब्रिटिश राजवट हजार हिश्शाने बरी" असे बोलून गेले त्या वेळेस तात्यासाहेब उसळून म्हणाले, "अहो, काँग्रेस-सरकारला तुम्हीच निवडून दिलेत, आता नावें ठेवून उपयोग काय? आपणच केलेला स्वयपाक वाईट झाल्यास दोष कोणास द्यावयाचा?" नगरपालिकेच्या कारभारासबधीहि कोणी फार कडक टीका करू लागला तर ते त्याना नापसत असे व ते वरील उदाहरणानेच टीकाकाराची समजत घालीत असत

( २ ) परशुरामभाऊ महाविद्यालयाच्या क्रीडागणावर सुमारे ७-८ वर्षांपूर्वी श्री. मुळे नावाच्या गृहस्थानी सतत तीन दिवस सायकल चालविण्याचा विक्रम केला होता. त्याचा सत्कार तात्यासाहेब याच्या अध्यक्षतेखाली झाला त्या वेळी ते म्हणाले, "अशा तऱ्हेचा विक्रम करणे म्हणजे मनुष्याने निसर्गाला आव्हान देऊन मी तुझ्यापेक्षा श्रेष्ठ आहे असे दाखविण्याचा हा प्रयत्न होय. अशा तऱ्हेचा प्रयत्न करणे म्हणजे नातवाने आजोबाच्या खाद्यावर बसून आपल्या हाताने त्याच्या मिशा उपटण्यासारखे आहे! निसर्ग हा अनादि म्हणून तो जख्खड झालेला आजोबा म्हणावयास हरकत नाही. मनुष्याची मर्यादित शक्ति व आयुष्य याना

विचार केला असता कोणत्याहि कालातील मनुष्य हा निसर्गाच्या दृष्टीने बालकच ठरतो " तसेच सुमारे दीड वर्षापूर्वी त्याच्या अध्यक्षतेखाली त्याच्याच तोतयाचे बंड या नाटकाचा प्रयोग [illegible] नाट्यगृहात झाला होता. त्या वेळेला ते म्हणाले की, " आपण लिहिलेल्या नाटकाचा प्रयोग आपण स्वत. पाहताना आपलें मूल आपणाकडे दुडदुड रागत येताना जसा आनद व्हावा तसा आनद होतो. "



## रं. न. होनप

( पुणे )

( १ ) सन १९४२ साली आचार्य प्र. के अत्रे हे ' महाराष्ट्र साहित्य-संमेलना ' चे अध्यक्ष झाल्याबद्दल त्याना महाराष्ट्र शारदा-मदिराच्या विद्यमाने अल्पोपाहार देण्यात आला त्या वेळी साहित्यसम्राट् केळकर हे त्या सस्थेचे अध्यक्ष या नात्याने उपस्थित होते आचार्य अत्र्यानी साहित्यसम्राटाशी माझा त्याच्या 'ब्रँडीची बाटली ' या बोलपटातील बगारामाची भूमिका माझ्यावरून घेतल्याचा उल्लेख करून, परिचय करून दिला. लगेच श्री. केळकरानी मी 'चित्रशाळे' त बारा रुपये पगारावर नोकरीस असल्याचे सागितले. ! यावरून कोण, कोठे, किती पगारावर नोकरास आहे याची खडान् खडा बिनचूक माहिती त्यास कशी असे याचे आश्चर्य वाटले !

( २ ) सस्थानिक राहू नयेत, सस्थाने नष्ट व्हावीत असे जेव्हा जेव्हा मी म्हणत असे त्या वेळी त्याना माझ्या म्हणण्याचा फार राग येत असे. ते म्हणत असत की, " तुम्ही चुकता आहात सस्थानिकाच्या एकतत्री व जुलमी राज्यकारभाराबद्दल मला तिटकारा येतो; पण त्याच्या व्यक्तिपरपरेबद्दल मला तिरस्कार वाटत नाही. एके काळी त्याच्या पूर्वजानी पराक्रम केले हे आपण स्मरले पाहिजे. त्याच्यासबधी विनाशक बोलणे मला रुचत नाही. आपण कृतघ्न ठरू असे वाटते " मी म्हणत असे की, " सस्थानिक हे देशद्रोही आहेत, म्हणूनच इग्रजानी त्याना ठेवलें आहे त्याच्यासबधी असतोष माजाविणे हे आज आमचे कर्तव्य आहे असे मला वाटते. " तात्यासाहेब म्हणत की, " सस्थानिकाच्या राज्यकारभारासबधी लोकामध्ये असंतोष निर्माण करा, पण सस्थानासबधी तसे करणे उचित नाही, मला पटत नाहीं. कृतज्ञताबुद्धि काही ठेवाल कीं नाही."



## रा. भ. देशमुख

### ( अध्यक्ष, कण्वशाखा, सोलापूर )

( १ ) सन १९२१ साली असहकारितेच्या ऐन धामधुमीच्या चळवळीत सरकारी शाळेवर बहिष्कार घालण्याची चळवळ सुरू झाली होती त्या वेळी येथील सरकारी शाळेवर ( हायस्कूल ) बहिष्कार घालून नवीन राष्ट्रीय शाळा काढण्याची चळवळ आम्ही सुरू केली व त्याकरिता प्रौढ विद्यार्थ्यांची सभा घेतली होती. कै लो टिळकाच्या मागें महाराष्ट्राचे राजकीय पुढारीपण तात्यासाहेब केळकर याच्याकडे असल्यामुळे, त्याचाहि सल्ला घ्यावा म्हणून आम्ही मुद्दाम त्याना बोलाविले होते व त्याप्रमाणे त्यानी येऊन आम्हा विद्यार्थ्यांच्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारले होते सदर सभेमध्ये घेतलेला बहिष्काराचा निर्णय तात्यासाहेबांना बिलकूल पसंत पडला नाहीं त्यानी स्पष्ट सागितले की, " [illegible] होत असलेला खर्च, जनतेने कर-रूपाने भरलेल्या पैशातूनच होत असतो, व सदर खर्चाने चाललेल्या शाळेवर बहिष्कार टाकणे, आत्मघातकीच होईल शिवाय सदर बहिष्काराने सरकारचे कांहीं नुकसान होणार नाही झालें तर विद्यार्थ्यांचेच होईल " आणि पुढे झालेंहि तसेंच ! त्या वेळीं ज्या विद्यार्थ्यांना त्याचा सल्ला मानला, त्यांनी आपला शिक्षणक्रम पुरा करून ते आज समाजात मानाने वावरत आहेत आणि ज्यानीं भावनेच्या भरात तो अवमानला ते आज आपला शिक्षणक्रम अपुरा राहिल्यामुळे कसेतरी दिवस काढीत आहेत यावरून भावनेच्या भरात तोडदेखला सल्ला न देता, दूरदृष्टीनें योग्य व हितकारी सल्ला देण्याचे [illegible] धोरण किती मोलाचे होतें याची आठवण होते

( २ ) दि ६–२–४२ ला तात्यासाहेबाचा मुक्काम सोलापुरास होता येथील कण्वशाखासघाचा चतुर्थ वाढदिवसाचा समारभ त्याच दिवशी होता सदर समारभास तात्यासाहेब अध्यक्ष लाभल्यास सघाच्या कारकीर्दीत एक चिरस्मरणीय गोष्ट होईल या जाणिवेन, त्यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल विनती करण्याचे सर्वानुमते ठरलें. येथील कण्वशाखासघाचा त्यावेळचा अध्यक्ष मी असल्यामुळे सदर काम माझ्याकडे आले ब्राह्मण जातीतील एका लहानशा उपशाखेच्या सघाच्या समारभाचे अध्यक्षस्थान तात्यासाहेबासारखा अखिल भारतीय पुढारी कसा स्वीकारील या विवचनेंतच त्यांना भेटून सघाचें कार्य व हेतु सागून, अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयी मी विनंती केली व त्यानींहि आढेवेढे न घेतां आत्मीयतेनें सदर गोष्टीस मान्यता दिली ! त्याप्रमाणे त्यानी समारभास हजर राहून सघटनेचा बहुमोल उपदेश करून सघ-कार्यकर्त्यास उत्तेजन दिले. यामुळें जनता-सघटनेच्या कामी लहानमोठेपणाचा विचारहि न करता तात्यासाहेब हे सर्वसाधारण जनतेस कसे कार्यप्रवीण करीत असत, याचा प्रत्यय आला वरील सघाचें अध्यक्षस्थान स्वीका-

रून तात्यासाहेबांनीं येथील कण्वबधूस उपकृत करून ठेवले असून, त्याचीच राजकीय मतप्रणाली बहुसख्येने कण्वबधु आचरीत आहेत



## भि. गो. भिडे

( व्यवस्थापक, गीताधर्ममंडळ, पुणें )

( १ ) तात्यासाहेब हे गीताधर्ममडळाच्या स्थापनेपासून त्याच्या मृत्यूपर्यंत गीताधर्ममडळाचे अध्यक्ष होते मडळाच्या १९२८ सालच्या वार्षिक सभेत कै. भिडेशास्त्री यानी प्रचारक तयार करण्यासाठी वर्ग काढावा आणि विद्यार्थ्यास मासिक शिष्यवृत्ति द्यावी, असा प्रस्ताव माडला भिडेशास्त्री यानी विद्यार्थ्यास शिक्षण देण्याचे मान्य केले त्याचा आग्रह पाहून तात्यासाहेबांनी तो प्रस्ताव मान्य केला आणि अनुमान पत्रकात शिष्यवृत्तीची रक्कम समत करून घेतली सभेचे काम सपल्यावर तात्यासाहेब म्हणाले, " शास्त्रीबुवा ! ह्या कामी तुमचे श्रम आणि मडळाचे पैसे वाया जातील; शिष्यवृत्तीसाठी येणारा विद्यार्थी प्रचारक होणार नाही; ज्याला ह्या कार्याची हौस असेल तोच तयार होईल व तो शिष्यवृत्तीची अपेक्षा ठेवणार नाही. " भिडेशास्त्री याना प्रचारक तयार होतील अशी दृढ आशा वाटत होती म्हणून त्यानी मडळाच्या खर्चाने शिष्यवृत्त्या देऊन विद्यार्थी ठेवून घेतले आणि त्याना न्याय, वेदान्त व गीता याचे शिक्षण देण्यासाठी अतिशय श्रम घेतले परतु विद्यार्थी टिकून राहिले नाहीत वर्ष सहा महिने राहून कटाळून निघून जात. तरी भिडेशास्त्री यानी निराश न होता सात-आठ वर्षे शक्य ते प्रयत्न केले त्या कामीं मडळाचे पाच सहा हजार रुपये खर्च झाले; पण एकहि प्रचारक तयार झाला नाही. शेवटी शेवटी हौसेने शिकणारा एक विद्यार्थी मडळाकडून शिष्यवृत्ति न घेता थोडेबहुत शिक्षण घेऊन तयार झाला आणि तोच साप्रत गीता-प्रचार करीत आहे. ह्याप्रमाणे तात्यासाहेबाचे अनुमान अक्षरशः खरे झाले.

( २ ) १९२४ साली मडळ स्थापन झाले; पण सार्वजनिक सस्थेचे हिशेब कशा पद्धतीने ठेवावे लागतात याची आम्हास नीटशी माहिती नव्हती. तसेच जमाखर्च, अदाजपत्रक व हिशेबतपासणी याचाहि माहिती नव्हती. मडळाची काळजी म्हणून तात्यासाहेबानी त्या सर्व गोष्टी आम्हास नीट समजावून सागितल्या, आणि मडळ सरकारात नोदविण्यासहि सागितले त्याच्या विश्वासाचे श्री स. वि. बापट यानाच त्यानी प्रथम हिशेब-तपासणीस पाठविले. त्याच्याकडून आम्हाला सर्व माहिती मिळाली; आणि त्याप्रमाणे सर्व गोष्टी आजवर चालू आहेत. अशा आत्मीय वृत्तीने ते सार्वजनिक सस्थाकडे पहात असत.

( ३ ) तात्यासाहेबानी 'गावरान गीता' नावाचे एक लहानसे पुस्तक लिहून प्रसिद्ध केले. त्यात गीतेतील तत्त्वज्ञान अगदी खेडवळ माणसालाहि कळावे म्हणून ते अत्यत सोप्या भाषेत लिहिले आहे त्याची एक प्रत त्यानी गीता-धर्म मडळाच्या ग्रथसग्रहाकरिता पाठविली काही दिवसानी समक्ष भेटीत प्रस्तुत लेखकाला त्याबद्दल अभिप्राय विचारला "पुस्तकाची भाषा सुबोध व सोपी आहे, पण त्यात अद्यापि काही शब्द थोडे दुर्बोधित राहिले आहेत," असा अभिप्राय प्रकट करताच ते म्हणाले, "होय! ते माझ्याहि लक्षात आले आहेत दृढाभ्यासामुळे ते त्यात घुसले आहेत पुढील आवृत्तीत मी काढून टाकीन" केवढा हा प्राजळपणा!



## बाळूकाका कानिटकर

( बी. ए., सेवक-सेवानद, पुणे )

तात्या नि मी दोघान्च्या राजकीय भूमिकात फार फरक पूर्वसस्कार व स्वभावभिन्नता हे कारण असावे पण त्यामुळे खाजगी प्रेमसबधात कधीहि बाध आला नाही इतर मोठ्यांच्या बाबतीतहि हा अनुभव आला असता तर किती छान झाले असते! पण तो तसा आला नाही तात्याच्या मनाचा मोठेपणा या एकाच गोष्टीवरून उत्तम सिद्ध होतो. माझ्यावर प्रसगविशेषी कित्येक सज्जनाकडून तीव्र आघात होत असत त्यावेळी स्वतः तात्यासाहेबानी, आमचे सर्व मतभेद विसरून, केवळ माझ्या सद्बुद्धीवर विश्वास ठेवला व अत्यत दिलदारपणाने माझा बचाव केला. खरोखर त्याचे स्मरण पुण्यदायक वाटते!



## धों. के. जोगळेकर

( बी. ए., एलूएल्. बी., वकील, चाळीसगाव )

( १ ) तात्यासाहेब चाळीसगाव येथे आले असताना त्यानी राष्ट्रीय स्वयसेवक सघाच्या शाखेला भेट देऊन बौद्धिक घेतले. या सघाच्या जागेच्या पलीकडे एक मोठा रस्ता टाकून पुढे 'राष्ट्रसेवादला'चे पटागण होते. तेथे स्वयसेवक जमले होते व तिरगी ध्वज होता. तेथेहि भाषण करावे अशी इच्छा दलप्रमुखानी दर्शविल्यावरून ते तेथे गेले. भाषण थोडा वेळच केलें. ते म्हणाले, "येथे दल-स्थानावर अहिंदु जर येत नसतील तर 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' व 'राष्ट्रसेवादल' या दोघानीं आपआपले ध्वज एके ठिकाणी लावून एके ठिकाणीं जमावे. दोघानीं निरनिराळे कार्यक्रम करून वदेमातरम् पद मात्र एकत्र म्हणावे." तात्यासाहेबाची समन्वयदृष्टि येथे प्रत्ययास आली, कारण ते समन्वयवादी होते.

( २ ) पुणे येथे टिळकभक्ताची सभा असो, विचारविनिमय असो अगर हिंदुसभेच्या बैठकी असोत, तात्यासाहेब उपस्थित असावयाचे वयमानपरत्वे पुढारीपण सोडण्याचे ठरविले तरी महत्त्वाच्या बैठकीत उपस्थित राहून ते धीर देत, उत्साह वाढवीत व मार्गदर्शन करीत एका खाजगी सभेत ते सद्गदित होऊन म्हणाले, " पुढाकार घ्या, कार्य करा, नुसते बोलू नका; कार्य करणाराचे मी ऐकेन इतकेच काय पण त्याच्या पायाची मातीहि मी कपाळाला लावीन ! " केवढी ही नम्रता !

( ३ ) पुण्यास सन १९४७ ऑगस्टला लो टिळकाच्या पुण्यतिथीनिमित्त महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार याचे भाषण व्हावयाचे होते अध्यक्ष तात्यासाहेब होते ध्वजगीत झाले, अध्यक्षाची सूचना होऊन अध्यक्ष स्थानापन्न झाले. व्याख्यात्याचे व्याख्यान सुरू होण्यापूर्वीच त्या व्याख्यानाला एका तरुण हिंदुत्व-निष्ठाने विरोध केला पोतदार याचे भाषण व्हावयाचेच आहे, तेव्हा तेच विरोध-कास समर्पक उत्तर देताल, म्हणून तात्यासाहेबानी तो विरोध आढेवेढे घेऊनच होऊ दिला पोतदार यानी व्याख्यानास सुरुवात केली. व्याख्यान रगले; तो मध्येच स्वातत्र्यवीर सावरकर आले श्रोत्यानी त्याचा जयजयकार केला. व्याख्यान सपत आले. श्रोत्याना मोठ्या आवाजाने स्वातत्र्यवीर सावरकरानी भाषण करावे अशी इच्छा आरडून ओरडून प्रदर्शित करण्यास सुरवात केली तात्यासाहेब रागावले, लाल झाले श्रोत्यानी सभा ताब्यात घ्यावी हे त्याना खपले नाही अध्यक्षाचा अधिकार त्यानी गाज विला. ते म्हणाले, " स्वातत्र्यवीर सावरकराचे व्याख्यान उद्या स्वतत्र व्हावयाचेच आहे. तरी ते सपूर्ण ऐकण्याची साधि उद्याच तुम्हाला मिळणार आहे आज आता सावरकर भाषण करणार नाही . " स्वातत्र्यवीर सावरकरानी उठून जेव्हा तेच सागितले तेव्हा मग श्रोते शात झाले! सभाप्रसगी तात्यासाहेब शिस्त काटेकोरपणाने पाळीत सभेची सुरवात निश्चित वेळेलाच व्हावयाची व तात्यासाहेब वेळेवर उपस्थित असावयाचेच एकदोन प्रसग असेच आठवतात की, सभा सपत आल्यावर श्रोत्यानी स्वातत्र्यवीर सावरकर याचे भाषण व्हावे असा त्यानी आग्रह धरावा, तेव्हा " हा मी ( अध्यक्ष ) चाललो ! होऊं द्या भाषण " असे बजावावे व त्यामुळे श्रोते ताळ्यावर यावे. आपण स्वतः शिस्त पाळून तात्यासाहेब ते शिस्त पाळावयास लावीत. तात्यासाहेब जितके लोकरजक तितकेच कडक शिस्तीचे भोक्ते होते



## भा. कृ. प्रधान
### ( डॉक्टर, खडकी, पुणें )

तात्यासाहेबाच्या घरी त्याच्या चिरजिवाच्या लग्नांतील मेजवानीनिमित्त निमत्रित मडळी जमली होती. पगत समिश्र म्हणजे ब्राह्मण-ब्राह्मणेतर, सर्व जातींचा

एकच अशी होती. सोवळे नेसलेले ब्राह्मण व ओवळे ब्राह्मणेतर शेजारीं शेजारी बसले होते! तात्यासाहेबांचा मित्रपरिवार फार मोठा. त्यात साहित्यिक तसेंच राजकारणी पुरुषहि होते. पगत फारच रगली. कोणी काहीतरी बोलावे, त्यावर तात्यासाहेबांनी समयसूचक कोटी करावी व मग प्रचड हशा पिकावा, असे चालले होते. जेवणाच्या शेवटीं तात्यासाहेबानी सर्वांपुढे दक्षिणेचा पैसा ठेवला. तेव्हा एक ब्राह्मणेतर म्हणाले, "अहो तात्यासाहेब, मी मराठा आहे, दक्षिणा घेत नाहीं." त्यावर तात्यानी चटकन उत्तर दिले, "अहो, आजपर्यंत होतात मराठे. आता [illegible] पक्तीला बसून बाटलात! आता तुम्ही ब्राह्मणच! तेव्हा दक्षिणेवर तुमचा हक्क आहे!"



## कृष्णाजी वासुदेव पुरंदरे

### (इतिहास-संशोधक, पुणें)

(१) भारत-इतिहास-सशोधक मडळाच्या एका समेलनप्रसगीं मी एक सशोधनात्मक निबध वाचला. त्यात बरीच पत्रे उपयोगात आणिली होतीं. तात्यासाहेब समेलनप्रसगीं बहुधा हजर असत आणि त्या वेळी सशोधनात्मक, चर्चात्मक व सकलनात्मक वाचले जाणारे निबध ते आस्थापूर्वक व बारकाईने अवलोकन करीत. तो निबधहि त्यानी बारकाईने ऐकला असावा. तो छापला न जाता माझ्याजवळ पडून होता. पुढल्या वर्षी मीं दुसरा निबध वाचला व त्यात पहिल्या वर्षाच्या निबधात उपयोगांत आणिलेलें एक पत्र सामील केले. निबधावर चर्चा झाली; तेव्हा तात्यासाहेबानी नेमके तें पत्र मागील वर्षी अमुक निबधात मीं उपयोगात आणिल्याचें सांगितलें! ही त्यांची अपूर्व स्मरणशक्ति पाहून मी अगदीं चकीत झालों.

(२) मराठेशाहीतील सामाजिक परिस्थिति समजून घेण्याकडेच त्यांचा विशेष कल असे. त्यामुळे सशोधनपूर्वक लिहिलेले सामाजिक निबध ते अत्यत लक्षपूर्वक ऐकत. मीं त्या काळच्या 'कुणबिणी' सबधी प्रकाशित व अप्रकाशित पत्राधारे एक निबध वाचला व त्यावर तोंडी बरीच चर्चा केली. त्या लिखाणांत व चर्चेत अश्लील समजला जाईल असा भाग आला, म्हणून कांहीं सोवळ्या प्रेक्षकात चुळबूळ सुरू झाली; पण निबंधाच्या शेवटीं जी चर्चा झाली त्यांत तात्यासाहेबानीं एकदर माझ्या निबधावर चागले मत दिले व समाधान व्यक्त केले. यावरून शास्त्रीय विषयात अश्लील म्हणून मुरड घालणे त्यांना पसत नव्हते असे म्हणण्यास चिंता नाही.



## कृ. श्री. खांडेकर

( बी. ए., बी. टी., अमरावती )

१९४६ च्या फेब्रुवारी महिन्यात तात्यासाहेबांचें " सुधारणा, सुख व सदाचार " हे पुस्तक मी वाचीत असता माझ्या अल्पमतीनुसार दोन सूक्ष्म प्रमादस्थळें मला त्यात आढळलीं. पण सदसद्विवेकबुद्धि जागृत होऊन दुसरे मन म्हणाले, " तुझेच ज्ञान विपरीत असेल. " या द्वद्वाने मला अखेर ग्रथकाराचा कौल घेण्याची प्रेरणा दिली. तदनुसार त्यास पत्र लिहून उत्तराची सविनय अपेक्षा केली. उत्तर येणार याविषयीं शका नव्हती; आणि खुद्द तात्यासाहेबानी स्वहस्ताक्षरातच स्वाक्षरीचे पत्र पुढीलप्रमाणे पाठविलेले वाचून मजसारख्या सामान्य माणसास जो आनद झाला व साश्रुनयन होऊन मला जी त्यांच्या उदारमनस्कतेची कृतज्ञतापूर्वक प्रतीति आली तिचे वर्णन मला यथार्थतेने करता येणें शक्य नाहीं. ते पत्र असे :

॥ श्री ॥ पुणें, १०-३-४६

" कृ. सा वि.

चुका दाखविल्या त्या मान्य आहेत. योग्य वेळ येईल तेव्हां सुधारता येतील. चुका कळविल्याबद्दल आभारी आहे. –न. चिं. केळकर "



## गोविंद दत्तात्रय अभ्यंकर

( तात्यासाहेबांचे विशेष परिचित, पुणें )

( १ ) दुसऱ्या गोलमेज परिषदेहून तात्या विलायतेहून नुकतेच परत आले होते. माझ्या वडिलाचे व तात्याचे एक समान स्नेही श्री. बाबूराव भिडे, आय्. सी. एस्. हे त्या वेळी पुण्यास को ऑ. सोसायटीचे रजिस्ट्रार होते. तात्यांच्याबरोबर मनमोकळेपणानें गप्पा मारण्याची सधि अनेक सरकारी वरिष्ठ अमलदाराना मनापासून हवी असे. श्री. भिडे यांच्याच सूचनेवरून आमच्या घरी धुंदुरमासाच्या जेवणाचा बेत ठरला होता. जेवणानतर मडळी इकडच्या तिकडच्या गप्पांत अगदीं तल्लीन झाली होती. बोलण्याचा विषय अर्थात् गोलमेज परिषद हाच होता व त्यात म. गांधींचे धोरण व त्याची त्या परिषदेंतील भूमिका हा तात्यांच्या बोलण्याचा मध्यबिंदु होता. मला स्मरते तें असे की, तात्या, गाधींच्या एकदर भूमिकेबद्दल म्हणाले की, इतरानी जमवीत आणलेले सर्व बनाव व एकमुखी मागणीचे सर्व प्रयत्न यशाच्या पायरीपर्यंत आलेले, वाया गेले. गांधींची भूमिका काय होती ते स्पष्टपणें उमजेच ना. गांधींच्या वागण्याने गोलमेज परिषदेचा विचका झाला असाच तात्यांच्या बोलण्याचा एकदर सूर होता.

( २ ) तात्याच्या काही खाजगी कामासाठी ते मुबईस आले होते. रात्री जेवणानतर काही प्रतिष्ठित मडळी भेटण्यासाठी आली 'सह्याद्रि' मासिक निघणार असल्याचे जाहीर झाले होते मडळींना या नवीन मासिकाचा उद्देश व धोरण काय असे विचारले. तात्या म्हणाले, "आमच्या ऑफिसमध्ये मडळी पुष्कळ आहेत. चागले ग्रथालय तयार केले आहे छापण्याची घरची सोय आहे. मडळींनी खूप वाचावे, आवडीच्या विषयावर खूप लिहावे बाहेरचे लेख न घेता सुद्धा एक चागले विवेचक मासिक का चालू नये? हाच विचार मनात येऊन मी हे मासिक केवळ आमच्या संपादक मडळीकडून चालवणार आहे" थोडा वेळ थाबून ते पुढे माझ्याकडे वळून म्हणाले, "पण गोविंदा! हे बघ, किर्लोस्कराना वाटते, मी ते त्याच्या मासिकाना स्पर्धा करण्याच्या ईर्षेनेच काढले आहे. या टीकाकाराच्या हे कसे लक्षात येऊ नये की, मला त्याच्याशी स्पर्धा करण्याची जरूरी काय?" तात्याचे हे उद्गार निघत असताना त्याच्या चर्येवर चीड व सात्त्विक सताप यान्च्या छटा स्पष्टपणे दृग्गोचर होत होत्या!

( ३ ) नूतन मराठी विद्यालयात प्रो नारळकर यानी विद्यार्थि-भाडार चालविले आहे अनेक प्रसगांनी तात्या या सस्थेत येत असत या भाडाराच्या फायद्यातून बाधलेल्या इमारतीचे उद्घाटन करण्याकरिता व्यापारी जगातला प्रतिष्ठित अध्यक्ष आम्हाला हवा होता गु. नारळकर व मी तात्याच्याकडे गेलो [illegible] आम्हाला दोन नावे सुचविली. एक श्रीमन प्रतापशेठ व दुसरे शेठ मनमोहनदास रामजी या दोघानाहि तात्यानी [illegible] आमत्रणाची पत्रे स्वतः लिहिली प्रथम प्रतापशेठ याना लिहिले त्यानी नकार दिला. नतर शेठ मनमोहनदास रामजी यानीं विनती मान्य केली. त्याच्या नावाच्या उल्लेखाची समारभाची आमत्रणे सगळीकडे रवाना झाली. समारभाच्या आदल्या दिवशी मध्याकाळी शेठजीची तब्येत नादुरुस्त झाल्याने ते येऊ शकत नाहीत अशी तार आली! आम्ही सर्वजण अगदी गोंधळात पडलो. रात्री तात्याच्याकडे जाऊन झाला प्रकार त्याना कळविला व असाहाय्य मुद्रेने त्याच्याकडे पाहात राहिलो. क्षणार्धात तात्या म्हणाले, "मी तरी खाली प्रेक्षकात बसणारच होतो. आता स्टेजवर अध्यक्षाच्या खुर्चीतच बसेन झाल ना?" शेवटी हा समारभ तात्यांच्या हस्ते झाला व त्या दिवशींचे त्याचे आयत्या वेळेचे भाषण फारच मनमोकळे, खेळीमेळीचे व हृदयस्पर्शी झाले!

( ४ ) शिक्षण-प्रसारक मडळीच्या नियामक मडळाची सभा चालू होती सभेत एका विषयावरील चर्चेच्या अनुरोधाने वातावरण बरेच गरम झाले व त्या भरांत डॉ. मुळे ( सोलापूर ) व म. म. दत्तोपत पोतदार यांच्यात बरीच शब्दाशब्दी चालू झाली. अध्यक्षाचे काम तात्याच करीत होते. तात्यांनीं चर्चा थांबविण्याचा प्रयत्न केला; पण प्रकरण थांबण्याचे लक्षण दिसेना. तात्या सतापाने चिडीला

जाण्याच्या बेतात होते. पण तेवढ्यात आत्मसयमन करून व प्रसगावधान राखून "कायदेशीर सभा सपली, तुमचे खाजगी बोलणे वाटेल तसे व वाटेल तितकें चालू द्या" असे त्या दोघांना सागून त्यानी पगडी काढून ठेवून एकदम खासगी विनोदी सभाषण सुरू करून एकदर सभेचा नूर अजीबात पालटून टाकला !



## स. के. नेऊरगांवकर

(बी ई., म्युनिसिपल इंजिनियर, पुणे)

(१) तात्यासाहेब याचा ... व सभासद या नात्याने पुणे नगरपालिकेशी अनेक वर्षे सबध होता, परतु त्या कारणास्तव त्यानी कोणतेहि वैयक्तिक काम स्वतः करून घेतले नाही, त्याकरिता दुसऱ्यास भीड घातली नाही. हे उदाहरण माझ्या मते फार दुर्मिळ आहे. नगरपालिकेतील कोणत्याहि नोकरास त्यानी आपल्या स्वतःच्या कामाकरिता त्याच्या घरी बोलाविल्याचेहि माझ्या ऐकिवात किंवा पाहण्यात नाही. फार काय, मरणापूर्वी एक वर्ष त्याच्या स्वतःच्या घराच्या रिव्हिजनच्या ... ते स्वतः सामान्य अर्जदाराप्रमाणे नगरपालिकेत आले होते ! वास्तविक त्यानी नुसता घरून निरोप पाठविला असता तरी त्याचे काम सहज झाले असते तात्यासाहेब त्या दिवशी नगरपालिकेत आलेले पाहून सर्वांना आश्चर्य वाटले नगरपालिकेचे सभासद डॉ ढमढेरे त्या वेळी तेथे हजर होते त्यानी ... कमिटीच्या ऑफिसमध्ये चलण्याचा त्याना आग्रह केला, परतु तेथे माझ्या अगोदर काही नागरिक येऊन बसले आहेत, त्याना बाजूस ठेवून मी पुढे जाणे इष्ट नाही, असे म्हणून ते तेथेच आपली पाळी येण्याची वाट पहात बसले ! या गोष्टीवरून त्याचा भिडस्त स्वभाव, स्वतःस लावून घेतलेली शिस्त व दुसऱ्याबद्दलची जाणीव दिसून येईल

(२) दुसरे महायुद्ध सुरू झाल्यानतर जपानचा हल्ला हिंदुस्थानवर येईल अशी जेव्हा भीति वाटू लागली, तेव्हा त्याला प्रतिकार करण्याकरिता सर्व ठिकाणी हवाईहल्लाप्रतिबधक सस्था निर्माण झाल्या त्याचप्रमाणे पुणे शहरातर्फे नागरिकाची सरक्षक-समिति स्थापन होऊन त्यात पुण्यातील वजनदार सद्-गृहस्थाचा समावेश झाला होता या समितीचे अध्यक्षपद तात्यासाहेब याना देण्यात आले होते. तात्यासाहेब हे त्या वेळी सार्वजनिक कार्यातून पूर्णपणे निवृत्त झाले असूनहि देशावर आलेला प्रसग जाणून त्याना अध्यक्षपद स्वीकारण्याची केलेली विनती त्यांनी अमान्य केली नाही या समितीच्या सभाना ते नियमितपणे हजर राहून मार्गदर्शन करीत असत. या समितीच्या कार्याकरिता नगरपालिकेतर्फे मला त्यांजकडे पुष्कळ वेळा जावे लागत असे.

त्या वेळी त्याजकडे नेलेल्या कामाचा निकाल अगदी अल्पावधींत व सर्वांना मान्य होईल अशा रीतीने ते करीत. या ग्रंथा[illegible] वर्गणी गोळा करण्याचा एकदां प्रश्न निघाला त्या वेळी प्रत्येक सभासदाने गावातील त्याच्या ओळखीच्या श्रीमत नागरिकाकडून वर्गणी [illegible] असे ठरले. रा ब नायडू वगैरे मडळींनी त्यात भाग घेतला होता [illegible] गोष्ट की, तात्यासाहेब यानी स्वतः त्याच्या माहितीच्या गृहस्थाकडे या कामाकरिता आपण होऊन जाण्याचे ठरविले तात्यासाहेब याचे वय, दर्जा व अधिकार लक्षात घेता हे काम त्यांनी करावे अशी इतर सभासदाची मुळीच अपेक्षा नव्हती; परतु तात्यासाहेब यानी स्वतः होऊन ते काम पत्करल्यामुळे सर्वच कामास चागला रग आला

( ३ ) सार्वजनिक काम करताना राजकीय पक्षातील मतभेद तात्यासाहेबानी आपल्या कार्याच्या आड [illegible] येऊ दिले नाहीत सन १९३८ साली ते पुणे नगर-वाचन मदिराचे अध्यक्ष होते, व त्या वेळी मी चिटणीस होतो त्या वेळी श्री बाळासाहेब खेर, श्री मावळकर वगैरे कॉंग्रेसपक्षाच्या मत्र्याना वाचनमंदिरात बोलवावयाचे ठरले त्या वेळी अध्यक्ष या नात्याने प्रत्येक वेळेस हजर राहून, पाहुण्याचे स्वागत करून, त्याच्याबद्दल गौरवपूर्ण भाषणे करून, सस्थेस त्यानीं मोठी मदत केली.

( ४ ) गेल्या वर्षी ते आळदीस श्रीज्ञानेश्वरमहाराजाच्या समाधीच्या दर्शनास मुद्दाम गेले होते. त्याच्याबरोबर श्री अण्णासाहेब ढमढेरे वगैरे तीन-चार मडळी होती. त्या वेळी त्यानी देवालयात सर्व ठिकाणी हिंडून माहिती घेतली. अर्थात् तात्यासाहेबाचा ज्ञानेश्वरीचा अलीकडील व्यासग लक्षात घेता या भेटीस विशेष महत्त्व होते. तात्यासाहेब जात्या भावनाप्रधान कमी परतु त्या वेळी श्रीज्ञानेश्वरमहाराजांबद्दल बोलत असताना त्याच्या मनातील सुप्त भावना ते लपवू शकले नाहीत. त्या वेळी तेथे हजर असलेल्या मडळीपैकी त्या दिवशी एकाचे कोर्टात काही काम होते. त्यास अनुसरून दुसरे एक गृहस्थ म्हणाले, “ बघा, तुम्ही आज आळदीला आलात, आज तुमचे काम फत्ते होईल. ” यावर तात्यासाहेब एकदम म्हणाले, “ अरे, श्रीज्ञानेश्वरमहाराजापाशी असली क्षणिक व नाशवत गोष्ट कोणी मागू नये शाश्वत सुख व आनद देणारे ते समर्थ आहेत ते त्याच्याजवळ मागू या ”



## ग. दा. टिळू

(एम्. ए., पनवेल)

राष्ट्रीय सभेत कौन्सिल-बहिष्काराचा ठराव नुकताच पास झाला होता. बहिष्काराच्या युक्तायुक्ततेबद्दल झालेल्या वादाच्या रणधुमाळीने सर्व वातावरण

धुंद झाले होते ठराव पास झाला खरा; पण महाराष्ट्राच्या तर्ककर्कश व युयुत्सु वृत्तीला तो मुळीच पटण्यासारखा नव्हता. पण विरोधाचें रान उगीच उठवावयाचे नाही, म्हणून डेमोक्रॅटिक पक्षातर्फे जाहीर झालेल्या उमेदवाऱ्या परत घेण्याचे व लोकांना सर्व गोष्टी समजावून देण्यासाठी व्याख्यानाचे दौरे काढावयाचे ठरले. या योजनेला अनुसरून तात्यासाहेब पनवेल येथे आले. त्याना म्युनिसिपालिटीतर्फे मानपत्र देण्यात आले सभेमध्ये मानपत्र वाचून दाखविण्यात आले व त्याची एक प्रत तात्यासाहेबाना अर्पण करण्यात आली त्या मानपत्रामध्ये सक्तीचे व मोफत प्राथमिक शिक्षण व स्थानिक स्वराज्य सस्थाच्या कायद्यांत सुधारणा या गोष्टींचा उल्लेख होता. मानपत्रातील इतर मतप्रणालीशी न जुळणारा असा हा उल्लेख तात्यासाहेबाच्या घारीसारख्या तीक्ष्ण नजरेतून सुटणे शक्यच नव्हते. मानपत्राला उत्तर देताना तात्यासाहेबानी बरोबर याच गोष्टीवर बोट ठेवून म्हटले की, “कौन्सिल-बहिष्काराचा वाझोटा वाद आज उकरून काढण्याची मला इच्छा नव्हती व मानपत्रात उल्लेख नसता, तर त्याचा निर्देश करण्याचे मी टाळणार होतो पण एकीकडे तुम्हाला सक्तीचें व मोफत प्राथमिक शिक्षण सुरू व्हावयास पाहिजे व स्थानिक स्वराज्य सस्थाचा कारभार सुरळीत चालावा म्हणून ऐनजिनसी कायद्यांतच तुम्ही सुधारणा करू पाहता; पण दुसरीकडे ज्या विधिमडळात हे कायदे घडविले जातात, त्या विधिमडळावर बहिष्कार घालण्यास तुम्ही पाहता, या विसगतीला म्हणावे तरी काय? आपल्या मनाप्रमाणे गोष्टी व्हावयास पाहिजे असतील तर शक्यतो जास्त शक्तिकेंद्रे हस्तगत करून घ्या, म्हणजे नुसता दुबळा आशावाद प्रकट करीत बसण्याची पाळी येणार नाही मिळालेली सत्ता वापरूनच दुसरी सत्ता परकीयांपासून हिसकावून घेण्याचे सामर्थ्य येते” अशा रीतीनें सुमारे एक तासभर कौन्सिल-बहिष्काराचा फोलपणा दाखविणारे व अधिकारक्षेत्रे काबीज करण्याची आवश्यकता प्रतिपादन करणारे सुश्राव्य, तर्कयुक्त व परिणामकारक भाषण तात्यासाहेबानी केले त्यांचे हे आवेशयुक्त व मार्मिक भाषण कित्येक दिवस लोकाच्या कानात घुमत होते.



## द. वा. चाफेकर

(बी. ए., एम्. बी. बी. एस्., गदग)

तात्यासाहेब याना आम्ही दि. २५–१०–१९३७ साली गदग येथील आमच्या मराठी वाङ्मयप्रेमी मडळातर्फे मानपत्र देण्यासाठी हुबळीहून आणविले होते. त्याच्या त्या वेळच्या दौऱ्यात गदगला यावयाला त्याना दुपारचीच वेळ फक्त शिल्लक होती.

मडळाच्या आवारात उघड्यावर ऐन बाराच्या उन्हात मंडळी त्याची वाट पहात बसली होती. गदगच्या मराठी मडळाच्या आद्य सस्थापकापैकी मी एक असल्याने मातृभाषा व मराठी मडळ याबद्दल मला वाटत असलेला जिव्हाळा त्याना ठळकपणाने दिसून आला. इतर सर्व मडळी आपापल्यापरी झटत होतीच; पण या समारभातील विशेष जबाबदार व प्रमुख कोण हे त्यास कळावे ही त्याची इच्छा होती म्हणून व्याख्यान देताना एक समर्पक गोष्ट सागून त्यानी या गोष्टीचा उल्लेख केला ते म्हणाले, "मडळाच्या या समारभात सर्वच जण आस्थेने भाग घेत आहेत हे मडळीच्या सौजन्यास साजेसेच आहे; पण मला येथे आल्यापासून प्रश्न पडला आहे तो हा कीं, या मडळाची जिव्हाळ्याची सचालक मडळी कोण असावी? यावरून मला एक माझ्या अनुभवाची गोष्ट आठवली आहे ती सागतो. मला एकदा एका गावी नुसती तोडओळख असलेल्या एका गृहस्थाच्या घरी लग्नाच्या पानसुपारीला जाण्याचा प्रसग आला. मी माझ्या शिरस्त्याप्रमाणे अगदी वेळेवर लग्नघरी गेलो, तो तेथे दहाबारा पुरुष मडळी लग्नाचे पोषाक करून आल्या-गेल्याचे स्वागत अगदी अगत्यपूर्वक करीत होती. ही सर्व मडळी सारख्याच दर्जाची दिसत असल्याने, घरचा मालक कोण याबद्दल मला कुतूहल उत्पन्न झाले. परत जाताना लग्नघरच्या मुख्य यजमानाना नमस्कार करून आपण पानसुपारीस येऊन गेल्याबद्दलची वर्दी त्याना देऊन जाण्याचे माझ्या मनात होते शेजारी-पाजारी विचारावे तरी पचाईत; म्हणून मी इकडेतिकडे काही गमक मिळते का म्हणून पहात होतो; इतक्यात मडपाच्या लोक येण्याजाण्याच्या दारातच कुणीतरी एक मोठा घाणेरडा धोडा ठेवला होता लोक त्याला चुकवून जात येत होते. कुणी घाईत अडखळतहि होते आमच्या स्वागतार्थ उभी असलेली सर्व पगडीवाली मडळीहि त्या धोड्याला ओलाडून आली गेली. पण कुणी काही त्याकडे विशेष लक्ष दिले नाही. इतक्यात साधा पोषाख केलेले एक गृहस्थ तेथून आले. त्यानी तो धोडा पाहताच गर्जना केली, 'काय रे धोडिबा! अरे, जायच्या यायच्या रस्त्यात धोडा कुणीं ठेवला आहे? लोक सारखे अडखळताहेत ते!' असे म्हणून त्या गृहस्थानी स्वतः तो घाण धोडा उचलून रस्त्यातून बाजूला केला मी लागलेंच उमजलों की, हे त्या घरचे यजमान म्हणून, आणि माझे ते अनुमान खरेहि ठरले! पुढे मी त्याना नमस्कार करून व पानसुपारी घेऊन बाहेर पडलो"



## पुरुषोत्तम दिनकर जोशी

( वाङ्मय-विशारद, मद्रास )

( १ ) तात्यासाहेब हे मला प्रत्यक्ष गुरुस्थानी होते. टिळक महाविद्यालया-

तील त्याच्या शिष्यवर्गापैकी मी एक आहे विद्यार्थिवर्गावर त्याचे फार प्रेम असे असहकारितेच्या बहिष्कारप्रधान वावटळीत सरकारी व निमसरकारी शिक्षण-सस्था सोडून देण्याचा उपदेश त्यांनी नावातावाने केला नाही, व यासाठी अनेकाचे कुत्सित आक्षेपहि त्यानी सहन केले तरुण विद्यार्थ्यांच्या आयुष्याची हानि न होता त्याचा समाजास व राष्ट्रास अधिकात अधिक उपयोग व्हावा याविषयीची त्याची तळमळच या त्याच्या थोरपणाच्या बुडाशी होती सल्ल्यासाठी कोणी विद्यार्थी त्याच्याकडे गेले, तर सर्व परिस्थितीचा विचार करून मग ते योग्य सल्ला देत. ते म्हणत की, "तुम्हास शाळा मनापासून सोडावयाच्या असल्या तर माझ्या सल्ल्याची काय गरज ? शाळा कॉलेजे सोडणाऱ्या विद्यार्थ्यांची शैक्षणिक सोय करण्याची जबाबदारी बहिष्कार-प्रचारक पुढाऱ्यावर आहे व महाराष्ट्रापुरती ती जबाबदारी त्यानी पारहि पाडली. खासगी व सार्वजनिक रीतीनेहि ते स्पष्ट सागत की, "माझे स्वतःचें मत काय आहे ते माझी मुले मी टिळक [illegible] घातली आहेत यावरून तुम्ही समजा"

( २ ) १९२१–२२ मध्ये गाधीजी पुण्यास आल्यावेळी शनिवारवाड्यासमोरील गाधीजीच्या व्याख्यानानतर अध्यक्षस्थानावरून तात्यासाहेबानी त्यास बजावलेच होते की, 'खादीनेच काय, पण [illegible] स्वराज्य मिळेल असे आम्हा महाराष्ट्रियास कोणी पटवून दिले तर आम्ही गोणपाटाचेहि कपडे वापरू !' ही एक-वस्त्राची प्रथा त्यास मनापासून रूढ करावयाची होती असे दिसते. अलीकडे एकदा ते म्हणाले, निदान [illegible] दिवसात तरी पुण्यास अधिक कपडे घालणे म्हणजे शरीरावर तो केवळ जुलूमच होय

( ३ ) तात्यासाहेब व नानासाहेब वैद्य या दोन महापुरुषाशी सबद्ध असलेला एक प्रसग मला स्मरतो कायदेमडळाच्या निवडणुकीच्या दौऱ्यात तात्यासाहेब एकदा कल्याणास आले होते. प्रकट व्याख्यानाप्रमाणेच विचारविनिमय, चर्चा, प्रश्नोत्तरे असे किंचित् अनौपचारिक कार्यक्रम कार्यपूर्तीच्या दृष्टीने तात्यासाहेबाना अधिक आवडत ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. कै. श्री. बाबूराव फडके याच्या माडीवर ही अनौपचारिक बैठक भरली होती व गावातील प्रतिष्ठित नागरिक, कार्यकर्ते उपस्थित होते कल्याण येथील पदवीधर नागरिक कै श्री. बापूसाहेब भिडे याचा कल कॉंग्रेसकडे म्हणजे त्या वेळेच्या कट्टर किंवा नाफेर पक्षाकडे होता त्याच्या मते तात्यासाहेब निरुत्तर होतील किंवा निदान अडचणीत पडतील असे काहीं प्रश्न तात्यासाहेबांस ते विचारीत व त्यास तात्याकडून योग्य उत्तरेहि मिळत. या सभेत रा ब नानासाहेबहि होतेच. थोडीं प्रश्नोत्तरे झाल्यावर नानासाहेब म्हणाले, "बापूसाहेब, तुम्ही नरसोपताशी वादविवाद करता आहां हे लक्षांत आहे ना ? त्यांना निरुत्तर करणे तुम्हांस जमणार नाही. ते कर्म कठीण आहे"

( ४ ) १९२५ मध्ये मी मद्रासला आलो. त्यानंतर पुण्यास गेलो म्हणजे प्रत्येक वेळी तात्यांची गाठ घेतल्यावाचून राहावत नसे. त्यांच्या घरी केव्हांहि गेलो व तेव्हां ते कितीहि कामात व्यग्र असले तरी चार शब्द मोकळेपणाने बोलून स्वतःच्या कुटुंबातील बऱ्याच दिवसांनी भेटलेल्या लहान माणसाची चौकशी करावी तशी चौकशी करून एका क्षणात आपुलकीची भावना निर्माण करीत !

( ५ ) येथील महाराष्ट्र-मंडळ-ट्रस्टतर्फे त्यांना मानपत्र देण्यांत आले. ह्या ट्रस्ट स्थापित करताना ट्रस्टडीडमध्ये अशी एक अट अंतर्भूत करण्यात आली होती की, स्थापनेपासून तीन वर्षांच्या अवधीत जर इमारत बांधून किंवा खरेदी करून झाली नाही, तर तोपर्यंत जमा झालेली रक्कम महाराष्ट्रातील एकाद्या उपयुक्त संस्थेस देणगी म्हणून देण्यात यावी पुरेशा पैशाच्या अभावी इमारत-खरेदीचे काम मागे पडले आहे असें जेव्हा तात्यांना समजले; तेव्हा त्यास फार वाईट वाटले, थोडा रागहि आला व दिरंगाई केली म्हणून त्यांनी सभासदास दोषहि दिला त्यांनी स्वतःची म्हणून १०० रु. ची देणगी ट्रस्टला दिली व त्यानंतर टिळक-पर्स-फंड-ट्रस्टच्या व्याजातून आणखी ३०० रु.ची देणगी दिली. यानंतर लवकरच सध्याची महाराष्ट्र-भवनाची इमारत खरेदी करण्यात आली याचे श्रेय तात्यासाहेबांना आहे !



## श्री. ना. हुद्दार

( बी. ए., संपादक, 'ग्रामीण', नागपूर )

( १ ) मी पुणे-टिळक-महाविद्यालयांत शिकत असताना गु. केळकर वरच्या वर्गांना शिकवीत असल्यानें त्यांच्या तासांना उपस्थित राहण्याचें भाग्य माझ्या वर्गाच्या विद्यार्थ्यांना केवळ २–३ वेळाच लाभले ! त्यांच्या वर्गाला विद्यार्थी चुकूनहि अनुपस्थित नसावयाचा; किंबहुना त्यांच्या वर्गातील मुलांची संख्या दिढी-दुपटीने वाढलेली दिसे. कारण इतर कॉलेजचेहि विद्यार्थी त्यांचे वर्गातील व्याख्यान ऐकण्यास अत्यंत उत्सुक असत ! त्यांच्याबद्दल सर्व विद्यार्थ्यांत नितान्त आदर व प्रेमभाव विशेषत्वाने वसत होता याचे हे निदर्शक होय

( २ ) टिळक-महाविद्यालयाच्या वार्षिक संमेलनप्रसंगी उत्तम गोष्ट सांगणाऱ्याला पांच रुपयाचे एक बक्षीस गु. केळकराच्या वतीनें देण्यात येई. एका वेळीं हे बक्षीस मला मिळाले. तेव्हां त्या किंमतीची त्यांचींच पुस्तके त्यांच्याकडे जाऊन मी आणली. हीच माझी त्यांची प्रत्यक्ष भेट व ती अत्यंत स्फूर्तिदायक मला झाली.

( ३ ) पुण्याच्या माझ्या विद्यार्थि-जीवन-कालात ( १९२२–१९२६ ) गु. केळकरांचे कोणतेहि जाहीर. भाषण मी सहसा चुकवीत नसे. या कालात देशबंधु

दास, प. मोतीलाल नेहरू, श्रीनिवास अयगार, राजगोपाळाचारियर, सरोजिनी नायडू इत्यादि अनेक सुप्रसिद्ध भारतीय पुढारी येऊन गेले व त्यांची गु. केळकराच्या अध्यक्षतेखाली जाहीर भाषणे झाली परतु प्रत्येक प्रसगी मुख्य वक्त्यापेक्षाहि गु. केळकरांचेच अध्यक्षीय भाषण अधिक समर्पक, मुद्देसूद, बुद्धीला पटणारे, प्रभावशाली व मार्मिक झालेले आढळून येई कोणताहि विषय सुबोध व मनोरजक रीतीने विद्यार्थ्यांना वा श्रोत्याना समजावून सागण्याची त्याची शैली अनुपम होती

(४) गु केळकर नेहमी म्हणत, "कोणत्याहि विषयाचा तुम्हाला अभ्यास करावयाचा असेल तर त्या विषयावर तुम्ही पुस्तकच लिहू लागा कोणाहि व्यक्तीला निदान एक आत्मवृत्ताचे तरी पुस्तक खास लिहिता येईल" कोणाहि होतकरू लेखकाला त्याचे हे बोल खचित अमोल व नेहमी स्फूर्तिदायक वाटतील.



## द. रा. कुलकर्णी मास्तर

(लो. टिळक-पंथाचे अनुयायी, सातारा)

(१) तात्यासाहेब हे केवळ पैशामुळे बड्या बनलेल्या व्यक्तींचा सहवास शक्य तो टाळीत ही गोष्ट माझ्या येथे घडलेल्या पुढील प्रसगावरून लक्षात राहिली. १९४१ साली बॅ. जम्नादास मेहता लो. स्व. पक्षातर्फे मध्यवर्ती असेंब्लीच्या पोटनिवडणुकीस उभे राहिले व आपले कॉंग्रेसी प्रतिस्पर्धी श्री. जेधे यांचा पराभव करून निवडूनहि आले त्यानतर त्यानी भोपटकर, नलावडे वगैरे मडळीसह आमच्या जिल्ह्यात आभार-प्रदर्शनार्थ दौरा काढला होता. दिनाक १९-४-४१ रोजी त्याच्या जिल्ह्यातला पहिला मुक्काम व सत्कार-समारभहि माझ्याच घरीं होता शहरातीलहि आणखी दोन-तीन निमत्रणे होती. पैकी एक फार मोठ्या धनाढ्य व्यापारी व्यक्तीचे होते माझ्यायेथील कार्यक्रम सपताच सदर गृहस्थाकडे जाण्याबद्दल मडळी सुचवू लागली. प्रथम तात्यासाहेबानी तिकडे दुर्लक्षच केले पण मडळी फारच आग्रह करू लागली, तेव्हां ते म्हणाले, "मला कशास आतां तिकडे नेतां? थोडी विश्राती घेतो. त्याच्या राजवाड्यापेक्षा येथेच आमच्या कुलकर्णी मास्तराची ही मठीच मला अधिक बरी वाटते. तुम्ही जाऊन या."

तात्यासाहेबांच्या या टोलवाटोलवीतील रहस्य बॅ. जम्नादासाच्या चटकन लक्षांत आले. त्यांनी मग आपल्या धारदार विनोदाच्या पद्धतीने त्या धनाढ्य व्यक्तीच्या वैभवाचे आणि विशेषतः वैभव-प्रदर्शनाच्या विशिष्ट पद्धतीचे मोठे गमतीदार वर्णन केले. मडळीत खूप हशा पिकला पण शेवटी मडळींनीं तात्या-

साहेबाना तिकडे आग्रहाने नेलेच! तात्यासाहेबाच्या स्वभावातील भिडस्तपणान त्याच्या इच्छेवर विजय मिळविला खरा, तथापि स्वभावाची मूळची ठेवण येथे व्यक्त -ा - ; ा-्न राहिली नाही

(२) तीस वर्षांपूर्वी तात्यासाहेबाच्या र-नाग/ मी मास्तरकी सोडून व्यापारात शिरलो व त्याचा आशीर्वाद घेतला त्यानी केलेला उपदेश सतत डोळ्यापुढे ठेविला त्यामुळेच आर्थिक व सामाजिक दृष्टीनेहि मी थोडेबहुत यश मिळवू शकलो. पुढे त्याचेच उदाहरण आदर्श मानून दोन वर्षांपूर्वी चालू व्यवसाया-तून समाधानपूर्वक पूर्णपणे निवृत्तहि झालो त्या वेळी हे सारे वृत्त तात्यासाहेबाना मी कृतज्ञतापूर्वक निवेदन करू शकलो ही माझ्या भाग्याचीच गोष्ट होय.



## वि. दि. बेलापूरकर

(मॅनेजर, सुलाखे-पेढी, मुंबई)

(१) टिळक-महाविद्यालयात असताना गु. तात्यासाहेब आम्हास 'सिव्हिक्स' विषय शिकवीत असत. शिकविण्यासाठी विषयाची सर्व तयारी पूर्ण करून ते येत व नवीन नवीन प्रसिद्ध झालेली पुस्तके वाचून, त्यातील उतारे वाचून दाखवून, विषयाची मांडणी उत्तम करीत असत. विद्यार्थ्यांमधील वक्तृत्व-कला वाढविण्यासाठी चढाओढी होत, त्यात त्यानी परीक्षकाचे काम मोठ्या आस्थेने केले होते.

(२) विद्यार्थ्यांत नवीन आवड उत्पन्न होण्यासाठी ते नवीन विषयाची माहिती देत. वक्तृत्वाबरोबर त्यानी टिळक-महाविद्यालयात गोष्ट सांगण्याची चढाओढ सुरू केली होती. ते म्हणत, "गोष्ट तरी सांगता आली पाहिजे. ती एक कला आहे. चांगली गोष्ट सांगणाराला मी एक बक्षीस ठेवणार आहे व परीक्षा मी घेईन" त्याप्रमाणे त्यानी गोष्ट सांगण्याची चढाओढ करवून परीक्षकाचे काम स्वत. केले. विद्यार्थ्यांच्या सर्व गोष्टी ऐकल्या व पहिल्या नंबरास चांगले बक्षीस दिले.

(३) एकदा 'प्रॉपगॅंडा' या शब्दाचा अर्थ काय असे त्यास मी विचारले. गुरुवर्य म्हणाले, "हे पाहा, रानातून गुरे परत फिरण्याची वेळ अजून व्हावयाची आहे; अशा वेळी एकदम वळवाचा पाऊस यावा आणि मग गुराख्याची कशी स्थिति होते? सगळ्या गुराना तो हाकीत सुटतो, काठी मारमारीत असतो, आडमुठ्याला मारतो, पळणाऱ्याला मारतो, न पळणाऱ्याला मारतो, धादलीत स्वत.लाहि काठी लागते; ही जी त्याची धादल तो प्रॉपगॅंडा म्हणाना!"



## सदाशिव आबाजी दांडेकर

### ( सहसंपादक, 'गोरक्षण', उपाध्यक्ष, सत्कार्य-सेवा-समाज, मुंबई )

( १ ) १९२९ साली जंजिऱ्याच्या दिवाणाच्या कुटिल नीतीमुळे हिंदु समाजाचे पाऊणशे पुढारी पकडले गेले व ४–५ महिन्याच्या अडवणुकीनंतर त्यांना सोडून देण्यात आले. या प्रकरणी तारा, सभा, निषेध इत्यादि आवश्यक चळवळ केली, त्यानिमित्त तात्यासाहेबास मी भेटलो. त्या वेळेस ते मुंबईस जावयाचे होते. मुंबईस सरदारगृहात भेटण्यास त्यांनी मला सुचविले. त्याप्रमाणे मी माझ्या मित्रासह गेलो. देशभक्त जम्नादास मेहतादि तेथे आले होते. दुपारी भोजनोत्तर वामकुक्षीसाठी मंडळी जरा आडवी झाली होती. जम्नादास मेहता वाचीत होते. त्यांच्याजवळ मी जंजिऱ्याविषयी प्रश्न काढला. त्यांनी लगेच तात्यासाहेबास त्याविषयी विचारले. ते म्हणाले, "मी विचार करतो आहे काय योजना करावी ती; पण या कामी तुमचाहि सल्ला घेणे योग्य होईल." हे बोलणे होत आहे तोच आडव्या झालेल्या मंडळीतून घोरण्याचा आवाज ऐकू येऊ लागला. तेव्हा विनोदाने जम्नादास तात्यासाहेबास म्हणाले, "A brahmin is useless after dinner." हे ऐकून तात्यासाहेब थोडे हसले व ताबडतोब म्हणाले, "अहो, तुमच्या म्हणण्यात 'Before dinner a brahmin is useful' असा अर्थ निघतो त्याची वाट काय ?" त्यामुळे तेथील सर्व मंडळीत हशाच हशा पिकला ! तात्यासाहेबांनी शक्य ती खटपट मी या कामी करीन असे आम्हास सांगितले व आम्ही शांत मनाने घरी निघून आलो.

( २ ) 'सत्कार्य-सेवासमाजा'च्या श्रीवर्धन येथे भरलेल्या पहिल्या संमेलनात असे ठरले की, भावी पिढीस योग्य वळण देता यावे म्हणून विविध कार्यें करण्यास एक इमारत बांधण्यात यावी व त्यास '**श्रीमंत पेशवे मंदिर**' असे संबोधावे. या कामी समाजाने जे सल्लागार-मंडळ योजिले यांत तात्यासाहेबास नेमण्यात आले व तसे त्यांना पत्राने कळविण्यात आले. नंतर ९।६।४७ रोजीं मी पुण्यास त्यांच्याकडे गेलो. माझे नाव सांगून 'श्रीमंत पेशवे मंदिर' हे शब्द मी उच्चारताच त्यांनी सांगितले 'तुमचं पत्र पोचले आहे; बोला, स्मारकाची रूपरेषा काय योजिली आहे ?' त्यावर मी त्यांना योजना तपशीलवार सांगितली. नंतर ते म्हणाले, "हा प्रयत्न अगदी योग्य आहे. भरीव असें कांही चांगले करीत रहा; स्मारकाकरिता केवळ स्तंभ अगर पुतळा यांत मात्र जनतेचा पैसा खर्च करू नका." एका मोठ्या गृहस्थाने, एक-दोन लाख रुपये जमवा व मोठा स्तंभ अगर पुतळा पेशव्याच्या वैभवास साजेल असा उभारा, असे सांगितले असल्याचे मी तात्यासाहेबांच्या निदर्शनास आणले. तेव्हा ते म्हणाले, "मग त्यांनाच सांगा, हे काम तुम्हीच उचला." अर्थात् फुकटचा हा परोपदेश होता. असो. श्रीवर्धनविषयी

त्यानी चौकशी केली. म. दत्तो वामन पोतदार कुलाबा जिल्ह्यातील बिरवाडी गावचे असल्याने, या कार्यात त्याचा सल्ला आम्ही प्रामुख्याने घेणार आहो असे भागतान्त ते अधिक प्रसन्न झालेले दिसले व तसे त्यानी नतर स्पष्टपणे बोलूनहि दाखविले

( ३ ) अष्टाग वैद्यक विद्यालयाचे कार्यकर्ते वैद्यरत्न पराजपे याच्यासमवेत मी तात्यासाहेबाकडे गेलो ०।. वाटत होती, आज भेट होईल की नाही म्हणून कारण लगेच त्याना एका सभेस जावयाचे होते. भीतभीत घटा वाजविली 'वर या' असे आमत्रण मिळाले आनद वाटला. " अ०न।म।मे भविष्यन्त्य. कार्यसिद्धेर्हि लक्षणम् " ही उक्ति आम्हा उभयताच्या तोडून न कळत बाहेर पडली कोणासहि मज्जाव नसणारे ते ऋषिआश्रमतुल्य स्वागत आमच्या हृदयात अतिशय बिंबले. आम्ही आदराने नमस्कार केला 'श्रीवर्धन-दाडेकर' एवढे शब्द उच्चारताच "काय, कोठवर ०।न।।न०। आली?" असा प्रश्न त्यानी अत्यत आस्थेने केला. 'श्रीमत पेशवे मदिरास' बृहन्महाराष्ट्रीय जनतेनें जोराने साहाय्य करावे म्हणून पुढाऱ्यानी एक पत्रक प्रसिद्ध करावे अशी इच्छा आहे असे सागितले "मी या मदिरास काय देणगी द्यावी ते अजून ठरविले नाही" असे ते म्हणाले. स्वकर्तव्याची जाणीव त्याच्यामध्ये कशी असे हे त्यायोगे सिद्ध झाले आम्ही सागितले, "आज आम्ही देणगीकरिता आलो नसून, आजचे कार्य पुढाऱ्याच्या पत्रकाविषयी आहे" नतर पुढाऱ्याचे पत्रक आम्हीं त्यांच्यापुढे ठेविले 'हे मला पूर्णपणे पसत आहेच' असे म्हणून पत्रकावर सही केली. म पोतदार व चौंडेमहाराज याच्या सह्याच्या मध्ये त्यानी आपली स्वाक्षरी केली! त्याचा तो विनय, प्राजळपणा व सहृदयता पाहून त्या अत्यत थोर पुढाऱ्याविषयी आमच्या मनात नितान्त आदर उत्पन्न झाला यानतर महत्त्वाच्या सभेस त्यास जावयाचे आहे हे जाणून आम्ही त्यास नमस्कार करून जलदीने बाहेर पडलो.



## पांडुरंग हरी देशपांडे

### ( आयुर्वेदाचार्य, पुणें )

( १ ) १९२१ चे भोर सस्थान प्रजापरिषदेचे पहिले अधिवेशन हे दक्षिणी सस्थानाच्या प्रजा-चळवळीची सुरुवातच म्हणावयाचे. त्यातून त्याचे तात्यासाहेब अध्यक्ष. सस्थानच्या हद्दींत सभाबदीचा कायदा होता; पण तो मोडूनहि तात्यासाहेब आणि कै. वामनराव पटवर्धन यानी आधीच सभा केल्याने त्याच्यावर भोर-कोर्टात खटला चालू होता. अशा स्थितींत भरणारे हे अधिवेशन! अर्थात् सर्व सस्थानवासियाना अत्यत आतुरता वाटणें साहजिक होते. सभाबंदी चालू असून

खटलाहि सुरू. अशा स्थितीत परिषद कशी पार पडते व तात्यासाहेबांची भूमिका काय राहते याबद्दलहि लोकात मोठे कुतूहल होते तात्यासाहेब परिषदेच्या दिवशी आल्यापासून सर्वत्र शातता होती. स्वत. ते प्रशान्त होते दुपारी भोजनोत्तर वाम-कुक्षीकरिता ते हुडले दरबारचे अधिकारी येऊन त्याच्या उठण्याची वाट पाहात बसले काय घेऊन आले असतील हे राजश्री म्हणून कार्यकर्ते चिंतातुर होते; पण चमत्कार निराळाच पडला तात्यासाहेब उठल्यावर आदबीने प्रणाम करून त्या अधिकाऱ्याने "खटल्याचा निकाल वाचून दाखविण्यास आलो" म्हणून त्याना सांगितले त ऐकून तात्यासाहेब म्हणाले, "म्हणजे ? खटला चालला केव्हा ? निकालहि लागला इतक्या झटपट आम्हाला त्याची काहीच बातमी कशी नाही ? तर मग निकाल बहुधा उलटच असणार ?" "नाही महाराज ! सुदैवाने आपण या खटल्यातून दोषमुक्त होऊन सुटलात, त्याचेच निकालपत्र मी वाचून दाखवितो," अधिकारी सौजन्याने म्हणाले. "वाः ! हा तर अजब चमत्कार ! स्वतःची जबानीहि द्यावी न लागता ज्या खटल्यातून सुटलो त्याचा निकाल ऐकणे मजेचेच आहे" तात्यासाहेब हसत म्हणाले आरोपी युनिव्हर्सिटीचे पदवीधर असल्यानें ते हेतुपुरस्सर गुन्हा करणार नाहीत, ह दोषमुक्तीचे कारण देऊन भोर दरबारने त्याना सोडले ! ! पण तात्यासाहेबाच्या [illegible] खरोखर सस्थानिकहि नमल्याचाच हा पुरावा होय

( २ ) त्याच परिषदेच्या समारोपाचे तात्यासाहेबाचे भाषण चालू होते त्या वेळेपर्यंत संस्थानच्या कारभाराचा वृत्तान्त ( Administration Report ) हाती येऊ शकला नाही, पण भाषण सुरू करता करता एकदम कोणी तरी त्याच्या हाती तो आणून दिला वृत्तान्तावर आधी काळजीपूर्वक वाचूनच जाहीर भाषण करावयास हवे असेच कोणालाहि वाटणार पण तात्यासाहेबानी उभ्या उभ्या तो चाळून अनेक विसगति व दोष काढून त्याचा आपल्या भाषणात इतका खरपूस समाचार घेतला की, त्यांनी जणू आधी अभ्यासपूर्वक त्याचें वाचन केले होते असेच सर्वास वाटले !

( ३ ) कामाचा तात्यासाहेबाचा उरक दाडगा ह महशूर आहे प्रस्तुत लेखकाने १९३९ साली श्री गोविंदराव टेंबे याच्या षष्ट्यब्दपूर्तीच्या समारभानिमित्त "गोविंदगुणगौरव" नावाच्या ग्रथाचे सपादन केलें. या ग्रंथाला तात्यासाहेबानी प्रस्तावना लिहावी अशी त्याचा इच्छा होती वस्तुतः गोविंदराव, मागील मराठी-करणाच्या चर्चेमुळे तात्यासाहेबाचे विरोधक गोविंदरावानीं आपल्या लेखन-भाषणातून तात्यासाहेबाच्या विधानावर कडक टीकाहि केलेली पण तात्यासाहेब खरे रसिक. एखाद्या मतभेदामुळे गोविंदरावासारख्या श्रेष्ठ कलावानाच्या गौरवाला ते मागे घेणार नव्हते विनती करताच त्यानी प्रस्तावना लिहिण्याचे कबूल केले

ते म्हणाले, "तुम्हीच या अमक्या दिवशी व मी मागतो ते लिहून घ्या कसे" ठरल्याप्रमाणे गेलो तो तात्यासाहेबानी आदल्या रात्रीच स्वहस्तें सुदर प्रस्तावना लिहूनहि ठेवलेली आणि त्यात गोविंदरावाच्या गुणाची मुक्तकठाने स्तुति केलेली त्यानी मला दिली पुढे त्याच्याच हस्ते सदर ग्रथाचा प्रकाशन-समारभहि झाला हे पुणेंकर रसिकाना विदित आहेच

(४) प्रस्तुत लेखकाने श्री सवाई गंधर्वांचा षष्ठयब्दपूर्ति-समारभ घडवून आणला व 'सवाई-गंधर्व-ग्रथ' प्रकाशित केला या वेळी . . . लेखनाची तसदी दिली नाही पण प्रकाशनाच्या वेळी आपणास या म्हटले! "कामे फार आहेत, आता असल्या समारभाना कटाळलो आहे, माफ करा" असे ते म्हणाले लेखक खट्टू झाला एवढा समारभ, डॉ कुर्तकोटी अध्यक्ष आणि तात्यासाहेब बोलण्यास नाहीत हा केवढा बेरग, म्हणून त्याला बरे वाटेना पण त्याचा स्पष्ट नकार असल्याने इलाज चालेना आता शेवटचा प्रयत्न करून पहावा म्हणून त्याने समारभाच्या वेळी श्रीमत रानडे याची गाडी त्याजकडे पाठविली आणि चमत्कार असा की, भीड न लोटल्यामुळे तात्यासाहेब आले आणि अर्धा तासपर्यंत फार चटकदार बोलले!



## ग. रं. कुलकर्णी हळदीकर

(बी ए., एल्‌एल्. बी., वकील, कोल्हापूर)

(१) करवीर नगर-वाचन-मंदिराच्या ८० व्या वर्षासबधाचा पहिला हीरक-महोत्सव १९३२ साली श्रीराजाराम छत्रपतीच्या अध्यक्षतेखाली झाला, तेव्हा तात्यासाहेब आले होते त्या वेळी त्यानीं अनेक व्याख्यानें दिली. अनेकानी त्याच्या स्वाक्षऱ्या, गाठी-भेटी, मुलाखती घेतल्या. सरस्वतीच्या कठातील हा मेरुमणि पाहून सर्वास आनद झाला, पण काही विशिष्ट व्यक्तीनी आपला निषेध व्यक्त केला! त्या वेळी पुढील सुभाषिताची आठवण झाली –

उदितवति द्विजराजे कस्य न चित्त परा मुद धत्ते।
सकुचसि यत्कमल हर हर वामो विधिर्भवतः॥

(येथे 'द्विजराज' = चंद्र. श्रेष्ठ ब्राह्मण – हा श्लेष सुज्ञाच्या ध्यानात येईल.)

(२) या उत्सवात रात्री सुप्रसिद्ध गवई श्री मजीरखा, मास्तर कृष्णराव, श्री अबदुल करीम याची गायने झाली. मजीरखा याचे गाणे सुदर व्हावयाचे पण ऐन वेळीं थडीने त्याचा आवाज काम देईना व तानबाजीची व सुरेलपणाची पर्जन्यवृष्टि होईना. त्यामुळे श्रोत्याची निराशा झाली तात्यासाहेब गाणे ऐकण्यास मुद्दाम आले

होते मी त्यास म्हटले, "आज आपणास खासाहेबाचे गायन-वैभव पहायला मिळत नाही याबद्दल मला फार वाईट वाटते" त्यावर तात्यासाहेब म्हणाले, "समुद्राचा अफाट दर्या मला दिसतो, फक्त लाटा येत नाहीत! गायनावरून मला एक कल्पना सुचते आद्य वाणी प्रकट झाली ती प्रथम नि:शब्द स्वरमय होती नि:शब्द स्वरमय म्हणजे संगीत व सशब्द वाणी म्हणजे वाङ्मय! सकाळी आमची वाङ्मय-सेवा झाली, आता गायनाने संगीतसेवा झाली मिळून एकाच वाणीची दोन रूपे!"

( ३ ) राजाराम कॉलेजमध्ये · ˙ व्याख्यान डॉ बाळकृष्ण यानी ठरविले तीन वाजल्या ... कॉलेज-हॉल व त्याची ग्यालरी चिक्कार भरून गेली होती ... नागरिक, प्रोफेसर्स वगैरे सर्व उपस्थित होते या कॉलेजमध्यें तात्यासाहेब आज चाळीस ... येत होते म्हणून जुना ... या नात्यानें आपल्या विद्याजननीच्या दर्शनास स्वतः तेहि उत्सुक झाले होते तात्यासाहेब प्रवेश करताच टाळ्याचा प्रचंड गजर झाला व्यासपीठावर चढून श्रोत्याकडे तोंड करून ते उभे राहिले, तोच गॅलरीतून अंडे टाकण्यात आले! व एकदम वातावरण अत्यंत गरम झाले काही हताश तर काही हतबुद्ध झाले अशा वेळी स्वतः तात्यासाहेब धीरगंभीर मुद्रेने उभे राहिले हात उभारून श्रोत्याना शांत राहण्यास ते सांगत होते ज्या दिशेनें ते अंडे आले तिकडे वर तोंड करून त्यानी दृष्टि लावली होती. अंडे कोठून आले ते त्याना समजले पण कोणी टाकले ते अर्थात् समजणे शक्य नव्हते एकदोन मिनिटांनी शांतता झाल्यावर ग्यालरी-वरील कोपऱ्याकडे दृष्टि करून ते ... "आपण जे मला आता काही दिले ते पोचले! त्याचा मी स्वीकार करतो आणखीहि काही टाकावयाचे असले तरी मी आपल्यापुढे ते टाकण्यास व मला घेण्यास सोपे जावे म्हणून हा पदर पसरतो!" असे म्हणून त्यानी खरोखरच उपरण्याचा पदर पसरल्यासारखा केला! व ज्याने अंडे टाकले त्याने जर आपले नाव सांगितले तर माझ्यावर व या सभेवर फार उपकार होतील करिता नाव सांगावे" असे म्हणताच वरून त्याने आपले नाव देसाई असे सांगितले तोच तात्यासाहेब म्हणाले, "तुमच्या धैर्याची मी तारीफ करतो! कारण तुम्ही धैर्याने पुढे आल्याने या सर्वावरील प्रसंग टळला व आता तुमच्या-माझ्यातलाच प्रश्न राहिला तुमचे व माझे विद्याबंधूचे नाते तेव्हा मी तुमची थोडी जरी सहानुभूति असली तरी गमाविण्यास तयार नाही. परंतु या पदार्थाचा मला उपयोग विलायतेत जाऊनही झाला नाही त्यापेक्षा एखादा मोठा पेढा फेकला असता तर मी तो खाल्ला असता व म्हटले असतें की, आपली अबकृपा अशीच लाभो!" नंतर श्रोत्यांकडे वळून प्रसन्न मुद्रेनें पाहून ते म्हणाले, "असो; आता हा उद्वेगजनक प्रकार सोडून आता ज्या आनंददायक

भावनेनें आपण जमलों आहों तिकडे वळू " असे म्हणून त्यानीं विषयाचा सुंदर प्रस्ताव करून उपमा, दृष्टान्त, विनोद इत्यादि युक्त असे सुदर व्याख्यान दिलें.

(४) यानतर १९३७ सालीं माझ्या 'बुद्धिबळ-क्रीडारत्ने' या पुस्तकास प्रस्तावना लिहिण्याची त्याना मी विनती केली त्यावर "मला त्यातील काहीं कळत नसल्यानें प्रस्तावना लिहूच शकत नाहीं" असे उत्तर आले त्यावर टिळकांनीं "सतारीचे पुस्तक" अभिप्रायास आले असता तज्ज्ञाकडून माहिती मिळवून अभिप्राय दिला होता, त्याची आठवण त्यास देऊन केसरीच्या सपादकाची जागा सर्वज्ञतेची आहे, आपला अभिप्राय पाहिजे, असा आग्रह मी धरला व तसें त्यांस लिहिलें. त्यावर त्यानीं सुदर अभिप्राय पाठवून देऊन "या पुस्तकाच्या सशोधनास मान्यता मिळाल्याखेरीज राहणार नाही वकील लोक जर अशा सशोधनाच्या कार्यात वेळ घालवतील, तर ज्ञानात भर पडून फुकट जाणाऱ्या रिकाम्या वेळाचे चीज होईल" असा वकीलवर्गास चागला टोला त्यानीं दिला होता.



## वि. रा. वेलणकर

(धनी, श्रीगजानन मिल्स, सांगली)

(१) १९३२ साल हें माझ्या आयुष्यात फारच क्रातिकारक गेले मजवर याच सालीं प्राणघातक हल्ला झाला सखाराम मणसाराम, लल्लूभाई किलाचंद याच्या पेढ्यावर चमत्कारिक प्रसग आले व त्यात माझे ५६००० रुपये बुडाले. अशा तऱ्हेचे आघात झाले आणि मी एकटा असल्यानें माझें काहीं बरेवाईट झालें तर गजानन मिल्सचें काय होईल, इतक्या प्रयासाने निर्माण केलेल्या गजानन मिल्सची परपरा कशी चालू राहील हा प्रश्न मला भेडसावू लागला. माझी गिरणी लिमिटेड केली तर कसे काय होईल, याबाबत तात्यासाहेबाचा सल्ला घेण्यासाठीं मी त्यांच्याकडे गेलो. तात्यासाहेब म्हणाले, "विष्णुपत, असे विचार तुमच्या मनांत यावे हे ठीकच आहे. काहींतरी व्यवस्था असावी हेंहि ठीक आहे. तथापि लिमिटेड कपन्याची परपरा अखड चालते याचा तरी काय नेम? परपरा राहणें याला समाजात कर्तृगार लोकांचा भरणा लागतो. लिमिटेड कपनी केल्यानें कदाचित् परपरा चालेल, कदाचित् चालणारहि नाहीं. तेव्हा तो मार्ग तुम्हीं आचारावाच असें मी निश्चित म्हणू शकणार नाहीं. तुम्ही आपल्या विवेकबुद्धीनें दुसरी काहींतरी चांगली व्यवस्था करून ठेवा. पण माझ्या मृत्यूनतर काय होईल याची निष्कारण काळजी करू नका. या जगात शाश्वत असें काहीं नाहीं. आपण जिवंत असेपर्यंत स्वीकृत कार्य उत्तम तऱ्हेने केलें, आपलें कर्तव्यकर्म चोख बजावलें, एवढी

जाणीव व समाधान मरताना लाभले, म्हणजे आपलें काम झाले; व अमका अमका मनुष्य अमक्या अमक्या गुणाने मरेपर्यंत यशस्वी झाला एवढे महाराष्ट्राच्या इतिहासकाराना नमूद करता आले म्हणजे आपल्या आयुष्याचें सार्थक झाले असें समजा. 'वेदान्त' म्हणतात तो हाच ब्राह्मणास तर हें बाळकडूच आहे."

(२) १९३१ मार्च केसरी सस्थेच्या सुवर्णमहोत्सवाच्या वेळी केसरी-मराठ्याच्या ट्रस्टींनी जो तीन लाख रुपयाचा स्वतत्र ट्रस्ट केला, त्याबद्दल तात्यासाहेबाच्या ६१ व्या वाढदिवसाच्या दिवशी मी एक अभिनदनपर पत्र त्याना पाठविलें होते त्यासबधाने तात्यासाहेब मला म्हणाले, " विष्णुपत, पैशाचा काही प्रश्न मजसमोर आला की, मला तुमची आठवण होते कारण माझ्या ६१ व्या वाढदिवसाच्या दिवशीं माझ्या अनेक गुणाबद्दल अभिनदन करणारी अनेक पत्रे मला आली; पण लोकमान्याच्या पश्चात् केवळ दहा वर्षात वर्तमानपत्रे चालवून त्यातून पैसा निर्माण करून मी तीन लाख रुपये बाजूस काढून त्याचा ट्रस्ट केला याबद्दल मला धन्यवाद देणारे जे फारच थोडे लोक आहेत त्यात प्रमुखत्वाने तुम्ही आहात याचे कारण तुम्हाला उपजतच द्रव्यदृष्टि आहे. द्रव्य निर्माण करणें म्हणजे किती यातायातीची, श्रमाची गोष्ट आहे याची खरीखुरी जाणीव महाराष्ट्रात फारच थोड्याना आहे आणि यामुळेच महाराष्ट्र द्रव्याच्या दृष्टीनें मागे पडला आहे ही द्रव्यदृष्टि ज्या वेळेस बहुताना येईल त्या वेळीच महाराष्ट्र सधन होईल विष्णुपत, तुमचें पत्र मी प्रामुख्यानें माझ्या स्नेह्याना दाखविलें, आणि म्हटले, अशी द्रव्योत्पादन करणारी व द्रव्योत्पादन करणाराचे कौतुक करून त्याना प्रोत्साहन देणारी माणसेंच महाराष्ट्राचा आर्थिक दृष्टीने उद्धार करतील."



## रघुनाथशास्त्री कोकजे

### (पंडित, तर्कतीर्थ, लोणावळें)

(१) चौदा वर्षापूर्वीची गोष्ट. त्या वेळी लेखक, कार्यकर्ता अथवा वक्ता यापैकी कोणत्याहि रूपाने माझे कार्य सुरू झालेले नव्हते पण योगायोग असा की, त्या वेळी विविधज्ञानविस्तारात प्रसिद्ध झालेला माझा एक लेख वाचून तात्यासाहेब यानी मला एक विस्तृत पत्र पाठविले. 'मराठीत प्राचीन शास्त्राची दुर्दशा' या शीर्षकाचा माझा एक लेख एप्रिल १९३३ च्या विविधज्ञानविस्तारात प्रसिद्ध झाला होता. हा लेख तात्यासाहेबाच्या वाचनात येताच तत्परतेनें "विविधज्ञानविस्तार मासिकाच्या गेल्या अकात जुन्या शास्त्राच्या दुर्दशेसबधाचा आपला लेख वाचला; तो मला फार आवडला," असा आरभ करून त्यानीं एक

विस्तृत पत्र मला पाठविले. या पत्रात "माझ्या मते मीमांसादि षड्शास्त्रे व शिवाय साहित्यशास्त्र, गायनशास्त्र, वैद्यशास्त्र इत्यादि शास्त्रांवर मराठींत एकेक उत्तम ग्रंथ हवा. पुस्तकें तयार करण्याचे काम सहकारी पद्धतीनं कोणी अंगावर घेतल्यास ती छापून काढण्याचे काम अंगावर घेण्यास मी तयार आहे. तरी एक वेळ तुमची माझी गाठ पडेल असे करा" इत्यादि मजकूर होता. माझ्यासारख्या अप्रसिद्ध व्यक्तीचा कोठे तरी प्रसिद्ध झालेला लेख राजकारणी प्रमुखवृत्तपत्र-संपादकाच्या अवलोकनात यावा, त्याने तो वाचून मजकडे पृच्छा करावी हे सर्व पाहून मी त्यास त्वरित भेटण्यास गेलो. सुमारे दोन-अडीच तास मनमोकळी चर्चा झाली. राजकारण आणि संपादकीय व्यवसायात वावरत असून प्राचीन शास्त्राबद्दल तात्यासाहेबांनी एवढी आस्था दाखविली हे पाहून त्यांच्याविषयीचा माझा आदर वरील पहिल्याच भेटीत दुणावला.

( २ ) जून १९४५ च्या पहिल्या आठवड्यात पुण्यास एक विद्वत् परिषद भरविण्यात आलेली होती. या परिषदेत सनातनी आणि परिवर्तनवादी यांचा एकत्र वाद होणार असे प्रसिद्ध झाले होते. परंतु परिवर्तनवाद्यांच्या प्रमुखांचे कोणत्याहि प्रकारे मत न घेताच सर्व कार्यचक्रे हालू लागली. वादाचे नियम कोणते आणि मध्यस्थ कोण याविषयी [illegible] माहिती मिळविण्याच्या मी केलेल्या प्रयत्नास यश आले नाही. शेवटी मला हा सर्व प्रकार अयोग्य वाटला म्हणून आमच्या पक्षातील प्रमुखांची एक तातडीची बैठक भरवून त्या परिषदेंत भाग घेऊ नये असा निर्णय एकमताने केला गेला. अर्थात् दुसऱ्या दिवशी मी आणि इतर परिवर्तनवादी पंडित कोणीच मंडपाकडे फिरकले नाही. तात्यासाहेब या परिषदेचे एक प्रमुख कार्यकर्ते होते. त्यांच्या-देखत जेव्हा आमच्या नव्या पक्षाची बाजू सावरण्यास कोणीच नाही असा प्रसंग येऊन ठेपला, तेव्हा 'त्या पक्षाचे पंडित आले नसले तरी मी स्वतःस परिवर्तन-वादीच समजतो,' असे स्पष्ट सांगून तात्यासाहेबांनी आमच्या पक्षाची बाजू मोठ्या हिरीरीने मांडली. परिवर्तनवादाचा या वेळी त्यांनी केलेला पुरस्कार मी कधीहि विसरणार नाही.

( ३ ) गेल्या वर्षी श्रीरामनवमीला भोर-दरबारात 'हिंदूंच्या अवनतीची मीमांसा' या माझ्या ग्रंथास तेथील राजेसाहेबांच्या हस्ते शंकराजी नारायण पारि-तोषिक मला मिळावयाचे होतें म्हणून मी भोरास गेलो होतो. तेथील विधिमंडळाचे अध्यक्ष या नात्याने तात्यासाहेबहि तेथे उपस्थित होते. दरबारात आम्हा दोघांची भाषणे झालीं. त्यात तात्यासाहेबांचेच भाषण खरोखरा महत्त्वाचे व चिंतनीय होतें. असे असता 'आज माझे भाषण मुख्य नाहीं; मुख्य भाषण पं. कोकजेशास्त्री यांचे होणार आहे,' असे त्यांनी सांगितलें. दुसऱ्यास मोठेपणा

देण्याचे तात्यासाहेबाचे उदार धोरण प्रसिद्धच आहे हा सर्व कार्यक्रम सपल्यानतर तात्यासाहेब स्वतत्र मोटारीने पुण्यास जाणार होते. मलाहि पुण्यास लवकर जाणे अवश्य होते म्हणून त्याच्या मोटारीत जागा होईल काय हे विचारण्यासाठी मी त्याच्याकडे गेलो, तो त्यानीच माझ्या पुण्यास जाण्याच्या सोई-विषयी प्रश्न केला माझा हेतु मी सागताच 'अहो, हे मीच तुम्हाला विचारणार होता,' असे म्हणून बरोबर निघण्याविषयी सुचविले. मोटारींत आम्ही दोघेच असल्यामुळे अनेक विषयावर मनमोकळी चर्चा झाली. त्या वेळी सर्व बोलणे अगदी बरोबरीच्या नात्याने चालले होते स्वतःच्या मोठेपणाचा अभिमान न धरता सामान्य माणसाशी देखील बरोबरीच्या नात्याने वागण्याच्या या त्याच्या पद्धतीचा ठसा माझ्या अतःकरणावर चिरकाल रहाणारा आहे



# नीलकंठ महादेव केळकर

## ( बी ए., प्रसिद्ध चित्रकार, मुंबई )

( १ ) तात्यासाहेबाचे ज्येष्ठ चिरजीव बापूसाहेब यास शाळेतील दिवसात चित्र काढण्याचा नाद होता व त्यास तात्यासाहेबाचे ` • • होते. पण तो भाग केवळ सर्वच बाप आपल्या मुलाचे कौतुक करतात तशात मोडेल पण आम्हा चित्रकारास, विशेषत पळनिटकर बधु, रावसाहेब पिंपळखरे, चिंतामणराव ओक, व मी स्वत तात्यासाहेबाच्या सहानुभूतिपूर्वक साहाय्याने उपकृत झालो आहोत तात्यासाहेबाना सगीत शास्त्राची बरीच चागला माहिती होती, तसा चित्रकलेशी तात्यासाहेबाचा दृढ परिचय नव्हता चित्रकलेतील अनेक पथ व त्याची स्पर्धा यात त्यानी फारसे लक्ष घातले नाही परतु पुण्यात जे चित्रकार-मडळ आज गेली अठरा वर्षे कार्य करीत आहे त्या महाराष्ट्र चित्रकार-मडळास तात्यासाहेबानी टिळक-स्मारक-मदिराची जागा वापरावयास देऊन, स्वतः सभासमेलनास हजर राहून मदत केली ती मदत विस्तारशः चित्रकार-मडळाचे मुख्य कार्यकर्ते रा गोडबोले आपल्या आठवणीत नमूद करतीलच. फक्त एक वेळा 'हिंदी पद्धतीचे पुनरुज्जीवन आपणास दुर्बोध वाटतें, वास्तवासारखी चित्रे सर्वास सुबोध वाटत असता हे दुर्बोध कलेतील प्रयोग फुकट होत आहेत,' इतपत वरवरची चर्चा तात्यासाहेबानी मजजवळ केली व मुबईच्या स्कूल ऑफ आर्टचे धोरण 'मुक्तद्वार' अथवा कोणत्याहि चागल्या पद्धतीचा पुरस्कार करण्याचें आहे हे ऐकून त्यास समाधान वाटले.

( २ ) १९३१ साली तात्यासाहेब दिल्लीच्या राजकीय वाटाघाटीसाठी दिल्लीस गेले असता तेथील महाराष्ट्र समाजापुढे त्यांचें भाषण झालें मला व्हाइसरॉयचे

बक्षीस मिळून साऱ्या हिंदी चित्रकारात 'प्रतिमालेखना'त अग्रपूजेचा मान मिळाला, याबद्दल महाराष्ट्र समाजाने माझे अभिनदन केले ते तात्यासाहेबाच्यातर्फे करविण्यात आले त्या वेळचे भाषण तात्यासाहेबाच्या चरित्रावर महत्त्वाचा प्रकाश पाडते. 'इग्रजाचे स्वभावविशेष' हा त्याच्या भाषणाचा विषय होता इग्रज हा व्यक्तिस्वातत्र्यवादी असला तरी तो सस्थानिष्ठ व राष्ट्रनिष्ठ असतो या गुणामुळेच इग्लडची बँक सात शत ... अधिक काळ इभ्रतीने भरभराटीस आली इतर अनेक सस्थाची उदाहरणे घेऊन अनेक कर्तृत्ववान् ... आले व गेले तरी इग्रजी सस्था चिरजीव राहतात व त्याचा उत्कर्ष होतो उलट अनेक हिंदी सस्था एकेका व्यक्तीच्या कार्यावर ... असतात व त्या व्यक्तीची शक्ति आटली की सस्था विरून जातात ! हा विरोध तात्यासाहेबानी अतिशय मार्मिक उदाहरणानी व्याख्यानात ... सस्था केवळ जगविल्या एवढेच नव्हे तर त्याना कायम कर्तृत्ववान् ... जे प्रयत्न केले त्याबद्दल अनेक सस्थाची साक्ष मिळू शकेल

( ३ ) ... चळवळीत मी कॉलेज सोडण्याचा सकल्प केल्यानतर तात्यासाहेबास विचारावयास गेलो ज्याची राष्ट्रीय कार्यासाठी स्वार्थत्याग करण्याची तयारी असेल, पुढ ... नुकसान झाले तरी ते निमूटपणे सोसण्याची तयारी असेल, अशा ... स्वत:च्या ... त्याग करावा; मी व्यक्तिश: कोणालाहि भरास घालीत नाही, असे त्यानी रोज जे जाहीर सभातून सागितले तेच मला व्यक्तिश: सागितले आम्ही सर्व ... भावनावश होऊन राष्ट्रीय कार्याच्या जाणिवेने स्वत:चे शिक्षण अर्धवट सोडण्यास प्रवृत्त होत आहोत, ही गोष्ट पूर्णपणे जाणवल्यामुळे तात्यासाहेबानी टिळक विद्यापीठाची चटकन स्थापना करविली पण ही असहकाराची चळवळ टिकाऊ नाही, राष्ट्रिय चळवळीच्या झझावाताने भावनावश होऊन लोक महात्माजीचे प्रत्येक वचन मानीत आहेत, त्याचे कमीत कमी नुकसान व्हावे ही जबाबदारी त्यानी आपणहून स्वत:च्या शिरावर घेतली व अनेकाच्या मदतीने टिळक-विद्यापीठ स्थापन केले व तेथे ते स्वत: ... इमर्सनचे निबध ... शाळामास्तराप्रमाणे ते आम्हास शिकवीत त्या वेळी त्याचे असामान्य अध्यापनपटुत्व प्रतीत झाले



## बाबूराव वामन कुलकर्णी

( जमीनदार, न्हावी-बुद्रुक, जिल्हा सातारा )

( १ ) १९२१ सालची गोष्ट आमच्या गावी फॉरेस्ट अधिकारी रेजर आयगार यान ग्रेझिंग फी देण्याबद्दल ... सर्व गुरे अडविली व चराई-कर दोन

आण्याच्याऐवजीं चार आणे दिल्याशिवाय गुरें सोडणार नाही, अशी धमकी दिली. रेंजरसाहेबाची मजल खटले करू असे सागण्यापर्यंत देखील गेली. हा निव्वळ अत्याचार होता. माझ्याकडे ग्रामस्थ मडळी येऊन त्यानी याची दाद लावा असें मला सागितले मी एक खेड्यात राहणारा सामान्य माणूस शिवाय सरकारविरुद्ध वागून आमची दाद कोण घेणार ? अर्थात् आमचे हितचिंतक व कैवारी तात्यासाहेब याच्याकडे धाव घेतली त्याना सर्व हकीकत सागितल्यावर त्यानी लगेच केसरीत स्फुट-सूचना लिहून आमची बाजू निर्भीडपणे माडली व अधिकाऱ्याचा नक्षा उतरविला. केसरीत लिहिलेल्या या स्फुट-सूचनेचा योग्य परिणाम होऊन रेजर मि आयगार यास डि मॅ साहेब यानी खासा जाब विचारला व मि डोमिंगो, प्रात व डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसर मोस्टरसाहेब यानी गावी येऊन लोकाची तक्रार ताबडतोब मिटविली केळकर व केसरी याचा हा केवढा प्रताप !

( २ ) १९२८ सालची गोष्ट तात्यासाहेब औंध येथे श्रीमत बाळासाहेब पत-प्रतिनिधि याच्या निमत्रणावरून चालले होते तात्यासाहेबाना आणण्याकरिता लॅबोरेटरीचे सुपरिंटेंडेंट मुळेसाहेब याना स्पेशल मोटार देऊन पुण्यास पाठविलें होते मोटार आमच्या गावाजवळ आल्यावर पेट्रोल अचानक सपले. आमचे गाव औंध रस्त्यावर अगदी सडकेनजिक असल्यामुळे, रा मुळे माझ्या घरी आले व म्हणाले, " तात्यासाहेब केळकर मोटारीत आहेत पेट्रोल सपले आहे मला एकादी बैलगाडी पाहून द्या येथून औंध पाच मैल आहे आता सात वाजले आहेत रात्रीची वेळ आहे दहा वाजेपर्यंत औंधास सहज जाऊ वगैरे " हे ऐकताच मी ताबडतोब सडकेवर मोटार उभी होती तेथे गेलो नतर तात्याना नमस्कार करून म्हणालो, ' तात्या, घरी चलायचें ना ? ' ते ताबडतोब उठले व म्हणाले, " चला, यावत् तैल तावत् आख्यानम् केव्हाहि बैलगाडीच बरी ! ह्या यात्रिक सुधारणामुळे प्रवासाच्या बाबतीत जितका स्टार्ट तितकाच हॉल्ट ठरलेला असतो " तात्या मोटारीतून उतरून रस्त्याने घरी जाताना मी त्याना म्हणालो, " आज आपल्या एका लेखाची प्रचीति पाहण्याचा योग आला आहे. " अर्थात् तात्यानी तो कोणता लेख अशी पृच्छा केली मी म्हणालो, तो लेख ' माझी आगगाडी कशी चुकली ' हा होय मी त्याच्या लेखाची वरीलप्रमाणे आठवण देताच तात्यासाहेब म्हणाले, " तुम्ही योग्य टोला दिलात ! तुम्ही मला केसरीतलि लेखावरून ओळखले असते, तर त्याचे मला इतके वाटले नसते पण माझ्या इतर लेखावरून तुम्ही मला ओळखलेले पाहून, माझे इतर वाङ्मय इतके आस्थापूर्वक तुम्ही वाचलेले पाहून व मी थोडीबहुत वाङ्मयसेवा करीत आहे तिचे लोण खेडेगावापर्यंत पोहोचलेले पाहून मला समाधान वाटतें "

( ३ ) तारीख २६।९।३१ रोजी आमच्या गावीं तात्यासाहेब केळकर व नाना-

साहेब वैद्य याना मानपत्रे देऊन त्याचा गौरव केला. ही सभा सातारचे सरदार अण्णासाहेब मुतालिक याच्या अध्यक्षतेखाली झाली. मानपत्राच्या समारभाच्या वेळी शृगारलेल्या खुर्च्यावर बसण्याची -गय :न' विनती केली त्याप्रमाणे दोघेहि खुर्चीवर जाऊन बसले आरभ होण्यापूर्वी नानासाहेब वैद्य तात्यासाहेबाना म्हणाले, "तात्या, केवळ तुमच्यामुळेच माझा हा येथे गौरव होतो आहे एरवी ह्या खेडे-गावात आम्हाला कोण विचारतो !" या नानासाहेबाच्या प्रश्नास उत्तर देताना तात्यासाहेब म्हणतात, "पूजा करणाऱ्या व्यक्तीना मूर्तीचे दोन्ही नेत्र लागतात व त्या दोन्ही नेत्राकडे पूजक आदराने पाहातो सध्या ह्या समारभात महाराष्ट्र-वाङ्मयरूपी शारदेची पूजा चालू आहे त्यात स्वतः देवतेने भाग घ्यावयाचा नसतो ! नुसते होणारे उपचार देवतेने पाहावयाचे असतात ! ह्या वेळी येथील समारभाच्या दृष्टीने दोन्ही व्यक्ति, चालकाना श्रेष्ठच आहेत उपास्य-देवतेच्या पूजकाना दोन्ही नेत्राची योग्यता सारखीच !"

(४) तात्यासाहेब आमच्या येथे येणार असून त्याना मानपत्र देण्याच्या कामी मी पुढाकार घेतलेला होता आमच्या तालुक्यातील एक × × × वकील गाधी-भक्त असल्यामुळे केसरी सस्थेबद्दल नाराज असत माझी गाठ पडली असता वकीलसाहेब म्हणाले, "काय हो, तुमच्या तात्यासाहेबाना मानपत्र देणार आहात वाटत ?" "हो, देणार आहोत, आपले म्हणणे काय ?" वकीलसाहेब म्हणाले, "मानपत्र दिल्यावर त्याकरिता क'र्णीाट येईल !" योगायोग असा की, तात्यासाहेबाचे प्रत्यक्ष पत्रच त्या वेळी माझ्या खिशात होते. ते वकीलमहाशयाना दाखविले. तात्याच्या पत्रात पुढील वाक्ये होती – "मी फक्त एका अटीवर आपल्या गावी मुक्काम करीन ! ती अशी की, माझा मानपत्रादिकानी आपण जाहीर सन्मान करता कामा नये मी केवळ एक स्नेही ह्या खाजगी नात्याने काही वेळ तुमच्याकडे राहीन व आपण गप्पागोष्टी बोलू तुमच्याकडे इतर चार मडळी आल्यास ओळखी करून घेऊ. वगैरे –" वकीलसाहेबानी तात्याचे स्वदस्तुरचे हे पत्र पाहिल्यावर ते अगदी गारच झाले !



## शां. वि. अवळसकर

(इतिहाससंशोधक, अलिबाग)

(१) १९३१ च्या नाताळात उज्जयिनीस मालव-कविसमेलन भरले त्याचे अध्यक्षपद तात्यासाहेबानी स्वीकारले; तेव्हा ते १।२ दिवस इदूर येथे होते त्यानी ख्रिश्चन कॉलेजमध्ये येऊन 'तरुण महाराष्ट्र मडळास' भेट द्यावी व आमच्या 'अभिनव विचारमाला' मासिकाच्या खास अकावर आपला अभिप्राय नमूद

करावा अशी त्यास विनती करण्यात आली. त्यानी अकाचे अंतर्बाह्य स्वरूप पारखून अभिप्राय दिला व सदर अकातील कवि, चित्रकार व लेखक भविष्यकाली मराठी वाङ्मयाची चांगली सेवा करतील असे भविष्य वर्तविले तात्यासाहेबाचे हे शब्द अक्षरशः खरे ठरले आहेत !

( २ ) उज्जयिनीच्या समेलनात काव्यगायनास खूप वाव होता व तरुण मालव-कवि यानी आपल्या सुरेल आवाजाने व भावपूर्ण काव्यानीं वातावरण निःशब्द केले. रात्रीच्या त्या कार्यक्रमप्रसगी तात्यासाहेबानी आपल्या दोन कविता म्हटल्या. ॰॰नेनन। भूमिका थोडक्यात सागून गाभीर्याचा ताण कमी करून वातावरणात त्यानी खेळकरपणा निर्माण केला

( ३ ) त्या समेलनात चौदा वर्षांचा एक बालकवि व्यासपीठाजवळ जाण्यासाठी घुटमळत होता त्यास वाट मिळेना तात्यासाहेब उभे राहिले व त्यास जवळ बोलावून कविता म्हणण्यास त्यानी त्यास उद्युक्त केल कवीची उची चार फूट, डोक्यावर पिवळ्या रगाची पगडी, धीर घेपून कवीने कविता म्हटली तात्यासाहेबानी टाळी वाजविली समेलनानतर छायाचित्राच्या प्रसगी तात्यासाहेब बालकवीस विसरले नाहीत खुर्च्यांच्या रागात मध्यभागी हे कवि विराजमान झाले !

( ४ ) १९४५ च्या नोव्हेंबरमध्ये राजोधक कै द वि आपटे याच्या पुण्य- ॰॰ भा. इ स मडळाच्या सभागृहात कार्यक्रम होता. अध्यक्ष म्हणून श्रीमत मालोजीराजे निबाळकर, अधिपति फलटण, याची योजना झाली होती. सदर प्रसगी तात्यासाहेबानी प्रास्ताविक भाषणात म्हटले, 'सस्थानिक म्हटला की त्याला एक तरी व्यसन असावयाचेच ! आजचे नियोजित अध्यक्ष श्रीमत राजे निंबाळकर यानाहि एक जबरे व्यसन आहे ' श्रोत्याची उत्सुकता वाढली. तात्यासाहेबानी पुढे म्हटले, 'आजच्या अध्यक्षाचे व्यसन विद्याव्यसन होय ! '

( ५ ) १९४६ मध्ये कोकणच्या इतिहासाची साधने क्रमशः खण्डशः प्रसिद्ध करण्याचे मी निश्चित ठरविले. पहिल्या पुस्तकाची तयारी झाली, पण आर्थिक अड चणी ॰ॊ॰ा॰ ा येईनात. त्याच्या यशोदा-चिंतामणि-निधीकडे धाव घेतली. तात्यासाहेबाना कोकणाबद्दल प्रेम आणि आम्च्याबद्दल आदर त्यानी यशोदा चिंतामणि निधीचा सक्रिय पाठिंबा जाहीर केला पुस्तकाच्या प्रसिद्धीनतर तात्यासाहेबाच्या सहीचा चेक हाती आला तात्यासाहेबानी स्वतःच्या निधीतून पुरस्कार केलेले माझे पुस्तक 'आंग्रेकालीन अष्टागर ' हे त्याच्या हयातीतले शेवटचे ठरले. त्यावर अभिप्राय देण्याचा हेतु त्यानी प्रकट केला होता; त्या मानास सदर पुस्तक आता अतरले; पण अभिप्राय देण्याचा विचार प्रकट केला होता, हाच अभिप्राय सामान्य नव्हे !

❁

## पु. शं. पतके

**(चिटणीस, महाराष्ट्र मंडळ, दिल्ली व डालमिया शेठजींचे खासगी कारभारी, दिल्ली)**

(१) तात्यासाहेब हे बृहन्महाराष्ट्र चळवळीचे जनक होत. १९२५ मध्ये कानपूर येथे कॉंग्रेस व हिंदुमहासभा यांची अधिवेशने एकाच वेळी भरलेली होती. त्या संधीचा फायदा घेऊन तात्यासाहेबांनी महाराष्ट्राबाहेरील महाराष्ट्रियांच्या विस्कळित चळवळीला संघटित स्वरूप देऊन बृहन्महाराष्ट्र मंडळ या संस्थेस जन्म दिला. त्याच संस्थेने पुढे आतापर्यंत पंधरा अधिवेशने पार पाडून बृहन्महाराष्ट्रसंघटनेची ज्योत तेवत ठेवली. [illegible] मंडळाचा चिटणीस या नात्याने गेली नऊ वर्षे या चळवळी-संबंधी ज्या ज्या वेळी मी [illegible] गेलो त्या त्या प्रसंगी त्यांनी आस्थेने सर्व चौकशी करून योग्य मार्गदर्शन केले हे कृतज्ञतेने नमूद करणे मी माझे कर्तव्य समजतो.

(२) गतवर्षी [illegible] ' टाइम्स ऑफ इंडिआ 'च्या एकंदर धोरणावर 'केसरी'[illegible] कडक टीका केली [illegible]. शेठ डालमिया यांच्या हाती हे वृत्तपत्र येऊन इतके [illegible] धोरण का असावे अशी त्यांनी शंका व्यक्त केली होती. तात्यासाहेब केळकरांच्यासारख्या पुढाऱ्यांनी ही शंका प्रकट करताच मला डालमिया [illegible] त्यांना भेटून खुलासा करण्यास [illegible]. त्या वेळी मी पुण्यास [illegible] तात्यासाहेबांनी शेठजींची सर्व बाजू ऐकून घेऊन त्याप्रमाणे केसरीत खुलासाहि केला. राष्ट्रसंघ बंद झाल्यामुळे [illegible] बारा वर्षांची नोकरी सोडून मी डालमिया [illegible] विनंतीवरून [illegible] गेलो होतो, व याच सुमारास मला नव्या राष्ट्रसंघाच्या नोकरीचे निमंत्रणहि आले होते. तेव्हा मी वरील भेटीचा फायदा घेऊन तात्यासाहेबांचा सल्ला विचारला व त्यांनी मला जो उपदेश केला तो या [illegible] सर्वांना कळल्यास तात्यासाहेबांचा महाराष्ट्राभिमान, दूरदृष्टि व व्यवहार्य धोरण समजून येईल. ते म्हणाले, "अहो, राष्ट्रसंघात तुम्ही गेला नाहीत तर काही अडणार नाही. तुमच्याऐवजी पुष्कळ हिंदी व महाराष्ट्रीयहि तेथे जाऊ शकतील, पण मारवाड्याच्या घरात शिरलेला महाराष्ट्रीय एकदा बाहेर आला तर पुनः तेथे महाराष्ट्रियांचा शिरकाव होणे अशक्य आहे. तुमची हल्लीची जागा हा बालेकिल्ला आहे. त्यातून तुम्ही महाराष्ट्रियांचे पुष्कळ हित करू शकता. पैशाचा प्रश्न म्हणाल, तर राष्ट्रसंघाने तुम्हाला जरी जास्त पैसे दिले, तरी अमेरिकेसारख्या ठिकाणी ते तुम्हाला पुरणार नाहीत. माणसाचे धन तो जितकी रक्कम शिल्लक टाकू शकतो त्यावर मोजणे योग्य आहे, मिळवतो किती यांच्यावर नाही. तिसरी गोष्ट अशी की, लवकरच ब्रिटिशांचे राज्य खलास होणार आहे. तेव्हा विलायतेचा मोहहि आजच्यासारखा पुढे टिक-

णार नाही." यानतर त्यानी डालमियाशेठसारख्या प्रथमश्रेणीच्या धनाढ्याजवळ राहून महाराष्ट्राचे, महाराष्ट्रीय सस्था, व्यक्ति व व्यापाराचे कसे हित करता येईल यासबधी आपले थोर विचार मनमोकळेपणे व्यक्त केले तात्यासाहेबानी दिलेला सल्ला मी [illegible] मान मानून चाललो आहे व आज या गोष्टीस वर्ष होत आले तरी त्यातील प्रत्येक शब्द माझ्या कानात अद्याप घुमत असून त्याची सत्यता पटत आहे



## द. गो. दीक्षित

( शिक्षक, हायस्कूल, वसई )

( १ ) मी धुळें येथील गरूड हायस्कुलात सरकारी नोकरीवर असता, "राजा रविवर्मा याची चित्रकला" या नावाचा एक लेख [illegible] प्रसिद्ध करण्यासाठीं पाठविला होता तो तात्यासाहेबाना विशेष पसत पडल्यामुळे तो केसरीकडे पाठविल्याबरोबर, त्याचें स्वतःचे पत्र मला पुढे [illegible] आले :—

श्री केसरी—मराठा ऑफिस,
ता १०-८-३०

सा. न. वि. वि — आपला 'राजा रविवर्मा याची चित्रकला' हा लेख पोहोंचला तो चागल्या चिकित्सक बुद्धीने लिहिला असल्यामुळे मला तो फार आवडला. तरी मी तो परत न करता शक्य तितक्या लौकर केसरीत घालीन आपल्यासारख्या चिकित्सकाचे अशा प्रकारचे लेख वाचून, इतरानाहि जर तसेच सुदर लेख लिहिण्याची बुद्धि झाली, तर त्यात मला आनदच वाटेल. कळावें.

— नरसिंह चितामण केळकर

या पत्रात लिहिल्याप्रमाणें तात्यासाहेबानी तो लेख लगेच केसरीच्या तीन अकात ओळीने प्रसिद्ध केला व बक्षिसादाखल एक पुस्तकहि मला पाठवून दिले.

( २ ) मी त्याना एकदा असे विचारले की, लो. टिळकानी काकासाहेब खाडिलकराना व वासुकाका जोशाना अनुक्रमे नेपाळात व अफगाणिस्तानात कांहीं वर्षें राजकीय चळवळ करण्यासाठी म्हणून पाठविले होते, त्या बाबतीत आपल्याला काय माहिती आहे ? कारण सामान्यतः लोकाची समजूत अशी आहे कीं, या दोघाना तिकडे पाठविण्यात लोकमान्याचा हेतु त्याच्या करवी नेपाळच्या राण्याला व अफगाणिस्तानाच्या अमिरालाहि हिंदुस्थानावर स्वारी करण्याची चिथावणी देण्याचा होता, व अशी स्वारी त्यानी केली, म्हणजे ब्रिटिश सरकार आयतेच

पेचात सापडून त्यामुळे स्वातन्त्र्यप्राप्तीचा आपला मार्ग सुलभ होईल अशीहि त्याची खात्री होती. तरी या बाबतीत आपले काय मत आहे ? तेव्हा ते म्हणाले, "या प्रवादात फारसे तथ्य नाही कारण माझ्या माहितीप्रमाणे, त्या दोघाना लोकमान्यानी जे जिकडे पाठविले होते, ते जागतिक राजकारणासबधी व्यापक दृष्टि ( Broad outlook ) त्याना प्राप्त व्हावी, म्हणूनच होय कारण स्वातन्त्र्य-प्राप्तीच्या कामी बाहेरच्या सत्ताविशाची आपल्याला फारशी मदत होण्याजोगी नाही, हे इतराप्रमाणेच लोकमान्यानीहि कळून चुकले होते " [illegible] यांच्या या उत्तरावरून मोठ्या लोकाच्या राजकीय हेतूविषयी सामान्य लोकात कित्येक वेळा कसे निराधार प्रवाद प्रचलित होतात, ते वाचकाना कळून येइल

( ३ ) त्यानतर मी त्याना, त्यानी लिहिलेल्या टिळक-चरित्राविषयी काही प्रश्न विचारले. कारण या चरित्रात टिळकाच्या खाजगी जीवनाची माहिती जितकी सूक्ष्म व विस्तृत यावयास पाहिजे होती, तितकी ती आली नाही, असे अनेक वाचकाप्रमाणेच माझेहि मत होते म्हणून "तुम्ही टिळकाविषयी आणखी काही माहिती, त्याच्या चरित्रात न आलेली अशी दुसरीकडे कोठे प्रसिद्ध करणार आहा काय ?" असे मी त्याना विचारल्यावर ते म्हणाले, "त्याचा शेवटचा म्हणजे नागपूर-वऱ्हाडकडे त्यानी आपल्या आयुष्याच्या शेवटी जो जगी दौरा काढला होता, त्या दौऱ्यासबधी व त्याच्या खाजगी आयुष्यासबधीहि मी त्याच्या चरित्रात शक्य तितके सविस्तर विवेचन केलेच आहे. त्यापेक्षा [illegible] जास्त काही लिहिण्याजोगे आहे, असे मला वाटत नाही "

( ४ ) त्यानतर माझ्या या राजकारणविषयक पृच्छा ऐकून, ते मला म्हणाले की, "तुम्हाला महाराष्ट्राच्या राजकारणाबद्दल बरीच जिज्ञासा व आस्था दिसते. मग तुम्ही स्वत.च का राजकारणात पडत नाही ? तुमच्यासारखे तरुण व उत्साही लोक जर राजकारणात पडले, तर त्यापासून माझ्यासारख्याना आनदच होईल " तेव्हा मी उत्तर दिले, "माझी सापत्तिक परिस्थिति अशा कामाला विशेष अनुकूल नाही आपल्याप्रमाणे एखादे वर्तमानपत्र माझ्या हाताशी असते किंवा आपल्या अथवा लो टिळकाच्या मुलाइतकी जर आनुवशिक लोकप्रियतेची किंवा संपन्नतेची बैठक मला लाभली असती, तर मी खात्रीने राजकारणात पडलो असतो " हे ऐकून ते म्हणाले, "माझ्या मुलानी तरी राजकारणात असे विशेष काय केले आहे ? आता यशवताने व काशिनाथानेहि राजकारणविषयक काही लेख लिहिले आहेत व यशवताने तर काही ऐतिहासिक पुस्तके व कविताहि प्रसिद्ध केल्या आहेत, नाही असे नाही पण ते दोघेहि राजकारणात विशेष चमकले नाहीत." त्यावर मी त्याना म्हणालो की, "आपल्याइतके जरी ते राजकारणात चमकले नसले तरी निदान त्यानी आपले नाव न घालविता आपले वाङ्मयसेवेचे

उदात्त व्रत पुढे चालू ठेवलें आहे हे तरी काय थोडे झाले ? कारण आपल्यासारख्या मोठ्या लोकांची मुले बहुधा नादान निपजतात, असाच आजपर्यंतचा अनुभव आहे, परंतु आपली मुले या नियमाला अपवाद अशी असून, त्यांनी आपली परंपरा कायम ठेवली आहे, हे आपल्याला खरोखरीच भूषण आहे मला वाटते, अशी परंपरागत . . . . उदाहरणे पंडित मोतीलाल नेहरू, दादासाहेब खापर्डे यांच्यासारख्यांच्या घराण्यातच काय ती आपल्याला सापडतील, बाकी इतर ठिकाणी त्याचा बहुधा अभावच दिसून येईल " तेव्हा तात्यासाहेब खूप हसून म्हणाले, "तुमच्या या बोलण्याचा अर्थ मला तरी असा दिसतो की, एक माझी मुले तरी खरोखरीच माझी परंपरा चालविणारी नसावी किंवा मी तरी नेहरू, खापर्डे यांच्या पंक्तीला बसण्याइतका मोठा नसलो पाहिजे, त्याशिवाय तुमच्या बोलण्याची मला बरोबर संगति लावताच येत नाही ! " हे त्यांचे उत्तर ऐकून मी मोठ्याने हसलो व अशा रीतीने त्यांची व माझी ही विनोदप्रचुर मुलाखत समाप्त झाली.



## पां. मो. गोगटे

### ( जामसडे, जि. रत्नागिरी )

( १ ) तात्यासाहेब यांनी आमच्या गावी १२ वर्षांच्या मक्त्याने घर घेतले होते. त्यामध्ये ते दरवर्षी काही दिवस तरी बहुधा येत असत. सुमारे १९४० पासून प्रकृति थकल्यामुळे त्यांना इकडे येणे शक्य झाले नाही. त्यांच्या गैरहजेरीत सदर वाड्याची व्यवस्था मी पहात असे. तसेच ते येथे असत त्या मुदतीत त्यांना लागणारे जिन्नस वगैरे आमच्यामार्फत पैदा करीत असत. त्यांचा आमचा घरोबा फार असे व ते कुटुंबियाप्रमाणे आमची आस्थेने विचारपूस करीत असत ते येथे असल्यावेळी मिरजेचे महाराज त्यांजकडे आले होते त्या वेळी त्यांनी मुद्दाम त्यांना आमच्याकडे आमची कलमी आंब्याची बाग वगैरे पाहण्याकरिता आणले होते. बाग पहात असता महाराजांनी सदर जागेस एकूण खर्च किती झाला व त्यामध्ये नफा काय होतो असा प्रश्न केला. आमच्याकडे बागेचा जमाखर्च नव्हता व त्या वेळी आकडेवारीने सांगणे मला मुळीच शक्य नव्हते ही अडचण तात्यांनी नेमकी ओळखून त्यांनी याचे उत्तर मी देतो असे सांगून म्हणाले, " ज्याने अगदी ओसाड जागेचे नंदनवन केले व सर्व लोकांस कलमी आंब्यांच्यासारख्या बागा करणे फायदेशीर आहे हे दाखवून दिले, त्याच्या कल्पकतेची व स्वतःच्या मेहनतीची तुम्ही काय किम्मत धरता ? सदर बाबतींत नुसत्या झालेल्या जमाखर्चाच्या रकमेवरून हिशेब करणें चूक ठरेल " असे सांगून त्यांनी माझी बाजू सावरली.

( २ ) तात्यानीं वाडी घेतली त्यास त्याच्या मर्जीप्रमाणे त्यानी अगण वगैरे तयार करून घेतले. त्या वेळीं अगणाचे दगड तात्यानी नुसत्या नजरेने चारहि कोनावर बसवून घेतले व मागाहून कामकऱ्यानी काटकोन लावून पाहता अगदीं बिनचूक आढळले !

( ३ ) त्याजकडे आम्ही काही सामान वगैरे देऊन इसम पाठविला तर त्याच्या डोकीवरून ओझे उतरण्यास त्यास ते स्वतः मदत करीत व उन्हातून आल्यास गूळपाणी देण्याची तजवीज करीत. त्या वेळी ओझेवाल्याची अगर उन्हांतून आलेल्या इसमाची काय स्थिति होते याची कल्पना त्याच्या चेहेऱ्यावर दिसे !



## म. ग. सोमण
### ( चिपळूण )

आपला मोठेपणा जगात दिसावा व इतरास आपल्यापेक्षा किंचित् तरी कमी समजावें अशी प्रवृत्ति मोठ्या माणसातहि असते व त्यासाठीं ते लोक प्रयत्नहि करीत असतात; पण ही वृत्ति तात्यासाहेब केळकराच्यामध्ये अणुमात्रहि नव्हती. जें काहीं असेल ते स्पष्ट व जाहीरपणे ते बोलून दाखवीत. याचे एक उदाहरण खाली देतो. रत्नागिरी जिल्हा परिषदेचें पहिले अधिवेशन तात्यासाहेब याच्या अध्यक्षतेखाली १९२२ साली रत्नागिरी येथे झाले त्या वेळी रत्नागिरी जिल्ह्याचे पुढारी कै. बाबासाहेब नानल वकील हे स्वागताध्यक्ष होते. त्यांचें भाषण आटोपून ते खाली बसले. नतर सूचना व अनुमोदन झाल्यानतर अध्यक्ष या नात्याने भाषण करण्यासाठी तात्यासाहेब उभे राहिले. नित्याप्रमाणें अध्यक्ष नेमल्याबद्दल त्यानी सर्वांचे आभार मानून भाषणास सुरुवात व्हावयाची; परतु तसे करण्यापूर्वी कै. बाबासाहेब नानल याच्याबद्दल तात्यासाहेब यानी सांगितले कीं, “ बाबासाहेब नानल यास प्रख्यात वकील म्हणून सर्वजण ओळखतात हे मला माहीत आहे. त्यानी वकिली सुरू करण्याच्या सुमारास त्याच्या लायकीची नेमकी पारख करून लोकमान्यांनी त्याना पुण्यास बोलाविले व ‘मराठा’ पत्र चालविण्याविषयीं विचारलें. काही दिवस बाबासाहेबानी ते काम केले असावे; परतु बाबासाहेब हे पुढे रत्नागिरीस आले व वकिली करू लागले. ते जर पुण्यासच असते तर आजचा देखावा तुम्हाला निराळा पाहावयास सापडला असता; म्हणजे केसरीकार या नात्यानें बाबासाहेब आज अध्यक्ष असते व मी कोठे तरी वकिलीचा अगर दुसरा कोठला तरी धदा पत्करून राहिलो असतों ! एवढी बाबासाहेबांची योग्यता होती व ती लोकमान्यांनी जाणली होती. हे कोणास माहीत नसेल म्हणून आज मी मुद्दाम याचा उल्लेख करीत आहें. बाबासाहेब गेल्यानंतरच मला लोकमान्यांनीं

बोलाविले व पुण्यास राहून मीं 'केसरी' चालविला व म्हणूनच मी आज अध्यक्ष या नात्याने आपल्यापुढे उभा आहे." दुसऱ्याच्या गुणाचा जाहीरपणे व अंतःकरण-पूर्वक उल्लेख करण्याने तात्यासाहेबाचे थोर व उदार अंतःकरणच दिसून आले



## नानासाहेब भिडे

### ( पुणेंवाडी, मुंबई )

( १ ) क्रिकेटर [illegible] देवधर याच्या सत्कार समारंभाचे नियोजित अध्यक्ष डिमेलोसाहेब हजर राहू शकले नाहीत म्हणून त्या जागेवर तात्याची योजना झाली "पाणपोईवर पाणी पीत असेल तर तो माझा पिता हरिश्चंद्र नव्हे" असे रोहिदासाने [illegible] भाषणात विनोद नसेल तर ते तात्याचे नव्हे! तात्या म्हणाले, "क्रिकेटरच्या स्वागत समारंभाचा अध्यक्ष होण्याची माझी लायकी मी तपासू लागलो तेव्हा मला आठवले की, मीहि [illegible] असताना मोडक्या फळीने चेंडू उडविलेला नाही असे नाही, व पुढील आयुष्यातहि देवधरासारख्या क्रिकेट पटूचा खेळ मी कॉलेजच्या तंबूतून केव्हा तरी [illegible] आहेच की!"

गौरव झाला, भाषणे झाली, देवधरानी क्रिकेटमधून वस्तुतः निवृत्त व्हावे की न व्हावे ह्याबद्दलहि बरीच [illegible] भाषण संपवून तात्या घरी जाण्यास निघाले; एवढ्यात त्यांची व माझी दृष्टादृष्ट झाली मी म्हटले, "तात्यासाहेब, देवधर रिटायर होतो म्ह[illegible] माझे म्हणणे आपण त्यास री-टायर करू शाब्दिक वाद कशाला?" हा श्लेष तात्याना इतका आवडला की, "समारंभ आटोपण्यापूर्वी तुम्ही बोलला असता तर मी सभेत तसे जाहीरच केले असते," असे कौतुकाने म्हणत तात्यानी मला [illegible] दिला गुणीच गुणाचे चीज करू शकतो; ह्यास सौजन्य लागत

( २ ) तात्यांनी सांगितलेली गोष्ट ते म्हणाले, "जुनी गोष्ट आहे. मी एका पुनर्विवाहाला गेलो होतो, पानसुपारीला म्हणून प्रघात नवीन म्हणून ह्या गोष्टीची साहजिकच चर्चा झाली ब्रह्मवृंदा[illegible] बातमी गेली व त्यांनी आमच्या घरावर बहिष्कार घातला माझे वडील तेव्हा हयात होते व दोन दिवसावर आजोबाचें श्राद्ध आलेलें आता श्राद्ध टळणार अशी माझ्या वडिलास शंका येऊन वाईट वाटले रात्री मी स्वतःशीच विचार केला व आमच्या गुरुजाग उदईक माझ्या प्रायश्चित्ताची तयारी करण्याविषयी निरोप पाठविला सशास्त्र प्रायश्चित्त घेतले वडिलाचा मार्ग श्राद्धाकरिता मोकळा झाला त्याना समाधान वाटले त्याच्या समाधानाकरिता मला थोडी मुरड घालावी लागली 'यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं

माचरणीयम् ' म्हणतात; मग इथे तर 'जनक-विरुद्धम्' अशी स्थिति. " त्याच्या उलट अलीकडे काही लोकास जनकविरुद्ध वागण्यात 'भूषणं न तु दूषणम्' असे वाटते "कालाय तस्मै नम."



## भा. वा. धडफळे

( पुणें )

( १ ) १९१७ साली एकदा दुपारी गायआळीतून आम्ही जात असताना कै. राम गणेश गडकरी 'मास्तरना' केळकराकडे जाण्याची लहर लागली. दारात शिरताच त्यानी मोठ्या आवाजात तात्यांची चौकशी सुरू केली. तात्यासाहेबांची ती वेळ म्हणजे नेहेमीच्या वामकुक्षीची जेवण सपवून नुकतेच ते अथरुणावर जाऊन पडले होते बाहेरच्या खोलीत गडकऱ्याशी त्यांचे चिरंजीव काशिनाथपन बोलत होते हेतु हा की, तात्यांची झाप तर मोडू नये व गडकऱ्यानी तात्याना भेटल्याशिवाय तर जाऊ नये बाहेरची गडबड ऐकून तात्यासाहेब जागे झाले व त्यानी काशिनाथपतास सागितले की, "अरे, गडकरी आले असतील तर मला माझा नित्यक्रम मोडलाच पाहिजे त्याना तात्डतोब आत आण " झाले गडकरी आत गेले व दोघेहि जण तब्बल दोन तास गप्पा मारीत बसले. तात्यांचे "तोतयाचे बड " हाच गप्पांचा मुख्य विषय होता गडकऱ्यानीहि आपल्या "राजसन्यासा 'ची त्रोटक हकीकत त्याना सागितली ही हकीकत सागताना नाटकाच्या भाषेचा प्रश्न निघाला तात्यासाहेबानी पुष्कळ मार्मिक सूचना करून मराठी बखरीची दोन-तीन जाडी पुस्तके आपल्या ग्रंथालयातून काढून गडकऱ्याच्या हवाली केली व त्याचा अभ्यास करून नाटकाची भाषा ठरवावी असे सुचविले त्या बखरी बरोबर घेऊन व दुपारचा चहा तेथेच घेऊन आम्ही चारच्या सुमारास घरी जेवणास तातडीन निघालो! कै गडकऱ्यानी त्या बखरीतूनच आपल्या "राजसन्यासा"ची भाषा बरोबर उचलली व पुढे कित्येक महिन्यानी ते ग्रथ तात्यासाहेबाकडे साभार परत पाठविले.

( २ ) कै. गडकऱ्याच्या निधनानिमित्त पुण्यात किर्लोस्कर नाटकगृहामध्ये तात्यासाहेबांच्या अध्यक्षतेखाली एक प्रचड सभा झाली. मी गडकऱ्याचा मित्र म्हणून त्या सभेत बोलावें असे ठरले. त्याच्या अगोदर 'डिबेटिंग क्लब' शिवाय मी सभेत कधीच भाषण केलें नव्हते सभेस जमलेला विद्यार्थ्यांचा एवढा प्रचड समुदाय पाहून मी प्रथमच घाबरलो व आपण जे बोलणार ते 'पुणेकर' मान्य करतील की नाही ही शका वाटू लागली. मी माझे भाषण लिहून काढिले होते व ते श्री अत्रे यास आगाऊ दाखविलें व त्यानी मला उत्तेजन दिलें, म्हणून मी बोल-

ण्याचा निश्चय केला ठरल्याप्रमाणे माझे नाव अध्यक्ष तात्यासाहेबांनी पुकारलें. मी अध्यक्षाच्या टेबलाजवळ जाऊन उभा राहिलो. समोरच ओळखीचे कांहीं विद्यार्थी-मित्र 'अरे, हा तर आपला भाक्या' अशा हसतमुखाने माझ्याकडे निरखून पहात आहेत असे दृश्य दिसले झाल। "सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति" अशा स्थितीत मी एक-दोन मिनिटे [illegible] उभा राहिलो। ते पाहून तात्यासाहेब मदतीला धावले व मला म्हणाले, "तुम्ही भाषण लिहून आणलय का? असल तर तेच वाचा" मी गोंधळून बावरून गेलो होतो. मग मला भाषण लिहून आणल्याची आठवण झाली व [illegible] कागद काढून वाचण्यास सुरवात केली नतर वीर [illegible] १०-१२ मिनिटे बोललोहि। पण मी आता [illegible] बोलावयास उठलो म्हणजे तात्यासाहेबांची मला आठवण होते।

( ३ ) कै. पंडित मालवीय यांच्या अध्यक्षतेखाली हिंदुमहासभेचे पुण्यातील १९३७ चे अधिवेशन फारच मोठे झाले व गाजलेहि पण मुंबई प्रांतिक हिंदुसभे-तर्फे [illegible] पुरोगामी मंडळींनी पुढाकार घेऊन अस्पृश्यता-निवारणाबद्दल एक ठराव करून तो विषयनियामक [illegible] चर्चिला जावा म्हणून पुण्यास अगोदर [illegible] आमचा हा ठराव पुण्याच्या मंडळींना सोसणारा नव्हता कारण ठरावाची भाषा फारच कडक होती पुण्याच्या सूत्रचालकांनी त्यावर "नियमबाह्य" हा शिक्का मारून आम्हास तो ठराव परत पाठविला त्यावर कै. डॉ उदगांवकर हे बॅ जयकरास भेटून त्यांनी त्यांचा सल्ला विचारला [illegible] उद्देश व नियमावली वाचून बॅ जयकरांनी असे सांगितले की, ठरावातील एकदर भाषेवरून तो नियमात बसू शकणार नाही परंतु ठरावाची भाषा सुधारून व थोडाशी बदलून आमच्या 'मत्रानुरूप' तो नियमात आणता येईल. त्यांनी आम्हांस दुसरा एक ठराव तयार करून दिला व सांगितल, जर हा दुसरा ठराव नियमबाह्य ठरविला गेला तर मी स्वत. येऊन तो ठराव नियमबाह्य होऊ शकत नाही हें प्रतिपादन करण्यास कचरणार नाही विषय नियामक कमिटीपुढें हा दुसरा ठराव सभेच्या खुल्या अधिवेशनाच्या आदल्या दिवशी [illegible] आला श्री भोपटकर, माटे, बॅ. अग्रवाल यांनीहि त्या ठरावास "[illegible]" म्हणून हरकत घेतलीच! अध्यक्ष या नात्यानें [illegible] त्यावर "नियमबाह्य" म्हणून आपले 'रूलिंग' दिले हे सर्व होतें न होते इतक्यातच बॅ जयकर सभेमध्ये उपस्थित झाले पंडितजींनी आग्रहपूर्वक त्यावर त्यांचे मत विचारलें पहिल्याप्रथम बॅ जयकरांनीं अध्यक्षांनी रूलिंग दिल्यानंतर बोलण्याचें नाकारलें परंतु पंडितजींनीं फारच आग्रह केल्या वरून ते त्यावर बोलावयास उठले. बॅ [illegible] प्रभावी बोलणें मी अजूनपर्यंत कधींच ऐकले नाही. त्यांचें वक्तृत्व अगदी शिगेस पोहोचलें होते त्यांनीं सर्व सभा एकदम जिंकली व सभेचा एकंदर नूर पालटला! हे दृश्य दिसतांच

तात्यासाहेब अध्यक्षांच्या रूलिंगचा मान राखण्यास व बॅ. जयकराचें म्हणणे सयुक्तिक व नियमास धरून अतएव ग्राह्य म्हणून दोघांचा समन्वय करण्यास एकदम फार जोराने पुढे सरसावले व उत्तम भाषण करून त्यानी अशी तोड सुचविली कीं, डॉ कुर्तकोटि, राधाकुमुद मुकर्जी, अस्पृश्याचे दोन प्रतिनिधि व इतर तीन बडी मडळी मिळून त्यांनी एक अशाच धर्तीचा नवा ठराव तयार करून उद्याच्या खुल्या अधिवेशनात आणावा व तो ठराव खुद्द अध्यक्षानीच सभेपुढे माडून पसार करून घ्यावा. त्याच्या या समयसूचकतेमुळे विषय-कमिटी-पुढील तो पेचप्रसग टळला व खुल्या अधिवेशनात स्वतः पडितजी व डॉ. कुर्तकोटी ह्यानी बॅ. जयकरास मान्य असलेला तो ठराव सभेपुढें माडला व तो पसारहि झाला तात्यासाहेबाच्या 'सुवर्णमध्याने' अखेर त्या अडचणीच्या प्रसगावर मात केली!



## गो. शां. कोवाडकर

### ( डॉक्टर, बेळगांव )

( १ ) लोकमान्य टिळक गेले. गाधी-युगाची सुरवात झाली. बहिष्कार-त्रयींचें रणशिंग फुकले गेले. विद्यार्थीवर्गाने शिक्षणाची पर्वा न करता शाळा व कॉलेजे ओस पाडण्यास सुरवात केली. अशा वेळी अभ्यासाकडे आमचे लक्ष लागेना त्या वेळी मी पुण्याच्या मेडिकल स्कूलमध्ये होतो. पुढारी-वर्गात मतभेद होते. काय करावे ते आम्हाला समजेना. कोणाचा सल्ला घ्यावा हेहि कळेना. शेवटी तात्यासाहेब हेच योग्य तें मार्गदर्शन करतील असे आमचे सर्वानुमते ठरलें. तात्यासाहेब म गाधीना भेटून पुण्याला नुकतेच आले होते. यापूर्वी आम्ही पुण्यातील इतर पुढारी मडळींना भेटून आलो होतों आमचे समाधान झाले नव्हते प्रत्येकानें आम्हाला मार्गदर्शन करण्याऐवजी स्वतःच्या मताचे एकएक भले मोठे व्याख्यानच आम्हाला ऐकविले अखेर आम्ही तात्यासाहेबाकडे गेलों. सुरवातीलाच आम्हाला आम्ही योग्य ठिकाणी आलो असे वाटले. अपत्यप्रेमानें आमचे त्यानी स्वागत केले राजकीय परिस्थितीमुळे आमच्यावर होत असलेले परिणाम व गोंधळलेली मनःस्थिति त्याच्यासमोर आम्हीं ठेवली व · :, ' योग्य तो मार्ग दाखविण्याची त्यास विनती केली. त मोठ्या आस्थेने व तळमळीने म्हणाले, “ आजचा विद्यार्थीवर्ग हा भावी कालाचा पुढारीवर्ग आहे. आजच्या राजकारणाचा प्रश्न जर विद्यार्थ्यांच्या त्यागावाचून सुटत नाही असे तुम्हाला वाटत असेल तर जरूर त्याप्रमाणे तुम्ही वागा. शाळाकॉलेजावर बहिष्कार घालणे व पुढे काहीं कार्य न करणे एवढेच कार्य जर तुम्हाला करावयाचें असेल तर तें देशकार्य होईल कीं काय याचा अवश्य विचार करा. आपला देश परकीयाच्या गुलामगिरीतून सोडविला

पाहिजे याबद्दल दुमत नाहीं; पण बहिष्कार घालून विद्यार्थ्यांनीं पुढे काय करावें व त्याना काय करता येईल याचा निर्णय न घेता, फक्त त्यानी शिक्षणसस्था बद पाडल्या एवढेच दाखवावयाचें असेल तर हे व्यवहाराला व तर्काला सोडून होते, असें मला प्रामाणिकपणाने वाटतें. तुम्हाला विद्यार्जनापेक्षा देशकार्य अधिक महत्त्वाचे वाटत असेल व तुम्ही हे कार्य केले नाही तर देशाचे मिळणारे स्वातन्त्र्य दूर जाणार आहे असे आपणास वाटत असेल तर तुम्ही तसे खुशाल करावे मात्र पुढारी सागतात म्हणूनच अगर पुढारी मदत करणार आहेत या कल्पनेने मात्र कोणतेहि कार्य करू नका. नाहींतर उद्या असे म्हणाल की, आम्ही पुढाऱ्याचे एकून आमची 'करिअर' बाद केली व आयुष्यात भरून न येणारे असे नुकसान झाले "

थोडा वेळ आम्ही स्तब्ध बसलो. भावनावश होऊन आम्ही काय करणार होतो हे आम्हाला समजले. आम्हाला आमचें उत्तर मिळालें. "आणखी काहीं विचारावयाचे आहे ?" असा प्रश्न तात्यासाहेबाकडून आला 'काही नाही' असें आम्ही उत्तर दिले. एकदरीत जणू काय भेटीला जाण्यापूर्वी प्रश्नमालिका पाठविली होती व तिचे उत्तर तात्यासाहेबानी तयारच ठेविले आहे, अशा तऱ्हेने ते उत्तरें देत होते. इतर पुढाऱ्याचा निरोप घेत असताना आम्ही नमस्कार करूनच घेत होतो; पण तात्यासाहेबाचा निरोप घेण्यास आम्ही उठलो तेव्हा आम्हाला न कळत आमची मान त्याच्यापुढे अति नम्रतेने वाकली !

( २ ) तात्यासाहेब कोल्हापूर राजाराम कॉलेजचे माजी विद्यार्थी त्याना गॅदरिंगकरिता पाहुणे म्हणून विद्यार्थ्यानी बोलाविले त्याच्या व्याख्यानप्रसगी थोडासा अनुचित प्रकार घडला, तरी तात्यासाहेब अगदी शात होते पाहुण्याचे आभार मानण्यात आले, कार्यक्रम सपला तात्यासाहेब आपल्या निवासस्थानीं आले झाल्या प्रकाराबद्दल क्षमा मागावी या इरादाने पुष्कळ विद्यार्थी त्याच्या भेटीला आले झालेला सर्व प्रकार अत्यत खिलाडू वृत्तीने त्यानी घेतला होता असे पाहून विद्यार्थ्यांना मोठे नवल वाटले नतर इतर विषय निघाले दाखले, दृष्टान्त व उपमा यावर चर्चा सुरू झाली तात्यासाहेब म्हणाले, "जो तो आपआपल्या व्यवसायानुसार दाखले देत असतो उदाहरणार्थ, वकील घ्या; तो बोलताना नेहमी कुळ, अशील, कोर्ट हाच शब्दप्रयोग करील. मोटार-ड्रायव्हर आज जेवणाला किती मडळी आहेत असे न म्हणता किती 'सीट' आहेत असे विचारील फार कशाला ? आज माझे आभार मानताना म्हणाले की, 'तात्यासाहेबाचें आजचें व्याख्यान ऐकत असताना द्राक्षरसाचा प्याला मी पीत आहे असे न वाटता मी द्राक्षरसाचे पीपच्या पीप पीत आहे असे वाटले!' त्याच्या जागी मी असतो तर 'प्याला' व 'पीप' या शब्दाऐवजी 'चादीचें रामपात्र' व 'हडा' या शब्दाचा उपयोग केला असता!"



## दत्तात्रय विष्णु परांजपे
### ( मिरज )

( १ ) तात्यासाहेब मिरजेस आल्यावर ते आपले बालपणचे स्नेही कै. गोविंदराव पटवर्धन यांच्याकडेच बहुधा उतरत असत केळकरांचे वडील मिरज संस्थानात नोकर होते ते गोविंदराव पटवर्धनांच्या वाड्यानजीकच्या घरात राहात असत. गोविंदराव व नरसोपंत समवयस्क विद्यार्थी मिरज हायस्कुलात शिकत असत दोघेहि मोठेपणी एकमेकास एकेरी नावानें संबोधीत असत गोविंदरावांच्या तोंडीं नेहमी 'आमचा नरसू' हा शब्द बसलेला पाहून तर मला गमत वाटे. मी एकदा "तुम्ही 'नरसू' म्हणून हाक का मारता" असा त्यास प्रश्न केला असता त्यांनी उत्तर दिले, 'नरसोपंत हे नाव माझ्या तोंडातून येतच नाहीं, त्यास मी काय करू?' गोविंदरावांच्या ठायी नरसोपंताविषयी नितान्त प्रेम होते. लहानपणीच्या नरसोपंताविषयीच्या गोष्टी सांगताना ते रंगून जात त्यांच्या तोंडावर विलक्षण तेज चढे, कधी कधी तर त्यांचे डोळे प्रेमादराच्या अश्रुंनी डबडबत असलेले दृश्य मी पाहिले आहे नरसोपंतांविषयी गोविंदरावांच्या ठिकाणची गाढ निष्ठा, विलक्षण प्रेम व नितान्त आदर पाहून ते 'नरसू' या एकेरी नावाने का संबोधितात हे मला पटे व तसा तो अधिकार चालविण्याचा त्यांचा हक्कच आहे असे माझ्या प्रत्ययास येइ

( २ ) सुमारे वीस वर्षांपूर्वी एकदा मिरज हायस्कूलच्या स्नेहसमेलनाच्या वेळी तात्यासाहेबांचे भाषण झाले कै श्रीमंत बाळासाहेब अधिपति अध्यक्षस्थानी होते. तात्यासाहेबापुढे शाळेचे विद्यार्थी, संस्थानांचे अमलदार व गावांतील प्रतिष्ठित गृहस्थ असा समाज होता हायस्कुलात उपस्थित झाल्यापासून याच इमारतीत आपण शिकलो ना? याच पटांगणात आपण खेळलो-बागडलो ना? आपल्या सवंगड्यांशी याच ठिकाणी आपण चेष्टामस्करी केली ना? अशा तऱ्हेच्या गतकालीन स्मृति त्यांना झाल्या व त्यांचे प्रत्यंतर तात्यासाहेबांनी आपल्या भाषणाच्या सुरुवातीसच काढलेल्या उद्गारावरून आले. केळकर म्हणाले, "आज मी तुम्हापुढे भाषण करण्यास उभा राहिलो असताना मला याची (मजकडे बोट करून) व अध्यक्ष अधिपतीची भीति वाटते. . . त्यांनी आपल्या आयुष्यातील गतगोष्टींचा प्रामुख्याने उल्लेख केला. बी एल्‌एल्. बी. ची परीक्षा पास झाल्याबरोबर साताऱ्यास वकिली करण्यास प्रारंभ केला नंतर शिरोळास आपणास मुनसफची जागा देऊ करण्यात आली होती. मिरज संस्थानांतील एका प्रमुख अधिकाऱ्याकडून मिरजेस तुम्हास संस्थानचा न्यायाधीश नेमावयाचा आहे तरी तुम्ही आपली संमति द्या, असे मला विचारण्यात आले होते. पण त्याच वेळी लो. टिळकाकडून आपणास एक मदतनीस पाहिजे आहे; तेव्हा

तुम्ही पुण्यास या, असे पत्र आले. तेव्हा आपण काय करावे असा प्रश्न माझ्या मनापुढे उभा राहिला. संस्थानातील नोकरी सोडली तरी खानदेशातील नोकरी मिळून निदान सबूजज्ज झालो असतो. पगारहि ७००–८०० रुपये मिळाला असता; पण अतःस्फूर्तीनें मला पुण्यास खेचले. तसेच माझ्या सातान्याच्या मित्रानी मला पुण्यास जाण्याचा सल्ला दिला. माझ्याहि मनामध्ये लेखन-वाचनाची हौस अनिवार. यामुळे मी पुण्यास गेलो व लो. टिळकाचा मदतनीस म्हणून राहिला मला लोकमान्यानीं मदतनीस होण्याबद्दल पाचारण करावे ही माझ्या आयुष्यातील एक विधिघटना नव्हे का? यालाच मी दैव – नशीब – म्हणतो दैववाद व प्रयत्नवाद याविषयीं आपण खूप चर्चा करतो व वाद घालतो; आणि प्रसगी प्रयत्नवादाची सरशी होते; पण मानवी आयुष्यात अशा काही घटना होत असतात की, त्याचा प्रयत्नार्शी बादरायणी सबधहि पोचत नाही त्या घटनास मी दैव मानतो. मला माझ्या दैवानेच हात दिला; म्हणूनच मी पुण्याला गेलो व लोकमान्याचा मदतनीस झालो; व त्याचा सहवास मला लाभला लोकमान्याकडून मला स्फूर्ति मिळाली त्याची गाढ विद्वत्ता, अलोट बुद्धिमत्ता, लोकहिताविषयी तळमळ, देशावरील अढळ प्रेम, कमालीचा स्वार्थत्याग व मुख्यतः त्याचे सच्छील व शुद्धाचरण या त्याच्या अगच्या गुणामुळे ते मला सूर्याचा प्रकाश वाटत त्याच्या चतुर मार्गदर्शनाप्रमाणे मी देशाची अल्पस्वल्प सेवा करीत आलो आहे माझ्याकडून जी काही बरी-वाईट सेवा झालेली असेल त्याचे सर्व श्रेय लो टिळकाना आहे. मी केवळ निमित्त कारण आहे, अशी माझी भावना आहे ”



## गो. म. भिडे

(वकील, अमळनेर)

भोर येथे मी शिकत असताना तात्यासाहेब काहीं कारणास्तव भोरला आले होते व त्यांचा त्या वेळी सरकारी आतिथिगृहात मुक्काम होता मला थोरामोठ्यांच्या स्वाक्षरी व संदेश घेण्याची फार हौस आहे. मला तात्यासाहेब आल्याची बातमी कळतांच तत्क्षणीं माझी वही घेऊन तात्यासाहेबाची सही घेण्यास अतिथिगृहाकडे दौडलो तात्यासाहेबांनी माझ्या वहीत असणारे इतर पुढान्याचे सदेश व स्वाक्षऱ्या चागल्या आस्थेने पाहिल्या व शेवटी वहींत माझ्या आईवडिलाची स्वाक्षरी नसल्याचे माझ्या निदर्शनास आणून मला त्यानी ‘ आधी स्वतःच्या आईवडिलाची सही घे व ती त्यात पाहिल्यावरच मी सदेश लिहीन ’ असें मला निक्षून सागितलें. मला त्या वेळेस फार वाईट वाटले, पण लगेच माझ्या आईची व वडिलांची सही घेऊन मी त्यांच्याकडे गेलों. त्यानी त्या स्वाक्षऱ्या पाहिल्या

तेव्हाच त्यानी मला म्नाभरी दिली. ही आठवण फारच क्षुल्लक वाटेल, पण त्यावरून तात्यासाहेबाना आपल्या मातापितराबद्दल किती आदर व पूज्यभाव वाटत होता हे दिसून येते.



## दामोदर दत्तात्रेय जोशी

### ( आयुर्वियाविशारद, सांगली )

( १ ) टिळक महाविद्यालयाचा मी विद्यार्थी. प्रथम वर्षास इग्रजी विषयाला 'पार्लमेंटरी स्पीचेस' हे पुस्तक लावले होते इग्रजी विषयाला तात्यासाहेब 'प्रोफेसर' लाभले होते ते आठवड्यातून दोन दिवस प्रत्येक दिवशी एक तास याप्रमाणे इग्रजी विषय शिकवीत महाविद्यालयाची वेळ दुपारी २ ते ५ अशी होती. तात्यासाहेब दुपारी २ ते ३ आमचा तास घेत ते विनावेतन स्वखुषीने भर दुपारी आपल्या आवडत्या विश्रांतीलासुद्धा फाटा देऊन आम्हाला शिकवीत, हे आमचे केवढे मोठे भाग्य! त्याचे इग्रजी भाषेवरील प्रभुत्व आम्हा विद्यार्थ्यांना त्या वेळी चागलेच प्रत्ययास आले तात्यासाहेब आपले तास न चुकता घेत हे त्याच्या नि नि ।'। ठळक उदाहरण होय आम्हास नेमण्यात आलेले पुस्तक साधारणत रुक्ष विषयातच गणले जाई; पण तो रुक्ष विषयहि तात्यासाहेब साधा व सोपा करून आम्हा विद्यार्थ्यांचे मन त्याच्या शिकवण्यात तल्लीन करून सोडीत ते अव्वल दर्जाचे प्रा ध्यापक होते

( २ ) तात्यासाहेबानी अनेक सस्थाना देणग्या देऊन आर्थिक साह्य केल्याचे पुष्कळाच्या लक्षात असेल 'यशोदा-चितामणी ट्रस्ट' स्थापन करून त्यातून शिष्यवृत्तीहि चालू केल्याचे सर्वांना माहीत आहे, पण विद्यार्थ्यांनासुद्धा ते प्रोत्साहनार्थ बक्षिसे देत हे फारसे कोणाच्या लक्षात नसेल मी १९३१ साली 'टिळक महाराष्ट्र विद्यापीठा'ची 'आयुर्वियाविशारद' ही पदवीपरीक्षा उत्तीर्ण झालो. तारीख ५ जुलै १९३१ ला आमचा पदवीदान समारभ झाला या प्रसगा आम्हा सर्व पदवीधराना त्यानी स्वतः लिहिलेल्या ग्रथापैकी वीस रुपये किंमतीची पुस्तके बक्षीस म्हणून दिली त्यानी आम्हा सर्वांना विद्यादान देऊन वर हे उपकार केले त्याचे गुरुऋण मात्र आम्ही फेडू शकलो नाही



## बी. एन्. सहस्रबुद्धे

### ( डेक्कन जिमखाना, पुणे )

( १ ) सन १९०८ मध्ये नामदार गोखल्यांची दोन व्याख्याने पुण्यांत रविवारांतील फडके यांच्या दिवाणखान्यांत झाली. दोन्ही व्याख्यानास तात्यासाहेब हजर होते. १९०८ सालासारख्या परिस्थितीत गोखल्यांच्या व्याख्यानास तात्यासाहेब केळकरांनी हजर राहणे व व्याख्यानानंतर बोलणे म्हणजे परम धाष्टर्य. त्या वेळीं तात्यासाहेबांना शिव्या न देणारा त्यांच्या जहाल पक्षांत जवळजवळ कोणी नव्हता व तात्यासाहेबांच्याबद्दलहि जवळजवळ गोखल्यांच्याइतकाच अनादर जहाल लोकांत होता. गोखले व केळकर या दोघा थोर पुढाऱ्यांबद्दल जहाल-मतवादी लोक काय वाटेल ते बडबडतांना प्रत्यही दिसत. याच वर्षीं येथील डेक्कन जिमखाना सुरू झाला व जिमखान्याच्या एका मॅचमध्यें तात्यासाहेब खेळले. तात्यासाहेब पहिल्यापासूनच जिमखान्याचे आधारस्तंभ व अलीकडे बरींच वर्षें ते जिमखान्याचे अध्यक्ष होते. मॅच पहाण्यास हजर असलेल्या प्रेक्षकांत क्रिकेटप्रेमी व प्रसिद्ध साहित्यिक कै. ' रामगणेश गडकरी ' होते व त्यांनी तात्यासाहेबांच्या खेळण्याच्या कौशल्याबद्दल वाहवा केली.

( २ ) सन १९३२ सालीं मद्रासमधील 'स्वदेशमित्रम्' ह्या तामीळ दैनिकाचा पंचविसावा वाढदिवस तात्यासाहेबांच्या अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत आला. त्या वेळीं केलेलें तात्यासाहेबांचें इंग्रजी भाषण नितान्तरम्य व सुंदर झालें. स्वभावातील गोडव्यामुळे तात्यासाहेबांनी मद्रासमधील सर्व महाराष्ट्रीय मंडळी आपलीशी केली. एवढा मोठा महाराष्ट्रीय पुढारी आपल्यांत आहे याची जाणीव आमची आम्हांसच करून घ्यावी लागत होती, इतके तात्यासाहेब समरस होत व अत्यंत आपलेपणानें सर्वांची चवकशी करीत. तेथील महाराष्ट्र-मंडळानें तात्यासाहेबांस मानपत्र दिलें. [illegible] ४ ५ महाराष्ट्रीय मुलींनी म्हटली. तात्यासाहेब येणार ही सूचना २–४ दिवसच आगाऊ कळली होती, यामुळे पद चांगले बसले नव्हते. मानपत्र-समारंभ संपल्यावर तात्यासाहेब ह्या ४–५ मुलींसह एका खोलींत जाऊन बसले व पद कसें म्हणावयास पाहिजे होतें तें त्यांनी मुलींस स्वतः गाऊन दाखवीत दाखवीत त्यांजकडून बसवून घेतलें ! ही हकीकत मला माझ्या मुलीच्याकडूनच त्या संध्याकाळीं कळली. मद्रासच्या महाराष्ट्र-भुवनाला तात्यासाहेबांनी स्वतःचे १०० रुपये व केसरी ट्रस्टतर्फे ३००० रुपयांची देणगी दिली. एवढेच नव्हे तर, तेथील प्रमुख महाराष्ट्रीय मंडळीच्या विनंतीला मान देऊन १–२ वर्षें ते ट्रस्टीहि होते.



## गोपाळ कृष्ण वेलणकर

**( नाडण, जि. रत्नागिरी )**

( १ ) तात्याचा व आम्हा वेलणकर मडळीचा परिचय झाल्यानतर आम्ही बोलावल्यावरून तात्यानी आमच्या गावी येण्याचे कबूल केले तात्यांच्या देवगडच्या रहात्या घरापासून आमचे घर सहा मैल दूर आहे. सहा मैलापैकी तीन मैल खाडी-तून होडीनें जाता येते. पुढे पायवाट आहे. तेव्हा तात्याला आणण्यासाठी आम्ही मेण्याची सोय केली होती आमच्या घराजवळ गड्यानी मेणा उतरताच तात्यानी कोटाच्या खिशात हात घातला व पैसे बाहेर काढले त्या वेळी मी म्हणालो, " तात्या, गडी आमच्या घरचे आहेत. त्याना मजुरी देण्याची जरुरी नाही " त्यावर तात्या निश्चयपूर्वक स्वरात म्हणाले, " मी मजुरी देत नाही, त्याना बक्षीस देत आहे तुम्ही माझ्याआड येऊ नका अगदी बोलू नका " गडी नको नको म्हणत असताहि तात्यानी त्याच्या हातात तीन रुपये ठेवले ! आमचे वडील अगदी टापटिपीने वागणारे गृहस्थ पायातील [illegible] ठेवण्याची जागासुद्धा अगदी ठरीव अशी आहे तात्या जेव्हा प्रथम आले त्या वेळी जोड काढण्यापूर्वी त्यानी इकडेतिकडे पाहिले व दूर असलेल्या वहाणा ठेवण्याच्या जागी जाऊन त्या ठिकाणी आपले जोडे नेऊन ठेवले ! इतक्या क्षुल्लक बाबतीतसुद्धा ते किती व्यवस्थितपणे वागत हे पाहण्यासारखे आहे

( २ ) आमचा नि तात्याचा परिचय वाढल्यानतर आम्ही भेटीदाखल त्याच्या-कडे फणस पाठवीत असू अर्थात् ही भेट घेऊन जाण्याचा प्रसग आमच्या गडी-मडळीवर येत असे आमचा गडी त्याच्या घरी गेल्याबरोबर, दुसरा कोणी पुढे होतो की नाही हे न पहाता, तात्या स्वत. गड्याच्या डोक्यावरील ओझे उतरण्यास पुढे होत हे पाहून आमच्या गडीमडळीना चमत्कार वाटे एक तर तात्या इतके जवळ आल्याबद्दल त्याना आनद वाटे; शिवाय एवढे मोठे गृहस्थ आपल्या डोक्यावरील ओझे उतरण्यास येतात कसे याचे नवल वाटे कारण त्याना इतर ठिकाणचे अनुभव अगदी याच्याउलट येत असत

( ३ ) तात्या नि त्याचे वडील बधु अप्पासाहेब असे मिळून एकदा नाडणला आमच्या घरीं आले होते त्या वेळी तात्यांचे गुडघे फार दुखत होते परतु जाताना विजयदुर्ग ते वाघोटण या सडकेवर मोटारकरितां त्यांना जाणें भाग होते आम्ही मेण्याची सोय केली असताहि तात्यांनी मेण्यात बसण्याचें अगदी साफ नाकारले वाटेच्या वरच्या बाजूची घाटी चढत असताना त्यांचे गुडघे फार दुखूं लागले थोडीशी वाट चढून गेल्यानतर जरा थाबून तात्या आम्हास म्हणाले, " जसे आपण एखाद्या लहान मुलास सागतो कीं, जरा हे काम कर म्हणजे तुला मी खाऊ देईन

लये मी माझ्या गुडघ्यांना सांगत आहे की, जरा चला म्हणजे तुम्हांस बसायला मोटार मिळणार आहे !" गुडघे दुखत असतांही ते दुःख अशा खेळकरवृत्तीनें तात्यांनी सहन केले. मला वाटते मुख्य हे त्यांच्या स्वभावांतच होते; आणि म्हणून स्वत.विषयीं बोलतांना मी सुखी आहे असे ते नेहमीं म्हणत असत, त्याचे कारण हेच असावे

( ४ ) व्यक्तिगत कायदेभगाची चळवळ सुरू झाली त्या वेळी एका महाराष्ट्रीय पुढाऱ्याने नुसत्या महाराष्ट्रातून एक लक्ष स्वयंसेवक मरण्यास तयार देतो, असे जाहीरपणे सांगितलें होते मी तात्याना म्हणालो की, बघा, हे पुढारी किती जहाल बोलले ते! तेव्हा तात्या म्हणाले, "बोलले याला महत्त्व नसून काय घडते इकडे लक्ष ठेवा ! सबध हिंदुस्थानात कायदेभगाची चळवळ झाली त्या वेळीं साठ हजार लोक तुरुगात गेले तेसुद्धा मरणास तयार नव्हते. कित्येकाना मागाहून पश्चात्ताप झाला मग नुसत्या महाराष्ट्रातून एक लक्ष स्वयसेवक मरण्यास तयार असे देतो या म्हणण्यात काय अर्थ आहे ? अशा बोलण्याने व तसे न घडण्याने आमची किंमत काय हे सरकाराला मात्र कळून चुकते "

( ५ ) एकदा आम्ही मडळी तात्याच्याकडे देवगडला गेला होतो त्या वेळी एक प्रसिद्ध पुढारी त्याच्याकडे आले होते तात्या व ते भाई याचा संवाद सुरू होता संवाद प्रकट असल्यामुळे आम्हाला ऐकण्यास प्रत्यवाय नव्हता तो सवाद पुढीलप्रमाणे : भाई :– मी राजकारणात पडलो आहे, तरीसुद्धा मला लग्न करावे असे वाटते. तरी याबद्दल तुमचे मत काय आहे ? तात्या .– तुम्हाला मरण-मारणाचे राजकारण खेळावयाचें असेल तर मात्र तुम्ही लग्न करू नका कारण आज लग्न कराल व उद्या जगातून नाहीसे व्हाल अगर कायमचे तुरुगात जाऊन बसाल; मग तुमच्या बायकोची स्थिति काय ? लग्न केलेत तर आधीं तिची व ससाराची नीट व्यवस्था लावा. बायकोला तुमच्या नावाने जन्मभर दुःख करीत बसण्याचा प्रसग आणू नका. मरण्या मारण्याचे राजकारण करणाऱ्यांनी लग्न न केलेलेच बरें !

( ६ ) तात्यानीं देवगडच्या घरासमोर बसण्याकरिता काही ओटे बाधून घेतले. ओटे बाधण्याचें काम सुरू असताना आम्ही तात्याच्या घरी गेलो होतो आम्ही गेलो त्या वेळीं गवडी काम करीत होता व तात्या त्याच्याजवळच उन्हात उभे होते. त्याने तात्याना सांगितले की, काटकोन साधण्यासाठी चारी कोनाना आधी चार खुट्या मारल्या पाहिजेत. त्यावर तात्या म्हणाले की, अरे, खुट्या कशाला ? आपण नजरेनें काटकोन कसा साधतो ते पाहू ? मी सागतो तसे दगड लाव, मग पाहू काटकोन जमतो की नाहीं त. त्यानतर गवंड्याने तात्यांच्या सागीप्रमाणे दगड बसविले व नंतर ते काटकोनात आहेत की नाहीत तें तो पाहू लागला व

आश्चर्य असे कीं, काटकोनात एका -ं ग-गादि फरक निघाला नाही! 'शेवटचें लढाऊ जहाज' या गोष्टीत त्यांनी राजकारणाविषयी जो अदाज बांधला तो खरा ठरला म्हणून लोक त्याची स्तुति करतात; परतु साध्या गोष्टीतसुद्धा त्याचा अदाज किती अचूक ठरे, हे सदर प्रसगावरून दिसून येते वास्तविक गवंडी याचा नेहमीचा तो धदा, परतु तात्यानी -ाळ ।ऽ्। चीत केल. तो गवंडी म्हणालाच की, "माझ्या आयुष्यात अशा 'नजर पाहणीचा' मनुष्य मी बघितला नाही!"



## पु. ल. ओगले
### (शहापूर, बेळगांव)

(१) १९१९ साली पत्रसृष्टींत प्रविष्ट होऊन आयुष्य व्यतीत करण्याचा विचार मी करीत असता मुबईस लोकमान्याचे स्नेही श्री. छत्रे याना भेटलो. तेव्हा त्याचा ओढा श्री खाडिलकराकडे असताहि तात्यासाहेबानाच भेटण्याचा त्यानीं सल्ला दिला ही गोष्ट माझ्या मनावर ••••मचा ठसलेली आहे पत्रसृष्टि व सपादकीय वकूब या••।। ••••नी या सल्ल्याच्या प्रसगाने जे विचार ठसविले त्यामध्य विचाराचा ••••।' परिश्रमात निरलसपणा आणि व्यवसाय-सृष्टीतहि ममत्वाची ••••ना करण्याची आवश्यकता, याना किती प्रमुख स्थान होते याचा विसर मला कधीहि पडणार नाही

(२) १९२९ च्या बेळगावच्या साहित्य-समेलनाला तात्यासाहेब आले आणि त्यानी त्या वेळच्या एकदर वादविषयात प्रामुख्याने भागहि उचलला; त्या वेळचा एक प्रसग कधीहि न विसरण्यासारखाच आहे बेळगाव जिल्हा प्रामुख्याने कानडी असून कर्नाटकचा भाग आहे अशा आशयाच्या पत्रकावर श्री बेळवी व गगाधररावजी याच्या स्वाक्षऱ्यानतर तात्यासाहेबाची स्वाक्षरी झाल्याचे बाहेर आले होते वरील आशयाच्या श्री गगाधररावजीच्या ठरावाला तात्यासाहेब अनुमोदन देणार हे त्यानीच मला •• । श्री बेळवीचे चिरजीव भाऊराव मजकडे 'जित मया' दृष्टीने पाहू लागले! मी तात्यासाहेबाना बाहेर बोलावण्याचा लहानतोडी मोठा घास घेतला, तेहि तत्काल बाहेर आले मी त्याना १९२० पासून गुरुबधु व स्नेही याच्याबद्दलच्या आपलेपणाच्या आहारी जाऊन, टिळकपक्ष व महाराष्ट्रीय राजकारण याच्यात फुटीरपणा उत्पन्न होण्यास आपण उघड्या डोळ्यानी कसा वाव दिला, याबद्दलचे माझे आक्षेप थोडक्यात त्याना ऐकवले व आम्हास तुम्ही होऊन असे दूर का लोटता, असा बोचक प्रश्न केला. त्या वेळीं त्यानी मला माझ्यावर दृष्टि रोखून स्पष्ट व स्वच्छ सागितले, "होय, तुम्ही म्हणता ते खरेहि असेल, पण मी माझ्या वागणुकींत बदल करणार नाहीं बेळवी-देशपांडे याच्या

सह्या ज्या कागदावर होईल त्या कागदावर माझीहि सही होइल, असें मी त्यास वचन दिले आहे. तुम्ही आता माझा नाद सोडा, माझें मन वळविण्याचा प्रयत्न करू नका." अत्यत निराशाजनक असे हे त्याचे शब्द ऐकत असतानाच माझा त्यांच्याबद्दलचा आदरभाव मात्र अनेकशः वृद्धिंगत होत होता. कारण याच वेळीं ते म्हणाले की, "एक केळकराचो मान्यता म्हणजे तुम्हा तरुणाची मुस्कटदाबी असे तुम्ही का मानता? तुमचा आग्रह न्याय्य असेल तर तो मी उलट गेलो तरी सोडू नका"

( ३ ) १९३० मध्ये माझ्या राहत्या व व्यवसायाच्या स्थलाचा त्याग करावयास उद्युक्त करणारा प्रसग माझ्यावर आकास्मिक कोसळला. त्या वेळी मी विश्वासानें तात्याच्याकडे धाव घेतली माझे सर्व म्हणणे ऐकून घेतल्यावर ते म्हणाले, "मला कळल्यापासून मी या गोष्टीचा विचार केलाच आहे. तुम्ही याल असेहि वाटलेच होते. येथे यायचेच ठरविलेत, तर केसरीचा दरवाजा उघडा आहे तेथे तुमची सोय होणार नाही असे नाही, पण माझे ऐकावयाच असेल तर तुम्ही त्याच गावीं यापुढे पाच वर्षे प्रतिष्ठित सार्वजनिक सस्थत वावरू शकलात तर तुम्हाला जे समाधान व भूषण वाटेल ते येथे येऊन केसरीच्या आश्रयानेहि मिळणार नाही हे विसरू नका. लोकमत हे जितके अविवेकी असते तितकेच ते विसराळू आणि उदारहि असते, याचा अनुभव तुम्हाला येईल व तोच शेवटी सुखद ठरेल असे मला वाटते." शेवटी झालेहि तसेच !

( ४ ) यापुढे अनेकदा माझी-त्याची गाठ पडली, पण आता लाबण लावत नाही. अगदी अखेरला त्याचे मला पत्र आले ते दि २२–४–४७ चे मी त्याना माझ्या चिरजिवाच्या मुजीचे निमत्रण पाठवून येण्याचा अति आग्रह केला. निदान आशीर्वाद तरी धाडून द्या असा आग्रह केला होता "या दिवसात आशीर्वाद देणारापेक्षा आशीर्वाद मागण्याची बुद्धि होऊन तो प्रेमपुरःसर मागणारा हाच मला अधिक माणुसकी असणारा माणूस वाटू लागला आहे !" असे वाक्य या पत्रात त्यांनी लिहिले आहे !



## नारायण विनायक जोशीराव
### ( मुंबई )

( १ ) १९२९ साली मी तात्यासाहेबाना भेटलो; तो त्याच्याशी वादविवाद करण्याकरिता. वादाचे मुद्दे दोन. एक असा की, काही लोक त्या वेळो मजजवळ म्हणत की, "केळकरानी टिळक-चरित्र लिहिले खरे, पण केळकर मूळचे दुष्टच. त्यानीं टिळक-चरित्रात टिळकाचे गुणवर्णन केले, त्याबरोबर टिळकावर प्रच्छन्न टीकाहि

केली व आपला दुष्टावा साधला. उदाहरणार्थ, टिळक-चरित्रातील चिरोल-प्रकरणाच्या प्रस्तावनेतील मुख्य वाक्यच पहा. ' ... ... एखादा मनुष्य वीरश्रीच्या हट्टाने किंवा फाजील आत्मविश्वासाने डोंगराच्या अंगावर चढून जाऊन त्याच्या डोक्यावर पाय देईन अशी महत्त्वाकांक्षा धरतो; पण त्या प्रयत्नात दमून जातो, घसरून खाली पडतो आणि डोंगराला काहीएक इजा न होता मनुष्याचेंच अंग ठेचाळून रक्त निघते, तशी स्थिति टिळकांची या चिरोल-प्रकरणी झाली ' यावरून केळकराना टिळकाचे गुणवर्णन करावयाचे होते, का त्याचे दोषदर्शन करावयाचे होते ? " पण मला स्वतःला ही गोष्ट पटेना, म्हणून प्रत्यक्ष खुलासा करून घेण्याकरिता मी केळकराना भेटलो व त्यास विचारले ते म्हणाले, " लोकाचें म्हणणे एका अर्थाने खरे आहे चिरोल प्रकरणी येथील हायकोर्टपर्यंत दाद मागणे ठीक होते, पण हायकोर्टानाहि न्याय मिळाला नाही म्हणून फिर्याद पुढे प्रिव्ही कौन्सिलपर्यंत नेणे मला स्वतःला पसत नव्हते व त्याप्रमाणें त्या वेळीच मी टिळकाना स्पष्टपणे माझे मत सांगितले होते कारण, माझ्या मतें दोन हिंदी माणसातच न्यायाचा देण्याचा प्रश्न असला तर ब्रिटिशाच्या न्यायाचा काटा समतोल असतो हें साधारणपणे मान्य होण्यासारखे आहे पण एका हिंदी माणसाविरुद्ध एका ब्रिटिश माणसाची केस असेल तर त्याच्या न्यायाचा काटा केव्हाहि ब्रिटिश माणसाकडेच झुकेल याबद्दल शकाच नको कारण ब्रिटिश लोक हे कांहीं देवदूत किंवा देव-माणसे नव्हत; आणि त्याप्रमाणेच घडलेंहि म्हणून प्रिव्ही कौन्सिलकडे दाद मागणे, त्याबद्दल इतका खर्च करणे व दगदग सोसणे इष्ट नाही असे त्या वेळी जे मी म्हटलें तेच आता लिहिले आता यांत कुणाला माझा दुष्टावा दिसत असला तर दिसो. आहे ती वस्तुस्थिति तुम्हाला मी सांगितली. " यावरून माझी तर त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल व प्राजलपणाबद्दल पूर्ण खात्री झाली व त्यांच्याविषयीचा माझ्या मनात अगोदरच असलेला आदर द्विगुणित झाला; आणि चरित्रवर्णन म्हणजे नुसती विभूतिपूजा नव्हे हें म्हणणे जसे केळकरानी टिळक-चरित्र लिहून खरे केले, तसेच आदर्श चरित्रलेखन कसे असावे हेंहि त्यानीं दाखवून दिले, असेच शेवटी सर्व लोक म्हणत आहेत.

( २ ) वादाचा दुसरा मुद्दा होता गीतारहस्याबद्दल टिळकचरित्रात गीतारहस्याविषयी जे वर्णन आले आहे त्यात अर्जुन हा ज्ञानी होता का नव्हता याविषयी टिळकाचे म्हणणे काय होते ते आले आहे. ते टिळकाचे म्हणणे बरोबर का चूक असा मी केळकराना प्रश्न केला. ते म्हणाले, " टिळकाचे काय म्हणणे होतें तें मीं लिहिले तें बरोबर का चूक तें मी कसें सागू ? " मी म्हटले, टिळक हयात असते तर त्यानाच मीं विचारले असते ते नाहीत म्हणून तुम्हाला विचारतों गीतारहस्य हा शास्त्रीय ग्रंथ आहे. त्यातील भाषा काटेकोरपणेंच वापरली पाहिजे वेदान्त-परिभाषेत 'ज्ञानी' याचा अर्थ ब्रह्मज्ञानी. त्याप्रमाणें अर्जुनाला ज्ञानी म्हटल्यास

गीतेचे मग प्रयोजन काय ? कारण ‘ येन ज्ञानेन सर्वं विज्ञात भवति । ’ यावर केळकर म्हणाले, “ अहो, ज्ञान्याज्ञान्यात काही प्रकार, पर्याय, श्रेणी असतातच की नाहीं ? त्यात कुठेतरी अर्जुन बसतो आणि तोच टिळकांचा अभिप्राय असावा. ” अर्थात् याने माझे तितकेसे समाधान झाले नाही. पण मी लहान असतांनासुद्धा या विषयासबंधी वाद करण्याची त्यानी तत्परता दाखविली, याचे मला आश्चर्य वाटलें.



## दत्तात्रेय गोपाळ शिरगांवकर

### ( राधानगरी, कोल्हापूर )

( १ ) तात्यासाहेब यास एकदा मी विचारले, “ तात्यासाहेब, मला आठ मुलगे आहेत. मी बुद्धीने व आर्थिकदृष्ट्या साधारण मनुष्य; माझ्या मुलाना मी शिक्षण काय देऊ ? आपण ज्ञानी आहात, मला सागा ” ते म्हणाले, “ असा प्रश्न करून तुम्ही मला गोंधळात पाडलेत; कारण मी सुद्धा माझ्या स्वतःबद्दल ठाम असे काहीच ठरविले नव्हते प्रथम वकिली करू लागलो व पुढे लोकमान्यांनी बोलाविल्याबरोबर पुण्यास येऊन आज अशा स्थितीप्रत आलो. माझ्या मुलाच्या बाबतीतहि ठराविक असे काहीच ठरविले नव्हते; तथापि तुम्ही विचारता म्हणून सागतो कीं, काही झाले तरी मुलाना निरुद्योगी ठेवू नका. त्याचा कल पाहून त्याना जे आवडेल तेच शिक्षण द्या व वीस वर्षे होईपर्यंत त्याचे सगोपन करा वीस वर्षाच्या पुढे त्याची जबाबदारी त्याच्यावर ठेवा. त्यानी स्वावलबी बनून आपला जीवनक्रम चालवावा पुढील जबाबदारी तुमच्यावर नाही. अशाने तुम्हास समाधान मिळेल ”

( २ ) एकदा मी तात्यासाहेबाना विचारले की, “ तात्यासाहेब, देव श्रेष्ठ की देश श्रेष्ठ ? ” ते हसले व म्हणाले, “ देवाचे श्रेष्ठत्व केव्हाहि आहेच; परतु आज आपण देशाचें श्रेष्ठत्व प्रथम मानले पाहिजे. थोडक्यातच पहा की, देव व देश या दोन शब्दात ‘व’ व ‘श’ अशी अक्षरें आहेत. त्यात व च्या पुढें श हें अक्षर मूळाक्षरातच आहे अर्थात् त्या दृष्टीनें देवापेक्षा देशच पुढे आहे ! ” याप्रमाणे विनोद करून थोडक्यांत त्यानी माझी समजूत केली

( ३ ) “ देशात उत्पन्न झालेले अनेक पक्ष, परस्परविरुद्ध सस्था, तट वगैर प्रकारामुळे सर्वत्र अस्वस्थता, क्षोभ व अनेक चळवळी सुरू आहेत. स्वास्थ्य कोठेच दिसत नाही, पुढे कसे होणार, मोठी काळजी वाटते यास उपाय काय ? ” असे मी त्यास विचारिले. त्यावर ते पाच मिनिटे स्तब्ध बसले व म्हणाले, “ काळजीचें कारण नाही. व्यक्ति असो, समाज असो, राष्ट्र असो, त्यास चळवळ ही पाहिजेच. स्वास्थ्य हे घातक आहे. मात्र ध्येय उच्च असावें. स्वतः निरपेक्ष असावें,

म्हणजे यश ठेवलेलेच आळशीपणाचे समाधान मुळीच उपयोगी नाही. महत्त्वाकाक्षा पाहिजे गीताग्रथाचा उपदेश कृतीत आणिला पाहिजे. आमच्या लोकास काय पाहिजे याबद्दल न्या रानड्याचे एक वाक्य सागतो. ते असे – "What our people want, is discontent; but I am sorry to say that they always seem to be satisfied with everything." टिळकाना चिरोलने 'The father of Indian unrest' असे म्हटले हे त्याचे वर्णन यथार्थ आहे"

( ४ ) गेल्या वर्षी उन्हाळ्यात सायकाळी मी फिरावयास जाताना वाटेत ते मला भेटले मला पहाताच ते म्हणाले, "केव्हा आलात ? घरी आला नाहीत ?" मी विचारले, आपली प्रकृति ठीक आहे ना ? ते म्हणाले, "आहे त्या मानाने ठीक आहे थोडा अस्वस्थपणा वाटतो पण हे आता चालावयाचेच होईल तोपर्यंत काम करावे, उद्योग करावा व हाक आली की, चालते व्हावे. मरणाचे भय कधीहि मनात बाळगू नये समर्थांनी म्हटले आहे, 'मरणाचे असावे स्मरण' त्यास तयार असावे" मी म्हटले, आपण असे बोलू नका, मनास वाईट वाटते त्या वेळी हसत व आनदाने त्यानी सागितले की, "हाकेची मी वाट पाहात आहे महासाधु सॉक्रेटिसाप्रमाणे मी मृत्यूचे स्वागतच करीन" याप्रमाणे बोलून ते घाईघाइने एका सभेस निघून गेले.



## नीलकंठ भाऊ गांधी

( चिपळूण )

लोकमान्य टिळकानी रायगडावर श्रीशिवजन्मोत्सव सुरू केला डोगरचढण, वाट आकुंचित व फार कठीण, त्रासदायक. तरी त्या जगली रानातून, खड्या-धोड्यातून हजारो मडळी वर शिवजयती-समारभ पाहण्यास मोठ्या उत्साहाने जमली होती तो पहिलाच उत्सव होता सागावयाचे विशेष म्हणजे त्या वेळेस तात्यासाहेब सोवळे नेसून काच्या मारून स्वत. भाताची रास परातीत घेऊन ब्राह्मणादि सर्व मडळींस जेवण वाढीत होते ! त्यानी अति मेहनत घेतली. लोकमान्य स्वतः सर्वांवर देखरेख करण्याचे काम फिरत राहून करीत होते. हाताशी साहाय्यक असताना तात्यानी व लोकमान्यानीं स्वतः कामे करण्याची कमाल केली. ते दृश्य, चार तपे होत आली, तरी माझ्या नजरेसमोरून हलत नाही !



## गोविंद केशव पांडे

( मुळावा, जि. यवतमाळ )

सन १९३४ ची गोष्ट आमच्या गावी श्रीदत्त संस्थान स्थापन होऊन कांहीं दिवस झाले होते श्रीगुरूंच्या शिष्यमंडळींपैकी एकाने आपली काही इस्टेट या संस्थानास दिली अर्थात् त्या इस्टेटीचा ट्रस्ट करण्याचा विचार होता गांवीं जरूर असा कोणी तज्ज्ञ नसल्यामुळे बाहेर गावच्या तज्ज्ञाचा सल्ला घेणे जरूर होते. यवतमाळ येथील श्री बापूजी अणे हे काही राष्ट्रकार्यार्थ बाहेर फिरतीवर असल्यामुळे त्यांच्या ज्ञानाचा लाभ होणे शक्य नव्हते केसरी संस्थेचा ट्रस्ट झाला असल्याचे वाचनात होते म्हणून तात्यासाहेब यांच्याकडेच पत्र पाठविण्याचे ठरले. पण सर्वांना शंका ही की, हे एवढे मोठे गृहस्थ व बहुव्यवसायी हे आमच्यासारख्या सामान्य नागरिकांच्या पत्राला उत्तर देतील हें शक्य नाही पण त्यावर एक उपाय म्हणून उत्तराकरिता तिकिट घालून पत्र पाठविण्याचे ठरविले व तसे अखेर पत्र पाठविले पण आमचा अदाज सर्वस्वी चुकून त्यांनी आम्हाला त्वरित व योग्य उत्तर तर पाठविलेच; पण आमची तिकिटे परत करून स्वतः पोस्टेज भरून उत्तर पाठविले! त्याचे उत्तर जसेच्या तसेंच खाली दिले आहे हेतु हा की, ते वाचून वाचकांना त्यांच्या अगच्या काही गुणांची ओळख होईल

### तात्यासाहेबांचें उत्तर

कृ सा. न वि वि –आपले पत्र पावले ट्रस्ट हा शब्द जरी सर्वसामान्य असला, तरी एका संस्थेचे ट्रस्टडीड दुसरीस सहसा उपयोगी पडत नाही माझा आपणास सल्ला असा की, आपण कागदपत्र यवतमाळ येथील [illegible] वकिलास दाखवून सल्ला विचारावा मला सर्व कागदपत्र पाहिल्याशिवाय सल्ला देता येणार नाही. श्री बापूजी अणे हे आता यापुढे बहुतेक यवतमाळ येथेच असतील तरी आपण त्यांचा सल्ला घ्यावा या कामाला लागेल तो वेळ खर्च करण्यास मी नाखूष नाही. परंतु चांगले काम चांगल्या प्रकारे व्हावे अशी इच्छा म्हणून आपणाला वरीलप्रमाणे लिहिले आहे. तरी गैरसमज करून घेऊ नये. चांगल्या माणसाला विशेषतः वकिलाला विचारल्याशिवाय कोणतीहि गोष्ट करू नका. कळावे.

– न. चि. केळकर



## नरहर हणमंत देशपांडे

### ( वतनदार कुळकर्णी, नंदगड, जि. बेळगांव )

( १ ) तात्यासाहेब याच्या दर्शनास आम्ही घरच्या सर्व मडळीसह गेलो असताना त्यानी आपुलकीच्या भावनेने आदरसत्कार, विचारपूस, गप्पागोष्टी यात आम्ही कटाळेपर्यंत आनदानें आपला अमोलिक वेळ घालविला. कट्रोलमुळें साखरेच्या कमतरतेने काय ताराबळ उडे! तरी त्यानीं उपाहारास मेवामिठाई आणवून सर्व मडळीस चहा दिला या साध्या गोष्टीतील त्याची गृहस्थाश्रमी पद्धत, लहानापासून थोरापर्यंत मनापासून विचारपूस करणे वगैरे पाहून आम्हास आश्चर्य वाटले! आम्हा सर्वांची त्यानी चौकशी करून राजकीय, सामाजिक वगैरे अनेक विषयाचे अमोलिक विचार त्यानी फोड करून आम्हास समजावून सागितले.

( २ ) उभ्या देशात मागचा-पुढचा विचार न करिता विचित्र अशा एका विशिष्ट विचारसरणीच्या पाठीशीं उदोउदो करीत अवघा देश असताना व आपल्या बाजूची कड घेणारा कोणी बलवत्तर नसताना, झुजार वृत्तीने त्यानी आपला पक्ष आपल्या पायावर उभा करून लढविला. त्याची तत्त्वनिष्ठा आणि आत्मविश्वास ही किती जाज्वल्य होती, याची त्यांनी मला लिहिलेल्या प्रश्नोत्तरावरून कल्पना होईल ता १४-७ ३६ च्या बोधपर पत्रात ते लिहितात, "आपण तत्त्वाप्रमाणें सरळ वागावे, त्याचे चीज कोणीना कोणी, कोठेना कोठें, करणारा भेटतोच. त्यातच समाधान मानलें पाहिजे."



## वा. ह. घारपुरे

### ( एम्. ए., कल्याण )

"शारदोपासक समेलन" या नावाखाली स्थानिक व उन्हाळयाच्या सुटीमुळे पुण्यास जाणाऱ्या साहित्यसेवकाचें समेलन जूनच्या पहिल्या आठवड्यात भरविण्याचा उपक्रम सुरू झाला होता. त्या मडळाचे केळकर अध्यक्ष व म. म. पोतदार कार्याध्यक्ष होते. चिटणीस कोण होते तें मला माहीत नाही. पण त्या वर्षी त्या बैठकीलाच मी एक चिटणीस बनलो खरा! लोकमान्याच्या राजकारणात सहकारी असलेले केळकर व शिवरामपत परांजपे, या वेळी फेरनाफेर पक्षांत सापडून विरुद्ध गोटात जाऊन राजकारणाचा लढा लढवीत होते. पण राजकारणात प्रतिस्पर्धी असले तरी वाङ्मयप्रातात एकत्र येऊन कार्य करण्याला त्यांना हरकत नव्हती. म्हणून शिवरामपत समेलनाध्यक्ष व केळकर स्वागताध्यक्ष म्हणून एकत्र आणून २।३

वाङ्मयविषयावर चर्चा घडवून आणावयाची असा आम्ही विचार केला कार्यक्रमपद्धति वर्गणी, समेलनाचे दिवस, चर्चाविषय वगैरे गोष्टीचा निर्णय होऊन केळकराची समति घेण्याची कामगिरी मजवर व शिवरामपताच्या समतीची कामगिरी दुसऱ्या दोघाकडे सोपविण्यात आली. मी दुसऱ्याच दिवशी सकाळी केळकराकडे भेटावयास गेलो. थोड्याच वेळात डॉ. मुजे, लोकनायक अणे आले व घरात शिरले. मी पुढे सरकून केळकराना नमस्कार करतो तो ती मडळी घरात गेली व केळकरानी मला दारातच अडवून चौकशी केली मीहि अगदी थोडक्यात महत्त्वाच्या गोष्टी त्याना गा।ग ।। आणि " । ।"। स्वागताध्यक्ष म्हणून निवडले आहे, आपण समेलनाच्या दिवशी येथे असाल काय ? व आपली या गोष्टीना मान्यता आहे काय ? असे विचारले मी कोण, काय वगैरे न विचारता तात्यासाहेबानी तत्काळ उत्तर दिले, " मी त्या वेळी येथेच आहे, मजवर सोपविलेले काम मी करीन " त्याच वेळी मी त्याना सागितले की, " शिवरामपताची अध्यक्ष म्हणून निवड करण्यात आली आहे व त्यानी न स्वीकारल्यास 'आनद'कर्ते वासुदेवराव आपटे याना विचारावयाचे आहे " त्याबरोबर त्यानी उत्तर दिले, " कारभारी मडळाने जे काय ठरविले असेल ते मला समत आहे व मी मजवर सोपविलेले काम करीन. " असे सागून त्यानी मला निरोप दिला व दार बद करून घेतले. पहिल्या तडाख्याला एवढे यश मिळाल्याबद्दल मला फार आनद वाटला. कै. शिवरामपताकडे मात्र त्या दोघाचीहि डाळ शिजली नाही त्या वेळी भारताचार्य नानासाहेब वैद्य तेथे असत. त्यानी आम्हाला आश्वासन दिले आणि शिवरामपताना आणण्याचे कबूल केले इतकेच नव्हे तर " शिवरामपत न आले तर मीच तुमच्या समेलनाचा अध्यक्ष होईन ! " असेहि आश्वासन '·' -। देऊन ठेवले ! त्यामुळे आम्ही पुढील उद्योगाला लागलो पूर्वीच्या समेलनाप्रमाणेच हे आमचे समेलन " भारत इतिहास-सशोधन-मदिरात " भरावयाचे होते. म्हणून आम्ही तिघेहि चिटणीस भारत इतिहास सशोधन-मदिरात येत होतो मध्यतरीच्या २–३ आठवड्याच्या काळात आमच्यापैकी कोणीच केळकराच्याकडे गेला नव्हता. पण केळकरानी मला बोलाविले व शारदोपासक समेलनाचा कार्यक्रम वगैरे मा।हि । विचारली हा केळकरांचा थोरपणा मी अद्याप विसरलो नाही छापील निमत्रण त्याच्याकडे गेले असेल, कार्यक्रम 'केसरी'त प्रसिद्ध झाला असेल; पण आम्हापैकी कोणी तरी त्याजकडे न जाणे रीतसर नव्हते असे असता त्यानी आपण होऊन मला बोलाविले, माहिती विचारली, अनुच्चारित अनुस्वार लेखनात न वापरण्याच्या आपल्याच नव्या प्रथेवर चर्चा करीत असता अत्यत खेळीमेळीने त्या विषयाची आपली बाजू माडली, समेलनाध्यक्ष शिवरामपत व इतर विद्वान् याचे स्वागत केले व आमची मनांतली इच्छा पूर्ण केली ! ही केळकराच्या निरभिमान वृत्तीची आणि लोकहित-तत्परतेची माझी आठवण मी अद्याप १९ वर्षांत विसरलो नाही;

आणि ह्यापुढे जन्मभर विसरेन असे मला वाटत नाही. कारण ती अत्यंत पवित्र, उत्साहवर्धक आणि सार्वजनिक कार्याला प्रेरक अशी आहे !



## हरी कृष्ण भडकमकर

### ( दादर, मुंबई )

केळकरांचा व माझा मुळीच परिचय नव्हता १९३३ साली १ ऑगस्टला चौपाटीवरील लोकमान्यांच्या पुतळ्याच्या अनावरण-समारंभास ते आले होते. त्या वेळी मी त्यांना गाठले व विचारले की, मी लोकमान्यांचा उत्सव घरी केला आहे, आपण पानसुपारीस त्यानिमित्त आमच्या घरी यावे अशी माझी इच्छा आहे. तत्काळ ते मला म्हणाले की, समारंभ आटोपल्यावर मला भेटा व तुमच्या घरी जायचे आहे, असे अतुकाकांना अगोदर सांगून ठेवा. समारंभ रात्री ८ ला संपला पाऊस मी म्हणत होता. त्यांनी सांगितल्याप्रमाणे मी त्यांना भेटलो व पुन्हा एकदा आमच्या घरी येता ना असे विचारले. एक क्षणाचाहि विचार न करता किंवा यत्किंचितहि अळटळ न करता तत्काल ते "हो" म्हणाले व आमच्या घरी आले ! वास्तविक एवढा मोठा सार्वजनिक समारंभ झाला आहे, शिवाय पाऊसहि चिक्कार पडत आहे, तर आता तुमच्या घरी येण्याची काय आवश्यकता आहे, किंवा मला आता वेळ नाही असे कारण देऊन माझी ब्याद त्यांना सहज टाळता आली असती व मलाहि त्यांना दोष देण्यास मुळीच जागा नव्हती. माझ्यासारख्या अप्रसिद्ध व अपरिचित मनुष्याच्या विनंतीस मान देणे यात त्यांचे पराकाष्ठेचे सौजन्य दिसून येते !



## नीळकंठ बाळकृष्ण खरे

### ( शेहेरा, जिल्हा पंचमहाल, गुजराथ )

१९३६ साल. श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांचा वाढदिवस होता. त्यानिमित्त तात्यासाहेब यांस सयाजी-व्याख्यानमालेतर्फे पाचारण केले होते. तात्यासाहेबांकडे मी त्यांची स्वाक्षरी मागण्यास सरकारी अभ्यागतगृहात गेलो होतो. तात्यासाहेबांची ती धीरगंभीर मूर्ति, पंचा नेसलेले, अंग उघडे आणि डोळ्यावर चष्मा अशा थाटात एका खुर्चीवर बसून लेखन-कार्य करीत असताना दिसली. अतिशयोक्ति न करिता मी असे सांगू इच्छितो की, पंधरा मिनिटे मी दरवाजात उभा होतो, खाकरलो, खोकलो,

पण त्याचा त्याना पत्ता नाही! त्याची ती ' सविकल्प समाधि ' पाहून मला त्याना त्रास देणे योग्य वाटले नाही अखेर मनाचा हिय्या करून मी पुढे जाऊन "तात्यासाहेब" म्हणून हाक मारली माणूस झोपी गेला असताना त्याच्या डोळ्यावर पाणी टाकल्यावर जशी त्याची स्थिति होते तशी त्याची झाली. मलाहि संकोच वाटला; पण माझा त्यांची स्वाक्षरी घेण्याचा निश्चय कायम होता. मी स्वाक्षरी मागितली मागे ..चीवर टेकून, मी काही विचारीन अशी त्याची समजूत म्हणून ते स्वस्थ बसले मी त्याचा अमूल्य वेळ खर्च केल्याबद्दल क्षमा मागितली त्यानीहि "त्यांत काय, त्यात काय" असे म्हणून चटकन् स्वाक्षरी दिली! नमस्कार करून मी निरोप घेतला



## भा. मो. भट

(साहित्य-विशारद)

प्रथम एक विद्यार्थी आणि त्यानतर वृत्तपत्राचा प्रतिनिधि या भूमिकावरून मी तात्यासाहेब याना पाहिले आहे त्याच्या भेटीचे, मुलाखतीचे आणि व्याख्यानाचे रिपोर्ट देण्याचे काम मी बरेच वेळा केलेले आहे

(१) विनोदनिर्मिति कशी होते यासबधी एका सभेत बोलताना केळकर यानी जे एक उदाहरण दिले ते फार मार्मिक आणि विनोदी असे होते ते म्हणाले, "मी एकदा काकणात गेलो असता काही लोक रेड्याची टक्कर पाहाण्यास चलण्यासाठी आग्रह करू लागले म्हणून मी गेलो मैदानावर दोन बाजूनी दोन सजवलेले रेडे मिरवीत आणण्यात आले होते टक्कर पाहण्यास आलेली मडळी बरीच लाबवर बसली होती फक्त काहीं थोडी मडळी पुढे गेली दोन्ही रेडे समोरासमोर आले, पण मध्ये एक लाब तावडे फडके होते लोकानी आरडाओरड केली, फडकें काढले आणि टकरीला सुरुवात झाली" केळकर पुढे म्हणाले, "लगेच दोन-तीन दिवसानी मला एका लग्नाचे निमत्रण आले, म्हणून गेलो. नवरदेव मिरवीत आला. वधूला समोर उभे करण्यात आले पण मध्ये अतरपाट होता. टाळ्या वाजविण्याकरिता लोक तयार राहिले ब्राह्मण अतरपाट दूर करण्याच्या तयारींत होते. दोनतीन दिवसापूर्वी पाहिलेल्या टक्करीची मला आठवण झाली. मी मनात म्हटले हे लग्न की . . !" श्रोत्यात मोठा हशा पिकला हे सागावयास नकोच.

(२) नवीन सशोधन अथवा कलानिर्मिति करणाऱ्या तरुण मडळींना केळकरांच्या आशीर्वादाची फारच आवश्यकता वाटे माझे स्नेही जी. के. दाबके यांनी मराठी लघुलिपी तयार करण्याकरिता बरेच परिश्रम केले होते आणि त्यांची

स्वतःची तयारी मराठींत मिनिटाला १२० शब्द लिहून घेण्याइतकी होती. त्याना केळकरांना भेटून आपल्या कलेचे प्रात्यक्षिक द्यावयाचें होतें. माझ्या वृत्तपत्र-व्यवसायामुळे मला माहीत होते कीं, केळकर ग्रंथलेखनात गुतल्यामुळे काम जमणें कठीण आहे. तरी पण एकदा जाऊन यावें म्हणून त्यांच्या घरीं दुपारीं आम्ही दोघेहि गेलो. ते त्या वेळी अति महत्त्वाच्या कामात होते. यामुळें आमच्या येण्यानें प्रथम ते नाखुष दिसले पण दाबके यानी आपले मराठी लघुलिपीवरील सशोधन सांगताच आपलें काम बाजूला ठेवून केळकर यानीं उतारे वाचले नतर दाबके यानीं आपल्या लघुलेखनातून काही भाग बिनचूक वाचून दाखविला. तात्यासाहेबानीं शाबासकी दिली आणि सर्टिफिकिटाकरिता पुन्हा एकदा भेटण्यास सांगितले.

( ३ ) मिरजेचे अधिपति श्री बाळासाहेब वारले असतां त्याच्या चरित्राविषयीं माहिती विचारण्याकरिता मी त्याच्या घरी रात्री १०–३० वाजता गेलो होतो अंथरुणावरून उठून डोक्यावरून उपरणे पाघरून ते माझ्यासमोर येऊन बसले व त्यानी अगदी शातपणे मला पाहिजे असलेली यथासाग माहिती दिली अशा अवेळीं तर राहोच, पण वेळी जाऊनसुद्धा " तुम्हाला दुसरा उद्योग नाही काय, नाही तर उद्या या " अशा उत्तरानीं वाटेस लावणारे पुष्कळ पुढारी मला आढळले होते म्हणूनच रात्री १०–३० वाजता जाऊनहि शातपणे वागण्याच्या त्याच्या सौजन्याचे महत्त्व वाटल्याशिवाय कसें राहील ?



## व्यंकटेश विष्णु वैद्य

### ( कुंकळी, गोवा )

( १ ) सन १९२८ सालची गोष्ट गोमतकीय गावड्याच्या शुद्धीकरणामुळे उत्पन्न झालेला पेचप्रसग सोडविण्यासाठी श्री केळकर, डॉ मुजे प्रभृति पांच गृहस्थाचे एक शिष्टमडळ पोर्तुगीज सरकारशीं शिष्टाई करण्यासाठी गोमतकात आलें होतें. सर्व गोमतकीय हिंदु जनतेच्या वतीनें मडगावच्या श्रीदामोदर-विद्याभुवनांत त्या शिष्टमडळाचे अभूतपूर्व स्वागत करण्यात आले होतें. डॉ. मुजे हे त्या शिष्टमडळाचे प्रमुख अशी कल्पना करून प्रथम दोन-चार सस्थांतर्फे त्या त्या सस्थाच्या प्रतिनिधानी डॉ. मुज्याच्याच गळ्यात पुष्पहार घातले. वास्तविक पाहता तात्यासाहेबच त्या शिष्टमडळाचे अध्वर्यु होते. त्यामुळे आमच्या ज्ञानप्रसारक समाजातर्फे पुष्पहार अर्पण करण्याच्या वेळीं तो हार मी तात्यासाहेबाच्या गळ्यात घालावयास गेलो, तेव्हा त्यानीं हळूच डॉ. मुज्याच्याकडे बोट दाखविलें त्याच्या इशाऱ्याचा अर्थ मला समजून आल्यामुळें तोहि हार मग मी डॉ. मुज्याच्याच गळ्यात घातला दुसऱ्या दिवशीं शिष्टमडळाचा

मुक्काम होता तेथें मी गेलो, तेव्हा तात्यासाहेब मुद्दाम मला एकीकडे नेऊन म्हणाले, " लोकहिताचे कार्य असेल तर त्या वेळीं कोणाचाहि अनुयायी म्हण-विण्यात मला कसलाहि कमीपणा वाटत नाही. आम्हा दोघांच्यांच गळ्यांत हार पडले असते तर उरलेल्या तिघाना त्यात वैषम्य वाटलें असते की नाहीं ? त्या प्रसगीं तुमचा विरस झाला याबद्दल मी दिलगीर आहे. " माझ्यासारख्या सामान्य मनुष्याच्या भावनेकडे लक्ष देऊन स्मरण ठेवल्याबद्दल आणि अनुयायी होण्याच्या त्याच्या निरहकार वृत्तीबद्दल मला अत्यत कौतुक वाटले.

( २ ) कॉंग्रेस व हिंदुमहासभा याच्या धोरणाकडे लक्ष देता आम्हा गोमत-कीयास पोर्तुगीज सरकारविरुद्ध राजकीय चळवळ करण्यास हिंदुमहासभेचे साहाय्य मिळू शकेल, कॉंग्रेसकडून ते मुळीच मिळणार नाही, असा आम्हा काहीं गोमं-तकीय आदोलकाचा अनुभवान्तीं समज झाला होता. म्हणून १९४५ साली मी तात्यासाहेबाचे मत अजमावण्यासाठी त्याना मुद्दाम भेटावयास गेलो. प्रथम साधकबाधक चर्चा करून शेवटी ते म्हणाले, " तुम्हाला हिंदुमहासभा शक्य ती मदत करील, पण 'उद्धरेदात्मनात्मानम्' हीच गोष्ट खरी ! मागे निजा मीत हिंदुमहासभेनें निःशस्त्रप्रतिकार सुरू केला. परतु स्थानिक हिंदु जनतेची कसलीच तयारी नाही, मग निःशस्त्रप्रतिकार यशस्वी होणार कसा ? ' जो दुसऱ्या-वरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला । ' हे समर्थाचे वचन लक्षात ठेवून चळवळीला आरभ करा "

( ३ ) आमच्या गावच्या कु फुलाइ गावड नामक एका मुलीच्या ख्रिस्ती-करणाचें प्रकरण १९४५ सालीं गोमतकात बरेच गाजले होते. गोमतकीय हिंदूनीं महत्प्रयासानीं ख्रिस्ती होण्यापासून तिचा बचाव केला होता. त्या सर्व हकीकतीचे एक चोपडे मी मुद्दाम तात्यासाहेबाच्या अवलोकनार्थ पाठवून दिलें होते. पुढें काही महिन्यानी माझी भेट होताच ते म्हणाले, " तुम्ही गोमतकीय हिंदूनी या प्रसगी बरीच सवेदना दाखविली म्हणावयाची ! ज्या प्रातात हिंदुता जास्त छळिली जाते, त्याच प्रातात हिंदुत्वाचा जास्त अभिमान आढळतो पजाब हिंदुत्वाबद्दल जागृत का ? आणि मद्रास उदासीन का ? याचें हच गमक आहे. " तात्यासाहेबाची व्यापक दृष्टि, स्मरणशक्ति व हिंदुत्वाविषयींची आस्था पाहून त्याच्याविषयीच्या माझ्या आदरात जास्तच भर पडली.

❋

## यशवंत पांडुरंग महाजन
(मुंबई)

सुमारे १९१२-१३ सालची गोष्ट. त्या वेळी मी शाळेत जाणारा विद्यार्थी होतो 'माधवाश्रम' हा आमच्या घरचा धंदा असल्यामुळ फावल्या वेळात मी आश्रमातील थोडेफार काम करीत असे त्यामुळे येणाऱ्या-जाणाऱ्या पाहुण्याची ओळख होई तात्यासाहेब हे, त्यानी लिहिलेल्या 'कृष्णार्जुनयुद्ध' नाटकाच्या तालमी नाटक कपनीस देण्यासाठी दर आठवड्यास 'माधवाश्रमा'त उतरत असत तात्यासाहेबांचा केसरी मी नियमाने वाचीत असे मुंबईला आल्यावर सुद्धा ते सतत लिहीत असलेले मला दिसायच; त्यामुळे त्याच्या लेखनशक्ती-बद्दल मला फार अचंबा वाटत असे म्हणून हा थोर मनुष्य एवढे लिखाण कसे करू शकतो हे जाणून घेण्याची मला फार उत्कंठा ... एके दिवशी खोलीत ते एकटेच ... मनाचा धीर करून, मी त्याना विचारले, "आपण एवढा मोठा केसरी लिहिता, तसा मला कधी लिहिता येईल का?" हा प्रश्न ऐकल्यावर ते रागावतील की काय अशी मला भीति वाटत होती. परतु उलट माझ्या ... हात ठेवून अत्यंत प्रेमळपणाने ते म्हणाले, "बाळ, हो हो, तुलाहि लिहिता येईल ... तसे नियमाने करीत जा दर आठवड्याचा केसरी आला की, त्याचा अग्रलेख ... वेळा वाचून काढ व नंतर केसरी बाजूस ठेवून तुला जे काय त्यापैकी आठवेल ते लिहून काढीत जा व असे नियमाने केलेस की तुलाहि केसरी लिहिता येईल!" एवढे म्हणाल्यावर तात्यासाहेब पुन्हा म्हणाले, "मी जेव्हा येथे येतो तेव्हा मला तू लिहिलेले दाखवीत जा, म्हणजे मी तुला ते तपासून देत जाईन, म्हणजे पुढे तू 'एवढा' केसरी लिहिशील!"



## नागेश दत्तात्रय कशाळकर
(बी ए, एलएल बी., वकील, पांढरकवडा, वऱ्हाड)

(१) १९२८ साली फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिकत असताना मी मराठी वाङ्मय-मंडळातर्फे "श्री न चि केळकर यांची भाषाशैली" हा निबंध वाचला व तो ... छापण्यात आला ... घडविताना लेखक स्वतः कोणत्या रीतीने प्रयत्न करतो हे लेखकाच्या तोंडून ऐकण्यात विशेष लज्जत आहे असे मला वाटत असल्यावरून मी केळकर यांच्याकडे गेलो, व माझ्या निबंधवाचनाच्या प्रसंगी त्यांनी अध्यक्ष व्हावे म्हणून विनंती केली परंतु ती त्यांनी मान्य केली नाही ते मला म्हणाले, "तुम्ही माझ्या भाषाशैलीबद्दल गुणदोषांची चर्चा करणार

त्या वेळी मी अध्यक्ष असलो तर तुमची व माझी दोघाचीहि कुचंबणा होणार! कसे ते पाहा तुम्ही माझे गुण वर्णू लागला तर मला ते ऐकताना संकोच वाटेल; उलट तुम्ही माझे दोष दाखवू लागाल, तर मी अध्यक्ष असल्यामुळे तुम्हास संकोच वाटणार! आपल्या दोघाच्याहि संकोचामुळे श्रोत्यांना जी कुचंबणा होईल ती वेगळीच! शिवाय मी अध्यक्ष झालोच, तर तुम्ही जे काही बरे-वाईट माझ्या भाषाशैलीबद्दल बोलाल ते अखेरपर्यंत मुकाट्याने ऐकून घेणे मला भाग आहे. श्रोत्यास जर आपला विषय आवडला नाही तर सभा सोडून जाण्याची जी सवड मिळते, तीहि मला उरणार नाही " यावर मीहि अधिक आग्रह धरला नाही

( २ ) ज्ञानप्रकाशकर्ते श्री. आबेकराच्या म्हणण्यावरून हा निबंध मी ज्ञानप्रकाशमध्ये छापण्यास दिला व तो छापण्यात आला केळकराच्या नजरेस तो आल्यावर त्यानी मला बोलावले व माझी पाठ थोपटली मी हळूच त्याना म्हटलें की, 'आपल्या तोंडून मला आपल्या भाषाशैलीबद्दल काय प्रयत्न आपण केले हे ऐकावयाचे राहूनच गेले' तेव्हा त्याच्या संभाषणातून जे विचार मला ऐकावयास मिळाले ते मी संक्षिप्त रीतीने पुढे देत आहे केळकर म्हणाले, "लेखनास सुरवात केली त्या वेळी माझ्या डोळयासमोर विष्णुशास्त्री चिपळूणकरांची भाषाशैली प्रामुख्याने असे माझी व श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांची भाषा संस्कृत शब्दप्रचुर व सामान्य वाचकास न झेपण्यासारखी असे कारण भाषेस प्रौढपणा व भारदस्तपणा येण्यास संस्कृत शब्दाचा अवलंब करावयास पाहिजे असे मला पूर्वी वाटत असे कोल्हटकरानी कोटी-विनोदयुक्त भाषापद्धति स्वीकारल्यामुळे व नाटके निर्माण करण्याकडेच लेखणी चालवल्यामुळे त्याच्या भाषेचा बोजडपणा जशाचा तसाच राहिला माझ्या भाषेत मात्र व्यवसायभेदामुळे फरक पडला केसरीमध्य मी लिहू लागलो तेव्हा आपल्या लेखनाचा दर्जा उच्च ठेवावा म्हणून मी जरूरीतीस संस्कृतप्रचुर शब्द आणि पल्लेदार वाक्ये लिहीत असे एक दिवस लो टिळक माझा लेख तपासत असता मला म्हणाले की, "आपला केसरी वाचणारे लोक ज्या भाषेत बोलतात त्या भाषेत त्याच्याशी आपल्याला बोलावयाचे आहे ते काही संस्कृत जाणणारे लोक नाहीत तुमच्या लेखनात जे संस्कृत शब्द येतात, त्याच्या अर्थाचे शब्द मराठीत मुळीच मिळत नसले, तरच अपरिहार्य म्हणून संस्कृत शब्दाची कास धरावयाची हा विचार संपादकाने नेहमी लक्षात ठेवावयास पाहिजे " लोकमान्याचा हा कटाक्ष मला जन्माचा मार्गदर्शक झाला व माझ्या नतरच्या लिखाणात साधेपणा व सुटसुटीतपणा येत चालला मी जे लिहू-बोलू लागलो, ते सामान्य मनुष्याच्या आटोक्यात कसे आणता येईल अशी मी नेहमी दक्षता घेऊ लागलो सामान्य जनाच्या भाषेत जर बोलता आले असते, तर माझ्या मताने, वामनराव जोशी अधिक लोकप्रिय कादबरीकार, गडकरी व कोल्हटकर अधिक

लोकप्रिय नाटककार, आणि माधवराव पटवर्धन अधिक लोकप्रिय कवि झाले असते. लेखनाच्या उचीप्रमाणे लेखनाची पातळीहि विस्तृत व्हावयास पाहिजे हे मला केसरीने शिकविलें."



## कृष्णशास्त्री नारायण कवडे

### ( बी. ए., वैद्यपंचानन, पुणें )

( १ ) श्री. बाबू अरविंद याच्या सपादकत्वाखाली कलकत्त्यास प्रसिद्ध होणारे 'वन्दे मातरम्' हे इग्रजी दैनिक पुण्यासारख्या ठिकाणीहि शेकडो प्रतींनी खपत असे. त्याच्या लेखाचा मराठीत अनुवाद करणारे मराठी 'वन्दे मातरम्' पुण्यात माझे मित्र कै. हरिभाऊ भागवत आमच्या 'शारदा' छापखान्यात छापून प्रसिद्ध करीत असत माणिकतोळा बॉब-खटला कलकत्त्यास सुरू झाला हा खटला सुरू असताच त्या खटल्यातील माफीचा साक्षीदार नरेन्द्रनाथ गोस्वामी याचा खून झाला त्यावर इग्रजी 'वन्दे मातरम्'मध्ये 'ए ट्रेटर इन् दि कॅप' हा खळबळ करणारा लेख प्रसिद्ध होताच इग्रजी 'वन्दे मातरम्' पत्र ज्या छापखान्यात प्रसिद्ध होत असे तो छापखाना जप्त केला गेल्याचे वर्तमान प्रसिद्ध होताच, त्याच लेखाचा मराठी अनुवाद 'गोटात फितूर' हा लेख मराठी 'वन्दे मातरम्' पत्रात प्रसिद्ध झाल्यामुळे आमचा 'शारदा' छापखानाहि जप्त होऊन सरकारजमा होण्याचा प्रसग आला ! अशा वेळीं काय केले असता हें अरिष्ट टळेल असा विचार सुरू झाला अनेक पुढाऱ्याचा सल्ला घेतला; पण उपाय सुचेना अखेरीस तात्यासाहेब यानीं उपाय सुचविला. दिपवाळीनिमित्त 'वन्दे मातरम्'चा अक बद होताच त्यापुढे 'वन्दे मातरम्' कायमचे बद करून 'शारदा' छापखानाहि कायमचा बद करून त्याची विल्हेवाट लावून टाकावी असे त्यानीं सुचविलें. त्याप्रमाणे 'शारदा' छापखाना कायमचा बद करून जागेतून हलविण्यात आला व तसे सरकारी अधिकाऱ्यास कळविण्यात आले. आठ दिवसानतर 'शारदा' छापखान्याच्या चौकशीसाठी पोलीस आले. परतु जागा मोकळी दिसली. तात्यासाहेब याच्या योग्य मार्गदर्शनाने आमचा 'शारदा' छापखाना वांचला आपत्कालीं तात्यासाहेबानीं योग्य मार्गदर्शन केल्यामुळे आमच्यावरील सकट टळलें योग्य मार्गदर्शन तात्यानीच करावें !

( २ ) लोकमान्य टिळकाच्या मृत्यूनतर कलकत्त्यास राष्ट्रीय सभेचे अधिवेशन झालें. एका वर्षात स्वराज्य मिळवून देण्याची महात्मा गाधीची घोषणा झाली व या चळवळीचा प्रचार करण्यासाठीं बहुतेक पुढाऱ्यानी पाढऱ्या टोप्या घालण्यास सुरुवात केली कै शिवरामपत पराजपे याच्यासारख्याच्या डोक्यावरील

पगडी जाऊन तिची जागा पाढऱ्या टोपीनें घेतलेली पाहून कसेसेंच वाटलें! तात्यासाहेबांच्याहि डोक्यावरील पगडी बाजूला होऊन काळसर रंगाची टोपी डोक्यावर कांही काळ येऊन बसली! मला फार वाईट वाटले. मीं तात्याना विचारले की, " तात्या, तुम्ही पगडी कायमची टाकून दिली काय?" तात्याना माझ्या प्रश्नातील मर्म समजले व त्यानीं लागलीच सागितलें कीं, " नाहीं, मीं पगडी कायमची सोडली नाही. मी पगडी कायम ठेवणार आहे." राष्ट्रीय सभेच्या चळवळीचा ठराविक काळ लोटतांच तात्यानीं पुन्हा पगडी घालण्यास सुरुवात केली व त्यानी आपली पगडी अखेरपर्यंत कायम ठेवली. महाराष्ट्रीय पगडीचे रक्षण केल्याबद्दल त्याचें अनेकाकडून कौतुक केलें गेले.

( ३ ) सन १९०८ सालीं जॅक्सनचा खून झाल्यावर व लोकमान्यांना शिक्षा झाल्यावर, त्यानी सुरू केलेले [illegible] शिवाजी-उत्सव आदि कार्यक्रम पार पाडण्याची जबाबदारी विशेषतः तात्यासाहेब याजवरच पडली. गणेशोत्सवात आपल्या गणपतीपुढे तात्यासाहेबाचे व्याख्यान झाले पाहिजे अशी जो तो मागणी करू लागला गणेश-मडळाचा चिटणीस या नात्याने तात्यासाहेब यास मी ही हकीकत कळविली व व्याख्याने देण्याची विनती केली. क्षणाचाहि बिलब न करतां लागतील तितकी व्याख्याने देण्याची विनती त्यानी मान्य केली व उत्सवात व्याख्यात्याची उणीव मुळीच भासू दिली नाही श्रीगणेशोत्सव यथासाग पार पडला.



## दत्तात्रय भिकाजी भिडे

( उपसंपादक, केसरी, पुणे )

( १ ) पुणें नगरपालिकेने तात्यासाहेब याचा षष्ट्यब्दपूर्ति समारभ केला समारभाची सभा नगरपालिकेच्या विश्रामबागवाड्यातील एका मोठ्या चौकात. भरली होती. सभेला स्त्री पुरुष, मुलें-मुली याचा मोठा समुदाय जमला होता श्रोत्याना उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून वर छाया केली होती; पण श्रोत्याची गर्दी फार झाल्यामुळे बऱ्याच स्त्रियाना आपल्या मुलाबाळाना घेऊन उन्हात बसावे लागले. समारभाचा प्रास्ताविक कार्यक्रम झाल्यावर तात्यासाहेब याच्या भाषणास सुरवात झाली; पण ते एक-दोन वाक्ये बोलत नि थाबत. असें दोन तीन वेळा झाले श्रोत्यांनाहि आज हे असे का करीत आहेत हे समजेना जो तो त्याच्याकडे बघू लागला. शेवटीं केळकरानाहि रहावेना व भाषण करण्याचेहि सुचेना. तेव्हा त्यानींच असें सागितलें कीं, "मी सावलीत उभा राहून बोलतो आहे; पण या भगिनी आपल्या लहानग्याना घेऊन उन्हांत उभ्या राहिल्या

आहेत, हे पाहून माझ्या मनात कालवाकालव होत आहे; तरी आपण याच्याहि डोकीवर सावली केल्यास त्याना बरे वाटेल आणि मलाहि भाषण करणे सुचेल." थोड्याच अवधीत तशी व्यवस्था करण्यात आली मौज अशी की, नतर केळकराचे भाषण सुमारे एक तास गंगौघाप्रमाणे झाले

( २ ) एका सुप्रसिद्ध इग्रजी वृत्तपत्राचा पुण्याचा वार्ताहर एक इग्रज मनुष्य होता हा इग्रज वार्ताहर महिन्यातून चार दोन वेळा तरी तात्यासाहेबाची या ना त्या राजकीय प्रश्नावर मुलाखत घेण्यास येत असे आणि तेहि त्याला मुलाखत देत केळकराची समजत अशी की, या गृहस्थाला इग्रजी लघुलेखन येत असेल आणि तो आपले वाक्य न् वाक्य लिहून घेत असेल एकदोन वेळेस असे झाले की, केळकरानी दिलेली मुलाखत आणि प्रसिद्ध झालेली मुलाखत यात तफावत पडली तेव्हा त्यानी या वार्ताहरास असे का झाले म्हणून विचारले त्यानेहि त्याचे काही कारण सागितले पण झालेला फरक फारसा महत्त्वाचा नसल्यामुळे केळकरानी त्याकडे अधिक लक्ष दिले नाही. काही दिवसानतर हे वार्ताहरमहाशय पुन. केळकराच्याकडे आले आणि त्यानी त्याच्याकडे एका महत्त्वाच्या राजकीय प्रश्नावर मुलाखतीची मागणी केली. केळकरानी त्याना सविस्तर मुलाखत दिली आणि नीट व्यवस्थितपणे आपल्या पत्राकडे पाठवा असे त्यास बजावून सागितले. दुसऱ्या दिवशी ती मुलाखत त्या पत्रात प्रसिद्ध झाली आणि केळकरानी ती वाचून पाहिली ती वाचून हाताच त इतके माही सतापले की, तो वार्ताहर जर त्या वेळी त्याच्यासमोर असता तर काय झाले असते याची कल्पनाहि मला करवेना मुलाखत प्रसिद्ध झाल्यानतर एक आठवड्याने पुन. ते वार्ताहरमहाशय केळकराच्याकडे मुलाखतीसाठी आले. त्या प्रसिद्ध झालेल्या मुलाखतीतील आपल्या विधानाची उलटापालट किती झाली आहे, हे त्यास दाखविले आणि त्याची इतकी निर्भर्त्सना केली की, हे महाशय शरमिंदवाणी मान खाली घालून परत गेले नि पुन. कधी केळकराची मुलाखत घेण्यास आले नाहीत या इग्रज वार्ताहरास इग्रजी लघुलेखन तर येत नव्हतेच, पण त्याची स्मरणशक्ति तितकीशी तीव्र नसल्यामुळे लिहून घेतलेल्या वाक्याचा सबध लावण्यात त्याचा मोठा घोटाळा झाला होता केळकराच्या प्रसिद्ध झालेल्या मुलाखतीतील उलटापालट नि मतलागलेली विधाने जेव्हा सदर वृत्तपत्राच्या सपादकाच्या नजरेस आणून देण्यात आली तेव्हा त्यानी आपल्या या वार्ताहरास पुण्याहून ताबडतोब हलविले आणि केळकराना दिलगिरीदर्शक पत्र पाठवले.

( ३ ) एक दिवस सकाळी मी तात्यासाहेब सागत असलेला मजकूर लिहून घेत होतो मजकुरातील एक वाक्य सपण्यापूर्वीच एका मोठ्या सस्थानचे दिवाण त्याच्या भेटीसाठी आले अर्थातच दोघेहि दुसऱ्या खोलीत बोलणे करण्यासाठी

गेले सुमारे ४० मिनिटे त्यांचे बोलणे झाले आणि आलेले पाहुणे गेले. नंतर तात्यासाहेब पुनः परत आले नि त्यांनी काही शब्द उच्चारले. मला वाटले, मला ते काही कामच सांगत आहेत; म्हणून हातात (dictation-) घेतलेला टाक मी खाली ठेवला. ते पाहून तात्यासाहेब म्हणाले, "अरे, मी तुला मजकुरातील मघाशी अर्धवट राहिलेले वाक्यच पुढे सांगत आहे." आणि खरेच. अर्धवट राहिलेल्या वाक्याचाच तो उत्तरार्ध होता! त्यांची ही स्मरणशक्तीची अजब करामत पाहून मी विस्मयचकित झालो.



## रा. द. पंतपराडकर

### ( मयूर-काव्य-प्रकाशक, पुणे )

( १ ) तात्यासाहेबांना मी आठवू लागलो म्हणजे काय काय आठवावे व कागदावर ते कसे वठवावे असा गोंधळून जातो. अशा स्थितीत प्रस्तुत ग्रंथ-योजकांनी स्थलमर्यादा जाणून आठविता, पहिली आठवण, त्यांनी माझ्या मयूर प्रकाशनकार्यात किती आपलेपणाने मन घातले होते, हीच पुढे येते. त्या वेळी मयूर-काव्य-प्रकाशनासारख्या अवजड कार्यभाराच्या दृष्टीने माझी व्यवहारस्थिति केवळ शून्य असल्याने, घरचे बांधवहि बिचकून मला सावधगिरीचे इशारे देत होते; पण तात्यासाहेबांना माझे उद्दिष्ट इतके पटले होते की, पंढरपुरातील मयूर-दप्तर कारणपरत्वे पुण्यास आल्याबरोबर एक प्रहराच्या आंत तात्या दप्तर-दर्शनार्थ मजकडे आले! केवळ आपल्या केसरीतून माझ्या तद्विषयक लिखाणास प्रसिद्धि देऊन व अनुमोदूनच न थांबता, माझी आर्थिक परिस्थिति जाणून त्यांनी माझ्या चालू खर्चाची तर हस्ते-परहस्ते सोय केलीच, पण पुढे प्रत्यक्ष छपाईच्या कामाचा प्रश्न उभा ठाकताच स्वतः पुढे होऊन बॉम्बे बॅंकिंग कंपनीकडून चार हजार रुपये भांडवलहि मला मिळवून दिले. या वेळी तात्यांची गृहस्थितीहि अशा धाडसाला साजेशी नव्हती व माझा प्रत्यक्ष वैयक्तिक परिचयहि इतका होता की, बॅंकेतील कागदावर सह्या करतानाच तेथे उघडपणे माझे संबंध नाव त्यांना विचारावे लागले! व्यक्तीपेक्षा व्यक्तीच्या कार्यावरच त्यांचे लक्ष त्या वेळी दिसून आले.

( २ ) पुण्यातील मराठी ग्रंथालयाच्या स्थापनेचा माझा त्या वेळचा उद्योगहि त्यांना पटल्यामुळे व प्राथमिक खर्चाचा बोजा सर्वस्वी मजवर पडू नये म्हणून ते कामी आले. लक्षात राहण्याजोगी गोष्ट अशी की, सदर संस्थेच्या स्थापनेच्या निमंत्रण-चिठ्ठ्या केसरी छापखान्यांत छापल्या तर तो एक खर्च कमी होईल हे जाणून, जरी त्या वेळी केसरी छापखान्यातून बाहेरची कामे छापून देण्याची प्रथा नव्हती

तरी, हे सार्वजनिक व म्हणून केसरीच्या परपरेप्रमाणे घरचेच काम आहे हें मॅनेजर बाबासाहेब याना पटवून देऊन त्यानी निमत्रण-चिठ्ठया छापावयास लावल्या. अशा कामाला जरूर ते ट्रेडल मशीनहि तेव्हा केसरी छापखान्यात नव्हते साध्या हॅडप्रेसवरच हे काम करावे लागले! ग्रथालयाच्या प्राथमिक अवस्थेत जागाभाड्याचा प्रश्न जाचक होऊ लागला तेव्हा काही दिवस गायआळीतील आपल्या घरातील जागाहि त्यानी मोकळी करून दिली होती! सस्थेची स्वतःच्या इमारतीपर्यंत प्रगति झाल्यानतर मी व कै. अण्णा पावगी, वकील हे चिटणिशीतून निवृत्त झालो नव्या [illegible] दुरावला. तथापि तात्यासाहेब इतके जागरूक कीं, सस्थेच्या ज्युबिली-महोत्सवाच्या वेळीं लोकविस्मृतीत गेलेल्या मला मूळ सस्थापक म्हणून आठवून अगत्यपूर्वक निमत्रण्याची सूचना त्यानीच नव्या चिटणिसाना दिली!

( ३ ) लो. टिळक मडालेस अडकून पडल्यानंतरच्या काळात टिळकानुयायाना एक मोठीच सुबुद्धि सुचली दर शुक्रवारी आलटून-पालटून कोणाकडे तरी टिळकानुयायाचे स्नेहसमेलन घडू लागले. यामुळे सघटना टिकण्यास बरीच मदत झाली. लोकमान्य सुटून आल्यावर तेहि या सघटनेत सामील होऊन तिला उत्तेजू लागले! ह्या बैठकी अगदी खेळीमेळीच्या होत; यामुळे टिळकाचें कोणाविषयी काय धोरण व मत आहे याचा सहज बोध होत असे अशी एक बैठक एकदा कसब्यातील पेठकर वकिलाच्या घरी भरली होती लोकमान्यसुद्धा सर्व लहानथोर मडळी जमली. उशीर झाला तरी नेहमीं वक्तशीर येणाऱ्या [illegible] पत्ता नाही तेव्हा कोणी म्हणाले, ते आज रेमार्केटपुढे भरलेल्या मॅडीसाहेबाच्या व्याख्यानसभेला गेले आहेत. पुण्यातील ड्रेनेजची अधिकारीकृत सर्व घाण सप्रमाण उपसून केळकरानी मराठ्यात प्रकट केली होती व तिच्या खडनार्थच मॅडीसाहेब सरसावून पुढे झाले होते. लोकमान्यानीं हे सर्व प्रकरण नीट न्याहाळलें होते. त्यामुळें केळकराच्या खडनोपखडापात मॅडी फजीत पावणार अशी त्याची खात्री होती. केळकर आले नाहींत याला उद्देशून टिळक म्हणाले, "अहो, ते मॅडीसाहेबाचे पिंड पाडण्यात गुंतले असतील! आमच्या तात्याचा स्वभाव असा आहे कीं, शक्यतों ते वर्दळीवर न येतां सामोपचारानेंच आपली बाजू माडतात. पण प्रतिपक्षी ताळतत्र सोडूनच बरळू लागला तर तात्याहि आपला सूर अष्टमात चढवून खडन करण्यास मागेंपुढें पाहात नाहींत अशाच काही तरी कारणाने तात्या आज येऊ शकले नसावेत." टिळक असे बोलत आहेत तोंच तात्यासाहेब घामेजल्या चेहऱ्याने घाईघाईने त्या बैठकींत दाखल झाले! चमत्कार असा की, टिळकाचें अनुमान अचूक ठरलें! मॅडीसाहेब मराठ्यातील लेखक, मराठ्यातील लेखक, असा वारवार उच्चार करून डिवचीत असतां श्रोत्यांत निमूटपणें बसलेले केळकर खवळून, "हा मी मराठ्यातील लेखक

येथें माझ्या लेखाचें समर्थन करण्यास उभा आहे" असें म्हणून मॅडीसाहेबाची तात्यानी अगदी रेवडी उडविली होती व त्यामुळेच त्याना विलब झाला होता.

(४) चिरोल-केसच्या प्रतिकूल निकालाची विद्युद्वार्ता धडकून टिळकपक्षीयाना मोठाच धक्का बसला. या निकालामुळें लोकमान्यावर कोसळलेल्या आर्थिक आपत्तीच्या कल्पनेने मी तर जवळजवळ वेडावून गेलों व त्या भरात तडक तात्याच्या पुढे जाऊन उभा राहिलों. त्या वेळी त्याच्या-माझ्यामध्ये झालेला सवाद माझ्या हृदयावर कोरल्यासारखा झाला असल्याने इतक्या कालावधीनतरहि तो जशाचा तसा मी व्यक्त करू शकत आहे. तो सवाद असा —

तात्या — का हो ! का आलात ?

मी — विलायतची तार कळली म्हणून

तात्या — हो ! बळवतरावावर मोठाच आघात झाला !

मी — पण, या आघातापासून आपल्या पुढाऱ्याला सुरक्षित राखणें अनुयायाचे काम नाहीं का ?

तात्या — हो, ते सर्व खरे. पण आघात सामान्य नाही !

मी — लोकमान्याची लोकमान्यताहि काहीं सामान्य नाहीं. लोकानी मनावर घेतल्यास लोकमान्यावरील आघात सहज निवारता यावा.

तात्या — अहो ! हे सर्व तुम्ही बोलता आहा; पण तुम्ही व्यक्तिशः काय करू शकता ते बोला.

मी — मी आज माझ्या मनाला धक्का बसलेल्या दिवशी माझ्या धदाव्यवहारातील असलेली सर्व रोकड टिळकार्पण करीन. असेंच सर्व टिळकभक्तानीं मनावर घेतल्यास लोकमान्यावरील आर्थिक आपत्तीचें सहज निवारण होईल.

तात्या — अशी कितीशी रोकड आज तुमच्याजवळ असेल ?

मी — पुणें व मुबई मिळून दोन ठिकाणची सुमारें दीड हजार तरी भरेल.

तात्या — ही सर्व रोकड तुम्ही देणार ? मग पुढे काय करणार ?

मी — पुढचें पुढे ! आजचा संकल्प असा आहे.

माझें हें इतके निग्रहाचे उत्तर ऐकतांच तात्या ईझी-चेअरवर सावरून बसून जरा विचारमग्न झाले; व माझ्यासमोरच त्यानी प्रथमतः मुबईच्या श्री. यशवंतराव नेने, डॉ. डी. डी. साठे वगैरे मडळींना विचारविनिमयार्थ तातडीने पुण्यास येऊन जाण्याविषयीं पत्रे पाठविली. हे पाहून मीहि माझ्या मुंबईतील व्यवहाररक्षक मित्रांना (बुकसेलर कै. बळवतराव परचुरे व कै. मनमोहनदास

रामजींचे विश्वासू दक्षिणी हस्तक कै. वामनराव हेरलेकर ) पत्रें पाठवून ताबडतोब यशवतराव नेने याच्याकडे १५०० रु. चा चिरोल खटल्याच्याकरिता भरणा करण्यास कळविले त्याप्रमाण यशवंतराव पुण्यास येण्यापूर्वीच ही रक्कम जमा धरून आले व अशा प्रकारे माझ्या भावनावेडात चिरोल-फंडाची प्राणप्रतिष्ठा झाली !

( ५ ) सुगधशाळेच्या धूपोद्योगाच्या प्रथमावस्थेतील अडीअडचणीनी मी व्यग्र झाल्याने पुण्यातील राष्ट्रीय क्लबाच्या बैठकीतील प्रायः न चुकणारी माझी उपस्थिति काहीं काळ घडेनाशी झाली. त्यामुळे तात्याच्या माझ्या भेटीतहि अतर पडले, हे जाणून त्यानी मला भेटीस बोलावून चौकशी केली. मी सर्व परिस्थिति निवेदून म्हैसूरला धूपव्यवहार-निरीक्षणाला जाण्याचा माझा मनोदय व्यक्त केला ते म्हणाले, " ठीक आहे. सोलापूर जिल्हा परिषदेच्या तुमच्या पढरपूरच्या बैठकीचा अध्यक्ष म्हणून मला जावयाचे आहे, माझ्याबरोबरच पढरपूरला चला व परिषद आटोपताच तेथून पुढ मार्गस्थ व्हा " त्याप्रमाणेच घडले मी म्हैसूरच्या दौऱ्यावरून सफलतेने परत येऊन त्यास भेटलो व मगच केसरीच्या ानिप्रानाने " पुण्यात म्हैसूर सुगधशाळा " खरी उदयास आली ! अशा प्रकारच्या व्यवसायाला पूरक म्हणून तात्यांनी कोकणात अनुभविलेल्या दतमजनाच्या एका प्रक्रियेची मला ओळख करून देऊन माझ्या धद्यास तीहि एक जोड द्या असे सुचविले; पण त्याच्या हयातींत माझ्याच हलगर्जीपणाने तात्याचे दतमजन माझ्यापाशीच राहिले !

( ६ ) वाङ्मयसेवेची नाना कुवत व मर्यादा मी जाणून होतो लेखनकलेच्या उपासनेपेक्षा व्यावहारिक ओढ्याने कलावस्तूच्या शोधर्चिंतनातच मी रमत असे हे जाणून तात्या त्याहि प्रकारच्या माझ्या उलाढालीत आपलेपणान लक्ष घालून तद-नुकूल लेखन करण्यास मला उत्तेजित असत यामुळे चरखा-काळे याचे यत्रचरित्र-लेखन त्यानी मजकडून करवून केसरीत प्रसिद्ध केले गया कॉंग्रेस बरोबरच्या प्रद-र्शनाचा सविस्तर अहवाल केसरीसाठी तयार करण्याची कामगिरी मजवर सोप-विली, इतकेच नव्हे तर, त्या प्रदर्शनात वैद्य नामक एका कोकणच्या इसमाने एका कारागिराकरवी मूर्तस्वरूपास आणलेल्या शिवणयत्राच्या पेटटोद्योगान उत्तेजनार्थ हजारभर रुपये खर्चून त्याला पुढील वाटेस लावले !

( ७ ) तात्या माझ्याशीं कशा व किती समरसतेने मिळून जात याचा खुद्द त्याच्या हातचा साक्षीभूत असा हा कागद त्याच्या मृत्यूनतर रद्दी म्हणून अग्नये स्वाहा होण्याचा प्रसग आला असता, प्राथमिक शाळेतील माझ्या लहान मुलाची जिज्ञासा जागृत होऊन त्याने जाणून माझ्या हाती आणून दिला, म्हणून तो वाचकापुढे ठेवणे आज शक्य होत आहे ! माझ्या किन्हईनिवासकालीन घरच्या व्रतबधप्रसगींचे हे तात्याचे मयूरभक्तोचित सदिच्छापत्र आहे. त्या पत्राचा ठसाच पुढे दिला आहे. अशा समरसतेचेच जणु दैवी अंतिम पर्यवसान

TELEPHONE No. 400
THE KESARI & THE MAHRATTA OFFICE
568 Narayan Peth,
POONA City 29/8—1932

आर्या

जरि कुंकुमगंधादिक निरहित शुभ्रपत्रिका स्वयंगंधा ।
'किन्हई' प्रेषित ऐसे निःसंदेह वदेल ती अंधा ॥१॥

उपनयनविधी करुनी द्विज एक नवा जगास लाभविता ।
तरि त्या घ्याया आशीर्वादार्थ हि मी करी न का कविता ॥२॥
रघुवीर भक्त आम्ही तुम्ही उभयहि सधानसे आहो ।
म्हणुनी मिळुनी प्रार्थू अविरत कृपा वरूनी राहो ॥३॥

न. चिं. केळकर

म्हणून माझ्या तृतीय कन्येच्या विवाहाचा योग त्याचे मावसबधु प्रि. ग. नी. गोखले, इजिनिअर याच्या ज्येष्ठ पुत्राशी कल्पनातीतपणे जमून, प्रिन्सिपॉलसाहेब त्या वेळी बनारसहून येऊ शकत नव्हते तरी त्याच्या जागी तात्याच्याच दापत्याला पुढे होऊन धार्मिक सस्कारविधि उरकावे लागले ! तात्याचे उभयान्वयित्व या वेळी माझ्या इतके कामी आले की, विवाहविधि उरकून आम्ही दोघ 'व्याही' सुखसवाद करीत बसलो असता, "दैव म्हणून मनुष्यप्रयत्नापलीकडील काही अदृष्ट असते, असे या तुमच्या माझ्यामधील सबधयोगाने मानावे लागते" असे भाविकपणाचे उद्गारहि त्याच्या तोडून निघाले ! म्हणून म्हणतो –

भावतिल वियोगाश्रुत मिळवुनि तात्या ! तिलाजली देता ।
जीवितसाफल्याचा भवदाशीर्वाद मागुनी घेतो ॥



## यशवंत गणेश कुलकर्णी

( मुख्य हिशेबनीस, केसरी-मराठा कचेरी, पुणें )

लोकमान्याची कार्यपद्धति ही उसाच्या चरकासारखी असे. त्यांत एकदा बोट सापडले की सबध माणूस आत ओढला जाई. मग चिरोल केस असो की ताईमहाराज प्रकरण असो टिळकाबरोबरची सर्व मडळी त्या कामात गुतली जावयाची व याच धकाधकीत मूळचे गुणाचे पैलू घासले पुसले जाऊन त्याचे खरें तेज प्रकट होई. तात्यासाहेब हे तर लोकमान्याचे उजवे हात !

( १ ) ज्या ताईमहाराज-प्रकरणाने वीस वर्षे लोकमान्याची बुद्धि व शक्ति खाल्ली त्या प्रकरणातीलच ही हकीकत आहे. फौजदारी स्वरूपाच्या खटल्यांत

औरंगाबाद-कमिशनपुढे फक्त लोकमान्यानीच आपल्यातर्फे साक्षीदार दिले होते त्यात महत्त्वाची साक्ष श्री. जगन्नाथमहाराज याचे जनक वडील भाऊसाहेब देव, निधोनेकर याची होती लोकमान्य औरंगाबादेहून दत्तविधानाचे काम आटोपून पुण्यास परत आल्यानंतर ताईमहाराजानी भाऊसाहेब याना जे पत्र लिहून दिले होते त्यात 'त्याच्याशिवाय दुसरा दत्तक घेणार नाही' असे ... होते. या वाक्याचा उपयोग करून मुलगा पसंत केला; पण दत्तक घेतला नाही असे उलटतपासणीत काढण्याचा सरकारी बॅरिस्टर मि. स्ट्रँगमन याचा विचार होता त्या हेतूने त्यानी वरील वाक्याचा अर्थ काय होतो, असा प्रश्न भाऊसाहेबाना टाकला पण भाऊसाहेब यानीं 'माझा मुलगा जगन्नाथ दत्तक घेतलाच आहे आता दुसरा दत्तक घेऊन तंटे करणार नाही' असाच त्याचा अर्थ आहे, असे स्पष्ट शब्दांत सांगितलें व त्याचबरोबर पत्रात असलेले 'जगन्नाथ यास औरस पुत्राचे सर्व हक्क प्राप्त झाले आहेत' हे वाक्यहि दाखविले भाऊसाहेबाच्या या उत्तराने मि स्ट्रँगमन याचा हेतु साध्य न झाल्याने चिडून, त्याने केळकर हे शेजारी बसले होते, त्यानी भाऊसाहेबाना सावधानतेची सूचना दिली असा आरोप केला आप यावरील असल्य आरोप मुकाट्याने ऐकून घेण्याचा तात्याचा स्वभाव नव्हता ! ते ताडकन उभे राहिले व त्यानी कोर्टासच सरळ प्रश्न केला कीं, "मी व भाऊसाहेब दोघेहि कोर्टासमोर बसलो आहोत, कोर्टास तसा संशय आला का ?" यावर कोर्टाने 'नाही' असे म्हणताच स्ट्रँगमनचा आरोप त्याच्या गळ्यात घालून त्यास माफी मागण्यास त्यानी भाग पाडलें !

( २ ) असाच प्रसंग या प्रकरणात आणखीहि एकदा घडला. श्रीमान् दादासाहेब खापर्डे याच्या साक्षीसाठी अमरावतीस जावयाचे होते. लोकमान्य, तात्या व मी असे तिघे पुण्याहून निघालो होतो लोकमान्याच्या अंगावर सतराशे कामे त्यामुळे खटल्याचे कागद पाहण्यास सवडच झाली नव्हती. तेव्हा गाडीत कागद वाचावयाचे असे ठरवून मूळची सेकंड क्लासची तिकिटे बदलून फर्स्ट क्लासची तिकिटे काढली पण योगायोग असा की, ज्या फर्स्ट क्लासच्या डब्यात आम्ही शिरलो त्याच डब्यातून नेमका बॅ. स्ट्रँगमन हाहि चालला होता ! आमचे कागद वाचण्याचे बेत त्यामुळे मनातच जिरले त्यात एकदा आत शिरलेलो, परत डबा बदलणेहि वाईट दिसलें असते. पण सुदैवानें श्रीमान् खापर्डे हे बाहेरगावी गेले असल्यामुळे कोर्टात हजर राहू शकले नाहीत यावर मि स्ट्रँगमन यानें खापर्डे याना आम्ही मुद्दाम गैरहजर ठेवले अशी कोर्टाकडे तक्रार केली. या वेळीहि केळकर पुन्हा उभे राहिले व त्यानीं स्ट्रँगमन याच्याकडून त्याच्याच डब्यातून आम्ही प्रवास केला याचे अगोदर होकारार्थी उत्तर घेऊन कोर्टास सरळ प्रश्न केला की, "खापर्ड्यांना जर आम्ही गैरहजर ठेवणार होतो तर नाहक यवढा खर्च आम्ही कशासाठी केला ?" यावेळींहि कोर्टाने मि. स्ट्रँगमन याना आपले शब्द मागे घेण्यास लावले. तात्या-

साहेब हे स्वभावाने शांत पण मोठे मानी असत. कोणताहि आरोप मुकाट्याने ऐकून घेणे त्यांना जमत नसे. टोल्यास सणसणीत प्रतिटोला देण्याचे शिक्षण तर त्यांना लोकमान्यांपासूनच मिळालेले, मग त्यांत ते कमी कसे पडतील ! कित्येकांना जन्मभर आठवण राहील अशी सणसणीत चपराक त्यांच्याकडून मिळाली आहे.



## जयंत श्रीधर टिळक

(बी. एस्सी, लोकमान्यांचे नातू, उपसंपादक, केसरी, पुणें)

(१) ती. तात्यासाहेबांची टिळकभक्ति ही शब्दातीत होती. लोकमान्यांच्या संस्था, पत्रे, पक्ष आणि राजकारण यांचे त्यांनी लोकनिंदेची तमा न बाळगता जिवापाड मेहनत करून संगोपन केले हा इतिहास सर्वश्रुत आहेच परंतु टिळक-घराण्यावरील त्यांच्या पितृतुल्य प्रेमाची कल्पना फारच थोड्यांना असेल. कारण त्यासंबंधी व्यर्थ गैरसमजच फार माजले माझ्या सुदैवानें त्यांच्या सहवासाचा लाभ मला नेहमीच मिळाला त्यांपैकी कोणते संस्मरणीय प्रसंग निवडावेत हेच कठिण होऊन बसले आहे एक प्रसंग माझ्या स्मृतिपटलावर ठसठशीत कोरला गेला आहे तात्यासाहेबांच्या अनिर्वचनीय टिळकभक्तीची आठवण होताच मन कावरेबावरे होतें तो माझ्या विवाहाचा दिवस होता. सकाळपासूनच तात्यासाहेब आमच्या घरीं येऊन समारंभाच्या सर्व तयारीवर जातीने देखरेख करीत होते. आल्यागेल्याची विचारपूस आणि सर्व व्यवस्था तर त्यांनी स्वतः केलीच, पण पानसुपारीच्या वेळी दरवाज्यावर इतक्या वृद्धापकाळी उभे राहून त्यांनी घरच्याप्रमाणे कार्य पार पाडले। तसेंच होमहवन चालू असतानाहि ते सारखे दक्षतेने सर्वत्र नजर ठेवीत होते. त्यांच्या आशीर्वादाने समारंभ व्यवस्थित पार पडला. शेवटी ते वाड्यातल्या गच्चीवर विश्रांति घेण्यासाठी आराम खुर्चीत बसले होते इकडे तिकडे बघून त्यांच्या नेत्रांत अश्रु उभे राहिले; जुन्या आठवणींनी त्यांचा कंठ दाटून आला त्यांच्या मनांत चाललेल्या विचारांची व भावनांची खळबळ त्यांच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित झाली होती पुनरपि एकदा सर्व गोष्टी मार्गाला लागल्या याचे समाधान त्या वेळी त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होते.

(२) चार वर्षांपूर्वी महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभेच्या कामाला पुनः एकवार जोराने चालना देण्यासाठी टिळक-मंदिरांत कार्यकर्त्यांची एक खाजगी बैठक घेण्यात आली होती ज्या हिरीरीनें व जोमाने हिंदुसभेचें कार्य व्हावयास पाहिजे तितके होत नाही, पुढारी मंडळी प्रांतातून फिरत नाहीत, हिंदुसभेचे राजकारण केवळ बैठे झाले आहे असे प्रवाद चालू होते. तात्यासाहेब हे विशेष निमंत्रणावरून

त्या बैठकीस हजर होते. मंडळीचे बोलणे झाल्यावर तात्यासाहेब तळमळीने म्हणाले, "पोकळ टीका कोणीहि करतो; काम करण्यास कोणी पुढे येतो आहे का? जो पुढे येइल त्यास हिंदुसभेचा कार्याध्यक्ष करतो, पीठ देतो, त्याच्या हाती जमविलेला पैसा देतो, वृत्तपत्रातून कार्याला प्रसिद्धि देतो, व मी स्वतः त्याच्या डोक्यावर हात ठेवता व पायालाहि हात लावतो! आम्ही आता वृद्ध झालो पीठ, पैसा, प्रसिद्धि व प्रतिष्ठा या चार गुणानी युक्त असे त्याने पक्षाचे कार्य जोमाने करावे. यापेक्षा आणखी काय पाहिजे?" तात्यासाहेबाच्या या उद्गारानी सर्वजण स्तब्ध झाले. पुढ याच बैठकीत्न त्रिकाळचे सपादक श्री शिवरामपत करदीकर हे अध्यक्ष, महाडचे सुप्रसिद्ध निरलस कार्यकर्ते श्री बापूराव जोशी हे कार्याध्यक्ष व श्री वा ब. गोगटे हे कार्यवाह असा हिंदुसभेच्या त्या वर्षीच्या पदाधिकाऱ्याचा उत्तम सच जमला तात्पर्य, कार्याची जबाबदारी अगावर घेऊन कार्य करण्यास तत्पर असलेल्या कोणाहि कार्यकर्त्यास आपले सर्व साहाय्य देण्यास तात्या नेहमी तत्पर असत. ते आपल्या ह्याच निरलस लोकसेवेच्या वृत्तीने लोकमान्याचे उजवे हात होऊन बसले होते ते उगच नव्हे!



## मधुकर केशव केळकर

### (एफ्. वाय्. कॉम., तात्यासाहेबांचे नातू, पुणें)

तात्यांच्याकडे माझीं लहान भावंडे – सुधा, अरविंद वगैरे वरचेवर गप्पा मारण्यास जात असत. मी मात्र तसा गप्पा मारण्यास जात नसे वास्तविक मी माझ्या भावंडांपेक्षा फार मोठा नव्हतो, पण लहान मुलासारख्या गोष्टी काय बोलावयाच्या असे मला वाटे, म्हणून मी त्याच्याकडे फार जातसा नसे; पण आता मात्र मी त्याच्या सहवासाला कायमचा मुकलो हे लक्षात आले म्हणजे मी त्याच्याकड जास्त वेळा गेलो असतो तर बरे झाले असते अशी चुटपूट माझ्या मनाला लागून राहिली आहे. असो. तात्याची एक आठवण मात्र माझ्या चागली लक्षात आहे. मी इंग्रजी चवथीमध्ये होतो, त्या वेळची ही आठवण आहे आमच्या वर्गाचे एक 'झुजार' नावाचे हस्तलिखित मासिक काढले होते मी त्या मासिकाच्या सपादकमडळात नव्हतो; परतु माझ्या वर्गातील मित्रानी तात्याच्याकडून मासिकाकरिता अभिप्राय मिळवून आणण्याची जबाबदारी माझ्यावर टाकली अर्थात् ही गोष्ट तडीस नेणे भाग पडले. मी तात्याना कोणता वेळ मोकळा आहे हे विचारले व त्याप्रमाणे माझ्या सपादक-मडळातील दोन मित्राना दुसऱ्या दिवशी बोलाविले त्या दिवशी सकाळी मी माझ्या मित्राना घेऊन तात्याच्या माडीवर गेलो त्या वेळी तात्या कांहीं तरी वाचत होते. त्यानी माझ्याकडे पाहताच मी सागितलें, "हे माझे

वर्गमित्र, माझ्या वर्गाच्या मासिकावर अभिप्राय मागण्यासाठी आले आहेत." हंसत हसत त्यानी आमचे स्वागत केले व म्हणाले, "बरे! कुठे आहे मासिक?" त्यावर माझे मित्र म्हणाले, "अक तयार आहे; पण त्यावरील मुखपृष्ठ काढावयाचे राहिल्याने सबध अक उद्या दाखवावयास आणतो." खरोखर अभिप्राय मागावयाचा म्हणजे मासिक आधीं दाखवावयास पाहिजे होतें; परतु तसे न होता त्याना त्याची फक्त स्थूल कल्पनाच दिली परतु तात्यांच्या स्वभावातील विशेष हा की, योग्य कारणाकरिता आलेला माणूस नाराज होऊन परत जाऊ नये असे त्याना वाटे त्यामुळे ते हसत हसत म्हणाले, "बरे! कशावर लिहून देऊ अभिप्राय?" यावर माझ्या मित्रानीं अभिप्रायार्थ आणलेला विशिष्ट कागद पुढे केला. तात्यानी चटकन त्यावर चारच ओळी अभिप्राय लिहून दिला; किती अर्थपूर्ण तो होता पहा तो असा :—

"ही कळी उमलण्याच्या आधीच तिचा वास मी घेत आहे; व ही कळी उमलल्यावर आपल्या सुगधाने लोकाना आनदित करील अशी इच्छा प्रकट करतो!"



## केशव ऊर्फ विठ्ठल नारायण केळकर

(तात्यासाहेबांचे पुतणे, पण मानलेले मुलगे, पुणें)

तात्याच्या आठवणी लिहिण्याचे काम अवघड कसे आहे याबाबत मी 'वाङ्मयशोभा' मासिकाच्या ऑगस्ट १९४८ च्या अकातील लेखात उल्लेख केला आहे आमच्या कुटुबियाच्या तात्याच्याबद्दल कितीतरी आठवणी आहेत. पण श्री. बापट यानी ग्रथ-विस्ताराच्या अडचणीमुळे अगदी मोजक्या आठवणी द्याव्या असे सागितल्यावरून खालील मजकूर लिहीत आहे

(१) भाडारकर इन्स्टिटयूटच्या कॉलनीत आमचा एक प्लॉट होता. तो जरा वेडावाकडा होता. त्याच्या शेजारीं कै रगाचार्य रड्डीशास्त्री याचा प्लॉट होता. एकदा तात्या, रगाचार्यशास्त्री व मी असे या प्लॉटची पाहणी करीत असता सहज घरे बाधण्याची दगदग, व्यवहारातील सरळपणा वगैरे गोष्टी निघाल्या. रगाचार्य म्हणाले, "माझा प्लॉट चौरस आखीव आहे. तुमचा जरा तिरकस आहे." त्यावर तात्या हसून चटकन् म्हणाले, "जागेचा मालक 'सरळ' असला म्हणजे मग जागा 'तिरकस' असली तरी बिघडत नाही! पण शास्त्रीबोवा, हे तुमच्याबद्दल नाही हो! दुसऱ्या अनुभवातील ही गोष्ट सागितली."

(२) १९३२ साली तिसऱ्या गोलमेज परिषदेकरिता तात्यांचे लंडनला जाण्याचे ठरले त्या सुमारास कै मुरुडकरबुवा हरदास एकदां घरी आले होते.

मुरुडकरबुवा, तात्या व सौ. ताई यांच्या गप्पा सुरू झाल्या म्हणजे ताईंच्या धार्मिक भावना सभाळून बुवाच्या मार्मिक प्रश्नोत्तरांवर तात्या उत्तरें देत, ते सर्व ऐकण्यासारखे असे. या वेळीं पुढील सवाद झाला मुरुडकरबुवा:—" तात्या ! ही विलायतची दुसरी खेप. पहिल्या खेपेस खाण्यापिण्याचा सराव झाला आहेच; ताईला कांही काळजाचें कारण नाहीं." तात्या :— " कांहीं काळजी नको. पण पहिल्या खेपेस विलायतेस गेलों तेव्हांची गमत तुम्हास माहीत आहेच. बोटीवर शाकाहारी व मासाहारी लोकाच्या जेवणाची सोय असते खरें पण वाढपी लोक एकाद्या वेळीं शाकाहारी माणसाला वाढताना, मांसाहारी लोकाच्या पदार्थांच्या भांड्यातील चमचाच शाकाहारींना वाढताना वापरत ! बुवा ! ब्रह्म आणि माया इतकी जवळजवळ आहेत; दुसरें काय !" बुवा '— " भले ! पण तात्या, तुम्ही काही मायेत गुरफटणारे नाहींत ही आमची खात्री आहे ह "

( ३ ) अलीकडे काही वर्षे तात्याचे इन्कमटॅक्सचे स्टेटमेंट भरून त कचेरीत दाखल करण्याचे काम मीच करीत असे तात्या याबाबत सर्व आकडे व माहिती देत; पण तपशील लिहिण्याचा त्याना फार कटाळा वाटे पण काही [illegible] राहू नये म्हणून शेवटी किरकोळ खाती [illegible] रुपयाची रक्कम लिहीत जा, असे ते मला सांगत. एकदा मीं तशी रक्कम घातली होती तेव्हा इन्कमटॅक्स ऑफिसरने त्याचा खुलासा विचारला मीं त्यास तात्याचे म्हणणे याबाबत काय असें ते सागितले. तेव्हा सदर ऑफिसर म्हणाला, " अहो, हे एन्. सी केळकराचें रिटर्न आहेना ? मग त्यात उणीव काय असावयाची ! आणि समजा, काही रक्कम राहिली तरी, आम्ही आहोतच वसूल करावयाला ! असे झुकते माप देण्याचे [illegible]च कारण नाही !"

( ४ ) लहानपणापासून मला तात्याच्याबरोबर प्रवासास जाण्याची फार इच्छा असे. एकदा मी हट्ट धरल्यावर त्यानी मला मुबईस नेले होते व मुद्दाम दोन तास खर्च करून ट्रॅमने 'मुबई' दाखविली होती ! पुढेहि जमखडी, कुरुदवाड, मिरज या ठिकाणी मी तात्याच्याबरोबर गेलो होतो पण मी १९२४ ते २८ मध्ये कराचीस असताना त्यानी तिकडे याव अशी माझी व प्रि तौ. तात्यासाहेब गोखले याची इच्छा असतानाहि तो योग आला नाही. तात्याच्या सर्व प्रवासात कराची व सिंधमधील इतर गावा ते जाऊ शकले नाहीत १९२८ मध्ये त्यानी कराचीस डिसेंबरमध्ये येण्याचे योजून निघण्याचा दिवसहि ठरला होता पण याच वेळीं माझी बदली मुबईस झाल्याची तार त्याच्या हाती पडताच त्यानी तो बेत रहित केला योगायोग असाच होता असे म्हटलें पाहिजे ! अशीच गोष्ट तात्याच्या अतसमयीं घडली. दिवाळीकरिता म्हणून मी ता १२ आक्टोबरला मुबईहून पुण्यास आलों व ता. १३ ला दुपारी एक्सप्रेसनें परत जावयाचे ठरले होते. पण त्याच दिवशी

दुपारी एक-दीड वाजता त्यांच्या छातीत दुखू लागून ते अस्वस्थ झाले होते, म्हणून मी गेलो नाही. आम्ही औषधोपचार केले व बरे वाटल्यावर तात्या माडी-वर जाऊन कामकाजहि करू लागले होते म्हणून मग मी सध्याकाळच्या गाडीनें जातों म्हणून सागण्याकरिता माडीवर त्याच्या खोलींत गेलो "जातोस? ठीक आहे; जा. काही हरकत नाहीं मला आता बरे वाटते आहे " हेच त्याचे शेवटचे शब्द व तेच त्याचे शेवटचे दर्शन !



## सौ. मालतीबाई केशव ऊर्फ विठ्ठल केळकर

### ( तात्यासाहेबांच्या स्नुषा, पुष्करणी, पुणे )

माझे लग्न १९२५ साला झाले त ठरविण्याच्या वेळी माझे वडील कै. ती. र न भिडे व के ती तात्या याच्यामध्ये जे बोलणे वगैरे झाले त्याची मला पक्की आठवण आहे ती हकीकत थोडक्यात देते – माझे वडील तात्याच्या घरी गेले व म्हणाले, " मी स्थळाविषयी चाकशी करण्याकरिता डॉ गणपुले याच्या सागण्या-वरून आप आ ऐ आलो आहे आपले मुलगे लग्नाचे आहेत असे कळते." तात्या म्हणाले, " माझा मुलगा व पुतण्या दोघेहि लग्नाचे आहेत तुम्ही पुतण्याकरिता बघता की मुलाकरिता? मला दोघाचीहि लग्ने एकदमच करावयाची आहेत." माझे वडील म्हणाले, " आम्ही मध्यम स्थितीतली मडळी; मुलाकरिता म्हणावें तर आम्हाला झेपणार नाही, तेव्हा पुतण्याची चौकशी करतो " तात्या म्हणाले, " खर्चाचा मुळीच प्रश्न नाहीं पुतण्या असला तरी मी त्याचे माझ्या मुलाप्रमाणेच सगोपन वगैरे केले आहे व पुढेहि तसेच करीन शिवाय माझ्या बाबतीत हुंड्याचा वगैरे प्रश्नच नाही मी ... हुडा घेणार नाही पुतण्याचे वडील, आई त्याच्या लहानपणीच वारली; पण तेव्हापासून मी मला तीन मुलगे आहेत असेच मानले व त्याप्रमाणेच सर्व काही करीत आहे " तात्याचे हे कळकळीचें बोलणे ऐकल्या-वर माझ्या वडिलाना जास्त काहीएक विचारण्याची इच्छा झाली नाही. ते घरी परत आले व आम्हास सर्व हकीकत सागितली व त्याप्रमाणे माझे लग्न होऊन मी 'केळकर' झाले मी कराचीहून एकदा परत आल्यावर तात्यानी माझ्या कराचीच्या बिऱ्हाडाबाबत सर्व चौकशी केली 'त्याना' पगार किती, खर्च किती, याची चौकशी केली व मग म्हणाले, " हे पाहा, दोन पैसे कमी किंवा जास्त मिळण्याचा प्रश्न नाहीं; पण मिळकतीच्या आत खर्च असला पाहिजे हे जन्मसूत्र लक्षात ठेव व हेच मी सर्वांना सागत असतो." केळकर-घराण्यात आल्यावर खरोखर माहेर आणि सासर याबाबत आम्हां सुनांना कधीहि फरक वाटला नाहीं, इतक्या ममतेनें तात्या आणि ताई यानीं आम्हास वागविलें त्याचा केव्हांहि उल्लेख करतांना मामंजी

आणि सासूबाई हे शब्दच आमच्या तोंडात येत नाहीत! माझ्या वडिलांच्या जवळ तात्यांनी काढिलेले शब्द अक्षरशः खरे ठरले आहेत हे तर सांगण्याचे कारणच नाही!



## सौ. शांताबाई केळकर

( तात्यासाहेबांच्या धाकट्या स्नुषा, पुष्करणी, पुणे )

माझी ही आठवण दिसायला अगदी साधी आहे, परंतु तिने ती सासूबाई-च्या व ती मामजींच्या स्वभावाची बरोबर परीक्षा होईल सासूबाईंची मामजींवरील निष्ठा आणि मामजींची सासूबाईंवरील भक्ति एकासारखी एक होती मामजींनी खाल्ल्याशिवाय सासूबाईंनी कधी खाल्ले नाही बारीकसारीक का खाण्याचा पदार्थ असेना, तो मामजींना आधी देऊन झाल्यावरच त्यांनी तो तोंडात घातला तर घालावा. मामजी गेले त्यांच्या आदल्या वर्षीची गोष्ट आहे त्या वेळी सासूबाई आजारी झाल्या होत्या त्यामुळे फार अशक्त झाल्या पण डॉक्टर-वैद्यांचे औषध न घेण्याचा त्यांचा निश्चय होता त्यांची मनापासून इच्छा की, आता औषध घ्यावयाचे नाही या दुखण्यातच आपले सोने व्हावे! पण त्यांची प्रकृति इतकी क्षीण होऊ लागली होती की, अखेर मामजींनी आग्रह धरून त्यांचे मन वळविले एक दिवस ते स्वतः त्यांना घेऊन डॉ ढमढेरे यांच्याकडे गेले व चांगली परीक्षा करून त्यांच्याकरिता औषध चालू केले डॉक्टरांच्या म्हण-ण्यांत त्यांनी खाणे-पिणे जास्त वाढविले पाहिजे, व त्यांनी मुख्यतः शक्तीवर औषध घेतलें पाहिजे म्हणून त्यांनी शक्तीच्या औषधाच्या गोळ्या लिहून दिल्या. त्या गोळ्या सकाळी चहाच्या वेळी एक एक याप्रमाणे घ्यावयाच्या होत्या. आमच्या येथल्या सगळ्या मंडळीचा सकाळचा चहा मामजींच्याबरोबर व्हाव-याचा नेहमीची पद्धत अशी असे की, चहाच्या आधी एका चांदीच्या वाटीत दुधात काही औषध सासूबाई मामजींपुढे ठेवीत व काही अधिक चौकशी न करता सासूबाईंच्याकरिता मुकाट्याने तो घोट ते पिऊन मग चहा घेत एक दिवस 'यांनी' सहज मामजींना विचारले की, "गोळी कसली घेता! कोयनेलची की काय?" त्यावर ते म्हणाले, "छे बुवा! ते मला ठाऊक नाही. तिने गोळी व दूध आणून ठेवले, ते मी प्यालो!" यावरून गोळी कसली व कशाकरिता याची सहज बोलणी सुरू झाली तेव्हा सासूबाईंनीच मग बाहेर येऊन [illegible] की, "कोयनेलची गोळी नाही मी घेतें शक्तीच्या गोळ्या, त्यापैकी इकडे एक गोळी देते" तेव्हा मात्र मनोमन सर्वांना काय समजावयाचे ते समजलें! सर्वांनाच तो काही वेळ हसण्याचा विषय झाला होता "शक्तीच्या गोळ्या मला आता घेऊन काय करा-वयाच्या आहेत आणि मला शक्तीच्या गोळ्या हव्यात तर, माझ्यापेक्षा इकडेच



तात्यासाहेब केळकर आणि सौ. दुर्गाताई केळकर

त्या आधीं दिल्या पाहिजेत " हीच मनातली त्याची इच्छा! आणि म्हणून त्या स्वतः गोळी घेण्याआधी मुकाट्याने मामजीच्या पुढे चहाच्या वेळीं ठेवीत, व मगच त्या स्वतः घेत!!



## तात्यासाहेब केळकर यांचें पत्र

( परस्परं भावयन्तः —

[ ती. तात्यासाहेब यानी आपल्या 'गतगोष्टी'त आपल्या कुटुंबियाचें वर्णन करताना आपल्या सहधर्मचारिणी दुर्गाताई ह्याच्यासबधीं काढलेले हार्दिक उद्गार सुप्रसिद्धच आहेत ती. मातोश्री ताईसाहेब यानी ती. तात्यासाहेब याना लिहिलेले एक खाजगी नमुनेदार पत्रहि तेथे त्यानी उद्धृत केले आहे. उलट, तात्यासाहेब यानी लिहिलेले एक खाजगी पत्र खाली उद्धृत करीत आहे हे पत्र २३ नोव्हबर १९४८ चे असून ते अहमदाबादेस तात्यासाहेब याचे नातू श्रीयुत श्रीधरपत देशपाडे ( डॉ कमलाबाईचे चिरंजीव ) एअरो ड्रोम ऑफिसर असताना, त्यास त्यानी लिहिलेले आहे त्या वेळीं घरातील काही मडळीची दुखणींबाणी काढून थकल्यामुळे ताईसाहेब विश्रातीसाठी अहमदाबादेस आठ-पधरा दिवस राहण्यास गेल्या होत्या रा देशपाडे यास तात्यासाहेब यानी लिहिलेल्या पत्रात ताई-साहेब ह्याच्याबद्दल तात्यासाहेब ह्याच्या जिव्हाळयाच्या गाढ भावना व्यक्त झाल्या आहेत तो मजकूर पुढे देत आहे. — संपादक. ]

" ता १ डिसेबरला मालिनी व मुले तेथून गेली तर ताईची करमणूक कमी होईल म्हणून त्याचे जाणे आणखी पुढे ढकलता आले तर पाहा ती गेली तर ताई इकडे परत फिरण्याची घाई करील म्हणून मुद्दाम सुचविले आहे ताईला येथे अलीकडे इतके काम पडले की, मी ते पाहूनच थकलो; म्हणून तिला खरा कटाळा तेथे राहण्याचा येईपर्यंत तिला तू तेथून सोडू नको ती येथे घरी नसता, आमच्या घराच्या 'खानावळी'च्या किंवा 'पाश्चिमात्या' व्यवस्थेची घडी अधिक अगवळणी सर्वांना बसण्याचा सभव आहे! तात्पर्य, ताईने इकडे येण्याची घाई करू नये; किंवा दुसरा पर्याय, इकडे आल्यास मोजके ठरीव काम पत्करण्याचे तिने शिकावे मी नाही का, जवण्याच्या व चहाच्या दोन वेळाशिवाय खाली न जाण्याचे व्रत साभाळीत? तसे ताईनेहि खालच्याखाली थोडे करावे आमच्या पक्तीला बसून तिने जेवावें अशी माझी फार इच्छा; पण दोन प्रहरीं दोन वाजता मी वामकुक्षी घेऊन उठतो तेव्हा तिला कोठे थोडे लवडायला सापडते दोघा मुलीच्या प्रकृति बऱ्या नव्हत्या हे खरें; परतु काम अगावाहेर थोडे टाकलें तर टाकता येणारच नाही असे नाही आमच्या × × × पहाना! स्वतः जगाचा काही उपयोग न करता

लोकांवर रागावण्याचे व टाकून बोलण्याचें अवसान केवढे! ताईला म्हणावे ते थोडे शीक ! !

ताईला साग की, घरची देवपूजा, नदादीप व्यवस्थित चालू आहेत. नदादीपाचे लिहिण्याचे कारण असें कीं, परवा अहमदाबादेस जाण्यास निघताना, घरांतून बाहेर पडताना, तिने शेवटचे जे एक काम केलेले मी पाहिलें ते नदादीपाची वात ठाकठीक करणे! ताई नसल्याने माजरीला मात्र दुःख होत असेल. कारण एक माझ्याशिवाय जे कोण तिला पाहील ते तिच्यावर छडी उगारते. गोवर्धन सस्थेच्या गोदूबाईंची फेरी मात्र झालेली पाहिली नाही. त्याना आमच्या घरी 'आई' आहे, पण इतर कोणी आत नाही ! परक्याहि माणसाना अगत्याने वागविण्यात [illegible] बरोबरी कोणी करील असे मला वाटत नाही. हो विसरलो! केळयाचे घड निघायला एकदम चार-पाच झाले आहेत. ताईला म्हणावे, तुझी आठवण करीत आम्ही सर्व खाऊ ! पण ती येथे असली तरी काय? तिने आम्हा सर्वांना दिलेला जिन्नस आपल्या हातान घेऊन आपल्या तोंडात घातलेला मी कधी पाहिल्याचे स्मरत नाही तसेच या घरच्या जिनसाचें !"



## दुर्गाताई केळकर

(——श्रेयः परमवाप्स्यथ ।)

[ ती [illegible] याचे घर म्हणजे साहित्यिकाचे छोटेसे समेलनच! तात्यासाहेबाच्या एकषष्टि-समारभाच्या वेळी अध्यक्ष लोकनायक [illegible] अणे यानी यासबधीं एक फार मार्मिक दृष्टान्त देऊन वर्णन केले होते ते म्हणाले, "मडनमिश्राचे घर [illegible]? म्हणून एकजण कोणाजवळ चौकशी करीत असता, त्याने खूण सागितली की, ज्याच्या दरवाजात टागलेल्या पिंजऱ्यातील राघ-मैनाहि काव्याची चर्चा करीत असतील किंवा ज्याच्या येथील गडीमोलकरणीहि वेदान्ताच्या प्रश्नावर वाद करीत असतील ते मडनमिश्राचे घर! असेच आपल्या तात्यासाहेबाच्या घरात आबालवृद्धांच्या व्यवसायाकडे पाहिले म्हणजे असाच अनुभव येतो." तात्यासाहेबाचे मुलगे, मुली, पुतणे, भाऊ, नातू सर्वच कमी अधिक प्रमाणात लेखक म्हणून माहीत आहेत पण सर्वांत तात्यासाहेबाच्या निकट असूनहि लेखणीला कधीकाळीच स्पर्श केला असेल, तर तो ती मातोश्री दुर्गाताईनी, पण असे [illegible] त्यानीं ती तात्यासाहेबाना लिहिलेलें जे एक पत्र तात्यासाहेब यानी आपल्या 'गतगोष्टी'त छापले आहे, त्यावरून ताईच्याहि भक्तिभावयुक्त लेखनाला उत्तम वाङ्मयाची लज्जत आलेली दिसतेच ती दुर्गाताईना क्वचितच पत्र लिहिण्यास बसण्याइतकी फुरसत मापडावयाची; व तसा फुरसतीचा वेळ बहुधा त्याच्या आवडीच्या धार्मिक व

वेदान्तपर वाचनपठनातच जावयाचा. यामुळे त्याना लिहिण्याचा बहुधा प्रसंगच येत नसे. अलीकडे त्यांचे धाकटे चिरंजीव रा. यशवतराव हे त्याच्या नेहमी पाठीमागें लागून म्हणत कीं, "ताई, आता तू फावल्या वेळांत आपल्या घरच्या जुन्या जुन्या आठवणी लिहून का काढीत नाहीस ! तसें केल्यास ती एक हरिवशासारखी सुदर बखरच तयार होईल; म्हणजे तुलाहि करमणूक होईल व आम्हांलाहि कितीतरी जुनी माहिती मिळेल !" पुढें ताईच्या कन्या डॉ. कमलाआक्का यानीं ताई आजारी असता त्याना अनेक पुस्तके रोज वाचून ऐकविलीं. त्यांत लक्ष्मीबाई टिळकाचें आत्मचरित्रहि वाचलें त्या वेळी पुन हा आठवणी लिहून ठेवण्याचा प्रश्न निघाला होता तेव्हा त्यानी कधी नव्हे तें आळेंबळें लिहून पाहण्याचा निश्चय केला, व आपल्या पठनाच्या पदाच्या जुन्या वहींतच दोन-चार कलमे लिहिलीहि; पण ते काम तितकेंच झाले तेथेच थाबले मला स्वतःला मातोश्री ताईच्याकडून ती तात्यासाहेबासबधी थोडाबहुत आठवणीवजा मजकूर प्रस्तुत ग्रथाकरिता मिळावा अशी फार इच्छा होती आज चाळीस वर्षें त्या उभयतानी मला प्रत्यक्ष मुलासारखेच, वागविलेले आहे. त्या परस्परांची परस्पराविषयींची भावना मला माहीत असल्यामुळे ताईच्याकडून असा मजकूर [illegible] मला मोह पडणे स्वाभाविकच होय, परतु [illegible] अत्यत नाजूक व कठिण स्थितीत त्याच्याजवळ असा शब्द काढणे माझ्या अगदी जिवावर आले; कारण असे करणें म्हणजे त्याच्या दुःखाची खपली [illegible] आहे, हे जाणून मी माझी जिज्ञासा दाबून धरली, परतु सुदैवाने वर उल्लेखिलेल्या ती तात्याच्याविषयींचा तीं. ताईच्या हातचा थोडा मजकूर प्रिन्सिपॉल कमलाबाआक्काच्या कृपेने उपलब्ध झाला, तोच शिरोधार्य मानून पुढे देत आहे — संपादक ]

"मागील सिंहावलोकन मी मनःपूर्वक व कृतज्ञतापूर्वक आमच्या उभयताच्या काही आठवणी लिहीत आहे मला लिहावेसे पुष्कळ वाटतें, परतु लिहिता येत नाहीं मनातले विचार मनातच जिरतात. आमचा आयुष्यक्रम साठ वर्षें ईश्वराच्या कृपेने चागल्या रीतीने गेला. आमच्यामध्ये केव्हाहि तिरस्कार, कुरबूर अगर कडवटपणा आला नाही. याला कारण तिकडला मोठेपणा, यांत सशय नाही मी काहीं शिकलेली नाहीं इकडल्या विद्वत्तेला आपण बायको म्हणजे शालजोडीला ठिगळच असे मला नेहमी वाटते. पण खरी सुसस्कृत माणसे, दुसरें माणूस अडाणी असले तरी, त्याबद्दल त्रास देत नाहींत व आपल्या वागणुकीने त्यालाहि ते सुशिक्षित व विचारी करतात व तशीच माझी निःसशय परिस्थिति झाली आहे. मी कोणास म्हटले तर खोटे वाटते; पण आता लोकाना मी पूर्ण सुशिक्षित आहे असे वाटतें. कारण याचा सहवास व आचरणाची शिकवण !

माझे सासर-माहेर हेच असल्याने सासूबाईचे व मामजींचे वागणे माझ्याबरोबर

मुलीप्रमाणे असे. त्यामुळे ते घरात याना रागावयाचें किंवा बोलावयाचे असल्यास त्याना न बोलता माझ्याजवळ बोलत पहिल्या वेळी तीर्थरूप टिळक तुरुगात गेले त्या वेळेस त्याच्या पाहुण्याची ये-जा आमच्याकडे व्हायची व खर्चाची कशी तरी तोड-मिळवणी करावी लागे मामजींना याच्या खर्चाची फार काळजी वाटे. एक दिवस ते मला म्हणाले, "अग, हा सुजेचा मोठेपणा आहे! यापुढे याचे सासारिक खर्च उभे राहिले म्हणजे याना कळेल!" पुढे स्वतःहि मला म्हणावयाचे झाले, "पहा बोवा, एवढ्या पैशात सर्व काही केलें पाहिजे. खर्च बेताने करा." परंतु त्या वेळे-पासून आतापर्यंत देवदयेने आम्हाला पैसा प्रपचाला कमी पडला असे कधीहि झाले नाही व मीहि कधी वायफळ खर्च केला नाही.

आमच्या घरी लोकाच्या कल्पनेप्रमाणे स्वैपाकी, आचारी वगैरे हवा; पण माझ्या स्वभावाला ते आवडत नाही. आपण आपल्या माणसाला काळजीनें हवे तसे चागले करून घालू, तसे दुसऱ्याच्या हातून होणार नाही या कल्पनेमुळे विशिष्ट [illegible], मी कधी आचारी ठेवू दिला नाही अजूनहि आपल्या हातून होईल तसा स्वयपाक करून आपण वाढावे यातच समाधान वाटतें."



## संपूर्णानन्दजी

(साहित्य वाचस्पति, शिक्षणमत्री, सयुक्तप्रांत)

मुझे न [illegible]चि केलकर से ऐसा घनिष्ठ परिचय कभी भी प्राप्त न हुआ कि कोई सस्मरण लिख सकू। मैने उनकी रचनाओ को मराठी और हिन्दी मे देखा है और उन के सार्वजनिक जीवन के स्वरूप से परिचित हूँ। भारतकी राजनातिक [illegible] के सबधमे समय समयपर उनका जो दृष्टिकोण होता था उससे कोई भले ही पूणतया सम्मत न हो परन्तु यह बात तो मै समजता हूँ सर्वसम्मत है कि वह उदात्त देशभक्त, निष्ठावान सार्वजनिक कार्यकर्ता, आदरणीय विद्वान् और भारतीय सस्कृति और परम्परा के अनन्य प्रेमी थे।

मै इतना ही लिखने मे अपने को समर्थ पाता हू!



## डॉ. बाबूरामजी सक्सेना

(एम्. ए., प्रिन्सिपॉल, के. पी. महाविद्यालय, प्रयाग)

स्वर्गीय श्री. नरसिंह चिन्तामणि केलकर महोदय के दर्शन मुझे हिन्दी साहित्य सम्मेलन के १९४० वाले पूना अधिवेशन मे हुए थे। उस समय भी हिन्दु-

स्तानी और हिन्दी का संघर्ष चल रहा था। श्री केलकर साहब ने जिन जोरदार शब्दो मे हिन्दी के पक्ष का समर्थन किया था उन से हमे बहुत बल मिला। आज भी हमारा संघष जारी है। महाराष्ट्रका लोकमत एकनिष्ठा से हिन्दीका समर्थक है। इस लोकमत को जागरूक करने मे केलकर जी का सक्रिय सहयोग बराबर मिलता रहा। इसके लिए उनका आभार मानते हुए अपनी श्रद्धांजलि अर्पित करते है।

※

## नरदेवशास्त्री

( आचार्य, गुरुकुल-महाविद्यालय, हरद्वार )

( १ ) मेरा और केलकर जी का अच्छा परिचय था। मैं १९२० से १९३२ तक ऑल इण्डिया काग्रेस कमिटी का सदस्य था, उस समय श्री केलकरजी भी सदस्य थे तभी से परिचय हो गया। ऑल इण्डिया कॉग्रेस कमिटी मे जो भिन्न भिन्न विषयो पर वाद-विवाद चल पडते थे उनमें श्री केलकर भाग लेते थे तब इनकी तर्कशैली, [illegible] पटुता देखनेयोग्य होती थी। ऑल इण्डिया काग्रेस कमिटी अथवा काग्रेस के महाधिवेशन मे मराठाशाही पगडीवाले दो ही व्यक्ति दिखा-लायी पडते थे। एक श्री केलकर, दूसरे श्री अणे। इन दोनो को देखकर स्व राष्ट्र-सूत्रधार लोकमान्य बाल गगाधर तिलक का स्मरण हो आता था। कानपूर काग्रेस के अवसर पर एक वादविवाद मे श्री केलकरजीने महात्मा गाधीजीसे स्पष्ट शब्दो में कहा था कि गुलाब के जलसे प्लेग के कीटाणु दूर नहीं किये जा सकते। इसी प्रकार अहिंसा से राज्यप्राप्ति अथवा राज्यशकट-सचालन भी असम्भव है। लोकमान्य तिलक के निधन के पश्चात् केसरी की कीर्ति को अक्षुण्ण बनाये रख-नेमे श्री केलकर जी की दूरदर्शिता तथा लेखनचातुर्यही कारण है। श्री केलकर जैसा स्पष्टवादी क्वचित विरले ही होगे। महात्मा गाधीजी भी इन की टीका-टिप्पणी को सुनकर चुप रहते थे। वैसे महात्मा गाधी तथा श्री केलकर जी का उग्र मतभेद रहा; पर दोनो परस्पर आदरभाव रखते थे। यदि श्री केल-कर थोडासा गरम बनकर महात्मा गाधी का साथ दे देते तो वे कभी के काग्रेस के अध्यक्ष अथवा राष्ट्रपति बन गये होते।

श्री. केलकर जी दो एक बार बृहन्महाराष्ट्र परिषद् मे मिले थे। उनके मराठी के भाषण सुनने योग्य थे। वे बोलते थे तो ऐसा प्रतीत होता था कि साक्षात् मूर्तिमान् महाराष्ट्र बोल रहा है। वे लिखते थे तो, ऐसा भान होता था कि महाराष्ट्र का हृदय लिख रहा है। श्री. केलकर जी सस्कृत वाङ्मय के भी प्रकाण्ड पण्डित थे। कानपुर के काग्रेस के अवसर पर कानपुर तथा काशी के पण्डित

उनसे मिलने आये थे – तब संस्कृत मे वार्तालाप प्रारम्भ हुआ – क्यो कि पण्डितो को अगरेजी नही आती थी और केलकर हिन्दी समजते तो थे, पर बोल नही सकते थे। कैसी सुन्दर सरल सस्कृत थी श्री केलकरजी की! बात-बातमे श्री केलकर सस्कृत श्लोक बोलते थे। पण्डितगण केलकर के पाण्डित्य पर मुग्ध हुए।

जबतक ससारमे महाराष्ट्र और मराठी भाषा जीवित रहेगी तबतक श्री केलकरजी के नाम को कोई मिटा नही सकता।



## य. सी. आगरकर

( संपादक, ' हिन्दी स्वराज्य ', खडवा )

' हिन्दी स्वराज्य ' के भू. पू. सपादक तथा सस्थापक स्व. सी. मा. आगरकरजी का उनसे परिचय रहा है। सदियों से परदास्य की शृखला मे आबद्ध भारत का विमोचन तथा उत्थान करने मे भारत की जिन इनी गिनी सस्थाओ तथा व्यक्तियो ने, प्रतिकूल परिस्थितियो के होने पर भी, प्रमुखता से भाग लिया तथा उन्नति की, उनमे ' केसरी मराठा ' सस्था तथा श्री तात्यासाहब केलकरजी का स्थान काफी ऊचा है। और मुझे आशा है इतिहास इसे अवश्य योग्य स्थान देगा। पूना की केसरी-मराठा सस्था तथा श्री केलकरजी का सबध व्यष्टि और समष्टि के समान अभिन्न था, और यही कारण है कि श्रद्धेय केलकरजी के स्वर्गवास से उपरोक्त सस्था की जो हानी हुई है, शायद ही कोई दूसरा उसकी पूर्ति कर सके।

( २ ) श्री केलकरजी के प्रभावशाली व्यक्तित्व का मूल कारण है आपकी दुर्दम्य उद्योगप्रियता, प्रगाढ विद्वत्ता तथा किसी भी समय मार्गदर्शन करनेवाली पूर्ण विकसित प्रज्ञा। गत प्रथम महायुद्ध क बाद स्वतत्रता प्राप्तिके लिए आपने जो दरख्वास्त कमसे कम समय में तैयार की थी, वह तथा ( इन्टरनॅशनल कमिटी ऑफ बर्थ राइट्स् ) के सामने पेश करने के लिए आपके द्वारा तैयार की गयी प्रश्न-मालिका आपके राजनैतिक बुद्धि की भी परिचायक है।

( ३ ) आपका सस्कृत तथा मराठी भाषापर अधिकार अनुपम था। आपकी लेखनी तो साहित्यके प्रत्येक अग-प्रत्यग से परिचित थी। आपकी ललित रचानाए, प्रबंध तथा कानूनका विवेचन हमेशाही सुरुचिके पोषक तथा सवर्धक रहे है। मराठी साहित्य पर आपका जो अधिकार था, उसी के कारण आपको ' साहित्य सम्राट् ' की उपाधी से विभूषित किया गया था। आपके साहित्य से नवसाहित्यिको को निश्चय योग्य मार्गदर्शन तथा प्रकाश प्राप्त होगा।

( ४ ) यद्यपि श्री केलकरजी गत पीढी के प्रतिनिधि थे फिरभी वर्तमान समस्याओं का कालोचित समन्वय करने की आपमे पात्रता थी। यही कारण था कि आप तरुणो और वृद्धो दोनों ही प्रकार के लोगो में लोकप्रिय थे। ऐसे महान पुरुष को खोकर महाराष्ट्रने एक महान कवि, साहित्यसम्राट्, उत्तम वकील, एक उत्तम तथा योग्य आलोचक को खोया है, ।जगन। पूर्ति निकट भविष्य मे होना कठिन ही नही, वरन् असभव सा प्रतात होता है।



## गोपीवल्लभ उपाध्याय

( संपादक, 'वीणा', इंदौर )

( १ ) तात्यासाहेब का नाम तो मै अपने विद्यार्थी-जीवन मे ही स्व. लोकमान्य बाल गगाधर तिलक के सहकारी के नाते सुन चुका था।

( २ ) सन १९१८ के अगस्त मे दैवयोग से मुझे पूना के चित्रशाला प्रेस मे हिन्दी " चित्रमय जगत् " के सपादक के रूप मे जाना पडा; और वहाँ पहुँचनेपर ग।ना। ी स्व. लो तिलक द्वारा हिन्दी 'गीता-रहस्य' के तृतीय मुद्रण के लिए उपमुद्रित-सशोधन की सेवा के लिए प्रोत्साहन पाने के बाद तात्यासाहब के भाषण सुनने का अवसर प्राप्त हुआ।

( ३ ) इसके बाद तीसरे दिन जब लोकमान्य के "अस्थि-पुष्प" पूना लाये गये और उनका जो विराट चल-समारोह स्टेशनसे ओकारेश्वर तक गया, उस समय भी पूना के अन्य नेताओं के साथ साथ तात्यासाहबने अपने मनोभाव जिन शब्दोमे व्यक्त किये, वे चिरकालतक विस्मृत न हो सके।

( ४ ) तात्यासाहब के विपुल साहित्य में से अनेक ग्रथ आज भी ऐसे है, जिनके हिन्दी अनुवाद निकलने चाहिए। परतु नही कहा जा सकता कि उनके उत्तराधिकारी इस विषय मे क्या योजना कर रहे हैं।



## गोविन्दशास्त्री दुगवेकर

( वर्तमानपत्रकार, काशी )

( १ ) सन १९०५ के दिसम्बर मे कांग्रेसके काशी अधिवेशन के अवसरपर देशभक्त नरसिंह चिन्तामणि केलकर जी के दर्शनका मुझे सौभाग्य प्राप्त हुआ।

( २ ) उस समय तात्यासाहबने मुझे एक महत्त्वपूर्ण सूचना दी। उन्होने

कहा, – " यदि आपकी सच्ची लगन हो, तो इस क्षेत्रमे आइये; क्योकि आर्थिक दृष्टिसे यह क्षेत्र लाभदायक नही। इसमे यही सिद्धान्त रखना होगाः– अकृत्वा परसन्ताप अगत्वा खलमन्दिरम् । अक्लेशयित्वा चात्मान यदल्पमपि तब्दहु॥ साथ ही कहा "अमृत यदयाचितम् । " तात्यासाहबके जीवनसे यही बात सिद्ध हुई । यदि वे पत्रकार न बनकर वकालतही करते रहते, लाखो रुपया बटोर लेते; क्योकि उनकी प्रतिभा प. मोतीलाल नेहरु से किसी प्रकार कम नही थी।

( ३ ) मैने काशीमे 'भारतधर्म', साप्ताहिक आरम्भ किया। उसके लिए रवीन्द्रनाथ ठाकुर, तुषारकान्ति घोष, अय्यगार, हसराज, श्रीमन्त खापर्डे, जयकर, नेहरू, ब्रेलवी, हार्निमन आदि जिन विद्वानोसे सन्देश और आशीर्वाद मागे थे, उनमे सबसे पहले हमे तात्यासाहबका सन्देश, आर्शीवाद ओर अभिनन्दन प्राप्त हुआ था। साथ ही समय समयपर उनमे उत्कृष्ट परामर्श मिला करते थे।

( ४ ) काशीमे जब ऑल इण्डिया काग्रेस कमेटी की बैठक हुई, तब वे यहा पधारे थे और लोकमान्य तिलक, श्रीमन्त खापर्डे, करदीकर, ग्वालिकर आदि के साथ रामचद्र नायक कालियाके बागमे ठहरे थे। मैं भी जाया आया करता और वे बडे ही प्रेमका व्यवहार करते थे। थे ही बडे नियमित। एक बार उक्त महापुरुषोको श्रीभारतधर्म महामण्डलमे पधारनेका हमने निमत्रण किया। समय सन्ध्याके चार बजेका निश्चय हुआ, परन्तु हम तीन बजे ही सबको ले जानेके लिये उपस्थित हो गये। लोकमान्य, खापर्डे और करन्दीकर हमारे साथ हो लिये; परन्तु उनसे चलने के लिये कहाँ गया, तो वे बोले, – आप लोग चलिये, मै ठीक चार बजे पहुच जाऊगा। तदनुसार वे यथा समय पहुच गये।

( ५ ) उन्होने महामण्डलके सब कार्य विभागोका बडी बारीकीसे निरीक्षण किया। जब उन्होने वहाँ का विशाल यज्ञमण्डप देखा और जाना कि, इसमे अब-तक दो सौ से अधिक श्रौत स्मार्त यज्ञ हो चुके हैं और समय समयपर हुआ करते हैं, तब उन्होने प्रस्ताव किया कि, इसीके साथ एक मीमासा विद्यालय खोलिये और अध्यापक रूपसे पण्डितप्रवर वामनशास्त्री किजवडेकर को बुला लीजिये, मै उन्हे भेज दूगा; परन्तु उनकी आज्ञा का पालन अर्थाभावके कारण न हो सका। सब क्षेत्रोमे सघटन करनेमे वे सिद्ध हस्त थे। वे गाना बजाना जानते थे या नहीं मैं नही जानता, पर इसमे सन्देह नहीं कि, वे सगीतके मर्मज्ञ थे। उक्त सब नेताओ को एक दिन स्थानीय महाराष्ट्रियोकी ओरसे पचगगा घाटपर निमन्त्रित किया। तब सभाके आरम्भमे मेरे अनुजने 'हर हर महादेव' शीर्षक मेरी कविता गा कर सुनायी। आलाप आरम्भ होतेही झट्से उन्होने कहा यह भूपराग है और बडाही समयानुकूल है। मुझसे लोगोने पूछा,–ये कौन हैं?

मैने उत्तर दिया, ये लोकमान्यके प्रधान शिष्य हैं। यह बात उन्होंने सुन ली, तुरन्त बोल उठे – हम आप सभी लोकमान्यके शिष्य हैं। किसीको प्रधान या अप्रधान कहना उचित नही है।

( ६ ) केलकरजी सुधारवादी थे और वैदिक सनातनी भी; परन्तु उनका सुधार या धर्मप्रेम अन्धा नही था, आखोंवाला था। मै 'गृहस्थ' पत्रका सम्पादक था। उसमे केलकरके चक्षुष्मान् विचारोंको छापना चाहता था। सबसे पहले उनकी 'स्वराज्यके मार्गके रोडे' यह लेखमाला चुनी। उनसे मैने निवेदन किया कि, आपके लेखोंको मै अपने मासिकके लिए अनूदित करना चाहता हू, आज्ञा दीजिये। उन्होंने मोडी लिपिमे उत्तर दिया कि, आप मेरे साहित्यका उपयोग कर सकते है। मुझे प्रसन्नता होगी। मै उनके लेख छापने लगा। उनके तर्क अकाट्य होते थे और उनके प्रतिपक्षीभी निरुत्तर हो जाते थे। मैने उनका अन्तिम लेख 'व्यायाम ज्ञानकोष' का अनुवाद करते समय अनूदित किया। उसमे उनकी शालीनता प्रकट हुई है।



## Vaikunt Lallubhai Mehta

*( Minister for Finance, Bombay Government )*

My contact with Sjt Tatyasaheb Kelkar was not so intimate as to entitle me to write about him My excuse in penning these few lines however, is that for the last 45 years I held him in great respect The more I came to know him the more that regard grew

Almost from behind a curtain, as a youngster, I first saw him when he visited my father along with the late Mr Gopal Krishna Gokhale in the early years of the present century As a boy, I remember Mr. Gokhale telling my father that he ( Kelkar ) was the most reasonable among the "extremists" with whom politics brought Mr Gokhale into conflict Devoted follower as he was of the late Lokmanya Tilak, Mr Kelkar went out of his way to establish contacts with those not of his way of thought, and I have a recollection of his having written occasionally to the "Times of India" or its weekly edition.

Co-operative work brought me in contact with Sjt Tatyasaheb nearly thirty years ago, but that was, again, from a distance. Knowing as I did the distrust with which political workers of the

day viewed the co-operative movement, I was surprised to find Sjt. Tatyasaheb writing a paper for a Co-operative Conference and then attending its session to present the paper When the organizing Secretary of the Co-operative Institute Rao Bahadur S. S Talmaki and I approached him to join as a founder member, we were both happy that he agreed to do so without hesitation. His political views did not, apparently, prevent Sjt Tatyasaheb from participating in a worthy cause either with workers belonging to other schools of thought or with Government

That attitude of his was, I believe, characteristic of the man It was no narrow sectarian spirit in which he approached life's problems Tolerance, considerateness, broadmindedness these, he appreciated, could go with an unshakable faith in one's own creed. The charitableness and spirit of comradeship which flowed from this essentially Hindu trait in the late Tatyasaheb's character made him loved and respected even by those like myself who were not priviledged to know him at close quarters



## M. R. Jayakar

( *Vice-Chancellor, Poona-University Bombay* )

I got to know Mr. Kelkar for the first time in the days which followed the incarceration of Lokmanya Tilak in the year 1908. Owing to some Press articles, which he had published, he was hauled up for contempt in the High Court of Bombay The late Mr Baptista defended him and we had a consultation as to what could be done in the matter without loss of self-respect. The Law of Contempt is very strict and the offence to be purged only by a proper apology, without which the punishment may be long and harrassing. During these consultations, I discovered Tatyasaheb's great sense of realism balanced between his duty to his country and to himself. After careful thinking, he arrived at what may be regarded as a proper *via media.* Our acquaintance grew after that time and it developed into greater intimacy during the days when the no-change programme of the Congress and its antipathy to Council entry had to be met by a forceful propaganda in favour of Council entry and the acceptance of office The Swaraj Party was then contemplated and, when the cause was not popular, Mr.

